भाषांतरमाला क्र. ४३ (२)



# डॉन क्विक्झोट

## भाग २

सरव्हँटिस-लिखित

"DON QUIXOTE" Part II

या कादंबरीचा मराठी अनुवाद

अनुवादक

दा. न. शिखरे, एम्. ए.




महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ

मुंबई

# निवेदन

आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृति मंडळाने वाङ्मयनिर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा महाकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती-विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे प्रगल्भ स्वरूप व दर्जा येण्याकरिता मराठी भाषेत विज्ञान, तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे आणि तंत्रविज्ञान या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत् माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल, ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागेल. जोपर्यन्त माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात, तोपर्यन्त शिक्षण सकस बनत नाही. संशोधनाला परावलंबित्व राहाते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटिन इत्यादी पश्चिमी भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश–अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथाचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर–योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे ३०० पुस्तके निवडली आहेत. होमर व्हर्जिल, इस्किलस्, ॲरिस्टोफेनीस्, युरिपिडिस्, प्लेटो, ॲरिस्टॉटल्, थॉमस् ॲक्वाइनस्, न्यूटन, डार्विन, रुसो, कांट, हेगेल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीयर, टॉलस्टॉय्, दोस्तएव्स्की, स्तानिस्लाव्स्की, बर्ट्रान्ड रसेल, रुथ बेनेडिक्ट, रायशेनबास, व्हाइटहेड, क्रोचे, मालिनवस्की, कॅसिरेर्, गॉर्डन व्ही. चाइल्ड इत्यादिकांचा या भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण,

भरताचे नाट्यशास्त्र, संगीतरत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही या भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. मंडळाच्या भाषांतर–योजनेखाली मंडळाने आतापर्यन्त अनेक अभिजात ग्रंथाची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे 'On Liberty', रूसोचे 'Social Contract', एम्. एन्. रॉयचे 'Reason, Romanticism & Revolution' व 'Letters from Jail', स्तानिस्लाव्स्कीचे 'An Actor Prepares', तुर्गेनिवचे 'Fathers & Sons', रायशेनबाखचे 'Rise of Scientific Philosophy', गन्नर मिरदाल्चे 'Economic Theory and Underdeveloped regions', पां. वा. काणे यांचे 'History of Dharmashastra,' कोपलँडचे 'Music & Imagination', बर्ट्रान्ड रसेलचे 'Religion & Science', तेरझागीचे 'Theoretical Soil Mechanics', विशाखादत्तचे 'मुद्राराक्षसम्', भरतमुनीचे 'भरतनाट्यशास्त्र' (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मनुचीचे 'Storia Do Mogor', ए. से. पिगू लिखित 'Socialism Vs. Capitalism' इत्यादी पुस्तकांची भाषांतरे व सारानुवाद प्रकाशित झाले आहेत.

६. सरव्हँटिस्–लिखित 'Don Quixote' या ग्रंथाच्या दोन भागांचा मराठी अनुवाद श्री. दा. न. शिखरे, पुणे यांनी केला असून मंडळाच्या भाषांतरमालेखाली 'डॉन क्विक्झोट' भाग १ आधीच प्रकाशित झाला आहे व आता 'डॉन क्विक्झोट' भाग २ प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

वाई
१४ पौष, १८९६.
प्रजासत्ताक दिन,
२६ जानेवारी, १९७५.

लक्ष्मणशास्त्री जोशी
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ.

# अनुक्रमणिका

● ● ●

### ला मांचाचे सुप्रसिद्ध

# डॉन क्विक्झोट यांचे जीवन व पराक्रम

# खंड–२



## प्रकरण १

## डॉन क्विक्झोट यांच्या शारीरिक अस्वास्थ्याविषयी डॉन, पाद्री व न्हावी यांच्यामध्ये काय घडले ?

सिड हॅमेट बेनेंगेली यांनी डॉनच्या तिसऱ्या मोहिमेबद्दल या इतिहासाच्या दुसऱ्या खंडात असे लिहिले आहे की, जवळ जवळ तब्बल महिनाभर पाद्री व न्हावी या दोघांनी त्यांची भेट घेतली नाही. हेतू हा की, आपण त्यांना भेटलो तर त्यांच्या मनात जुन्या आठवणी जाग्या व्हायच्या आणि ती अचाट कृत्ये पुन्हा करण्याची त्यांना प्रवृत्ती व्हायची. ते दोघे त्यांना भेटले नसले तरी, त्यांची पुतणी व त्यांची घरधनीण यांची भेट घेण्यास ते एक दिवसही चुकले नाहीत. पाद्री व न्हावी या दोघांनी पुतणीला व घरधनिणीस सांगितले होते की, " डॉन क्विक्झोट यांची सेवा–शुश्रूषा काळजीपूर्वक करा आणि त्यांचे मन प्रसन्न राहण्यासाठी अत्यंत योग्य असा आहार त्यांना द्या व त्यांच्या मेंदूला विश्रांती मिळेल असे करा, कारण त्यांच्या मेंदूत बिघाड झाल्यानेच हे सारे अनर्थ ओढवले. "

पुतणी व घरधनीण यांनी त्या दोघा हितचिंतकांना असे आश्वासन दिले की, " आपल्या सूचनेप्रमाणेच आम्ही त्यांची देखभाल करीत आहो आणि तशीच ती पुढे चालू ठेवण्यासाठी आम्ही प्रयत्नांची पराकाष्ठा करू. याचे एक कारण असेही आहे की, अधून–मधून त्यांचे डोके ताळ्यावर आलेले दिसते. "

रोग्याची ही सुधारणा ऐकून पाद्री व न्हावी यांना फार हर्ष झाला. डॉन यांना मंतरलेल्या गाडीतून त्यांच्या घरी आणून पोचविण्याची जी युक्ती आपण केली, तिचेच

हे फळ होय असे त्यांना वाटले. या युक्तीचा वृत्तांत या महत्त्वाच्या व समयोचित इतिहासग्रंथाच्या प्रथम खंडाच्या शेवटच्या प्रकरणात येऊन गेलेला आहे.

रोग्याची ही सुधारणा कळल्यानंतर, त्याला भेटण्याचा त्या दोघांनी निश्चय केला. जवळजवळ असाध्य वाटणारा रोग बरा होण्याच्या मार्गावर कितपत आला आहे, हे आपण प्रत्यक्ष पहावे, असे त्यांना वाटले. डॉनच्या शिलेदारी मोहिमेबद्दल त्यांच्याजवळ ब्र काढावयाचा नाही, असेही त्यांनी ठरविले. नाही तर नुकतीच भरून आलेली त्यांची नाजूक जखम पुन्हा चिघळावयाची.

थोडक्यात सांगावयाचे म्हणजे, ते दोघे डॉनच्या भेटीस गेले. त्यावेळी डॉन आपल्या अंथरुणावर बसलेले होते. त्यावेळी त्यांच्या अंगात लोकरीचे हिरवे जाकीट होते आणि त्यांच्या डोक्यावर तांबडी 'टोलेडो' टोपी होती. पण तो बिचारा शिलेदार यावेळी इतका वाळलेला व खंगलेला होता की, एकाद्या हाडाच्या सांगाड्यासारखा तो दिसत होता. त्याने या उभयतांचे अत्यंत आदबीने स्वागत केले. त्यांनी प्रकृतीबद्दल पृच्छा केली असता डॉन यांनी आपल्या प्रकृतीची सारी हकिकत सांगितली. त्यावेळी डॉन मोठ्या विवेकाने आणि अत्यंत सुंदर भाषेत बोलत होते.

नाना विषयांवर गप्पासप्पा केल्यानंतर शेवटी ते राज्यकारभाराच्या विषयाकडे वळले, आणि सरकारचे स्वरूप काय असावे याची चर्चा करू लागले. "जनतेचे हे गाऱ्हाणे दूर झाले पाहिजे पण जनतेची ती तक्रार खोटी आहे. समाजातील ही रूढी सुधारली पाहिजे आणि ती गाडली पाहिजे. नव्हे, नवे कायदेच निर्माण केले पाहिजेत." असे विविध विचार त्या तिघांच्या बोलण्यात येऊन गेले. जणू काही ते आपल्या युगातील लायकर्गस किंवा सोलॉन होते. त्यांनी आपल्या प्रजासत्ताक राज्याला असे काही नवे वळण इतक्या झपाट्याने दिले की, ती राज्यपद्धती भट्टीत घालून नव्या मुशीत तिची नवी मूर्तीच त्यांनी निर्माण केली. प्रत्येक विषयावर बोलताना डॉन क्विक्झोट यांनी इतक्या विवेकाने युक्तिवाद केले की, त्यांच्या भेटीस आलेल्या त्या दोन मित्रांची हे पूर्णपणे ताळ्यावर आले आहेत अशी पक्की खात्री झाली.

या चर्चेचे वेळी डॉनची पुतणी व घरधनीण उपस्थित होती. डॉनची विचार-शक्ती शाबूत असल्याची अनेक लक्षणे या चर्चेत त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली. तेव्हा त्यांना वाटले, परमेश्वराने आपल्यावर ही अलौकिक कृपा केली आहे, त्याबद्दल त्याचे आभार मानावे तितके थोडेच. डॉनच्या प्रकृतीत ही विलक्षण सुधारणा झालेली पाहून पाद्री-महाशयांना विस्मय वाटला. डॉन पूर्णपणे बरे झाले आहेत की नाहीत, याची कसोटी लावण्यासाठी त्यांनी आपला पूर्वीचा निश्चय बदलला. डॉनच्या शिलेदारी मोहिमेची चर्चा टाळण्याचा निश्चय त्यांनी केला होता, तो बदलून त्यांनी त्यांना जगातील घडामोडींच्या बातम्या सांगण्यास सुरवात केली. त्यांपैकी एक म्हणजे, "दरबारात विश्वसनीय रीत्या असे वृत्त आले आहे की, प्रचंड सैन्य घेऊन ग्रँड सिन्यॉर स्वारी करून येत आहे. या स्वारीचे वादळ कोणावर कोसळेल हे कोणासच माहीत नाही. पण सारे ख्रिस्ती

जग भयभीत झालेले आहे. बहुधा प्रत्येक वर्षी असे भय त्यांना पडतेच. सिसिली व नेपल्स यांच्या किनाऱ्यांचे आणि माल्टा बेटाचे संरक्षण करण्याची व्यवस्था राजेसाहेब करीत आहेत."

यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, "राजेसाहेब आपल्या मुलखाचे संरक्षण योग्य वेळी करीत आहेत, हे अत्यंत चतुर योद्धयाला शोभेसेच आहे. त्यांनी तसे केल्यामुळे शत्रूला अकस्मात् हल्ले करण्याची संधी मिळणार नाही. तरी पण या प्रकरणी आमचा सल्ला घेतला तर आम्ही दुसऱ्याच प्रकारची तयारी करावयास त्यांना सांगू. ती यावेळी राजेसाहेबांच्या कल्पनेतही नसेल, असे आम्हास वाटते."

डॉन महाशयांचे हे मत ऐकून पाद्री मनात म्हणाला, "आता देवच डॉनला वाचवो! बिचारा डॉन! मूर्खपणाच्या शिखरावरून आता तो भोळेपणाच्या दरीत कोसळत आहे."

न्हाव्याच्या मनातही तोच विचार आला. डॉन क्विक्झोट यांनी आपली भव्य योजना आपल्याला सांगावी, अशी त्याला इच्छा झाली आणि तो म्हणाला, "पण हे सांगायचे कुणी? न जाणो आपली ही तरतूद, राजेमहाराजांना जो अप्रस्तुत उपदेश केला जातो, त्यापैकीच एक असेल."

"छेः छेः, श्री. ट्रिमर, तसे मुळीच नाही. आमची योजना आगाऊपणाची नाही की उर्मटपणाची नाही. ती अत्यंत विवेकी आहे."

"मी जे बोललो त्यात, महाराज, आपल्याला दुखविण्यासारखे काहीच नाही." न्हावीबुवा उत्तरले. "सामान्यतः आपल्याला असे आढळून येते की, राजेसाहेबांपुढे ज्या योजना मांडल्या जातात, त्यांपैकी बहुतेक अव्यवहार्य तरी असतात किंवा तऱ्हेवाईक तरी असतात आणि राजा किंवा राज्य यांना अपायकारक असतात."

"पण आमची योजना अव्यवहार्य नाही, हास्यास्पदही नाही आणि राजा किंवा राज्य यांना तर मुळीच अपायकारक नाही. छेः छेः तशी ती मुळीच नाही. ती अत्यंत सोपी आहे, अतिशय विचार करून तयार केलेली आहे, आणि आतापर्यंत कोणाही मानवाने बनविली नसेल इतकी छोटी आहे." डॉन क्विक्झोट अभिमानाने उद्गारले.

ते ऐकून पाद्री म्हणाला, "आपली योजना आम्हांस निवेदन करण्यास आपण फार विलंब लावीत आहा, असे मला वाटते."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "तुम्हाला मोकळ्या मनाने सांगावयाचे तर आमची योजना या क्षणी या स्थळी तुम्हाला निवेदन करण्यास आम्ही नाखूष आहो. कारण तसे केले तर उद्या ती बातमी प्रधानमंडळातील कोणाच्या कानी जाऊन पोहोचेल, आणि आमच्या योजनेचे फल दुसऱ्या कोणी उपटल्याचे आम्हास पहावे लागेल."

"माझ्यापुरते बोलावयाचे तर राजा किंवा राणी, शिपाई किंवा शिलेदार—या पृथ्वीतलावरील कोणाही माणसाला मी आपली योजना कदापी सांगणार नाही, असे मी

ईश्वरसाक्ष वचन देतो. आपल्या शंभर मोहोरा व दुडक्या चालीचे खेचर यांची चोरी झाल्याची वर्दी देण्यासाठी या पाद्रीमहाशयांनी राजेसाहेबांजवळ जे अद्भुत निवेदन केले होते, त्याच्या प्रारंभी त्यांनी अशीच शपथ घेतली होती. " न्हावी म्हणाला.

यावर डॉन क्विक्झोट म्हणाले," ती चोरीची कहाणी आम्हाला मुळीच माहीत नाही. पण न्हावीमहाशयांच्या शपथेने आमचे समाधान झाले आहे; कारण ते प्रामाणिक आहेत असा माझा विश्वास आहे. "

पाद्रीमहाशय आवेशाने म्हणाले, " आणि जरी हा न्हावी प्रामाणिक नसता तरी या बाबतीत मी त्याच्या सच्चेपणाची ग्वाही दिली असती. तो मुका असता तर त्याने आपल्या योजनेचा जितका बभ्रा केला असता, त्याहून अधिक तो आताही करणार नाही, हे मी त्याच्या वतीने सांगतो. आपण कोणतीही शिक्षा दिली, तरी तो आपल्या मौनाचा भंग करणार नाही. "

" आणि पाद्रीमहाराज. आपल्याबद्दल ग्वाही कोण देणार ? " डॉन क्विक्झोट यांनी विचारले तेव्हा पाद्र्याने उत्तर दिले, " माझा व्यवसाय ती ग्वाही देईल. त्या व्यवसायामुळे मी गुप्तता पाळण्यास बांधलेला आहे. "

" वा: ! फारच नामी ! " डॉन क्विक्झोट हर्षभराने ओरडले व म्हणाले, " राजेसाहेबांनी आता अधिक काही करू नये—फक्त आमच्या राज्यात सर्वत्र विखुरलेले जे जे शिलेदार असतील, त्या सर्वांनी एका विशिष्ट दिवशी आमच्या दरबारात उपस्थित राहावे असा जाहीरनामा काढावा. हा जाहीरनामा कळल्यावर पाच-सहाच शिलेदार दरबारात आले तरी त्यांच्यामध्ये असा एखादा बहाद्दर निघेल की, जो एकटा तुर्कस्तानच्या साऱ्या संयुक्त सैन्याचा धुव्वा उडवू शकेल. सद्गृहस्थहो, आम्ही काय सांगत आहो, हे कृपा करून नीट ध्यानी घ्या आणि आम्हाला आपल्याबरोबर दरबारात घेऊन चला. दोन लाख माणसांच्या लष्कराचा विध्वंस एका सरदाराने करणे आणि तो विध्वंस सर्वांना मिळून एकच गळा असल्याइतक्या शिताफीने करणे किंवा सारे सैनिक साखरेच्या पाकाचे असल्याइतक्या सहजपणे करणे, ही काय तुम्हाला नवीन गोष्ट वाटते ?

"अशा चमत्कारांनी भरलेले किती इतिहास-ग्रंथ आहेत, हे तुम्हाला माहीतच आहे. सुविख्यात डॉन बेलियानिस आज जिवंत असते तर त्यांचे माझ्याशी शत्रुत्व झाले असते, कारण त्यांच्याशिवाय मी कोणालाही शिव्या देत नाही. अॅमॅडिस डी गॉल यांच्या प्रदीर्घ परंपरेतील कोणी एखादा सरदार आज विद्यमान असता आणि त्याची या तुर्काशी गाठ पडली असती, तर त्यांची किती शोचनीय अवस्था झाली असती ! तथापि मला अशी आशा वाटते की, परमेश्वर आपल्या लेकराकडे कृपादृष्टीने पाहील आणि प्राचीन युगातील वीरांइतका नसला तरी त्यांच्याइतके धैर्य अंगी असणारा एखादा शूर पुरुष निर्माण करील. माझ्या म्हणण्याचा अर्थ काय आहे, हे ईश्वर जाणतो. मी अधिक काही बोलत नाही. "

डॉनचे हे भाषण ऐकून त्याची पुतणी म्हणाली, "हाय रे देवा ! अजून काकांना शिलेदार होण्याची स्वप्नं पडताहेत, असे मला नक्की वाटते."

"शिलेदार म्हणूनच मी मरणार !" डॉन क्विक्झोट आवेगाने उद्गारले, "म्हणून ते तुर्क कोणत्याही स्थळी नि कोणत्याही वेळी येऊन उतरोत आणि मिळेल तितके सारे सैन्य तेथे उभे करोत, आम्हाला त्याची भीती नाही. माझ्या म्हणण्याचा अर्थ काय आहे, हे ईश्वर जाणतो, असे मी पुनः म्हणतो."

नंतर न्हावीदादा म्हणाले, "सद्गृहस्थहो, मी आपल्याला एक छोटी गोष्ट सांगू इच्छितो. सेव्हिल प्रांतात ती घडलेली आहे नि जणू काही आपल्या प्रस्तुत कार्याला उद्देशूनच आहे, असे मला खरोखर वाटते. म्हणून ती सांगण्याची मला फार इच्छा होते."

डॉन क्विक्झोट यांनी संमती दिली. पाद्री आणि इतर मंडळी ती गोष्ट ऐकण्यास उत्सुक होते. तेव्हा न्हावीदादांनी आपली गोष्ट सुरू केली:—

"एका माणसाचा मेंदू बिघडला, म्हणून त्याच्या नातलगांनी त्याला सेव्हिल येथील पागल-घरात ठेवले. त्याने नागरी कायद्याचा अभ्यास केलेला होता आणि ओसूना येथे कायद्याची पदवी घेतली होती. ती पदवी त्याने सालामँका येथे घेतली असती, तर तो त्याच्या आधीच वेडा झाला असता असे पुष्कळ लोकांचे मत आहे. पागल-घरात काही वर्षे राहिल्यानंतर त्याला असे वाटू लागले की, आपण आता बरे झालो आहो. या समजुतीने त्याने धर्मगुरूला ( आर्च बिशपला ) एक पत्र लिहिले.

"ते पत्र कळकळीने ओतप्रोत भरलेले होते आणि अत्यंत विवेकाने लिहिलेले आहे, असे भासत होते. त्या पत्रात त्याने लिहिले होते की, "परमेश्वराच्या कृपेने मी बुद्धिभ्रंशापासून पूर्णपणे मुक्त झालो आहे. म्हणून आपण आपल्या अधिकाराचा उपयोग करून मला येथील दुःखातून सोडवावे, अशी माझी विनंती आहे. माझ्या नातलगांना माझ्या जिंदगीचा उपभोग घेण्याची इच्छा असल्यामुळे त्यांनी मला येथे डांबून ठेवले आहे आणि सत्यस्थिती दडपून टाकून मला येथे मरेपर्यंत वेडा म्हणून ठेवण्याचा त्यांचा इरादा आहे."

"या विषयावर त्याने त्या धर्मगुरूला पुष्कळ पत्रे लिहिली. ती सर्व समंजस-पणाने व विवेकाने लिहिलेली होती. त्यांचा परिणाम झाल्यामुळे त्या धर्मगुरूने आपल्या एका शिष्याला आदेश दिला, "त्या पागल-घराच्या संचालकाकडे जाऊन खरे काय आहे याची चौकशी कर आणि पत्रलेखकाचे वेड जर गेलेले असेल तर त्याला मोकळे सोडण्यास ते तयार आहेत का याची चौकशी कर."

"त्याप्रमाणे तो शिष्य गेला आणि त्याने त्या संचालकाला विचारले, 'या कायद्याच्या पदवीधराची अवस्था आता कशी आहे ?' तेव्हा त्याला सांगण्यात आले, 'अजून तो वेडाच आहे. काही काही वेळा मात्र तो अत्यंत चतुर माणसाप्रमाणे बोलतो पण थोड्याच वेळात त्याला पूर्वीप्रमाणे वेडाचे झटके पुन्हा येतात. तुम्ही स्वतः

त्याच्याशी बोलून पाहा म्हणजे त्याचे शहाणपणाचे बोलणे व वेडाचे झटके येणे या दोहोंचा अनुभव तुम्हाला येईल. ''

हा प्रयोग करून पाहण्याचा निश्चय त्या शिष्याने केला आणि तो त्या वेड्या माणसाकडे गेला. एका तासाहून अधिक काळ तो त्याच्याशी बोलत राहिला. त्या साऱ्या वेळात त्याला त्याच्या मेंदूतील बिघाडाची छटा लवमात्रही आढळली नाही. उलट, तो इतक्या शांतपणे बोलत होता– आणि प्रत्येक प्रश्नाला इतकी सरळ व समर्पक उत्तरे देत होता – की, त्याची विचारशक्ती शाबूत असल्याची त्या शिष्याची खात्री पटली; एवढेच नव्हे तर, त्या वेड्याने त्या पागल–घराच्या चालकावर असाही आरोप केला की, 'माझ्या नातलगांनी दिलेल्या देणग्यांना भुलून तुम्ही आपल्याकडे येणाऱ्या माणसांना असे सांगता की, हा माणूस अजून भ्रमिष्ट आहे – फक्त अधूनमधून तो शहाण्यासारखे वागतो.' खरे म्हणजे त्याचा मोठ्यातला मोठा शत्रू म्हणजे त्याची मालमत्ता. ती मिळविण्याचा मोह त्याचे आप्त सोडू शकत नाहीत. आणि म्हणून ज्या ईश्वरी कृपेने तो पुन्हा शहाणा झाला आहे, ती कृपा मान्य करीत नाहीत.'

थोडक्यात म्हणजे, त्या वेड्याने आपली बाजू इतक्या कुशलतेने मांडली की, त्या पागलघराच्या चालकाबद्दल कोणालाही संशयच यावा आणि त्याचे आप्त लोभा-मुळे माणुसकीला सोडून वागत आहेत, अशी त्यांची बदनामी व्हावी आणि तो स्वतः मात्र पूर्ण विवेकनिष्ठ असल्याची खात्री पटावी. त्यामुळे त्याला आपल्याबरोबर घेऊन जाण्याचे त्या शिष्याने ठरविले. तसे केल्याने आपल्या धर्मगुरूला या सर्व प्रकरणातील सत्य समजून येऊन समाधान होईल, असे त्याला वाटले. म्हणून त्या भोळ्या–भाबड्या शिष्याने त्या चालकाला विनंती केली की, हा पदवीधर प्रथम येथे आला तेव्हा त्याने जे कपडे आपल्याबरोबर आणले होते, ते परत द्या. त्या चालकाने त्या शिष्याला परो-परीने सांगितले की, 'हा माणूस अजून वेडा आहे आणि त्याचा मेंदू बिघडलेला आहे.' त्या शिष्याला आपल्या योजनेपासून परावृत्त करण्यासाठी शक्य ते सर्व युक्तिवाद त्या चालकाने केले, पण पालथ्या घड्यावर पाणी ! त्या वेड्याला यापुढे तेथे क्षणभरही ठेवण्यास तो शिष्य तयार नव्हता. म्हणून त्या चालकाने धर्मगुरूची आज्ञा मानली आणि त्या वेड्या माणसाला त्याचे सुव्यवस्थित व सभ्य माणसाला शोभतील असे कपडे परत दिले.

"वेड्याने आपली पागलपणातील वस्त्रे टाकून दिल्यानंतर आणि समंजस माणसा-सारखे कपडे परिधान केल्यानंतर पदवीधराने शिष्याला विनविले की, माझ्या समदुःखी मित्रांचा निरोप घेण्याची परवानगी आपण मला कृपया द्यावी. तेव्हा शिष्य त्याला म्हणाला, 'या घरातील (वेडे) लोक पाहण्याची मलाही इच्छा आहे, म्हणून मी तुझ्या-बरोबर येतो.'

मग ते माडीवर गेले आणि त्यांच्याजवळ उभे असलेले काही लोकही जिना चढून वर गेले. तेथे जाताच त्या पदवीधराला एक पिंजरा दिसला. भयंकर वेड लागलेला

एक माणूस त्यात होता. पण यावेळी तो शांत व थंड होता. त्याला उद्देशून तो पदवीधर म्हणाला,

" बंधो, मला सांगण्यासारखी काही सेवा आहे काय ? मी आत्ता लवकरच माझ्या घरी जाणार आहे. देवाची दया आणि कृपा अपार आहे. त्यानेच मला बरे केले. मी त्याचे किती आभार मानू ? भाई, समाधानात राहा आणि सर्वज्ञ ईश्वरावर विश्वास ठेव. त्याने जशी माझ्यावर कृपा केली तशीच तो तुझ्यावरही करील, अशी मला आशा वाटते. मी तुला काही निवडक खाद्यपदार्थ खात्रीने पाठवीन. ते तू अवश्य खाल्ले पाहिजेस, अशी माझी इच्छा आहे. कारण मी तुला एक गोष्ट सांगतो. माझ्या अनुभवामुळे तिच्यावर माझा विश्वास आहे. ती गोष्ट ही की, आपली पोटे रिकामी असतात आणि आपल्या मेंदूत चक्रे फिरत असतात, त्यामुळे आपला सारा वेडेपणा निर्माण होतो. म्हणून दोस्ता, धीर धर आणि प्रसन्न राहा. कारण दुर्दैव आले असताना जो माणूस खिन्न होतो, त्याची प्रकृती बिघडते आणि तो स्मशानभूमीचा रस्ता धरतो. "

" त्या खोलीशेजारीच दुसरा एक वेडा माणूस होता. तो हे सारे भाषण काळजीपूर्वक ऐकत होता. त्याला आपल्या शेजाऱ्याचा हेवा वाटत होता. तो एका जुन्या चटईवर अगदी उघडा–नागडा बसला होता. तो ताडकन् उठून उभा राहिला आणि ओरडला, 'कोण आहे तो ? पुरा बरा होऊन शहाणा–सुर्ता होऊन इथून कोण निघून जात आहे ?'

' बंधो, मी येथून निघून जात आहे. ' त्या पदवीधराने उत्तर दिले. ' येथे अधिक काळ थांबण्याची मला गरज नाही. ईश्वराच्या असीम कृपेने आणि आशीर्वादाने मी पूर्ण बरा झालो आहे. त्याबद्दल मी ईश्वराला नम्र भावाने हार्दिक धन्यवाद पुनः पुनः देतो. ' यावर तो वेडा म्हणाला, ' डॉक्टर, तुम्ही काय म्हणत आहा याचा नीट विचार करा. सैतान तुम्हाला भुरळ न घालो. येथून एक पाऊल पुढे टाकू नका – आपल्या जुन्या खोलीला चिकटून राहा. नाही तर, येथून बाहेर गेल्यावर तुम्हाला पुनः या खोपटात आणून टाकले जाईल. त्यामुळे तुम्हाला केवढा मनस्ताप होईल ! तो टाळा आणि येथेच राहा. '

यावर पदवीधर उत्तरला, " छेः छेः, मी पुनः येथे परत येण्याचा प्रश्नच उद्भवत नाही, असे मी खात्रीने सांगतो. मी पूर्ण बरा झालो आहे, हे मी जाणतो. "

"तू आणि बरा ? लवकरच पाहू आपण खरे काय आहे ते !" तो वेडा ओरडून म्हणाला, " मी निरोप देतो तुला. ज्या देवराज जव्हचा प्रतिनिधी म्हणून मी या पृथ्वीतलावर आलो आहे, त्याच्या शपथ सांगतो की, तुझी बुद्धी शाबूत आहे, असे म्हणून तुला मुक्त करण्यात सेव्हिल शहराने गुन्हा केला आहे. त्याबद्दल मी त्या सर्व शहरावर असा भयंकर सूड उगवीन की, त्याची आठवण त्याला युगानुयुगे निरंतर राहील. तथास्तु ! सुवेशधारी निर्बुद्ध प्राण्या ! असा सूड घेणे मला शक्य आहे, हे तुला माहीत नाही काय ? स्वर्गातील तप्त विद्युत्पात माझ्या हाती आहेत आणि त्यांच्या बळावर मी सारे जग माझ्या वर्चस्वाखाली व भयाखाली ठेवले आहे. घनगंभीर गर्जना

करणारा जव्ह तो मीच ! मी सारे जगत भस्मसात करू शकेन. पण मित्रा, थांब, मी त्या मूर्ख नगरीला अशी भयानक शिक्षा न देता दुसरीच शिक्षा देतो. ती म्हणजे आकाशातील पूरनियंत्रणाचे सारे दरवाजे मी बंद करून टाकतो म्हणजे या शहरावर पर्जन्याचा एक बिंदूही पडणार नाही. एवढेच नव्हे तर, या शहराच्या आसपासच्या मुलुखावरही तब्बल तीन वर्षे पावसाचा थेंब पडणार नाही. माझा हा शाप अटळ आहे. मी हा शाप देईन त्या क्षणापासूनच त्याचा प्रभाव दिसू लागेल. हाः हाः ! अरे, काय तू मुक्त झालास ? बरा झालास ? शुद्धीवर आलास ? आणि मी ? येथे वेडा म्हणून, भ्रमिष्ट म्हणून, कोंडला जाऊ ? मी फाशी जाईन, पण त्या नगरीवर पर्जन्यवृष्टी करणार नाही. "

त्या वेड्याच्या उच्च स्वरातील प्रक्षुब्ध धमक्या तेथील प्रत्येकजण कान देऊन ऐकत होता. पण त्या पदवीधराने त्या शिष्याकडे वळून त्याचा हात आपल्या हातात घेतला आणि म्हटले, ' महाराज, या वेड्याच्या धमक्यांनी तुम्ही आपल्याला त्रास करून घेऊ नका. त्याच्याकडे लक्षच देऊ नका. तो जर जव्ह असेल आणि पर्जन्यवृष्टी थांबविणार असेल तर मी पर्जन्यदेवता नेप्च्यून आहे. म्हणून, जरूर तेथे माझ्या इच्छेस येईल तितक्या वेळा मी पाऊस पाडीन. '

तेव्हा त्या शिष्याने उत्तर दिले, " नेप्च्यूनमहाराज, श्रीमान जव्हना प्रक्षुब्ध करणे सोयीचे नाही. म्हणून माझी आपल्याला विनंती आहे की, आणखी काही काळ आपण येथेच राहण्याची कृपा करावी. पुढे मला सवड होईल त्यावेळी मी पुनः आपल्या भेटीस येईन आणि आपल्याला येथून घेऊन जाईन." त्या पागल-घराचा चालक आणि तेथे जमलेली मंडळी यांना आपले हंसू आवरेना. त्यामुळे त्या शिष्याचीही हसता हसता पुरेवाट झाली. थोडक्यात सांगायचे तर, नेप्च्यूनमहाराजांच्या अंगावरील सारे कपडे उतरले गेले आणि त्यांना स्वतःला पूर्वी जेथे होते तेथेच ठेवण्यात आले. झाले ! संपली माझी गोष्ट. "

" ठीक, न्हावीदादा, " डॉन क्विक्झोट म्हणाले, " ही गोष्ट आपल्या सध्याच्या प्रसंगाला नेमकी लागू पडते, आणि म्हणून तुम्हाला ती सांगण्याचा मोह आवरला नाही, होय ना ? भले भले दाढीकापेमहाराज ! चाळणीतून ज्याला दिसत नाही, तो किती आंधळा म्हणावा ? चातुर्या-चातुर्यात, धैर्या-धैर्यात, सौंदर्या-सौंदर्यात, घराण्या-घराण्यात तुलना करणे नेहमीच किती हिडीस व भ्रामक असते, हे आपल्या उपयुक्ततावादी खुद्द स्वारीस माहीत नाही काय ? मी समुद्रदेव नेप्च्यून नाही आणि मी शहाणा नसताना शहाणा असल्याचे सोंगही करीत नाही, समजले न्हावीदादा ? माझ्या साऱ्या कार्यांचा उद्देश एकच आहे– आणि तो म्हणजे ज्या काळात शूर शिलेदारी ऐन भरात आली होती तो सौख्याचा काळ पुनः जिवंत करण्यासाठी धडपडणे. आणि तशी धडपड न केल्याबद्दल हे जग दोषास किती पात्र आहे, याची जाणीव त्याला करून देणे. पण खरोखर आपल्या या कलियुगाला प्राचीन काळातील महान् सौख्याचा उपभोग घेण्याची पात्रताच नाही. अहाहा ! तो प्राचीन काळ ! त्यावेळी राज्याचे संरक्षण करणे, सुंदर

युवतींचे रक्षण करणे, अनाथ अर्भकांचे पालन करणे, अरेरावी व जुलुम-जबरदस्ती करणाऱ्यांना अद्दल घडविणे आणि नम्रतेने वागणाऱ्यांना बक्षिसे देणे —अशी सत्कृत्ये ते शूर शिलेदार करीत असत. पण आताचे बहुतेक सरदार आपल्या अंगावर दिमाखदार व जरतारी कपडे घालून त्यांचा खुळखुळ आवाज करीत असतात. खरे म्हटले तर, चिलखत चालण्यात त्यांना भूषण वाटले पाहिजे. आताचा कोणताही सरदार, मोकळ्या मैदानातील खडबडीत जमिनीवर, भरभक्कम पोलादी पोषाख नखशिखान्त करून, अपायकारक हवेत निजणार नाही. पूर्वीचे बहादूर शिलेदार रात्रीच्या वेळी रिकीबीतून आपले पाय न काढता आपल्या भाल्यावरच रेलून आपल्यावर आक्रमण करून येणाऱ्या निद्रादेवीला परतवून लावीत असत—तिला कधीही वश होत नसत. असे शिलेदार आता कोठे आहेत ?

" असा एक तरी शिलेदार मला दाखवा की, जो प्रथम अफाट जंगलातून चालत गेलेला आहे, उंच डोंगर चढून गेला आहे, खवळलेल्या तुफानी समुद्राच्या भीषण किनाऱ्यावरून प्रवास करीत गेला आहे, शीड किंवा वल्हे नसलेली छोटी होडी किनाऱ्यावर पाहताच अदम्य उत्साहाने त्या होडीत उडी घेण्याइतके धैर्य दाखवीत आहे, आणि समुद्राच्या त्या अजिंक्य लाटांवर स्वतःला झोकून देत आहे— त्या लाटा त्याला कधी आभाळापर्यंत उंच चढवीत आहेत, तर कधी समुद्राच्या सखोल अंतर्यामी वेगाने लोटीत आहेत— आणि तरीही आपल्या अकुंठित धैर्याने तो त्या अत्यंत भयानक वादळावर मात करीत आहे, जेथून तो निघाला तेथून वीस हजार कोसांवर तो जाऊन पोचला आहे, आणि एका दूरच्या अज्ञात प्रदेशात दाखल होत आहे, व अशी काही धाडसी कृत्ये करीत आहे की, जी चर्मपत्रावर नव्हे, तर कॉरिन्थिअन पितळी पत्र्यावर नोंदली जावीत. पण हाय ! परिश्रम व जागरूकता यांच्यावर आता आळस व नामर्दपणा यांनी मात केली आहे. उद्योगशीलतेवर आळशीपणाने, सद्गुणावर दुर्गुणाने, व पराक्रमावर उर्मटपणाने, मात केली आहे. पूर्वीच्या त्या सुवर्णयुगात उत्कर्ष पावलेल्या व स्त्री-दाक्षिण्याच्या कैवाऱ्यांमध्ये रूढ झालेल्या शस्त्रांच्या प्रयोगांवर, आता युद्धशास्त्राच्या केवळ तात्त्विक प्रतिपादनाने कुरघोडी केली आहे. त्या सुविख्यात अमॅडिस डी गॉलहून अधिक पराक्रमी व अधिक सन्मान्य अशा सरदाराचे नाव आता आपल्याला कोठून ऐकावयास मिळणार ? इंग्लंडच्या पामेरिनपेक्षा अधिक विवेकी माणूस कोण लाभणार ? विशुद्ध चारित्र्याच्या टिरांटेपेक्षा अधिक सौजन्यशील व परोपकारी माणूस कोण आहे ? ग्रीसमधील लिझार्टेपेक्षा अधिक शूर कोण आहे ? डॉन बेलियानिसपेक्षा अधिक विध्वंस करणारा कोण आहे ? गॉलच्या पारियनपेक्षा अधिक निर्भय कोण आहे ? हिरकॅनियाच्या फेलेक्स मार्टेपेक्षा अधिक धडाडीचा कोण आहे ? एस्प्लॅन्डियनपेक्षा अधिक प्रामाणिक कोण आहे ? थ्रेसच्या सिरिऑन गिलोपेक्षा अधिक सुजाण कोण आहे ? रोडोमॉन्टपेक्षा अधिक बहादूर कोण आहे ? राजा सोब्रिनोपेक्षा अधिक समंजस कोण आहे ? रिनाल्डोपेक्षा अधिक साहसी कोण आहे ? ओर्लॅडोपेक्षा जास्त अजिंक्य कोण आहे ? रोजेरोपेक्षा अधिक सुस्वभावी व सुजन कोण आहे ? ( टर्पिनच्या मताप्रमाणे ) रोजेरोचे वंशज

फेरारांचे ड्यूक हे होते. पाद्रीमहाशय, हे सारे योद्धे--- आणि आणखीही पुष्कळ नावे मी सांगू शकेन–हाडाचे शिलेदार होते, आणि आपल्या दाक्षिण्यपूर्ण संस्कृतीचे वैभवशाली दीप होते. अशी माणसे राजेसाहेबांनी आपल्या नोकरीत ठेवावी, असा सल्ला मी त्यांना देईन. तो त्यांनी मानला तर अशी माणसे त्यांची खरीखुरी सेवा करतील आणि मग राजेसाहेबांचा प्रचंड खर्च वाचेल व तुर्काला वेड लागून तो आपली दाढी उपटू लागेल. माझ्यापुरते सांगावयाचे तर, मी आता जेथे आहे, तेथे राहण्याची माझी योजना नाही. कारण कोणी शिष्य मला बाहेर नेणार नाही. न्हावीजींनी म्हटल्याप्रमाणे ज्युपिटरने पावसाचा थेंब पाडला नाही तरी आपल्या इच्छेस येईल तेव्हा पावसासारखा पडणारा हा माणूस येथे उभा आहे. वाटीबहाद्दरांचा मतलब मला समजला, हे त्यांना कळावे म्हणून मी हे बोलत आहे. ”

यावर न्हावीदादा म्हणाले, “ खरोखर महाराज ! मी वाईट बुद्धीने बोलली नव्हतो. ईश्वरसाक्ष सांगतो, माझा हेतू चांगला होता. म्हणून आपण माझ्या बोलण्याचा विपर्यास करणार नाही, अशी मला आशा आहे. ”

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, “ विपर्यास करावा की नाही, हे आम्हाला चांगले कळते. ” तेव्हा पाद्रीमहाराज म्हणाले, “ हे पहा, आतापर्यंत मी एक शब्दही बोललो नाही. पण डॉन क्विक्झोट यांच्या शब्दांनी माझ्या मनात एक शंका निर्माण केली आहे–आणि ती माझ्या विवेक–शक्तीला ओरबाडीत व पोखरीत आहे–ती शंका दूर झाली तर मला आनंद वाटेल. ” तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, “ अशा महान् विषयावर पाद्रीमहाशयांनी आमच्याशी मोकळेपणी बोलावे. त्यांनी आपली शंका आम्हाला खुशाल सांगावी, कोणाच्याही मनावर दडपण असणे सुखाचे नाही. ”

तेव्हा पाद्री म्हणाला, “ महाराज, आपल्या परवानगीने मला हे सांगावयाचे आहे की, आपण आत्तापर्यंत ज्या शिलेदारांच्या समूहाचे वर्णन केले, ती या जगातील हाडामांसाची खरीखुरी माणसे कधीकाळी होती यावर, कितीही प्रयत्न केला तरी, माझा विश्वास बसत नाही. त्यांच्याविषयी जे जे बोलले जाते, ते सारे दंतकथेसारखे, कादंबरी. सारखे असते–अर्धवट झोपेत असलेल्या माणसानी सांगितलेली ती स्वप्ने नि थोतांडे असतात, असे आपले मला वाटते. ”

“ ही आणखी एक चूक होय–पुष्कळ लोक ती करीत असतात आणि–या जगात तसे शिलेदार कधी झालेच नाहीत, असे मानतात, ” डॉन क्विक्झोट सांगू लागले, “ या सार्वत्रिक भ्रामक समजामुळे गैरसमज निर्माण होतो; तो दूर करून उघड सत्य सिद्ध करण्याचा प्रयत्न आम्ही पुष्कळ वेळा पुष्कळ मंडळीमध्ये केलेला आहे. काही वेळां आमच्या कार्याच्या मानाने आम्हांला यश लाभले नसेल, पण काही वेळा लाभलेही आहे. स्वयंसिद्ध अशा सत्याच्या खांद्यावर उभे राहून आम्ही असे धाडसी विधान करतो की, आम्ही ‘ याचि देही याचि डोळा ’ अमॅडिस डि गॉल यांना पाहिले आहे. उंच नि कमनीय शरीरयष्टी असलेले त्याचे व्यक्तिमत्त्व होते, उत्तम चैतन्यपूर्ण कांती होती

दाढी काळी असली तरी सुव्यवस्थित, मुद्रा भयप्रद पण सौजन्यशील. ते अत्यंत मितभाषी होते. सहसा प्रक्षुब्ध न होणारे, झाले तरी चटकन् शांत होणारे. अॅमॅडिसचे हे चित्र मी जसे तुमच्यापुढे रेखाटले आहे तसेच इतिहासात आढळणाऱ्या साऱ्या शिलेदारांचेही चित्रण मी सहज करू शकेन. कारण इतिहासात त्यांचे जे वर्णन आले आहे, तसेच ते होते असे आम्ही समजतो. तसे समजले म्हणजे त्यांची शरीरयष्टी, त्यांचा बांधा अन् त्यांची मुद्रा या सर्वांची कल्पना, सामान्य तर्कशास्त्राच्या नियमानुसार, बांधता येणे सहज शक्य आहे. त्यांनी मिळविलेले यश आणि त्यांचे विविध स्वभाव यांचे जे वर्णन आज आपल्यापाशी आहे त्यावरून अंदाज करणे मुळीच अवघड नाही. "

" मग महाराज, मॉर्गेटे हा धिप्पाड पुरुष किती उंच होता, हे मला कृपा करून सांगा. " न्हावीदादा नम्रतेने म्हणाला. तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " असे राक्षस कधीकाळी होते की नाही, हा विषय विद्वान लोकांमध्ये वादग्रस्त आहे. तथापि, सत्यापासून अणुमात्र न चळणाऱ्या बायबलमध्ये असे सांगितले आहे की, असे काही राक्षस होऊन गेले. फिलिस्टाईन, गोलिया अशा प्रचंड राक्षसांचा जो वृत्तांत त्यात दिलेला आहे, त्यावरून ते साडेसात हात उंच होते असे दिसते. ही उंची प्रचंडच आहे. याशिवाय सिसिलीमध्ये मांड्यांची व खांद्यांची प्रचंड आकारांची हाडे सापडली आहेत. त्यावरून भूमितीच्या नियमानुसार, आपण असा निष्कर्ष अवश्य काढला पाहिजे की, ती हाडे ज्यांची होती, ती माणसे प्रचंड होती–प्रार्थनामंदिराच्या शिखरांइतकी उंच होती. पण या साऱ्या गोष्टींवरून मार्गोटे केवढा मोठा होता हे मी निश्चितपणे सांगू शकत नाही. पण तो फार उंच नसावा, असे मानण्याकडे माझा कल आहे; आणि त्याचे कारण इतकेच की, त्याच्या पराक्रमाचे विशेष वर्णन करणाऱ्या इतिहासामध्ये, तो वारंवार छपराखाली निजून राही असे आपल्याला वाचावयास सापडते. आता, त्याला सामावून घेणारे जर एखादे घर असेल तर तो प्रचंड आकाराचा नव्हता हे उघड आहे. "

नंतर पाद्रीमहाराज म्हणाले, " ते गृहीत धरले पाहिजे. " असे चमत्कारिकपणे बोलत असलेल्या डॉनचे भाषण ऐकताना त्यांना आनंद वाटत होता. म्हणून त्यांनी विचारले, " मॉन्टलबॅनचा रिनाल्डो, ओर्लँडो प्रभृती फ्रान्समधील बारा उमरावांच्या चेहऱ्यांसंबंधी आपल्या भावना काय आहेत ? ते सारे शिलेदार होते. "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " रिनाल्डोसंबंधी आम्ही असे सांगण्याचे धाडस करितो की, त्याचा चेहरा रुंद होता, त्याची कांती तांबूस होती, त्याचे डोळे विशाल व चमकदार होते, त्याचा स्वभाव अत्यंत संतापी व दोषैक-दृष्टीचा होता आणि चोर-बदमाष यांचे ते दोस्त होते. रोलँडो, रोटोलँडो किंवा ओर्लँडो (ही सारी नावे इतिहासाने एकाच व्यक्तीस दिलेली आहेत.) मध्यम उंचीचा, रुंद खांद्यांचा, फेंगड्या पायांचा, काळसर मुद्रेचा, तांबड्या दाढीचा, अंगावर खूप केस असलेला, खाष्ट दिसणारा, न बोलणारा पण अत्यंत सभ्य व सुस्वभावी असावा, असे आमचे ठाम मत आहे. "

हे ऐकून पाद्री म्हणाला, " आपण आम्हाला सांगता त्यापेक्षा ओर्लँडो अधिक

देखणा नसेल तर त्याला झिडकारून सुंदर अंजेलिकेने चपल, देखणा, मोहक व कोवळ्या मऊ दाढीचा तरुण मूर पसंत केला, यात काही नवल नाही. पहिल्याचा खरखरीतपणा टाकून दुसऱ्याचे मृदु आलिंगन तिने पसंत केले, याबद्दल तिला दोष देता येत नाही. ''

यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, " अंजेलिका ही एक स्वच्छंदी छोकरी होती. ती स्वैराचारी, नखरेल व बेछूट होती; शिवाय थोडीफार लहरीही होती. जगात तिच्या सौंदर्याची जितकी ख्याती आहे तितकीच तिच्या उर्मटपणाचीही आहे. हजारो राजपुत्रांना तिने झिडकारले – साऱ्या जगातील अत्यंत शूर नि शहाण्या अशा हजारो सरदारांना तुच्छ लेखले आणि एका क्षुद्र, बिनदाढीच्या शागिर्दाला जवळ केले–ज्याच्या जवळ ना मान ना मत्ता. आपला मित्र डार्डिनेल याच्यावरील प्रेमाचा पुरावा त्याने दिला आणि आपली कृतज्ञता सिद्ध केली, याहून दुसरा कोणताही लौकिक त्याने मिळविलेला नव्हता. तिच्या सौंदर्याचे मुक्त कंठाने गुणगान करणारा, सुविख्यात एरिओस्टो यानेही तिची ओळखण पुढील दोन काव्य–पंक्तीनीच केली :—

**' कदाचित अधिक चांगली वीणा गाऊन सांगेल**
**की प्रेमानें आणि तिने कटायाला राजा कसे केले. '**

तिने आपल्या सौंदर्याचा जो बाजार मांडला, ( त्याचे वर्णन तिच्या कीर्तीला शोभादायक खास नाही ) त्याचे वर्णन करण्याचे त्याने टाळले. त्याने जे लिहिले, ते भविष्यवादी ठरले. आपण ज्यांना कवी म्हणतो ते खरोखर द्रष्टे असतात, हे सत्य पुढे खरे झाले. कालांतराने एका प्रख्यात अंडालुसियन कवीने तिच्यासाठी अश्रू गाळले आणि तिचा शोक काव्यबद्ध केला. कॅस्टाईलच्या एका कीर्तिमान व उत्तम कवीने तिचे सौंदर्य हा आपला काव्य–विषय बनविला. ''

न्हावीदादांनी प्रश्न केला, " पण महाराज, अंजेलिकेच्या स्तुतिपर काव्ये लिहिणाऱ्या इतक्या कवींपैकी एकानेही तिच्यावर टीका केली नाही का ? '' या प्रश्नाला उत्तर देताना डॉन क्विक्झोट म्हणाले, " सॅक्रीपँटे किंवा ओर्लँडो हे जर कवी असते, तर त्यांनी तिचे वर्णन निःसंशय परिणामकारक केले असते. कवीचा अव्हेर त्याच्या ढोंगी अथवा बेइमान प्रेयसीकडून जेव्हा केला जातो, तेव्हा तिच्यावर सूड उगविण्यासाठी किंवा टीका करण्यासाठी ते उपहासपूर्ण किंवा विडंबक कवितेचा आश्रय करतात. खरे म्हणजे, हे उदार स्वभावाशी विसंगत आहे. तथापि, अंजेलिका या युवतीने या जगाला इतका उपद्रव दिला तरी तिची बदनामी करणारी एकही कविता मी अद्याप ऐकलेली नाही. ''

" खरोखर, हा एक चमत्कारच होय. '' पाद्रीमहाशय मोठ्याने उद्गारले. पण येथे त्यांचा संवाद एका गोंगाटामुळे खंडित झाला. त्या तिघांना काही वेळापूर्वी तेथे सोडून डॉनची पुतणी व घरधनीण अंगणात आल्या होत्या अन् तेथे कलकलाट करीत होत्या. त्या गडबडीचे कारण काय, हे समजून घेण्यासाठी ते तिघेही घाईघाईने खाली आले.

□ □

## प्रकरण २

# सँको पँझा आणि डॉन क्विक्झोट यांची पुतणी व घरमालक यांच्यामध्ये झालेल्या अविस्मरणीय भांडणाचे वर्णन आणि त्याबरोबर दुसरे काही आनंददायक उतारे.

इतिहास आपल्याला असे सांगतो की, ती गडबड व तो गोंगाट होण्याचे कारण म्हणजे, सँको पँझा घरात घुसण्याचा प्रयत्न करीत असताना पुतणी व घरधनीण यांनी त्याला बाहेर ठेवण्यासाठी दार बंद केले. त्यामुळे त्यांचे भांडण झाले. त्या दोघांपैकी एकजण ओरडून म्हणाला, " ढेरपोट्या माणसा, या घरात येऊन तुला काय करायचे आहे ? जा, जा, आपल्या घरी जा. आमच्या गरीब बिचाऱ्या धन्याला बहकायला – भरकटायला – देशभर भटकायला लावणारा तूंच – दुसरा कोणी नाही. "

सँकोने उत्तर दिले, " अगे सैतानाच्या घरधनिणी, बहकलो – भरकटलो भटकलो तो मी – तुझा धनी नव्हे. मला भ्रमंती करावयास लावणारा तोच. तुमचा तर्क अगदी साफ चुकला. तुमच्या धन्यानेच मला थापा मारून माझ्या घरादारापासून मला फूस लावून नेले. 'मी तुला एक बेट बहाल करीन.' अशी थाप त्याने मला मारली होती. ते बेट मला अजून मिळाले नाही. ते मिळण्याची मी अजून वाट पाहात आहे. "

" तुझ्या त्या पटकी पडलेल्या बेटांमध्ये तू खुशाल गुदमरून मेलास तरी हरकत नाही. अन् तुझी बेटे काय आहेत ? काही खायच्या वस्तू वाटल्या होय, बुभुक्षिता ? " ती पुतणी खेकसली.

" थांबा, थांबा, " सँको उत्तरला. " ती बेटे काही खायची नाहीत – त्यांच्यावर मला राज्य करायचे आहे. राजेसाहेबांच्या कोणत्याही चार उत्तम खात्यांपेक्षा किंवा चार शहरांपेक्षा मला चांगला कारभार करून दाखवायचा आहे. "

तेव्हा घरधनीण त्वेषाने म्हणाली, " अरे दुष्टा, लबाडा, त्यासाठी या दारापाशी तू येऊन कडमडायचं काही कारण नव्हतं. चल, जा, आपल्या घराचा कारभार नीट कर म्हणजे झाले. अरे, आळशी बदमाषा ! काम कर – शेतात नांगर चालव पण आपले हिंदकळणारे डोके बेटामध्ये खुपसू नकोस. "

हा संवाद ऐकण्यात पाद्री व न्हावी यांना मोठी मजा वाटत होती. पण डॉन क्विक्झोट यांना असे भय वाटले की, सँकोची जीभ मर्यादा पाळणार नाही आणि

आपल्या लौकिकाला बट्टा लावण्यासारखे तो काही तरी चुकून बोलेल, म्हणून त्याची मूर्खपणाची बडबड चालू असताना ती मध्येच तोडून डॉन यांनी त्याला आत बोलावले आणि बायकांना गप्प बसण्यास सांगितले.

सँको आत आला. पाद्री व न्हावी हे डॉन क्विक्झोट यांचा निरोप घेऊन गेले. त्यांना वाटले, 'डॉन बरा होण्याची आशाच नको. त्याच्या मस्तकात मूर्खपणा खोलवर रुतलेला आहे. शिलेदारीच्या वेड्या कल्पनांमुळे तो भारला गेला आहे.' पाद्री न्हाव्याला म्हणाला, "मित्रा, आपल्या या भल्या माणसाचे अधिक भले काही ऐकायला येईल अशी मला आशा नाही. दुसऱ्या एखाद्या मोहिमेवर तो गेल्याचे आपल्या कानी लौकरच येईल."

न्हावीदादा उत्तरले, "मलाही डॉनची काही आशा वाटत नाही. त्याच्या मूर्खपणाचे मला इतके नवल वाटत नाही, पण आपल्याला बेट मिळण्याची खात्री बाळगणाऱ्या त्याच्या त्या शागिर्दाच्या वेडेपणाचे मात्र मला नवल वाटते. ते त्याचे वेडेपण त्याच्या मस्तकातून काढून टाकण्यास मानवाची सारी अक्कल असमर्थ ठरेल, असे मला वाटते."

"ईश्वरच त्या दोघांना ताळ्यावर आणो!" पाद्रीमहाशय उद्गारले. "तोपर्यंत त्यांच्यावर आपण नजर ठेवू. आपल्या शिलेदाराची स्वैर कल्पना आणि त्याच्या शागीर्दाचा आचरटपणा यांचा काय परिणाम होतो हे आपण पाहू. त्या दोघांची मने एकाच मुशीत ओतलेली असती तर किती बरे झाले असते? त्या शागीर्दाच्या आगाऊपणाशिवाय त्याच्या धन्याच्या मूर्खपणाला काही किंमत नव्हती."

न्हावी म्हणाला, "बरोबर, आता ते दोघे एकत्र आले आहेत, तेव्हा त्यांच्यामध्ये काय घडते हे जाणण्याची मला इच्छा आहे. त्या दोन बायका त्याचा वृत्तांत आपल्याला व्यवस्थितपणे सांगतील, याविषयी मला शंका नाही. कारण दुसऱ्याचे संवाद ऐकण्याचा मोह टाळण्याचा त्यांचा स्वभाव नाही."

मध्यंतरी डॉन क्विक्झोट यांनी त्या आपल्या शागीर्दाला घरात घेऊन आतून कुलूप लावल्यावर त्या उभयतांमध्ये पुढील संवाद झाला :—

डॉन म्हणाले, "सँको, तुझे बोलणे ऐकून मला फार वाईट वाटले. अरे, मी माझा स्वतःचा राजवाडा सोडून बाहेर पडलो, आणि तू म्हणतोस, 'तुम्ही मला माझ्या छोट्या झोपडीतून भुलवून बाहेर काढले.' आपण दोघे एकदम बाहेर पडलो, एकत्र चाललो आणि एकदिलाने हिंडलो. एकच वैभव आपण भोगले – आणि एकाच प्रकारची संकटे आपण सोसली. तुझ्यापेक्षा मला जर काही विशेष लाभ झाला असेल, तर तो म्हणजे तू एकदा घोंगडीत उडवला गेलास, तर मी शंभर वेळा इकडे–तिकडे आदळलो–आपटलो आणि जखमी झालो."

यावर सँको म्हणाला, "छान आहे आपला युक्तिवाद. आपणच असे म्हणत असता की, दुर्दैव आणि अडथळे शागिर्दापेक्षा शिलेदारावर अधिक वेळा कोसळतात."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " सँको, तू चुकतो आहेस. कारण म्हण अशी की, " कांदो कॅपउ दोल्सेत "

" नाही महाराज, मला आपल्या भाषेशिवाय दुसरी भाषा समजत नाही. " सँको म्हणाला.

डॉन क्विक्झोट यांनी खुलासा केला, " माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, डोके दुखू लागले की शरीराच्या सर्व अवयवांना वेदना होतात. आता मी तुझा धनी – म्हणजे डोके. आणि तू माझा चाकर – म्हणजे माझा एक अवयव. म्हणून, मला वेदना होताच तुलाही त्याचा ताप होणारच. प्रत्यक्ष रोग तुला होणार नाही, पण त्याच्या वेदना तुला होतील. प्रत्यक्ष रोग मीच सोसला पाहिजे. "

तेव्हा सँको म्हणाला, " रास्त आहे आपले बोलणे. पण जेव्हा आपला एक अवयव म्हणून मी घोंगड्यात उडवला जात होतो, तेव्हा माझे डोके भिंतीच्या दुसऱ्या बाजूस लोळत होते आणि माझी दुर्दशा पहात होते. पण माझ्या शारीरीक वेदनांमध्ये त्या माझ्या डोक्याने काही भाग घेतला नाही. "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " सँको, तुझी मोठी चूक होत आहे. तुझ्या वेदनांची जाणीव मला नव्हती, असे तू मानणे चुकीचे आहे. तुला जितक्या शारीरिक वेदना होत होत्या, त्यापेक्षा मला मानसिक वेदना अधिक होत होत्या. पण आपण हा वाद दुसऱ्या वेळेपर्यंत लांबणीवर टाकू. त्यावेळी आपल्याला आपली जुनी गाऱ्हाणी दूर करण्यास संधी मिळेल. आता मेहेरबानी करून हे सांग की, शहरातील लोक माझ्याबद्दल काय बोलत आहेत ? शेजारीपाजारी, आसपासचे लोक यांना माझ्याबद्दल काय वाटते ? सभ्य नि उच्च वर्ग आमच्याबद्दल काय म्हणतो ? माझे पराक्रम, माझे थोर शस्त्र-नैपुण्य आणि माझे सौजन्यशील वर्तन – याबद्दल सरदारांमध्ये काय चर्चा चालते ? शिलेदारीची संस्था विस्मृतीच्या थडग्यातून उकरून काढून जगात तिची पुनः प्राणप्रतिष्ठा करण्याच्या माझ्या योजनेबद्दल त्यांचे काय विचार आहेत ? थोडक्यात म्हणजे, तू जे जे ऐकले असशील, ते सारे मोकळेपणाने नि प्रामाणिकपणे आम्हास निवेदन कर – त्यात आमच्या प्रशंसेची भर घालू नकोस किंवा निंदा होईल म्हणून काही गाळू नकोस. सत्य हे सन्मान्य रीतीने नि उघड्या-नागड्या स्वरूपात धन्यापुढे मांडणे, हे विश्वासू सेवकाचे कर्तव्य होय. सँको, तू हे लक्षात ठेव की, राजापुढे सत्य जर प्रशंसेचा हिडीस पोषाख काढून साध्या सरळ स्वरूपात ठेवले गेले, तर आपल्याला अधिक सुखाचे दिवस येतील आणि हे युग सुवर्णयुग ठरेल – नि त्याच्या तुलनेने, प्राचीन काळ हा लोहयुग ठरेल, हे लक्षात ठेव आणि साऱ्या गोष्टींचा प्रामाणिक वृत्तांत माझ्या कानी घाल. "

सँकोने उत्तर दिले, " तसे मी मनापासून करीन. मी जे ऐकले असेल ते, अधिक-उणे न करता, मी आपल्याला निवेदन केले; तर महाराजांनी राग धरू नये. "

" आम्हाला कशानेही राग येणार नाही. कोणताही निर्बंध न पाळता मुक्तकंठाने बोल. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले.

सँको म्हणाला, " सांगतोच तर मग ! आपल्याला प्रथम नि प्रमुख गोष्ट कळली पाहिजे ती ही की, आपण एक पुरेपुरे वेडे आहात आणि मी दुबळ्या मेंदूचा माणूस आहे, असे सर्वसामान्य लोक समजतात. वरिष्ठ वर्गाचे लोक म्हणतात, आपण वरिष्ठ वर्गाच्या मर्यादेत राहण्यास राजी नसल्याने ' डॉन ' बनलात आणि शिष्ट कर्मठ शिलेदाराचा आव आणलात. कशावर ? तर आपल्या घराजवळची द्राक्षाची छोटी बाग–दोन एकर जमीन–थोडी अंगणात, थोडी परसात. एवढ्यावर सरदार लोक नाक उडवून खरोखर असे म्हणतात की, या क्षुल्लक वरिष्ठ लोकांनी स्वतःला आमच्याइतके चांगले समजू नये. खेड्यातील जे जुने–पुराणे उमराव स्वतःची पादत्राणे स्वतः रंगवितात व दुरुस्त करतात आणि हिरव्या रेशमाचे ठिगळ आपल्या फाटक्या काळ्या पायमोज्यांना लावतात, यांच्यासारखेहि स्वतःला समजू नये.

यावर डॉन क्विक्झोट म्हणाले," या साऱ्याचा माझ्या मनावर काडीमात्र परिणाम होत नाही. कारण, मी नेहमी चांगले कपडे घालतो आणि त्यांना कधी ठिगळे लावीत नाही. क्वचित् ते थोडेसे फाटलेले असतील हे खरे, पण माझ्या मोठ्या कपड्यांपेक्षा माझ्या चिलखताला ते अधिक लागू आहे. "

सँको पुढे म्हणाला, " आपल्या सामर्थ्याविषयी, शस्त्र–कौशल्याविषयी, सौजन्य-शील वर्तनाविषयी आणि हाती घेतलेल्या कार्याविषयी, नाना मते आहेत. काही म्हणतात, तो वेडा आहे, पण गंमत्या वेडा आहे. दुसरे म्हणतात, तो शूर आहे पण त्याचे नशीब खडतर आहे. आणखी कोणी म्हणतात, तो सौजन्यशील आहे पण तसाच आगाऊही आहे. ते आपल्यावर अशा नाना दोषांचे आरोप करीत असतात आणि आपणा उभयतांची अशी छकले उडवीत असतात की, त्यामुळे आपल्या शरीरात एकही शाबूत हाड शिल्लक राहणार नाही. "

डॉन क्विक्झोट गंभीरपणे उद्गारले, " सँको, हे लक्षात ठेव की, कोणाचेही गुण तेजाने जितके अधिक चमकू लागतात, तितका त्याला मत्सराचा छळ अधिक सोसावा लागतो. प्राचीन काळातील त्या सुप्रसिद्ध वीरांपैकी एकालाही निंदेचे विषारी बाण चुकविता आले नाहीत. अत्यंत धैर्यशाली, समंजस व पराक्रमी सेनापती असलेला ज्युलियस सीझर हा 'महत्त्वाकांक्षी आहे-त्याचे कपडे असावेत तितके स्वच्छ नाहीत, आणि त्याचे वर्तनही पण स्वच्छ नाही.' असे लोक बोलत असत. शिकंदराला त्याच्या पराक्रमी कृत्यांमुळे ' महान् ' ही पदवी मिळाली होती; पण त्याला मद्याचे व्यसन होते, असा आरोप त्याचेवर करण्यात येतो. हर्क्युलसने शौर्याची किती कृत्ये केली ! पण तो विषयी आहे–स्त्रीलंपट आहे, असा आळ त्याचेवर घेण्यात आला. ॲमडिस डी गॉल याचा भाऊ डॉन गलोर हा भांडखोर असल्याबद्दल गवगवा झाला आणि खुद्द त्याचा भाऊ रड्या प्रेमिक आहे असा बोभाट झाला. म्हणून प्रिय सँको, निंदेच्या हल्ल्यापासून कोणीही थोर माणूस सुटलेला नसल्यामुळे, तू वर्णन केलेस तेवढे निंदा–पुराण मी आनंदाने सहन करीन. "

पण सँको म्हणाला, "अरे बापरे ! एवढ्यावर भागले नाही. लोक एवढे बोलूनच थांबले नाहीत."

"का ? आणखी काय बोलणार ते ?" डॉन क्विक्झोट यांनी विचारले.

"काय बोलणार ?" सँकोने ओरडून म्हटले, "किती तरी विचित्र गोष्टी लोक बोलतात. अजून आपल्याला मांजराच्या शेपटीतल्या पिसवा पाहायच्या आहेत. आता-पर्यंत आपल्याला बदाम-पिस्तेच मिळाले. पण जर महाराजांसंबंधी साऱ्या शहरात जी निंदा-नालस्ती-निभर्त्सना चालू असते, ती ऐकण्याची आपली इच्छा असेल, तर काही राखून न ठेवता मी तुम्हाला सांगतो. त्यावरून आपल्याबद्दल लोक काय बोलतात, याची आपल्याला कल्पना येईल. बार्थोलोम्यू कॅरास्को याचा मुलगा सालामँका विद्यापीठाचा हुशार विद्यार्थी आहे अन् तो लवकरच साहित्याचा पदवीधर होणार आहे. काल रात्री तो घरी आला होता. तेव्हा त्याला मी भेटावयास गेलो असता तो मला म्हणतो कसा, 'तुमच्या महाराजांचा सारा इतिहास डॉन क्विक्झोट डी ला मांचा या सुप्रसिद्ध नावाने ग्रंथात नोंदला गेलेला आहे.' तसेच 'सँको पँझा' या माझ्या खऱ्या नावाने माझीही नोंद त्या ग्रंथात झालेली आहे. तसेच लेडी डल्सीनिया डेल टोबोसो हिचाही निर्देश त्या ग्रंथात आहे. आपण दोघांमध्येच ज्या गोष्टी बोलल्या गेल्या त्याही त्याने मला सांगितल्या. त्या ऐकून मी चकित झालो. त्याला त्या कशा कळल्या याची कल्पना मी काही करू शकत नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, मी तुला खात्रीने सांगतो की, कोणा शहाण्या जादूगाराने आपला इतिहास लिहिला असला पाहिजे. त्या सर्वज्ञ जादूगारापुढे त्याला हवी असलेली कोणतीही गोष्ट लपविता येत नाही."

"शहाणा आणि जादूगार एकच व्यक्ती कशी असू शकेल ?" सँकोने विचारले. "सॅम्सन कॅरास्को हे त्या गोष्टी-सांग्याचे नाव ! तो म्हणाला, सिड हॅमेट बेरेनजेनास याने तो इतिहास लिहिला आहे."

"हे मूर लोकांमध्ये नाव आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले. तेव्हा सँको म्हणाला, "तुमच्या मूर लोकांना बेरेनजेनासचे प्रेम आहे." त्यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, "खरे आहे, सँको. त्या सिडचे आडनाव तू चुकीने घेतलेस. कारण, अरबी भाषेत सिड म्हणजे उमराव.

सँकोने उत्तर दिले, "ते खरे असेल. पण त्या तरुण विद्यार्थ्याला मी इकडे आणावे अशी आपली इच्छा असेल, तर मी पंख लावून त्याच्याकडे जाईन व त्याला येथे आणीन."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा, तसे केलेस तर खरोखर तू आमच्यावर खास कृपा केलीस, असे होईल. कारण, आतापर्यंत तू आम्हास जे निवेदन केले आहेस,

त्यामुळे आमचे डोके शंकांनी नि अपेक्षांनी भरून गेले आहे. म्हणून सारा इतिहास मला यथातथ्यपणे कळेपर्यंत मी सकस अन्नग्रहण करणार नाही."

"मी जातो आणि त्याला घेऊन येतो." सँको म्हणाला, आणि आपल्या धन्याला सोडून तो त्या विद्यार्थ्याच्या शोधासाठी बाहेर पडला. थोड्या वेळाने तो त्याला घेऊन आला. नंतर त्या सर्वांचा अत्यंत मनोरम असा सुखसंवाद झाला.



प्रकरण ३

# डॉन क्विक्झोट, सँको पँझा आणि पंडित कॅरास्को यांच्यामधील सुख-संवाद

डॉन क्विक्झोट विलक्षण चिंतातुर अवस्थेत होते. सँकोने सांगितल्याप्रमाणे, पंडित कॅरास्कोने त्यांच्या स्वतःसंबंधीचे जे अनुभव पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले होते, ते ऐकण्याची क्विक्झोट यांना आतुरता होती. अशा अनुभवांचा इतिहास पूर्णपणे लिहून झालेला असेल असे मानण्यास त्यांचे मन तयार होईना. कारण त्यांनी ज्या शत्रूंची मुंडकी कापली होती, त्यांचे रक्त आपल्या समशेरीवर अजून वाळलेले नाही असे क्विक्झोट यांना वाटत होते. आपल्या प्रचंड समर-चमत्कारांचा इतिहास अद्याप पूर्ण झालेला नाही आणि छापला गेलेला नाही, असे ते मानीत होते. तथापि त्यांनी शेवटी असा निर्णय केला की, कोणा तरी विद्वान ऋषीने मित्र-कार्य म्हणून जादूच्या साह्याने ते अनुभव मुद्रित केले असतील, आणि पूर्वीच्या अत्यंत सुविख्यात अशा शिलेदारांच्या परम उदात्त कृत्यावर मात करणाऱ्या आपल्या पराक्रमाचे पवाडे गाइले असतील. किंवा उलटपक्षी, शत्रूच्या भावनेने त्याने आपल्या महान पराक्रमाचे तेज कलंकित केले असेल किंवा नष्ट केले असेल, आणि कोणाही क्षुद्र सेवकाने केलेल्या अत्यंत क्षुल्लक कृत्यापेक्षा आपले पराक्रम कमी लेखले असतील.

क्विक्झोट यांच्या मनात असा विचार आला की, सेवकांची कृत्ये कधीच नोंदली जात नाहीत. तरीसुद्धा जर त्यांचे असे एखादे पुस्तक छापले गेले असेल, तर ते भरभक्कम, भपकेबाज, भव्य आणि प्रमाणभूत असेच असेल. कारण काही झाले तरी तो शिलेदारीचाच इतिहास ठरेल. या विचाराने त्यांना थोडा वेळ थोडेफार समाधान झाले; पण पुनः त्यांच्या डोक्यात दुःखद शंकांचे व चिंतांचे चक्र फिरू लागले. कारण, लेखकाने आपले नाव ' सिड ' असे दिले होते– आणि म्हणून तो मूर असला पाहिजे. मूर लोकांच्या राष्ट्रापासून सत्याची अपेक्षा कधीच धरता येत नाही. ते लोक इतरांवर खोट्यानाट्या आणि कल्पित कथा लादीत असतात, बनावट गोष्टींनी इतरांना खोटे ठरवीत असतात आणि स्वतःसंबंधी भलत्या कल्पना करण्याचा त्यांना छंद असतो. आपली प्रेयसी टोबोसाची डल्सिनिया हिच्या प्रतिष्ठेला बाध आणण्यासारख्या आपल्या प्रणय-लीलांचे बेफाट वर्णन त्या लेखकाने केले असेल, या विचारानेही क्विक्झोट अस्वस्थ झाले होते. आपल्या अढळ निष्ठेचे वर्णन त्या इतिहासग्रंथात आपल्याला वाचावयास

मिळावे, अशी त्यांची मनापासून इच्छा होती. डल्सिनियाविषयी त्यांची प्रेमभावना कितीही उत्कट असली तरी त्यांनी संयम व सभ्यता पाळलेली होती आणि तिच्याखातर सर्व प्रकारच्या राण्या-महाराण्या आणि सुंदर ललना यांना त्यांनी झिडकारले होते; फार काय, आपल्या नैसर्गिक वासनांचा भयप्रद आवेगही त्यांनी दडपून टाकला होता. अशा हजारो खेदजनक कल्पनांनी ते प्रक्षुब्ध व संभ्रांत झालेले आहेत, असे सँको व कॅरास्को यांना दिसून आले. तरीसुद्धा त्या पाहुण्याचे स्वागत मोठ्या सभ्यतेने करण्यास ते चुकले नाहीत.

या पंडिताचे नाव सॅम्सन् असले तरी, त्याचा देह धिप्पाड नव्हता. त्याचा स्वभाव मोठा गमत्या होता. त्याचा चेहरा फिकट व कुरूप होता, पण त्याची बुद्धी चांगली होती. त्याचे वय सुमारे चोवीस वर्षांचे होते. त्याचा चेहरा गोल आणि नाक बसके होते व त्याची जिवणी लांबट होती. मत्सरी स्वभावाची सारी लक्षणे त्याचे अंगी होती. दुसऱ्यांची चेष्टा करून स्वतः खूष होण्यात त्याला मोठा आनंद वाटे. डॉन क्विक्झोट यांना पाहिल्यावर त्याने असेच वर्तन केले. तो ओरडून म्हणाला, " अहो परमोदार डॉन क्विक्झोट, आपल्या कर-कमलाचे चुंबन घेण्याची मला अनुज्ञा द्या. ( धर्मपीठाच्या पहिल्या फक्त चार पदव्या मी संपादन केलेल्या असल्या तरी) सेंट पीटरच्या परंपरेप्रमाणे मी आपल्याला अभिवादन करतो आणि नक्की सांगतो की, या अखिल पृथ्वीतलावर आतापर्यंत जे जे शिलेदार होऊन गेले-किंवा यापुढे होतील—त्या सर्वांमध्ये आपण अत्यंत सुविख्यात आहा. आपल्या प्रचंड पराक्रमांच्या इतिहासाने सर्व जगताला संपन्न करणारा पंडित सिड हॅमेट बेनेनगेली धन्य आहे, आणि त्याहीपेक्षा धन्य आहे, तो जिज्ञासू कलावंत की, ज्याने समस्त मानवजातीच्या मनोविनोदार्थ त्या ग्रंथाचे भाषांतर अरबीतून आमच्या ग्राम्य भाषेमध्ये करण्याचे परिश्रम केले. "

त्याला उठवून डॉन क्विक्झोट म्हणाले, " महाराज, माझ्या पराक्रमांचा इतिहास अस्तित्वात असणे शक्य आहे काय ? आणि तो लिहिणारा एक मूर पंडित असू शकेल काय ? " तेव्हा तो पंडित म्हणाला, " हे सत्य अगदी उघड आहे. त्या इतिहास-ग्रंथाच्या बारा हजारांहून अधिक प्रती या क्षणापर्यंत छापलेल्या आहेत, याविषयी मला काडीमात्र शंका नाही. संधी मिळाली तर याची साक्ष पोर्तुगाल, बार्सेलोना व व्हॅलेन्सिया या देशात पहावयास मिळेल. कारण तेथे तो ग्रंथ छापलेला आहे. अँटवर्प येथेही सध्या तो छापला जात आहे असे म्हणतात. त्याचे भाषांतर जिच्यामध्ये होणार नाही अशी एकही भाषा जगात असणार नाही, असे मला खात्रीने वाटते. "

हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, " साऱ्या जगात आपली उत्तम कीर्ती पसरलेली आहे आणि आपली कृत्ये छापून प्रसिद्ध झालेली आहेत, हे पाहण्यास जो जिवंत असतो, अशा अत्यंत सद्गुणी माणसाला फार मोठे समाधान प्राप्त होते. ' उत्तम कीर्ति ' असे मी म्हणतो, याचे कारण अकीर्ती होण्यापेक्षा मरण बरे. " तेव्हा कॅरास्कोने उत्तर दिले, " उत्तम कीर्ती व लौकिक यांचे बाबतीत आतापर्यंत होऊन गेलेल्या सर्व शिलेदारांपेक्षा

आपण ती अधिक मिळवली आहे. कारण आपले चारित्र्य, शौर्य, आपली निर्भयता आणि संकटाशी मुकाबला करण्यात आपण दाखविलेले महान धैर्य, तसेच आपत्काळी टिकून राहिलेले आपले चित्तस्थैर्य, जखमा व त्रास सहन करण्यात आपण दाखविलेला शांतपणा, आपली शालीनता, आणि आपण व टोबोसोची आपली प्रेयसी डोना डल्सिनिया यांच्यामधील उदात्त प्रणय आणि त्या प्रणयातील संयम-या सर्वांचे वर्णन न्यायबुद्धीने करण्याचे कामी अरबी इतिहासकाराने-आणि त्याच्या ख्रिश्चन भाषांतरकाराने-फार परिश्रम घेतले आहेत." ते ऐकून सँको ओरडला, "छेः ! छेः ! तिला असे कोणी संबोधिल्याचे मी कधी ऐकले नाही. डोना हे नवेच नाव आहे. तिला फक्त टोबोसोची लेडी डल्सिनिया असेच म्हणत असत, आणि ते आता इतिहासात नमूद होऊन चुकले आहे." तेव्हा कॅरास्को म्हणाला, "हा काही महत्त्वाचा विरोध नाही." डॉन क्विक्झोट यानी पुस्ती जोडली, "छेः ! मुळीच नाही. पण, भल्या गृहस्था, मला हे कृपा करून सांग की, माझ्या सर्व पराक्रमांपैकी कोणत्या पराक्रमावर त्या इतिहासात भर दिला आहे ?" कॅरास्कोने उत्तर दिले, "जशी ज्याची अभिरुची, तसे त्याचे मत. पवनचक्कीला राक्षस मानून आपण त्यांच्यावर हल्ला करण्याचे जे साहस केले, त्याचा उदो उदो कोणी करतात, तर कापडगिरण्यांचे बाबतीत आपण दाखविलेल्या शौर्याचे पवाडे कोणी गातात. मेंढ्यांचे दोन कळप म्हणजे दोन सैन्ये आहेत, असे म्हणून आपण केलेल्या बहादुरीमुळे काही लोक चकित होतात, तर सेगोव्हिया येथे नेण्यात येणाऱ्या प्रेताचे बाबतीत आपण जे शौर्य प्रगट केले, त्याचे मोल काही लोक फार मानतात. कोणी म्हणतो, गुलामांच्या बाबतीत आपण केलेल्या वीरकृत्याची तुलना यांपैकी कशाशीही होणार नाही; तर कोणी म्हणतो, बेनेडिक्टाईन राक्षस आणि पराक्रमी बिस्केनेर यांच्याबाबतीत आपण दाखविलेले धाडस अतुल्य आहे."

सँकोने विचारले, "अहो पंडितमहाशय, आमच्या बहुमोल रोझिनांट घोड्याने काही घोड्यांशी थोडी फार प्रणय-चेष्टा केली, म्हणून त्याला बदडण्यात आले, त्या यांगेसियन लोकांबद्दल काही बोलले जात नाही काय ? हे मला कृपा करून सांगा." कॅरास्कोने उत्तर दिले, "क्षुल्लक गोष्टसुद्धा त्या इतिहासात वगळलेली नाही. त्या विद्वानाने शक्य तितक्या बारकाव्याने साऱ्या गोष्टी नोंदल्या आहेत – घोंगड्यामध्ये इमानी सँकोने ज्या उड्या मारल्या, त्यांचीही नोंद त्यात केलेली आहे." तेव्हा सँकोने खुलासा केला, "मी घोंगडीत उड्या कधीच मारल्या नाहीत – हवेत मारल्या – माझ्या इच्छेपेक्षा अधिक वेळा मारल्या – त्यामुळे मला अधिक दुःख झाले." तेव्हा डॉन क्विक्झोट गंभीर सिद्धांत सांगू लागले, "जगातील कोणत्याही इतिहासात -त्यातही शिलेदारीच्या गोष्टीत- दैवाचे चढउतार तुम्हास पहावयास मिळणारच. सदैव सुयश मिळेल, अशी खात्री कोणाही माणसास धरता येत नाही." कॅरास्को म्हणाला, "ते खरे, पण आपल्या इतिहासाच्या कांही वाचकांना असे वाटते की, थोर डॉन क्विक्झोट यांना असंख्य वेळा जो चोप बसला, त्याची नोंद करण्याचे श्रम लेखकाने घ्यावयास नको होते." सँको

म्हणाला, "इतिहासातील सत्य तेच होय." डॉन क्विक्झोट उद्गारले, "मानवी व्यवहारातील असे प्रसंग गाळले असते तर बरे झाले असते. कारण इतिहासाला जे प्रसंग वळण लावीत नाहीत किंवा त्याची हानी करीत नाहीत, पण इतिहास-नायकाची बदनामी करतात, ते विस्मृतीच्या गुहेत गाडले गेले पाहिजेत – निवेदन करता कामा नयेत. खरे पाहता, व्हर्जिलने दाखविला आहे तितका पवित्र एनियस नव्हता आणि होमरने चित्रित केला तितका युलिसिस शहाणा नव्हता." कॅरास्को म्हणाला, "माझे मत आपल्यासारखेच आहे. पण कवी म्हणून लिहिणे निराळे आणि इतिहासकार म्हणून लिहिणे निराळे. गोष्टी जशा घडावयास हव्यात, तशा रंगविल्या.की कवीचे काम संपते. पण त्या प्रत्यक्ष जशा घडल्या, तशाच – कोणत्याही सबबीवर त्यांत अधिक-उणे न करता – इतिहासकाराने निवेदन केल्या पाहिजेत."

यावर सँको म्हणाला, "हा मूर इतिहासकार सत्याच्या मार्गाने जात असेल, तर माझ्या धन्याच्या बरगड्या खिळखिळ्या झाल्याचे वर्णन करताना तो माझे हाल सांगण्यास विसरला नसेल. कारण आमच्या धनीसाहेबांच्या खांद्यांचे मोजमाप त्या लोकांनी घेतले नसले, तरी माझ्या सर्व शरीराचे घेतले होते, आणि ते चांगलेच पिटले होते. पण असे घडणे यात काही नवल नाही. डोके दुखू लागले म्हणजे प्रत्येक अवयवही दुखू लागतो." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, तू पक्का बिलंदर आहेस. तुझ्या मनात येईल तेव्हा तुला साऱ्या गोष्टी चटाचट आठवतात." सँको उद्गारला, "तसे नाही महाराज. माझ्या जखमा आणि ओरखडे विसरावयाचे मी मनांत आणले असते, तरी माझ्या बरगड्यांवरील वण व खुणा अद्याप ताज्या आहेत, त्या मला कशा विसरू देतील?" डॉन क्विक्झोट ओरडले, "गप्प बैस, मूर्खा. या विद्वान पदवीधराला आपली कथा पुढे सांगू दे म्हणजे माझ्याविषयी इतिहास काय म्हणतो, हे मला कळेल." सँको म्हणाला, "आणि माझ्याविषयीसुद्धा. कारण इतिहासातील एक सर्वश्रेष्ठ धर्मगुरू ( Parson ) मी आहे, असे लोक मला सांगतात." ते ऐकून कॅरास्को म्हणाला, "गुरु ( Parson ) नव्हे, व्यक्ती ( Person ) असे म्हण, सँको." तेव्हा सँको ओरडला, "वा! वा! आपल्याला एक नवाच भाष्यकार मिळाला म्हणावयाचा." कॅरास्को म्हणाला, "अरे इमानी सँको, त्या इतिहास-ग्रंथात तू जर 'दुसरा वीर' म्हणून नोंदला गेला नसशील, तर माझ्या ज्ञानाला आग लागो! शहाण्या शहाण्या माणसांपेक्षा तू चांगले बोलतोस, असे काही लोकांना माहीत आहे, तर काही लोकांना असे वाटते की, तू फार भोळा आहेस. तुझ्या धन्याने तुला जे बेट बहाल करण्याचे वचन दिलेआहे, त्याचे राज्य आपल्याला मिळाले आहे, अशा खुशीत तू आहेस, असे काही लोक समजतात." तेव्हा डॉन क्विक्झोट गंभीरपणे म्हणाले, "जोपर्यंत आयुष्य आहे, तोपर्यंत आशा असते. कालांतराने, अनुभव मिळाल्यावर, सँको हा राज्य चालविण्यास आतापेक्षा अधिक लायक ठरेल."

तेव्हा सँको म्हणाला, "काय हे महाराज? या वयात मी जर एखाद्या बेटाचा

राज्यकारभार करण्यास लायक नसेन, तर मला मेथुसिलाचे अतिदीर्घ आयुष्य लाभले तरी मी राज्यपाल कधीच होणार नाही. खरी अडचण ही आहे की, आपल्याला पुरेशी अक्कल आहे पण आपल्याला बेट अजून मिळायचे आहे." यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे पहा सँको, चांगले होईल अशी आशा धर. ईश्वरावर विश्वास ठेव, म्हणजे सारे काही ठीक होईल—तुझ्या कल्पनेपेक्षाही कदाचित् चांगले होईल. पण लक्षात ठेव, परमेश्वराच्या अनुज्ञेविना झाडावरील पानही हालत नाही." कॅरास्को म्हणाला, "हे अगदी खरे आहे. प्रभूची इच्छा असेल तर सँकोला एक काय, हजार बेटे मिळतील, असे मी खात्रीने सांगतो." सँको उद्गारला, "का नाही मिळणार ? मी माझ्या आयुष्यात असे राज्यपाल पाहिले आहेत की, माझ्या खेटराची सर त्यांना येणार नाही, असे मला वाटते. आणि तरीही लोक त्यांना 'महाराज, महाराज' म्हणतात आणि ते चांदीच्या ताटात जेवतात." यावर कॅरास्को म्हणाला, "अरे, त्यांच्या राज्यांचा कारभार करणे सोपे होते. तुझ्या बेटाचा कारभार करण्यास ते लायक नव्हते. त्यांना राज्यकारभाराचे प्राथमिक ज्ञान तरी हवे होते." सँकोने उत्तर दिले, "ज्ञान कशाला ? मला नुसता कारभार द्या म्हणजे मला साऱ्या गोष्टी कळू लागतील, असे मी खात्रीने सांगतो. पण अहो पंडित सॅम्सन कॅरास्को, राज्यकारभाराचा प्रश्न बाजूस ठेवला तरी तुमचा इतिहासकार मला विसरला नाही आणि माझ्या स्वभावाचे चित्रण त्याने वाईट केले नाही, याचा मला प्रचंड आनंद होत आहे. कारण मी जुना मूळचा बिनबाटलेला ख्रिश्चन आहे. त्याला न शोभेसे वर्णन त्याने जर केले असते तर त्याला मी असा घंटानाद ऐकवला असता की, तो बहिऱ्या माणसालाही ऐकू गेला असता." कॅरास्को म्हणाला, "तो चमत्कारच झाला असता !" तेव्हा सँको आवेशाने उद्गारला, "चमत्कार असो-नसो, प्रत्येक माणसाने आपण कसे बोलावे, दुसऱ्याबद्दल काय लिहावे याची काळजी घेतली पाहिजे आणि हवे ते भरकटता कामा नये. आपल्या डोक्यात जे वेडेवाकडे विचार येतील ते त्याने लिहू नयेत."

यावर कॅरास्को म्हणाला, "या इतिहास-ग्रंथात एक दोष असा आढळतो की, त्यात त्याने एक कादंबरी घातली आहे आणि तिला त्याने नाव दिले आहे, 'एक साहसी जिज्ञासू.' ती कादंबरी वाईट लिहिली आहे, किंवा तिची रचना नापसंत होण्यासारखी आहे असे नव्हे, पण ती योग्य ठिकाणी आलेली नाही आणि डॉन क्विक्झोट यांच्या कथेशी तिचा काही संबंध नाही." तेव्हा सँको म्हणाला, "त्या कुतरड्याने साऱ्या गोष्टींचा चिवडा केला आहे, असे मी पैजेवर सांगतो." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "आता मला असे दिसते की, माझा इतिहास लिहिण्याचा प्रयत्न ज्याने केला, तो विद्वान नाही, तर अडाणीपणाने बडबडणारा कोणी तरी मूर्ख तो असावा—प्रत्येक गोष्टीत लुडबुड करणारा असावा आणि म्हणून त्याने काही तरी लिखाण खरडले असावे. त्याच्या डोक्यात विवेकाचा कणही नसावा आणि म्हणून तो त्या गोंधळातून बाहेर पडू शकला नाही. उबेडा येथील ऑर्बेनेजा या चित्रकारासारखेच त्याचे झाले.

त्या चित्रकाराला कोणी विचारले, 'हे कशाचे चित्र ?' तेव्हा त्याने उत्तर दिले. "मला सुचले तसे चित्र मी काढले." आणि त्याने काढलेल्या कोंबड्याच्या वेड्या-वाकड्या चित्राखाली त्याला लिहावे लागले, 'हा कोंबडा आहे.' तशीच गत त्या लेखकाने माझ्या इतिहासाची करून टाकलेली दिसते. म्हणून त्या इतिहासाचा उलगडा करण्यासाठी त्यावर एक भाष्य लिहिणे अवश्य आहे." पण कॅरास्को म्हणाला, "छेः तशी मुळीच आवश्यकता नाही. कारण, त्याने साध्या गोष्टी इतक्या स्पष्ट केल्या आहेत की, कोणाला कळणार नाही, असे त्यात काहीच नाही. तो ग्रंथ मुले हातात धरतात, तरुण वाचतात, प्रौढ माणसे समजावून घेतात आणि वृद्ध माणसे त्याची प्रशंसा करतात. सारांश, तो इतिहास इतका वाचला गेला आहे—अभ्यासला गेला आहे—चाळला गेला आहे आणि इतका सुप्रसिद्ध झाला आहे की, लोकांना एखादे हडकुळे घोडे दिसले रे दिसले की, ते चटकन् ओरडतात. 'तो पाहा रोझिनांट चालला आहे.' पण, तुमच्यासंबंधीचा मजकूर जितक्या दक्षतेने लोक वाचतात, तितका दुसरा कोणताच वाचीत नाहीत. डॉन क्विक्झोट जेथे नाहीत, असा सरदाराचा एकही दिवाणखाना असणार नाही. तो ग्रंथ एकाने खाली ठेवला की दुसऱ्याने तो उचललाच म्हणून समजावे. इकडे तो कोणी शोधतो तर दुसरीकडे तो पळविला जात आहे. थोडक्यात म्हणजे या ग्रंथात एकही असभ्य शब्द नाही की हीन विचार नाही. आणि त्यामुळे आतापर्यंत कधी निर्माण झाला नसेल इतका आल्हाददायक असा हा ग्रंथ मानला जातो. त्यापासून मिळणारा विरंगुळा शुद्ध–सात्त्विक स्वरूपाचा आहे."

तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "यापेक्षा निराळ्या तऱ्हेने इतिहास लिहिणे म्हणजे असत्य लिहिणे होय—सत्य लिहिणे नव्हे. जे इतिहासकार असत्य लिहिण्याचा अपराध करतात, त्यांना खोटी नाणी पाडण्यासारखीच शिक्षा झाली पाहिजे. पण त्या लेखकाने आपल्या इतिहासात, आपल्या उद्देशाशी मुळीच संबंधित नसलेल्या विदेशी कादंबऱ्या आणि पराक्रम का कोंबावेत हे मला कळत नाही. त्याच्या लेखणीला खाद्य म्हणून पुरतील इतके विपुल पराक्रम माझे स्वतःचे आहेत. पण 'पोते गवताने भरा की भुश्याने भरा पण भरा.' ही म्हण आपण येथे लागू केली पाहिजे. खरे बोलावयाचे तर, माझे विचार आणि माझे सुस्कारे आणि माझी दुःखे, माझ्या प्रशंसनीय योजना आणि माझे पराक्रम-एवढ्यापुरतेच त्याने आपले लेखन मर्यादित केले असते, तरीसुद्धा टोस्टाटसच्या ग्रंथाइतका महाग्रंथ निर्माण झाला असता. अहो पंडितमहाशय, मला असे वाटते की, इतिहास रचणे—किंवा कोणतेही पुस्तक लिहिणे—हे लोक समजतात त्या-पेक्षा कठीण काम आहे. त्यासाठी विशाल विवेक हवा आणि परिपक्व समंजसपणाही हवा. आपले विचार डौलदार व शोभिवंत भाषेत प्रगट करणे आणि इतर लोकांचे वर्तन व कार्य जिवंत स्वरूपात मांडणे हे फार मोठ्या प्रतिभावंतांनाच शक्य असते. एखाद्या नाटकातील अत्यंत कलात्मक भाग मूर्खासंबंधी असतो पण म्हणून तो लिहिण्याचा आव मूर्खाने आणता कामा नये. उलट, इतिहास ही एक प्रकारे पवित्र वस्तू आहे.

कारण, त्यामध्ये सत्य असते–आणि जेथे सत्य असते तेथे तो 'महान् पिता' वास करीत असतो–निदान जितक्या प्रमाणात सत्य असेल तितक्या प्रमाणात तो तेथे असतो. परंतु, असेही काही लोक असतात की, जे तुमच्यासाठी पुस्तके लिहितात आणि शिळ्या भाकरीचे ताट भिरकावून द्यावे त्याप्रमाणे, जगात ती पुस्तके स्वैर सोडतात."

यावर पंडित म्हणाला, "कोणतेही पुस्तक इतके वाईट नसते––त्यामध्ये काही ना काही चांगले सापडते." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते खरे आहे. तरीही ज्या लोकांचे लेख प्रसिद्ध होण्यापूर्वीच त्यांना फार मोठी कीर्ती लाभलेली असते, ती सारी कीर्ती—किंवा तिचा बराचसा भाग–पुढे त्यांना गमवावा लागतो, असा नेहमीचा अनुभव आहे."

कॅरास्कोने खुलासा केला, "याचे कारण उघड आहे. त्यांची पुस्तके छापली गेल्यानंतर त्याचे वाचन पुष्कळ लोक करतात आणि ते त्यांची छाननी फार बारकाईने करतात. विशेषतः लेखकाचा बोलबाला आधीच पुष्कळ झालेला असला म्हणजे त्याच्या ग्रंथाची समीक्षा कठोरपणाने केली जाते आणि त्यातील दोष सहजच उघडकीस आणले जातात. जे लोक आपले स्वतःचे एकही पुस्तक प्रसिद्ध करीत नाहीत पण दुसऱ्याच्या लेखांची निंदा करण्यात ज्यांना आनंद वाटतो, अशा लोकांना प्रतिभासंपन्न व कीर्तिशाली कवीचा आणि सुविख्यात इतिहासकारांचा हेवा नेहमीच वाटतो — निदान पुष्कळ वेळा वाटतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "त्यात काही आश्चर्य नाही. असे पुष्कळ धर्मोपदेशक असतात की ज्यांची प्रवचने अत्यंत कंटाळवाणी होतात, पण दुसऱ्या लोकांच्या प्रवचनातील दोष आणि उथळपणा शोधून काढण्यात ते तत्पर असतात." कॅरास्कोने उत्तर दिले, "हे सारे खरे आहे. आणि म्हणून मला असे वाटते की, या निंदकांनी अधिक दया दाखवावी आणि कमी चिकित्सा करावी. सूर्याच्या स्वच्छ मुख-मंडलावरील डागांप्रमाणे जे लहानसान दोष ग्रंथात आढळतील, त्यांच्याविषयी त्यांनी कुरकुर करू नये आणि त्यावर अनुदार टीका करू नये. आपल्या ग्रंथाला दोषाचा कालिमा लागू नये म्हणून लेखक किती तरी रात्री जागून काढतो आणि नंतर आपला उदात्त ग्रंथ प्रकाशात आणतो, हे या टीकाकारांनी लक्षात घ्यावे. फार काय, पुष्कळ वेळा असे असते की, दोष म्हणून ज्यावर टीका होते, तो त्या ग्रंथाचा अलंकार असतो — तोंडा-वरील तीळ पुष्कळ वेळा सौंदर्य वाढवीत नाही काय ? हे सारे लक्षात घेऊन मी म्हणतो की, जो माणूस पुस्तक प्रसिद्ध करतो, तो मोठा धोका पत्करतो. प्रत्येक वाचकाची मान्यता मिळविण्यासारखी रचना करणे केवळ अशक्य आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अगदी खरे ! माझ्यासंबंधी जे लिहिले गेले आहे, त्याने फारच थोड्यांचे समाधान झाले असेल."

"छेः छेः, अगदी उलट घडले आहे." कॅरास्को म्हणाला, "आपल्या इति-हासाचा गौरव असंख्य लोकांनी केला आहे. काही थोड्या लोकांनीच त्या इतिहासाच्या लेखकापाशी स्मृती किंवा प्रामाणिकपणा नसल्याचा आरोप केला आहे. कारण, सँकोचे

गाढव कोणी चोरले हे सांगण्यास तो लेखक विसरला आहे; फक्त ते चोरले गेले एवढेच आपल्याला इतिहासात कळते. आणि तरीही सँको त्याच गाढवावर पुनः पुनः बसला आहे, असे आपल्याला आढळते. हे कसे ? यावर आधी काहीच प्रकाश टाकलेला नाही. शिवाय, सीरा मोरेना येथे कपड्याच्या पिशवीमध्ये सँकोला सोन्याची जी शंभर नाणी सापडली, त्यांचे त्याने काय केले, हे वाचकांस सांगण्याचे लेखक विसरला, असे लोक म्हणतात. त्या नाण्याविषयी एकही शब्द त्यात लिहिलेला नाही. त्या मोहोरांचे त्याने काय केले आणि त्याने त्या कशा खर्च केल्या, हे जाणण्याची पुष्कळ लोकांना तीव्र इच्छा आहे. हा एक अत्यंत महत्त्वाचा मुद्दा आहे. तो गाळल्याने हा इतिहास सदोष झाला आहे. ''

तेव्हा सँको म्हणाला, '' मित्रा सॅम्सना, तो सारा वृत्तांत फेकून देण्याच्या अवस्थेत मी सध्या आहे. माझ्या पोटात एकाएकी गोळा उठला आहे. त्यामुळे मला इतके अस्वस्थ वाटत आहे की, माझ्या पोटात अन्नाचे दोनचार गोळे गेले नाहीत तर मी एखाद्या मेणबत्तीसारखा जळून खलास होईन. एकदा का माझे जेवण झाले म्हणजे मी तुमचाच आहे. मग मी तुमचेच काय पण, ज्याच्या खांद्यावर डोके आहे, अशा कोण-त्याही माणसाचे, जगातील कोणत्याही गोष्टीविषयी समाधान करीन— मग ती गोष्ट गाढव हरवण्याविषयी असो किंवा ती सोन्याची नाणी खर्च करण्याविषयी असो ! '' असे म्हणून, अधिक एकही शब्द न बोलता किंवा कोणाच्या उत्तराची वाट न पाहता, तो तेथून तरातरा निघून गेला. डॉन क्विक्झोट यांनी पंडिताला तेथे थांबण्याची व आपल्या-बरोबर प्रायश्चित्तपर प्रार्थना करण्याची विनवणी केली. त्याप्रमाणे पंडित तेथे थांबला. नेहमीच्या मर्यादित जेवणाला दोन कबुतरांची पुरवणी झाली. जेवण चालू असताना सारा वेळ ते शिलेदारीची चर्चा करीत होते आणि कॅरास्को डॉन यांच्या कलाने घेत होता. नंतर त्यांनी झोपून दिवसाचा उकाडा पार केल्यानंतर सँको परत आला आणि त्या सर्वांचा पूर्वीचा सुख-संवाद पुढे चालू झाला.



प्रकरण ४

# पंडित सॅम्सन कॅरास्को याच्या शंकांचे व पृच्छांचे समाधान सँको पँझा याने केले त्याचे आणि इतर श्रवणीय गोष्टींचे वर्णन

सँको डॉन क्विक्झोट यांच्या घरी परत आला, आणि आपले संभाषण त्याने जेथे सोडले होते, तेथून पुढे चालू केले. तो म्हणाला, "माझे गाढव केव्हा, कुठे आणि कोणी चोरून नेले, हे जाणण्याची मास्टर सॅम्सनला इच्छा होती. म्हणून मी उत्तर देतो की, सिगोव्हिया जेथे जे प्रेत चालले होते, त्यावेळी गुलामांनी एक शोचनीय प्रकार केला. त्यानंतर धर्मगुरूंनी मोठा आरडाओरडा केला. तो टाळण्यासाठी आम्ही सीएरा मोरेना-कडे त्याच रात्री कूच केले. मी व माझा धनी एका अरण्यात दडून राहिलो. माझा धनी आपल्या भाल्याला टेकून उभा होता. आमच्या पूर्वीच्या चकमकीमुळे आम्ही दोघेही दमून-थकून गेलो होतो आणि आम्हाला दुखापती झालेल्या होत्या. मी गाढवावरून खाली न उतरता गाढ झोपी गेलो, आणि पराच्या चार चार गाद्यावर निजावे, त्याप्रमाणे आम्हा उभयताना गाढ झोप लागली. मी तर रान-उंदरासारखा गाढ झोपलो. त्यामुळे जो कोणी चोर आला असेल, त्याला आमच्या खोगीराखाली जमिनीत ठोकलेल्या चार मेखांवर आम्हाला अलगद ठेवून गाढवाचे चार पाय काढून घेण्यास पुरेशी सवड मिळाली असेल. माझ्या तंगड्यातून ते गाढव त्याने दूर नेले असावे. मला ते काहीच दिसले नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "यात नवीन काहीच नाही. अशी चोरी करणे मुळीच कठीण नाही. अशाच डावपेचांनी, अल्ब्राका येथील वेढ्याचे वेळी कुप्रसिद्ध चोर ब्रुनेला याने सॅक्रिपँटचा घोडा त्याच्या मांडीखालून चोरून नेला होता." सँकोने आपली कहाणी पुढे चालविली. तो म्हणाला, "मी जेव्हा अर्धवट जागा झालो आणि माझ्या खोगीरात पाय ताणू लागलो, तेव्हा दिवस चांगला उजाडला होता. पण माझ्या हालचालीमुळे मेखा खाली आल्या आणि मी डबक्यात पडलो. जमिनीवर चिखल झालेला होता. लगेच मी माझ्या गाढवाचा शोध घेऊ लागलो, पण ते कोठेच दिसेना. तेव्हा माझ्या डोळ्यातून किती टपोरे अश्रू वाहू लागले आणि मी किती करुणापूर्ण शोक केला! ज्याने आमचा इतिहास लिहिला, तो जर या प्रसंगाचे शब्दशः वर्णन करण्यास विसरला असेल, तर त्याला मी फुटकी कवडीही देणार नाही-आणि तसे मी त्याला सांगेनही. यानंतर काही

काळ गेला. किती, हे मी तुम्हाला आताच सांगू शकत नाही. राजकन्या मिकोमिकोना या माझ्या प्रेयसीबरोबर आम्ही चाललो होतो. मी माझे गाढव ओळखीत होतो आणि चोराप्रमाणे पळून गेलेल्या व त्या गाढवावर स्वार झालेल्या माणसालाही ओळखत होतो. तो कोण असेल, असे तुम्हाला वाटते? अहो, तो पॅसामाँटेचा गिनेस होता. मी व माझा धनी यांनी ज्याला त्या गुलामांच्या तावडीतून सोडविले, तोच तो खट्याळ हलकट माणूस होता."

कॅरास्को म्हणाला, "चूक तेथे झालेली नाही. तुझे गाढव कसे सापडले, याची याची हकीकत न देता लेखकाने तुला त्या हरवलेल्या गाढवावर पुनः बसविले, हीच चूक आहे." सँकोने उत्तर दिले, "त्याबद्दल मी काय म्हणावे, हे मला कळत नाही. एखाद्या माणसाने थोडचूक केली, तर त्याला कोण काय करणार? पण कदाचित तो मुद्रण-दोष असेल." तेव्हा कॅरास्को म्हणाला, "त्याची शहानिशा मी करीत नाही. त्या सोन्याच्या शंभर नाण्याचे काय झाले? ते पाण्यात बुडविले काय? हे मला कृपा करून सांग." सँकोने उत्तर दिले," ती बहुतेक सर्व नाणी मी माझ्यासाठी आणि माझ्या बायकामुलासाठी खर्च केली. माझे धनी डॉन क्विक्झोट यांच्यामागोमाग मी दौडत-भटकत गेलो, तरी माझ्या अर्धांगीने चडफडाट केला नाही-सारे शांतपणे सोसले, याचे कारण ती सोन्याची नाणी. मी जर रिकामे खिसे घेऊन व माझे गाढव गमावून माझ्या घरी गेलो असतो, तर माझे स्वागत आक्रोशाने झाले असते. आता तुम्हाला काही बोलावयाचे आहे काय? असल्यास सांगा. राजालामुद्धा जाब देण्यास मी येथे उभा आहे. मला माझे गाढव सापडले की नाही? आणि मी माझी नाणी खर्चिली की नाही? याची चांभार-चौकशी करण्याचे कोणास काय कारण आहे? आमच्या सहलीमध्ये माझ्या शरीरावर ठोसे पडले आणि त्या शरीराचा खुळखुळा झाला, म्हणून मला कोणी कितीही सोन्याची नाणी दिली, तरी त्यांचा काय उपयोग? प्रत्येक माणसाने आपल्या तोंडावर बोट ठेवावे आणि गप्प बसावे. काळ्याचे गोरे व गोऱ्याचे काळे करण्याची चूक करू नये. कारण प्रत्येक माणूस, ईश्वराने घडविला तसा असतो-केव्हा केव्हा तर तो पुष्कळसा बिघडतो."

तेव्हा पंडित म्हणाला, "ठीक आहे. त्या लेखकाने या इतिहास-ग्रंथाची दुसरी आवृत्ती काढली, तर इमानी सँकोने जे सांगितले, त्याची नोंद करण्यास तो विसरणार नाही, याकडे मी विशेष लक्ष पुरवीन. तशी नोंद झाल्याने तो ग्रंथ परिपूर्ण होईल." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "अरे भल्या माणसा, या इतिहास-ग्रंथात आणखी काही दुरुस्त्या करणे अवश्य आहे काय? हे सांगण्याची कृपा कर." कॅरास्कोने उत्तर दिले, "काही दुरुस्त्या करणे अवश्य आहे. पण आतापर्यंत सांगितल्या त्यापेक्षा अधिक महत्त्वाच्या त्या नाहीत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "कदाचित ग्रंथकार दुसरा खंड प्रसिद्ध करणार असेल. तसे करण्याचे त्याने वचन दिले आहे काय?" कॅरास्कोने उत्तर दिले, "होय. तसे त्याचे अभिवचन आहे. पण तो म्हणतो, मला दुसरा खंड

सापडत नाही– आणि तो कोणाजवळ आहे, याचा पत्ताही लागत नाही. म्हणून तो खंड प्रकाशात येईल की नाही, याविषयी आम्हाला शंका आहे. त्या शंकेचे दुसरेही एक कारण आहे. ते म्हणजे, काही लोक म्हणतात, दुसरे खंड कधीच चांगले नसतात. दुसरे लोक ओरडतात, ' पुरे झाले डॉन क्विक्झोटचे पुराण ! ' पण पुष्कळ लोकांना शोकापेक्षा मौजेच्या कथा आवडतात. त्यांचा अट्टाहास असा की, ' क्विक्झोटसंबंधी आम्हाला आणखी माहिती द्या. डॉन क्विक्झोट आमच्यासमोर उभे राहू द्यात आणि सँको हवे ते बडबडू द्या– आम्ही खूष आहोत. " शिलेदार क्विक्झोट यानी विचारले, " याचा परिणाम ग्रंथकारावर काय झाला ? " कॅरास्कोने उत्तर दिले, " चांगलाच झाला. इतिहासाच्या दुसऱ्या खंडाचा शोध लावण्यासाठी तो शक्य ती सारी खटपट करीत आहे. तो खंड उपलब्ध होताच तत्काळ छापखान्याकडे पाठविण्याचा निश्चय त्याने केला आहे. लोकांची प्रशंसा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा तर याच्या बुडाशी आहेच पण त्यापेक्षा स्वतःचा फायदा व्हावा, ही इच्छा मोठी आहे. "

सँकोने विचारले, " काय ? पैसे मिळविण्यासाठी तो हे सारे करीत आहे ? तसे असेल तर आपल्याला चांगला इतिहास वाचावयास मिळणे कठीण ! सणासुदीच्या आधी शिंपी लोक घाईघाईने जसे कपडे शिवतात, तसा ठिगळाठिगळांचा इतिहास आपल्या हाती पडेल. ते चिंध्याचिंध्यांचे गाठोडे होईल. घाईने केलेले कार्य चांगले कधीच होत नाही. इतिहास–लेखक श्री. मूर यांनी आपल्या कार्यास कसा आरंभ करावा, याची काळजी घेतली पाहिजे. मी आणि माझा धनी त्याच्यापुढे आमच्या पराक्रमांची आणि त्यात आड आलेल्या विघ्नांची रास उभी करू. त्यातून त्याला दुसरा एकच काय, पण शंभर खंड लिहिता येतील, हे मी पैजेने सांगतो. त्या बिचाऱ्याला असे वाटत असावे, आम्ही गवताच्या गंजीवर लोळण्यापलीकडे दुसरे काही करीत नाही. पण एकदा का आम्ही रिकीबीत पाय ठेवला म्हणजे आम्ही काय करतो हे त्याला कळेल. मी निदान इतके म्हणण्याचे धाडस करतो की, माझ्या धन्याने जर माझे ऐकले असते तर या वेळेपर्यंत आम्ही, पूर्वीच्या थोर थोर शिलेदारांप्रमाणे, दुष्कृत्यांचे निर्दाळण आणि अन्यायाचे निवारण केले असते आणि आमची सर्वत्र फत्ते झाली असती. "

सँकोने आपल्या या भाषणाचा शेवट केला न केला तोच रोझिनांटचे खिंकाळणे त्यांच्या कानी आले. डॉन क्विक्झोट यांना वाटले, हा शुभ-शकुन आहे. आणि म्हणून त्यांनी असा निर्धार केला की, तीन–चार दिवसांत आपण नवी योजना हाती घ्यावयाची. त्यांनी आपला निर्धार पंडिताला उलगडून सांगितला आणि विचारले, " आम्ही पुढील मार्ग कोणत्या दिशेने आखावा ? " पंडिताने सांगितले, " ॲरागॉनच्या राज्यातील सॅरा-गोसा शहराचा रस्ता तुम्ही धरावा. तेथे सेंट जॉर्जच्या उत्सवासाठी विराट सामने लवकरच होणार आहेत. त्यात भाग घेऊन आपण ॲरागॉनच्या झुंजार वीरांना चीत करू शकाल आणि त्यामुळे अजरामर कीर्ती मिळवू शकाल. कारण त्या वीरांवर मात करणे म्हणजे जगातील सर्व शिलेदारांना जिंकणे होय. आपला उदात्त निर्धार प्रशंसनीय

आहे. पण संकटात उडी घेण्याइतका बेहोषपणा आपण दाखवू नये, असे मला वाटते. कारण आपले आयुष्य हे आपले स्वतःचे नाही – ज्यांना आपल्या सहाय्याची व संरक्षणाची गरज आहे, अशा दुःखीकष्टी लोकांचे ते आहे. ”

सँको म्हणाला, “ अगदी बरोबर ! माझ्या धन्याच्या अशा बेहोष वागण्यामुळे मला कधी–कधी वेड लागण्याची पाळी येते. एखाद्या भुकेल्या तरुण माणसाने पाच-सात काकड्यांवर भराभर हात मारावा, त्याप्रमाणे माझे धनी शंभर सशस्त्र माणसांवर एकदम तुटून पडतात. पण पंडितजी, हे लक्षात घ्या की, आघाडीवर जाण्याची जशी योग्य वेळ असते, तशीच माघार घेण्याची पण असते ! ‘ संत जॅगो पुकारा आणि स्पेनवर हल्ला करा ! ’ ही रणघोषणा नेहमीच असता कामा नये. कारण मी कोणाकडून तरी असे ऐकले आहे–बहुधा माझ्या धन्याकडूनच ऐकले असेल,–की बेहोषपणा व भित्रेपणा या दोहोंच्या मध्यावर शौर्य उभे असते. हे जर खरे असेल, तर काही कारण नसताना माझ्या धन्याने कोणावर तुटून पडावे असे मला वाटत नाही, आणि जर काही लभ्यांश नसेल तर त्यांनी कोणावर हल्ला करावा असेही मला वाटत नाही. या सर्वांपेक्षा मी माझ्या धन्याला हे सांगू इच्छितो की, मी आपल्याबरोबर यावे अशी आपली इच्छा असेल तर आपण असा करार करू या की, आपणा दोघांसाठी तुम्ही लढावे आणि मी फक्त तुमची, तुमच्या कपड्यांची, खाद्य-पदार्थांची काळजी घ्यावी. हे मान्य असेल तर मी एखाद्या इमानी कुत्र्याप्रमाणे तुमच्या पाठोपाठ येईन आणि साऱ्या गोष्टी करीन. पण मी माझी तलवार उपसून चोरा-दरोडेखोरांना, फार काय, कुंपणावरील पाखरांनासुद्धा मारणार नाही. माझ्यासंबंधी म्हणाल तर, पंडितजी, शूर होण्याची मला इच्छा असली तरी शूरत्वाच्या कीर्तीची मला हाव नाही. कोणाही शिलेदाराच्या पावलावर पाऊल टाकून त्याचा परिचारक होणाऱ्या शागीर्दांमध्ये मी अत्यंत विश्वासू व उत्तम ठरावा, अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे. आणि जर, माझी सारी सेवाचाकरी संपल्यावर माझ्या धन्याने कृपावंत होऊन मला एक बेट बहाल केले, तर मी त्यांचा अत्यंत ऋणी होईन. आपण कैक बेटे पादाक्रांत करणार आहो, असे आमचे धनीमहाशय म्हणत असतात. पण जर त्यांनी मला बेटाचे राज्य दिले नाही तर मी कशाला जन्माला आलो ? दुसऱ्यावर विसंबून कोणी जगू नये. केवळ प्रभूवर विश्वास ठेवावा. मी राज्यपाल म्हणत खाल्लेली भाकरी मला जितकी गोड लागेल, त्यापेक्षा मी राज्यपाल नसून खाल्लेली भाकरी कदाचित् अधिक रुचकर लागेल. कोणी सांगावे ? राज्य-कारभार करणे ही माझ्या आयुष्यात सैतानाने फेकलेली एक धोंड ठरेल आणि तिच्यावर मी अडखळून पडेन. त्यामुळे माझा जबडा फुटेल आणि दात बाहेर पडतील. सँको म्हणून मी जन्मास आलो आणि सँको म्हणूनच मरण्याची माझी इच्छा आहे. तरीसुद्धा मला असे वाटते की, फारसे श्रम न करता किंवा संकटात न सापडता, देवाने मला मोठ्या खुषीने जर एखादे बेट–– किंवा तसेच काही घबाड दिले, तर ते नाकारण्याइतका मी मूर्ख नाही, हे लक्षात ठेवा. मला आपली जुनी म्हण यावेळी आठवते. ती म्हणजे ‘ तुला दिला गद्धा, तर घेऊन

जा त्यालासुद्धा.' तसेच, 'नशीब दार ठोठावील, तेव्हा त्याला आत घे नि ठेवून घे!'"

कॅरास्को म्हणाला, "वा! वा! मित्रा सँको, तू तर एखाद्या विद्यापीठाच्या प्राध्यापकासारखा बोललास. परमेश्वराच्या औदार्यावर आणि डॉन क्विक्झोट यांच्या उदात्तपणावर विश्वास ठेव म्हणजे तो तुला नुसते बेटच काय पण राज्यही अर्पण करील." तेव्हा सँको म्हणाला, "दोन्हींचा अर्थ एकच. तरीही, पंडितराज, मी आपल्याला असे सांगतो की, माझा धनी मला जे राज्य देणार आहे, ते मी खड्डयात लोटणार नाही. कारण मी माझी नाडी तपासलेली आहे आणि मला असे आढळून आले आहे की, राज्यकारभार करण्यास आणि बेटाचे शासन करण्यास मी पूर्ण समर्थ आहे. हे मी माझ्या धन्याला पूर्वीच सांगितले आहे." तेव्हा कॅरास्को म्हणाला, "सँको, सांभाळ, माणसाला मान-सन्मान मिळाले की त्याचे आचार-विचार बदलतात. तू जेव्हा राज्यपाल होशील, तेव्हा तू कदाचित आपल्या जन्मदात्या आईला ओळखणारही नाहीस." तेव्हा सँकोने उत्तर दिले, "चिखलात जन्मलेल्या माणसाबद्दल हे खरे असेल. पण प्राचीन ख्रिस्ती संस्कारांचा दाट थर ज्यांच्या आत्म्यावर पसरलेला आहे, त्यांना तसे काही होणार नाही. माझा जीव ख्रिश्चन संस्कारांनी पवित्र बनलेला आहे. राज्यपाल झाल्यावर माझी वृत्ती किती चांगली होईल, याची तुम्ही नुसती कल्पना करा. मग मी कोणाशी घाणेरड्या पद्धतीने वागेन अशी भीती बाळण्याचे तुम्हाला काहीच कारण पडणार नाही." नंतर डॉन क्विक्झोट म्हणाले, "प्रभो, करा ते दान याला. याचे राज्य केव्हा सुरू होते, हे आम्हास पहावयाचे आहे. मला तर वाटते, ते आताच माझ्या डोळ्यापुढे उभे आहे."

एवढे बोलल्यानंतर क्विक्झोट यांनी पंडिताला प्रार्थना केली, "तू जर कवी असशील, तर माझी हृदयस्वामिनी डल्सिनिया डेल टोबोसो हिचा निरोप मी जेव्हा घेईन, त्या प्रसंगावर तू काही कविता कृपा करून रच. त्या अशा खुबीने की, प्रत्येक कवितेचे आद्य अक्षर तिच्या नावाचे एक अक्षर असावे. म्हणजे प्रत्येक कवितेचे पहिले अक्षर एकत्र केले तर, 'टोबोसाची डल्सिनिया' हे नाव तयार व्हावे," पंडिताने त्यांना उत्तर दिले, "महाराज, स्पेनमध्ये जे साडेतीन प्रसिद्ध कवी आहेत, त्यांपैकी मी एक नव्हे. तथापि मी ही काव्याची कसरत करण्याचा प्रयत्न करीन. ते काम सोपे नाही, याची जाणीव मला आहे. तिच्या (इंग्रजी) नावात सतरा अक्षरे आहेत. चार चार ओळींची एक अशा चार कविता मी रचल्या, तर एक अक्षर शिल्लक राहणार आणि पाच ओळींची एकेक अशा चार कविता केल्या तर त्यात तीन अक्षरे कमी पडणार. तथापि एक अक्षर गडप करण्याचा प्रयत्न मी करीन म्हणजे सोळा ओळींमध्ये सारे नाव येऊन जाईल." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "तसेच तू कर. कारण, ज्या कवितांमध्ये तिचे नाव स्पष्टपणे ओळखता येणार नाही, त्या आपल्यावर रचलेल्या आहेत, असे कोणाही स्त्रीस वाटणार नाही."

यानंतर सर्वानुमते ठरले की, एका आठवड्यात सर्वांनी तेथून कूच करावे. " या योजनेची गंधवार्ताही कोणास लागू देऊ नये – विशेषतः पाद्री, न्हावी, श्री. निकोलस, पुतणी आणि घरधनीण याना तर ताकास तूर लागू देऊ नये. नाही तर माझ्या सन्मान्य व शौर्यपूर्ण योजनेला ते अडथळा आणतील. " असे डॉन क्विक्झोट यांनी पंडिताला बजावले. तसे करण्याचे वचन कॅरास्कोने दिले आणि डॉन क्विक्झोट यांना सांगितले, " आपल्या सवडीप्रमाणे आपण मला आपल्या यशापयशाची हकीकत लिहून पाठवावी. " नंतर त्याने त्यांचा निरोप घेतला आणि तो तेथून निघाला. आपल्या प्रवासाची सारी तयारी करण्यासाठी सँकोही तेथून निघाला.



## प्रकरण ५

# सँको पँझा आणि त्याची पत्नी टेरेसा पँझा यांच्यामधील समंजस व सुखदायक संवाद; तसेच संस्मरणीय असे इतर उतारे

[ या इतिहास-ग्रंथाच्या भाषांतरकाराला या पाचव्या प्रकरणाचे प्रारंभी वाचकांना हे सांगणे योग्य वाटते की, माझ्या मते हे प्रकरण प्रक्षिप्त आहे. कारण, सँकोच्या अल्प-पात्रतेमुळे त्याच्याकडून ज्या भाषणशैलीची अपेक्षा करता येणार नाही, ती तो येथे उप-योजित आहे आणि इतक्या सुसंस्कृत स्वरूपाच्या गोष्टी तो सांगत आहे की, त्या तो सांगू शकेल, हे अशक्य वाटते. तथापि प्रामाणिक भाषांतरकाराची भूमिका कायम ठेवण्यासाठी हे भाषांतर केलेले आहे आणि म्हणून पुढील मजकूर लिहिलेला आहे. ]

सँको आपल्या घरी इतक्या आनंदाने व मजेने आला की, त्याचा आनंद त्याच्या चेहऱ्यावर शक्य तेवढा त्याच्या बायकोला दिसला. त्याच्या आनंदाचे कारण जाणण्याची तिला उत्सुकता वाटली आणि म्हणून ती ओरडून म्हणाली, "लाडक्या, आज तू इतका आनंदी का ?" सँकोने उत्तर दिले, "लाडके, मी याहूनही आनंदी होईन. मला जितका आनंद झालेला दिसतो, तितका आनंदी मी न होवो, असे वरदान परमेश्वर मला देवो." ती म्हणाली, "नाथ, आपण तर कोड्यासारखे बोलता. आपल्याला इतका आनंद झाला नसता तर आपण अधिक मजेत असतो, या आपल्या बोलण्याचा अर्थ काय, हे मला कळत नाही. मी वेडी तर खरीच. पण आनंद न होण्याने माणूस आनंदी कसा होतो, हे मला कळत नाही." सँको उत्तरला, "हे पाहा, टेरेसा, मी मजेत आहे याचे कारण, माझा धनी डॉन क्विक्झोट यांची सेवा करण्यासाठी मी पुनः जाणार आहे. माझ्या धन्याने नवा खेळ खेळण्याचे आणि साहसपूर्ण प्रसंगांचा पिच्छा पुरविण्याचे ठरविले आहे. तेव्हा मला त्याच्याबरोबर गेलेच पाहिजे. नड असल्यावर सैतान चालवील, तसे मुकाट चालले पाहिजे. मी घरी उपाशी का राहू ? आम्ही उधळलेल्या सोन्याचा आणखी एक गड्डा सापडण्याची आम्हाला आशा आहे. त्यामुळे माझ्या हृदयाला गुदगुल्या होत आहेत. पण तुला – आणि आपल्या गोड बछड्यांना – सोडून जाताना मला दुःख वाटते. दऱ्याखोऱ्यातून आणि झाडाझुडपांतून भटकत राहण्यापेक्षा आपल्या घरी निवांतपणे व शांततेने प्रभूने मला राहू द्यावे, अशी माझी इच्छा आहे. (तसे करण्यासाठी प्रभूला काही श्रम पडणार नाहीत की काही खर्च येणार नाही – फक्त त्याने तशी इच्छा करण्याचा अवकाश !) तसे झाले म्हणजे माझा आनंद अधिक दृढ व

भक्कम होईल, हे स्पष्ट आहे. माझा सध्याचा आनंद तुझ्या वियोगाच्या दुःखात मिसळलेला आहे. मला जे म्हणावयाचे आहे, ते मी स्पष्ट केले आहे असे मला वाटते. मी जर फार आनंदी दिसत नसलो, तर मला अधिक आनंद झाला आहे, असे तू समज. "

सँकोची बायको त्याला म्हणाली, " हे पाहा, सँको, तू एका शिलेदाराचा सेवक झाल्यापासून इतके काही गोलमाल बोलतोस की, त्याचा अर्थ कोणालाही कळत नाही." सँको म्हणाला, " पुरे, पुरे ! ज्याला साऱ्या गोष्टी समजतात, त्याला माझे बोलणे समजते ! म्हणून प्रिये, आता यासंबंधी आणखी काही शब्दांची उधळण करू नकोस. मात्र, आपल्या गर्दभराजाची काळजी या तीन दिवसांत चांगली घे म्हणजे तो ताजा-तवाना होईल आणि शस्त्रे धारण करण्यास समर्थ होईल. त्याचा चारा दुप्पट कर. त्याचे खोगीर, त्याचा लगाम हे सर्व नीट पाहून ठेव. कारण, आम्ही काही लग्न-समारंभास जात नाही—सर्व जगभर संचार करण्यासाठी आणि राक्षसाशी, दैत्याशी, पिशाच्चाशी दोन हात करण्यासाठी जात आहो. त्यावेळी आम्हाला खिंकाळणे, किंचाळणे, ओरडणे, विव्हळणे—याशिवाय दुसरे कसलेहि आवाज ऐकू येणार नाहीत ! तथापि आम्हाला पिट्टून काढणारे जे योगेसियन हुंडेकरी आणि जादूगार मूर यांची आमच्याशी गाठ पडली नाही, तर हे सारे अनुभवही मिठाईसारखे वाटतील. "

टेरेसा म्हणाली, " तसे होणार नाही. तुमच्यासारखे शिलेदाराचे नोकर त्याची भाकरी उगाच खात नाहीत, असे मला वाटते. म्हणून त्या भयंकर उपद्रवातून तुमची लवकर सुटका व्हावी, अशी प्रार्थना मी दररोज करीत राहीन. " तेव्हा सँको म्हणाला, " प्रिये, लवकरच मी एका बेटाचा राज्यपाल होणार आहे. अशी आशा मला जर नसती, तर याच क्षणी, याच स्थानी मी मरून पडलो असतो. " तेव्हा त्याची बायको म्हणाली, " नाही रे माझा राजा. कोंबडी जिवंत राहिली म्हणजे अंडी वाटेल तितकी मिळतील ! 'शिर सलामत तो पगडी पचास.' तू जिवंत राहा. मग जगातील सारी राज्ये सैतानाच्या हाती जाईनात का ! तू आपल्या आईच्या उदरातून बाहेर आलास तेव्हा तुझ्याजवळ राज्य नव्हते; आतापर्यंत तू जिवंत राहिलास, तेही राज्याशिवाय आणि ईश्वरेच्छा होईल तेव्हा तू निजधामास जाशील, तेही राज्याशिवाय ! जगातील किती तरी लोक राज्यपद न मिळवता जगतात आणि तरी ते सुखी असतात. त्यांना लोक मानही देतात. अन्नाला चव आणणारे जगात भुकेसारखे दुसरे काही नाही, आणि गरिबांना तर, भूक नाही असे कधीच होत नाही. म्हणून ते मोठ्या चवीने नेहमी अन्न सेवन करतात. पण, हे पाहा माझ्या राजसा, राज्य-कारभार मिळण्याचे शिकंदर नशीब तुला लाभले तर आपल्या बायकामुलांना विसरू नकोस अशी माझी तुला प्रार्थना आहे. आपला छोटा सँको पूर्ण पंधरा वर्षे वयाचा झाला आहे. आणि तो आता शाळेत गेला पाहिजे हे लक्षात ठेव. त्याचा काका धर्मगुरू आहे, तो प्रार्थना-मंदिरात त्याची काही सोय करील. शिवाय मेरी पँझा ही आपली मुलगी आहे. तिच्या लग्नाचा प्रश्न आपल्यापुढे

आहे. त्या प्रश्नामुळे तिच्यावर मरण ओढवणार नाही, असे मी खात्रीने सांगते. कारण, माझा असा धूर्त तर्क आहे की, तुला अधिकारपदाची जितकी लालसा आहे, तितकी तिला पतीची आहे. साऱ्या गोष्टी ठीक जमल्या पाहिजेत. तिला बरीच सुखा-समाधानात ठेवण्यापेक्षा कशा तरी माणसाशी तिचे लग्न लावणे चांगले ! ''

सँको म्हणाला,'' अगदी बरोबर बोललीस. ईश्वराच्या कृपेने मला जर अधिकार-प्राप्ति झाली, तर मी मेरी पँझा हिचे लग्न असे झक्क जमवीन की, लोक तिला ' सरकार ' म्हणतील. '' तेव्हा त्याची बायको म्हणाली, '' मुळीच नको. तिला बरोबरीचाच जोडी-दार मिळाला तर बरा. तिला जर तुम्ही तुटक्या वहाणाऐवजी उंच टाचेचे बूट घालावयास लावले आणि तिच्या अंगातील जाड्या-भरड्या तपकिरी डगल्याऐवजी तिला उंची मखमलीचा अंगरखा घालावयास लावले आणि ' तू ' ' तुझे ' असे साधे सरळ संबोधन न वापरता, ' बाईसाहेब ' नि ' हुजूर ' म्हणून हाक मारू लागला, तर त्या गरीब बिचाऱ्या मुलीला कसे वागावे हे कळणार नाही आणि ती पावलोपावली हजारो चुका करील आणि आपल्या जाड्या-भरड्या गांवढळ राहणीचे प्रदर्शन करील. '' ते ऐकून सँकोने उत्तर दिले,'' गाढव कुठली ! दोन तीन वर्षांची उमेदवारी तिला करावी लागेल. मग तिच्यात किती विलक्षण बदल घडून आला आहे हे तुला दिसेल. 'सरकार' आणि तिचे ते डौलदार वागणे तिला इतके शोभेल की, ते सारे उपजतच आहे असे वाटावे. आणि समज, तसे घडले नाही, तर दुसऱ्या लोकांना त्याचे काय ? ती एक बडीबाई तर होऊ दे, मग पुढे काय व्हायचे ते होवो. '' बायको म्हणाली, '' भले शाब्बास ! आपल्यापेक्षा वरच्या वर्गात जाण्याची खटपट करू नये.' सारख्या पिसांची पाखरे एकत्र येतात ' ही म्हण माहीत आहे ना ? एखाद्या सरदार-उमरावाच्या किंवा नेक नामदाराच्या घरात आपली मुलगी फेकून देणे, मला आवडणार नाही. कारण लहर फिरल्यास तेथे ते तिला नावे ठेवतील, खेड्यातील ' जोन ' म्हणतील-नांगरऱ्याची मुलगी म्हणतील-कोष्ट्याचे धागे म्हणतील. छेः ! छेः ! अशा रीतीने तिला भलत्या ठिकाणी लोटण्यासाठी मी माझ्या मुलीला वाढविलेले नाही हे मी ठाम सांगते. तुम्ही फक्त घरात पैसा आणा आणि तिला नवरा मिळवून देण्याचे काम माझ्यावर सोपवा. जोन टोको या म्हाताऱ्याचा मुलगा लोल टोको हा धडधाकट आणि आनंदी वृत्तीचा तरुण मुलगा आहे. आपण सारेजण त्याला ओळखतो. त्याचा आपल्या मुलीवर डोळा आहे, हेही मी पाहिले आहे. तो रोमरोमात आपल्यासारखाच आहे. तो तिला योग्य जोडीदार ठरेल आणि लग्नानंतरही ती आपल्या पंखाखालीच राहील. आई-बाप, मुले-नातवंडे, सारे गुण्यागोविंदाने एकत्र नांदतील आणि प्रभूचा आशीर्वाद आणि शांती आपल्याला निरंतर लाभेल. पण राजदरबारात किंवा थोरामोठ्यांच्या घराण्यात तिला देऊन टाकण्याचे कधी बोलू नका. कारण तेथे ती कोणाला ओळखणार नाही आणि तिला कोणी ओळख-णार नाही. '' बायकोचा हा सल्ला ऐकून सँको खवळला व म्हणाला, '' जनावर ! बारा-बास चोराची कारभारीण ! माझ्या मुलीचा विवाह मी अशा थोर माणसाशी करणार

आहे की, त्यांच्या मुलांना ' महाराज ', ' सरदार ' असे लोक म्हणतील. या कामी तू मला अडथळा का करतेस ? माझ्यापेक्षा चांगल्या स्थितीतील लोक माझ्याविषयी नेहमी म्हणतात, 'जेव्हा हा एखादी गोष्ट करू शकतो, तेव्हा तो ती करीत नाही आणि जेव्हा तो ती करू पाहतो, तेव्हा त्याला ती करता येत नाही.' आपले भाग्य आपले दार ठोठावीत असताना, आपण दार बंद करून त्या भाग्य-देवतेला बाहेर ठेवणे योग्य आहे का ? छेः ! छेः ! तवा तापला आहे, तोवर भाकरी भाजून घेतली पाहिजे. वैभवाचे वारे सुटण्याआधी आपण आपल्या जहाजांची शिडे उभारली पाहिजेत. [ ही भाषणशैली आणि यानंतर मांडलेली विचार व सिद्धांत यांची रास सँकोच्या मुखातून बाहेर पडली, असे मानतात. पण यामुळेच या इतिहासाच्या भाषांतरकाराला असे म्हणावे लागते की, हे प्रकरण प्रक्षिप्त आहे ]. तू अगदी बेअकली बायको आहेस. तुझ्या टाळक्यात हे कसे येत नाही की, साहसाची शिकस्त करून मी एखाद्या संपन्न राज्याचा कब्जा घेतला पाहिजे, म्हणजे दारिद्र्याच्या शृंखलातून आपले पाय मोकळे होतील आणि आपल्या इच्छेप्रमाणे आपण मेरी पँझा हिची लग्नगाठ कोणाशीही बांधू. तसे झाले म्हणजे हा सारा लोकसमाज ' लेडी टेरेसा पँझा' या नावाने तुला संबोधील, आणि मग तू प्रार्थनामंदिरात गालिचावरून चालत जाऊन लोडाला टेकून बसशील–ऐश्वर्याच्या राशीवर लोळत राहशील. मग शहरातील अत्यंत कुलीन स्त्रियासुद्धा तुझा हेवा नि मत्सर करू लागतील. थांब, थांब, आहेस तशीच राहा, त्याच पवित्र्यात उभी राहा–खालीवर करू नकोस–पडद्यावरील चित्राप्रमाणे तटस्थ राहा. बस्स, बस्स. आता ही चर्चा पुरे. आपली चिमणी सँकिका, तुझ्या नाकावर टिच्चून, ' श्रीमंत पतीची राणी ' होणार ! "

सँकोची बायको म्हणाली, " छान, छान, पतिराज. तुम्ही काय बोलता, याचा विचार करा. या आपल्या उच्च भराऱ्यामुळे माझ्या मुलीचे पाय मोडतील, असे भय मला वाटते. पण तुम्हाला काय करायचे, ते करा—राणी करा की सरदारीण करा—पण त्याला मी संमती देणार नाही. अहो, नांगरबहाद्दर, जेथली वस्तू तेथे असावी, असे मला आवडते. लोकांनी बोलू नये त्या गोष्टी बोलाव्या, हे मला आवडत नाही. काही गाजावाजा न करता, माझे नाव साधे टेरेसा असे ठेवले गेले–' बाईसाहेब ' किंवा ' देवीजी ' अशी पदवी त्याला जोडली गेली नाही. माझ्या बापाचे नाव कॅस्काजो होते, आणि मी तुमच्याशी लग्न केले म्हणून लोक मला टेरेसा पँझा म्हणू लागले. पण खरोखर पाहता टेरेसा कॅस्काजो असे मला म्हणणेच न्यायाचे आहे. पण राजे आले की कायदे आले. म्हणून कोणतीही उपाधी न लावता किंवा ते नाव लांबलचक आणि कंटाळवाणे न करता, पहिल्या साध्या नावावरच मी संतुष्ट आहे. कोणी माझ्याकडे पाहून हसावे, असे मला वाटत नाही. ( मी जर सरदारणीप्रमाणे किंवा राज्यपालाच्या राणीप्रमाणे रस्त्यावरून जाऊ लागले ) तर लोक म्हणतील, ' पहा, पहा, ही डुकरीण कशी ऐटीने चालली आहे ! ' तसे मला होऊ द्यायचे नाही. लोक म्हणतील, ' कालपर्यंत ही बाई हातात काठी घेऊन आणि डोक्यावर पोते घेऊन पहाटेपासून रात्रीपर्यंत

काबाडकष्ट करीत होती. पण आता तिने आपल्या अंगावर उंची उंची कपडे इतके घातले आहेत की, कापडाचे एक दुकानच तेथे थाटल्यासारखे दिसत आहे. जणू काही तिला कोणी ओळखीतच नाही.' छेः! नाथ, असे होता कामा नये. माझी पंचेंद्रिये-किंवा सप्तेंद्रिये-किंवा जितकी असतील तितकी-प्रभूने कायम ठेवावी. म्हणजे अशा रीतीने बडबडणाऱ्या लोकांच्या जिव्हा मी बांधून टाकीन. तुम्ही खुशाल जा आणि राज्यपाल व्हा, नाही तर राजे व्हा आणि बैलासारखे फुगून जा. पण, आईची शपथ घेऊन मी सांगते की, मी किंवा माझी मुलगी या कौलारू घरातून इंचभरही बाहेर जाणार नाही. कारण, अशी म्हणच आहे--

कीर्ति वांछित जी दिगंत गृहिणी गेहींच ती राहते।
पायानें अधु कीं जनास गमते, कोठें न संचारिते ॥
अत्यानंद तिला सदैव गवसे रात्रंदिनीं जागुनी।
संसारीं रमुनी श्रमासि करुनी आनंद घे जीवनीं ॥

तुम्ही आणि तुमचे डॉन क्विक्झोट, दोघे मिळून आपल्या बेटाकडे आणि पराक्रमाकडे दौड ठोका आणि आम्हाला येथे आमच्या फुटक्या नशिबावर सोपवा. आम्ही जसे वागावयास हवे तसे आम्ही वागलो तर देवदयेने आमचे नशीब उजळेल, हे मी ठाम सांगते. पण मला खरोखर नवल वाटते, या राजेश्रीला डॉन कोणी केले ?-- त्यांचा बाप किंवा आजा यांच्या शिरावर या मानाचा तुरा कधी झळकला नाही." सँको म्हणाला, "प्रये, देवच तुझे रक्षण करो! आगा ना पिछा असलेल्या किती तरी सटर-फटर गोष्टी तू एकत्र वळल्या आहेस. मी जे काही बोललो, त्याच्याशी तुझ्या कास्काजोसचा, तुझ्या उंची वस्त्रांचा, तुझ्या जुन्या हत्यारांचा आणि मेलेल्या-गाडलेल्या घोड्याचा काय संबंध आहे ? 'गॅमार ॲडलपेट', ( यापेक्षा तुला मी अधिक चांगले नाव ठेवू शकत नाही. कारण, तू एक आंधळी-बेंधळी आहेस आणि आपल्या नादात गुंग असतेस. त्यामुळे मी काय बोलतो हे तुला कळत नाही.) माझ्या मुलीने एखाद्या कड्यावरून उडी घ्यावी किंवा भटक्या जमातीप्रमाणे जगभर हिंडत राहावे अथवा इन्फन्टा डोन्ना युराका या राजकन्येप्रमाणे तिचा वारसा हक्क बुडावा, असे जर मी तुला सांगितले असते, तर माझ्यावर कडाडण्यास तुला काही कारण मिळाले असते. पण डोळ्याचे पाते लवते ना लवते तोच, मी तुझे नाते डॉनशी जोडतो आहे आणि मुलीच्या मस्तकी राणीपदाचा मुकुट चढवीत आहे—गवताच्या गंजीतून बाहेर काढून मी तिला पराच्या गादीवर निजवीत आहे आणि मूर लोकांच्या पिढ्यानपिढ्यांमध्ये मोरोकोच्या सरदारांना मिळाल्या नसतील अशा जांभळ्या तक्याशी बसवीत आहे-- असे असताना तू माझ्याविरुद्ध का तणतणतेस ? मला ज्याने आनंद होतो, त्याने तुला तो का होत नाही ?"

टेरेसाने उत्तर दिले, "स्वामी, मी याचे कारण सांगू ? 'जो तुम्हाला झाकतो, तोच उघड्यावर टाकतो.' या म्हणीत ते कारण साठवलेले आहे. गरीब माणसाकडे

लोकांचे लक्ष क्वचितच जाते पण श्रीमंतांवर सर्वांची नजर रोखलेली असते. आणि तो माणूस जर पूर्वी गरीब असला, तर इतर लोक त्याच्याविषयी कुरकुर करतात--त्याचे दोष काढण्यास टपून बसतात. मधमाशांप्रमाणे दुष्ट लोकांच्या जिभा रस्त्यारस्त्यांवर गुंगुं आवाज करीत असतात आणि लोकांच्या कानात विष ओतीत असतात." सँको म्हणाला, "हे पाहा, टेरेसा, आता मी जे काही तुला सांगत आहे, ते नीट लक्ष देऊन ऐक. साऱ्या जन्मात ज्या गोष्टी तू कधी कदाचित् ऐकल्या नसशील, अशा गोष्टी आज मी तुला सांगत आहे. त्या मी माझ्या डोक्यातून काढलेल्या नाहीत, तर गेल्या वर्षी माझ्या सज्जन पाद्र्याने आपल्या शहरात जो उपदेश केला तोच मी तुला सांगत आहे. त्याने आम्हाला जे सांगितले, त्याची मला पक्की आठवण आहे. त्याने सांगितले, 'पूर्वी होऊन गेलेल्या गोष्टीपेक्षा आपल्या डोळ्यांसमोर ज्या गोष्टी घडत असतात, त्या आपल्या स्मृतीमध्ये कायमच्या पक्क्या रुतून बसतात.' (सकोने येथे जी काही कारणे सांगितली, ती पाहिली म्हणजे हे प्रकरण प्रक्षिप्त असावे, असे वाटण्यास भाषांतर-काराला आणखी एक कारण मिळाल्यासारखे वाटते. ही सारी भाषा सँकोच्या कुवती-बाहेरची आहे.) सँको पुढे बोलू लागला, "यावरून असे निष्पन्न होते की, चांगला पोशाख केलेला आणि श्रीमंतीने नटलेला एखादा माणूस, नोकर-चाकरांच्या लवाजम्या-निशी येत असलेला आपल्याला दिसला म्हणजे आपले हृदय हालते आणि त्याला योग्य तो मान देण्याची प्रेरणा आपल्याला होते. त्याच माणसाला आपण पूर्वी हीन परिस्थितीत पाहिले असल्याची आपल्याला आठवण झाली तरी आपण त्याला मान देण्यास उत्सुक असतो. त्याची पूर्वीची बदनामी गरीबीमुळे किंवा हलक्या कुळामुळे झालेली असेल, पण आता त्याचे काय ? आपल्या डोळ्यांना जे दिसते, तेच आपल्या मनात टिकून राहते. आता आपल्या बापाच्या संगोपनामुळे तो माणूस जर आपल्या पूर्वीच्या अज्ञातावस्थेतून दैवयोगाने उच्चस्थानी जाऊन पोचला असेल, आणि सर्वांशी तो जर सभ्यतेने व औदार्याने वागत असेल-उच्चकुळातील लोकांशी स्पर्धा करीत नसेल, तर टेरेसा, हे तू पक्के समज की, तो पूर्वी कोण होता, याचे स्मरण कोणालाही होणार नाही--तो आता जसा आहे तसाच लोक त्याला पाहतील. कोणत्याही वैभवशाली माणसाला मत्सरी लोकांचे टोमणे सहन करावे लागतात, तेवढे वगळले म्हणजे झाले !"

यावर टेरेसा म्हणाली, "नाथ, तुम्ही काय म्हणता हे मला कळत नाही—तुमचे अजब शोध तर माझ्या डोक्यात शिरतच नाहीत. तुमच्या काव्यमय भाषेमुळे आणि व्याख्यानबाजीमुळे माझ्या डोक्यात गोंधळ उडून गेला आहे. तुम्ही म्हणता तसे वागण्याचा तुमचा 'निराधार' झाला असेल—" पण सँकोने तिला अडवून म्हटले, "निराधार नव्हे, निर्धार म्हण." तेव्हा टेरेसा म्हणाली, "अहो कारभारी, कृपा करून आता शब्दांचा गोंधळ घालू नका. देवाने मला जसे शिकविले, तसे मी बोलते. जडजंबाल शब्द मी धर्मगुरूवर सोपविते. आता मला इतकेच म्हणावयाचे आहे की, आपण राज्यपाल होणार अशी खूणगाठ तुम्ही आपल्या मनाशी अजून घातली असेल,

तर मेहेरबानी करून आपला मुलगा सँको यालाही आपल्याबरोबर घेऊन जा आणि यापुढे त्याला राज्यकारभारचे शिक्षण द्या. कारण बापाचा धंदा चालविण्यास जरूर ते शिक्षण मुलाला देणे हेच योग्य!"

सँको म्हणाला, "मी एकदा का राज्यपाल झालो म्हणजे मी त्याला पत्र पाठवून बोलावून घेईन आणि तुला पैसा पाठवीन. कारण मला पैशाची मुळीच गरज लागणार नाही, हे मी ठामपणे सांगतो. राज्यपालाजवळ पैसा नसला तर तो देणाऱ्या माणसांची उणीव कधीच नसते. मात्र एक गोष्ट लक्षात ठेव, तो आता जसा आहे तसाच दिसावा, असा त्याचा पोशाख तू ठेवू नकोस—तो पुढे कसा व्हावा, हे लक्षात घेऊन तू त्याच्या अंगावर चांगला पोषाख चढव." टेरेसा म्हणाली, "तुम्ही फक्त पैसे पाठवा हो. मग मी त्याला सणावाराप्रमाणे सजवीन." तेव्हा सँको म्हणाला, "यावरून मी असे समजतो की, आपली मुलगी सरदारीण व्हावी, याबद्दल आपणा दोघांचे एकमत आहे." टेरेसा उद्गारली, "ज्या दिवशी सरदारीण म्हणून मला ती दिसेल, त्या दिवशी मी तिला थडग्यात पुरीन हे पक्के समजा. पण मी तुम्हाला पुनः सांगते, तुम्ही आपल्या कल्पने-प्रमाणे चाला. तुम्ही पुरुष लोक धनी बनता आणि आम्ही गरीब बिचाऱ्या स्त्रिया तुमच्या आज्ञेचे लोढणे आमच्या गळ्यात वागवितो. आमच्या नवऱ्यांना कावळ्यापेक्षा अधिक अक्कल नसली, तरी त्यांची आज्ञा आम्ही मानतो––त्यासाठीच आमचा जन्म असतो."

असे बोलून ती जोरजोराने रडू लागली. – जणू काही आपली मुलगी मेली आहे – गाडली गेली आहे, असे आपण पाहात आहो, असे तिला वाटत होते. तेव्हा सँकोने तिचे सांत्वन केले आणि तिला वचन दिले की, "मी जरी आपल्या मुलीला सरदारीण करणार असलो तरी तो काळ मी शक्य तितका लांबणीवर टाकीन." अशा प्रकारे त्या दांपत्याचा संवाद संपला. नंतर सँको डॉन क्विक्झोट यांच्याकडे परत गेला आणि पुढील मोहिमेची सर्व तयारी करू लागला.



## प्रकरण ६

# डान क्विक्झोट, त्याची पुतणी आणि घरधनीण यांच्यामध्ये जे घडले, त्याचा वृत्तांत, या सर्व इतिहासात हे अत्यंत महत्त्वाचे प्रकरण

सँको पँझा व त्याची बायको टेरेसा कॅस्काजो यांच्यामध्ये मागील अप्रस्तुत संवाद चालू होता, तेव्हा डॉन क्विक्झोट यांची पुतणी व घरधनीण स्वस्थ बसल्या नव्हत्या. आपले शिलेदार तिसऱ्या मोहिमेचा बेत आखीत असावेत, असे अनुमान त्यांनी हजारो चिन्हांवरून बांधले. म्हणून त्याला त्याच्या मूर्ख योजनेपासून परावृत्त करण्याचे शक्य ते सर्व प्रयत्न त्यांनी केले, पण व्यर्थ. एखाद्या पाषाणापुढे प्रवचन सांगण्यासारखे किंवा टणक व थंड लोखंडावर घाव घालण्यासारखे ते व्यर्थ होते. घरधनिणीने जे अनेक युक्तिवाद केले, त्यांपैकी एक म्हणजे " महाराज, थोडक्यात सांगावयाचे तर, स्वर्ग व नरक यामध्ये येरझारा घालणाऱ्या भ्रांत जीवाप्रमाणे, आपण जर डोंगर व दऱ्या यामध्ये धावत पळत राहिला आणि आमचे म्हणणे ऐकले नाही, तर मी ईश्वराकडे आणि राजाकडे तक्रार केल्याशिवाय राहणार नाही. कारण तुम्ही मोठ्या आशेने जी साहसी कृत्ये करू इच्छिता, ती मला व्यर्थ खटाटोप वाटतात. या किंवा त्या मार्गाने ती बंद होईपर्यंत मी देवाकडे व राजाकडे तक्रार करीत राहीन. "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " देव तुम्हाला काय उत्तर देईल आणि राजेसाहेब तुमच्या अर्जाला कोणता जबाब देतील, हे मी सांगू शकत नाही. पण राजे लोकांच्या विश्रांतीला बाध आणणारे जे असंख्य व अप्रस्तुत अर्ज येत असतात, त्यांना उत्तर देण्याचे, मी राजा असतो तर, टाळले असते. बाई, मी खात्रीने सांगतो की, राजे लोकांना जे अनेक उपद्रव सहन करावे लागतात, त्यांपैकी सर्वांत मोठा म्हणजे प्रत्येकाचे म्हणणे ऐकून घेणे आणि सर्व लोकांना उत्तर देणे. म्हणून कृपा करून माझ्यासंबंधी राजेसाहेबांना काही उपद्रव देऊ नका. " तेव्हा ती म्हणाली, " राजाच्या दरबारात अनेक शिलेदार नसतात काय ? हे कृपा करून मला सांगा. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " राजेशाहीचे भूषण म्हणून, वैभव म्हणून, भपका म्हणून, पुष्कळ शिलेदार दरबारात असतात – आणि असले पाहिजेत, हे मी कबूल करतो. " तेव्हा त्या स्त्रीने विचारले, " तर मग, महाराज, त्या शूर शिलेदारांपैकी आपण एक बनून राजाची सेवा पायउतार होऊन त्याच्या दरबारातच करीत राहणे अधिक चांगले नाही काय ? " डॉन क्विक्झोट

यांनी उत्तर दिले, " बाळे ऐक. सारे शिलेदार दरबारी होऊ शकत नाहीत आणि सारे दरबारी लोक शिलेदार असू शकत नाहीत. जगात सारे प्रकार असले पाहिजेत. शिलेदारीचा किताब सर्वांना असला तरी त्यांच्यामध्ये तर-तम-भाव हा असतोच. तुमचे जे दरबारी लोक आपल्या महालातून कधी बाहेर पडत नाहीत किंवा दरबाराच्या सावलीखालून दूर होत नाहीत, ते प्रवासाचा खर्च किंवा शीण न होता नकाशावरून साऱ्या दुनियेचा फेरफटका करून येऊ शकतात. ऊन-थंडी, भूक-तहान, यांची कोणतीही गैरसोय त्यांना सोसावी लागत नाही. उलट आमच्यासारखे जे हाडाचे शिलेदार असतात, ते या सर्व संकटांना सामोरे जातात. रात्री आणि दिवसा, पायी आणि घोड्यावरून, निसर्गाचे सारे आघात सोशीत, ते स्वतःच्या पावलांनी सारे पृथ्वीतल आक्रमितात. आम्हाला आमच्या शत्रूच्या चित्रांचाच परिचय असतो, असे नव्हे, तर प्रत्यक्ष त्यांच्या मूर्तीचाही असतो, आणि त्यांच्याशी आम्ही सर्व काळी व सर्व स्थळी सामना देण्यास सिद्ध असतो. क्षुद्र गोष्टीसाठी आम्ही थांबत नाही. आपली हत्यारे केवढी आहेत, त्यांना धार पाजलेली आहे की नाही यांचे अवडंबर आम्ही माजवीत नाही. तसेच आमच्या शत्रूपाशी काही धार्मिक वस्तू आहेत काय किंवा गुप्त जादू आहे काय, याचीही चौकशी आम्ही करीत नाही. खाजगी द्वंद्व-युद्धात, सूर्य डोक्यावर आहे की नाही, असे अनेक शिष्टाचार आणि सोयी पाळल्या जातात-त्या तुला कळणार नाहीत, पण मला कळतात-त्यांची पर्वा न करता, आम्ही आमच्या शत्रूवर एकाएकी तुटून पडतो. याच्यापुढे जाऊन मी तुला असे सांगतो की, गगनचुंबी मस्तके धारण करणारे, प्रचंड बुरुजाप्रमाणे पाय असणारे, बलाढ्य जहाजांच्या शिडाप्रमाणे हात फडफडविणारे, चक्कीच्या चक्राप्रमाणे मोठमोठे डोळे असणारे आणि काच-कारखान्याच्या भट्टीहून अधिक भयंकर असणारे - असे एक नव्हे, दहा राक्षस खऱ्या शिलेदाराला भेटले, तरी त्याला त्यांचे काडीमात्र भय वाटत नाही. सौम्य मुद्रेने तो त्यांच्याशी सामना खेळतो आणि अदम्य धैर्याने तो त्यांच्यावर हल्ला करतो, त्यांच्याशी हातघाईची लढाई करतो आणि शक्य तर क्षणार्धात त्यांना जिंकतो आणि ठार मारतो. कठिणात कठिण म्हणून ख्याती असलेल्या कोणत्याशा माशाचे खवले घेऊन ते लढावयास आले आणि साध्या समशेरीऐवजी दमास्कसच्या तीक्ष्ण व भयंकर तलवारींनी लढू लागले किंवा तशाच पोलादाच्या प्रचंड गदेने युद्ध करू लागले, तरी आम्ही जातिवंत शिलेदार त्यांचा निःपात करू शकतो. असे विप्पाड शत्रू मी दहा-वीस वेळा पाहिले आहेत. हे इतके सर्व तुला सांगण्याची मेहरबानी मी केली, याचे कारण इतकेच की, शिलेदारांमधील प्रचंड फरक तुला समजावा. हा फरक राजेलोकांना ओळखता यावा, म्हणजे प्रथम श्रेणीतील शिलेदारांना ते प्रमुख स्थान देतील. अशा शिलेदारांपैकी काहींचे धैर्य इतके अजिंक्य असते की, त्यामुळे केवळ आपल्या राज्याचेच नव्हे, तर इतरही अनेक राज्यांचे संरक्षण झालेले आहे. त्यांच्या इतिहासात तशी नोंद झाल्याचे आपण वाचतो. "

पुतणी म्हणाली, " काका, आपण काय म्हणता, याची काळजी घ्या. कारण,

शिलेदारांच्या साऱ्या कथा म्हणजे दंतकथा व थापा यांचे गाडोडे असते. अशा शिलेदारांना जाळून टाकले पाहिजे, नाही तर निदान, पाखंडी लोकाप्रमाणे त्यांच्या अंगावर काळे झगे घातले पाहिजेत किंवा दुष्कीर्तीची काही खूण ठेवली पाहिजे; म्हणजे ते दुष्ट आहेत आणि सदाचाराचे शत्रू आहेत, हे जगाला कळेल." हे ऐकताच डॉन क्विक्झोट खवळले व ओरडून म्हणाले, "आता ईश्वरच माझे संरक्षण करो! तू जर माझी इतकी जवळची नातलग नसतीस–माझ्या बहिणीची मुलगी नसतीस–तर आता तू पवित्र गोष्टींची टवाळी केलीस, त्याबद्दल मी तुझा इतका सूड घेतला असता की, त्याचे पडसाद अखिल विश्वात उमटले असते. तुझ्यासारखी निर्लज्जपणाची भाषा कोणी ऐकली असेल? जिला सुई नि सूतनळी यातला फरक कळत नाही, अशा कच्च्या पोरीने शिलेदारांच्या इतिहासात आपले नाक खुपसावे आणि त्यांची टवाळी करावी, हे किती विचित्र आहे! सर अमॅडिस यांनी हे ऐकले असते तर ते काय म्हणाले असते? पण पोरी, त्यांनी तुला क्षमाच केली असती हे खचित. कारण ते आपल्या काळातील अत्यंत क्षमाशील व सौजन्यशील शिलेदार होते–विशेषतः स्त्रियांच्या बाबतीत तसे होते–तरुणींचे तर ते मोठे वाली होते. परंतु तुझे शब्द दुसऱ्या काही लोकांच्या कानी पडले असते तर त्यांनी आपल्या संतापात तुझी आहुती घेतली असती. कारण सारेच शिलेदार काही सौजन्यपूर्ण व सुस्वभावी नसतात–काही आडमुठे व सूडबुद्धीचे असतात. आपल्या कर्तव्याला योग्य अशी वृत्ती, शिलेदार म्हणविणाऱ्या सर्वांची असतेच असे नाही. अर्थात काही शिलेदार म्हणजे खणखणीत नाणी होती. पण दुसरी काही खोटी नाणीहि होती. ती लोकांच्या दृष्टीला भुरळ घालीत असली तरी, कसोटीला न उतरणारे हीण त्या खोट्या नाण्यात असे. शिलेदारीची महत्त्वाकांक्षा बाळगणारे आणि त्या उच्च मानाच्या जागी पोचण्यासाठी धडपड करणारे जे असतात, ते हलक्या दर्जाचे मानव म्हटले पाहिजेत. दुसरे काही उच्च–कुलीन शिलेदार असे असतात की, ज्यांना धुळीत लोळणे आवडते आणि हलक्या दर्जाच्या माणसांच्या जमावात त्यांचे नाव गडप होऊन जाते. पहिल्या कोटीतील शिलेदार आपल्या महत्त्वाकांक्षेने किंवा गुणवत्तेने वर चढतात, तर दुसऱ्या कोटीतील शिलेदार आपल्या उपेक्षा–वृत्तीने किंवा दुर्गुणाने पतित होतात. या दोन कोटीतील शिलेदार नावाने अगदी सारखे असतात, पण कृतीने वेगळे असतात. त्यांच्यातील फरक जाणण्यासाठी चांगली समज–शक्ती असावी लागते."

हे ऐकून पुतणी म्हणाली, "धन्य आहा, काका तुम्ही. काय हे तुमचे ज्ञान! प्रसंग पडला तर तुम्ही व्यासपीठावर बसून किंवा रस्त्यावर उभे राहून प्रवचने करू शकाल, आणि तरीही लोकांचा तुमच्याबद्दल विलक्षण गैरसमज आहे. त्याना मुळी काही कळतच नाही. तुमच्या वयाचा एखादा दुर्बल माणूस इतका धडधाकट आणि शूर असू शकतो, हे त्यांच्या लक्षातच येत नाही. आपल्या वार्धक्याच्या भाराखाली वाकलेले असताना तुम्ही सर्व गोष्टी ठाकठीक करू शकाल आणि हट्टी शत्रूला शरण आणू शकाल, हे या लोकांना समजतच नाही. आणि काका, याहून विलक्षण गोष्ट ही

की, तुम्ही शिलेदार मुळीच नाही, हे सर्वांना माहीत असतानाही तुम्ही शिलेदार आहा! काही सज्जन शिलेदार असू शकतील, पण गरीब सज्जनांना शिलेदार होता येणार नाही. कारण, शिलेदारी विकत घेणे त्याला परवडणार नाही." तेव्हा डॉन क्विक्झोट यानी उत्तर दिले, "मुली, तूं चांगले बोललीस. तुझ्या शेवटच्या विधानासंबंधी, आपल्या घराण्याबद्दल मी तुला काही गोष्टी सांगू शकेन. त्या ऐकून तुला आश्चर्य वाटेल. पण पवित्र गोष्टीची गल्लत अपवित्र गोष्टीशी मी करणे योग्य नाही. म्हणून मी हा विषय बाजूस सारतो. पण आपल्याला ज्ञान मिळावे म्हणून तुम्ही दोघेही हे ऐकून ठेवा की, मनुष्यजातीच्या साऱ्या परंपरा चार वर्गात विभागता येतात. पहिला वर्ग म्हणजे, काही माणसे अत्यंत लहान व अज्ञात कुळातून पुढे येतात आणि स्वतःला प्रचंड व वाढते महत्त्व मिळवून देतात. दुसरा वर्ग अशा माणसांचा असतो की, ते थोर कुळात जन्माला येतात आणि आपले मूळचे वैभव व प्रतिष्ठा टिकवून ठेवतात. तिसऱ्या वर्गातील लोक सुळासारखे (पिरॅमिडसारखे) असतात. त्यांचा पाया मोठा असतो. पण पुढे लहान लहान होत त्यांचे कर्तृत्व निमुळते होते--त्या पायाच्या मानाने नष्ट किंवा नष्टप्राय होते. बाकीचे लोक (बहुसंख्य माणसे अशीच असतात.) थोर कुळातून आलेले नसतात, त्यांची वाढ बुद्धिपूर्वक झालेली नसते, म्हणून त्यांचा अंत अज्ञातावस्थेत होतो. सर्वसामान्य लोक-खालच्या वर्गातील लोक-असेच असतात. ऑटोमन घराणे पहिल्या कोटीतील होय. गुराख्याच्या हलक्या व गरीब कुळात जन्म घेऊन ते सध्याच्या उच्च पदास पोचले आहेत. दुसऱ्या कोटीतील लोक म्हणजे राजे-महाराजे. राजघराण्यात त्यांचा जन्म झालेला असतो आणि म्हणून वारसा-हक्काने ते आपली सत्ता उपभोगीत असतात-तिच्यात अधिक-उणे काही न करता, ते आपला वारसा आपल्या वंशजांचे हाती जशाचा तसा देतात. तिसऱ्या कोटीतील लोकांची असंख्य उदाहरणे आहेत. इजिप्तमधील सारे फॅराहो आणि टोलेमी, रोमचे सीझर आणि राजपुत्र, राजे, सरदार, मीड, असीरियन, इराणी, ग्रीक व बार्बेरियन-या सर्वांचा तांडा (तो शब्द मला वापरता येत असेल तर)-ही सर्व घराणी आणि साम्राज्ये एका टोकापर्यंत जाऊन नष्ट झाली. त्यांना महत्त्व देणारे लोकही नामशेष झाले. आता त्यांचा एखादा वंशज सापडणेही अशक्य-आणि जर सापडलाच, तर तो गरीबीच्या खातेऱ्यात लोळत असलेला सापडेल. बाकीच्या सर्वसामान्य लोकांबद्दल मी काहीच बोलत नाही, एवढेच सांगतो की, मनुष्यजातीची संख्या वाढविण्यासाठी, शून्यासारखा, त्यांचा उपयोग होतो. याहून प्रशंसा करण्यासारखे त्यांच्याजवळ काही नसते. मैत्रिणींनो, मी आतापर्यंत तुम्हाला मान-मरातबाच्या स्वैर वाटणीसंबंधी आणि घराण्याच्या अनिश्चित व गोंधळात टाकणाऱ्या परंपरेसंबंधी जे काही सांगितले, त्यावरून तुम्ही असे सयुक्तिक अनुमान काढावे की, एखाद्या माणसाचे अंगी सद्गुण व औदार्य असेल, तर त्याला सरदाराचा मान देणे न्यायाचे ठरेल हे निर्विवाद. पण हे गुण नसताना, केवळ घराण्याचा मोठेपणा प्राप्त झालेला असेल तर त्यामुळे त्याचे दुर्गुण अधिकच ठसठशीतपणे दिसू लागतात.

थोर माणूस दुर्गुणी असला तर, त्याचे दुर्गुण डोळ्यावर येतात आणि एखादा श्रीमंत माणूस कंजूष असेल तर त्याला 'लोचट भिकारी' म्हटले पाहिजे, ज्याचेजवळ संपत्ति असते तो श्रीमंत असतो किंवा सुखी असतो असे नाही. जो आपली संपत्ती खर्चतो आणि उपभोगतो, तोच खरा श्रीमंत, तोच खरा सुखी. जो माणूस विवेकाने संपत्तीचा व्यय करतो त्याला सुख मिळते. गरीब शिलेदार, आपण शिलेदार आहो हे आपल्या वैभवाने दाखवू शकत नाही; पण शिलेदारीचे जे प्रमुख घटक आहेत, ते म्हणजे सद्‌गुण, सौजन्य सभ्यता, नम्रतापूर्वक वर्तन, हे गुण प्रगट करून तो गरीब शिलेदार आपली शिलेदारी सिद्ध करू शकतो. आपण उदार असल्याचा बहाणा तो करू शकत नाही, कारण त्यासाठी संपत्तीची गरज असते; पण त्याच्या मनाचा उदारपणा संपत्तीची उणीव भरून काढतो. एखाद्या दरिद्री भिकाऱ्याला गरीब माणसाने दोन मुठी धान्य आनंदाने दिले, तर त्याला उदारच म्हटले पाहिजे–हांजी हांजी करणाऱ्या तोंडपुज्या लोकांच्या घोळक्याला पोकळ ऐट मिरविणाऱ्या श्रीमंत माणसाने दिलेल्या बड्या देणगीपेक्षा त्या दोन मुठीचे महत्त्व अधिक आहे. हे सद्‌गुण दुर्दैवाच्या मेघांनी काही काळ झाकले गेले असले तरी, त्यांचे तेज कधी ना कधी मोठ्या ऐश्वर्याने बाहेर पडल्याशिवाय रहात नाही.

"कीर्ति व संपत्ती मिळविण्याचे दोन मार्ग आहेत–शस्त्र व शास्त्र. मी शस्त्र पसंत केले आहे. माझ्या कुंडलीतील मंगळाच्या प्रभावामुळे मी हा धाडसी मार्ग स्वीकारला आहे. म्हणून धाडस करण्याचा माझा निर्धार ढासळविण्याचे तुमचे सारे प्रयत्न फोल आहेत. सारी मानवजात माझ्याविरुद्ध गेली तरी, ईश्वराने योजिलेले, दैवाने आज्ञापिलेले, बुद्धीने अवश्य ठरविलेले आणि (सर्वात महत्त्वाचे म्हणजे) माझ्या मनोदेवतेने सांगितलेले कार्य मी सतत करीत राहणार. शिलेदारीचे कार्य चालविताना किती त्रास होतो आणि किती संकटांना तोंड द्यावे लागते, याची मला जाणीव आहे. पण त्या कार्याचे फल म्हणून, असंख्य मान–सन्मान आणि पारितोषिके मिळतात, हेही मला माहीत आहे. पुण्याचा मार्ग निरुंद असतो–पापाचा मार्ग सोपा व उघडा असतो. पण त्या दोन्ही मार्गांचे मुक्काम आणि शेवट अत्यंत भिन्न असतात. पापाचा मार्ग उतरणीचा असतो–राजमार्ग असतो हे खरे, पण त्या मार्गाने जाणाऱ्याला शेवटी निंदा व मृत्यू यांचीच भेट नेहमी होते. उलट, पुण्य–मार्गाने जाणाऱ्या माणसाला कीर्ती व अमर जीवन प्राप्त होते. ते जीवन कधीच नष्ट होत नाही. स्पेनमधील महाकवी कॅस्टिलियन याने म्हटले आहे—

कडा जो चढुनी जाई ।
क्लिष्ट मार्ग क्रमूनिया ॥
उच्च जागीं वैभवाच्या ।
शोभतो नर तो भला ॥ "

"वा! वा! माझे काका कवी पण आहेत." पुतणी आनंदाने ओरडली. "त्यांना सर्व काही माहीत आहे. जरूर पडली तर ते गवंड्याचेही काम करतील, हे मी

वैजेने सांगते. आणि जर त्यांनी ते काम अंगावर घेतले, तर पोपटाचा पिंजरा तयार करावा, त्याप्रमाणे ते घर सहज बांधू शकतील." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले," खरे आहे, मुली, खरे आहे. शिलेदारीच्या कार्यासंबंधी विचार करण्यात माझी बुद्धी पूर्णपणे बुडाली नसती तर, मी करू शकणार नाही, असे कोणतेच काम राहिले नसते. पोपटाचे पिंजरे काय किंवा दात कोरणे काय, कोणतीही वस्तू माझ्या हातून सुटली नसती."

इतक्यात कोणी तरी दार ठोठावले. तेव्हा 'कोण आहे ?' असे विचारले असता, 'मी आहे' असे सँकोचे उत्तर आले. त्याला भेटण्याची इच्छा नसल्यामुळे घरधनीण तेथून निसटली. पुतणीने सँकोला आत घेतले. डॉन क्विक्झोट यांनी दोन्ही हात पसरून त्याचे स्वागत केले. नंतर एका खोलीत ते दोघे बसले आणि पूर्वीइतकाच सुखद संवाद करू लागले.



प्रकरण ७

# डॉन क्विक्झोट यांचा आपल्या शागिर्दाशी झालेला संवाद आणि इतर सुविख्यात वृत्तांत

डॉन क्विक्झोट आणि सँको एकत्र बसलेले पाहून त्यांच्या बंदिस्त चर्चेचा सूर काय असेल, हे घरधनिणीने तत्काळ ताडले. आणखी एखादी नवीन मोहिम हे शिलेदार त्या चर्चेतून काढतील, असे तिने ताडले. दुःखाने आणि त्रासाने तिचे मन अगदी खचून गेले आणि म्हणून, आपले अवगुंठन डोक्यावर घेऊन, ती पंडित सॅम्सन कॅरास्को याचा शोध घेण्यास निघाली. डॉन क्विक्झोट यांना आपल्या माथेफिरू निश्चया-पासून परावृत्त करण्याइतकी बुद्धिमत्ता आणि वक्तृत्व त्यांच्या त्या मित्राजवळ आहे, असा विश्वास तिला वाटत होता. कॅरास्को आपल्या घराच्या अंगणात फिरत असलेला तिला आढळला. त्याला पाहताच, ती गुडघे टेकून त्याच्यापुढे वाकली. त्यावेळी तिचे मन अस्वस्थ झालेले होते आणि तिच्या चेहऱ्यावर घामाचे थंड थेंब ओघळत होते. ( तिची स्थिती व गोंधळ पाहून काहीसा चकित झालेला ) कॅरास्को तिला म्हणाला, " काय झालं बाई ? तुझ्यावर कोणतं संकट ओढवलं आहे ? एखादं भूत मानगुटी बसल्यासारखा तुझा चेहरा दिसत आहे. " ती म्हणाली, " नाही रे बाबा, तसं काही नाही. पण माझा धनी निघाला आहे-तो जाणार हे खचित. " कॅरास्को ओरडला, " काय ? तुझ्या म्हण-ण्याचा अर्थ काय ? त्याचा जीव त्याच्या कुडीतून जाणार आहे ? " त्या स्त्रीने उत्तर दिले, " छेः ! पण त्याचे सारे बोलणे त्याच्या केवळ प्रयाणाविषयीच चाललेले आहे. पुनः या अफाट दुनियेत भटकण्याचा त्याचा विचार आहे. ' साहसी कृत्यांचा ' शोध घेण्यासाठी तिसऱ्या मोहिमेवर निघण्याच्या तयारीत तो आता आहे. योगायोगाने घडणाऱ्या गोष्टींना तो साहस का म्हणतो, हे मला माहीत नाही. पहिल्या खेपेस त्याला जेव्हा घरी आणण्यात आले, तेव्हा त्याला गाढवावर आडवे घातलेले होते आणि त्याचे शरीर मारामुळे जवळ जवळ छिन्नविच्छिन्न झालेले होते; दुसऱ्या मोहिमेच्यावेळी, एका गाडीतून त्याला घरी आणावे लागले. त्यावेळी एका पिंजऱ्यात त्याला ठेवलेले होते. आपल्यावर जादू-टोणा झालेला आहे, असे तो आम्हाला भासवीत होता. त्यावेळी तो बिचारा जीव इतका दुःखी तो कष्टी दिसत होता की, त्याला उदरात वाहिलेल्या त्याच्या मातेलाही, आपल्या पोटचेच हे अपत्य आहे, असे ओळखता आले नसते-इतका खंगलेला, फिकट आणि थकला-भागलेला तो दिसत होता. त्यावेळी त्याचे डोळे आत गेलेले होते आणि

त्याच्या मेंदूच्या कोपऱ्यात कोठे तरी दडलेले होते. त्याला पुनः ताजातवाना करण्यासाठी मी निदान सहाशे अंडी तरी खर्चिली असतील, अशी मला खात्री आहे—नाही, नाही, याहूनही अंडी मी त्याला खाऊ घातली असतील, याला साक्ष प्रभु आहे, सारे जग आहे—फार काय, ती अंडी घालणाऱ्या कोंबड्याही हे नाकारणार नाहीत. ''

हे ऐकून तो विद्वान पंडित म्हणाला, '' यावर माझा विश्वास बसतो. कारण, तुमच्या कोंबड्या इतक्या छान जोपासलेल्या आहेत आणि इतक्या धष्टपुष्ट नि चांगल्या आहेत की, मनात एक आणि बाहेर दुसरेच बोलायचे, असे त्या, जगाचे राज्य मिळवण्यासाठीही, करणार नाहीत. पण सारे प्रकरण एवढेच आहे का? तुमच्या धन्याने भ्रमण करण्याचे योजिले आहे, यापेक्षा दुसरे कोणतेही दुर्दैव तुमच्यावर कोसळले नाही ना?'' ती म्हणाली, '' नाही महाराज. तेच काय ते दुःख. '' तो उद्गारला, '' मग तुम्ही आपल्या डोक्याला आणखी शीण देऊ नका. चटकन घरी जा आणि जाता जाता माझ्यासाठी सेंट अप्पेलोनियाची प्रार्थना म्हणा — तुम्हाला ती येत असेल तर. नंतर, माझ्या न्याहारीसाठी काही गरम पदार्थ पाठवा म्हणजे मी तुमच्याकडे लगेच येईन. मग मी कोणते चमत्कार करतो ते पहात रहा. '' ती म्हणाली, '' अहा रे माझ्या बाळा, सेंट पोलोनियाची प्रार्थना फक्त दातदुखीवर उपयोगी पडते पण माझ्या धन्याचे दुखणे आहे त्याच्या मेंदूत. '' तेव्हा तो म्हणाला, '' बाई, माझ्याशी वाद घालू नका. मी काय सांगतो, त्याचा अर्थ मी बरोबर जाणतो. सॅलामँका येथे कलेचा पदवीधर होण्याचा अभ्यास मी सुरू केलेला नाही काय? दुसरा कोणी सुरू केला आहे, असे तुम्हाला वाटते काय? '' हे ऐकताच ती तेथून तत्काळ निघून गेली. नंतर लगेच तो पाद्रीबुवाच्या शोधार्थ निघाला. योग्य वेळ येताच आपण काय जाहीर करावे, याचा सल्ला घेण्यासाठी तो तिकडे निघाला.

[ सँको आणि त्याचा धनी हे दोघे एका खोलीत कोंडले गेल्यानंतर त्यांच्यामध्ये जो काही संवाद झाला, त्याचा अत्यंत समयोचित व निःपक्षपाती वृत्तांत या इतिहास-ग्रंथात दिलेला आहे. ] सँको आपल्या धन्याला म्हणाला, '' महाराज, आपल्याबरोबर मी जेथे जेथे यावे, असे आपल्याला वाटत असेल, तेथे मला जाऊ देण्यास मी माझ्या बायकोचे मन अखेर 'कळविले' आहे. '' तेव्हा डॉन क्विक्झोट त्याच्या ' चुकीची दुरुस्ती ' करीत म्हणाले, '' सँको, ' कळविले ' नाही, तर ' वळविले ' म्हण. '' तेव्हा सँको म्हणाला, '' हे पहा महाराज, मी जर चूक करीत नसेन तर, मी आपल्याला एकदोनदा अशी विनंती केली आहे की, माझ्या बोलण्याचा अर्थ तुम्हाला कळत असेल तर, माझे शब्द दुरुस्त करीत बसू नका, आणि जर तो अर्थ तुम्हांला कळत नसेल तर तुम्ही एवढेच म्हणा, ' मूर्खा सँको, तू काय म्हणतोस हे मला कळत नाही.'' आणि जर माझा अर्थ मला स्पष्ट करता येत नसेल तर माझ्या मनातील भाव तुम्ही जाणून घ्या. कारण, मी तितका ' साहसी ' आहे. '' तेव्हा डॉन क्विक्झोट मध्येच म्हणाले, '' मला तुझे बोलणे काहीच कळत नाही. तुझ्या ' साहसी ' शब्दाचा अर्थ काय, याचा मी तर्कही करू शकत

नाही." सँकोने विचारले, "का ? मी इतका हा आहे ? म्हणजे आपला असा आहे ?" तेव्हा त्याचे शिलेदार म्हणाले, "तू मला अधिकच बुचकळ्यात टाकीत आहेस." सँको म्हणाला, "असे असेल तर साराच खेळ खलास ! मला काहीच बोलता येणार नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "हां, हां, आता माझ्या डोक्यात प्रकाश पडू लागला. 'सालस', 'समंजस', 'कोणाचेही ऐकून घेणारा' मी तुला जे शिकवीन, ते ग्रहण करण्यास दक्ष व तत्पर असलेला– असे तुला म्हणावयाचे आहे." ते ऐकून सँको म्हणाला, "मी कोणतीही पैज मारून सांगतो की, आपल्याला माझे बोलणे पहिल्या-प्रथमच चांगले कळले होते. पण मला घोटाळ्यात पाडण्याची तुम्हाला इच्छा झाली आणि आपले सुंदर शब्द माझ्या कानी पडावेत, असे आपल्याला वाटले, म्हणून हा सारा शब्दांचा गोंधळ आपण केला." डॉन क्विक्झोट म्हणाले, "असेल, तसे असेल. पण टेरेसा काय म्हणते, हे मला कृपा करून सांग."

तेव्हा सँकोने उत्तर दिले, "आपली इच्छा असेल तर सांगतो. ती म्हणते, आपल्या धन्याचे काम नीट करा. बोलावे थोडे पण करावे फार. माणसाने स्वतःच आपल्या आयुष्याला आकार देऊ नये. ज्याला काम करावयाचे आहे, तो बडबड करीत नाही. ठाम निश्चय असणे चांगले. आज रोख, उद्या उधार. 'मी उद्या दोन मोहरा देईन.' असे म्हणणाऱ्यापेक्षा 'आहे ते जतन करा' असे सांगणारा चांगला. पण महाराज, स्त्रीच्या मताला फारशी किंमत नसते. पण ते मत जो झिडकारतो, तो जरूर तितका शहाणा ठरत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझेही मत तसेच आहे. पण भल्या माणसा, आपले बोलणे पुढे चालव. कारण आता तुझा सूर फार चांगला लागला आहे. आज तू फार शहाणपणाने बोलत आहेस." तेव्हा सँको म्हणाला, "माझ्यापेक्षा आपल्यालाच हे जास्त चांगले माहीत आहे की, आपण सर्व मर्त्य–मानव आहोत. आज इथे आहो, तर उद्या परलोकात ! एखाद्या म्हाताऱ्या मेंढ्याप्रमाणे माणूस नाहीसा होतो. एखाद्या लहान कोकराने हिरवळीवर उडी घ्यावी, तसा माणूस मृत्यूकडे धाव घेतो. आपल्या आयुष्याची दोरी किती लांब आहे, हे कोणास सांगता येत नाही. कारण मृत्यू बहिरा आहे ! तो जेव्हा आपले दार ठोठावतो, तेव्हा तो कोणाला दया-माया दाखवीत नाही. त्याची अगदी लगीनघाई असते. स्तुती किंवा निंदा त्याला थोपवू शकत नाहीत. राजाचा मुकुट किंवा धर्मगुरूचा टोप त्याला अडवू शकत नाहीत. असे लोक बोलतात आणि प्रार्थनामंदिरातील प्रवचनात आम्हाला हेच सांगितले जाते."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे सारे मला मान्य आहे. पण यावरून तू अनुमान काय काढतोस ?" सँकोने उत्तर दिले, "महाराज, दुसरे काही नाही, मला एवढेच पाहिजे की, जोपर्यंत मी आपल्याबरोबर आहे, तोपर्यंत आपण मला मासिक वेतन देत असावे आणि ते आपल्या जिंदगीतून द्यावे. कारण आता मी पुढे मिळणाऱ्या बक्षिसा-वर विश्वास ठेवणार नाही. बक्षिसे कदाचित उशिरा मिळतील किंवा अजिबात मिळणारही नाहीत. मला किती वेतन मिळणार – मग ते थोडे असो किंवा फार असो – हे मला

कळले तर आनंद वाटेल. दुसऱ्याच्या थैलीतील पुष्कळ पैशापेक्षा स्वतःच्या खिशातील थोडा पैसाही अधिक मोलाचा! आर्थिक तरतूद करून ठेवणे केव्हाही चांगलेच. पै-पैशाने मोठा द्रव्यनिधी साचतो. माणसाला जोपर्यंत पैसे मिळत असतात, तोपर्यंत त्याचे ठीक चालते. महाराज, आपण मला जे बेट बहाल करण्याचे वचन दिले आहे, ते जर आपण खरोखर दिले. ( अर्थात्, तशी आशा करण्यास मी धजत नाही ) तर मी काही इतका कृतघ्न नाही – घाणीत लोळणारा किडा नाही – तेव्हा आपणापासून मिळालेल्या वेतनावर मी लाथ मारीन. भक्कम म्हणजे भक्कम!" ते ऐकून डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "अरे, भक्कमपेक्षा रक्कम म्हटलेले चांगले नाही का?" तेव्हा सँको ओरडून म्हणाला, "हो, हो. आत्ता मला आपले म्हणणे कळले. मी 'रक्कम' म्हणावयास पाहिजे होते – 'भक्कम' नव्हे, हे मी पैज मारून सांगतो. पण त्याचे काही महत्त्व नाही. मला काय म्हणायचे आहे, हे आपल्याला कळले आहे."

तेव्हा शिलेदारसाहेब म्हणाले, "ठीक, सँको, ठीक. मी तुझ्या विचाराच्या थेट तळाशी बुडी मारली आहे आणि तू म्हणीचा जो वर्षाव केलास, त्याचा हेतू जाणला आहे. दोस्त सँको, हे पाहा, तुला वेतन देण्याचे बाबतीत मी कधीच खळखळ केली नसती; पण वेतन देण्याचा दाखला माझ्यापुढे नाही. मी आतापर्यंत शिलेदारीचे जे जे ग्रंथ वाचले, त्यांमध्ये वार्षिक किंवा मासिक वेतन देण्याचा थोडाही दाखला मला सापडलेला नाही. तो सापडता तर तुझी विनंती मी मान्य केली असती. मी शिलेदारांचे सारे—बहुतेक सारे—इतिहास वाचलेले आहेत. त्यात मला असे आढळले आहे की, शिलेदारांचे सारे शागीर्द आपल्या चरितार्थासाठी केवळ आपल्या धन्याच्या मर्जीवर अवलंबून असत. शिलेदारांच्या नशीबाने आश्चर्यकारक कलाटणी खाल्ली, तर त्याच्या शिष्यांना एखाद्या बेटाचा राज्यकारभार किंवा तत्सम धनदौलत दिली जात असे. निदान मानमरातब आणि एखादी पदवी, बक्षीस म्हणून, त्यांना अर्पण केली जात असे. म्हणून मित्रा सँको, अशा बढतीच्या आशेवर विसंबून तू माझ्या सेवेस पुनः रुजू झालास तर ठीकच आहे. पण जर तू त्या आशेवर विश्वास ठेवीत नसलास, तर घरी परत जा आणि तुझ्या मगरूर बायकोला सांग, तुझ्या व तुझ्या नवऱ्याच्या क्षुद्र अविश्वासासाठी मी शिलेदारीचे सारे नियम व परंपरा मोडणार नाही. आता यासंबंधी अधिक शब्दाशब्दी नको. मित्र म्हणून आपण एकमेकांचा निरोप घेऊ. माझ्या हातात हिरवा चारा असेल तर पाखरे कोठूनही येतील. कमी पगार देण्यापेक्षा पगार न देणे चांगले! उशीरा मोबदला मिळण्यापेक्षा रोख पैसा मिळणे चांगले हे लक्षात ठेव. आणि हे ध्यानात धर की, प्रत्येक म्हणीसारखी दुसरी म्हण असते. त्यांची वृष्टी तुझ्याइतकीच मी करू शकेन, हे समजून ऐस. सारांश, तू जर सौजन्याने माझ्याबरोबर येत नसलास आणि माझ्यासारखी सुखदुःखे भोगीत नसलास तर देव तुझे कल्याण करो आणि तुला संत बनवो. त्यावर मी आक्षेप घेणार नाही. तुझ्यापेक्षा अधिक आज्ञाधारक, अधिक दक्ष पण तुझ्यापेक्षा कमी बडबड्या आणि कमी उर्मट नोकर मला मिळेल."

आपल्या धन्याचा हा ठाम निर्धार ऐकून सँकोच्या मनामध्ये क्षणार्धात दुःखाचे ढग जमू लागले. निराशेने त्याची वाचाच खुंटली आणि त्याचे हृदय एकदम कमरेपर्यंत खाली घसरले. कारण त्याला मनापासून असे वाटत होते की, आपण आपल्या धन्याला कोणत्याही अटी मान्य करावयास लावू. त्याला असे उगाचच वाटत होते की, जगाचे राज्य मिळाले तरी आपले शिलेदारसाहेब आपल्याला सोडून जाणार नाहीत. अशा दुःखदायक विचारात तो बुडालेला असताना सॅम्सन कॅरास्को तेथे येऊन दाखल झाला. डॉन क्विक्झोट यांना आपल्या संकल्पित मोहिमेपासून परावृत्त करण्यासाठी तो कोणते युक्तिवाद करतो, हे एकण्यास अत्यंत उत्सुक असलेली पुतणी पण तेथे आली. पण सॅम्सन हा एक विलक्षण नकल्या होता. त्याने तेथे येताच शिलेदारांना घट्ट मिठी मारली आणि उंच स्वरात बोलण्यास सुरुवात केली. त्यामुळे ती पुतणी निराश झाली. कॅरास्को ओरडून म्हणाला, " अरे, तूं शिलेदारातील हिरा, देदिप्यमान शस्त्रांचा तुरा, सन्मानाचा मोहरा आणि आपल्या स्पेन राष्ट्राचा तारा ! तूं आपल्या शौर्यशाली वृत्तीने ज्या तिसऱ्या मोहिमेचा संकल्प केला आहेस, तिला अडथळा आणणारे सारे लोक आपल्या विपर्यस्त आकांक्षांच्या जंगलात बुडून जावोत आणि तेथून वर जाण्यास त्यांना एकही सुताचा धागा न सापडो." नंतर, घरधनिणीकडे वळून तो म्हणाला, " आता तुम्ही सेंट अपोलोनियाची प्रार्थना म्हणण्याची गरज नाही. कारण मला ती नक्षत्रानी लिहिलेली दिसते. ती म्हणजे, आपल्या या कीर्तिमान वीराने आपल्या वैभवाच्या मार्गाने जाण्यास क्षणभरही विलंब लावू नये. त्यांच्या शौर्यशाली आत्म्याच्या उपजत गुणांचा आणि त्यांच्या बलदंड बाहुबलाचा उपयोग केल्याने समस्त मानवजातीचे कोट-कल्याण होणार आहे. ते करण्यापासून मी जर त्याला परावृत्त केले, तर माझ्या विवेक-शक्तीला टोचणी लागेल. अरेरे ! आमच्या शिलेदारांनी येथे राहणे म्हणजे दलित अर्भकांना वाली न मिळणे, सुंदर तरुणीना मुक्तिदाता न लाभणे, शूरवीराना मान न मिळणे, विधवाना उपकारी हितचिंतक न गवसणें आणि सुवासिनीना दृढसंतोष प्राप्त न होणे. त्यांच्या येथे थांबण्याने इतर हजारो महत्त्वाचे पराक्रम आणि त्यांची फले थांबण्यासारखे आहे. तसे पराक्रम करणे, हे शिलेदारीच्या सन्मान्य परंपरेतील एक कर्तव्य आणि अवश्य असे फल आहे. हे रुबाबदार शूरवीरा ! उद्या जाण्यापेक्षा आजच्या आजच तू प्रस्थान ठेव. अहो डॉन क्विक्झोट, आता आपल्या मोठेपणाला पंख फुटू देत ! आपली प्रवासाची तयारी करण्याचे कामी जर काही उणे पडत असेल, तर मी माझे तन-मन-धन खर्चून ते पूर्ण करीन आणि जरूरच पडली तर आपला नोकर म्हणूनही काम करण्यास मी तयार आहे. तो मान मिळावा अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे."

हे ऐकून आणि आपल्या नोकराकडे वळून डॉन क्विक्झोट म्हणाले, "पहा, पहा, सँको, मला नोकरांची उणीव पडणार नाही, असे मी तुला सांगितले नव्हते का ? सेवा करण्यास कोण पुढे आहे, हे पहा तर खरे. अरे, कलांचा परमस्वामी,

काव्यदेवतेचा निरंतरचा कंठमणि, सॅला मॅंका शाळेचा अलंकार असा हा सॅम्सन कॅरास्को शरिराने सुदृढ व चपळ आहे, परिश्रम करण्यात तत्पर आहे, संयमाची सवय जडलेला आहे, दुःखात शांत राहणारा आहे–थोडक्यात म्हणजे, सेवकाच्या अंगी जे जे गुण असावयास हवेत, त्या सर्वांनी मंडित आहे. परंतु हे परमेश्वरा, माझी वैयक्तिक इच्छा पूर्ण करण्यासाठी हा आधारस्तंभ काढून घेऊन विद्वत्तेचे हे मंदिर खिळखिळे करण्याची बुद्धी मला देऊ नकोस. हा विज्ञानाचे प्रचंड भांडार आहे आणि ललित कलांचा विशाल वृक्ष आहे. छेः ! मित्रा तू आपल्याच देशात राहा आणि दुसरा सॅम्सन हो–स्पेनचे भूषण आणि तुझ्या प्राचीन पूर्वजांचे आनंदनिधान तू हो. मी कोणत्याही नोकरांवर संतुष्ट राहीन. कारण सँको माझ्याबरोबर येईल, अशी खात्री नाही." तेव्हा सँको डोळ्यातून अश्रू ढाळीत ओरडून म्हणाला, "येतो, मी येतो, मी खात्रीने येतो. सँको पँझा यापुढे खेळ खेळण्यात नि नाच नाचण्यात वेळ घालविणार नाही. महाराज, मी काही पाषाणहृदयी नाही. पँझाचे सर्व घराणे कसे आहे, हे तमाम दुनियेला–त्यातले त्यात आमच्या शहराला–माहीत आहे. शिवाय आपली माझ्यावर सदैव कृपा–दृष्टी आहे हे मला पक्के माहीत आहे. आपल्या कैक कृत्यानी–आणि त्याहूनही भल्या शब्दानी–आपण ते यापूर्वीच दाखविले आहे. आता वेतनाचा प्रश्न काढून मी जसे वागावयास नको होते तसा वागलो असेन, तर ते केवळ माझ्या बायकोला खूष करण्यासाठी. तिने एखादी गोष्ट एकदा डोक्यात घेतली की, तिचाच ठेका ती सारखी धरत असते–पिपे दुरुस्त करणाऱ्या लोहारासारखी. शेवटी ती आपले म्हणणे तडीस नेते. पण जाऊ द्या ते चुलीत. मी नवरा आहे–आणि तिचा नवरा राहणार आहे. ती काय, बायको आहे–आणि माझी बायको राहणार आहे. मी जेथे कोठे असेन, तेथे मी मर्दासारखा वागतो–माझ्या रोमरोमात मर्दपणा भरलेला आहे–हे कोणीच नाकारू शकणार नाही. मला कोणी कितीही विरोध केला तरी मी घरात मर्दासारखाच वागेन. म्हणून महाराज, आपण आता दुसरे काही न करता, फक्त आपले मृत्यु–पत्र व वारसा–पत्र तयार करा. मग आपल्या मोहिमेची योजना इतकी पक्की करा की, तिला कोणी धक्का लावू शकणार नाही. तसे झाले म्हणजे लगेच आपल्या इच्छेप्रमाणे आपण निघूया. म्हणजे मास्टर सॅम्सन यांचा जीव भांड्यात पडेल. कारण ते म्हणतात, नव्या जागतिक प्रवासास तुम्ही आरंभ करीपर्यंत माझे मन मला स्वस्थ बसू देणार नाही. या प्रवासास मी आपल्या मागोमाग येण्यास तयार आहे. पृथ्वीच्या पाठीवर आजवर शिलेदारांचे जे जे सेवक झाले, त्यांच्या-इतकाच–किंबहुना काकणभर अधिक–विश्वासू व निष्ठावंत सेवक म्हणून काम करण्याचे वचन मी आपल्याला देतो."

सँको पँझा याने आपले मन अशा प्रकारे मोकळे केलेले पाहून तो पंडित चकित झाला. या इतिहास–ग्रंथाच्या प्रथमार्धात त्याच्यासंबंधी त्या पंडिताने पुष्कळ वाचलेले होते, तरीही त्यात चित्रित केल्याप्रमाणे तो इतका गंमत्या माणूस असेल, असे सॅम्सनला वाटत नव्हते. पण आता ते त्याचे मृत्यु–पत्रासंबंधीचे व प्रवासासंबंधीचे सारे बोलणे

ऐकून त्याचे मत असे झाले की, सँकोचे जे जे गुण गायिले गेले, ते खरे आहेत, आणि या युगातील तो एक विलक्षण माणूस आहे. तो आणि त्याचा धनी यांच्यासारखी उदार जोडी जगाने आतापर्यंत कधी पाहिली असेल, अशी कल्पना त्याला करवेना.

डॉन क्विक्झोट आणि सँको यांनी एकमेकांना आलिंगन दिले–पुनः पहिल्यासारखे ते मित्र बनले. महाशय कॅरास्को यांच्या संमतीने–कारण, आता तो आपल्या शिलेदारांचा देव बनला होता–असे ठरले की, तीन दिवस संपल्यानंतर, त्याने आपल्या मोहिमेवर निघावे. या तीन दिवसांत प्रवासातील सर्व गरजेच्या वस्तू मिळवाव्यात. विशेषतः खंबीर असे शिरस्त्राण मिळवावे. ते विकत घेण्याचा निश्चय डॉन क्विक्झोट यानी पक्का केला होता. एका मित्राकडून सहज मिळण्यासारखे एक शिरस्त्राण आणून देण्याची तयारी सॅम्सनने दाखविली. त्याच्यावर पोलादाची चकाकी फारशी नव्हती, गंज चढल्यामुळे ते मलिन दिसत होते.

पुतणी व घरधनीण शोकाने मोठमोठ्यांदा रडू लागल्या. त्यांनी आपले केस ओढले, आपल्या चेहऱ्यावर ओरखडे काढले, आणि स्मशानात गळा काढून रडणाऱ्या माणसाप्रमाणे त्या आक्रोश करू लागल्या–जणू काही, शिलेदाराचे प्रयाण म्हणजे त्याचा खराखुरा मृत्यूच आहे. त्यांनी कॅरास्कोवर रागाने लाखोली वाहिली. पण खरोखर पाहता, त्याने जे काही केले, ते पाद्री, न्हावी व तो स्वतः यांनी शिजविलेल्या कटाचे फळ होते.

सारांश, डॉन क्विक्झोट व त्याचा नोकर यांनी सर्व गोष्टींची सिद्धता केली–एकाने आपल्या बायकोला शांत केले, तर दुसऱ्याने आपल्या पुतणीला व घरधनिणीला गप्प बसविले. संध्याकाळ झाल्यानंतर, कोणी पहात नसताना, ते टोबोसोकडे निघाले. फक्त तो पंडित त्या खेड्यापासून मैलभर त्यांच्याबरोबर चालत गेला. डॉन क्विक्झोट आपल्या अश्व–राजावर आणि सँको आपल्या गर्दभ–राजावर स्वार झाले. सँकोच्या पिशवीत खाद्य–पदार्थ भरपूर होते. खर्च भागविण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी सँकोला जे पैसे दिले होते, ते त्याने आपल्या थैलीत ठेवले. शेवटी सॅम्सनने त्यांचा निरोप घेतला आणि त्या वीरपुरुषाला विनंती केली की," आपल्या विजयाची वार्ता वेळोवेळी मला कळवावी. आपल्या बऱ्यावाईट काळात माझी सहानुभूती आपल्याला मिळेल. तसे करणे हा मैत्रीचा नियमच आहे. " तसे करण्याचे वचन डॉन क्विक्झोट यानी दिले. नंतर त्यांनी एकमेकांचा निरोप घेतला. सॅम्सन घरी गेला आणि शिलेदार व त्याचा नोकर यांनी टोबोसा शहराकडील आपला प्रवास सुरू केला.



प्रकरण ८

# टोबोसोची श्रीमती डल्सिनिया हिची भेट घेण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी केलेला यशस्वी प्रवास

[ हॅमेट बेनेट गेली आपल्या आठव्या प्रकरणाचा प्रारंभ करताना म्हणतात, "अल्लाला धन्यवाद!! अल्लाला धन्यवाद!!" त्याने हे धन्यवाद तीनदा दिले आहेत कारण, डॉन क्विक्झोट व सँको यांनी पुनः आपल्या मोहिमेस सुरूवात केली. या प्रकरणापासून वाचकाला शिलेदाराच्या यशाचा आनंददायक इतिहास आणि त्याच्या नोकराच्या मौजा वाचावयास मिळतील. या विलक्षण शिलेदाराने, पूर्वी जी शौर्याची कृत्ये केली ती तुम्ही विसरून जा आणि त्याच्या भावी पराक्रमावर आपली नजर खिळवून ठेवा अशी विनंती या लेखकाने केलेली आहे. त्याचे पूर्वीचे पराक्रम माँटीलच्या मैदानात जसे सुरू झाले होते, तसे त्याचे भावी पराक्रम टोबोसोकडे सुरू केलेल्या प्रवासात जन्मले होते. ही छोटीशी विनंती कोणाला वेडगळपणाची वाटणार नाही. कारण लेखकाने शिलेदाराच्या पराक्रमाची तशी अभिवचने दिली आहेत. त्या पराक्रमांचा प्रारंभ पुढीलप्रमाणे ]—

डॉन क्विक्झोट आणि त्याचा नोकर त्या पंडिताचा निरोप घेऊन निघाले न निघाले, तोच रोझिनांटने खिंकाळण्यास आणि डॅपल गाढवाने ओरडण्यास एकदमच सुरुवात केली. हा आपल्या कार्याला शुभ-शकुन आहे, आणि आपल्या यशाचे प्रसाद-चिन्ह आहे, असे त्या दोघांनी मानले. खरी गोष्ट अशी होती की, रोझिनांटच्या खिंकाळण्यापेक्षा अधिक जोराने डॅपल ओरडू लागले. त्यावरुन सँकोने असा निष्कर्ष काढला की, माझ्या धन्यापेक्षा माझे नशीब चांगले आहे आणि त्याच्या नशिबावर मात करणारे—त्याला ग्रहण लावणारे-आहे. हे अनुमान त्याने ज्योतिष-शास्त्राच्या काही तत्त्वावरून काढले असे मी म्हणू शकत नाही. त्या शास्त्रात तो चांगलाच पारंगत होता हे निःसंशय. पण त्या बाबतीत इतिहासात काही लिहिलेले नाही. तथापि त्याच्याविषयी अशी नोंद केलेली आहे की, जेव्हा जेव्हा त्याचे गाढव अडखळले किंवा पडले, तेव्हा आपण त्या दिवशी बाहेर पडलो नसतो तर बरे झाले असते, असे त्याला वाटे. या अपघातापासून सांधे खिळखिळे होणार आणि बरगड्या मोडणार असे भाकित तो करी. तो कितीहि मूर्ख असला, तरी त्याचा हा समज काही वाईट नव्हता.

डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा सँको, आपण टोबोसोला पोहोचण्यापूर्वीच रात्र

पडेल, असे मला वाटते. कोणत्याही मोहिमेला प्रारंभ करण्यापूर्वी, मी त्या अप्रतिम डल्सिनियाला अभिवादन करण्याचा, तिचे आशीर्वाद घेण्याचा आणि नंतर तिचा निरोप घेण्याचा निश्चय केला आहे. त्यामुळे अत्यंत संकटमय अशा प्रसंगातसुद्धा सौख्यदायक घटना घडतील, अशी मला खात्री वाटते. कारण, आपल्या हृदय–देवतेच्या स्मितापासून आणि कृपा–कटाक्षापासून शिलेदाराला शौर्याची जितकी स्फूर्ति मिळते, तितकी जगातील कोणत्याही गोष्टीपासून मिळत नाही. " तेव्हा सँको म्हणाला, " मला पण तसेच वाटते. पण महाराज, मला असे भय वाटते, की, आपण तिच्याजवळ जाऊ शकणार नाही–तिच्याशी बोलू शकणार नाही—निदान तिने आपले आशीर्वाद देण्याला योग्य अशा स्थानी आपण तिला भेटू शकणार नाही. आता तिने आपल्या अंगणाच्या चिखल–मातीच्या भिंतीवरून आपला आशीर्वाद फेकून दिला, तर गोष्ट निराळी. सीएरा मोरेना येथे आपण ज्या खुळचट खोड्या केल्या, त्यांची वार्ता तिला कळविण्यासाठी मी जेव्हा तिकडे गेलो, तेव्हा मी तिला त्या अंगणातच प्रथम पाहिले. " हे ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, " अरे, बोलतोस काय तू ? चिखला–मातीची भिंत ? मूर्खा, तुझीच काही तरी चूक झाली आहे. तुझ्या डोक्यात चिखल नि माती भरलेली आहे. त्याशिवाय, तशी भिंत दुसरीकडे कोठे असणार नाही. ती भिंत म्हणजे तुझ्या गलिच्छ कल्पनेचे फळ आहे. लावण्याची नि कुलीनतेची ती आदर्श प्रतिमा आहे. तिचा योग्य तो सत्कार कधी झालाच नाही. ती लावण्य-लतिका त्यावेळी एखाद्या प्रांगणात एखाद्या भव्य सज्जात किंवा प्रशस्त रस्त्यावर तुला आढळली असेल. तिच्या निवासाचे योग्य वर्णन करावयाचे तर, तो एखादा विलासी आणि ऐश्वर्यशाली राजवाडा असला पाहिजे. " तेव्हा सँको म्हणाला, " असेल, असेल, तसेही असेल. पण मला जे आठवते, ते इतकेच की, तेथे फक्त चिखलाची भिंत होती–त्याहून चांगली किंवा वाईट दुसरी कोणतीच वस्तु नव्हती." शिलेदाराने उत्तर दिले, " त्याचे काही महत्त्व नाही. आपण तिकडे जाऊ. मी माझ्या प्रिय डल्सिनियाला भेटेन. ती चिखलाच्या भिंतीपलीकडे असो किंवा झोपडीच्या आत असो, मी फटीतून तिला पाहीन–बागेच्या कुंपणातून किंवा जाळीतून अथवा दुसऱ्या कशातूनही मी तिचे दर्शन घेईन. तिच्या तेजस्वी डोळ्यातील एखादा किरणही माझ्या डोळ्यात शिरताच माझ्या मनाला इतके ज्ञान प्राप्त होईल, माझ्या अंतःकरणात इतके धैर्य निर्माण होईल आणि माझ्या जीवनाचा प्रत्येक पैलू इतका शक्तिमान बनेल कीर शौर्य नि विवेक यामध्ये माझ्याशी स्पर्धा करण्यास कोणताही मर्त्य मानव समर्थ ठरणा, ठरणार नाही. " सँको म्हणाला, " खरे आहे, महाराज. पण त्या महिलेच्या डोळ्यातील सूर्य जेव्हा मला दिसला, तेव्हा त्यातून काही किरण निघत आहेत, असे मला मुळीच आढळले नाही. पण त्याचे कारण एवढेच असेल की, ती जे धान्य पाखडीत होती, त्याच्या भुशाचा ढग तिच्या मुद्रेभोवती जमा झाला असेल आणि त्यामुळे ती काहीशी धूसर दिसत असेल. "

तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " मूर्खा, तुझी बुद्धी धूसर आहे – दुष्ट आहे, हे

मी तुला पुनः सांगतो. अरे, माझी हृदय-स्वामिनी डल्सिनिया धान्य पाखडीत होती, हे तुझ्या मठ्ठ मेंदूतून कधीच बाहेर जाणार नाही का? तिच्या योग्यतेची माणसे असेच व्यायाम करीत असतात. त्यांचे करमणुकीचे प्रकार नेहमी उदात्त असतात. त्यांच्या कुळाला आणि प्रतिष्ठेला साजेशा मोठेपणाची झाक त्या प्रकारावर झळाळत असते. आपल्या कवीने अशा प्रसंगांचे वर्णन कसे केले आहे, हे तुला आठवत नाही का? टॅगस नदीच्या सुंदर प्रवाहातून आपले डोके वर काढून, चार अप्सरा आपल्या स्फटिकाच्या राजवाड्यात कोणकोणते उद्योग करीत होत्या, याची गगती त्या कवीने केलेली तुला माहीत नाही काय? त्या जल-कन्यका गवतावर बसून, रेशमाचे आणि जरतारीचे उंची भरतकाम करीत असत आणि त्यावर मोती बसवीत असत. त्यात त्यांचे जे विलक्षण कौशल्य दिसून येई, त्याचे कलात्मक वर्णन त्या प्रतिभासंपन्न कवीने केलेले तुला माहीत आहे ना? याचप्रकारे, माझी राजकन्या उद्योगात मग्न होती आणि तेव्हा ते दर्शन देऊन तिने तुला धन्य केले. परंतु कोणा हलकट पिशाच्च-विद्या-पारंगताने दुष्ट मत्सरभावाने तुझी दृष्टी गढूळ करून टाकली. त्यामुळे मला जे अत्यंत सुंदर नि उपकारक वाटते, ते तुला विविध कुरूप आकारात दिसू लागते. म्हणून मला अशी भीति वाटते की, माझ्या पराक्रमाचा जो इतिहास सध्या छापला जात आहे, असे म्हणतात, तो जर माझ्या वैभवाचा हितचिंतक नसेल आणि एखादा जादुगार असेल, तर त्याने खात्रीने पुष्कळ गोष्टी पक्षपाताने सांगितल्या असतील, एक सत्य घटना मांडून शंभर खोट्या गोष्टी दडपल्या असतील आणि माझे सारे जीवन विपर्यस्त स्वरुपात रंगविले असेल. खऱ्या इतिहासाच्या प्रवाहाला अनुरूप नसलेल्या आणि त्याच्या उद्देशाला पारख्या असलेल्या, अशा किती तरी भाकड कथा त्याने रचल्या असतील. मत्सर! मत्सर! सद्‌गुणांचा भक्षक असा कृमि-कीटक! असंख्य भानगडींचे भांडार! मित्रा सँको, कोणताही दुर्गुण घेतला तरी त्यात काही मजा असते. पण मत्सर हा नेहमी द्वेष, तिरस्कार आणि बेभान करणारा संताप यांनी डागळलेला असतो."

सँको म्हणाला, "माझे मत बरेचसे आपल्यासारखेच आहे. आपल्या जीवनाचा इतिहास आपला शेजारी कॅरास्को याने वाचला आहे, असे तो म्हणतो. त्या इतिहासात माझ्या गुणांचे मोठे स्तोम माजविलेले आहे. अच्छा! मी एक सच्चा माणूस आहे. मी जन्मल्यापासून जादुगाराविषयी एकही वाकडा शब्द कधी बोललो नाही आणि लोकांनी मत्सर करावा, अशी माझी परिस्थिती नाही. खरी गोष्ट अशी आहे की, मी थोडासा मत्सरी आहे. अधून-मधून मी खटखोड्या करीत असतो. पण तरीही लोक मला खट किंवा दुष्ट समजत नाहीत – मूर्ख मानतात. अशाच तऱ्हेने मी लहानपणापासून वाढत आलो आहे. (मी यहुदी लोकांचा भयंकर द्वेष करतो आणि पवित्र रोमन कॅथालिक चर्च जे जे सांगते, त्यावर दृढ श्रद्धा ठेवतो.) या धर्माशिवाय दुसरा कोणताही गुण माझ्या अंगी नसला, तरी या इतिहासकारांनी माझ्यावर दया दाखवावी आणि आपल्या ग्रंथात मला फारसे झोडपून काढू नये. त्यांनी आपल्या ग्रंथाच्या अखेरीस

एवढेच म्हणावे की, ' हा माणूस या जगात नागवा आला आणि तो नागवाच जाणार. ' त्यावर सँको संतुष्ट आहे. यात माझे नफा-नुकसान काहीच नाही. माझे नाव छापले गेले आणि पुढील पिढ्यांपुढे ठेवले गेले, म्हणजे बस्स ! मग माझ्याविषयी त्यांनी कितीही वाईटसाईट लिहिले, तरी मला त्याची पर्वा नाही. "

तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " तू जे बोललास, त्यामुळे मला एका गोष्टीची आठवण झाली. आपल्या काळातील एका सुप्रसिद्ध कवीने दरबारातील साऱ्या कारस्थानी स्त्रियावर अत्यंत शिवराळ व खोडसाळ असा एक टीकालेख लिहिला. त्या कुटिल स्त्रियांच्या यादीत एकीचे नाव गोवावे की नाही, याचा निश्चय न झाल्यामुळे त्याने ते नाव गाळले. पण गंमत ही की, त्या जंत्रीत आपले नाव नाही, असे पाहून तिला आपला उपमर्द झाला असे वाटले आणि तिने त्या कवीकडे जोराची तक्रार केली की, ' तुम्ही माझ्यामध्ये अशी कोणती उणीव पाहिली की, त्यामुळे त्या यादीतून तुम्ही माझे नाव गाळले ? आता तुम्ही आपला टीकालेख वाढवा आणि त्यात माझे नाव घाला. नाही तर मी तुम्हाला धारेवर धरीन. ' ग्रंथकाराने तिची आज्ञा मानली आणि तिचे वर्णन सूडबुद्धीने असे केले की, कोणाही स्त्रीची गावात कधी झाली नसेल, इतकी तिची बदनामी व्हावी. पण तरीही ती बेहद्द खूष झाली. अशीच दुसरी एक गोष्ट दायाना ( चंद्रदेवता ) मंदिराची आहे. जगातील सात आश्चर्यांपैकी एक असणारे हे मंदिर एका अज्ञात व्यक्तीने जाळून टाकले – केवळ आपले नाव अजरामर व्हावे म्हणून ! ते नाव, लेखी वा तोंडी, कधी कोणी उच्चारू नये, अशी धर्मगुरूची आज्ञा असतानाही, अजून इरोस्ट्रॅटस हे ते नाव असल्याचे प्रसिद्ध आहे. सम्राट पाचवा चार्लस आणि एक रोमन सरदार यांची एका विशिष्ट प्रसंगीची हकिगत अशीच आहे. एके काळी, पॅंथियन या नावाने संबोधिले जाणारे पण आता सुदैवाने ' सकल-संत-मंदिर ' म्हणून ओळखले जाणारे विख्यात मंदिर पाहण्याची त्या सम्राटाला फार इच्छा झाली. पाखंडी रोमन लोकांची तेवढीच एक इमारत शाबूत आहे. तिच्या महान निर्मात्यांच्या भव्यतेची व गौरवाची उत्तम कल्पना त्या इमारतीवरून येते. अर्ध्या नारिंगाचा आकार तिला देण्यात आला आहे. ती अत्यंत विस्तीर्ण आहे आणि फार देखणी आहे. मात्र एका खिडकीशिवाय दुसरीकडून कोठून प्रकाश येत नाही. पण ती खिडकी कसली ? छपरावरील ते एक वाटोळे भोकच आहे, असे म्हणणे योग्य ! तो सम्राट एका रोमन सरदाराला बरोबर घेऊन तेथे गेला आणि त्या भोकातून खाली पाहू लागला. त्या विशाल इमारतीचे खरे सौंदर्य सरदाराने सम्राटाला दाखविले. तेथून बाहेर पडल्यावर सरदार सम्राटाला म्हणतो, " पूज्य महाराज, हे सारे पहात असताना माझ्या डोक्यात हजार वेळा असा विचार आला की, मी आपल्याला मिठी मारावी आणि या मंदिराच्या माथ्यावरून आपल्यासह तळाशी उडी झोकून द्यावी म्हणजे माझे नाव अजरामर होईल."

ते ऐकून सम्राट म्हणाला, " तसे तू केले नाहीस म्हणून मी तुझे आभार मानतो. आपली निष्ठा अशा प्रकारे कसोटीस लावण्याची संधी यापुढे मी तुला कधीच

देणार नाही. म्हणून मी तुला माझ्यापासून कायमचे हद्दपार करीत आहे. " तसे करून सम्राटाने त्या सरदारावर थोडाफार कृपा–प्रसाद केला. म्हणून म्हणतो, सँको, कीर्तीची ही लालसा विलक्षण फसवी असते. नखशिखांत सशस्त्र असलेल्या होरॅटियसने वेगाने वाहणाऱ्या टायबर नदीत पुलावरून सरळ उडी का टाकली ? याचे कारण तुला माहीत आहे ? आग भडकलेल्या दरीमध्ये कर्टिसने उडी का झोकली ? म्यूटिसने आपला हात जाळून का घेतला ? सारे अपशकून होत असतानाही, सीझरने इटलीतील रुबिकॉन नदी पार करण्याचे का ठरविले ? आणि अलीकडील उदाहरण द्यावयाचे तर, अत्यंत सौजन्यशील कोर्टेझ याच्या आधिपत्याखाली बेडर स्पॅनियर्ड लोकांनी आपली जहाजे का बुडविली ? त्यांनी हे जग वारंवार जिंकून मोठा लौकिक मिळविला होता, पण त्या शिळ्या लौकिकाचा वीट येऊन, नव्या क्षेत्रातील विजयाचे वैभव प्रथमच भोगण्याचे त्यांनी ठरविले. अशी किती उदाहरणे सांगू ? लौकिकाची तहान आणि कीर्तीची लालसा तत्काळ तृप्त व्हावी अशी अपेक्षा सर्व मानवांना असते. ती कीर्ती म्हणजे आपल्या महान कार्यांची योग्य किंमत आहे आणि अक्षय्य मोबदला आहे, असे त्यांना वाटते. पण कीर्ती म्हणजे काय ? महत्–कृत्याची केवळ पोकळ सावली. सर्वभक्षक कालामुळे त्या कीर्तीचा आधार असणारे कार्य नष्ट होते आणि त्याबरोबरच कीर्तीही लुप्त होते. पण आपण कॅथॉलिक खिश्चन शिलेदार आहोत. तेव्हा आपण उच्च पारितोषिकाची आशा धरली पाहिजे – दिव्य नि शाश्वत अशा प्रांतातील पारितोषिक आपण मिळविले पाहिजे. त्या दिव्य लोकांमध्ये आपल्याला शाश्वत सन्मान आणि संपूर्ण सौख्य लाभावे, अशी अपेक्षा आपण धरावी. तेव्हा, प्रिय सँको, आपल्याला जर खिस्ती धर्माकडून पारितोषिक हवे असेल तर, आपण आपली कर्मे खिस्ती धर्माच्या नियमानुसार केली पाहिजेत. आपल्या शूर शत्रूंच्या अंतःकरणातील गर्व आणि उद्धटपणा आपण ठार केला पाहिजे. पण आपले महान रिपु आपल्या अंतःकरणातच असतात – आणि त्यांच्याशीच आपण मुख्यत्वे लढा दिला पाहिजे. आपल्या अंतःकरणातील मत्सराला आपण औदार्याने आणि उदात्त स्वभावाने जिंकले पाहिजे, क्रोधाला शांत व स्थिर चित्ताने आटोक्यात आणले पाहिजे, दक्षता आणि संयम यांनी आपण आपला उच्छृंखलपणा आणि बेहोषपणा यांना आळा घातला पाहिजे, आपल्या कल्पनेतील हृदयस्वामिनीशी अढळ निष्ठा बाळगून आपण विषयवासना पराभूत केली पाहिजे, आणि साऱ्या विश्वात अथक प्रवास करून आपण आपली सुस्ती घालविली पाहिजे. अशा प्रवासात आपण लष्करी लौकिक व धार्मिक मान मिळविण्याची संधी शोधली पाहिजे. सँको, शाश्वत कीर्तीचा हाच मार्ग आहे – सामान्य आणि थोर लौकिकाचाही मार्ग हाच आहे. "

सँकोने उत्तर दिले, " महाराज, आपण जे काही सांगितले त्याचा कणन् कण मी समजलो, पण आताच माझ्या डोक्यात एक शंका आली आहे, ती आपण कृपया दूर कराल काय ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " बोल बोल, मी तुझे समाधान करण्याचा प्रयत्न करीन. " सँकोने विचारले, " हे सारे ज्युलियस, हे सारे ऑगस्टस् आणि इतर

सारे सुप्रसिद्ध शिलेदार, यांच्या कथा आपण सांगता. ते सारे मेले आहेत, तर मग आता ते कोठे आहेत ? " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " सारे पाखंडी लोक नरकात पडले आहेत, यात शंका नाही. जे ख्रिस्ती लोक आपल्या धर्मानुसार वागले, ते स्वर्गात आहेत किंवा शुद्धीकरणाच्या अवस्थेत आहेत. " तेव्हा सँको म्हणाला, " तसे असेल तर ठीकच आहे. या थोरामोठ्यांच्या थडग्याविषयी मला काही माहिती सांगा. त्यांच्यापुढे अद्यापि चांदीचे दिवे पेटलेले आहेत काय ? आणि त्यांच्या प्रार्थना-स्थानाच्या भिंतींवर कुबड्या, पडदे, केसाचे जुने टोप, मेणाचे पाय किंवा डोळे टांगलेले आहेत काय ? नसतील तर त्या भिंतींवर दुसरे काय आहे ? " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मृत पाखंडी लोकांची स्मारके बहुतकरून शिल्पकलेचे शोभिवंत नमुने होते. ज्युलियस सीझरची रक्षा एका मनोऱ्याच्या कळसावर ठेवलेली होती. हा मनोरा अत्यंत प्रचंड असला तरी एकाच दगडाचा बनविलेला होता. त्याला आता ॲगूल्या डि सॅन पीट्रो-सेंट पीटर्स नीडल् म्हणतात. बादशहा ॲड्रियनची दफनभूमि, एखाद्या खेडेगावाइतकी विस्तीर्ण होती. तिला मोल्स ॲड्रियानी-आता रोममधील सेंट ॲंजेलोचा किल्ला-म्हणतात. राणी आर्टे-मिसियाने आपला पती मौसोलस याला एका भव्य व विचित्र स्तंभात पुरले होते. त्याचे स्मारक म्हणजे जगातील सात आश्चर्यांपैकी एक आहे, असा त्याचा लौकिक होता. परंतु यापैकी एकाही स्मारकावर-किंवा पाखंड्यांच्या दुसऱ्या एकाही दफनभूमीवर-एकही प्रेत-वस्त्र नव्हते किंवा दफन केलेली ही माणसे साधु-संत आहेत, असे सूचित करणारी एकही खूण तेथे नव्हती. "

सँको म्हणाला, " महाराज, एथपर्यंत सारे ठीक आहे. आता मला कृपा करून एवढेच सांगा की, मेलेल्या माणसाला जिवंत करणे आणि एखाद्या राक्षसाला ठार मारणे यामध्ये मोठा चमत्कार कोणता ? " डॉन क्विक्झोट म्हणाले, " उत्तर उघड आहे. मृत माणसाला उठविणे, हा खरोखर मोठा चमत्कार होय. " सँको म्हणाला, " मग मालक, मी आपल्याला पेचात धरले आहे. कारण, जो मेलेल्याला उठवितो, तो आंधळ्याला दृष्टी देतो, पांगळ्याला चालावयास लावतो आणि आजारी माणसाला बरे करतो. त्याच्या दफनभूमीवर रात्रंदिवस दिवे जळत असतात आणि त्याच्या पवित्र भूमीवर यात्रेकरूंची गर्दी लोटत असते. ते त्याच्या अवशेषांची पूजा, गुडघे टेकून, करतात. अशा माणसाला या लोकी व परलोकी इतकी कीर्ती मिळते की, अधर्मी सम्राटांना किंवा सरदारांना ती कधीच मिळाली नसेल किंवा पुढेही कधी मिळणार नाही. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मला मान्य आहे. " सँको म्हणाला, " फार छान. मी आपल्या सांगातीच राहीन. ही कीर्ती, या देणग्या, हे हक्क, हे सुख-सोहळे आणि तुम्ही काय म्हणाल ते सारे या साधु-संतांच्या देहांना अन् अवशेषांना मिळतात. आपल्या ' पवित्र माते 'च्या संमतीने, त्यांना दिवे काय अन् मशाली काय ? प्रेत-वस्त्र काय अन् कुबड्या काय, चित्रे आणि त्यांची मस्तके, त्यांचे पाय, त्यांचे डोळे-छेः ! छेः : एका प्रभूलाच माहीत ! त्यांच्या-विषयीच्या कोणत्याही वस्तूने जनतेची भक्ती उचंबळून येते आणि त्यांच्या धार्मिकतेचा

डंका सर्वत्र वाजत राहतो. संतांचे देह किंवा त्यांचे अवशेष राजे लोक आपल्या स्वतःच्या खांद्यावरून वाहून नेतील, त्यांच्या हाडांच्या तुकड्यांचे चुंबन घेतील आणि त्यांची समाधि-स्थाने नि प्रार्थना-मंदिरे सुशोभित करण्यासाठी कितीही पैसा खर्च करण्यास मागेपुढे पाहणार नाहीत," हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "म्हणायचे आहे काय तुला ? या सर्वांवरून तू कोणते अनुमान करतोस ?" तेव्हा सँको म्हणाला, "महाराज, याचा अर्थ उघड आहे. आपण कोणालाही हां हां म्हणता साधू बनवू शकतो. मग तुम्ही म्हणता, तो मान तत्काळ नि सहज मिळतो. कालचीच गोष्ट-नाही, केव्हाची, हे मला सांगता येत नाही पण फार पूर्वीची नाही, हे मी खात्रीने सांगतो. -दोन भिक्षु गरीब होते-अनवाणी पायांनी चालले होते, त्यांना लोक साधू मानू लागले. त्यांनी आपल्या शरीरावर नियंत्रण ठेवण्यासाठी, आपल्या कमरेभोवती, कमरपट्ट्याप्रमाणे, लोखंडी साखळी बांधली होती. तिचे चुंबन घेण्यासाठी लोकांची किती तोबा गर्दी उडाली, याची कल्पना तुम्हाला करता येणार नाही. आपले सार्वभौम राजेसाहेब-देव त्याना दीर्घायुष्य देवो ! -ह्यांच्या शस्त्रागारामध्ये ऑर्लॅण्डोच्या समशेरीला जो मान आहे, त्यापेक्षा अधिक सन्मानाने त्या भिक्षूंची पूजा केली जाते, असे मी ठामपणे सांगतो. म्हणून, मला वाटते की, शूर शिलेदार होण्यापेक्षा भिकारी भिक्षु होणे चांगले. राक्षसांना, पिशाच्चांना आणि विषारी सर्पांना दोन हजारवेळा भाल्याने भोसकण्यापेक्षा सदिच्छेने आणि मनापासून दहा-वीस फटके खाऊन स्वर्ग लौकर मिळेल."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "हे सारे अगदी खरे आहे. पण, बाबारे, सारी माणसे भिक्षू होऊ शकत नाहीत. चिरंतन आनंदाच्या उच्च पदी आरूढ होण्यासाठी आपल्याला ईश्वराने निरनिराळे मार्ग आखून दिलेले आहेत. शिलेदारी ही एक धर्म-संस्था आहे आणि स्वर्गात साधु-संतांच्या मेळाव्यामध्ये शिलेदाराना स्थान मिळते." तेव्हा सँको म्हणाला, "पण महाराज, मी असे ऐकले आहे की, जगात शिलेदारापेक्षा भिक्षू अधिक आहेत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "याचे कारण शिलेदारांपेक्षा भिक्षूंची संख्या मोठी आहे." सँकोने विचारले, "पण शिलेदारही संख्येने पुष्कळ आहेत ना ?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "आहेत. पण त्या नावाला शोभतील, असे फारच थोडे आहेत."

असे संवाद करीत करीत, शिलेदाराने व त्याच्या शागीर्दाने ती रात्र आणि दुसरा सबंध दिवस घालविला. आपले वैशिष्ट्य दाखवण्यासारखी एकही संधी त्यांना मिळाली नाही. त्यामुळे डॉन क्विक्झोट अत्यंत चिंतातुर झाले. शेवटी दुसरे दिवशी सायंकाळी त्यांच्या नजरेस टोबोसोची सुंदर नगरी पडली. त्यामुळे शिलेदाराच्या वृत्ती विलक्षण उफाळून आल्या. पण त्यांच्या नोकरावर त्याचा अगदी विपरीत परिणाम झाला. कारण आपल्या धन्याप्रमाणेच त्यालाही, डल्सिनिया कोठे राहते, ते घर माहीत नव्हते. म्हणून तिला पाहीपर्यंत एकजण वेडा झाला आणि दुसरा अत्यंत दुःखी व बेचैन झाला. कारण

सँकोने तिला कधी पाहिलेच नव्हते. आपल्या धन्याने आपल्याला टोबोसोला पाठविले, तर आपण काय करावे, हे त्याला माहीत नव्हते. तथापि डॉन क्विक्झोट त्या शहरात दिवसा प्रवेश करणार नव्हते. म्हणून त्या शहरापासून जवळच असणाऱ्या ओक वृक्षांच्या राईत त्या दोघांनी ती संध्याकाळ घालविली. संकल्पित क्षण येताच, ते दोघे त्या शहरात शिरले. तेथे त्यांना संकटाना तोंड द्यावे लागले.



## प्रकरण ९

# वाचल्यानंतरच तुम्हाला कळतील, अशा गोष्टींचा वृत्तांत

कृष्ण-रजनीने आपला अर्धा मार्ग आक्रमिला, तेव्हा डॉन क्विक्झोट व सँको टेकडीवरून खाली उतरले आणि टोबोसो शहरात शिरले. त्यावेळी सर्व शहरावर गाढ शांततेचे साम्राज्य पसरलेले होते. तेथील सर्व नागरिक गाढ झोपी गेलेले होते आणि त्यांनी आपापले देह यथेच्छ ताणून दिले होते. रात्रीचा काळोख काहीसा उजळ होता. तो दाट अंधाराचा असता तर बरे होते म्हणजे आपला आणि आपल्या धन्याचा मूर्खपणा झाकून गेला असता असे सँकोला वाटले. तेथील सार्वत्रिक शांततेचा भंग कशानेही होत नव्हता. फक्त अधूनमधून कुत्री भुंकत होती. त्या आवाजामुळे डॉन क्विक्झोट यांचे कान—आणि त्याहीपेक्षा बिचाऱ्या सँकोचे हृदय—त्रस्त होत होते. केव्हा केव्हा एखादे गाढव ओरडे, डुकरे डुरकत होती आणि मांजरे म्यांव म्यांव करीत होती. या सर्व आवाजांच्या कर्णकटु मिश्रणाला रात्रीच्या स्तब्धतेमुळे व शांततेमुळे उठाव मिळत होता. त्यामुळे त्या झपाटलेल्या वीरपुरुषाच्या मस्तकात हजारो अशुभ कल्पनांचे तरंग उठत होते. तथापि आपल्या चाकराकडे वळून क्विक्झोट म्हणाले, " प्रिय सँको, डल्सीनियाच्या राजवाड्याचा माग मला दाखव. कदाचित् ती अजून जागी असल्याचे आपल्याला आढळेल. " सँको ओरडला, " भलतेच काही तरी ! कोणता राजवाडा आपण म्हणता ? मी जेव्हा त्यांना पाहिले तेव्हा त्या एका क्षुद्र नि क्षुल्लक खाटेवर बसलेल्या होत्या. " त्यावर शिलेदारसाहेबांनी उत्तर दिले, " अरे, त्यावेळी ती आपल्या सख्यांशी गुजगोष्टी करण्यासाठी राजवाड्याच्या एखाद्या कोपऱ्यात येऊन बसली असेल. थोर थोर महिलांचा आणि राजकन्यांचा असा शिरस्ताच आहे. " सँको म्हणाला, " ठीक, ठीक. माझी इच्छा असो वा नसो, तो राजवाडाच असला पाहिजे ! पण, महाराज, राजवाड्याचे दरवाजे रात्रीच्या या वेळी उघडे असतील, असे आपल्याला वाटते काय ? किंवा ते दरवाजे ठोठावण्यास ही वेळ आपल्याला योग्य वाटते काय ? आपल्या ठोठावण्याने सारे घर उठणार नाही का ? आणि सारे शहर भयभीत होणार नाही का ? आपण काय वेश्यागृहाकडे चाललो आहे ? रात्रीच्या कोणत्याही क्षणी कोणाच्याही दारावर थाप मारावी आणि आपल्या मर्जीस येईल तेव्हा लोकांना उठवावे, असे करणारे आपण आहो काय ? "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " प्रथम आपण राजवाडा शोधून काढू या, मग आपण

काय करावे, हे मी तुला सांगेन. पण थांब, ते पहा, माझे डोळे मला फसवीत नसतील तर, ती उंच नि उदास अशी जी इमारत मला पलीकडे दिसत आहे, ती डल्सीनियाचा राजवाडा असला पाहिजे. '' सँको म्हणाला, " अच्छा, आगे बढो ! ती इमारत मी माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिली आणि माझ्या दहा बोटांनी स्पर्शिली तरी माझा विश्वास बसणार नाही–जसा, या रात्रीच्या वेळी ऐन मध्यान्ह आहे, यावर बसणार नाही. "

शिलेदारजी पुढे चालले. सुमारे दोनशे पावले घोड्यावरून ते दौडत गेले आणि शेवटी त्यांना जो डल्सीनियाचा राजवाडा वाटला, त्या इमारतीपाशी जाऊन थडकले. पण ते होते त्या शहरातील मोठे प्रार्थनामंदिर ! तेव्हा क्विक्झोट म्हणाले, "सँको, आपण चुकलो. हे प्रार्थना मंदिर आहे असे मला दिसते. " सँको म्हणाला, " होय महाराज, मलाही तसेच दिसते. येथे आपल्याला आपली थडगी आढळली नाहीत, ही प्रभूची कृपा. रात्रीच्या या समयी प्रार्थना–मंदिराच्या अंगणात येणे हा अपशकुनच होय. मी जर चुकत नसेन, तर मी आपल्याला पूर्वीच सांगितले होते की, या बाईचे घर एका लहानशा बोळात आहे––हमरस्त्यावर नाही. " तेव्हा डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, " धिक्कार असो तुझ्या विकृत मेंदूचा ! अरे मूर्खा, हमरस्ता नसलेल्या व पुढे वाट बंद असलेल्या बोळात राजप्रासाद बांधलेले तू कधी पाहिले आहेस काय ? " सँको म्हणाला, " महाराज, प्रत्येक देशाची निरनिराळी तऱ्हा असते. आपल्या माहिती-प्रमाणे, टोबोसोमध्ये आंधळ्या बोळात मोठमोठी घरे आणि राजवाडे असतीलही कदाचित्. म्हणून, महाराजांनी मला गल्ली–बोळात येरझारा घालण्यासाठी मोकळे सोडावे. कोणी सांगावे, एखाद्या कोना–कोपऱ्यात आपल्याला राजवाडा आढळेलहि. अशी मौजेची सहल करण्यास आणि शरीराचा असा खुळखुळा करण्यास सैतानानेच मला प्रेरणा दिली असेल. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, माझ्या स्वामिनीचे बाबतीत अधिक आदराने बोलत जा. मजेत आणि शहाणपणाने वाग. उगाच कुऱ्हाडीच्या डोक्यामागोमाग दांडेही फेकू नको. " हे ऐकून सँको कळवळून म्हणाला, " महाराज, माझ्यावर दया दाखवा. अहो, आपल्या स्वामिनीचे निवासस्थान मी माझ्या आयुष्यात एकदाच पाहिलेले आहे. असे असताना ते तत्काळ शोधून काढण्याच्या कामगिरीवर आपण जर मला पाठविले, तर मला वेड लागणार नाही काय ? एवढेच नव्हे तर, आपण स्वतः जे घर हजार वेळा पाहिले असेल, ते आता आपणास सापडत नसताना या मध्यरात्रीच्या वेळी मी ते कसे शोधून काढणार ?" तेव्हा क्विक्झोट म्हणाले, " तू मला भयंकर संताप आणीत आहेस. अरे पाखंड्या, ऐक. मी त्या अद्वितीय देवतेला–– डल्सीनियाला– कधी पाहिले नाही ! की तिच्या प्रासादाच्या दारातून कधी आत गेलो नाही, हे मी तुला हजार वेळा सांगितले नाही काय ? केवळ सांगोवांगी वर्णन ऐकून आणि तिच्या सौंदर्याची नि अलौकिक सद्गुणांची महान ख्याती ऐकून, माझे तिच्यावर प्रेम बसले आहे. " तेव्हा सँको म्हणतो, " आता आपण जे बोलला, ते मी ऐकले आहे. आपण तिला कधीच पाहिले नाही, असे आपण सांगता, तर मलाही असे सांगणे

अवश्य वाटते, मीही तिला कधी पाहिले नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अशक्य! अशक्य!! मी जेव्हा तुला माझे पत्र घेऊन तिच्याकडे पाठविले, तेव्हा त्या पत्राचे उत्तर तू आणलेस, आणि मला सांगितलेस की, गहू पाखडताना तिला मी पाहिले." सँको उत्तरला, "त्यात काय आहे? आपल्याला स्पष्टच सांगावयाचे तर, मीसुद्धा तिला सांगोवांगीच पाहिले आहे. तिचे जे उत्तर मी आपल्याला आणून दिले, तेही इतर गोष्टी-प्रमाणेच ऐकीव माहितीवर आधारलेले होते. चंद्रावरचा माणूस मला जितका माहीत आहे, तितकीच लेडी डल्सीनिया माहीत आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे सँको, कोणत्याही गोष्टीला काळ–वेळ पाहावी लागते. अवेळी केलेली चेष्टा नेहमी दुःखदायक ठरते. अरे, तिला मी कधी पाहिले नाही आणि त्या माझ्या जीवीच्या जिवलग प्रेयसीशी कधी संभाषण केले नाही, असे मी बोललो, म्हणून तूही तसेच बोलून खेळखंडोबा करावास काय? याच्या उलट घडल्याचे तुला पक्के माहीत आहे."

येथे त्यांच्या संवादात खंड पडला. कारण एक माणूस दोन खेचरे घेऊन त्यांच्याजवळून चालत होता. ती खेचरे नांगर ओढीत नेत होती. त्यामुळे आवाज होत होता. त्यावरून या दोघांनी असा तर्क केला की, गावातील कोणी तरी मजूर आपल्या शेतावर, दिवस उजाडण्यापूर्वी, चालला असावा. वस्तुस्थिती तशीच होती. रोन्सेसव्हॅले येथे फ्रेंच लोकांचा जो पराभव झाला, त्यावरील एक शोक–गीत गात तो चालला होता.

फरेंच–जनांनो! दुःख करा रे
शोकाचा तो दिन मनी धरा रे!

त्या मजुराचे ते गाणे ऐकून, डॉन॰क्विक्झोट म्हणाले, "सँको, हा शेतकरी जे गातो, ते तू ऐकतोस ना? आज रात्री आपल्याला जर उत्तम विजय मिळणार असेल, तर त्यासाठी मी मरावयास तयार आहे." तेव्हा सँको म्हणाला, "मीदेखील. पण रोन्सेसव्हॅले येथील पराभवाचे आपल्याला काय? 'कॉली माझ्या गायी' हे गीत त्याने गायिले काय आणि आताचे हे गीत गायिले काय–दोहोंचा आपल्याशी सारखाच संबंध. त्यामुळे आपण जलदीने जाणार नाही की मंदपणे जाणार नाही."

हे बोलणे होईपर्यंत तो नांगऱ्या त्यांचेजवळ येऊन ठेपला. त्याला उद्देशून डॉन क्विक्झोट म्हणाले, "अभिवादन, मित्रा. तू आम्हाला टोबोसोची देवता डल्सिनिया–या अद्वितीय राजकन्येचा राजवाडा कोठे आहे, हे सांगशील काय?" तेव्हा तो म्हणाला, "महाराज, मी नवखा आहे–आणि या शहरात नुकताच आलेलो आहे. एका सधन शेतकऱ्याचा नांगर हाकणारा मजूर मी आहे. पण पलीकडे एक पाद्री आणि स्मशानातला कामगार राहतात. त्यांच्याजवळ शहरातील सर्व लोकांची यादी आहे. तेव्हा ते त्या राजकन्येची काही माहिती आपल्याला देऊ शकतील. पण माझा तर्क असा आहे की, येथे एकही राजकन्या रहात नाही, तथापि या शहरात सभ्य लोकांची मोठी वस्ती आहे. त्यांच्यापैकी प्रत्येकाच्या घरी एकएक राजकन्या असेल असे मी मानतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा, मी त्या लोकांकडे चौकशी करीन आणि त्या राजकन्येचा

शोध लावीन. " मजूर म्हणाला, " मालक, अगदी तसेच होईल-आपण म्हणता तसेच घडेल. म्हणून जलदी करा. आता तांबडे फुटले आहे." एवढे बोलून आणि आपल्या खेचरांना इषारा देऊन तो पुढे चालू लागला-आणखी प्रश्नांची वाट पहात तो थांबला नाही.

आपला धनी गोंधळलेला आहे, पूर्णपणे संतुष्ट झालेला नाही, हे पाहून सँको म्हणाला, " सूर्य वरवर येत आहे. अशा वेळी आपण येथे थांबणे, रस्त्यात ऊन खात बसणे आणि लोकांनी आपल्याकडे टक लावून पहात राहणे, हे आपल्याला शोभादायक होणार नाही असे मला वाटते. आपण शहरातून निसटून जवळपासच्या जंगलात जाऊन राहणे चांगले. नंतर मी परत येईन आणि आपल्या स्वामिनीचे घर, किल्ला किंवा राजवाडा हुडकून काढण्यासाठी शहराचा कोपरा न् कोपरा तपासीन. इतके करूनही तो राजवाडा मला सापडला नाही असे होणार नाही. तो सापडला म्हणजे मी बाईसाहेबांशी बोलेन आणि त्यांना सांगेन, ' आमचे शिलेदारसाहेब जवळच आहेत आणि आपल्याशी खाजगी बोलण्यासाठी आपल्याकडे येणार आहेत. त्याकरिता आपल्या आज्ञेची नि आदेशाची वाट ते पहात आहेत. '' तेव्हा शिलेदारसाहेब म्हणाले, " प्रिय सँको, तू छान बोललास-थोड्या शब्दात हजारो वाक्यांचा आशय भरलास. तुझा सल्ला पसंत आहे. तो मी प्रेमाने स्वीकारतो. बेटा, चल, आपण येथून निघू या आणि जवळपासच्या वन-राईत सोयीस्कर असे विश्रांतीचे स्थान पाहू या. नंतर तू म्हणतोस त्याप्रमाणे तू परत ये आणि माझ्या हृदय-स्वामिनीला भेटून माझा संदेश तिच्या कानी घाल. ती अत्यंत विवेकाने आणि सौजन्याने माझ्यावर हजारो गोष्टींचा कृपा-वर्षाव करील. अत्यंत आश्चर्यकारक वाटणाऱ्या वस्तूंचा लाभ मला तेव्हा होईल. "

आपल्या धन्याला शहराबाहेर काढीपर्यंत सँकोच्या मनाला सुया टोचत होत्या. डलसिनियाने आपल्या धन्याच्या पत्राला उत्तर दिले, वगैरे जो वृत्तांत त्याने सीएरा मोरेना येथे क्विक्झोट यांना निवेदन केला होता, त्याचा खोटेपणा आपल्या धन्याच्या ध्यानी येईल, अशी भीति त्याला वाटत होती. म्हणून ते दोघे तेथून जलदीने निघाले आणि शहरापासून दोन मैलांवर असणाऱ्या एका जंगलात तातडतोब जाऊन पोहोचले. तेथे डॉन क्विक्झोट लपून राहिले आणि सँकोला डलसिनियाकडे रवाना करण्यात आले. त्या वाटाघाटीत काही अपघात घडले. त्याकडे नव्याने लक्ष देणे जरूर आहे — आणि म्हणून, नवे प्रकरणही जरूर आहे.



## प्रकरण १०

# लेडी डल्सिनियावर मोहिनी घालण्याचा मार्ग सँकोने धूर्तपणाने शोधून काढला. त्याचे वर्णन आणि इतरही हास्यास्पद उतारे.

[ या प्रकरणातील हकिगत सांगण्यापर्यंत या महत्त्वाच्या इतिहास-ग्रंथाचा लेखक येऊन ठेपला आहे. म्हणून, त्याने असे म्हटले आहे की, " ही सारी हकिगत विस्मृतीच्या खड्ड्यात मी आनंदाने गाडून टाकली असती. कारण तिच्यावर वाचकांचा विश्वास बसेल अशी मला मुळीच आशा नाही. या प्रकरणात डॉन क्विक्झोट यांच्या मूर्खपणाने इतकी उंच उडी मारली आहे की, कोणाच्याही विश्वास-बुद्धीला दोन-चार धक्के देऊन त्यांनी चीत केले आहे. तथापि ही हकिगत कितीही अविश्वसनीय असली तरी, मी प्रत्येक घटना तपशीलवार लिहिली आहे— ती घटना जशी घडली तशीच लिहिली आहे. साऱ्या इतिहासात कणभर सत्याचीही भर मी घातली नाही किंवा कणभर सत्यही कमी केले नाही. सत्याचा भंग केला म्हणून माझ्यावर कोणी आरोप लादू शकणार नाही. या माझ्या सत्यनिष्ठेची कोणीही प्रशंसाच करील, अशी मला आशा आहे. कारण सत्य कोणाला अपाय करीत नाही- थोडेफार दुःख कमी करते. तेल जसे पाण्यावर तरंगते त्याप्रमाणे सत्य हे नेहमी असत्याच्या वरच राहते. " अशी प्रस्तावना करून या इतिहासकाराने आपले कथा-कथन पुढीलप्रमाणे चालविले आहे— ]

डॉन क्विक्झोट त्या अरण्यात किंवा जंगलात – खरे म्हणजे, भव्य टोबोसा-नगरीच्या आसमंतातील ओक वृक्षाच्या राईत – विश्रांती घेत होते. त्यांनी सँकोला शहरात परत जाण्याचा हुकूम सोडला आणि बजावले, " त्या देवतेचे दर्शन झाल्याशिवाय परत येऊ नकोस आणि माझ्यासमोर उभा राहू नकोस. दर्शन झाल्यावर तू त्या स्वामिनीची अशी प्रार्थना कर की, ' आपला बंदा गुलाम असलेला हा शिलेदार आपले दर्शन आणि आपला आशीर्वाद घेऊ इच्छितो. आपल्या आशीर्वादाच्या बळावर, आपण आपल्या सर्व आक्रमणामध्ये आणि भयप्रद प्रयत्नामध्ये नि धाडसामध्ये मोठे यश मिळविण्याची त्याला आशा आहे. " सँकोने हे काम आपल्या शिरावर घेतले आणि आपल्या धन्याला अभिवचन दिले, " आपल्या पूर्वीच्या संदेशाप्रमाणेच या आदेशाचे कार्यही मी तडीस नेईन. "

शिलेदारसाहेब म्हणाले, " जा, बाळा, जा ! त्या तेजोनिधी सौंदर्य – सूर्यासन्निध तू जेव्हा जाशील, तेव्हा त्याच्या तेजाने दिपून न जाण्याची काळजी घे. विश्वातील साऱ्या सेवकांपेक्षा आज तू अधिक सुखी आहेस. अरे भाग्यवंता, आज तुझे तेथे जे स्वागत

होईल ते नीट लक्षात घे आणि स्मृतीमध्ये कोरून ठेव. तू माझा संदेश त्या माझ्या स्वामिनीला सादर केल्यानंतर तिच्या गालावरील रंग कसकसा बदलतो हे पाहा. माझे नाव ऐकताच तिच्या नजरेत प्रेमभावना उचंबळून येते की चिंता ओसंडते हे नीट पाहा. आपल्या सत्तेला शोभेल, अशा भपकेबाज सिंहासनावर बसलेली ती तुझ्या नजरेस जर पडली तर, तिचे मन अस्वस्थ आहे का, ते पाहा. आणि जर ती उभी असेल तर थोडा वेळ या पायावर, तर थोडा वेळ दुसऱ्या पायावर ती उभी राहते का, याकडे लक्ष दे. ती तुला जे उत्तर देईल, ते ती तीन–चारदा उच्चारते काय ? त्यातील प्रेमळ शब्द काढून कठोर शब्द घालते काय ? अथवा कठोर शब्द काढून प्रेमळ शब्द घालते काय ? हे सारे तू बारकाईने निरखून पाहा. तिच्या मस्तकावरील केश–कलाप चापून–चोपून सुव्यवस्थितपणे बसलेला असला, तरी ती आपले केस सावरण्याचा नि नीट करण्याचा प्रयत्न करते काय ? हे न्याहाळून पाहा. सारांश, तिची सारी कृत्ये, तिची प्रत्येक हाल-चाल, तिचा प्रत्येक हावभाव, तू लक्षपूर्वक पाहा. कारण या साऱ्या गोष्टींचे तू जे यथार्थ वर्णन करशील त्यावरून मी तिच्या अंतरीचे गूज बरोबर ताडीन आणि माझ्या प्रणया-संबंधी योग्य ते अनुमान मी बांधीन. कारण सँको, प्रेमिकांच्या बाह्य हालचालींवरून त्यांच्या अंतरंगीच्या भावनांचे यथार्थ दर्शन होते, हे जर तुला आतापर्यंत माहीत नसले, तर ते मी तुला सांगितले पाहिजे. प्रणयाच्या व्यवहारामध्ये या बाह्य क्रियांवरून अचूक अनुमाने बांधता येतात. जा, माझ्या विश्वासू सेवका, जा. माझे नसले तरी तुझे शुभ ग्रहयोग या कार्यात तुला लाभदायक ठरोत आणि तुला विजयश्री माळ घालो. या ओसाड अरण्यात, आशा आणि भीती यांच्या आंदोलनात सापडून जे यश मिळण्याची मी अपेक्षा धरतो, त्याहून फार उज्ज्वल यश तुला लाभो. ”

सँको म्हणाला, “ निघालो मी महाराज ! डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच मी परत येतो. मी येईपर्यंत आपण आनंदात असावे, अशी माझी प्रार्थना आहे. आपले मुठीएवढे हृदय आपण प्रसन्न ठेवा ! खचून जाऊ नका असे माझे सांगणे आहे. भित्र्या हृदयांना सुंदरी कधीच लाभत नाहीत, हे सुभाषित ध्यानी धरा. टांगायला आकडाच नसेल तेथे डुकराचे सुके मांस टांगलेले कोठून आढळणार ? आपल्याला मुळीच कल्पना नसते, अशा वेळी झुडपातून एखादा ससा टुण्दिशी उडी मारून बाहेर येतो. हे मी आपल्याला एवढ्याकरता सांगत आहे की, काल रात्री आपल्याला आपल्या स्वामिनीचा किल्ला सापडला नाही, तरी आता दिवस असल्यामुळे, मला कल्पना नाही अशा ठिकाणीच आज तो मला आढळेल. एकदा का तो मला आढळला की, मी एकटा तिच्याशी सारे बोलणे करीन. ” ते ऐकून शिलेदारसाहेब म्हणाले, “ छान, सँको, सुभाषिते आणि म्हणी यांचा उपयोग करण्याची तुझी बुद्धी खरोखर अलौकिक आहे. ईश्वराने तुला तुझ्या कार्यात अधिकाधिक यश द्यावे ! ” हे शब्द कानावर पडताच सँकोने पाठ वळविली आणि आपल्या डॅपल गर्दभराजाला पुढे चलण्याचा इशारा दिला. त्यावेळी डॉन घोड्या-वर बसलेले होते आणि आपल्या भाल्यावर टेकलेले होते आणि रिकिबीत पाय ठेवून

स्वस्थ होते. त्यांच्या डोक्यात खेदाच्या व गोंधळाच्या कल्पनांनी गर्दी केली होती, त्यांचा आपण निरोप घेऊ या आणि सँकोबरोबर जाऊ या. त्याचेही मन त्याच्या धन्या-प्रमाणेच बेचैन झालेले होते.

त्या राईतून तो बाहेर पडताच एका बाजूला वळला आणि आपल्या धन्याच्य दृष्टीआड झाला. तेव्हा तो गाढवावरून खाली उतरला आणि एका झाडाच्या पायथ्याशी स्वस्थ बसला. नंतर तो आपल्या मनाशी पुढीलप्रमाणे सुख-संवाद करू लागला—

" मित्रा सँको, आपली स्वारी कोठे चालली आहे ? असे मी तुला विचारतो. तुझे गाढव हरवले आहे, ते शोधण्यासाठी तू निघाला आहेस काय ? छेः ! तसे नसेल तर तू कोणाचा पिछा पुरवीत आहेस ? तू हे समजून घे की, मी नसलेल्या गोष्टीच्या शोधार्थ–एका राजकन्येच्या शोधार्थ–निघालो आहे. तिच्या ठायी म्हणे सौंदर्याचा सूर्य विलसत आहे–नंदनवन खडे आहे. अरे मित्रा, हे सारे मला कोठे गवसेल, असे तुला वाटते ? कोठे ? अर्थात, टोबोसोच्या महा–नगरीत. पण महाशय, आपल्याला या कामगिरीवर कोणी धाडले ? खरेच, या कामगिरीवर मला कोणी धाडले ? हा प्रश्नच आहे. दुसरे कोण असणार ? अन्यायाचे निवारण करणारा, भुकेलेल्याला पाणी देणारा आणि तहानेलेल्याला अन्न देणारा, मांचा येथील अत्यंत सुविख्यात डॉन क्विक्झोट यानेच मला या कामगिरीवर पाठवले. छान ! फारच छान, महाराज ! पण ती कोठे राहते, हे तुला माहीत आहे काय ? मुळीच नाही. पण माझा धनी मला सांगतो, ती राजाच्या राजवाड्यात किंवा राजेशाही किल्ल्यात रहात असते. पण तिला तू आतापर्यंत कधी पाहिले आहेस काय ? छेः ! मुळीच नाही. मीच काय ? पण माझ्या धन्यानेही आपल्या साऱ्या आयुष्यात तिच्यावर कधी नजर टाकली नाही. पण सँको, टोबोसोच्या लोकांना जर कळले की, आपल्या राजकन्येला फुसलावून पळवून नेण्यासाठी आणि इतर स्त्रियांना भीतीने धावपळ करावयास लावण्यासाठी तू आला आहेस, तर ते तुझी हड्डी चांगलीच नरम करतील आणि तुझी एकही बरगडी शाबूत ठेवणार नाहीत. तसे त्यानी केले तर अगदी योग्य केले, असे तुला वाटणार नाही काय ? नाही. त्यांचे काही फारसे चुकले आहे, असे मला वाटणार नाही. तरी माझ्या मनात येईल की, मी केवळ एक नोकर आहे–दुसऱ्याच्या कामगिरीवर मला दुसऱ्याने पाठविलेले आहे आणि म्हणून, त्यात माझा काहीही दोष नाही, असा विचार टोबोसाच्या लोकांनी करावा. नाही, नाही, सँको, त्यावर तू मुळीच विश्वास ठेवू नकोस. कारण ला मांचामधील लोक भयंकर तापट नि हळवे आहेत. त्यांची कोणतीही खोडी काढलेली त्यांना खपणार नाही. अरे काय सांगावे ? त्यांनी केवळ धूर सोडला, तरी ते तुला अस्मानात उडवून लावतील. छेः ! छेः ! ' ज्याला मिळे पूर्वसूचना, त्यांनी करावी प्रतिकाराची योजना. ' दुसऱ्याच्या लहरीखातर, एखाद्या मांजरापेक्षा मी अधिक दूरचे का पहावे ? आणि इतकी सारी यातायात मी केली तरी तिचे फल काय ? गवताच्या गंजीत सुई शोधणे किंवा सॅलामँकामध्ये विद्वान

माणूस शोधणे, यांच्याइतकेच साऱ्या टोबोसा–नगरीत डल्सिनियाला शोधणे कठिण आहे. खरोखर, हे कटकटीचे काम मला सांगणारा प्राणी दैत्य असला पाहिजे, दैत्य ! ”

असा संवाद सँकोने आपल्या मनाशी केला. त्याचे फळ म्हणजे तो पुढील स्वगत भाषण करू लागला–“ मृत्यूशिवाय बाकी साऱ्या गोष्टींवर काही ना काही उपाय आहे. मृत्यू मात्र आपल्याला केव्हा ना केव्हा तरी सपाट करतो. माझा धनी पुरा पुरा वेडा आहे. त्याच्या वेडेपणाच्या हजारो खुणा मी पाहिल्या आहेत आणि मी तर त्याच्या अगदी जवळ आहे. त्याची सेवा करीत आणि त्याच्या मागोमाग जात आहे त्याच्या दोन शिंगापैकी मोठे शिंग म्हणजे मी. ‘ माणूस त्याच्या संगतीवरून ओळखला जातो.’ आणि ‘ एकाच तऱ्हेची पिसे असलेली पाखरे एकत्र येतात ’ या दोन म्हणी खऱ्या असतील तर, मी व माझा धनी यात काहीच फरक असणार नाही. माझा धनी तर इतका मूर्ख आहे की, तो केव्हा एका वस्तूला दुसरी वस्तू मानतो, तर केव्हा काळ्याला पांढरे आणि पांढऱ्याला काळे समजतो. पवन–चक्कीला त्याने राक्षस मानले आणि हमालांच्या खेचरांना उंट मानले. मेंढ्यांचे कळप हे त्याला सैन्य भासले – आणि अशा किती तरी भ्रांति ! मला खेड्यामध्ये जी पहिली मोलकरीण आढळेल, ती लेडी डल्सिनिया आहे, असे त्याच्या मनावर ठसविणे मला मुळीच जड जाणार नाही असे वाटते. त्यावर त्याने विश्वास ठेवला नाही, तर मी शपथ घेऊन सांगेन. त्याच्या उलट तो शपथ घेऊ लागला, तर मी एकामागून एक शपथा घेत सुटेन. तो ठामपणे बोलू लागला, तर मी त्याच्याहून अधिक ठामपणाने बोलेन आणि त्या बोलण्याला मी चिकटून राहीन नि त्याला ते कबूल करावयास लावीन – मग त्याचा परिणाम काहीही होवो- मी माझे म्हणणे सोडीत नाही, हे पाहिल्यावर तो आपल्या त्रिनबुडाच्या कामगिरीवर मला पुनः कधी पाठविणार नाही–कारण, त्याच्या कामगिरीचे मी वांगे भाजल्याचे त्याला दिसून येईल. नाही तर, माझा धनी असे समजेल की, आपला मत्सर करणाऱ्या एखाद्या दुष्ट जादुगाराने डल्सिनियाला द्वेष–बुद्धीने दुसरे रूप दिले आहे आणि तिचा काया-पालट केला आहे. ”

या खुबीने खूष होऊन त्याचे मन स्थिर झाले आणि आपले दिव्य कार्य सिद्धीस गेलेच आहे, असे त्याला वाटू लागले. म्हणून तो संध्याकाळपर्यंत तेथेच थांबला. तोपर्यंतचा वेळ आपल्या नोकराने जाण्या–येण्यात घालविला असेल, असे आपल्या धन्याला वाटेल, अशी त्याची कल्पना. आणि साऱ्या गोष्टी त्याला अनुकूल घडत गेल्या. कारण, तो आपल्या गाढवावर बसण्यासाठी उठला, तोंच तीन तरुण गाढवावर बसलेल्या तीन खेडवळ तरुणी टोबोसोहून आपल्याकडे येत असलेल्या त्याला दिसल्या. ती तीन गाढवे नर होती की मादी होती, याचा निर्णय लेखकाने सांगितलेला नाही. पण आपण असे सयुक्तिकपणे समजू या की, त्या तीन गाढविणी होत्या. कारण, त्या प्रदेशातील खेडवळ तरुणी पुष्कळ वेळा गाढविणीवर बसून जात. परंतु हा काही फार महत्त्वाचा मुद्दा नाही. म्हणून त्याचा निर्णय करण्यासाठी आम्ही फारसा खल करीत बसत नाही.

ती गाढवे होती आणि ती सँकोला दिसली, एवढे पुरेसे आहे. त्यानंतर सँको शक्य तितक्या जलदीने आपल्या धन्यापाशी गेला. पहातो तों आपला धनी शेकडो सुस्कारे टाकीत आहे आणि प्रेमाचे शोकालाप करीत आहे, असे त्याला आढळले. सँको येताक्षणीच डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, " सँको, बातमी काय आहे ? आजचा दिवस आपण सुवर्णाक्षरांनी लिहिण्यासारखा आहे काय ? " सँको उत्तरला, " मला वाटते तांबड्या अक्षरांनी लिहावा ! चर्चमधील खुर्च्यांवर तसे लिहिलेले असते, आणि त्यामुळे कोणती खुर्ची कोणाची, हे सर्वांना कळते. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे वा ! तू तर शुभवार्ता आणलेली दिसतेस. " सँको म्हणाला, " महाराज, आता आपण दुसरे काही करावयाचे नाही– फक्त रोझिनांटला टाच मारायची अन् मोकळ्या मैदानात जाऊन थडकायचे–म्हणजे आपल्याला टोबोसोची देवता डल्सिनिया दिसेल. आपल्या सखीजनाच्या परिवारासह ती महाराजांच्या स्वागतासाठी सामोरी येत असलेली आपल्याला आढळेल. "

ते ऐकून डॉन क्विक्झोट आनंदाने ओरडले, " धन्य, धन्य मी ! अरे लाडक्या सँको, म्हणतोस काय तू ? खोट्या आनंदाने माझे खरे दुःख दूर करण्याचा प्रयत्न तू करू नकोस ! " सँको म्हणाला, " नाही महाराज. मी तुमची काही चेष्टा करावी आणि लगेच ती उघडकीस यावी, यात माझा काय फायदा ? प्रत्यक्ष पाहावे म्हणजे विश्वास बसेल. हा साऱ्या जगाचा न्याय आहे. चला, चला महाराज, कपडे चढवा आणि कूच करा म्हणजे ती राजकन्या येत असलेली आपल्याला दिसेल. स्वतःच्या गोड जीवाप्रमाणे तिची वेषभूषा नि अलंकारभूषाही गोडच असेल. ती काय अन् तिच्या सख्या काय – साऱ्याजणी सोन्याच्या लगडी आहेत– मोत्यांच्या, हिऱ्यांच्या, पाचूंच्या माळा आहेत– दहा इंचाहून उंच अशा जरतारीमध्ये गुंफलेल्या त्या तेजःपुंज माला आहेत. त्यांच्या खांद्यावर रुळणारे आणि वायुलहरींशी खेळणारे केस सूर्यकिरणांसारखे चमकत आहेत. विशेष म्हणजे त्या साऱ्याजणी तीन लुकड्या गाढवावर बसलेल्या आहेत. पण त्या गाढवांची सर तीन राज्यातील एकाही घोड्याला येणार नाही. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " लुकड्या नव्हे, ' तगड्या ' म्हणायचे असेल तुला ! " पण सँको म्हणाला, "लुकड्या काय नि तगड्या काय ? मला त्यात काही फरक वाटत नाही. पण ते कसेही असो, मी खात्रीने सांगतो की, त्यांच्या पाठीवर स्वार झालेल्या त्या तरुणींपेक्षा– विशेषतः लेडी डल्सीनियापेक्षा– अधिक सुंदर प्राणी माझ्या डोळ्यांनी कधीच पाहिलेला नाही. अहाहा ! काय ते डल्सीनियाचे रूप ! ते पाहताच कोणीही मूर्च्छितच होईल. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, चल तर मग आपण जाऊ या तिकडे ! ही अकल्पित मंगलवार्ता तू आणलीस म्हणून मी तुला एक बक्षिस आनंदाने देणार आहे. यापुढे आपण धाडस करून संकटावर मात करू, तेव्हा आपल्याला जी लूट सापडेल, ती सारीच्या सारी मी तुला बक्षिस देईन. अन् तेवढ्याने तुझे समाधान झाले नाही तर माझ्या तीन घोड्या आता व्यायला आल्या आहेत त्यांची तीन शिंगरे तू घे म्हणजे झाले. " सँको म्हणाला, " शिंगरांबद्दल धन्यवाद ! पण लूट फार किंमतीची असेल, असे मला वाटत नाही ! "

आता ते दोघेहि जंगलातून बाहेर आले, आणि जवळच तीन खेडवळ तरुणी त्यांना दिसल्या. डॉन क्विक्झोट यांनी टोबोसो नगरीकडे नजर टाकली. तेव्हा या तीन तरुणींशिवाय रस्त्यावर कोणीही त्यांना दिसले नाही. त्यामुळे त्यांचे चित्त अत्यंत त्रस्त झाले. सँकोकडे वळून त्यांनी विचारले, " तू जेव्हा शहरातून निघालास तेव्हा ती राजकन्या व तिच्या सखी शहराबाहेर येण्यास निघाल्या होत्या काय ? " हा प्रश्न ऐकून सँको ओरडून म्हणाला, " शहराबाहेर काय म्हणता ? तुमचे डोळे कुठे आहेत ?—तुमच्या पायाच्या तळव्यात आहेत ? अहो, मध्यान्हीच्या मार्तंडाप्रमाणे प्रकाशणाऱ्या त्या राजस्त्रिया आपल्याकडे येत असलेल्या तुम्हाला दिसत नाहीत काय ? "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " छेः, मला काहीच दिसत नाही. फक्त तीन गाढवांवरून येणाऱ्या तीन तरुणी तेवढ्या दिसतात ! " सँको म्हणाला, " आता देवच माझी लाज राखो ! हिम-धवल अशा तीन अश्वराजांना आपण तीन गाढवे मानाल हे शक्य आहे का ? ते घोडे नसून गाढवे असतील तर मी माझी दाढी उपटून फेकून देईन. " तेव्हा क्विक्झोट म्हणाले, " मित्रा सँको, मी डॉन क्विक्झोट आहे आणि तू सँको पँझा आहेस, हे जितके खरे, तितकेच ती तीन जनावरे म्हणजे नर किंवा मादी अशी गाढवेच आहेत हे पक्के समज. निदान ती तशी दिसतात तरी. " तेव्हा सँको म्हणाला, " छेः छेः महाराज, असे बोलू नका. आपले डोळे चोळा आणि आपल्या जीवीच्या जिवलगाला अभिवादन करण्यासाठी पुढे व्हा. आपली आराध्य-देवता जवळच आहे. "

असे म्हणून सँको त्वरेने त्या तीन खेडवळ तरुणींकडे दौडत गेला आणि आपल्या गर्दभराजावरून खाली उतरून व त्यातील एका गाढवाचा लगाम धरून, तो गुडघे टेकून एका ग्रामीण युवतीला म्हणाला, " हे सौंदर्य-सम्राज्ञी ! आपल्या ऐश्वर्याला नि थोरवीला शोभत असेल तर, पलीकडे उभा असलेल्या आपल्या बंद्या गुलामाला-त्या शूर शिलेदाराला-आपल्या मान्यतेस व कृपेस पात्र करून घे. हे राज्यकन्ये, तुझ्या प्रभावशाली सान्निध्यात आल्यामुळे हा शिलेदार एकाएकी संगमरवरी पुतळा बनला आहे आणि विस्मित झाला आहे. मी, सँको पँझा, त्याचा खिदमतगार आहे. आणि ऊन-पावसाला दाद न देता सतत भ्रमंती करणारा हा शिलेदार मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. त्याला ' दुःखी शिलेदार ' असे म्हटले जाते. " यावेळेपर्यंत डॉन क्विक्झोट सँकोजवळ आले आणि त्याच्याप्रमाणेच गुडघे टेकून बसले. सँकोने जिला ' सम्राज्ञी ' व ' देवता ' म्हणून संबोधिले, त्या प्राण्याकडे ते संशयी व हताश नजरेने टक लावून पाहू लागले. ती खेड्यातील साधी मोलकरीण आहे—तिचे गाल सुरणासारखे आहेत आणि तिचे नाक भोपळ्यासारखे पसरट आहे--हे पाहून तिच्याविषयी त्यांचे मत अनुकूल झाले नाही, एवढेच नव्हे तर ते बुचकळ्यात पडले. त्यांच्या तोंडून एक शब्द बाहेर पडेना. उलट, त्या तरुणीही तितक्याच आश्चर्यचकित झाल्या. भिन्न भिन्न बाह्य रूप असणाऱ्या या दोन तरुणांनी गुडघे टेकून आपल्याला का अडविले आहे, हे त्याना कळेना. पण शेवटी, सँकोने जिचे गाढव पकडून ठेवले होते, ती धीर धरून व मौनाचा भंग करून संतप्त

सुरात ओरडली, "उठा, आमच्या वाटेतून दूर व्हा. आम्हाला आमच्या काम-धंद्यास जाऊं द्या. आम्ही घाईत आहो." तेव्हा सँको म्हणाला, "हे राजकन्ये! हे टोबोसोच्य नगर-देवते! आपल्या श्रेष्ठ नि बलिष्ठ चरणाशी शिलेदारीचे हे दोन आधारस्तंभ शरण आलेले पाहून आपले महान् अंतःकरण द्रवत कसे नाही?" हे ऐकून दुसरी मोलकरीण म्हणाली, "वाः! आता इथं काय करायचं बाई? आमच्यासारख्या गरीब नि खेडवळ तरुणींची चेष्टा नि हुर्रेवडी तुमच्यासारख्या सभ्य लोकांनी करावी, याचं मोठं नवल वाटतं. तुमच्याइतके आम्ही थोर नाही म्हणून काय झालं? तुम्ही आपल्या उद्योगाला जा आणि आम्हाला आमच्या उद्योगास जाऊ द्या. चला, झटकन् निघा."

हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "ऊठ, सँको, माझी अशी खात्री झाली आहे की, आतापर्यंतच्या माझ्या दुर्दैवावर माझे दुष्ट ग्रह संतुष्ट झालेले नाहीत आणि म्हणून, ते आपला घातुक प्रभाव माझ्यावर पाडीत आहेत. या सचेतन मातीच्या दुबळ्या कुडीत वास्तव्य करणाऱ्या माझ्या दुःखी जीवाला समाधान मिळवून देणारे सारे मार्ग त्या दुष्ट ग्रहांनी रोखलेले आहेत. हे प्राणेश्वरी! तू अमोल रत्नभांडार आहेस-सर्व मानवी सद्‌गुणांची परिसीमा आहेस-या तुझ्या भक्ताच्या त्रस्त हृदयाची एकमेव संजीवनी आहेस! आता एका मत्सरी मांत्रिकाने माझा छळ चालविला आहे आणि माझ्या दृष्टीवर भुरळ घातली आहे. तुझी अप्रतिम सौंदर्य-लक्षणे त्याने ग्रामीण कुरूपतेच्या आवरणाखाली झाकली आहेत. तुझ्या अप्रतिम लावण्यावर धुक्याचा धबधबा सोडून ते माझ्यापासून लपवून ठेवले आहे. तरी मी तुझ्या सौंदर्याचा नि सद्‌गुणांचा पुजारी आहे. तुला माझे दर्शन नकोसे वाटावे, म्हणून त्या मांत्रिकाने या तुझ्या एकनिष्ठ सेवकाचे रूपांतर कोणत्या तरी हिडीस स्वरूपात केले नसेल, तर हे देवते! तू माझ्यावर एक सस्मित नि प्रेमळ कटाक्ष टाक. तुझ्या सौंदर्याला त्या मांत्रिकाने खग्रास ग्रहण लावले असले, तरी मी त्या सौंदर्याला अभिवादन करतो आणि शरण येतो. मी माझा जीव तुझ्यावरून मोठ्या नम्रतेने ओवाळून टाकतो. ती नम्रता तुला माझ्या शरणागतीत आढळून येईल."

हे जडजंबाल भाषण ऐकून गोंधळलेली ती खेडवळ तरुणी म्हणाली, "पुरे करा ही तुमची वटवट. आपली गरम खीर थंड करण्यासाठी तुम्ही आपले श्वास राखून ठेवा आणि मला तुमच्या वायफळ वटवटीतून सोडवा. महाराज, येथून आपण चालू लागा-आणि आम्हालाही जाऊ द्या. ती आम्ही आपली कृपा समजू." हे ऐकल्यावर सँकोने तिला वाट दिली आणि तिला जाऊ दिले. आपले कारस्थान इतक्या उत्तम रीतीने तडीस गेले, म्हणून त्याचा आनंद पोटात मावेना. ती काल्पनिक डल्सिनिया इतक्या लवकर मुक्त झाली नाही. तिने आपल्या हातातील काठीच्या टोकाने आपल्या गाढवाला ढोसले आणि त्या मैदानावरून दौडत जाण्याचे योजिले. पण हाय! त्या क्रुद्ध प्राण्याला अशा ढोसण्याची सवय नसल्याने, तो लाथा झाडीत व अडखळत जमिनीवर पडला आणि त्यामुळे लेडी डल्सिनियालाही खाली यावे लागले. तिच्या साहाय्यासाठी डॉन क्विक्झोट त्वरेने तिच्याकडे धावत गेले आणि तिच्या गाढवाच्या पोटाखाली लोंबत असलेले खोगीर

टाकटीक करण्यासाठी सँको तिकडे गेला. हे सारे झाल्यावर आमच्या शिलेदारांच्या मनात, त्या जादुगारणीला अत्यंत अदबीने आलिंगन देण्याचा विचार आला आणि तिला तिच्या खोगिरावर बसविण्याचा त्याने बेत केला. पण आता ती आपल्या पायावर उभी राहिली होती आणि पळू लागली होती. गाढवाच्या पाठीवर हात देऊन ती एका उडी-सरशी दूर गेली आणि ससाण्याप्रमाणे वेगाने धाव घेऊन ती गाढवावर पुरुषाप्रमाणे पाय दोन्ही बाजूस टाकून बसली. ते पाहून सँको म्हणाला, " देवा रे देवा ! आमची स्वामिनी माशासारखी चपळ आहे. कॉर्डोव्हा किंवा मेक्सिको येथील घोड्याच्या शर्यतीत भाग घेणाऱ्या जॉकीना चांगले धडे देऊ शकेल, असे माझे मत आहे. ते खोटे ठरले तर मला फाशी द्या. एका उडीत ती खोगीरावर जाऊन बसली आणि टाच न मारता तिने आपल्या गाढवाला शिकारी कुत्र्याप्रमाणे पळावयास लावले. तिच्या सख्याही दौड मारण्यात तरबेज आहेत–तिच्याहून रतीमात्र कमी नाहीत. वाऱ्याप्रमाणे त्या फिरत आहेत. "

सँको जे बोलला, ते खरे होते. डल्सिनिया गाढवावर स्वार होताच तिच्या दोन्ही मैत्रिणी तिच्या पाठोपाठ वेगाने निघाल्या. मैल–दीडमैल जाईपर्यंत त्या तिघींनी मागे वळूनसुद्धा पाहिले नाही. डॉन क्विक्झोटची दृष्टी त्यांच्यापाठोपाठ शक्य तितक्या वेगाने धावत गेली. पण जेव्हा त्या तिघीजणी त्यांच्या दृष्टीआड झाल्या, तेव्हा आपल्या सेवका-कडे वळून ते म्हणाले, " सँको, आता तुला या साऱ्या प्रकरणासंबंधी काय वाटते ? या दुष्ट जादुगारिणी निर्दय नाहीत काय ? माझ्या आकाक्षांचा विषय झालेल्या त्या रूप–सुंदरीला तिच्या नैसर्गिक आकारात नि सौंदर्यात पहाण्याचे माझे सुख हिरावून घेणाऱ्या त्या तरुणींचा मत्सर किती तीव्र असेल, नाही ! खरोखर मी मूर्तिमंत दुर्दैव ठरणार होतो. मत्सरी मांत्रिकांच्या द्वेष–पूर्ण बाणांचे लक्ष्य मी झालो असतो. हे पहा, सँको, माझ्या डल्सिनियाचे रूपांतर करून या देशद्रोह्यांचे समाधान झाले नाही–त्यांनी त्या सर्वांना खेडवळ तरुणींचे हिडिस रूप दिले. एवढेच नव्हे, तर डल्सीनियासारख्या युवतींच्या अंगी हटकून असणारा मधुर सुगंधही त्या मांत्रिकाने हिरावून घेतला. कारण, खरे खरे सांगावयाचे तर मी जेव्हा तिच्या साहाय्यासाठी, तू म्हणतोस त्या तिच्या अश्वराजा-जवळ ( मला ते गाढवच दिसत होते ) गेलो, तेव्हा माझ्या नाकात असा काही दुर्गंधी भपकारा आला की त्यामुळे माझे सर्वांग कापू लागले. "

तेव्हा सँको ओरडून म्हणाला, " अहो, दुष्ट जादुगारिणींनो ! मी तुम्हा सर्वांना एका दोरीने बांधून झाडाला टांगून ठेवीन. तुम्हाला पुष्कळ ज्ञान असेल, तुमची कर्तबगारी मोठी असेल आणि तुम्ही खोड्याही खूप करीत असाल. आमच्या स्वामिनीचे मोत्यासारखे डोळे कवड्यासारखे बनवून आणि तिचे सोन्यासारखे केस तांबड्या गाईच्या शेपटासारखे बनवून तुम्ही संतुष्ट झाला असाल असे कोणाला वाटेल. पण तुम्ही बदमाषांची टोळी आहा. तुम्ही तिचे एकंदर स्वरूपच बदलले. त्यामुळे तिचे खरे रूप कोणाला कळेनासे झाले. परंतु मला मात्र असे वाटते की, ती देवता देखणी नि सुंदर होती–कुरूप मुळीच

नव्हती. तिच्या उजव्या ओठावर जो तीळ होता, तो मिशीसारखा भासत असे. त्यातून सात–आठ तांबडे केस उगवले होते आणि ते सोन्याच्या तारेसारखे दिसत होते, त्यातील प्रत्येक केस वीतभर लांब होता. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे शरीरावरील तीळ हे सामान्यतः तोंडावरील तिळाला जबाबदार असतात. म्हणून, डल्सिनियाच्या चेहऱ्याच्या उलट बाजूला असणाऱ्या तिच्या मांडीवर एक तीळ असला पाहिजे. पण सँको, तू ज्या केसाचे वर्णन केलेस, ते तिळातून निघत नसतात, असे मला वाटते. " सँको म्हणाला, " ऊंः ! त्याचे काही महत्त्व नाही. ते केस तेथे होते, हे मी खात्रीने सांगतो. ते तिने आपल्या जन्माबरोबर या लोकी आणले असावेत, असे दिसत होते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " ते मला खरे वाटते. कारण, डल्सिनियाचा प्रत्येक अवयव सहजच परिपूर्ण असला पाहिजे. म्हणून तिच्या चेहऱ्यावर शंभर तीळ विखुरलेले असले–आणि तुला दिसण्याइतके ते ठळक असले–तरी त्यामुळे तिला कुरूपता मुळीच येत नाही. अनेक चंद्र आणि अनेक नक्षत्रे यामुळे तिच्या सौंदर्याच्या तेजामध्ये भरच पडत होती. पण सँको, मला हे सांग की, मला जे गाढवावरील खोगीरासारखे दिसत होते, ते काय होते ? " सँकोने उत्तर दिले, " खोगिराला जोडलेले ते एक आसन होते. अर्धे राज्य विकत घेता येईल, इतक्या किमतीचे ते होते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मग हे सारे मला कसे दिसले नाही ? खरोखर या विश्वातील अत्यंत अभागी माणूस मी आहे, असे मी पूर्वी म्हटले आहे आणि पुनः हजारदा म्हणेन. "

आपल्या धन्याचे अशा प्रकारचे भाषण ऐकून त्या लुच्चा चाकराला आपले सोंग सांभाळता येईना. आपण आपल्या धन्याला किती कौशल्याने फसविले, हे पाहून आलेले हसू त्याला आवरेना. शेवटी, याच स्वरूपाचा बराचसा संवाद केल्यानंतर ते दोघे पुनः स्वार झाले आणि सारागोस्सा शहराच्या रस्त्याला लागले. त्या महान नगरीमध्ये दरसाल खेळ आणि उत्सव मोठ्या थाटामाटाने साजरे होत असत. त्यावेळी आपण हजर रहावे, असा या दोघांचा बेत होता. परंतु वाटेत त्यांना इतक्या विलक्षण अपघातांना तोंड द्यावे लागले की, त्यांची माहिती वाचकाला देणे अवश्य आहे. न नोंदता किंवा न वाचले जाता, ते अपघात गाळणे योग्य नव्हे, हे पुढील प्रकरणावरून वाचकांच्या ध्यानी येईल.



प्रकरण ११

## शूर डॉन क्विक्झोट यांचेवर ओढवलेला अवाढव्य प्रसंग. न्याय-मंदिराने किंवा संसदेने मृत्यूच्या रथाशी किंवा गाडीशी त्यांचा घडविलेला संघर्ष.

डॉन क्विक्झोट अत्यंत खिन्न मनाने चालले होते. लेडी डल्सीनियाचे रूपांतर मत्सरी मांत्रिकाने केल्यामुळे त्यांच्या मनाचा मोठा गोंधळ उडाला होता. मांत्रिकाची जादू नष्ट कशी करावयाची आणि डल्सीनियाला तिचे पूर्वीचे सौंदर्य कसे प्राप्त करून द्यावयाचे, याच एका विचारावर त्यांचे मन केंद्रित झाले होते. अशा नाराज अवस्थेत ते चालले होते. तेव्हा त्यांचे मन थाऱ्यावर नव्हते. त्यांनी रोझिनांटचे लगाम निष्काळजी-पणाने सैल सोडले होते. ते घोडे काय ? आपल्याला स्वातंत्र्य मिळाले आहे, असे पाहताच गवताच्या लुसलुशीतपणाला लोभावले आणि पोटभर चरण्याची संधी त्याने घेतली. ते पाहून सँको आपल्या धन्याला जागर-स्वप्नातून उठवून म्हणाला, "महाराज, दुःख हे माणसाला असते– पशूंना नसते. पण माणसे जर दुःखाला फार शरण गेली, तर ती पशू बनतात हे मला सांगावेसे वाटते. महाराज, उठा, जागे व्हा! आणि घोड्याचे लगाम खेचून मर्दाप्रमाणे दौड ठोका. उत्साह धरा आणि आपण शिलेदार आहोत, हे दाखवा. तुम्हाला एवढे दुःख कशाचे झाले आहे? तुमच्याइतका खिन्न कोणी मानव कधी झाला होता ? आपण येथे आहो की नंदनवनात आहो ? आपल्या-सारख्या एका शिलेदाराला अशी खिन्नता येण्यापेक्षा जगातील साऱ्या डल्सीनिया नरकात पिचत पडल्या तरी हरकत नाही." कोणाला कल्पना येणार नाही. इतक्या त्वेषाने डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले," गप्प बैस, सँको, मी सांगतो, तू गप्प बैस. त्या सौंदर्यवती जादुगारिणीच्या विरुद्ध निंदेचा एक शब्द बोललास तर खबरदार ! कारण, तिला जी जी संकटे भोगावी लागत आहेत, त्या सर्वांना जबाबदार आहे हा अभागी डॉन क्विक्झोट. माझ्याबद्दल त्या मांत्रिकांना जो हेवा वाटतो, त्यामुळे तिच्यावर हे सर्व अनर्थ कोसळत आहेत." सँको उत्तरला, "मी तरी तेच म्हणतो, महाराज. तिला ज्याने पूर्वी पाहिले आहे, त्याने आता आपल्याप्रमाणे तिला पाहिले तर तो खवळणार नाही काय ?" क्विक्झोट म्हणाले, "होय रे सँको, होय. संपूर्ण कांतीने झळाळणारे तिचे सर्वांग-सुंदर स्वरूप पाहण्याचे भाग्य तुझ्या नेत्रांना लाभले म्हणून तू असे म्हणावेस हे योग्य आहे. पण माझ्या डोळ्यापुढे फक्त त्या मांत्रिकांचा मत्सरच

उभा आहे. परंतु सँको, आता मला असे वाटते की, तिच्या सौंदर्याचे तू जे वर्णन केलेस, ते काही बाबतीत वेडगळपणाचे होते. तिच्या डोळ्यांना तू मोत्यांची उपमा दिलीस. तसे डोळे सुंदर युवतीचे नसतात, तर समुद्रातील माशाचे असतात. माझ्या मताने, डल्सीनियाचे डोळे म्हणजे दोन हिरवे पाचूचे खडे आणि त्यावर तिच्या भुवया दैवी कमानीप्रमाणे शोभतात. म्हणून सँको, तू तिच्या डोळ्यांत बसविलेले मोती काढून घे आणि ते तिच्या दातांवर ठेव. तू दातांऐवजी डोळे चुकीने म्हणालास, असे मला खात्रीने वाटते."

सँको म्हणाला, "असेल, तसे असेल, महाराज. तिच्या कुरूपतेमुळे आपण जितके गोंधळून गेला, तितकाच मी तिच्या सौंदर्याने गोंधळलो. पण हे सारे आपण ईश्वरावर सोपवू या. दुःखाच्या दरीत पडलेल्या आपणासारख्या माणसावर जी जी संकटे कोसळतात, ती सर्व ईश्वराला माहीत असतात. या दुष्ट आणि त्रासदायक जगामध्ये थोडीशी लबाडी किंवा फसवणूक केल्याशिवाय आपल्याला नक्की काहीच सांगता येणार नाही. थांबा, महाराज. माझ्या डोक्यात एक विचार आला आहे अन् त्याने मला मोठ्या गोंधळात टाकले आहे. माझी शंका अशी की, आपण एखाद्या वीर पुरुषावर किंवा शिलेदारावर मात केली आणि आपल्या प्राणेश्वरीच्या सौंदर्याला अभिवादन करण्यासाठी त्यांना तिकडे पाठविले, तर त्या बिचाऱ्या वीराला किंवा शिलेदाराला, हीच ती डल्सीनिया आहे, हे कसे ओळखता येईल ? ते तिचा शोध कसा घेतील ? त्यासाठी ते इकडे तिकडे कसे भटकतील ? साऱ्या टोबोसो नगरीत टकमका पहात आ वासून ते कसे हिंडत राहतील ? याचे चित्र माझ्या डोळ्यापुढे सारखे खेळत आहे. अशा वेळी, ऐन राजमार्गाच्या मध्यावर ती त्यांना दिसली तरी ते तिला कसे ओळखणार ? माझ्या जनकाला ओळखण्याइतकेच ते त्यांना अवघड जाईल."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "सँको, त्या पराभूत शिलेदारांना व वीरांना तिच्या निरभ्र सौंदर्याचे दर्शन घेण्याचे भाग्य मिळेलही कदाचित् ! तिच्या मोहिनीच्या सामर्थ्याने त्यात काही अडथळा येणार नाही. मी प्रथम ज्या सरदारांना जिंकेन, त्यांच्यावरच हा प्रयोग मी करीन आणि त्यांना आज्ञा देईन की, तुमच्या यशाची वार्ता मला देण्यासाठी तत्काळ माझ्याकडे परत या." सँको म्हणाला, "आपले बोलणे मला आवडले. या योगाने आपल्याला सत्य सापडण्याचा संभव आहे. आणि जर असे घडले की, आपली ही स्वामिनी केवळ आपल्यापासूनच लपून राहिलेली आहे, तर आपल्याप्रमाणे तक्रार करण्यास तिला काही जागा राहणार नाही. पण सारे काही ठीकठाक झाले आणि आपली स्वामिनी सुखरूप नि सुरक्षित असली, तर आपण ती इष्टापत्ती समजून दुसरे धाडसाचे प्रसंग शोधण्यासाठी जाऊ या. बाकीचे काम आपण कालावर सोपवू या. अशा प्रसंगी– घातुक रोगामध्ये– काल–पुरुष हाच उत्तम वैद्य असतो." डॉन क्विक्झोट याला काही उत्तर देण्याच्या बेतात होते. पण त्याचवेळी रस्ता ओलांडून एक गाडी चालली होती, त्यामुळे ते थांबले. त्या गाडीचा गाडीवान एक कुरूप पिशाच्च होता. ती

गाडी उघडी होती. तिच्यावर झाडाच्या फांद्या घातलेल्या नव्हत्या. त्यामुळे निरनिराळ्या आकारांच्या आश्चर्यकारक वस्तूंचा जो साठा त्या गाडीत होता, तो दिसत होता. डॉन क्विक्झोट यांना त्यावेळी प्रथम भास झाला तो, साक्षात् मृत्यूचा !– मानवी मुद्रा धारण करणाऱ्या यमराजाचा ! यमराजाच्या एका बाजूस नाना रंगांचे विशाल पंख असलेला एक देवदूत उभा होता, तर दुसऱ्या बाजूस सोन्याचा मुकूट धारण करणारा सम्राट होता. आणि त्या यमराजाच्या पायाशी पडला होता प्रेमदेव मदन – आणि त्याचे धनुष्य – बाण – भाता ! मात्र तो अंध नव्हता. या सर्वांच्या जवळ नखशिखांत सशस्त्र असलेला शिलेदार दिसत होता. त्याच्या शिरावर शिरस्त्राणाऐवजी टोपी होती आणि तिच्यावर रंगीबेरंगी पिसांचा तुरा खोवलेला होता. नाना प्रकारचे चित्रविचित्र वेष धारण करणारे दुसरेही कित्येक लोक तेथे होते.

या विचित्र दृश्याने डॉन क्विक्झोट प्रथम थोडे चकित झाले. आणि त्यांचा गरीब बिचारा नोकर तर घाबरून गेला––त्याची मति गुंग झाली. पण शिलेदारसाहेबांनी पुनः विचार करून आपले मन तत्काळ स्वच्छ केले. त्यांना वाटले, आपल्या धैर्याला आवाहन करणारा एखादा असामान्य व धाडसी प्रसंग आपल्यापुढे दत्त म्हणून उभा आहे. या कल्पनेने ते खूष झाले आणि कोणत्याही संकटाशी सामना करण्याचा निर्धार त्यांनी केला. रस्त्याच्या मध्यभागी येऊन ते गडगडणाऱ्या भयप्रद आवाजात म्हणाले, " अरे गाडीवाना, सारथ्या, पिशाच्चा, जो कोणी तू असशील तो ! तू कोठून आला आहेस आणि कोठे जाणार आहेस ? हे मला ताबडतोब सांग. तुझ्या वाहनामध्ये या विचित्र आकृती कोण आहेत ? हे मला सांग. त्यांना पाहून असे वाटते की, ही तुझी गाडी म्हणजे भूमीवरून चालणारे वाहन नसून पाताळातली केरनची होडी आहे. " हे ऐकून गाडीवानाने आपली गाडी थांबविली आणि मोठ्या अदबीने उत्तर दिले, " महाराज, आम्ही अँगुलोच्या नाटक–कंपनीतील फिरते नट आहोत. सध्या कॉर्पस् ख्रिस्तीटाईडचा समारंभ असल्याने, आम्ही आज सकाळी या डोंगरापलीकडील शहरात ' यमराजाचा दरबार ' या नावाच्या शोकांतिकेचा प्रयोग केला, आणि आपल्या नाका-समोर जे शहर आपल्याला दिसत आहे, तेथे आज दुपारी तोच प्रयोग आम्ही पुनः करणार आहोत. दोन्ही शहरे जवळ जवळ असल्यामुळे, आम्ही रंगभूमीवरील कपड्या-निशीच प्रवास करीत आहो. त्यामुळे पुनः कपडे चढविण्याचे आमचे श्रम वाचतील. हा तरुण माणूस मृत्यूचे काम करतो, तो दुसरा तरुण देवदूताचे सोंग घेतो. ही बाई म्हणजे आमच्या कवीची शय्या-मैत्रीण आहे. ती राणीचे काम करते. सैनिकाचे काम करणारा एकजण आहे. त्याच्याजवळ आहे, तो बादशहा आहे आणि मी स्वतः सैतानाचे काम करतो–साऱ्या नाटकात सैतानाचे काम उत्तम आहे, हे आपण समजावून घ्यावे. दुसऱ्या काही गोष्टीचा खुलासा आपल्याला पाहिजे असेल, तर मला विचारा म्हणजे मी तो लगेच करीन. कारण सैतान सर्वज्ञ असतो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, आमचा व्यवसायच असा आहे की, आम्ही देखाव्यांना भुलू नये. ते खरे की

खोटे हे पहावे. हा देखावा पाहून मला नक्की वाटले की, कोणते तरी महान संकट आपल्यावर चालून येत आहे. जा, बाबा, जा. तुझे भले होवो. आपले नाटक करण्यासाठी तुम्ही पुढे व्हा. कोणत्याही बाबतीत माझा तुम्हाला काही उपयोग होण्यासारखा असला, तर मी तुम्हाला जीवाभावाने मदत करण्यास तयार आहे हे पक्के समजा. माझ्या अगदी लहानपणापासून मला नाटकांचे वेड आहे आणि तारुण्याच्या कालापासून तर मी नाट्य–प्रयोगांचा मोठा चाहता बनलो आहे. ''

हा संवाद चालू असताना दुर्दैवाने असे घडले की, प्राचीन काळचा पोशाख केलेल्या त्या मंडळीतला एक नट–त्या नाटकातील विदूषक—आपल्या नृत्याच्या घंटा वाजवीत तेथे येऊन उभा राहिला. त्याच्या हातातील काठीच्या टोकाला एक भला मोठा फुगा लावलेला होता. अशा विचित्र वेशाने येऊन त्याने आपली काठी हवेत फिरविण्यास सुरुवात केली आणि रोझिनांटच्या नाकापुढे जमिनीवर तो फुगा आपटला. त्याच्या घंटांचा खुळखुळ आवाज आणि फुग्याचा खडबडणारा आवाज ऐकून तो शांत प्राणी इतका दचकला आणि घाबरला की, डॉन क्विक्झोट त्याला आवरू शकले नाहीत. त्या घोड्याच्या दातामध्ये लगामाची कडी होती. तरी तो घोडा त्या मैदानावर इकडे तिकडे वेगाने पळू लागला–त्याच्या दुबळ्या हाडांना सोसणार नाही, अशा वेगाने पळू लागला, आणि आपल्या नाराज स्वाराला फिरवू लागला. आपला धनी आता घोड्यावरून फेकला जाईल, असे पाहून सँको आपल्या गाढवावरून ताबडतोब खाली उतरला आणि शक्य तितक्या त्वरेने त्याच्या मदतीस धावला. पण तो धन्याजवळ जाऊन पोहोचण्यापूर्वीच रोझिनांटचा पाय घसरला आणि तो आपल्या मालकासह जमिनीवर पडला. जेव्हा जेव्हा रोझिनांट अशा वेडगळ कल्पत्या करी आणि शर्यतीचा आव आणी, तेव्हा त्याच्या धडपडीचा शेवट असाच होई, एवढेच नव्हे तर त्या विदूषकाने, सँको आपल्या मालकाच्या मदतीस जात आहे असे पाहताच, सकोच्या गरीब गाढवावर उडी मारली. त्यामुळे ते गाढव घाबरून गेले. त्याच्या डोक्यावर घोड्याच्या शरिराचा भार बसला. त्यामुळे ते गाढव त्या रानात पळत सुटले आणि तो नाट्यप्रयोग जेथे होणार होता त्या शहराकडे निघाले. आपला धनी खाली पडला आहे आणि त्याचवेळी आपले गाढव पळत सुटले आहे, हे पाहून सँकोचे मन द्विधा झाले. प्रथम मदत कोणाला करावी–– आपल्या धन्याला की आपल्या गाढवाला ? शेवटी, चांगल्या सेवकाचे आणि निष्ठावंत चाकराचे कर्तव्य काय आहे, याचा पगडा चित्तावर बसल्यामुळे तो आपल्या धन्याकडे धावला. त्यावेळी गाढवाच्या पाठीवर विदूषकाच्या हातातल्या फुग्याचे फटके एकसारखे बसत होते आणि ते पाहून सँकोचा जीव कळवळत होता. आपल्या गाढवाच्या शेपटीच्या एका केसालाही धक्का लागण्यापेक्षा आपल्या स्वतःच्या डोळ्यातील बुब्बुळावर घाव पडले तरी चालेल, असे त्याला वाटत होते. अशा व्याकुळ मनोवृत्तीने तो डॉन क्विक्झोट यांचेकडे गेला. त्यांची स्थिती तर फारच शोचनीय होती. त्या बिचाऱ्या शिलेदाराला कधी वाटले नसेल की, आपली अशी स्थिती कधी काळी होईल. त्यांना घोड्यावर पुनः

स्वार होण्याचे कामी हात देऊन सँको ओरडून म्हणाला, " महाराज, सैतान गाढवाला घेऊन पळाला. " डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " कोणता सैतान ? " सँकोने उत्तर दिले, " तडाखे देणारा सैतान. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " काळजी करू नकोस. नरकाच्या अत्यंत खोल भागात, उदासवाण्या गुहेत, त्याने तुझे गाढव बंदिस्त ठेवले असले तरी त्या हरामखोराला ते तुला परत देण्यास मी भाग पाडीन. चल सँको, माझ्या मागोमाग ये. आपण त्या गाडीला सहजच मागे टाकू आणि मग गाढवांच्या ऐवजी खेचरे मिळवू. " तेव्हा सँको म्हणाला, " महाराज, आता आपण इतकी घाई करण्याचे कारण नाही. कारण, सैतानाने गाढवाला पूर्वीच सोडले आहे आणि तो आपल्या वाटेने निघून गेला आहे. " सँको जे म्हणाला, ते खरे होते. कारण, डॉन क्विक्झोट व रोझिनांट याचे अनुकरण करून ते गाढव आणि सैतान दोघेही कडमडले होते. गाढवाने आपल्या नव्या स्वाराला शहराकडे पायी जाण्यास लावले होते आणि खुद्द गाढव आपल्या मालकाकडे पळत परत आले होते.

डॉन क्विक्झोट म्हणाले, " त्या असभ्य सैतानाने आपल्या काही सोबत्यांचा बळी देऊन आपणा दोघांचा जो उपमर्द केला आहे, त्याचा सूड घेण्यापासून मला कोणीही परावृत्त करू शकणार नाही. तो उपमर्द करणारा माणूस सम्राट असला तरी सुद्धा मी त्याचा सूड घेईन. " तेव्हा सँको म्हणाला, " महाराज, त्याकडे आपण लक्ष देऊ नका. माझा सल्ला आपण ऐकावा, अशी माझी विनंती आहे. नटांच्या बाबतीत कधीही लुडबुड करू नये. त्यापासून काहीही मिळणार नाही. ते लोक असे असतात की, ज्यांना अनेक मित्र नेहमी मिळतात. त्यांच्यापैकी एकजण मला माहीत आहे. त्याने दोन खून केले होते तरी तो फाशी गेला नाही. आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, ही नटमंडळी म्हणजे खुशालचेंडू असतात आणि जेथे जातील तेथे गंमत करीत असतात. त्यामुळे सारेजण त्यांचेवर फिदा असतात—त्यांचे मित्र म्हणून त्यांच्या पाठीशी उभे असतात. आणि ते जर राजाच्या दरबारातील नट असतील किंवा कोणा सुप्रसिद्ध मंडळीतील असतील तर ते अशा काही थाटामाटाने वागतात की, कोणालाही वाटावे हे उमराव आहेत, सज्जन आहेत. " पण डॉन क्विक्झोट म्हणाले, " सारी मानवजात त्यांच्या पाठीशी उभी राहिली तरी मी पर्वा करणार नाही आणि त्या सैतानी विदूषकाला शिक्षा केल्यावाचून राहणार नाही. ' मी याचा उपमर्द केला, ' ही बढाई सांगण्यास मी त्याला मोकळा ठेवणार नाही. " या वेळेपर्यंत ती गाडी शहराजवळ आली होती. तिला गाठून डॉन क्विक्झोट गरजले, " थांबा, थांबा, फक्कडरावांनो थांबा. शिलेदाराच्या सन्माननीय सेवकाचा भार सहन करणाऱ्या जनावराशी सभ्यतेने कसे वागावे, हे मी तुम्हांला शिकवितो, "

तारस्वरातील हे अभिवादन त्या प्रवासी कंपनीच्या कानी पोचले, त्यावेळी ही मंडळी दूर अंतरावर होती. तरी ते शब्द ऐकून शिलेदारांचे स्वागत करण्याचा निश्चय

त्या नटांनी केला. त्यांच्यापैकी मृत्युराजाने गाडीतून तत्काळ उडी टाकली अन् त्याच्यामागोमाग बादशहा, गाडीवान आणि देवदूत हेही तावडतोब बाहेर आले. एवढेच नव्हे तर राणी, प्रेमदेव आणि इतर नटही युद्धाच्या पवित्र्यात उभे ठाकले. आपला शत्रु हाकेच्या अंतरावर येताच त्याचे स्वागत गारगोट्यानी करण्याचे त्यांनी योजले. उत्कृष्ट व्यूह–रचना करून ते सर्वजण उभे आहेत आणि आपले हात त्यांनी वर उचलले आहेत आणि आपल्यावर दगडा–धोंड्यांचा भयंकर वर्षाव करण्यास सिद्ध आहेत, हे पाहून डॉन क्विक्झोट थोडा वेळ थांबले आणि आपल्याला कमीत कमी अपाय होऊन आपण या तुफान सेनेवर कोणत्या बाजूने हल्ला करावा याचा विचार करू लागले. ते हल्ला करण्याच्या तयारीत आहेत, असे पाहून सँकोने त्यांना गाठले आणि म्हटले, " छेः छेः महाराज, आपण काय करीत आहा ? आपण वेडे तर नाही ? या भिकाऱ्यांच्या गोळ्यांपासून संरक्षण फक्त तुम्ही पितळेच्या घंटेखाली झाकून घेतलेत तरच. संपूर्ण सेनेवर एका माणसाने तुटून पडण्याचा विचार करणे, हा मूर्खपणा आहे – खरे धैर्य नव्हे, असे आपल्याला वाटत नाही काय ? या युद्धात भले–बुरे सारे देवदूत तुमच्याविरुद्ध आहेत. प्रत्यक्ष बादशहा आणि मृत्युराजही जातीने लढण्यास तयार आहेत. या सर्वांचा काहीच विचार आपण करणार नसला तर मी आपल्याला एका गोष्टीचा विचार करण्याची विनंती करतो. अहो, हे सारे राजे–महाराजे दिसत असले तरी त्यांच्यांमध्ये एकही शिलेदार नाही, हे आपण लक्षात घ्या. " ते ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, " बरोबर ! तू अगदी नेमक्या मुद्यावर बोट ठेवलेस. माझे शिवशिवणारे हात थोपविण्यास हे एकच कारण समर्थ आहे. कारण सँको, मी तुला वारंवार सांगितलेच आहे की, शिलेदारापेक्षा कमी प्रतीच्या माणसावर समशेर न उगारणे हे माझे कर्तव्य आहे. तुझ्या गाढवाचा अपमान झाला म्हणून तुला जर योग्य तो संताप आला असेल, तर या वेळी लढणे हे तुझे कर्तव्य आहे. मी या जागी उभा राहून तुला योग्य ते आदेश नि आज्ञा देऊन तुला उत्तेजन देईन आणि मदत करीन. " तेव्हा सँको म्हणतो, " महाराज, मी आपला आभारी आहे. पण मी लढणार नाही. सूड घेण्याचा मला तिटकारा वाटतो. खऱ्या ख्रिश्चनाने सारे विसरले पाहिजे आणि सर्वांना क्षमा केली पाहिजे. मला खात्री वाटते की, मी डॅपल गाढवाला शोधून काढीन आणि प्रभूची मर्जी असेल तोपर्यंत शांततेने नि निवांतपणे राहीन. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे माझ्या शहाण्या सँको, ख्रिश्चन सँको, प्रामाणिक सँको, सज्जन सँको, तुझा जर असाच निश्चय असेल तर या रिकामटेकड्या भुतावळीला आपण रामराम ठोकू आणि अधिक भरीव नि सन्माननीय अशा धाडसी प्रसंगांच्या शोधार्थ येथून कूच करू. असे विविध नि विस्मयकारक प्रसंग या प्रदेशात आपल्याला पुष्कळ सापडतील, असा दाट संभव आहे. "

असे म्हणून त्यांनी वेगाने कूच केले आणि त्यांच्या मागोमाग सँको गेला. उलट, मृत्युराज आपल्या फिरत्या तुकडीनिशी आपल्या गाडीत जाऊन बसले आणि प्रवासाला लागले. अशा प्रकारे मृत्युराजांच्या रथाचा हा अत्यंत भयंकर प्रसंग संपुष्टात आला

□ □

## प्रकरण १२

# दर्पणयुक्त बहादर शिलेदाराशी शूर डॉन क्विक्झोट यांनी केलेला विचित्र संग्राम

डॉन क्विक्झोट यांची मृत्युराजाशी चकमक उडाल्यानंतरची रात्र त्यांनी उंच उंच झाडांच्या निवाऱ्याखाली घालविली. तेथे त्यांनी सँकोच्या आग्रहामुळे काही खाद्यपदार्थ सेवन केले आणि ते ताजेतवाने झाले. सँकोच्या गाढवावरून आणलेल्या त्या खाद्य पदार्थांवर ते दोघे ताव मारीत बसले होते, तेव्हा सँको म्हणाला, "महाराज, मी आपल्याला शुभवार्ता सांगितली तेव्हा तीन घोड्यांची शिंगरे बक्षिस म्हणून मागितली, हे किती चांगले झाले ! तुमच्या पहिल्या मोहिमेतील लूट जर मी मागितली असती, तर मी इरसाल मूर्ख ठरलो असतो. 'झुडपातील दोन पक्ष्यांपेक्षा हातातील एक पक्षी अधिक मोलाचा' ही म्हण मी खरी केली. हातचे टाकून पळत्याच्या मागे धावणे हा शुद्ध वेडेपणा होय." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे, तू जर मला त्या नाटकमंडळीवर तुटून पडण्याची मुभा दिली असतीस तर मी तसे केले असते, आणि तुला निदान बादशहाचा सोनेरी मुगुट आणि प्रेमदेवाचे रंगी-बेरंगी पंख बहाल केले असते. त्या वस्तू मी त्यांचेपासून हिरावून घेतल्या असत्या आणि तुझ्या हाती दिल्या असत्या." सँको म्हणाला, "पण महाराज, भटक्या बादशहाचे मुगुट नि राजदंड खऱ्या सोन्याचे नसतात, तर जस्ताचे—तांब्याचे असतात." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते मला मान्य आहे आणि रंगमंचाच्या शोभेसाठी असलेल्या त्या वस्तू खऱ्या असणेही योग्य नाही. त्या नकलीच असणार जशी नाटके सत्याचा आभास उत्पन्न करतात, तसेच ते नाटकी अलंकारही. तरी सँको, जाता जाता मी तुला सांगतो की, तू नाटकावर प्रेम कर— त्यांचेविषयी आदर बाळग. तसेच नाटके लिहिणारे आणि नाटकात काम करणारे लोक यांच्याविषयीही प्रेम आणि आदर ठेव. कारण सर्व समाजाचे कल्याण करण्याला ते सारे-जण साधनीभूत असतात. मानवी जीवनाचे जिवंत प्रतिबिंब आपल्या डोळ्यांपुढे उभे करणारे आरसे ते आपल्याला दाखवतात. मानवी स्वभावाची यथार्थ कल्पना देण्यास आणि आपण कसे आहो नि कसे असावयास हवे, हे सांगण्यास सुखान्त नाटके आणि त्यातील नटवर्ग याहून दुसरे कोणीही समर्थ नाहीत. राजे-महाराजे, धर्मगुरु, शिलेदार, स्त्रिया वगैरेंची सोंगे असलेले एकही नाटक रंगभूमीवर तू कधी पाहिले नाहीस काय ? हे मला कृपा करून सांग. रंगभूमीवर कोणी गुंडाचे काम करतो, तर कोणी सैनिकाचे.

एकजण लबाड असतो, तर दुसरा व्यापारी असतो. एकजण धूर्त वेडा असतो, तर दुसरा वेडा प्रेमिक असतो. पण एकदा का खेळ संपला आणि नटांनी आपापले पोशाख काढून टाकले म्हणजे ते सारे समान असतात—खेळापूर्वी होते तसे असतात." सँको म्हणाला, "हे सारे मी पाहिले आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, असाच नाट्यप्रयोग जगाच्या या महान् रंगभूमीवर चालू आहे. त्यात कोणी बादशहांचे सोंग घेतात, तर कोणी धर्मगुरूंचे. सारांश, जगातील सारे व्यवहार रंगभूमीवर दाखविता येतात. जगाच्या रंगभूमीवरील नाटकाचा शेवट मृत्यूमध्ये होतो. नाटक संपले म्हणजे सारे नट, आपापली उच्च–नीच पदे सोडून, स्मशानामध्ये समान भूमिकेवर आरूढ होतात."

सँको म्हणाला, "वा: ! अशी तुलना क्वचितच कोणी केली असेल, पण ती काही नवी नाही, मी ती वारंवार ऐकलेली आहे. अशीच दुसरी उपमा म्हणजे बुद्धिबळाच्या डावाची. तो खेळ जोपर्यंत चाललेला असतो, तोपर्यंत त्यातील प्रत्येक घटकाला विशिष्ट काम असते. पण एकदा का खेळ संपला म्हणजे राजा, वजीर, उंट, घोडे––हे सारे एकत्र मिसळून पिशवीत कोंबले जातात. तसेच आपले आयुष्य संपले म्हणजे आपल्याला स्मशानात पुरले जाते." हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, तुझे म्हणणे खरे आहे. दिवसा–दिवसाला तुझा भोळेपणा कमी होत आहे आणि तुझी बुद्धी वाढत आहे." सँको म्हणाला, "महाराज, तसे होण्याला सबळ कारण आहे. आपल्या बुद्धीचे काही कण मला चिकटणारच. माझ्या मनाची नांगरणी नि मशागत चांगली झाली, तर त्यातून योग्य वेळी भरपूर पीक निघेल. माझी बुद्धिमत्ता म्हणजे ओसाड जमीन आहे. पण आपल्या भाषणाचे शेणखत तिच्यावर टाकले आणि मी आपली जी सेवा करतो तिने मशागत केली, म्हणजे माझ्या मनाच्या मळ्यातून उत्तम पीक निघेल. ते पाहून माझ्या धन्याला लज्जा खचित वाटणार नाही. माझ्या सर्द झालेल्या बुद्धिमत्तेवर आपण सदाचाराचे जे सिंचन केले आहे, त्याला अनुरूप असेच पीक निघेल." सँकोची ही कृत्रिम भाषाशैली ऐकून डॉन क्विक्झोट यांना हसू आले. तरी त्यांना त्याचे बोलणे खरे आहे असे वाटले. त्याची ही सुधारणा पाहून त्यांना मोठे कौतुक वाटले. पण सँको आपला कमीपणा झाकण्याचा प्रयत्न करीत असे आणि अत्यंत उत्तुंग उड्डाण करण्याचा जेव्हा तो प्रयत्न करी तेव्हा तो कोसळून खाली पडे. त्याच्या बोलण्यातील खरे सौन्दर्य म्हणजे, प्रस्तुत असोत वा अप्रस्तुत असोत, म्हणीचा वापर आपल्या संवादात करण्याची त्याची खुबी. या इतिहास-ग्रंथात त्याची भाषण करण्याची पद्धती ज्याने पाहिली असेल, त्याच्या लक्षात हे आले असेलच.

असे संवाद करीत करीत त्यांनी बहुतेक रात्र घालविली. शेवटी सँकोच्या पापण्या मिटू लागल्या – याचा अर्थ त्याला झोप येऊ लागली. तेव्हा त्याने आपल्या गाढवावरचे खोगीर काढले आणि त्याला चरावयास मोकळे सोडले. पण बिचाऱ्या रोझिनांटला रात्रभर, अंगावर खोगीर घेऊन, उभे राहण्याची शिक्षा भोगावी लागली. प्राचीन काळी सारे

शिलेदार आपल्या घोडयावरील खोगीर रानात कधी काढीत नसत. फक्त त्यांचे लगाम काढून ते खोगिराच्या टोकाला जोडीत. या परंपरेनुसार रोझिनांटला तसेच ठेवण्याचे आदेश त्याच्या मालकाने दिलेले होते. परंतु विश्वासू डॅपल गाढवाने रोझिनांट घोडयाला सोडले नव्हते. त्या दोघांची दोस्ती अतुल्य व अजिंक्य होती. अशी निरपवाद परंपरा बापापासून मुलाकडे चालत आलेली होती. या दोन जनावरांच्या प्रेमाचे वर्णन करण्यासाठी या इतिहासाच्या लेखकाने काही प्रकरणे लिहिली होती. पण एवढ्या शौर्यपूर्ण इतिहास–ग्रंथाची प्रतिष्ठा राखण्यासाठी त्याने ती प्रकरणे या ग्रंथात घातली नाहीत, तरीसुद्धा या विषयाच्या काही छटा मधून मधून दाखविण्यास तो विसरत नाही. म्हणून त्याने असे लिहिले आहे की, या दोन मित्रांना एकमेकांची अंगे घासण्यात आणि चाटण्यात प्रचंड आनंद वाटत असे आणि ही क्रीडा पुरेशी झाल्यावर रोझिनांट आपले मस्तक गाढवाच्या मानेवर हलकेच ठेवीत असे. अशा प्रकारे ते दोघे अत्यंत प्रेमाने दोन-तीन दिवस एकत्र उभे राहिले असते आणि जमिनीवरील गवताकडे अधाशीपणे पहात राहिले असते. त्यांची ती चिंतनशील भूमिका कोणी त्यांना सोडावयास लावली असती किंवा पोटातील भुकेमुळे त्याना एकमेकापासून दूर जावे लागले असते, तर गोष्ट निराळी.

त्या दोघांच्या मैत्रीची तुलना लेखकाने निसस व युरेलस यांच्या मैत्रीशी किंवा पायलेडस व ऑरेस्टस यांच्या मैत्रीशी केलेली होती, असे म्हणतात. ते खरे असेल तर त्यांच्या मैत्रीचे कौतुक सर्वत्र झाले पाहिजे. या दोन शांत प्राण्यांचा खराखुरा स्नेहभाव म्हणजे मानवजातीवर केलेली समर्पक टीकाच होय. कारण मानव आपल्या मैत्रीचा भंग करण्याचा अपराध नेहमी करतो. यावरूनच अशी म्हण पडली आहे की, " जगात कोणी कोणाचा मित्र नाही. सारी मैत्री वाऱ्यावर उडून गेली आहे. जी माणसे आत्ता गळ्यात गळा घालतात, तीच लगेच एकमेकांचे गळे कापतात. " दुसरी एक म्हण अशी आहे की, " मित्र दिसला की आपला जीव सांभाळा. " या दोन पशूंच्या हार्दिक प्रेमाला आमच्या लेखकाने मानवी प्रेमाची उपमा दिली, याबद्दल जगाने वाईट वाटून घेऊ नये. कारण विवेकाची व नीतीची अत्यंत महत्त्वाची तत्त्वे माणूस बुद्धिहीन पशु-पासून शिकला आहे. उदा. करकोचापासून बस्तीचा उपयोग आणि कुत्र्यापासून ओकारीचा फायदा तो शिकला. बगळ्याने माणसाला दक्षता, मुंगीने काटकसर, हत्तीने प्रामाणिक-पणा आणि घोडयाने स्वामिनिष्ठा शिकविली. शेवटी सँको एका झाडाच्या बुंध्यापाशी झोपला आणि त्याच्या धन्याने विशाल ओक वृक्षाखाली निद्रादेवीला आवाहन केले.

थोड्याच वेळात डॉन क्विक्झोट यांची झोप गोंगाटाने चाळविली गेली. ते उठले आणि तो आवाज जिकडून येत होता, तिकडे त्यांनी नजर टाकली आणि कान टवकारले. त्यांना घोड्यावरून येणारी दोन माणसे दिसली. त्यापैकी एकजण खोगिरावरून बेफिकिर-पणे खाली सरकत उतरत होता. तो दुसऱ्याला म्हणाला, " मित्रा, खाली उतर आणि घोड्याला मोकळे सोड. या ठिकाणी त्याला चरायला भरपूर कुरण मिळेल आणि मला माझ्या प्रेम–कल्पनात गुंग होण्यासाठी शांतता नि एकांत लाभेल, असा माझा कयास

आहे." असे म्हणून तो खाली गवतावर पहुडला. त्यामुळे त्याच्या अंगावरील चिलखताचा आवाज झाला. त्यावरून डॉन क्विक्झोट यांनी ओळखले, हा नक्की कोणी तरी शिलेदार असला पाहिजे. म्हणून ते झोपलेल्या सँकोजवळ गेले आणि त्याचा एक हात धरून त्यांनी त्याला उठविले – मोठी गडबड करून त्याला जागे केले व त्याच्या कानात ते हळूच कुजबुजले, "मित्रा सँको, धाडसी प्रसंग दत्त म्हणून उभा आहे." तेव्हा सँको म्हणाला, "देव करो आणि तो चांगला ठरो. पण ती वीरांगना कोठे आहे?" तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "ती कोठे आहे, म्हणून तू विचारतोस, सँको? अरे माणसा, तुझे डोके वळव अन् पलीकडे पहा. जमिनीवर पडलेला एक शिलेदार तुला दिसत नाही काय? तो काही दुःखात सापडला असावा, असे मानण्यास मला जागा आहे. कारण, त्याने स्वतःला आपल्या घोड्यावरून खाली झोकून दिले हे मी पाहिले आहे. तो खाली पडताना त्याच्या चिलखताचा खणखणाट झाला आणि तो जमिनीवर पडला तो हताश होऊन." सँकोने विचारले, "या सर्वांचा अर्थ काय? यात साहसाला वाव आहे असे आपण कसे म्हणता?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "हा साहस करण्यासारखा प्रसंग आहे असे मी इतक्यातच ठामपणे सांगू शकत नाही. पण जवळजवळ तसाच तो प्रसंग असावा, असे मला वाटते. पण ऐक. तो कांही वाद्य लावीत आहे आणि तो खोकत–थुंकत आहे. यावरून गाण्यासाठी तो आपला घसा साफ करीत आहे, असे दिसते." सँको म्हणाला, "खरे हो खरे, महाराज. हा कोणी तरी प्रेमात पडलेला शिलेदार असावा, असा माझा तर्क आहे." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "सारे शिलेदार असेच असले पाहिजेत. आपण कान देऊन ऐकू या. तो जर गाऊ लागला, तर त्याच्या परिस्थितीची कल्पना आपल्याला चटकन येईल. कारण, हृदय भरून आले म्हणजेच वाचा बोलू लागते." याला सँकोने उत्तर दिले असते. पण त्या त्या वन–वीराच्या सर्वसामान्य स्वराने त्याचे बोलणे थांबले. तो वीर–शिरोमणी पुढील गीत गाऊ लागलाः—

### गाणे

(१) तेजस्वी राणी, तुला नाराज न करण्याची हमी,
तुझा प्रीतिदास कशी करून देईल?
कर्तव्याचा काही नियम त्याला मागून घेऊ दे,
अन्य कोणत्याही सुखाची याचना तो करीत नाही.

(२) मी मेलेच पाहिजे, की निराशपणे जगावे?
तू आज्ञा करशील तसा वागेन.
निराशेने मूक मृत्यु येईल,
किंवा साक्षात प्रेमच विलाप करील.

( ३ ) माझे हृदय मेणासारखे मऊ असले तरी
हिऱ्यासारखे दृढ नि अकृत्रिम ठरेल,
कारण प्रेमाने आणि त्वां उठवलेल्या मुद्रेचा
संस्कार कशाने नाहीसा होणार आहे ?

त्या वन–वीराने आपले गीत संपविताना एक सुस्कारा सोडला. तो सुस्कारा त्याच्या थेट अंतःकरणापासून निघालेला दिसत होता. थोडा वेळ थांबून दुःखी व हताश स्वरात तो म्हणाला, " हे अत्यंत चारुगात्री आणि अत्यंत कृतघ्न स्त्रिये, व्हॅन्डा-लियाची अत्यंत प्रसन्न असणारी कॅसिल्डिया, तुझ्या सौंदर्याची पूजा करणाऱ्या शिले-दाराने आपले यौवन–पुष्प कोमेजून टाकावे आणि सतत भ्रमंती करून नि खडतर श्रम सोसून स्वतःला ठार मारावे, याला तुझ्या हृदयाने संमति कशी दिली ? अलम दुनियेतील तू सर्वांत लावण्यसंपन्न ललना आहेस, हे मी सर्व शिलेदारांना मान्य करावयास लावले, एवढी तुझी सेवा पुरेशी नाही काय ? नॅव्हारचे सारे शिलेदार, लियनचे सारे शिलेदार, टार्टेसियनचे–कॅस्टिरियनचे– आणि मुख्य म्हणजे ला मांचाचे सारे शिलेदार तुला सौंदर्य–सम्राज्ञी म्हणून मान देतात. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " छेः ! छेः ! तसे नाही. कारण, मी स्वतः ला मांचाचा शिलेदार आहे आणि मी त्या ललनेला कधीच मान्यता दिली नाही–आणि देणार पण नाही. माझ्या हृदय–सम्राज्ञीच्या सौंदर्याला कमी-पणा आणणारी ही गोष्ट मी कशी करीन ? म्हणून सँको, मला वाटते, या शिलेदाराचे डोके फिरले असावे. आपण त्याचे आणखी बोलणे ऐकू या. कदाचित त्यातून काही नवीन निघेल. " तेव्हा सँको म्हणाला, " आपण तसे कराल, ही मला खात्री आहे. तो सबंध महिनाभर विलाप करीत राहील. "

पण घडले उलटे. त्या वन-वीराने त्याचे संभाषण ऐकले आणि आपले विलाप थांबविले. तो आपल्या पायावर उभा राहिला आणि उच्च स्वराने पण सौजन्याने त्यांना म्हणाला, " कोण आहे तिकडे ? तुम्ही कोण आहा ? तुम्ही सुखी लोकांपैकी आहा की दुःखी लोकांपैकी ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " दुःखी लोकांपैकी. " तेव्हा तो वनवीर म्हणाला, " तर मग मजकडे या. म्हणजे तुम्हाला खात्री पटेल की, मूर्तिमंत दुःख व दैन्य यांचे दर्शन आपल्याला झाले आहे. " इतक्या हृदय–द्रावक आणि शालीन निमंत्रणानंतर डॉन क्विक्झोट व सँको हे सहजच त्याच्याकडे गेले. तेव्हा डॉन क्विक्झोटचा हात धरून तो दुःखी शिलेदार म्हणाला, " खाली बसा, महाराज. आपला व्यवसाय शिलेदारी हा असल्यामुळे आपण या एकांतवासात मला भेटत आहा, हे उघड आहे. येथे एकांत आणि रात्रीचे शीतल दवबिंदू हेच आपले सांगाती असतील. शिलेदारांचे योग्य विश्रांती–स्थान असेच असते. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " आपण म्हणता त्या परंपरेतील शिलेदार मी आहे. माझ्या मनाच्या सिंहासनावर दुःख, दुर्दैव आणि संकटे आरूढ झालेली असली तरी इतरांची दुःखे ऐकण्यास माझे हृदय अजून तत्पर आहे. आपल्या विलापावरून मला असे वाटते की, आपले दुःख प्रेमभंगाचे आहे.

आताच आपण वर्णिलेल्या सुंदरीने कृतघ्नता दर्शविल्यामुळे आपल्याला दुःख झालेले दिसते."

अशी चर्चा करीत असताना, ते दोघे त्या कठिण जमिनीवर एकमेकाजवळ प्रेमाने व शांततेने बसलेले होते. त्यावरून कोणास असे वाटले नसते की, उद्या पहाट फुटली की यांची डोकी एकमेकाकडून फोडली जातील. त्या वन-वीराने विचारले, "कोणाच्या प्रेमपाशात पडण्याचे भाग्य आपल्याला लाभले आहे काय?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "तसे दुर्भाग्य मला लाभले आहे. तथापि माझे प्रेम योग्य ठिकाणी बसले आहे, या सुखद विचाराने माझ्यावरील संकटाचे पारडे हलके होते आणि ती संकटे वरदान ठरतात." तेव्हा वनवीराने उत्तर दिले, "कोणा सुंदरीने केलेला तिरस्कार आपल्या मनोवृत्तींना दुखविणारा नसेल आणि सूडाची भावना निर्माण करणारा नसेल, तर आपण म्हणता ते बरोबर आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझ्या हृदयदेवतेने माझा तिरस्कार केल्याचे मला कधी जाणवलेच नाही." जवळच बसलेला सँको म्हणाला, "मलाहि कधी जाणवलेच नाही. कारण, माझी हृदय-देवता गाईसारखी गरीब नि लोण्यासारखी मऊ आहे." वन-वीराने डॉन क्विक्झोट यांना विचारले, "हा आपला शागीर्द काय?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "होय." तेव्हा वन-वीर उद्गारले, "जेव्हा आपला धनी बोलत असतो, तेव्हा त्या बोलण्यात तोंड खुपसण्याचे धारिष्ट करणारा शागीर्द मी कधी पाहिला नाही. माझा माणूस पलीकडे आहे. तो स्वतःच्या बापाच्या बरोबरीचा आहे. पण मी बोलत असताना त्याने आपले तोंड कधी उघडले नाही. तसे करण्याइतका तो उद्धट आहे, असे कोणीच म्हणू शकणार नाही." सँको म्हणाला, "बरं, बरं. मी बोललो—आणि पूर्वीसारखाच पुनः बोलेन. पण माझे बोलणे संपले. तुम्ही मला जितके चिडवाल, तितका तुम्हालाच त्रास होईल." पण त्या वनवीराच्या शागीर्दाने सँकोचा हात धरून त्याला ओढले आणि म्हटले, "बंधो, ये, आपण जेथे मन-मोकळ्या गप्पा मारू शकू, अशा ठिकाणी जाऊ या. आपण दोघेही शिलेदाराचे खरेखुरे सेवक आहो. आपले धनी प्रणय-कथामध्ये आकंठ बुडू देत. त्या त्यांच्या कथा सर्व रात्रभर चालतील आणि दुसरा दिवस उजाडला तरी त्या संपणार नाहीत, हे मी तुला बजावून सांगतो." सँको, म्हणाला, "कबूल! एकदम कबूल. मग मी कोण आहे आणि काय करतो, हे सारे मी तुम्हाला सांगेन. मधेमधे बोलणाऱ्या सेवकासारखा मी आहे की नाही, हे तुम्ही नंतर ठरवा." असे बोलून ते दोघे सेवक एका बाजूस गेले आणि गप्पा करू लागले. त्यांच्या धन्यांच्या गप्पा जितक्या गंभीर होत्या, तितक्याच यांच्या गप्पा गंमतीच्या होत्या.



## प्रकरण १३

# त्या दोन सेवकांमध्ये झालेला सुख-संवाद आणि वन-वीराशी झालेल्या सामन्याचे वर्णन

अशा प्रकारे सरदार एकीकडे आणि त्यांचे नोकर एकीकडे बसले. नोकर आपापल्या आयुष्याची कथा सांगत होते, तर त्यांचे धनी आपापल्या प्रेम–कथा निवेदन करीत होते. वन-वीराच्या सेवकाने कथेस सुरुवात केली व सँकोस म्हटले, " मेहेरबान, शिलेदारांच्या आपल्यासारख्या सेवकांना जे आयुष्य घालवावे लागते, ते कटकटीचे असते. आपल्या निढळाचा घाम गाळून आपण आपली भाकरी खातो, असे आपण खुशाल म्हणू शकतो. मानवाच्या आदि मातापित्यांना मिळालेला हा एक शाप आहे." तेव्हा सँको म्हणाला, " आपले देह थंडीने कुडकुडत ठेवून आपण अन्न सेवन करतो, असेही आपण खुशाल म्हणू शकतो. थंडी किंवा ऊन यांचा त्रास आपल्यापेक्षा अधिक सहन करणारे दुसरे कोणी करंटे प्राणी नसतील. मी तर म्हणतो, आपल्याला काही तरी खावयास मिळाले, तर आपल्याला कशाचा त्रास वाटणार नाही. कारण, पोट भरलें म्हणजे चिंता कमी होते. पण आपल्याला पुष्कळ वेळा एक एक, दोन दोन दिवस न्याहारीसुद्धा मिळत नाही. दशदिशा वाहणारा वायू सेवन करूनच रहावे लागते." त्यावर तो वन-वीराचा सेवक म्हणाला, " ते काही असले तरी आपण हे सारे सहन केले पाहिजे. कारण आपण आपल्याला मिळणाऱ्या पारितोषकाची वाट पाहात असतो. जो शिलेदार आपल्या सेवकाला केव्हा ना केव्हा एखाद्या बेटाचे राज्य किंवा सुंदरशी सरदारकी बहाल करीत नाही, तो अत्यंत दुर्दैवी म्हटला पाहिजे." सँको म्हणाला, " माझ्यापुरते सांगायचे तर, मी माझ्या धन्याला पुष्कळ वेळा असे सांगितले आहे की, एखाद्या बेटाचे राज्य मला मिळाले, तरी मी संतोष मानीन. आणि माझा धनी इतका थोर आहे––उदार अंतःकरणाचा आहे की, त्याने मला तसे बेट देण्याचे अभिवचन पुनः पुनः दिले आहे." तेव्हा दुसरा सेवक म्हणतो, " मला जर धर्मगुरूचे पद मिळाले, तर माझ्या सेवेचे चांगले चीज झाले, असे मी समजेन. ते पद देण्याचे वचन माझ्या धन्याने मला दिलेले आहे." सँको म्हणाला, " तर मग तुझा धनी चर्चचा शिलेदार असेल आणि तो आपल्या भल्या नोकराला तसे पद देईल. पण माझा धनी अगदी अडाणी आहे. त्याच्या काही शहाण्या मित्रांनी (त्यांचे काही आभार मानण्याचे कारण नाही.) धर्मगुरू होण्याचा सल्ला त्याला एकदा दिला होता—त्याचे

भले व्हावे, अशी त्यांची इच्छा होती असे मला वाटत नाही. त्याने धर्मगुरू होण्याचे नाकारले. कारण त्याला बादशहाच व्हायचे होते. माझा धनी चर्चच्या पाठीमागे लागतो की काय, अशी मला फार भीती वाटत होती. तसे झाले असते तर माझी प्रगति खुंटली असती. कारण, त्या धार्मिक पेशाला मी योग्य नाही. तुम्हालाच म्हणून सांगतो, अंगात कोपऱ्या घातलेल्या माणसारखा मी दिसत असलो तरी, मी जर पाद्र्याचा काळा झगा घातला, तर गाढवासारखा दिसेन. ''

यावर वन-वीराचा तो सेवक म्हणाला,'' मित्रा, मी तुला हे सांगू इच्छितो की, तू हे राजकारण सोडून दे. कारण, बेटाचा राज्यकारभार करण्यापासून मान मिळण्यापेक्षा खर्च अधिक होतो, आरडाओरड फार, पण लाभ थोडा. त्यात यश आले तरी त्रास आणि चिंता फार. जे लोक राज्यकारभाराचे ओझे आपल्या शिरावर घेतात, ते त्याखालीच दडपले जातात. आपली ही गोंधळाची गुलामगिरी सोडून आपण आपल्या घरी धडपडत गेलो आणि मासेमारी, शिकार वगैरे मौजेचे उद्योग करीत राहिलो, तर आपल्याला अधिक आनंद वाटेल. कारण, ज्या अडाणी नोकराला आपले घोडे, आपले दोन शिकारी कुत्रे किंवा मासे धरण्याचे जाळे संभाळून घरी सुखाने राहता येत नसेल, तो खरोखर दुर्दैवी होय. '' सँको म्हणाला, '' मी म्हणेन तेव्हा हे सारे मला मिळेल. माझ्याजवळ घोडे नाही हे खरे, पण माझ्याजवळ जे एक इमानी गाढव आहे, ते माझ्या मालकाच्या दोन घोड्यांपेक्षा केव्हाही सरस आहे. माझ्या गाढवाची मी माझ्या धन्याच्या घोड्याशी अदलाबदल केली, तर माझ्या नशिबी दुःखच येणार-या किंवा पुढल्या नाताळातही मला सुख मिळणारच नाही-चार पोती धान्य माझ्या मालकाने भरीला दिले, तरी मला आनंद वाटणार नाही. मी माझ्या डॅपलला जी किंमत देतो, ती पाहून तुम्ही वाटेल तितके हसा. त्याच्या चित्र-विचित्र रंगावरून त्याला ते नाव पडले आहे. आता शिकारी कुत्र्यासंबंधी म्हणाल तर, आमच्या गावात ती खूप आहेत. आणि दुसऱ्याच्या जिवावर शिकार करण्यासारखा दुसरा खेळ कोणता ? '' तेव्हा तो सेवक म्हणाला,'' दोस्ता, खरे रे खरे ! आता माझा निश्चय झाला. हे भटकते शिलेदार आपले खुळचट पराक्रम एकटेही करू शकतील. त्यांना सेवकांची गरज नाही. मी माझ्या घरी जातो आणि मला योग्य वाटेल त्या रीतीने मी माझ्या मुलांचे संगोपन करतो. मला तीन मुले आहेत-आणि ती इराणी मोत्यासारखी चमकदार आहेत. '' सँको म्हणाला, '' मला फक्त दोन मुले आहेत, पण खुद्द पोपला अर्पण करण्याजोगी ती आहेत. त्यातही माझी मुलगी फारच नामी आहे. तिच्या आईचा विरोध असला तरी मी तिला सरदारीण करणार. ( ईश्वर तिच्यावर कृपा करो ! ) '' तेव्हा त्या सेवकाने जिज्ञासेने विचारले, '' ही आपली तरुण सरदारीण किती वयाची आहे ? '' सँको उत्तरला, '' असेल पंधरा वर्षांची-थोडी कमीजास्त वयाची. पण ती भालाभर उंच आहे, वसंत ऋतूतील उषःकालासारखी ताजीतवानी आहे आणि हमालासारखी भक्कम आहे. '' तेव्हा वन-वीराचा तो सेवक म्हणाला, '' असे असेल तर ती सरदारीणच काय पण वन-देवताही होऊ शकेल ! वा, बेटी धट्टीकट्टी नि

रांडलेक ! हौशी वनराणीला तिच्यासह वसंतऋतून किती मजा वाटेल !" तेव्हा सँको कुरकुरत म्हणाला, "शीः ! माझी मुलगी रांडलेक नाही. तिची आई पूर्वीपासून सच्छील आहे-आणि तशाच त्या, मी जिवंत नि सुखरूप आहे तोवर, देव-दयेने राहतील. म्हणून महाराज, तुम्ही आपल्या जिभेला लगाम घाला किंवा योग्य तेवढेच बोला. तुमच्या धन्याने तुम्हाला शिष्टाचार शिकविला असेल, असे मला वाटत होते. कारण, शिलेदार म्हणजे सभ्यतेचे शिखर !"

तेव्हा वन-वीराचा तो सेवक म्हणाला, "अरेरे, तुमचा किती गैरसमज झाला ! अलीकडे लोकांची स्तुती करण्याचा कोणता प्रकार रूढ आहे, हे तुम्हाला माहीतच नाही ? एखाद्या साठमारीत एखाद्या सद्‌गृहस्थाने बैलाला आपल्या भाल्याने भोसकले, किंवा एखाद्या प्रसंगी एखादा माणूस मोठ्या चातुर्याने वागला, तर लोक त्याची कशी वाहवा करतात, हे तुम्ही कधी पाहिले नाही का ? लोक टाळ्या पिटून ओरडतात, 'अरे, हा रांडलेक काय तजेल आहे ! चलाख कुत्राच आहे तो !' एका अर्थी जी निंदा आहे असे वाटते, ती आता भरघोस प्रशंसा ठरत आहे. अशा प्रकारे आपल्या आईबापांची प्रशंसा व्हावी, अशी कृत्ये जी मुले करणार नाहीत, त्यांना आपली म्हणण्यात काय अर्थ आहे ?" सँको म्हणाला, "माझ्या मुलांनी तशी सत्कृत्ये केली नाहीत, तर मी त्यांना आपली म्हणणार नाही. यापुढे तुम्ही माझ्या बायकोला नि मुलीला 'रांडलेकी' 'उंडग्या' आणखी काय वाटेल त्या नावाने हाक मारून त्यांचा गौरव करा. कारण, अशा सर्व गौरवाला पात्र ठरणारी हजारो कृत्ये त्या दोघी करीत असतात. त्यांना पाहण्यासाठी माझा जीव तळमळत आहे. देवाने मला या चाकरीच्या अघोर पापातून मुक्त करून मला घरी पाठवावे. शंभर नाण्यांच्या आमिषाने मी या चाकरीत दुसऱ्यांदा खेचला गेलो आहे. सीएरा मोरेना येथे सैतानाने माझ्या वाटेवर ती नाणी फेकली आणि मी त्यांच्या मोहात अडकलो. सैतान अजून माझा पिच्छा सोडीत नाही. तो सर्वत्र माझ्या डोळ्यापुढे नाचत असतो. हाय ! हाय ! ती दुष्ट थैली ! माझ्या डोक्यात अजून कशी फिरत आहे-आणि तिच्यातील नाणी मी पुनः पुनः मोजीत आहे, असे मला वाटते. एकदा मी ती थैली घट्ट धरतो, तर एकदा मी ती घरी घेऊन जातो; एकदा मी तिच्या बळावर जमीन खरेदी करतो, तर एकदा मी ती जमीन कोणाला गहाण देतो आणि त्याबद्दल भाडे घेतो नि एखाद्या राजपुत्रासारखा राहतो. अशा कल्पना करीत करीत मी वेळ घालवितो. आणि त्या गुंगीत या माझ्या ठोंब्या मालकाची कामे वेठ-बिगारीसारखी करीत राहतो. माझे तर असे मत आहे, हा माझा मालक शिलेदार नाही-मूर्ख आहे." तेव्हा तो सेवक उद्‌गारला, "बरोबर आहे. 'सर्व पापांचे मूळ लोभ आहे,' ही म्हण तुमच्यावरून खरी वाटते. माझा मालक तर तुमच्या मालकापेक्षा जास्त ठोंब्या आहे. त्याला पाहिले की, 'तो खरा वेडा, जो करतो दुसऱ्याच्या कामाचा चिवडा.' ही म्हण मला आठवते. जो माणूस दुसऱ्याच्या कामात नाक खुपसतो, तो आपल्या कामाचे वाटोळे करतो. दुसऱ्या शिलेदाराची अक्कल शोधावयास जो जातो, तो आपली अक्कल

गमावून बसतो. जे मिळविण्यासाठी तो प्राण पाखडतो, ते मिळाल्यावर त्याला पस्तावा करावा लागतो. ”

सँकोने विचारले, “ तुमचा मालक प्रेमात अडकला आहे काय ? ” सेवकाने उत्तर दिले, “ तर रे, व्हॅन्डालियाची कॅसिल्डिया ही तमाम दुनियेतील एक विचित्र बली आहे. तिच्या प्रेमपाशात ही स्वारी पडली आहे. तिला भात शिजविता येत नाही की रोटी भाजता येत नाही. पण त्याबद्दल आमच्या मालकाला काही खंत वाटत नाही. त्याच्या डोक्यात काही विलक्षण लहरी असतात. त्यांच्याबद्दल मी तुला लवकरच सांगेन. ” तेव्हा सँको म्हणाला, “ प्रत्येक मार्गात असा काही खड्डा असतो की, तेथे माणूस अडखळून पडतो. काही घरामध्ये पावटे शिजवून खातात, पण आमच्या घरी सारी भांडी त्यांनी भरलेली आहेत. म्हणून मूर्ख माणसाना अक्कल मिळण्यापेक्षा चांगले सेवक मिळणे अवश्य असते. पण समदुःखी माणसे भेटल्याने दुःख कमी होते, म्हणतात ना ? माझे दुःख कमी करण्याला तुम्ही सर्वथैव लायक आहा. तुम्ही एका मूर्खाच्या उपयोगी पडत आहा–आणि मी दुसऱ्या. ” वनवीराचा सेवक म्हणाला, “ माझा मालक जितका मूर्ख आहे, त्याहून अधिक आडमुठा आहे – आणि त्याहूनही अधिक दुष्ट आहे. ” सँको म्हणाला, “ तर मग माझा मालक तुमच्या मालकासारखा नाही. त्याच्या अंगी दुष्टपणा रतिमात्र नाही. एखाद्या फुटक्या–जुन्या घड्यासारखा तो मठ्ठ आहे. तो कुणाला दुखवीत नाही– कोणाचेही शक्य तितके भले करतो. एखाद्या लहान मुलाने भर दुपारी त्याला सांगितले की, ही रात्र आहे, तर ते तो खरे मानील. तो इतका साधाभोळा आहे की, त्याच्यावर जीवाभावाने प्रेम केल्याशिवाय मला राहावत नाही. आणि त्याने कितीही वेडेचार केले तरी मी त्याला सोडू शकत नाही. ” तेव्हा तो सेवक म्हणतो, “ संभाळ रे, बाबा, जेव्हा एक आंधळा दुसऱ्याला नेत असतो, तेव्हा दोघेही खड्डयात पडण्याचा संभव असतो. सुखासमाधानाने आपण आपल्या घरी जाऊन आपल्या चुलीपाशी पुनः बसलो, म्हणजे चांगले होईल. कारण, जे लोक नाकासमोर पाहात जातात, ते बहुधा खड्डयात पडतात. ”

सँको एकसारखा थुंकत होता – आणि कोरडेपणाने थुंकत होता. ते पाहून तो वनवीराचा सेवक म्हणाला, “ मला वाटते, बंधो, आपण बडबडत असल्यामुळे आपल्या जिभा आपल्या टाळूंना चिकटत असाव्यात. तो दोष नाहीसा करण्यासाठी माझ्या खोगिराच्या शिंगाला मी एक औषधी बाटली अडकविलेली आहे. तिच्यातील पेय कोणाच्याही जिभेला पाणी सुटेल, असे आहे. ” नंतर तो आपल्या घोड्याकडे गेला आणि दारूने भरलेली चामड्याची एक बुधली त्याने काढून घेतली आणि एक गार मांस-पदार्थही घेतला. तो दीड हात लांब होता. ही काही थाप नव्हे, कारण त्या मांसाच्या तुकड्यावर सँकोने जेव्हा हात ठेवला तेव्हा त्याला वाटले, हा भाजलेला बकराच आहे–करडूं नव्हे. पण खरोखर तो एक मोठा ससा होता. तो पाहून सँकोने विचारले, “ वाः ! तुम्ही हेही येथे आपल्याबरोबर आणले आहे का ? ” तेव्हा तो सेवक आढ्यतेने

म्हणतो, "अहो, तुम्ही मला काय समजता ? मी काय नुसते ताजे पाणी घटघटा पिणारा शागीर्द आहे ? एखादा सेनापती स्वारी करावयास निघाला म्हणजे जसा आपल्या खाण्या-पिण्याची भरपूर तरतूद करतो, तशी मी माझ्या घोड्यावर बांधून घेतो." खाण्याच्या निमंत्रणाची वाट न पाहता सँको अंधारात आपल्या मुठीएवढे मांसाचे घास घेऊ लागला. खाता-खाता सँको म्हणाला, "खरोखर, तुम्ही नखशिखांत सेवेकरी आहा. जितके सच्चे तितकेच विश्वासू, जितके घट्ट तितकेच लठ्ठ आहा, जितके उदार तितकेच मनमोकळे आहा. त्याचा पुरावा म्हणजे तुमचा आनंदी स्वभाव, तो काही कोणी चेटूक करून तुमच्यामध्ये आणलेला नाही – पण, तसे काही घडले असावे असे कोणालाही वाटेल उलट, मी एक दीन–दरिद्री असा करंटा सेवक आहे. माझ्याजवळ चीजच्या ( खाऱ्या चकत्याच्या ) एका घट्ट तुकड्याशिवाय दुसरे काही नाही. आणि तो तुकडाही इतका कठीण आहे की, तो खाताना राक्षसाचेही दात मोडून पडतील. त्या-शिवाय, माझ्याजवळ थोडी ओकफळे, थोडे अक्रोड आणि थोडे शेंगदाणे आहेत. माझ्या धन्याची अशी कल्पना आहे की, शिलेदाराने सुक्या मेव्यावर आणि कच्च्या भाज्यावर राहावे. माझ्या मालकाचा कंजूषपणा आणि विचित्र लहरीपणा खरोखर लज्जास्पद आहे." तेव्हा वनवीराच्या सेवकाने उत्तर दिले, "भाई, ते ठीक आहे. आपल्या मालकांची इच्छा असेल तर त्यांनी शिलेदारीच्या नियमानुसार आहार घ्यावा. तुमची ती कंदमुळे नि पालेभाजी माझ्या पोटाला मुळीच मानवत नाहीत. मला चांगले चमचमीत मांस पाहिजे—आणि शिवाय माझ्या खोगीराच्या टोकाला ती बाटली अजून अडकविलेली आहेच. तिच्यातील मद्य म्हणजे माझा आनंद आहे, जीव की प्राण आहे, माझ्या आत्म्याची शांती आहे. क्षणोक्षणी मी त्या बाटलीला बिलगतो नि चुंबितो. तुम्ही माझे या जगातील सर्वोत्तम मित्र आहा. म्हणून तुम्हाला मी हे मद्य घेण्याची शिफारस करतो."

सँकोने ती बाटली घेतली आणि आपल्या तहानेलेल्या ओठांना लावली. त्यावेळी त्याचे डोळे आकाशातील नक्षत्रांवर खिळलेले होते. अशा सौख्यदायक ध्यानावस्थेत तो पक्का पाव तास होता. शेवटी, एक मोठा सुस्कारा टाकून आणि मान एका बाजूस झुकवून त्याने दारूचा एक घोट घेतला. त्यावेळी त्याने आपले डोळे मिचकावले व म्हटले, "वाः, वाः किती सुंदर हे मद्य !" तेव्हा वन-वीराचा सेवक म्हणाला, "मी तुम्हाला सांगितले नव्हते का ? फर्मास आहे आमची ही दारू." सँको म्हणाला, "फक्कड ! फक्कड !! फारच फक्कड !!! मी आता गडबडा लोळणार. आता मला कळले, एखाद्याची तारीफ करताना त्याला 'रांड–लेक' म्हटले तर ती त्याची स्तुती कशी होते ते : पण दोस्ता, तू आपल्या प्रियकरिणीची शपथ घेऊन सांग की, हे मद्य टयूडाड रिआल गावचे आहे की नाही ?" दुसरा सेवक उद्गारला, "बरोबर, अगदी बरोब्बर ! अचूक परीक्षा. तुमची जीभ मोठी तल्लख दिसते. तीच ती दारू आहे—अन् जुनी, मुरलेली पण आहे." सँको म्हणाला, "वाटलेच तसे मला. दारूच्या बाटल्यांच्या राशीत मला तुम्ही मोकळे सोडा म्हणजे मी प्रत्येकीची चव कशी आहे ते सांगेन. दारूच्या पेल्याजवळ

मी माझे नाक नेले रे नेले की, लगेच मी, ती कोठे तयार झाली, कोणत्या द्राक्षा-पासून तयार झाली, तिचा स्वाद कसा आहे, ती किती वर्षांची जुनी आहे, तिची ताकद किती आहे, वगैरे वगैरे सारे गुण सांगू शकेन–आणि मी हे सहज करू शकतो. कारण, ला मांचामध्ये दीर्घकाळ दारूचे जाणते म्हणून माझ्या पितृवंशातील दोन नातलग प्रसिद्ध होते. त्या दोघांपैकी एकाची गोष्ट मी तुम्हाला सांगतो. तिच्यावरुन माझे बोलणे तुम्हाला पटेल. एकदा असे घडले की, एका मोठ्या पिपातून ताजी दारू काढण्यात आली आणि तिची चव चाखण्यासाठी ती माझ्या त्या नातलगांना देण्यात आली आणि त्यांना विचारण्यात आले, ही दारू चांगली आहे की वाईट आहे ? तिचा दर्जा कोणता आहे ? ती किती जुनी आहे ? वगैरे वगैरे. एकाने केवळ जिव्हाग्राने त्या दारुची पारख केली, तर दुसऱ्याने तिचा फक्त वास घेतला. पहिला म्हणाला, या दारूला लोखंडाची चव आहे, तर दुसरा म्हणाला, मेंढ्याच्या कातडीची चव तिला आहे. कलालाने शपथ घेऊन सांगितले, " माझे भांडे स्वच्छ होते आणि त्यातील दारू इतकी शुद्ध होती की, तिला दुसऱ्या कोणत्याही वस्तूची चव येणे शक्य नाही. " झाले, दिवस चालले, दारू खपली, दारूचे पिप रिकामे होत चालले. तेव्हा त्याच्या तळाशी काय सापडले असेल, महाराज ? एक छोटी किल्ली आणि तिला बांधलेला छोटासा चामड्याचा तुकडा. इतकी चोख परीक्षा होती त्यांची. त्यावरून तुम्हीच ओळखा की, अशा कुळात जन्मलेल्या माणसाला दारूचे गुण जाणण्याची बुद्धी असेल की नाही ? " दुसरा सेवक म्हणाला, " साहसाचे प्रसंग जाणण्यापेक्षा दारूचे गुण जाणण्यात तुम्ही फार चतुर आहा. म्हणून आता पोटभर दारू प्याल्यानंतर जादा दारू मिळविण्याचे श्रम न घेता आपण आपापल्या घरी सुखाने जाऊ या आणि ईश्वराची इच्छा असेल तर, आपापल्या छोट्या खाटांवर सुखाने लोळत राहू या, " सँको म्हणाला, " सारागोस्सा येथे जाऊन पोचे-पर्यंत माझ्या धन्याबरोबर राहण्याचे मी योजले आहे. त्यानंतर मी माझ्या आयुष्याचे नवे पान उघडीन. "

शेवटी सांगायचे तर, ते दोघे सेवक–दोस्त खूप प्याले व खूप बोलले. नंतर झोपेमुळे त्यांची जीभ वळवळण्याचे थांबले. त्यांची दारूची तहान पूर्णपणे भागणे अशक्यच होते. पण ती थोडीफार शमली. त्यांचे पोट दारूने भरताक्षणीच ते दोघे गाढ झोपी गेले. जवळ जवळ रिकाम्या झालेल्या आपल्या बाटल्यावर त्यांनी आपले हात ठेवले होते. त्या दोघांना आपण तसेच विश्रांती घेण्यासाठी काही काळ मोकळे सोडू या अन् त्या दोघांच्या धन्यामध्ये काय घडले ते पाहू या.



## प्रकरण १४

# वन-वीराच्या पराक्रमाचा पुढील भाग

डॉन क्विक्झोट व वन-वीर यांच्यामध्ये पुष्कळच सुखसंवाद झाले. त्यापैकी काही असे—

वन-वीर म्हणाले, "महाराज, आपल्याला हे माहीत असले पाहिजे की, दैवाच्या योजनेमुळे असो किंवा माझ्या स्वतःच्या पसंतीमुळे असो, अप्रतिम लावण्यवती व्हॅन्डालियाची कॅसिल्डिया हिच्यावर मी भाळलो. मी तिला अप्रतिम म्हणतो, याचे कारण तिच्या शरीराचा बांधा अलौकिक आहे, एवढेच नव्हे तर, तिचा रुबाब आणि सौंदर्य हेही अलौकिक आहे. परंतु, हर्क्युलिसच्या सावत्र आईप्रमाणे मला संकटांच्या साहसात लोटण्यापलीकडे तिने माझ्या सन्मान्य भावनेची दुसरी काही कदर केली नाही. त्यापैकी एक साहस मी सुखद रीतीने सिद्धीस नेल्यानंतर तिने मला अभिवचन दिले की, असाच दुसरा पराक्रम तुम्ही गाजविला की तुमची अपेक्षा पूर्ण होईल. परंतु असंख्य साहसी कृत्यांमध्ये मी यश मिळवल्यानंतरही माझी आशा पूर्ण झालेली नाही. माझ्या न्याय्य आशा पूर्ण करण्यासाठी तिच्या कोणत्या आज्ञा मी अखेरच्या समजाव्या, हे मला कळत नाही. एकदा तिच्या खास आदेशानुसार मी सेव्हिल येथील ला गिराल्डा या सुविख्यात महामायेस आव्हान दिले. (या वीरांगनेचा पितळी पुतळा सेव्हिल येथील मनोऱ्यावर आहे.) पितळी पुतळ्याप्रमाणे ही वीररमणी सामर्थ्यशाली आणि निर्भय आहे. ती आपले स्थान बदलत नाही, पण आपले मन बदलत असते. तमाम दुनियेत तिच्याइतकी चंचल स्त्री सापडणार नाही. मी तिच्याजवळ गेलो. तिला पाहिले—आणि जिंकले. तिला मी एकेजागी उभे केले—स्थिर केले—तब्बल आठवडाभर ती तेथेच खडी होती. आकाशात उत्तरेशिवाय दुसऱ्या कोणत्याही दिशेकडून त्या काळात वारे वाहिले नाहीत. दुसऱ्या एके वेळी तिने मला आज्ञा केली की, रोमन लोकांच्या वेळेपासून गिसॅन्डो येथे दोन धिप्पाड बैलांचे जे प्रचंड पुतळे आहेत, ते तेथून हलवा.

हे काम शिलेदारापेक्षा हमालालाच अधिक शोभणारे आहे. नंतर तिने मला काब्रा येथील दरीमध्ये किंवा गुहेमध्ये उडी टाकण्याची आज्ञा केली. (किती भयानक नि अपूर्व साहस हे!) त्या भीषण दरीतील साऱ्या चमत्कारांचे वर्णन करण्यास तिने मला आज्ञापिले होते. मी ला गिराल्डा हिची हालचाल थांबविली, गिसॅन्डोच्या बैलांचे वजन जोखले आणि मोठी उडी मारून काब्राच्या भयाण दरीतील अत्यंत गूढ गोष्टी उजेडात आणल्या. पण हाय रे देवा! माझ्या आशा अद्याप मेलेल्याच आहेत. मेलेल्या कशा?

कारण, तिचा माझ्याविषयीचा तिरस्कार कायम आहे आणि त्यामुळे ती मला नवे उद्योग, नवे पराक्रम करण्याचे हुकूम देत आहे. शेवटी, तिने मला असा हुकूम दिला की, ' स्पेन देशाच्या दूरदूरच्या भागात तुम्ही संचार करा, आणि तेथे भटकत असलेल्या साऱ्या शिलेदारांकडून अशी कबुली घ्या की, सर्व स्त्रियांमध्ये माझे सौंदर्य सर्वश्रेष्ठ आहे आणि जगातील अत्यंत शूर नि प्रेमिक असे शिलेदार तुम्ही आहा !' या मोहिमेवर मी स्पेनच्या बहुतेक सर्व भागातून यापूर्वीच संचार केला आहे आणि तिच्या अद्वितीय सौंदर्याविषयीचे माझे मत खोडण्याचे धारिष्ट करणाऱ्या कैक शिलेदारांवर मी मात केली आहे. पण माझ्या कीर्तीचा किरीट म्हणजे ला मांचा येथील सुविख्यात शिलेदार डॉन क्विक्झोट याच्यावर मी मिळविलेला विजय ! त्याला मी एकाच चकमकीत धूळ चारली आणि त्याच्या डल्सिनियाचे सौंदर्य माझ्या कॅसिल्डियाच्या सौंदर्यापुढे शरण आणले. आता मी असे मानतो की, साऱ्या विश्वात भ्रमण करणारे शिलेदार माझ्या सामर्थ्यामुळे चीत झाले आहेत. कारण त्या सर्व शिलेदारांची कीर्ती, विभूती आणि मान–सन्मान या महान डॉन क्विक्झोटच्या अंगी वसत होता. त्याने आपल्या बाहुबलाने त्या सर्वांना जिंकले होते आणि युद्धातील लूट मानले होते. आता मात्र त्या शिलेदारांनी माझ्या विजयाच्या तुताऱ्या वाजविल्या पाहिजेत. जित जितका मोठा; तितका त्याच्या विजेत्याचा लौकिक मोठा, या न्यायाने माझा विजय डॉन क्विक्झोटच्या विजयापेक्षा मोठा ठरतो— त्याची सारी विजय–चिन्हे माझ्याकडे आली आहेत. ”

अशा प्रकारचे त्या शिलेदाराचे हे भाषण ऐकून डॉन क्विक्झोट आश्चर्यचकित झाले आणि ' तू खोटे बोलतोस ' असे त्याला हजार वेळा सांगावे, असे त्यांना वाटले. ते वाक्य त्यांच्या जिभेच्या शेंड्यावर घोळत होते. पण त्याला आपल्याच मुखाने आपला खोटेपणा कबूल करावयास लावावे, या विचाराने त्यांनी आपला क्रोध आवरण्याचा प्रयत्न केला. अत्यंत शांतपणे ते त्याच्याशी युक्तिवाद करू लागले व म्हणाले, “ महाशय, आपण स्पेनमधील सर्व शिलेदारांवर–कदाचित साऱ्या जगावर–विजय मिळविला असेल, त्याबद्दल मला वाद घालावयाचा नाही. परंतु, ला मांचाचा डॉन क्विक्झोट यांना आपण जिंकले म्हणता, त्याबद्दल संशय घेण्याची मुभा आपण मला द्यावी. त्याच्यासारखाच दुसरा कोणी तरी असेल. त्याच्याशी साम्य असणारे फारच थोडे लोक सापडतील. ” तेव्हा वन-वीर उत्तरला, “ म्हणता काय तुम्ही ? या तारकांकित नभोवितानाची शपथ घेऊन मी सांगतो की, मी डॉन क्विक्झोट यांच्याशी हातघाईचे युद्ध खेळलो आहे, त्यांना जिंकले आहे, त्यांना शरण आणले आहे ! कोळपलेल्या चेहेऱ्याचा, मोठ्या जबड्याचा, काटकुळा, पांढऱ्या केसाचा, ससाण्यासारखा नाक असलेला असा उंचापुरा तो शिलेदार आहे. त्याच्या मिशा लांबच लांब आणि काळ्याभोर आहेत. 'दु:खी चेहेऱ्याचा शिलेदार ' या नावाने तो ओळखला जातो. सँको पँझा नावाचा त्याचा सेवक आहे. तो कष्टाळु आहे. शिलेदाराच्या रोझिनांट नावाच्या दिगंत कीर्ती असलेल्या घोड्याची काळजी तो घेतो. डॉन क्विक्झोटची प्रेमदेवता टोबोसोची डल्सिनिया ही आहे. तिला कोणी कोणी

आल्डोन्सा लोरेन्झो म्हणतात. माझ्या प्रेम–देवतेचे नाव कॅसिल्डिया असे होते आणि ती अॅन्डालुसियाची रहिवासी आहे. पण आता व्हॅन्डालियाची कॅसिल्डिया या अभिधानाने ती सर्वश्रुत आहे. मी सांगितलेल्या या साऱ्या प्रत्ययकारी लक्षणावरून डॉन क्विक्झोटचे चित्र उभे रहात नसेल तर संशयी माणसालाही माझ्या विधानातील सत्यता पटविण्यास ही माझी समशेर सिद्ध आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "हां, हां, इतकी घाई करू नका महाराज. या मुद्यावर मी जे सांगणार आहे ते कृपा करून लक्षात घ्या. तोच डॉन क्विक्झोट साऱ्या जगातील माझा सर्वोत्तम मित्र आहे हे ध्यानात धरा. मी माझ्यावर जितके प्रेम करतो तितकेच त्याच्यावरही करतो असे म्हणता येईल. आता आपण त्याची जी लक्षणे वर्णन करून सांगितली, ती त्याच्या व्यक्तीला व परिस्थितीला इतकी जुळणारी आहेत की, तुम्ही ज्याला शरण आणले तो माणूस हाच आहे, असे कोणासही वाटावे. उलट तो तो नाही अशी माझी खात्री आहे–त्यासाठी माझ्याजवळ निरुत्तर करणारा युक्तिवाद आहे. पण पुष्कळ जादूगार त्याचे वैरी आहेत–त्यातही एक मत्सरी जादूगार त्याचा क्षणाक्षणाला छळ करीत आहे–तेव्हा त्यांच्यापैकी एखाद्याने त्याचे रूप धारण केले असेल. अखिल विश्वावर त्याने जे विलक्षण प्रभुत्व संपादन केले आहे, त्याची कीर्ती धुळीस मिळविण्यासाठी त्याच्या तोतयाला आपण नामोहरम केले असेल. आता मी आपल्याला जे सांगणार आहे, त्याची खात्री पटण्यासाठी एक ताजा प्रसंग सांगणे अवश्य आहे. अहो, दोन दिवसांपूर्वीचीच गोष्ट! या मत्सरी मांत्रिकांनी टोबोसोच्या लावण्यवती डल्सिनियाचे रूप नि शरीर इतके बदलून टाकले की, खेड्यातील एखाद्या मोलकरिणीसारखी ती क्षुद्र व हीन दिसू लागली. आणि एवढ्याने तुम्हाला आपली चूक कळून येत नसेल तर, हा पहा डॉन क्विक्झोट तुमच्यापुढे साक्षात उभा आहे. तो आपले शब्द आपल्या शस्त्रांनी खरे करण्यास सिद्ध आहे. पायी किंवा घोड्यावर बसून– अथवा तुम्हाला सोयीस्कर वाटेल त्या पद्धतीने-तो लढण्यास तयार आहे."

असे बोलून डॉन क्विक्झोट ताडकन् उठले आणि त्यांनी आपल्या तलवारीला हात घातला. त्या वनवीराच्या हालचाली व निर्धार ते पाहू लागले. परंतु अत्यंत शांत स्वरात वन–वीर म्हणाला, "महाराज, जो श्रीमंत असतो, तो कोणाचाही जामीन घेण्यास अनमान करीत नाही. ज्याने एकदा रूपांतरित डॉन क्विक्झोटला जिंकले आहे, त्याला त्याच्या मूळ रूपात तो भीत नाही. पण शिलेदारांच्या पराक्रमाला अंधार योग्य नव्हे – चोर-दरोडेखोरांना तो योग्य असेल. आपण प्रभातीच्या प्रकाशाची वाट पाहू या. म्हणजे आपल्या शौर्याला सूर्यनारायण साक्षी राहील. आपल्या सामन्याच्या अटी पुढील-प्रमाणे राहतील – जित शिलेदार जेत्या शिलेदाराच्या दयेवर पूर्णपणे अवलंबून राहील. जित्याची विल्हेवाट कशी करावी, हे जेता आपल्या बुद्धीप्रमाणे ठरवील, मात्र शिलेदारीच्या प्रतिष्ठेला न शोभेल असे काही मागून त्याने आपल्या सत्तेचा दुरुपयोग करता कामा नये." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक आहे, आपल्या अटी मला फार आवडल्या."

एवढे बोलणे झाल्यावर ते दोघेही आपापले सेवक शोधण्यासाठी निघाले. त्यांना

आढळले, तेव्हा ते मोठमोठ्याने घोरत होते. ते प्रथम झोपी गेले तेव्हा ज्या अवस्थेत होते, त्याच अवस्थेत ते आताही होते. त्या दोघा शिलेदारांनी त्या दोन सेवकांना जागे केले आणि आपले घोडे तयार ठेवण्याचे हुकूम दिले. कारण, उदयास येणाऱ्या सूर्याच्या पहिल्या किरणांना त्या शिलेदारांचा अतुल्य व रक्तपाताचा अलौकिक संग्राम पहावयास मिळणार होता. ही वार्ता कानी पडताच सँकोच्या डोक्यावर वज्राघात झाला आणि आपल्या धन्यावर कोणते संकट कोसळणार या विचाराने त्याची मति गुंग झाली. कारण वनवीराच्या शौर्याचे अतिशयोक्त वर्णन त्याच्या सेवकाकडून सँकोने ऐकले होते. पण काही न बोलता तो आपल्या सवंगड्यासह आपापली जनावरे शोधण्यास निघाला. त्याच्या जनावरांनी एकमेकांना हुंगले होते आणि ती एकमेकांच्या प्रेमात पडली होती. त्यांच्याजवळ गेल्यावर, वन-वीराचा सेवक सँकोला म्हणाला, " अरे दोस्ता, आपले मालक तर लढण्यास तयार झालेले दिसतात. म्हणून तुमच्या–माझ्यामध्येही चकमक उडाली पाहिजे. कारण आम्हा ॲन्डालुसियन्समध्ये असा प्रघात आहे की, आपले मित्र खणाखणी करीत असताना त्यांच्या मदतनिसांनी हात जोडून स्वस्थ उभे राहू नये."

तेव्हा सँको म्हणाला, "तुमच्या देशात असा प्रघात असेल. पण तो वाईट आहे असे मी तुम्हाला सांगतो. रक्ताला चटावलेल्या बदमाशाशिवाय दुसरे कोणीही या प्रघाताचे पालन करणार नाही. पण एकूण सेवकवर्गामध्ये अशी रूढि मुळीच नाही. ती असती तर माझ्या धन्याने यापूर्वीच मला तिची माहिती करून दिली असती. कारण शिलेदारीचे सारे नियम त्याला तोंडपाठ आहेत. पण समजा, असा नियम असला, तरी मी तो पाळणार नाही, हे अगदी स्पष्ट आहे. अशा शांतताप्रेमी सेवकांना जो दंड केला जातो, तो वाटल्यास मी देईन–आणि तो दंड एक शेर धान्यापेक्षा अधिक असणार नाही असे मला वाटते–आणि त्याची किंमत, माझ्या तोंडावरील जखम बांधण्यासाठी वापरलेल्या कापसापेक्षा अधिक असणार नाही. शिवाय तुम्ही माझ्याशी लढणार कसे? तलवार माझ्याजवळ कधीच नसते– मी ती कधीच बाळगलेली नाही." वनवीराचा सेवक म्हणाला, " हरकत नाही. त्यावरील एक तोडगा माझ्याजवळ आहे. माझ्याजवळ येथे तागाच्या दोन पिशव्या, सारख्या आकाराच्या आहेत. त्यातील एक तुम्ही घ्या अन् एक मी घेतो. आणि या पिशव्यांच्या शस्त्रांनी आपण एकमेकाशी लढू या." सँको म्हणाला, " वा! वा! अगदी मनापासून पसंत! अशा लढाईमुळे आपल्या अंगातील कपड्यावरील धूळ झटकली जाईल अन् आपल्या चामडीला काही इजा होणार नाही."

पण वन–वीराचा सेवक उत्तरला, " छेः! छेः! तसे मुळीच नाही. कारण, त्या पिशव्या वाऱ्याच्या झोताबरोबर मागेपुढे हलू नयेत आणि त्यांचे प्रहार अचूक व्हावेत, म्हणून आपण प्रत्येक पिशवीत पाच–सहा गुळगुळीत दगड घालू या आणि एकमेकांच्या अंगावर त्या पिशव्या कौशल्याने आदळू या. त्यामुळे आपल्याला मोठीशी दुखापत होणार नाही." तेव्हा सँको ओरडला, " काय नामी योजना! आपल्या हाडांचा खुळ-खुळा होऊ नये अन् डोक्यांचा लगदा बनू नये, म्हणून त्या पिशव्यामध्ये मऊ मऊ

लोकर अन् बारीक कातलेले तलम कापड घालणार! मोठी मजा येईल. पण मी पुनः पुनः सांगतो, त्या पिशव्या रेशमी गुंड्यांनीच भरलेल्या असल्या, तरी लढाई करण्याची लहर मला मुळीच नाही. लढू द्या आपल्या धन्यांना खुशाल अन् परलोकात वाजू द्यात त्यांच्या युद्धाच्या नौबती! आपण मात्र शक्य तो दारू पिऊ या अन् मजेत राहू या. आपल्या मृत्यूची वेळ येण्यापूर्वीच आपण आपल्या आयुष्याचा शेवट करण्यासाठी का धडपडावे? आणि पिकलेल्या फळाप्रमाणे आपोआप खाली पडणाऱ्या मान-सन्मानासाठी इतके उतावीळ का व्हावे?" वन-वीराचा सेवक म्हणाला, "तसे असेल तर आपण अर्धा-एक तास लढू या." सँकोने उत्तर दिले, "एक मिनिटही नाही. अहो, ज्याच्याबरोबर मी खातो-पितो, त्या सज्जनाशी तंटा करण्याची हिंमत मला कशी होईल? मला तुमचा काडीमात्र राग आलेला नाही. म्हणून जरी मला कोणी फाशी देणार असेल, तरी मी मुळीच लढणार नाही." तेव्हा तो सेवक म्हणाला, "एवढेच ना? तुम्हाला लौकरच पुरेसा राग येईल, असे मी खात्रीने सांगतो. आपण तिकडे जाण्यापूर्वी मी तुमच्यापुढून मोठ्या ऐटीने चालत जाईन आणि तुमच्या श्रीमुखात दोन-चार चपराका लगावीन नि तुम्हाला खाली पाडीन. त्यामुळे, आतापर्यंत उंदरासारखा झोपलेला तुमचा क्रोध खडबडून जागा होईल. हे नक्की." सँको म्हणाला, "छेः! छेः! तसे होणार नाही. माझ्याजवळ तुमच्या तोडीस तोड आहे. तुम्ही जशी युक्ती कराल, तशीच मीही करीन. तुम्ही माझा क्रोध जागृत करण्यापूर्वीच मी तुमच्या क्रोधाला गाढ झोपी जावयास लावीन. त्यामुळे तो पुनः कधी जागृत होणारच नाही-झालाच तर परलोकात होईल. तेथे सर्वांना हे माहीत आहे की, माझ्या नाकावर कोणाही माणसाची मूठ आदळणार नाही. अहो, प्रत्येक माणसाने उडी घेण्यापूर्वी आपली शक्ती अजमावावी. पुष्कळ माणसे पैका कमावण्यासाठी येतात, पण पैका गमावून घरी जातात. दुसरा माणूस काय करू शकेल, हे कोणालाच माहीत नसते. म्हणून मित्रा, प्रत्येकाने आपला क्रोध आपल्या अंतःकरणात निद्रिस्त अवस्थेत ठेवावा. धन्य आहेत ते शांतता-भक्त! धिक्कार असो शांतता-भंजकांना! कोंडलेले मांजर सिंहासारखे चवताळते. मग मी तर एक माणूस आहे. तो खवळला म्हणजे काय करील, हे कोण सांगू शकेल? म्हणून सेवकमहाशय, मी तुम्हाला इशारा देतो की, तुम्ही माझी जी कुरापत काढू इच्छिता, ती मी तुमचीच काढू शकेन." तेव्हा तो सेवक म्हणाला, "अच्छा! आता दिवस लवकरच उजाडेल. मग काय करावयाचे ते आपण पाहू."

आणि आता झाडा-झाडांवरून हजारो प्रकारचे चिमणे पक्षी किलबिल करू लागले-जणू काही आपल्या भिन्न भिन्न आनंदी स्वरांनी ते उषादेवतेला अभिवादन करीत आहेत. पूर्व दिशेच्या गवाक्षातून व कमानीतून उषेचे वाढते सौंदर्य प्रगट होत होते. तिने दंवबिंदूंनी भिजलेल्या आपल्या केशकलापातून मौक्तिकधारा खाली सोडल्या होत्या. झाडाझाडांच्या खाली वाकलेल्या पानांतून ते मोती वरखाली होत होते, आणि आपल्या तजेल ऐश्वर्याने हिरव्यागार कुरणावर चमचमत होते आणि त्या कुरणाची शोभा वाढवीत

होते. फुलझाडांचा मधुर सुगंध दरवळत होता, लहान लहान नद्या आनंदाने खळखळत होत्या, पाण्याचे झरे स्मित करीत होते, राने उत्साहाने बहरली होती आणि शेते उषा-देवतेच्या आगमनाने संपन्न झाली होती. प्रभातकालच्या या प्रकाशाने प्रत्येक वस्तू स्पष्टपणे दिसू लागली होती. पण सँकोला जी वस्तू प्रथम दिसली ती म्हणजे वन–वीराच्या सेवकाचे नाक. ते इतके मोठे होते की, त्याच्या सर्व शरीरामध्ये ते उठून दिसत होते. थोडक्यात म्हणजे त्या नाकाचा आकार अवाढव्य होता. मध्यभागी ते वाकडे होते, तिळांनी व चामखिळांनी भरलेले होते. पिवळसर सफरचंदासारखे ते पिंगट दिसत होते आणि त्याच्या तोंडाखाली दोन बोटे ते लोंबत आहे असे वाटत होते. त्या नाकाचा अवाढव्य आकार, विचित्र रंग, भलता फुगीरपणा आणि वाकडेतिकडे स्वरूप—या सर्वांमुळे तो सेवक इतका कुरूप दिसत होता की, एखाद्या फेफरे आलेल्या मुलाप्रमाणे ते नाक पाहताच सँको थरथरा कापू लागला. अशा पिशाच्चाशी सामना देण्यासाठी आपला क्रोध जागा करण्याचे त्याच्या मनात येईना. कोणी आपल्याला दोनशे रट्टे लगावले, तरी आपण रागवायचे नाही आणि या पिशाच्चाशी दोन हात करायचे नाहीत असे त्याने ठरविले.

डॉन क्विक्झोट यांनी आपल्या प्रतिस्पर्ध्यावर आपले डोळे रोखले. पण त्याच्या डोक्यावर शिरस्त्राण असल्यामुळे आणि त्याचे टोक त्याने पुढे ओढलेले असल्यामुळे त्याचा चेहरा क्विक्झोटना दिसेना. तरीसुद्धा त्यांनी हे ओळखले की, आपला प्रतिस्पर्धी फार उंच नसला तरी त्याचे अवयव बळकट आहेत. त्याने आपल्या चिलखतावर जो अंगरखा घातला होता, तो जरीचा होता. त्यावर अर्धचंद्राकृती आरशाचे बारीक बारीक तुकडे लावलेले होते. त्यामुळे त्याचा वेष मोठा चमकदार दिसत होता. त्याच्या शिर-स्त्राणावर पिवळ्या, हिरव्या व पांढऱ्या पिसांचा भला मोठा तुरा शोभत होता. त्याने आपला भाला एका झाडावर टेकून ठेवला होता. तो भाला जाडजूड व उंच होता आणि त्याचे पोलादी टोक फूटभर लांब होते. हा सारा तपशील डॉन क्विक्झोट यांनी न्याहाळला आणि त्यावरून त्यांनी असा कयास बांधला की, हा माणूस महासामर्थ्यशाली असला पाहिजे. पण त्यामुळे त्यांचे धैर्य, सँकोप्रमाणे, मुळीच गळाले नाही. उलट, वीराच्या आविर्भावाने ते म्हणाले, "हे आदर्श शिलेदारा, युद्धाची तीव्र लालसा आपल्या मनात खेळत असल्यामुळे आपण जर आमच्या विनवण्यांना भीक घालीत नसाल, तर कृपा करून आपण आपल्या शिरस्त्राणाचे टोक जरा वर उचलावे, म्हणजे मला हे ताडता येईल की, आपल्या देहाइतकेच आपले मुखही शोभिवंत आहे काय ?" तेव्हा आदर्श शिलेदाराने उत्तर दिले, "या संग्रामात तुम्ही पराभूत व्हा किंवा विजयी व्हा, माझे मुख पाहण्यास तुम्हाला संधी मिळेल. पण आताच तुमची जिज्ञासा मी तृप्त करू शकत नाही. कारण, युद्धाला एक एक क्षण विलंब करणे म्हणजे व्हँडालियाच्या सौंदर्यसंपन्न कॅसिल्डि-यावर अन्याय करणे होय, असे माझे मत आहे." डॉन क्विक्झोट उत्तरले," पण आपण घोड्यावर स्वार होईपर्यंत तुम्ही मला हे सांगा की, ज्या डॉन क्विक्झोटला जिंकल्याचा

आव तुम्ही आणला आहे तो मीच आहे काय ?" तेव्हा तो दर्पण–खचित शिलेदार म्हणाला, "याचे उत्तर मी तुम्हाला देतो. एक अंडे जितके दुसऱ्यासारखे असते, तितकेच तुम्ही मी जिंकलेल्या शिलेदारासारखे आहा. पण जादूगारांनी आपला पिच्छा पुरविला आहे, असे जे तुम्ही सांगता; ते लक्षात घेऊन मी असे ठामपणे सांगू शकत नाही की, तुम्ही तेच आहा." हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "आपली चूक झाली असेल असे तुम्ही मानता, हे मला पुरेसे आहे. पण तुमच्या साऱ्या संशयांचे निराकरण करण्यासाठी आपण आपापल्या घोड्यांवर स्वार होऊ या. जर माझे दैव, माझे शस्त्र आणि माझी हृदयदेवता माझ्या सहाय्यास धावून आले, तर तुम्हाला आपले शिरस्त्राण उचलण्यास जितका वेळ लागला असता, त्यापेक्षा कमी वेळात मी तुमचे मुख पाहीन आणि तुमची खात्री पटवीन की, ज्याच्यावर विजय मिळविल्याची भाषा तुम्ही काढता, तो डॉन क्विक्झोट मी नव्हे."

यानंतर अधिक न बोलता ते घोड्यावर स्वार झाले. सामन्यासाठी जागा शोधण्याकरता डॉन क्विक्झोट रोझिनांटवरून गरगरा फिरले–आणि दर्पणखचित शिलेदारानेहि तसेच केले. पण डॉन क्विक्झोट पंधरा–वीस पावले गेले असतील–नसतील, तोंच त्या शिलेदाराने आपल्याला हाक मारल्याचे त्यांचे कानी आले. तेव्हा दोघेही जवळ जवळ आले. वन–वीर ओरडला, "शिलेदारसाहेब, आपण ज्या अटीवर लढत आहो, त्या ध्यानात ठेवा. पराजित शिलेदाराने जेत्या शिलेदाराच्या इच्छेप्रमाणे वागले पाहिजे, ही अट मी पूर्वी सांगितलीच आहे." डॉन क्विक्झोट उत्तरले, "ते मला मान्य आहे. मात्र शिलेदारीच्या नियमाचा भंग करणारे कोणतेही बंधन जेत्या शिलेदाराने घालता कामा नये." तेव्हा दर्पण–खचित शिलेदार म्हणाला, "माझ्या म्हणण्याचा अर्थ तोच!" त्याच वेळी डॉन क्विक्झोट यांची नजर त्या शिलेदाराच्या सेवकाच्या विचित्र नाकाकडे गेली आणि सँकोइतकेच त्यांनाही त्याचे आश्चर्य वाटले– हा माणूस नसून राक्षस असावा, असे त्याना वाटले. आपल्या शत्रूवर जोराने आघात करण्यासाठी आपला धनी बरेच अंतर मोजून घेत आहे, असे सँकोला दिसले. तेव्हा त्या 'नाकेल्या' हुजऱ्यावर आपण एकट्याने विश्वास ठेवणे बरे नाही, असे त्याला वाटले. मोठ्याला जिंकणे लहानाला अवघड जाईल, अशी भीती त्याला वाटली. आणि त्या भीतीमुळे किंवा त्या हुजऱ्याच्या ठोशामुळे आपण जमिनीवर लोळत पडू, असेही त्याला वाटले. म्हणून तो आपल्या धन्याच्या मागोमाग पळत गेला. रोझिनांटच्या रिकिबीचा पट्टा क्विक्झोट हातात घेणार आणि आपल्या शत्रूवर हल्ला करण्यासाठी मागे वळणार, तोंच सँको ओरडून म्हणाला, "महाराज, आपण आपल्या शत्रूवर तुटून पडण्यापूर्वी मला त्या पलीकडच्या कॉर्क वृक्षाजवळ पोचते करा. तेथून मी आपला त्या शिलेदाराशी होत असलेला तुंबळ रण–संग्राम चांगला पाहू शकेन–तसे करणे मला फार आवडेल." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "मला वाटते, बैलांची साठमारी बिनधोकपणे पहाता यावी, म्हणून त्या दूरदूरच्या मचाणावर बसण्याची तुला इच्छा आहे."

सँको म्हणाला, " महाराज, खरे सांगायचे तर, त्या माणसाच्या अक्राळविक्राळ नाका-मुळे मी इतका घाबरून गेलो आहे की, त्याच्या आटोक्यात उभे राहण्याचे धैर्य माझ्या अंगी नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, " खरोखर, माझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही भय वाटावे, असेच ते दृश्य आहे. म्हणून ये, मी तुला दूर जाण्यास मदत करतो."

आपल्या धन्याच्या मदतीने सँको झाडावर चढत असताना, त्या दर्पण-खचित शिलेदाराने आपल्या कामासाठी योग्य तितकी जागा मोजून घेतली. डॉन क्विक्झोट यांनीही तसेच केले असेल, अशी कल्पना करून त्या वन-वीराने इकडे तिकडे पाहिले आणि आपल्या घोड्याला भरवेगात काढून आपल्या दुष्मनाशी सामना देण्यास तो निघाला. तुतारीची ललकारी किंवा युद्धाची दुसरी कोणती निशाणी होण्याची वाट त्याने पाहिली नाही. ( त्याचे घोडे रोझिनांटपेक्षा अधिक उमदे नव्हते किंवा चलाखही नव्हते. म्हणून ते हळूहळू दुडक्या चालीने चालत होते. ) पण डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाला झाडावर चढण्याचे कामी मदत करण्यात मग्न झाले आहेत, असे पाहून त्याने आपल्या घोड्याचा लगाम खेचला आणि सामना सुरू करण्याचे थांबविले. यामुळे त्याच्या घोड्याने त्यांचे फार आभार मानले असतील. कारण, आता एक पाऊलही पुढे टाकण्यास ते समर्थ नव्हते. आपला शत्रू आपल्यावर चालून आला आहे, असे डॉन क्विक्झोट यांना वाटले आणि म्हणून त्यानी रोझिनांटच्या पाठीवर जोराने टाच मारली. त्यामुळे त्या घोड्याचे तेज इतके प्रगट झाले की, (असे इतिहासात लिहिले आहे, थोडी-फार तरी दौड मारण्याच्या त्याच्या आयुष्यातला हा पहिलाच प्रसंग, एरवी दुडक्या चालीने चालणे, हाच त्याचा मोठा वेग ! ) विलक्षण त्वेषाने डॉन क्विक्झोट रण-भूमीवर जाऊन पोहोचले. तेथे त्यांचा प्रतिस्पर्धी आपल्या घोड्याच्या दोन्ही बाजूंनी जोर-जोराने टाचा मारीत होता. पण ते घोडे जाग्यावरून इंचभरही हलले नाही. तो आपल्या घोड्याला असा इशारा देत आहे आणि आपल्या भाल्याचा त्याला अडथळा होत आहे, पण तो भाला नीट हातात घेण्याइतका वेळ त्याला मिळाला नाही-ही त्याची दुर्दशा डॉन क्विक्झोट यानी लक्षात घेतली आणि बिनधोकपणे त्याच्यावर इतक्या त्वेषाने हल्ला केला की, तो दर्पण-खचित शिलेदार आपल्या घोड्याच्या चामडी पट्ट्या-वरून खाली घसरला आणि जमिनीवर कोसळला. त्यामुळे तो इतका दुखावला की, तो काहीच हालचाल करीना आणि जिवंतपणाचे कोणतेच लक्षण त्याच्यामध्ये दिसेना. तो शिलेदार खाली पडलेला पाहताच सँको झाडावरून एकदम घसरत खाली आला आणि आपल्या धन्याकडे धावत गेला. त्यावेळी डॉन क्विक्झोट घोड्यावरून खाली उतरले होते आणि त्या दर्पण-खचित शिलेदाराजवळ गेले होते. तो वनवीर जिवंत आहे की मेलेला आहे, हे पाहण्यासाठी आणि त्याला हवा मिळण्यासाठी त्यांनी त्याचे शिरस्त्राण सैल केले. तेव्हा त्यांना काय दिसले हे कोण सांगू शकेल ? वाढत्या विस्मयाने आणि उत्कंठेने त्यांनी त्या दर्पण-खचित शिलेदाराचे मुख न्याहाळले, तेव्हा त्यांना ( इतिहास असे सांगतो की ) पंडित सॅम्सन कॅरॅस्कोचेच स्वरूप, अगदी थेट तसेच शरीर, तशीच

मुद्रा, तसाच बांधा, तसेच अवयव–जणू त्याचीच प्रतिमा त्यांच्या दृष्टीस पडली. ती पाहताच डॉन क्विक्झोट ओरडले, " ये, ये, सँको, इकडे ये. हे पाहा. तुला येथे जे दिसेल त्याच्यावर तुझा विश्वास बसणार नाही. पण तरीही त्याचे कौतुक तू कर. अरे, माझ्या दोस्ता, धावत ये आणि जादूची ही शक्ती पहा–जादूगार आणि मांत्रिक लोक काय करू शकतात हे समजून घे. "

सँको जवळ गेला आणि पंडित सॅम्सन कॅरॅस्कोची मुद्रा पाहून त्याने हजार वेळा स्वतःच्या अंगावर क्रॉसची खूण केली आणि तितक्याच वेळा स्वतःला धन्य मानले. हे सर्व होईपर्यंत तो बिचारा पराभूत शिलेदार जिवंतपणाची काहीच खूण दाखवीना. तेव्हा सँको आपल्या धन्याला म्हणाला, " तुम्ही जर माझे ऐकणार असाल तर, महाराज, भल्या बुऱ्या कशाही उपायाने या प्रकरणाचा सोक्षमोक्ष करून टाका. हा जो माणूस पंडित सॅम्सन कॅरॅस्कोसारखा दिसत आहे, त्याच्या मानेत तुम्ही तलवार बेलाशक खुपसा. त्यामुळे कदाचित् तुमच्या हातून त्या भयंकर कुतरड्यांपैकी–तुम्हाला छळणाऱ्या त्या जादूगारांपैकी––एकाचा मुडदा पडेल. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " तुझा विचार काही चुकीचा नाही. " असे म्हणून त्यांनी आपली समशेर उपसली.

ते सँकोचा सल्ला कृतीत उतरविण्याच्या बेतात असताना वनवीराचा शागीर्द धावत तेथे आला. आतापर्यंत त्याला झाकून टाकणारे ते नाक आता त्याच्या शरीरावर नव्हते. डॉन क्विक्झोट यांना हाक मारून तो म्हणाला, " थांबा, थांबा, महाशय डॉन क्विक्झोट, थांबा. लक्ष द्या ! सावध व्हा ! अहो, आता आपली करुणा भाकीत येथे पडला आहे तो आपला मित्र सॅम्सन कॅरास्को हा आहे––आणि मी त्याचा शागीर्द आहे. " त्याला बे–नाक पाहून सँकोने विचारले, " तुमचे नाक कोठे आहे ? " हुजऱ्याने उत्तर दिले, " हे काय ? माझ्या खिशात ! " असे म्हणून त्याने पुठ्याचे बनविलेले आणि पूर्वी वर्णन केलेले नाक खिशातून बाहेर काढले. सँको त्याच्या चेहऱ्याकडे मोठ्या उत्कंठेने पुनः पुनः टक लावून पाहू लागला आणि म्हणाला, " आता मेरी माताच माझे रक्षण करो ! अरे, हा कोण ? माझा दोस्त अन् शेजारी–थॉमस सेसियल !" तेव्हा तो सेवक म्हणाला, " मित्रा सँको, तोच मी ! कोणत्या युक्त्या–प्रयुक्त्या करून अन् किती लाडीगोडी लावून त्याला येथे येण्यास मी प्रवृत्त केले, हे मी तुम्हाला चटकन सांगतो. तोपर्यंत तुम्ही आपल्या धन्याला आपल्या शक्तीचा दुरुपयोग न करण्यास सांगा—आपल्या पायाशी पडलेल्या दर्पण–खचित शिलेदाराला ठार न मारण्यास किंवा थोडाही धक्का न लावण्यास सांगा. कारण, हे नक्की आहे की बदसल्ला मिळालेला हा आपला ग्राम–बंधु सॅम्सन कॅरॅस्को हाच आहे—दुसरा कोणी नाही. "

या वेळेपर्यंत दर्पण–खचित शिलेदार सावध होऊ लागला होता. ते पाहून डॉन क्विक्झोट यांनी आपल्या तलवारीचे टोक त्याच्या मानेवर ठेवले आणि ओरडून म्हटले, " मर, मर, शिलेदारा, मर. सौंदर्यामध्ये टोबोसोची अप्रतिम देवता डल्सिनिया ही व्हँडालियाच्या तुझ्या कॅसिल्डियापेक्षा सरस आहे, हे कबूल करण्याचे तू नाकारीत

असशील तर मर. ( या संग्रामातून तू जर जिवानिशी सुटलास ) तर टोबोसा शहरात जाण्याचे वचन तू मला दिले पाहिजेस. तेथे गेल्यावर माझ्या स्वप्नांची सम्राज्ञी असलेल्या डल्सीनियापुढे तू हजर हो आणि ती देईल तो निर्णय मान्य कर. तिने तुला जर मोकळे सोडले तर तू मजकडे परत ये. ( माझे पराक्रम तुला वाट दाखवितील ) आणि मग तिच्यामध्ये व तुझ्यामध्ये जे काही घडले असेल, ते सारे मला निवेदन कर. संग्रामापूर्वी आपण जो करार केला, त्याला अनुसरूनच या अटी आहेत आणि त्या शिलेदारांच्या नियमांचे उल्लंघन न करणाऱ्या आहेत." तेव्हा तो पराभूत शिलेदार म्हणाला, "टोबोसोच्या डल्सीनिया देवतेचा फाटका आणि घाणेरडा बूट कॅसिल्डियाच्या स्वच्छ पण न विंचरलेल्या केश–कलापापेक्षा सरस आहे, हे मी कबूल करतो. डल्सीनियाकडे जाण्याचे आणि तेथून आपल्याकडे परत येण्याचे–तसेच आपण सांगितलेल्या सर्व कार्याचा पूर्ण व सत्य इतिहास सांगण्याचे-अभिवचन मी आपल्याला देतो." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी त्या अटीत आणखी अशी भर घातली की, "तुम्ही ज्या शिलेदाराचा पराभव केला, तो ला मांचाचा डॉन क्विक्झोट नव्हता आणि असू शकणार नाही; तो त्याच्यासारखाच दुसरा कोणी तरी असेल, हेही तुम्ही मानले पाहिजे आणि कबूल केले पाहिजे. त्याचप्रमाणे, उलट बाजूने, मी असे मानतो आणि कबूल करतो की, तुम्ही पंडित सॅम्सन कॅरस्कोसारखे दिसत असला, तरी तुम्ही ते नाही. माझ्या संतापाचा आवेश किती आहे, हे जोखण्यासाठी माझ्या शत्रूंनी दुसऱ्या कोणाला तुमच्यासारखे स्वरूप दिले असले पाहिजे. हेतु हा की, मी माझ्या पराक्रमाची कीर्ती नम्रतेने स्वीकारावी." तेव्हा वन–वीर म्हणाला, "अहो, हे सारे मला मान्य आहे आणि कबूल आहे. मी खाली पडल्यामुळे मला जी दुखापत झाली आहे, तिच्यातून मला जर उठणे शक्य असेल तर आपण मला उठण्याची परवानगी द्यावी, अशी माझी विनंती आहे. मला फार दुखापत झाली आहे."

डॉन क्विक्झोट यांनी वन–वीराचा शागीर्द थॉमस सेसियल याच्या साहाय्याने कॅरस्कोला उठून उभे राहण्यास मदत केली. ते सर्व होत असताना सँकोने आपली नजर सेसियलवर रोखली अन् त्याला हजार प्रश्न विचारले. त्यांना त्याने दिलेल्या उत्तरांमुळे सँकोची खात्री पटली की, तो खरा थॉमस सेसियल आहे. जादूगारानी दर्पण–खचित शिलेदाराचे रूपांतर सॅम्सन कॅरास्कोमध्ये केले आहे, असे त्याच्या धन्याने त्याला सांगितले असल्यामुळे, त्याच्या कल्पना–शक्तीवर तसाच ठसा उमटला आणि त्याने 'चक्षुर्वै सत्यम्।' चा पुरावा मानला नाही. सारांश, तो व त्याचा धनी हे दोघेही आपल्या चुकीच्या समजुतीचा आग्रह धरून बसले. दर्पण–खचित शिलेदार आणि त्याचा शागीर्द या दोघांचेही मन ताळ्यावर नव्हते आणि शरीर सुस्थितीत नव्हते. म्हणून त्यांनी डॉन क्विक्झोट यांना तेथे सोडले आणि आपल्या दुखावलेल्या बरगड्यांना जेथे मलम व पट्टी मिळेल अशा शहराकडे ते निघाले. डॉन क्विक्झोट आणि सँको यांनी सारागोस्साकडे आपली कूच चालू ठेवली.

□ □

प्रकरण १५

# दर्पण-खचित शिलेदार आणि त्याचा हुजऱ्या हे कोण होते, याचा वृत्तांत

डॉन क्विक्झोट अत्यंत आनंदाने आणि हर्षाने पुढे चालू लागले. दर्पण-खचित शिलेदारासारख्या शूर वीरावर आपण विजय मिळविला, याचा त्यांना मोठा अभिमान व गौरव वाटत होता. डल्सिनियाकडून आपले स्वागत कसे झाले, याचा वृत्तांत सांगण्यासाठी तो शिलेदार क्विक्झोटकडे परत येणार होता. तसा त्याने शब्द दिला होता. तो त्याने मोडला तर त्याचा शिलेदारीवरील हक्क नष्ट झाला असता. त्याच्याकडून तो वृत्तांत ऐकल्यावर क्विक्झोट यांना कळणार होते, आपली हृदय-स्वामिनी जादूच्या इंद्रजालात अद्याप अडकलेली आहे की नाही ? पण डॉन क्विक्झोट यांना हे स्वप्न पडत होते, तर दर्पण-खचित शिलेदाराला दुसरेच. त्याला सध्या एकच काळजी वाटत होती-- आणि ती म्हणजे आपल्या जखमा बऱ्या कशा होतील याची.

( येथे इतिहास-ग्रंथात असे नमूद केले आहे की, ) जेव्हा पंडित कॅरास्कोने डॉन क्विक्झोट यांना आपला पूर्वीचा शिलेदारीचा व्यवसाय पुढे चालविण्याचा सल्ला दिला, त्यापूर्वी पाद्री व न्हावी यांच्याशी त्याने वाटाघाट केली होती. दुर्दैवी साहसे शोधण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी भटकू नये आणि आपल्या घरी शांतपणे वास्तव्य करावे, यासाठी त्या तिघांनी वाटाघाट करून जो उत्तम उपाय शोधून काढला, तो हा होता. त्यांनी पुनः दूरदेशी जाऊ नये, म्हणून आपण अडथळा केला तर तो फोल ठरेल, असे कॅरास्कोला-आणि बाकीच्या दोघांनाही-वाटले. आणि म्हणून त्यांनी असे ठरविले की, आपण क्विक्झोट यांना घराबाहेर जाऊ द्यावे. व कॅरास्कोने शिलेदाराचा वेष धारण करून त्यांना रस्त्यावर भेटावे आणि त्यांच्याशी युद्ध करण्याची व रस्त्यावर भेटावे आणि त्यांच्याशी युद्ध करण्याची व त्यांना जिंकण्याची संधी साधावी, हाच उत्कृष्ट उपाय होय. हे सर्व सोंग कॅरास्को सहज पार पाडील, असे त्यांना वाटले. जिताने जेत्याच्या इच्छेप्रमाणे वागले पाहिजे, असा करार प्रथम करावा. म्हणजे कॅरास्कोने क्विक्झोटवर जय मिळविल्यानंतर, त्यांना आपल्या गावी आपल्या घरी परत जाण्याचा आदेश द्यावा. परवानगीशिवाय दोन वर्षे तेथून बाहेर जाण्याची तयारी क्विक्झोट यांनी करू नये, अशीही अट त्या करारात घालण्याचे त्या तिघांनी ठरविले. शिलेदारीच्या नियमांचे उल्लंघन आपल्याकडून होऊ नये, म्हणून डॉन क्विक्झोट कराराचे

पालन निष्ठेने करतील, याविषयी कोणासच शंका नव्हती. यावेळी तरी क्विक्झोट यांना आपल्या वेडपट छंदापासून आपण अलग करू शकू, अशी त्यांना आशा वाटत होती. ती फोल ठरली तर त्यांचा वेडेपणा घालविण्यासाठी दुसरा काही उपाय योजण्याचे त्यानी ठरविले.

कॅरास्कोने हे काम आपल्या अंगावर घेतले. त्याचा शागीर्द होण्याची तयारी सँकोच्या शेजारी थॉमस सेसियल याने दाखविली. तो आनंदी, बडबड्या व चलाख माणूस होता. पूर्वी सांगितल्याप्रमाणे सॅम्सनने वेष परिधान केला आणि थॉमस सेसियलने पुठ्याचे एक प्रचंड नाक आपल्या तोंडावर बसविले. त्यामुळे सँको त्याला भेटीत ओळखू शकणार नाही, अशी त्यांची अटकळ. नंतर ते डॉन क्विक्झोटच्या मागोमाग गेले व इतके जवळ जाऊन पोहोचले की, मृत्युराजाच्या रथाबरोबर त्यांची झटापट जेव्हा झाली, तेव्हाच त्यांना गाठण्याचे यांच्या मनात होते. शेवटी त्याना क्विक्झोट जंगलात सापडले. पुढे ते जंगल त्यांचे युद्धक्षेत्र बनले. तो तोच आहे, यावर विश्वास न ठेवण्याचा हट्ट डॉन क्विक्झोट यांनी धरला नसता तर त्या पंडिताला त्या युद्धात जबरदस्त हानी सोसावी लागली असती आणि दुसरी पदवी संपादन करण्यास तो कायमचा निकामी झाला असता.

आपल्या प्रवासातील अपयश पाहून थॉमस सेसियल म्हणाला, “कॅरास्को, आपल्याला चांगली अद्दल घडली. एखादे कार्य सुरू करणे सोपे असते, पण ते शेवटास नेणे कठीण असते. डॉन क्विक्झोट मूर्ख आहे आणि आपण शहाणे आहो, असे आपल्याला वाटते. पण तो गालातल्या गालात हसत धडधाकटपणे येथून निघून गेला आणि आपली स्वारी चांगली झोडपली गेली–उकिरड्यावर फेकली गेली. मग आता सांगा, या दोघात बडा वेडा कोण ? – ज्याला राहवत नाही म्हणून जो वेडेपणाने वागतो तो की जो मौजेने तसे वागतो तो ?” पंडिताने उत्तर दिले, “त्या दोहोंत फरक असा आहे की, मूर्खपणा केल्याशिवाय ज्याला राहवत नाही तो सदैव वेडाच राहतो. पण जो आपल्या लहरीप्रमाणे मूर्खपणाचे केवळ सोंग करतो, तो ते आपल्या इच्छेस येईल तेव्हा उतरू शकतो.” तेव्हा सेसियल म्हणाला, “आपल्याबरोबर शागीर्द म्हणून जाण्याचा मूर्खपणा करण्याचे सोंग मी खुषीने घेतले होते. आता आपल्याच म्हणण्याप्रमाणे मी ते फेकून देतो आणि घरी परत जातो.” कॅरास्कोने उत्तर दिले, “तुझ्या इच्छेप्रमाणे तू वाग, पण त्या विलक्षण वेड्याला चांगली अद्दल घडविल्याशिवाय मी घरी कधी परत जाईन, असे मानणे हा मूर्खपणा आहे. त्याचे डोके कधी ठिकाणावर येईल, अशी मला आशा नाही. पण मला केवळ सूड उगवावयाचा आहे. माझी हाडे एकसारखी ठणकत आहेत. त्यामुळे मी त्याच्यावर कोणत्याही प्रकारची दया दाखविणे शक्य नाही.”

अशा प्रकारे गप्पागोष्टी करीत ते दोघे शहरापाशी आले. सुदैवाने त्यांना हाडे बसविणारा माणूस भेटला. त्याने त्या जखमी पंडिताला थोडाफार आराम दिला. थॉमस

सेसियल तेथून निघाला आणि घरी गेला. कॅरास्को मात्र सूडाचा विचार करीत तेथेच राहिला. त्याच्यासंबंधीची माहिती या इतिहासात योग्य वेळी पुनः येईलच, पण डॉन क्विक्झोट याच्या आनंदाचे वृत्त आपल्याला सांगण्यास इतिहासकाराने विसरता कामा नये.



## प्रकरण १६

# ला मांचा येथील एका शहाण्या माणसाबरोबर डॉन क्विक्झोट यांनी कोणता व्यवहार केला, त्याचा वृत्तांत

आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे, डॉन क्विक्झोट यांनी आपला प्रवास आनंदाने व संतोषाने पुढे चालविला. त्यांनी जो विजय नुकताच संपादन केला होता, त्यामुळे ते स्वतःला या युगातील वीरोत्तम समजू लागले होते. आपले पुढील सारे पराक्रमाचे प्रसंग आपण पार पाडले आहेत आणि त्यात आपण सुखाने यशस्वी झालो आहोत असे त्यांना वाटत होते. आता त्यांनी सर्व जादूगारांना व त्यांच्या जादूला धाब्यावर बसविले होते. आपल्या मोहिमेत त्यांना जे असंख्य आघात सोसावे लागले, दगडांच्या वर्षावामुळे त्यांचे जे अर्धे–अधिक दात पडले, गुलामांनी जी कृतघ्नता दाखविली आणि यांगेसियाच्या हुंडेकऱ्यांनी जो उद्धटपणा केला आणि त्यामुळे त्यांच्या बरगड्या खिळखिळ्या झाल्या हे सारे सारे ते आता विसरले. सारांश, त्यांनी आपल्या मनाशी असा निष्कर्ष काढला की, कोणत्याही उपायाने आपण जर आपल्या पूज्य डल्सिनियाला जादूच्या जालातून सोडविले, तर या पृथ्वीतलावरील कोणाही भाग्यवान शिलेदाराला पूर्वी किंवा पुढे जो गौरव प्राप्त झाला असेल किंवा होईल, त्याचा हेवा करण्याचे आपल्याला मुळीच कारण नाही.

अशा सुखद कल्पनांमध्ये पूर्णपणे गर्क झालेल्या त्या विजयी वीराला सँको म्हणाला, " महाराज, मी माझ्या गळ्याशपथ आपल्याला सांगतो की, माझा सोबती थॉमस सेसियल याचे ते प्रचंड नि अवाढव्य नाक माझ्या डोळ्यांपुढून हालत नाही, ही एक आनंदाची गोष्ट नव्हे काय ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " अरे सँको, म्हणतोस काय ? तो आरसेबहाद्दर शिलेदार म्हणजे पंडित कॅरास्को होता आणि त्याचा शागीर्द थॉमस सेसियल होता, यावर तू अजून विश्वास ठेवतोस ? " तेव्हा सँको म्हणाला, " याबद्दल काय म्हणावे हे मला कळत नाही. पण मी खात्रीपूर्वक हे सांगतो की, माझ्या घराच्या नि माझ्या कुटुंबाच्या ज्या खाणाखुणा त्याने सांगितल्या, त्या सेसियलशिवाय दुसऱ्या कोणास सांगता येणार नाहीत. शिवाय, जेव्हा त्याचे धिप्पाड नाक बाजूस गेले, तेव्हा त्याचा चेहरा थेट टॉम सेसियलसारखा बालंबाल होता. ते साम्य मी चटकन् ओळखले. कारण, तो चेहरा मी शेकडो वेळा पाहिलेला आहे. आम्ही दोघे शेजारी-शेजारीच आहोत ना, तेव्हा तो फारच थोडे बोलत असे. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " चल, ये, सँको, या प्रकरणाचा आपण ऊहापोह

करू या. माझ्याशी युद्ध करण्याच्या हेतूने, एखाद्या शिलेदाराप्रमाणे नखशिखांत सशस्त्र होऊन, सॅम्सन कॅरास्को येथे येईल, अशी कल्पना कोणाच्या डोक्यात कशी येऊ शकेल? मी त्याचा कधी वैरी होतो का ? किंवा त्याने माझा वैरी व्हावे, असे मी काही केले आहे का ? मी त्याचा प्रतिस्पर्धी आहे का ? मी माझ्या समशेरीच्या बळावर जो लौकिक संपादन केला आहे, त्याचा हेवा वाटून त्याने हा मार्ग स्वीकारला आहे काय ? " सँकोने उत्तर दिले, " असे म्हणता होय ? मग मी विचारतो, हा जो कोणी शिलेदार आहे, त्याचे पंडित कॅरास्कोशी इतके साम्य कसे ? आणि त्याचा शागीर्द नि माझा शेजारी यांच्यामध्येही इतके साम्य कसे ? आपण म्हणता ही सारी जादू आहे ! पण, जगात या दोघांशिवाय दुसरे, एकसारखे दिसणारे, लोक नव्हते काय ? " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " छेः छेः, ही सारी त्या मत्सरी मांत्रिकांची लबाड युक्ती आहे. ते माझा पिच्छा पुरवीत आहेत, मी विजयी होणार हे आधी ओळखून त्यांनी आपली लूट, माझ्या त्या पंडित मित्राचें साम्य धारण करणाऱ्या माणसाजवळ, लपवून ठेवली. त्या पंडिताला पाहताच माझी मैत्रीची भावना उसळून येईल आणि माझ्या खड्गाची धार बोथट करील नि माझा सात्त्विक संताप सौम्य बनवील, आणि त्यामुळे, मी त्याला --माझ्या प्राणांवर नीचपणाने उठलेल्या त्या शिलेदाराला--मृत्यूच्या जबड्यातून सोडवीन, अशी त्या मांत्रिकाची अटकळ असावी ! आणि सँको, तुला आता अनुभव आलाच आहे--तो तुला फसवू शकत नाही. कोणाचाही चेहरा दुसऱ्याच्या चेहऱ्या-सारखा करणे--सुरूपाचा कुरूप नि कुरूपाचा सुरूप करणे--ही गोष्ट मांत्रिकांना किती सहजपणे करता येते, याचा अनुभव तू घेतला आहेसच. दोनच दिवसांपूर्वी तू आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी अद्वितीय डल्सीनियाला, तिच्या नैसर्गिक सौंदर्यासह आणि डौलदार शरीरासह, पाहिले होतेस ना ? पण या मांत्रिकाच्या मत्सरामुळे मला ती प्रियतमा दिसली, ती साध्या पोशाखातील एखाद्या खेडवळ कुरूप तरुणीसारखी–डोळ्यातून आसवे गळत आहेत, आणि अंगाला दुर्गंधी सुटली आहे, अशा स्वरूपात मला ती दिसली. मग त्या पंडिताचे आणि तुझा शेजारी सेसियल याचे भीषण रूपांतर झाले, म्हणून तुला एवढे आश्चर्य का वाटावे ? पण ते काही असो, माझ्या वैऱ्याने कोणतेही रूप धारण केले, तरी मी त्याच्यावर मात केली, ही मला समाधानाची गोष्ट वाटते. " तेव्हा सँको म्हणाला, " या साऱ्या प्रकरणातील सत्य काय आहे, हे परमेश्वरालाच माहीत ! " एवढेच उत्तर देणे योग्य आहे, असे त्याला वाटले. कारण, डल्सिनियाचे रूपांतर आपल्याच क्लृप्तीने झाले, हे त्याला माहीत होते. आपल्या धन्याच्या कल्पना-तरंगावर तो फारसा संतुष्ट नव्हता. तरी ते संभाषण पुढे चालविण्यास तो उत्सुक होता. पण आपली लबाडी उघडकीस आणणारा एखादा शब्द तोंडावाटे काढण्यास तो धजला नाही.

अशा तऱ्हेने त्यांचे संभाषण चालू असताना तेथे एक गृहस्थ आला. तो एक पिसवा असलेल्या नामी घोडीवर बसलेला होता. त्याच्या अंगावर हिरव्यागार कापडाचा

प्रवासी पोशाख होता आणि त्याच रंगाची शिकारी टोपी डोक्यावर होती. त्याच्या घोडीचे सारे सामान खेडेगावी होते आणि छोटया तटटूला शोभण्यासारखे होते. तेही हिरव्या रंगाचे होते. हिरव्या व सोनेरी रंगाच्या मोठ्या पट्ट्याला मूर देशाची एक छोटी तलवार लटकलेली होती. त्याचे बूटही त्या पट्ट्यासारखेच होते. त्याच्या रिकिबींना हिरवा रंग चांगला दिलेला होता, आणि त्यामुळे इतर सामानाबरोबर त्या छान शोभत होत्या. त्या शुद्ध सोन्याच्या असत्या, तरी इतक्या चांगल्या दिसल्या नसत्या. तो गृहस्थ त्यांच्याजवळ आला आणि अत्यंत नम्रतेने त्याने त्यांना सलाम केला. आपल्या घोडीला टाच मारून तो त्यांना मागे टाकण्याच्या तयारीत होता. तेव्हा डॉन क्विक्झोट यानी त्याला हाक मारून म्हटले, " महाशय, आपण जर फार घाईत नसाल तर, आपण या रस्त्याने प्रवास करीत असताना अ पल्या संगतीचा लाभ आपण आम्हाला दिल्यास आम्हाला आनंद वाटेल. " तेव्हा त्या गृहस्थाने उत्तर दिले, " खरोखर, मला तुम्हाला टाळावयाचे नव्हते. पण मला अशी भीती वाटत होती की, तुमचा घोडा माझ्या घोडीला पाहताच अनावर होईल. " सँको म्हणाला, " एवढेच ना ? मग तुम्ही आपली घोडी आवरून धरा. कारण, आमचा घोडा तमाम दुनियेत अत्यंत प्रामाणिक आणि शांत असा घोडा आहे. अशा प्रसंगी खोडसाळपणा करण्याची त्याला मुळीच सवय नाही. एकदा काय झाले ? तो स्वतःला विसरला आणि वाट सोडून दुसरीकडे गेला. तेव्हा तो, मी आणि माझा धनी तिघांनाही पुरा पस्तावा झाला. म्हणून महाराज, मी आपल्याला सांगतो की, आपल्याला इच्छा असेल तर, आपण खुशाल थांबावे. आपल्या घोडीला एखाद्या ताटात घालून ते ताट आमच्या घोड्यापुढे धरले, तरी तो तिला स्पर्शही करणार नाही, असे मी माझ्या गळ्याची शपथ घेऊन सांगतो. "

यानंतर त्या मुशाफिराने आपली घोडी थांबविली आणि आपले शिलेदार डॉन क्विक्झोट यांच्या आकृतीकडे आणि मुद्रेकडे टक लावून पाहिले. त्यावेळी त्यांचे शिरस्त्राण डोक्यावर नव्हते. ते सँकोच्या गाढवावरील खोगिराच्या शेंड्याला, चामडी पिशवीप्रमाणे, अडकविले होते. हिरव्या वेषातील तो गृहस्थ डॉन क्विक्झोटकडे जसा टक लावून पहात होता, तसेच डॉन क्विक्झोट त्याच्याकडे पहात होते. 'ही कोणी तरी बडी असामी आहे.' असे त्याना वाटत होते. त्याचे वय सुमारे पन्नास वर्षांचे दिसत होते. त्याचे काही केस करडे झालेले होते. त्याची नजर तीक्ष्ण होती. त्याचे एकंदर स्वरूप गंभीर पण आल्हादकारक होते. थोडक्यात म्हणजे त्याची ढब आणि स्वरूप गुणी माणसाला शोभेल, अशी होती. त्याने जेव्हा डॉन क्विक्झोटकडे रोखून पाहिले, तेव्हा त्याला वाटले, अशा विचित्र स्वरूपाचा माणूस यापूर्वी आपण कधीच पाहिला नव्हता. त्याच्या घोड्याचा सडपातळपणा पाहून त्याला मोठे कौतुक वाटले. त्याच्यावर स्वार झालेला उंच पाठीचा व हाडे वर आलेला शिलेदार–त्याची फिकट–किरकोळ मुद्रा, त्या मुद्रेवरील निस्तेज कांती, त्याचे गांभीर्य, त्याची शस्त्रे आणि इतर सामानसुमान—अशी व्यक्ति त्या प्रदेशात आपण पूर्वी कधीच पाहिली नाही, असे त्याला वाटले. हा मुशाफिर आपल्याला इतक्या बारकाईने न्याहाळत

आहे, हे पाहून आणि त्याच्या आश्चर्यचकित मुद्रेवरून त्याची इच्छा ताडून, डॉन क्विक्झोट स्वतःच त्याला आपला परिचय करून देऊ लागले. ते सौजन्य–मूर्ती होते आणि सर्वांना संतुष्ट करण्याचा त्यांना छंद होता. म्हणून त्या गृहस्थाने प्रश्न विचारीपर्यंत न थांबता क्विक्झोट म्हणाले, " माझ्या आकृतीकडे पाहून, आपल्याला आश्चर्य वाटत असेल. माझे स्वरूप नवखे नि निराळे असल्यामुळे मला आपल्या आश्चर्याचे नवल वाटत नाही. पण साहसांच्या शोधार्थ संचार करणाऱ्या शिलेदारांपैकी मी एक आहे, असे मी आपल्याला सांगितले तर आपले आश्चर्य ओसरेल. मी माझा देश सोडला, माझी माल-मत्ता गहाण टाकली, माझ्या सुखसोयींवर पाणी सोडले आणि स्वतःला नियतीच्या चरणावर झोकून दिले. शिलेदारीची परंपरा जगातून किती तरी काळ नष्ट झालेली आहे, तिला नवजीवन देण्याचा माझा हेतू आहे. आणि म्हणून, अनंत यातना व संकटे सोसून, अडखळत–धडपडत चालून, कोठे संकटाच्या खाईत उडी घेऊन तर कोठे संकटातून वर येऊन, मी माझ्या इच्छेची बहुतांशी पूर्तता केली आहे. विधवांचे दुःख हरण करून, युवतींचे संरक्षण करून, सुवासिनींना नि त्यांच्या अर्भकांना मदत करून, ( शिलेदाराची ही सारी स्वाभाविक नि समुचित कार्ये होत ). आणि ख्रिश्चनाला शोभेल असे वीरश्रीचे विपुल पराक्रम करून, मी जगातील बहुतेक सर्व देशामधील ग्रंथात प्रसिद्ध होण्याच्या पात्रतेचा ठरलो आहे. माझ्या इतिहासाचे तीस हजार खंड आतापर्यंत प्रसिद्ध झालेले आहेत–आणि दैव आडवे आले नाही तर, आणखी तीन कोटी खंड प्रसिद्ध होणार आहेत. हे सारे एका शब्दात सांगावयाचे तर, मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. त्यालाच ' दुःखी चेहेऱ्याचा शिलेदार ' म्हणतात. आपण स्वतःच आपल्या गौरव-ग्रंथाचे स्तवन करण्याने त्या गौरवाची किंमत कमी होते, हे मी मान्य करतो. पण मला न्याय देणारा कोणीही माणूस अस्तित्वात नसल्याने मलाच हे काम करावे लागले आहे. मी कोण आहे आणि कोणता व्यवसाय करतो, हे आता आपल्याला माहीत झाले आहे. म्हणून महाराज, हा घोडा, हा भाला, ही ढाल, हे चिलखत, हा सेवक आणि माझ्या नजरेतील हा फिकटपणा किंवा माझ्या शरीरातील हा थकवा–यामुळे आपण माझे कौतुक करण्याचे काहीच कारण नाही. "

एवढे बोलून डॉन क्विक्झोट गप्प बसले. हिरव्या वेशातील गृहस्थाने उत्तर देण्याचे लांबणीवर टाकले–जणू काही उत्तर देण्याचे त्याच्या मनातच नव्हते. पण शेवटी अंमळ थांबून तो म्हणाला, " महाराज, माझ्या नजरेवरून माझी जिज्ञासा आपण जाणली. आपण कोण आहो हे आपण मला सांगितल्यानंतर माझे आश्चर्य ओसरेल असे सांगण्याची आपण कृपा केली. पण मी हे कबूल केले पाहिजे की, आपल्या निवेदनामुळे माझे आश्चर्य मुळीच ओसरलेले नाही. मी पूर्वीइतकाच स्तिमित झालेलो आहे. कारण, सध्याच्या काळी जगात कोणी शिलेदार असणे शक्य आहे काय ? आणि विद्यमान शिलेदाराचा खरा इतिहास छापलेला असणे शक्य आहे काय ? विधवांचे दुःख हरण करणारा, युवतींचे संरक्षण करणारा किंवा सुवासिनींना आणि त्यांच्या अर्भकांना मदत

करणारा कोणी माणूस सांप्रत पृथ्वीतलावर असेल असे मानण्यास माझे मन घेत नाही. आपल्यासारख्या व्यक्तीचे दर्शन माझ्या डोळ्यांना घडले नसते तर माझे तेच मत अद्याप कायम राहिले असते. आपल्या खऱ्याखुऱ्या आणि उदात्त पराक्रमांचा जो इतिहास छापला जात आहे असे आपण म्हणता, त्यामुळे पूर्वीच्या ढोंगी शिलेदारांच्या साऱ्या ऐदी प्रणय–कथांचे जनतेला विस्मरण होईल, याबद्दल मी परमेश्वराला धन्यवाद देतो. कारण आतापर्यंत जगामध्ये ज्यांचा सुळसुळाट होता आणि ज्यांनी आतापर्यंत जगाचा उच्छाद मांडला होता, त्या शिलेदारांनीच चांगल्या शिक्षणाची हानी केली आहे आणि खऱ्या इतिहासाला काळिमा फासला आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, "शिलेदारीच्या इतिहासातील सत्यासंबंधी अनुकूल आणि प्रतिकूल पुष्कळच बोलण्यासारखे आहे." तेव्हा त्या हिरव्या वेशातील गृहस्थाने विचारले, "काय? ते इतिहास खोटे नाहीत, असे त्रिवार म्हणणारा एक तरी प्राणी जिवंत आहे आहे?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "होय महाराज, मी तरी एक आहे. पण जाऊ द्या ते. पुनः आपण जर कधी काळी रस्त्यावरून एकत्र प्रवास केला, तर त्या इतिहासावर सामान्यतः अविश्वास दाखविणाऱ्या माणसांच्या प्रवाहात तुम्ही सापडले आहात, अशी मी तुमची खात्री पटवून देईन–आणि त्या अविश्वासाबद्दल तुम्हीच दोषी ठराल."

हे भाषण ऐकून त्या प्रवाश्याला असा संशय आला की, डॉन क्विक्झोटचे डोके फिरले असावे. आपले हे मत बरोबर आहे की नाही, हे त्यांच्या पुढील भाषणावरून कळेल, अशी त्याची अपेक्षा. पण त्यांचे पुढील संभाषण सुरू होण्यापूर्वीच डॉन क्विक्झोट यांनी त्याला नम्रतेने विनंती केली की, "महाराज, आता आपण आपली जानपछान करून द्या. मी माझ्या जीवनाचा नि परिस्थितीचा थोडाफार वृत्तांत आपल्याला निवेदन केला आहे." तेव्हा तो गृहस्थ म्हणाला, "दुःखी चेहऱ्याचे शिलेदारसाहेब, मी खेड्यात जन्मलेला एक माणूस आहे. ईश्वराची इच्छा असेल तर आपण दोघे त्या खेड्यात लवकरच जेवण करू. माझे नाव मिरांडा येथील डॉन डीएगो असे आहे. मी एक बऱ्यापैकी स्थितीतला आहे. माझी बायको, माझी मुले आणि माझे मित्र यांच्याबरोबर मी माझा काळ संतोषाने घालवितो. शिकार करणे आणि मासे पकडणे — ही माझी नित्याची करमणूक. पण मी त्यासाठी ससाणे किंवा शिकारी कुत्रे बाळगीत नाही. पण माणसाळलेले काही तितिरपक्षी आणि मुंगसासारखे एक फेरेट नावाचे जनावर मी बाळगले आहेत. माझ्याजवळ शे–पाऊणशे पुस्तके आहेत– त्यातील काही स्पॅनिश भाषेत आहेत, तर काही लॅटिन भाषेत आहेत– काही इतिहासाची आहेत आणि बाकीची धार्मिक आहेत. पण शिलेदारीच्या पुस्तकांसंबंधी म्हणाल तर, त्यापैकी एकही माझ्या घरात कधी आले नाही. भावभक्तीची पुस्तके वाचण्यापेक्षा पाखंडी पुस्तके वाचण्याकडे माझा अधिक कल आहे. मात्र त्या पुस्तकांची भाषा–शैली आवडणारी असली पाहिजे, आणि त्यातील नवनवे विचार चकित करणारे असले पाहिजेत अन् त्या सर्वांमुळे त्या पुस्तकापासून निरागस करमणूक झाली पाहिजे. पण अशी पुस्तके आपल्या भाषेत फारच थोडी

आहेत. काही वेळा मी माझ्या शेजाऱ्याकडे आणि मित्राकडे जेवावयास जातो आणि पुष्कळ वेळा मी त्यांना माझ्या घरी जेवावयास बोलावतो. माझ्या घरचे जेवण स्वच्छ आणि सुंदर असते. ते कंजूषपणाचे नसते की उधळेपणाचे नसते. मला कोणाविरुद्ध कुर-कुरण्याची किंवा त्याला चिमटे घेण्याची खोड नाही, आणि दुसऱ्या कोणी तसे केले तर ते ऐकण्याची मला आवड नाही. दुसऱ्यांच्या आयुष्याची आणि कृत्यांची चांभारचौकशी करण्याची मला सवय नाही. मी ' दैवी प्रार्थना ' दररोज श्रवण करतो, आणि गरीबांना दान करतो, पण त्याचा गाजावाजा करीत नाही किंवा माझ्या सत्कृत्यांचा गैरफायदा मी घेत नाही. कारण, मी तसे केल्यास माझ्या अंगी ढोंगीपणा नि बढाईखोरपणा हे दोष येतील. हे दोष अत्यंत सावध असणाऱ्या थोर माणसांच्या अंतःकरणातही शिरतात आणि त्यांचे वैरी बनतात. ज्यांच्यामध्ये छत्तिसाचा आकडा आहे, त्यांचा समेट घडवून आणण्याचा प्रयत्न मी करतो. ' कुमारी माते 'ची मी भक्ती करतो आणि प्रभूच्या अपार करुणेवर निरंतर विश्वास ठेवतो. " त्या गृहस्थाने आपला जो जीवनमार्ग निवेदन केला तो सँको अत्यंत उत्सुकतेने ऐकत होता. इतके मंगल नि पवित्र जीवन घालविणार माणूस चमत्कार करू शकेल असा सँकोला विश्वास वाटला. म्हणून तो आपल्या गाढवा-वरून ताडकन् उडी मारून खाली उतरला. त्याची उजवी रिकीब हातात धरून, डोळ्यात आसवे आणून आणि हृदयात भक्ती फुलवून, तो त्या गृहस्थाच्या पाया पडला आणि त्याच्या पायाचे चुंबन घेऊ लागला. त्यामुळे चकित होऊन तो गृहस्थ ओरडून म्हणाला, " मित्रा, काय आहे हे ? या पदचुंबनाचा अर्थ काय ? " तेव्हा सँको म्हणाला, " मला आपल्या प्रिय चरणांचे चुंबन घेऊ द्या. माझी आपल्याला तशी प्रार्थना आहे. कारण, मी माझ्या उभ्या आयुष्यात अश्वारूढ असा पहिलाच संत आपल्या रूपाने पहात आहे. " तेव्हा त्या गृहस्थाने उत्तर दिले, " छेः छेः ! मी संत कुठला ? मी महा–पापी आहे. मित्रा, तुझ्या साध्या वागणुकीवरून तू भला माणूस आहेस, असे मला वाटते. "

एवढे बोलून सँको आपल्या गाढवाच्या खोगिराजवळ परत गेला. या त्याच्या कृतीमुळे त्याच्या धन्याचे गांभीर्य मोडले आणि तो हसू लागला. डॉन डीएगोला त्याच्या-विषयी नवेच कौतुक वाटू लागले. नंतर डॉन क्विक्झोट यांनी त्या गृहस्थाला विचारले, " आपल्याला मुले किती आहेत ? " आणि त्याबरोबरच त्यांनी त्या गृहस्थाला सांगितले, " प्राचीन तत्त्ववेत्त्यांना ईश्वराचे सत्य ज्ञान नव्हते. ज्या गोष्टीपासून सुख मिळत असे त्या निसर्गाने किंवा दैवाने दिलेल्या असे ते मानीत. अशा सौख्यदायक गोष्टी म्हणजे पुष्कळ मित्र असणे आणि असंख्य सद्गुणी मुले असणे. " तेव्हा त्या गृहस्थाने उत्तर दिले, " महाराज, मला एक मुलगा आहे. पण तो नसता तरी मी स्वतःला अधिक दुःखी मानले नसते. ह्याचा अर्थ तो वाईट आहे, असा नव्हे, पण मला हवा होता तितका तो चांगलाही नाही. तो अठरा वर्षांचा आहे. आपला लॅटिन व ग्रीक भाषांचा अभ्यास पूर्ण करण्यासाठी त्याने गेली सहा वर्षे सॅलामँका येथे काढली. त्याने इतर शास्त्रांचा अभ्यास पुढे करावा, अशी माझी इच्छा होती. पण त्याला काव्य हेच

शास्त्र वाटू लागले आणि त्यात तो रममाण झाला, तो इतका की, कायद्याच्या अभ्यासा-कडे त्याने वळावे असा माझा मानस होता पण तो त्याकडे ढुंकूनही पाहीना आणि सर्व विद्यांतील राज-विद्या असणाऱ्या धर्मशास्त्राकडेही तो नजर टाकीना. तो आपल्या कुळाला भूषण ठरेल, अशी मला आशा होती. शुभ नि पवित्र साहित्य राजे लोकांना फार आवडते आणि त्याला ते चांगले बक्षीसही देतात, असा हा काळ आहे. पावित्र्या-विना विद्या म्हणजे उकिरड्यावरील रत्न. आता तो आपले सारे दिवस याच विचारात घालवीत असतो की, 'इलियड' ची विशिष्ट कविता होमरने चांगली लिहिली आहे की नाही? मार्शलच्या वाङ्मयातील एखादे सुभाषित अश्लीलतेसाठी गाळले पाहिजे की काय? व्हर्जिलच्या कवितांचा अर्थ असा होतो की तसा? सारांश, होरेस नि पर्सिअस, जुव्हेनल नि टिबुलस– अशा सुप्रसिद्ध कवीशी त्याचा सारा संवाद चाललेला असतो. पण आधुनिक कवीविषयी त्याचे मत तितकेसे चांगले नाही. स्पॅनिश कवितेसंबंधी तर त्याला तिटकारा आहे. तरीही विद्यापीठाकडून त्याच्याकडे ज्या चार कविता आल्या आहेत, त्यांचे रूपांतर करण्यासाठी किंवा त्यावर टीपा लिहिण्यासाठी तो सध्या आपले डोके फोडून घेत आहे. त्या चार कविताना बक्षीस लावलेले आहे, असे मला वाटते."

डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, "महाराज, मुले ही आपल्या आई-बापांच्या हाडामांसाची असतात. ती भलीबुरी कशीही असोत, ती आपलीच आहेत, असे मानून आपण त्यांचे कौतुक केले पाहिजे. त्यांच्या अगदी कोवळ्या वयापासून त्यांना पावित्र्य, शिस्त इत्यादि खिस्ती तत्त्वांच्या दिशेने शिक्षण देऊन वाढविले पाहिजे. म्हणजे, ती मुले वयाने वाढल्यानंतर आपल्या आईबापाचे आधार बनतात आणि आपल्या वंशजांना चांगला किता घालून देतात. मात्र हा किंवा तो अभ्यास करण्याची सक्ती त्यांच्यावर करणे मला फारसे मान्य नाही. अशा वेळी त्यांचे मन वळविणे हाच योग्य मार्ग आहे असे मला वाटते. त्यांच्या चरितार्थाची काळजी घेणारे पालक त्यांना लाभले असतील, तर पोटासाठी अभ्यास करण्याचे दुर्भाग्य त्यांच्या कपाळी येणार नाही. म्हणून माझे मत असे की, त्यांच्या बुद्धीचा जास्तीत जास्त कल ज्या शास्त्राकडे असेल, त्यांची उपासना करण्याचे त्यांना स्वातंत्र्य असावे. काव्य-कला ही जितकी आल्हाददायक आहे, तितकी लाभदायक नाही, हे खरे. पण तिच्यामुळे कोणा बुद्धिमान पंडिताला कमीपणा येईल असेही नाही. मेहेरबान, माझ्या दृष्टीने तर, कविता म्हणजे ऐन यौवनातील कोमल कुमारिका—दुसऱ्याला मुग्ध करण्याइतकी सुंदर नि आकर्षक. इतर सर्व शास्त्रे म्हणजे तितक्या कुमारिकाच होत. त्यांचे कर्तव्य त्या कविता-कामिनीला समृद्ध, सुसंस्कृत नि सालंकृत करणे, हे असते. ती कविता अन्य सर्व शास्त्रांचा उपयोग करीत असल्या-मुळे तिने त्यांच्याशी कृतज्ञतेने राहिले पाहिजे. पण या कविता-कामिनीला धसमुसळे-पणाने वागविता कामा नये, रस्त्यावर फरफटत नेता कामा नये, बाजारात विक्रीसाठी ती मांडता कामा नये आणि थोरामोठ्यांच्या प्रासादात ती सांदी-कोपऱ्यास पडता कामा नये. चांगला कवी हा एक प्रकारचा किमयागार असतो. तो कोणत्याही वस्तूचे रूपांतर

शुद्ध सोन्यात करू शकतो आणि मग ते काव्य म्हणजे एक अमूल्य ठेवा बनते. मात्र त्याने आपली प्रतिभा सभ्यतेच्या कक्षेत ठेवली पाहिजे.—तिला अश्लील किंवा निंदा-प्रचुर विषयात त्याने स्वैर सोडता कामा नये आणि अनैतिक सुनीतामध्ये संचार करण्यास मुभा देता कामा नये. कवीने आपल्या कलेला वारांगना बनवू नये-भाडोत्री ठरवू नये.

"पराक्रमाचे पोवाडे, गंभीर शोकांतिका व कलात्मक आनंद देणाऱ्या सुखात्मिका यांच्यापासून मिळणारा फायदा तिने टाकून देण्याचे कारण नाही. टवाळांनी किंवा अडाणी गावढळांनी काव्य करण्याचा प्रयत्न करू नये. कारण, काव्यामध्ये जे ऐश्वर्य साठवलेले असते, त्याचे सम्यक् ज्ञान त्यांना कधीच होणे शक्य नसते. आणि महाराज, हे आपण लक्षात घ्या की, मी जेव्हा 'गावढळ' म्हणतो, तेव्हा केवळ 'खेडेगावचा बहुजन-समाज' असा माझा अर्थ नसतो. जो जो म्हणून अज्ञानी आहे—मग तो सरदार असो की राजा असो—त्याची गणना गावढळातच करावयास हवी. पण, सत्कवीच्या अंगी जे जे गुण असावेत म्हणून मी सांगितले, ते जो कोणी आपल्या काव्यात ओतील, त्याचे नाव जगातील सर्व सुसंस्कृत देशात चांगले गाजेल, आणि त्याला मोठे मोल प्राप्त होईल. महाशय, आपले चिरंजीव आधुनिक काव्याला फारसे महत्त्व देत नाहीत असे आपण म्हणता. त्याबद्दल तोच काहीसा दोषी आहे असे माझे मत आहे. अन् त्याचे कारण हे की, होमर ग्रीसचा रहिवासी असल्यामुळे त्याने लॅटिन भाषेत कधी काही लिहिले नाही. तसेच व्हर्जिलने ग्रीक भाषेमध्ये काही लिहिले नाही. कारण त्याच्या देशाची भाषा लॅटिन ही होती. सारांश, तुमच्या साऱ्या प्राचीन कवींनी आपापल्या मातृभाषेतच लिहिले आणि आपले उत्तुंग विचार व्यक्त करण्यासाठी अन्य भाषा कधी शोधल्या नाहीत. असा प्रघात प्रत्येक राष्ट्रात पडला तर चांगलेच होईल. एखाद्या जर्मन कवीने आपल्या भाषेत काही रचना केली म्हणून त्याला तुच्छ समजण्याचे काहीच कारण नाही. तसेच कॅस्टिलियन किंवा बिस्केनर कवीने स्वभाषेत काव्य लिहिले म्हणून ते अवहेलनेस पात्र ठरत नाहीत. परंतु मला असे वाटते की, आपल्या चिरंजीवांना आधुनिक काव्याची नावड नसावी, तर जे अर्वाचीन कवी आपल्या उपजत प्रेरणेला, अन्य भाषांच्या किंवा शास्त्रांच्या सुगंधाने जागृत किंवा संपन्न करीत नाहीत, त्यांच्याबद्दल त्याला नावड असावी. तशी नावड असणेही चुकीचे ठरण्याचा संभव आहे. कारण असे मानले जाते—आणि त्याला सबळ कारणही आहे—की, कवी हा जन्मतःच कवी असतो—मातेच्या गर्भात असल्यापासून तो कवी असतो. ईश्वराने दिलेल्या बुद्धीच्या बळावर, कोणत्याही अभ्यासाविना वा कलेविना, तो अशी काही रचना निर्माण करू शकतो की, त्यामुळे 'कवि जन्मजात असावा लागतो' ही म्हण सार्थ ठरते. जो मूळचा कवी आहे, तो कलेच्या अभ्यासाने आपली काव्य-रचना सुधारू शकतो. ज्याच्या अंगी काही काव्य-गुण नाहीत पण केवळ काव्यशास्त्राच्या अभ्यासाने जो कविता करतो, त्याच्यावर तो उपजत कवी ताण करू शकतो. कारण, कला ही निसर्गाच्या पलीकडे जाऊ शकत नाही—फक्त त्याच्या पूर्णतेला सहाय्य करते. यावरून असे दिसते की,

ज्याच्या ठायी निसर्ग नि कला यांचा संगम झाला आहे, तो पूर्ण कवी. म्हणून तुमच्या मुलाला त्याच्या वाटेने पुढे जाऊ द्या आणि आपल्या नशिबाप्रमाणे चालू द्या. तो चांगला विद्यार्थी आहे, असे मी समजतो—शास्त्रांची तोंडओळख आणि संपन्न भाषांचे ज्ञान त्याला झालेले असल्यामुळे तो विद्वत्तेच्या शिखरावर सहजच जाऊन पोचेल—आणि तो मान नि ते भूषण कोणाही सद्गृहस्थाला मोठे वाटावे असेच आहे. धर्मगुरूच्या डोक्यावरील टोपी किंवा नागरिकाच्या अंगावरील लांब झगा, याप्रमाणेच तो मान मोलाचा आहे. एखाद्या माणसाच्या कीर्तीला कलंक लावण्यासाठी आपले चिरंजीव जर विडंबनकाव्य लिहीत असतील तर आपण त्याची खरमरीत हजेरी घेऊन त्याला बदनाम करणाऱ्या त्याच्या कविता टराटर फाडून टाकता ना? पण होरेसने मोठ्या कौशल्याने जसे केले तसे आपले चिरंजीव, समाजातील सर्वमान्य दुर्गुण उघडकीस आणण्यासाठी, ते हास्यास्पद ठरविण्यासाठी, काव्यरचना करीत असतील, तर त्यांना आपण जरूर उत्तेजन द्या. कारण मत्सर आणि मत्सरी माणसे—तसेच इतर दुर्गुण—यांच्यावर हल्ला चढविण्यास कवीच्या लेखणीला मुभा असते. मात्र त्याने विशिष्ट व्यक्तीवर रोख धरता कामा नये. पण टवाळी करण्याची आपली खाज शमविण्याची खोड काही कवींना इतकी लागलेली असते की, एखादी हलकट कोटी करण्याचे ते कधीच सोडीत नाहीत—मग त्यापायी पॉंटसच्या बेटात हद्दपार व्हावे लागले तरी बेहत्तर. एखादा कवी आपल्या वर्तनात नम्र असेल, तर तो त्याच्या काव्यातही तसाच असेल. कारण, लेखणी ही मनाची जिव्हा होय. म्हणून मनामध्ये जे विचार निर्माण होतात आणि लेखनात जे चितारले जातात, त्यांच्यामध्ये विलक्षण साम्य असते. जेव्हा कोणाची अलौकिक काव्य—कला गंभीर, भरीव नि पवित्र अशा विषयांमध्ये चमकत असलेली राजे—महाराजाच्या दृष्टीस पडते, तेव्हा ते तिचा सन्मान करतात, तिला प्रतिष्ठा मिळवून देतात आणि तिला संपन्न करतात, एवढेच नव्हे तर, वज्राघाताने न भंगणाऱ्या वृक्षाच्या पर्णसंभाराने त्या कवींना विभूषित करतात. अशा तऱ्हेने भूषित व सन्मानित झालेल्या कवींना कोणीही काहीही अपाय करू शकणार नाही, याचे ते एक चिन्हच होय."

अशा प्रकारे डॉन क्विक्झोट आपल्या मनीचे विचार बोलून दाखवीत असताना त्या गृहस्थाला इतके आश्चर्य वाटले की, पूर्वी डॉन क्विक्झोटच्या बुद्धिमत्तेबद्दल त्याचे जे वाईट मत झाले होते, ते हळुहळू बदलू लागले. आपल्या धन्याच्या त्या सुंदर भाषणाचे मर्म सँकोला फारसे कळले नाही. म्हणून ते भाषण मध्यावर आले असताना त्याने तेथून गुपचुप दूर जाण्याची संधी साधली. जवळच असलेल्या काही धनगरांकडून त्याच्या शेळ्यांचे थोडेसे दूध मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला. डॉन क्विक्झोट यांच्या समंजस विचारांनी अत्यंत संतुष्ट होऊन तो गृहस्थ आपला संवाद पुढे चालविणार होता. पण त्याचवेळी डॉन क्विक्झोट यांनी आपली नजर वर उचलली असताना त्यांना रस्त्यावर एक गाडी दिसली. तिच्यावर लहान—लहान निशाणे लावलेली होती. ती निशाणे राजाची असावीत, असे दिसत होते. नव्या पराक्रमाची संधी आपल्याकडे चालून

आलेली आहे, असे वाटून त्यांनी सँकोला आपले शिरस्त्राण आणण्यास फर्माविले. त्यांची उंच हाक ऐकून सँकोने त्या धनगरांचा निरोप घेतला आणि आपल्या गाढवाच्या दोन्ही बाजूंना जोराने टाचा मारल्या व तो आपल्या धन्याजवळ दुडदुडत येऊन पोचला. अत्यंत भयानक आणि निर्वाणीचा पराक्रम दाखविण्याची संधी त्याच्यापुढे आता खडी होती.



## प्रकरण १७

# सिंहाच्या झुंजीत यश मिळविण्यासाठी महान् डॉन क्विक्झोट यांनी जे अतर्क्य व अपूर्व धैर्य प्रगट केले त्याचा श्रेष्ठ पुरावा.

इतिहास असे सांगतो की, जेव्हा डॉन क्विक्झोट यांनी सँकोला हाक मारली, तेव्हा तो दही मिळविण्यासाठी खटपट करीत होता. आपल्या धन्याला घाई झाली आहे, हें पाहिल्यावर आपण काय करावे, हे त्याला कळेना. (त्याने दह्याची किंमत दिलेली असल्या- मुळे ) दही गमावण्यास तो नाखूष होता, म्हणून त्याने आपल्या जवळच्या शिरस्त्राणात दही घेतले आणि आपल्या धन्याची मर्जी काय आहे, हे जाणण्यासाठी तो त्याच्याकडे गेला. तो तेथे पोहोचताच डॉन क्विक्झोट म्हणाले, " मित्रा, ते शिरस्त्राण मला दे. मला जर साहसाचे काही कळत असेल, तर तिकडे पलीकडे साहस दाखविण्याजोगा प्रसंग उभा आहे आणि त्यासाठी मी शस्त्र–सज्ज झाले पाहिजे, असे मला दिसते. " हिरव्या वेषातील गृहस्थाने हे ऐकून, हे काय चालले आहे, हे पाहण्यासाठी इतस्ततः नजर टाकली. पण आपल्याकडे येणाऱ्या गाडीशिवाय दुसरे काहीच त्याला दिसले नाही. त्या गाडीवरील छोटी छोटी निशाणे पाहून त्याने ती गाडी राजाची असावी असे ठरविले आणि डॉन क्विक्झोट यांना तसे सांगितले. परंतु पराक्रमाच्या कल्पनांनी त्यांचे मस्तक इतके भणाणून गेले होते की, त्या गृहस्थाने जे सांगितले, त्याचे श्रेय त्यांनी त्याला दिले नाही. डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, " महाराज, 'आधी मिळे सूचना, तो करी पूर्वयोजना.' कोणीही माणूस सावध राहिल्याने, त्याचे काहीच नुकसान होत नाही. दृश्य नि अदृश्य असे पुष्कळ शत्रू मला आहेत, हे मी अनुभवावरून शिकलो आहे. ते शत्रु माझ्यावर केव्हा, कोठे, कोणत्या स्वरूपाने हल्ला करतील, हे मी सांगू शकत नाही. " असे म्हणून त्यांनी सँकोच्या हातातील शिरस्त्राण एकदम हिसकावून घेतले आणि त्यात काय आहे, हे न पाहता आपल्या डोक्यावर चढविले. सँकोला शिरस्त्राणातून दही बाहेर काढण्यास वेळच मिळाला नाही. क्विक्झोटचे बोडके डोके आणि शिरस्त्राणाचे पोलाद यांच्यामध्ये ते दही चिमटले गेले आणि त्याचे पाणी क्विक्झोटच्या साऱ्या तोंडावरून नि दाढीवरून वाहू लागले. त्यामुळे ते गोंधळले आणि सँकोला घाईघाईने हाक मारून त्यांनी विचारले, " सँको, हे काय ? मला काय झाले आहे ? अरे, माझा मेंदू वितळत आहे की माझी माझी कवटी पाघळत आहे, कां मला नखशिखांत घाम फुटला आहे ? जर असेल, तर तो भीतीने आलेला नाही, याची मला खात्री आहे. खरोखर अत्यंत भीषण

प्रसंग आपल्यावर चालून येत आहे. हा घाम तुला जर पुसता येत नसेल, तर तो पुसण्यासाठी मला काही कपडा दे. कारण, या घामाच्या लोंढ्यामुळे मी जवळजवळ आंधळा झालो आहे. ”

सँको एक शब्दही बोलण्यास धजला नाही. त्याने त्यांना कापडाचा एक तुकडा दिला. आपण काय करीत होतो, हे आपल्या धन्याला कळले नाही, म्हणून त्याने आपल्या दैवाला धन्यवाद दिले. डॉन क्विक्झोट यांनी आपले सर्वांग कोरडे केले. आपल्या मस्तकावर इतके थंडगार काय होते, हे जाणण्यासाठी त्यांनी शिरस्त्राण काढून घेतले आणि त्यातील पांढरा–स्वच्छ पदार्थ आपल्या नाकाशी धरला नि तो काय आहे, हे चटकन ओळखले. तेव्हा ते गरजले, “ अरे बेइमान दुष्टा ! अरे आडमुठ्या सेवका ! मी टोबोसाच्या डलसिनियाची शपथ घेऊन सांगतो की, तू माझ्या शिरस्त्राणात दही ठेवले होतेस. ” सँकोने आपला चेहेरा तसाच ठेवून मोठ्या चातुर्याने उत्तर दिले, “ नाही महाराज. ते जर दही असेल, तर मला ते द्या–मी खाऊन टाकतो. पण थांबा, विचारांती मला असे वाटते की, खुद्द सैतानाने ते तेथे ठेवले असेल आणि म्हणून ते त्यालाच खाऊ द्या. काय ? मी आपली पाशवी चेष्टा करीन ? मला काहीच शिष्टाचार नाही, असे आपल्याला वाटते काय ? मेहेरबान, मी जिवंत आहे, हे जितके खरे आहे, तितकेच माझा द्वेष करणारे काही जादूगार आहेत, हेही खरे आहे. मी आपला सेवक आहे, म्हणून ते मला छळतात. आपल्याला माझ्याविरुद्ध उठविण्यासाठी आणि आपण माझ्या हाडांचा खुळखुळा करावा, यासाठी त्यांनीच तो घाणेरडा माल तेथे मुद्दाम ठेवला असेल, असे मी खात्रीने सांगतो. पण खरोखर, यावेळी त्यांचा नेम चुकला, असे मला वाटते. माझा धनी समंजस आहे. त्याला हे माहीत आहे की, माझ्याजवळ दही नाही की दूध नाही की दुसरा कोणताच पदार्थ नाही. मला जर दही मिळाले असते तर ते माझ्या धन्याच्या शिर-स्त्राणात ठेवण्याऐवजी मी ते तत्काळ माझ्या पोटात ठेवले असते.” तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, “ ठीक ! तू म्हणतोस त्यात काही तथ्य असेल. ”

ही प्रश्नोत्तरे ऐकून तो गृहस्थ चकित होऊन उभा राहिला—आणि त्यानंतर लगेच जे घडले, त्याने तर तो विशेषच विस्मयचकित झाला. कारण, आमच्या शिलेदार-साहेबानी ते शिरस्त्राण पुनः आपल्या डोक्यावर चढविले, रिकीबीत पाय घट्ट ठेवले, आपली समशेर म्यानातून झटदिशी उपसता येईल की नाही, हे पाहिले आणि आपला भाला बाजूस ठेवला व ते गरजले, “ आता काहीही होवो ! मी येथे उभा आहे. प्रत्यक्ष सैतान सगुण–साकार होऊन पुढे आला तरी त्याच्याशी सामना करण्यास मी सिद्ध आहे ! ” यावेळेपर्यंत ती गाडी त्यांच्याजवळ आली. एका खेचरावर बसलेला एक गाडीवान ती हाकीत होता, आणि दुसरा माणूस गाडीच्या पुढच्या भागावर बसलेला होता. त्यांना वाट देऊन डॉन क्विक्झोटनी विचारले, “ दोस्तानो, कोठे चालला ? ही गाडी कसली आहे ? तिच्यातून तुम्ही काय नेत आहा ? आणि या रंगी–बेरंगी निशाणांचा अर्थ काय ? ” तेव्हा गाडीवानाने उत्तर दिले, “ ही गाडी माझी आहे आणि तिच्यात

दोन शूर सिंह आहेत. ओरानच्या सेनापतीने ते आमच्या धन्याकडे–राजेसाहेबाकडे–पाठविले आहेत. गाडीतून काही जे जात आहे, ते राजेसाहेबांचे आहे, हे लोकाना कळावे म्हणून गाडीवर ही रंगी–बेरंगी निशाणे लावलेली आहेत." डॉन क्विक्झोट यांनी चौकशी केली, "ते सिंह मोठे आहेत काय?" गाडीच्या धुरेवर बसलेल्या माणसाने उत्तर दिले, "फार, फार मोठे आहेत ते. त्याहून मोठे सिंह आफ्रिकेतून स्पेनमध्ये यापूर्वी कधीच आलेले नाहीत. मी त्यांचा व्यवस्थापक आहे. दुसरेही पुष्कळ सिंह माझ्या ताब्यात होते. पण या सिंहांसारखे सिंह मी पूर्वी कधीच पाहिले नाहीत. पुढच्या पिंजऱ्यात नर आहे आणि मागच्यात मादी आहे. आज त्यांनी कांही खाल्ले नाही. म्हणून ते भयंकर भुकेलेले आहेत. म्हणून महाराज, आपण दूर व्हा, अशी माझी विनंती आहे. त्या सिंहाना आम्ही जेथे खाऊ घालण्याचे योजिले आहे, तेथे जाऊन पोहोचण्याची जलदी आम्ही केली पाहिजे." तेव्हा डॉन क्विक्झोट तुच्छतेचे स्मित करीत म्हणाले, "काय? सिंहाचे छावे अन् माझ्याविरुद्ध? अहो, म्हणता काय? माझ्याशी ते छोटे छावे लढत देणार? आणि यावेळी? ठीक आहे! ज्यांनी आपले सिंह या रस्त्याने पाठविले, त्या गृहस्थांना हे कळले पाहिजे की, सिंहाला घाबरणारा मी माणूस नव्हे. भल्या माणसांनो, येथून चालते व्हा. तुम्ही व्यवस्थापक आहा ना? मग, त्यांचे पिंजरे उघडा अन् त्या दोन्ही सिंहांना बाहेर येऊ द्या. माझी परीक्षा पाहण्यासाठी ज्या जादूगारांनी सिंह इकडे पाठविले आहेत, त्यांना, ला मांचाचा डॉन क्विक्झोट कोण आहे, हे याच शेतात मी पटवून देईन."

"आपण कोण आहो? हे या गरीब बिचाऱ्या शिलेदाराला आता कळले आहे आणि डोक्यावरील दह्याने त्याची कवटी मऊ नी डोके नरम झाले आहे." असे तो गृहस्थ आपल्या मनात म्हणाला. त्याचा असा विचार चालू असतानाच सँको त्याचेकडे गेला, आणि आपल्या धन्याला त्याच्या अविचारी प्रयत्नापासून परावृत्त करण्याची विनंती सँकोने त्यांना केली व तो म्हणाला, "अहो, प्रिय महाशय, त्या सिंहावर माझे धनी तुटून पडणार आहेत, त्यांना कसेही करून थोपवा. म्हणजे ती मोठी दया होईल. नाही तर आपले तुकडे–तुकडे होतील." तेव्हा तो गृहस्थ म्हणाला, "काय? तुझा धनी इतका इरसाल वेडा आहे काय की अशा उग्र पशूवर तो हल्ला करील, अशी भीती तुला वाटावी?" सँको म्हणाला, "काय सांगू, महाराज? तो वेडा नाही, पण बेफाम धाडसी आहे." तेव्हा तो गृहस्थ उत्तरला, "त्यांना काही अपाय न व्हावा, याची काळजी मी घेईन." म्हणून तो डॉन क्विक्झोटकडे गेला. त्यावेळी ते सिंहाच्या व्यवस्थापकाला पिंजरा उघडण्याचा आग्रह करीत होते. त्यांना तो गृहस्थ म्हणाला, "महाशय, शिलेदारांनी साहसे करावीत. पण ती अशी असावीत की, त्यातून ते सुरक्षितपणे बाहेर येण्याची थोडी–फार तरी आशा असावी. ज्यात पूर्ण निराशाच होण्याचा संभव आहे, अशी साहसी कृत्ये त्यांनी करू नयेत. कारण जे धैर्य नव्हे–वेडे साहस ठरण्याचा संभव आहे–ते खरे धैर्यच नव्हे–वेडेपण होय. शिवाय, हे सिंह काही तुमच्यावर

चालून आले नाहीत. राजाला नजराणा म्हणून ते पाठविलेले आहेत. म्हणून त्यांना थांबवून धरणे किंवा त्यांची गाडी थोपविणे हा काही सन्मार्ग नव्हे." "अहो, गोड स्वभावाचे महाराज," डॉन क्विक्झोट उत्तरले, "आपण येथून निघून जा आणि आपल्या गोड गोड चिमण्या-सश्याबरोबर मौजेने खेळत राहा. ज्याला त्याला आपले काम करू द्या. हे काम माझे आहे. हे बहाद्दर सिंह माझ्याशी लढण्यासाठी पाठविले आहेत की नाहीत ? हे मला चांगले कळते." नंतर व्यवस्थापकाकडे वळून ते म्हणाले, "अरे बदमाषा ! उघड ते पिंजरे ताबडतोब. नाही तर मी माझ्या भाल्याने तुला या गाडीत खिळून-खोचून ठेवीन, हे मी शपथेवर सांगतो."

त्या विलक्षण नि सशस्त्र पिशाच्चाचा तो निर्धार ऐकून गाडीवान ओरडला, "भल्या गृहस्था, माझ्यावर दया कर आणि मला माझी खेचरे प्रथम बाहेर नेऊ दे, म्हणजे हे सिंह बाहेर पडेपर्यंत मी त्या खेचरासह शक्य तितक्या त्वरेने धोक्यातून निसटेन. एकदा का ते सिंह त्या बिचाऱ्या खेचरावर तुटून पडले, म्हणजे माझा कायमचा सत्यानाश होईल. अहो, काय सांगू ? ही गाडी आणि ही खेचरे – हीच काय ती माझे पोट भरण्याची साधने जगात आहेत." तेव्हा डॉन क्विक्झोट खेकसले, "अरे भेकडा, नेभळटा ! घेऊन जा ती खेचरे ताबडतोब तुला वाटेल तिकडे. पण तुला लवकरच कळून येईल की, अशी सावधगिरी तू घेण्याचे काहीच कारण नव्हते आणि हा सारा खटाटोप तुला टाळता आला असता." तेव्हा आपली खेचरे बाहेर नेण्याची गाडीवानाने जास्तीत जास्त जलदी केली. त्यावेळी व्यवस्थापक शक्य तितक्या मोठ्या आवाजात ओरडत होता, "अहो, येथे जमलेल्या सर्व माणसांनो, हे पिंजरे उघडून त्यातील सिंह मोकळे सोडण्यास हा मला माझ्या इच्छेविरुद्ध भाग पडत आहे, याला तुम्ही साक्ष आहा. यापुढे हे मोकळे झालेले सिंह जे जे म्हणून उत्पात करतील आणि हानी करतील, माझा मुशाहिरा नि माझी फी यांची जी हानी होईल त्या सर्वांची जबाबदारी या गृहस्थावर राहील, हे मी त्याला बजावून सांगत आहे. आणि महाराज, मी पिंजरे उघडण्यापूर्वी आपण शक्य त्या त्वरेने येथून दूर जावे. माझ्यासंबंधी म्हणाल तर, हे सिंह मला काही अपाय करणार नाहीत, हे मला माहीत आहे." त्या गृहस्थाने डॉन क्विक्झोट यांना ती वेडपट गोष्ट करण्यापासून परावृत्त करण्याचा पुनः एकदा प्रयत्न केला, आणि तो म्हणाला, "असा महान अनर्थ आपल्यावर अकारण ओढवून घेऊन आपण मृत्यूला आमंत्रण देत आहा." याला डॉन क्विक्झोट यांनी काहीच उत्तर दिले नाही. आपल्याला काय करावयाचे आहे, ते त्यांना माहीत होते. तो गृहस्थ पुनः म्हणाला, "आपण काय करीत आहा, याचा विचार करा. खचित आपण फार मोठी चूक करीत आहा." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "बरं आहे, महाराज, जे कृत्य शोकदायक होईल असे तुम्हाला वाटते, ते आपण पाहू नये, अशी जर तुमची इच्छा असेल तर आपल्या घोडीला तुम्ही टाच मारा आणि आपल्या सुरक्षितपणाची तरतूद करा."

हे सारे बोलणे ऐकून व डोळ्यांत पाणी आणून सँको आपल्या धन्याकडे गेला आणि म्हणाला, " मालक, असले हे दारुण कृत्य करू नका. यापूर्वी आपण आपल्या आयुष्यात पवनचक्क्या, कापड–गिरण्या वगैरेंचे जे आघात सोसले, ते सारे आताच्या प्रसंगापुढे पोरखेळ आहेत. महाराज, या प्रकारात जादूबिदू काही नाही, हे लक्षात घ्या. पिंजऱ्यांच्या फटीतून मी आत्ताच डोकावून पाहिले, तेव्हा मला खऱ्या सिंहाचा पंजा दिसला, अशी मला खात्री वाटते. आणि तो पंजा तरी केवढा हो ? तो ज्याचा असेल, तो सिंह डोंगराएवढा मोठा असेल, असे मला वाटते. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरेरे ! गरीब बिचारा सँको ! तुझ्या भीतीमुळे तो सिंह अर्ध्या पृथ्वीएवढा मोठा होईल. जा, सँको जा, तूं मला येथे सोडून जा. मी जर येथे पतन पावलो, तर आपला जुना करार तुझ्या ध्यानात आहेच. डल्सिनियाकडे प्रयाण कर, एवढेच मी सांगतो. " आणखीहि कांहीबाही ते बोलले. त्यावरून ते आपला वेडपट विचार सोडतील, या आशेच्या ठिकऱ्या झाल्या. हिरव्या वेषातील गृहस्थाने त्यांना विरोध केला असता, पण त्यांच्याजवळ अधिक शस्त्रे आहेत, हे पाहून आणि वेडया माणसाशी सामना करणे शहाणपणाचे नाही, असा विचार करून त्याने आपल्या घोडीवरून पळ काढण्याची संधी साधली. डॉन क्विक्झोट व्यवस्थापकाला दम देतच होते. सँकोने आपल्या गाढवावरून पळ काढला आणि गाडीवानाने आपल्या खेचरांवरून धूम ठोकली. सिंह मोकळे सुटण्यापूर्वी त्यांच्या गाडीपासून आपण शक्य तितके दूर जाण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न प्रत्येकजण करीत होता. बिचाऱ्या सँकोला वाटले, सिंहानी आपल्या मालकाला आपल्या पंजात पकडले आहे आणि त्याची शंभरी भरली आहे. आपल्या धन्याच्या मृत्यूमुळे तो गळा काढून रडू लागला आणि आपल्या दुर्दैवाला शिव्या देऊ लागला. ' कोणत्या क्षणी मी माझ्या धन्याच्या सेवेला पुनः आलो ? ' असे तो तळमळून बोलू लागला. असे त्याचे क्रंदन नि आक्रंदन चालू असतानाच, त्या सिंहापासून शक्य तितक्या त्वरेने दूर जाण्यासाठी त्याने बिचाऱ्या गाढवाला चमकावले. पळ काढलेली माणसे चांगली दूर गेलेली आहेत, हे पाहून तो व्यवस्थापक डॉन क्विक्झोटशी पूर्वीप्रमाणेच पुनः युक्तिवाद करू लागला आणि विनवण्या करू लागला. पण शिलेदारजींनी त्याला पुनः सांगितले, " तुमची सारी कारणे नि विनवण्या व्यर्थ आहेत. आता चकार शब्द काढू नका. तत्काळ येथून हला. " पुढील पिंजरा उघडण्यास व्यवस्थापकाला वेळ लागला. तोपर्यंत डॉन क्विक्झोट स्वतःशीच वाद करीत होते, आपण सिंहावर पायी उभे राहून हल्ला करावा की घोडयावरून ? पूर्ण विचारांती त्यांनी असे ठरविले की, पायी उभे राहूनच हल्ला करावा. नाही तर सिंहाची सवय नसलेला रोझिनांट त्याना पाहून सैरावैरा धावत सुटेल. म्हणून त्यांनी आपल्या घोडयाला मोकळे सोडले, आपला भाला बाजूस फेकला, आपली ढाल हातात घट्ट धरली आणि आपली समशेर बाहेर काढली. नंतर विचारपूर्वक पावले टाकीत, निर्भय अंतःकरणाने आणि ईश्वरावर व नंतर लेडी डल्सिनियावर हवाला ठेवून, ते त्या पिंजऱ्याच्या अगदी दाराशी उभे राहिले.

[ येथे या सत्यनिष्ठ इतिहासाच्या लेखकाला कथा–कथनाचा धागा तोडल्याशिवाय रहावले नाही. आश्चर्यचकित होऊन आणि आनंदाने व उत्साहाने ओसंडून जाऊन, इतिहासकाराने पुढील उद्‌गार काढले आहेत–" अरे अत्यंत उदार वीरा! शूर नि असीम धाडसी डॉन क्विक्झोट डी ला मांचा! अरे शौर्याच्या भव्य आदर्शा! सर्व स्पॅनिश शिलेदारांचा अलंकार नि मानबिंदू असणारा डॉन इम्यान्युएल डी लिअन याचा तू दुसरा अवतारच आहेस. तुझ्या या विस्मयकारक कृत्याचे वर्णन मी कोणत्या शब्दाने करू? त्याचे चित्रण मी कोणत्या रंगाने करू? खरोखर, तुझे हे साहस मानवी शक्तीच्या पलीकडचे आहे. त्याची सत्यता पुढील पिढ्यांना पटविण्यासाठी मी कोणती भाषा वापरू? अरे, तुझ्या श्रेष्ठ गुणांची प्रशंसा करण्यासाठी मी कोणते शब्द घडवू? आणि त्या गुणांची स्तुति–स्तोत्रे मी कशी रचूं? मी अतिशयोक्तीची कितीही रास रचली, तरी ती तुझ्या गुणांपुढे ठेंगणीच ठरेल! अरे, तू एकाकी, पायी, एका हातात फारशी धार नसलेली तलवार, आणि दुसऱ्या हातात फारशी भक्कम नसलेली ढाल. अशा अवस्थेत असूनही, केवळ आपल्या निर्भयतेच्या नि उदात्ततेच्या बळावर तू दोन प्रचंड सिंहांच्या रानटी शक्तीशी टक्कर देण्यास उभा आहेस, हे केवढे आश्चर्य! लिबियाच्या वाळवंटात एवढे प्रचंड सिंह कधीच गरजले नाहीत. ला मांचाच्या बहाद्दर मर्दा! तुझी अतुल्य कृत्येच तुझी स्तुती योग्य प्रकारे करू शकतील आणि जगाला स्तिमित करतील. ती स्तुती ऐकून कीर्ति–देवतेचे तोंडच बंद होईल. महाकाव्याचा विषय होऊ शकणाऱ्या या तुझ्या पराक्रमाचे वर्णन करण्यास माझ्याजवळ पुरेशी शक्ती नाही. " इतिहासकाराचे आश्चर्योद्‌गार येथे संपले आणि येथून इतिहास पुढे चालू झाला. ]

डॉन क्विक्झोट यांचा तो पवित्रा पाहून, आणि सिंहांना बाहेर न काढणे अशक्य आहे—कारण, तसे केल्यास या बेफाम शिलेदाराचा राग ओढवून घ्यावा लागेल—हे जाणून, त्या व्यवस्थापकाने पुढील पिंजऱ्याचे दार सताड उघडले. तेथे मी सांगितल्या-प्रमाणे, सिंहाचा नर होता. त्याचे स्वरूप राक्षसासारखे प्रचंड होते आणि अत्यंत भीषण होते. त्या सिंहाने पहिली गोष्ट ही केली की, आपल्या पिंजऱ्यात तो लोळला आणि वाटोळ्या फेऱ्या मारू लागला. नंतर त्याने आपला एक पंजा ताणला, आपले दात बाहेर काढले आणि आळस देऊन तो जागा झाला. त्यानंतर त्याने बराच वेळ तोंड उघडले आणि जांभई दिली व आपले भयंकर सुळे दाखविले. नंतर आपली भली रुंद अशी जीभ त्याने फूट–दीड फूट बाहेर काढली आणि त्या जिभेने आपल्या डोळ्यांतील व चेहऱ्यावरील धूळ चाटली. एवढे केल्यानंतर त्याने आपले डोके पिंजऱ्याबाहेर काढले आणि आपल्या डोळ्यांनी तो टक लावून पाहू लागला. ते डोळे म्हणजे अग्नीचे दोन धगधगीत निखारेच! प्रत्यक्ष धैर्य–देवतेच्या उरात धडकी भरवील, असे ते दृश्य आणि ती हालचाल! पण, डॉन क्विक्झोट फक्त टक लावून तिकडे पहात होते. आपला उग्र प्रतिस्पर्धी आपल्या स्थानापासून उडी घेऊन बाहेर केव्हा पडतो आणि आपल्या आटो-क्यात केव्हा येतो, म्हणजे आपण आपले शौर्य दाखवू आणि या राक्षसाचे तुकडे–तुकडे

करून टाकू, अशी आशा ते करीत होते. त्यांच्या मूर्खपणामुळे अशा आशेच्या उंच मनोऱ्यावर ते जाऊन बसले होते. पण त्यांच्या पोकळ डौलाची नि पराक्रमाची काहीच दखल त्या उदार सिंहाने घेतली नाही तो जितका गर्विष्ठ होता, त्यापेक्षा अधिक सौम्य होता. थोडा वेळ इकडे-तिकडे पाहून त्याने आपली शेपटी हालविली आणि आपले ढुंगण डॉन क्विक्झोट यांना दाखविले. नंतर ती स्वारी आपल्या खोलीमध्ये अत्यंत संतुष्टपणाने पडून राहिली. हे पाहून डॉन क्विक्झोट यांनी व्यवस्थापकाला हुकूम दिला, "तू आपल्या काठीने त्याला डिवचून उठव आणि त्याची इच्छा असो-नसो, त्याला बाहेर येण्यास भाग पाड." तेव्हा व्यवस्थापकाने उत्तर दिले, "छेः छेः महाराज, मी असे करू शकत नाही. तसे केले तर मी प्राणास मुकेन. मी जर त्याला डिवचले, तर तो प्रथम माझेच तुकडे तुकडे करील, ही मला खात्री आहे. महाराज, आजच्या दिवसाचे आपले काम झाले, असे समजून आपण संतोष मानावा, असा माझा सल्ला आहे. ज्याच्या खांद्यावर डोके आहे, असा वीराग्रणीही एवढेच करू शकेल. यापुढे आता जाऊ नका, अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. पिंजऱ्याचे दार उघडलेले आहे आणि त्याच्याबाहेर येणे न येणे सिंहाच्या मर्जीवर आहे. आपण त्याची वाट पाहिली. पण तो आपल्या चेहऱ्याकडे नजर टाकण्याची पर्वा करीत नाही. पहिल्या प्रथम तो पिंजऱ्यातून बाहेर आला नाही, यावरून आज सबंध दिवस तो बाहेर पडणार नाही, असे मी खात्रीने सांगतो. आपण आपले महान् धैर्य पुष्कळच प्रगट केले आहे. आपल्या शत्रूला आव्हान देऊन त्याची रणक्षेत्रावर वाट पाहण्यापेक्षा अधिक काही करणे, हे कोणाचेही कर्तव्य नसते. सिंह जर बाहेर आला नाही, तर तो त्याचा दोष होय. आव्हान देणाऱ्याला मान मिळेल आणि ते न स्वीकारणाऱ्याची छीः थू होईल."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "खरे आहे. इमानी दोस्ता, चल, पिंजऱ्याचे दार बंद कर आणि मी काय केल्याचे तू पाहिले आहेस, ते आपल्या हाताने लिहून, तुला शक्य तितक्या विस्तृत स्वरूपात, मला एक शिफारस-पत्र लिहून दे. तू सिंह बाहेर येण्यासाठी पिंजरा कसा उघडलास? तो बाहेर येईल म्हणून मी कशी वाट पाहिली? आणि तो बाहेर कसा आला नाही? तो बाहेर आला नाही तरी त्याला वेळ देण्यासाठी मी कसा थांबलो? तरी माझी भेट न घेता, तो आपली शेपटी वळवून पडून कसा राहिला – हे सारे, सारे तू त्या शिफारस-पत्रात सविस्तरपणे लिही. याहून अधिक काही करणे हे माझे कर्तव्य नाही. जादूगार कितीही बढाई मारोत, ईश्वर सत्याचा, न्यायाचा आणि शिलेदारीचा उत्कर्ष केल्याविना राहात नाही. मी सांगितल्याप्रमाणे ते दार लाव. आपल्यापासून जे लोक पळून गेले, त्यांना मी खुणा करून परत बोलावतो. म्हणजे तुझ्याच तोंडून त्यांना माझ्या या पराक्रमाचा पोवाडा ऐकावयास मिळेल." व्यवस्थापकाने तसे केले. डॉन क्विक्झोट यांनी आपल्या भाल्याच्या टोकावरील हातरुमाल उचलला आणि हवेत फडफडविला (याच रुमालाने त्यांनी आपल्या चेहऱ्यावरील दही पुसले होते.) आणि त्या पळपुट्या लोकांना शक्य तितक्या मोठ्या आवाजाने साद घातली. पण, छेः

ते पळाले ते पळालेच. पळत असताना ते एकसारखे मागे पहात होते. हिरव्या वेशातील गृहस्थ त्यांच्या अग्रभागी होता आणि बाकीचे लोक गट करून दौडत होते.

शेवटी सँकोने पांढऱ्या निशाणाची खूण पाहिली आणि बाकीच्या लोकांना हाक मारून तो म्हणाला, " थांबा, माझा धनी आपल्याला बोलावीत आहे. त्याने त्या सिंहांना चीत केले नसेल, तर मला फाशी द्या. " हे ऐकताच त्या सर्वांनी आपली तोंडे वळविली. आपले निशाण फडफडवीत असणारे डॉन क्विक्झोट त्यांच्या नजरेस पडले. तेव्हा त्यांची भीती थोडी कमी झाली आणि ते आस्ते आस्ते परत यावयास निघाले. त्यांना डॉन क्विक्झोट यांचा आवाज स्पष्टपणे ओळखता आला. मग ते गाडीजवळ गेले. ते जवळ येताच डॉन क्विक्झोट गाडीवानाला म्हणाले, " ये, मित्रा ये, तुझी खेचरे पुनः गाडीला जोड आणि आपला प्रवास पुढे चालू कर. आणि सँको, मी या दोघांना थांबविले, याची नुकसान–भरपाई करण्यासाठी गाडीवान आणि व्यवस्थापक या दोघांना दोन नाणी देऊन टाक. " सँको, आनंदाने ओरडला, " व्वाः ! ते मी मनापासून करीन. पण सिंहांचे काय झाले ? ते मेले की जिवंत आहेत ? " नंतर व्यवस्थापकाने अत्यंत शिष्टाचाराने सारा वृत्तांत निवेदन केला. डॉन क्विक्झोटच्या शौर्याचे वर्णन शक्य तितक्या कौशल्याने आणि अतिशयोक्तीने करण्यास तो चुकला नाही. " या वीर–पुरुषाच्या केवळ दर्शनानेच सिंह इतका घाबरला की, आपल्या बालेकिल्ल्यातून बाहेर येण्याचे त्याच्या मनात येईना. त्याला धैर्य होईना. तो बाहेर यावा म्हणून आम्ही किती तरी वेळ पिंजऱ्याचा दरवाजा उघडा ठेवला होता. त्याला सक्तीने बाहेर काढावे, अशी शिलेदार-साहेबांची इच्छा होती. पण मी त्यांना परखडपणे सांगितले, तसे करणे म्हणजे ईश्वरावर फार भार टाकण्यासारखे होते. तेव्हा सिंहांना पुनः पिंजऱ्यात कोंडून ठेवण्यास त्यांनी मोठ्या नाखुषीने मला परवानगी दिली. "

डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाला म्हणाले, " ठीक आहे सँको, या प्रकरणाबद्दल तुला काय वाटते ? जातिवंत शौर्यावर जादूची मात्रा चालू शकेल काय ? छेः, हे जादूगार कदाचित माझे यश हिरावून घेऊ शकतील, पण माझ्या मनाचा मोठेपणा कोणालाही अजिंक्यच वाटेल. " सारांश, सँकोने गाडीवान व व्यवस्थापक यांना दोन नाणी दिली. गाडीवानाने आपली खेचरे जुंपली आणि व्यवस्थापकाने डॉन क्विक्झोट यांचे त्यांच्या उदार देणगीबद्दल आभार मानले आणि वचन दिले, "मी जेव्हा दरबारात जाईन तेव्हा खुद्द राजेसाहेबांना आपला पराक्रम निवेदन करीन." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " व्वाः एवढा पराक्रम गाजविणारा माणूस कोण आहे, याची चौकशी राजेसाहेबांनी केली तर त्यांना तू सांग की, तो ' सिंहाधीश शिलेदार ' आहे. आतापर्यंत मी ' दुःखी चेहऱ्याचा शिलेदार ' असे नामाभिधान धारण केले होते. पण यापुढे मी हे नाव घेण्याचे योजले आहे. असे करण्याने मी शिलेदारांची प्राचीन परंपराच पुढे चालवीत आहे. ते आपल्या मर्जीस येईल तितक्या वेळा किंवा त्याच्या हितास धरून असेल तितक्या वेळा आपली नावे बदलीत असत. " यानंतर गाडी आपल्या मार्गाने गेली आणि

डॉन क्विक्झोट, सँको व हिरव्या वेषातील गृहस्थ हेही आपापल्या वाटेनें गेले. हिरव्या वेषातील गृहस्थ डॉन क्विक्झोटचे निरीक्षण इतका वेळ करीत होता की, त्याला एक शब्द बोलण्यास सवड सापडली नाही. समंजसपणा आणि बेफामपणा यांचे विचित्र मिश्रण त्याला त्यांचे ठायी आढळले. या इतिहासाच्या प्रथम खंडाशी तो अपरिचित होता. तो खंड त्याने वाचला असता तर क्विक्झोटांच्या उक्तींचे किंवा कृतींचे आश्चर्य त्याला वाटले नसते. पण त्यांच्या वेडेपणाचे स्वरूप माहीत नसल्यामुळे त्या गृहस्थाला वाटले, " हे शिलेदार समंजस आहेत–त्यांना फक्त अधूनमधून झटके येतात––त्यांच्या संवादात पुरेसा विवेक आणि चातुर्य दिसून येते. पण त्यांच्या साऱ्या कृती स्वैर, बेफाम आणि न उलगडण्यासारख्या असतात. दह्याने भरलेले शिरस्त्राण आपल्या डोक्यावर ठेवणे आणि नंतर ते दही जादूगारांनी आणून ठेवलेले असेल असे मानणे, यापेक्षा अधिक वेडेपणा दुसरा कोणता असू शकेल ? आणि सिंहाशी लढत खेळण्याचा सावेश प्रयत्न करण्यापेक्षा अधिक बेफामपणा दुसरा कोणता असू शकेल ? "

त्या गृहस्थाचे असे स्वगत चालले असताना, डॉन क्विक्झोट मध्येच म्हणाले, " महाशय, मी अगदी पुरापुरा वेडा आहे, असे तुम्ही निःसंशय समजा–आणि खरेच, माझ्या कृतीवरून मी तसाच दिसतो. पण मला हे सांगू द्या की, तुम्ही समजता तितका मी वेडा नाही आणि माझी अक्कल मंद नाही. एखाद्या विस्तीर्ण मैदानावर चाललेल्या साठमारीत, राजेसाहेबांच्या समक्ष, पिसाट बैलाच्या अंगात एक शूर शिलेदार आपला भाला खुपसत आहे–हे चित्र किती उदात्त दिसते ! तसेच एखाद्या मौजेच्या सामन्यात, चोहोबाजूंनी तळपणाऱ्या पोलादी कठड्यातून किंवा लष्करी कवायती करून, आपले शौर्य प्रगट करणाऱ्या दरबारी उमरावांच्या रांगातून, आपल्या घोड्यावरून भरधाव उड्या मारीत एखादा शिलेदार येतो––ते चित्र किती उदात्त दिसते ! तेथे ज्या ज्या घटना होतात, त्या साऱ्या केवळ मनोरंजनार्थ असतात–आणि तरीही त्या राज-दरबाराच्या भूषण मानल्या जातात ! पण याहीपेक्षा अधिक उदात्त व्यक्ती म्हणजे धवल कीर्तींच्या लालसेने पेटलेला जो शिलेदार राना–वनातून भटकतो, निर्जन अरण्यातून संचार करतो, जंगले, आडरस्ते, डोंगर व दऱ्या–हे सारे ओलांडून संकटाच्या खाईत उडी घेतो आणि सर्वांना सुख देणाचा प्रयत्न करतो, तो ! होय, मी पुनः सांगतो, एखाद्या निर्जन जागेतील विधवेला मदत करणारा शिलेदार हा नागरी युवतींना उद्देशून भाषणे करणाऱ्या दरबारी शिलेदारापेक्षा श्रेष्ठ होय. प्रत्येक शिलेदाराचे एक विशिष्ट कार्य असते. दरबारी शिलेदाराने महिलांचा अनुनय करावा, आपल्या भपकेबाज लवाजम्याने राज-दरबार सुशोभित करावा आणि गरीब लोकांना चमचमीत मेजवानी द्यावी. मेजवान्या आणि सामने घडवून आणून त्याने आपले वैभव, औदार्य आणि दातृत्व प्रगट करावे–आपले पावित्र्यही प्रकाशात आणावे. या सर्व गोष्टीमुळे तो आपल्या अधिकाराची कर्तव्ये पार पाडीत असतो. पण भ्रमण करणाऱ्या शिलेदाराने जगाच्या साऱ्या कोनाकोपऱ्यात संचार

केला पाहिजे, अत्यंत गुंतागुंतीच्या जंगलात शिरले पाहिजे आणि क्षणोक्षणी असाध्य गोष्टी साध्य करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ओसाड अरण्यात त्याने हवेचे तडाखे सोसावेत, सूर्याच्या अत्यंत प्रखर किरणांची दाहक उष्णता सहन करावी आणि वाऱ्याचे झंझावात नि बर्फाचे प्रपात यांचे आघात सहन करावेत. सिंहाला पाहून तो भयभीत होत नाही, भुजंगांना पाहून तो घाबरत नाही आणि दुष्ट पिशाच्चे त्याच्या कार्यात अडथळा आणू शकत नाहीत. अशी विघ्ने शोधण्यासाठी बाहेर पडणे, त्यांच्याशी धडाडीने सामना करणे आणि त्या सर्वांवर विजय मिळविणे–हे त्याचे प्रधान कार्य होय–योग्य कर्तव्य होय. अशा धडाडीच्या शिलेदारांपैकी मी एक व्हावे, असे माझ्या नशिबाने ठरविलेले आहे. त्यामुळे माझ्या व्यवसायाच्या कक्षेत जे जे येते असे मला वाटते, ते कृत्य करण्याचा प्रयत्न करणे, हे मी माझे कर्तव्य समजतो. त्यामुळेच मी त्या सिंहाशी सामना करण्यास आताच प्रवृत्त झालो होतो. तसे करणे अत्यंत साहसाचे आहे, याची जाणीव मला होती. तरीही तो सामना करणे हे माझे तात्कालिक कर्तव्य आहे, असे मी ठरविले. कारण मला हे पक्के माहीत आहे की, भित्रेपणा आणि धैर्य–यांच्या अनिष्ट नि आत्यंतिक टोकामध्ये पराक्रमाचा सद्गुण वास करीत असतो. पण हे निश्चित की, शौर्य कमी पडल्यामुळे भित्रेपणाच्या सीमेवर उभे रहाण्यापेक्षा एखाद्या वीर–पुरुषाने साहसाची अविचारी मर्यादा गाठणे, चांगले. उधळ्या माणसाला, कंजूष होण्यापेक्षा उदार होणे, जसे सोपे असते, तसे कणखर नि साहसी माणसाला खरा शूर बनणे, भित्र्या माणसाने शूर होण्यापेक्षा सोपे असते. म्हणून राज्यमान्य राजेश्री डॉन डीएगो, अशी धाडसी कृत्ये करताना थोडासा मर्यादातिक्रम झाला आणि वाजवीपेक्षा अधिक शौर्य दाखविले गेले, तर ते, कमी शौर्य दाखविण्यापेक्षा चांगले, हे लक्षात ठेवा. ”

डॉन डीएगो याने उत्तर दिले, “ महाराज, आपण जे काही बोलला आणि जे काही केले, ते सर्व तर्काच्या सूक्ष्म नियमांना धरून आहे, असे मला वाटते. शिलेदारीचे सर्व नियम नि विधि–निषेध नष्ट झाले, तरी ते आपल्यापासून पुनः मिळविता येतील असे मला वाटते. ते सर्व आपल्या अंतःकरणाच्या जामदारखान्यात सुरक्षितपणे ठेवलेले आहेत, असे दिसते. पण शिलेदारसाहेब, आता उशीर होत चालला. आपल्या गावी–माझ्या घरी–जाऊन पोचण्यासाठी आपण थोडी घाई करू या. आतापर्यंत आपण शरीराचे नसले तरी, निदान मनाचे परिश्रम ( आणि मानसिक श्रम शरीरावरही पुष्कळदा परिणाम करतात. ) खूपच केलेले आहेत, हे खचित. त्यानंतर आपल्याला अवश्य असणारी विश्रांती आपण माझ्या घरी घ्यावी. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ महाशय, आपले हे निमंत्रण म्हणजे मी मोठीच कृपा समजतो. ” नंतर पूर्वीपेक्षा जरा जलद चालून ते दुपारी सुमारे दोन वाजता खेड्यात जाऊन पोहोचले आणि डॉन डीएगोचे घर त्यांनी गाठले. आता डॉन क्विक्झोट डॉन डीएगो याला “ हिरव्या अंगरख्याचा शिलेदार ” म्हणून संबोधू लागले.



## प्रकरण १८

# हिरव्या अंगरख्याच्या शिलेदाराच्या किल्ल्यात–किंवा घरात–डॉन क्विक्झोट यांचा सत्कार कसा झाला, त्याचा वृत्तांत आणि दुसरे काही विलक्षण उतारे.

डॉन क्विक्झोट यांना तेथे असे आढळले की, खेड्यातील पद्धतीप्रमाणे मिरांडाचा डॉन डीएगो याचे घर ऐसपैस होते. त्याच्या दारावर ओबड–धोबड दगडांमध्ये कुटुंबाचे वंशचिन्ह कोरले होते, अंगणात दुग्धशाला होती, दारापुढील कमानीखाली तळघर होते आणि घराच्या चारी बाजूंना सामान्यतः टोबोसो येथे तयार झालेले मोठमोठे रांजण होते. ते सारे ग्रामीण वैभव पाहून डॉन क्विक्झोट यांना मंतरलेली आणि रूपांतरित झालेली आपली डल्सीनिया आठवली. तेव्हा त्यांनी एक मोठा सुस्कारा सोडला आणि आपल्याजवळ कोण आहे आणि तो काय म्हणेल, याची पर्वा न करता, त्यांच्या मुखातून पुढील काव्योद्गार बाहेर पडले—

प्रतिज्ञे ! एकदा तूं । सौख्य–शांती दीधली ॥
आजही सौख्यासि देसी । दुःख धावे सोबती ॥

हे टोबोसोच्या रांजणांनो, माझ्या अत्यंत कटु दुःखास कारण असणाऱ्या गोड प्रतिज्ञेचे विचार, तुम्हाला पाहिल्यामुळे, माझ्या मनात जागृत होत आहेत." डॉन डीएगो याचा मुलगा विद्यार्थी आहे आणि त्याचा कल काव्याकडे आहे, असे बोलले जात होते. तो आपल्या आईसह आपल्या पित्याचे स्वागत करण्यासाठी घरातून बाहेर आला होता. त्याच्या कानी वरील शब्द पडले. आपल्या वडिलांनी आपल्याबरोबर कोण हा विचित्र प्राणी आणला आहे, हे पाहून त्या मायलेकांना फार आश्चर्य वाटले. डॉन क्विक्झोट रोझिनांटवरून खाली उतरले, ते आपल्या घर–धनिणीच्या हाताचे चुंबन घेण्याची सभ्य इच्छा मनात धरून. डॉन डीएगो अत्यंत सौजन्याने म्हणाले, "बाईसाहेब, हे गृहस्थ म्हणजे ला मांचा येथील डॉन क्विक्झोट होत. जगातील अत्यंत चतुर नि शूर असे ते एक शिलेदार आहेत. त्यांच्या गुणवत्तेला आणि आपल्या नेहमीच्या शिष्टाचाराला अनुरूप अशा रीतीने आपण त्यांचे स्वागत करावे, अशी माझी विनंती आहे." त्यानंतर डोना ख्रिस्तिना ( त्या बाईचे हे नाव ) हिने त्यांचे अत्यंत प्रेमाने आणि आदरभावाने स्वागत केले. त्या स्वागताला डॉन क्विक्झोट यांनी योग्य ते सुंदर उत्तर दिले. नंतर ते आणि तो तरुण यांच्यामध्ये स्वागताचे जवळजवळ तसेच प्रकार

घडले. तो तरुण बुद्धिमान व विनोदी असावा, असे त्याच्या बोलण्यावरून डॉन क्विक्झोट यांनी ताडले.

[ येथे इतिहास–लेखकाने डॉन डीएगोच्या घरातील प्रत्येक वस्तूचे प्रदीर्घ वर्णन दिलेले आहे – घरातील भांडीकुंडी आणि सामानसुमान यांची जंत्री जोडलेली आहे. खेड्यातील सधन माणसाच्या घराचे जे वैशिष्ट्य असते तेही त्याने येथे नोंदले आहे. पण भाषांतरकाराला असे वाटते की, अशा बारीकसारीक गोष्टी आणि किरकोळ वस्तू यांचे वर्णन टाळणे बरे. कारण या इतिहासाच्या मुख्य विषयाला त्या धरून नाहीत. अशा नीरस व बेचव वर्णनाने विषयांतर करून इतिहास लिहिण्यापेक्षा तो भरीव सत्यावर उभारलेला असला पाहिजे. ]

एका चांगल्याशा खोलीत डॉन क्विक्झोट यांना नेण्यात आले. तेथे सँकोने त्यांच्या अंगावरील चिलखत काढून घेतले. मग आमचे शिलेदारजी चड्डी–बंडीमध्ये दिसू लागले. त्या कपड्यांवर चिलखताची धूळ माखलेली होती. एखाद्या विद्यार्थ्याप्रमाणे त्यांनी आपल्या गळ्याभोवती एक साधी पट्टी बांधलेली होती. त्यांच्या पायांवर पट्ट्या–पट्ट्यांचे पायमोजे होते आणि पायात कातड्याचे बूट होते. त्यांनी आपली विश्वासू तलवार एका कातडी पट्ट्याला टांगून आपल्याजवळ ठेवली होती. त्या कातडी पट्ट्यांवरून पुष्कळ लोकांचा असा ग्रह होत असे की, त्यांना मूत्राशयाच्या विकाराचा त्रास दीर्घकाल होत असावा. त्यांनी आपल्या अंगावर चांगल्या तपकीरी कापडाचा लांब झगा घातला होता. प्रथम त्यांनी आपले डोके व तोंड धुतले. त्यासाठी त्यांना सहा नसल्या तरी पाच बादल्या पाणी लागले. त्या बादल्यांच्या संख्येबद्दल वाद आहे. त्या बादल्यांतील पाण्याला दह्याचा वास येत होता, सँकोच्या खादाडपणामुळे त्याने आपल्या धन्याच्या शिरस्त्राणात ते दुर्दैवी दही घेतले होते आणि धन्याचे डोके व तोंड विद्रूप केले होते.

अशा पोशाखात शिलेदारसाहेबांची स्वारी डौलाने नि उत्साहाने दुसऱ्या खोलीत गेली. आम्ही पूर्वीच उल्लेखिलेला तरुण डॉन लोरेंझो तेथे त्यांची वाट पहात होता. जेवणाच्या टेबलावर चादर पसरली जाईपर्यंत तो त्यांची सोबत करीत होता. आपल्या घरी येणाऱ्या पाहुण्याचे स्वागत कसे करावे, हे आपल्याला चांगले कळते अशी खात्री या पाहुण्यास पटावी, म्हणून ती घरधनीण चांगले पदार्थ आणण्यासाठी बाहेर गेली होती. डॉन क्विक्झोटचा पोशाख होईपर्यंत, डॉन लोरेंझो याला त्याच्यासंबंधी आपल्या वडिलांना काही विचारण्यास सवड सापडली. त्याने विचारले, "दादा, आपण आपल्याबरोबर हा कोण गृहस्थ आणला आहे ? त्याचे नाव, त्याचे स्वरूप आणि तुम्ही त्याला दिलेली शिलेदाराची पदवी, यांचा विचार करता त्यांच्याविषयी काय मत बनवावे, हे मला किंवा माझ्या आईला कळत नाही." डॉन डीएगो उत्तरले, " खरे आहे ते, मुला. मी तुला काय सांगावे, हे मला कळत नाही. मी तुला एवढेच सांगू शकतो की, जगातील अत्यंत मूर्खपणाचे चाळे करीत असताना मी त्याला पाहिले आहे. आणि तरीही ती खोडसाळ कृत्ये खोडून टाकण्यासारखे शहाणपणाचे हजारो विचार उच्चारताना मी

त्याला ऐकले आहे. पण तू स्वतःच त्याच्याशी बोल आणि त्याच्या बुद्धिमत्तेची नाडी ओळख. त्याची अक्कल तपासण्यासाठी तुझी अक्कल चालव. पण खरे सांगायचे तर त्याच्या शहाणपणापेक्षा त्याचा मूर्खपणा वरचढ आहे असे मला वाटते. " तेव्हा डान लोरेंझो हा डॉन क्विक्झोट यांचे स्वागत करण्यास गेला. त्या दोघांचा काही सुखसंवाद झाल्यानंतर डॉन क्विक्झोट म्हणाले, " महाशय, आपल्या गुणांना मी पूर्णपणे पारखा नाही. आपले पिताजी, मिरांडाचे डॉन डीएगो, यांनी मला सांगितले आहे की, तुमचे गुण फार श्रेष्ठ आहेत. विशेषतः तुम्ही एक महाकवी आहा. "

तेव्हा त्या तरुणाने उत्तर दिले, " मेहेरबान, मी काव्य करण्याचा कदाचित् आव आणतो असे म्हणता येईल. पण महाकवि मी मुळीच नाही. ट ला ट करण्याची मला थोडीफार संवय आहे आणि चांगले ग्रंथ वाचण्याची आवड आहे, हे खरे. पण कवीच्या किंवा ग्रंथकारांच्या पंक्तीत बसण्याची माझी मुळीच लायकी नाही. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " भल्या तरुणा, तुझी नम्रता मला नापसंत नाही. तो गुण कविवर्गामध्ये सहसा सापडत नाही. कारण, प्रत्येक कवीला वाटते, आपणच काय ते जगातील सर्वश्रेष्ठ कवि आहो. " तेव्हा डॉन लोरेंझो म्हणाला, " ज्याला अपवाद नाही असा नियम नाही. असा एखादा माणूस असणे शक्य आहे की, ज्याला कवि हे नाव शोभावे, पण जो स्वतःला तसे समजत नसावा. " डॉन क्विक्झोट उत्तरले, " ते अगदी असंभवनीय आहे. पण महाशय, आपल्याला ज्या कवितांचे एवढे कोडे पडले आहे, असे आपले पिताजी सांगतात, त्या कविता कोणत्या, हे कृपा करून सांगा. ज्याला आम्ही टिप्पणी किंवा रूपांतर म्हणतो, ते जर असेल तर तसे लेखन मला थोडेफार समजेल आणि ते पाहण्यात मला आनंद वाटेल. जर ती रचना काव्याच्या पारितोषकासाठी केलेली असेल, तर त्या काव्यरचनेला दुसरे बक्षीस मिळेल असे मी माझे मत तुम्हाला सांगतो. कारण, पहिले पारितोषिक केव्हाही वशिलेबाजीने दिले जाते-आणि ते बहुधा ग्रंथकाराच्या गुणापेक्षा त्याच्या महान प्रतिष्ठेकडे पाहूनच दिले जाते. मात्र, दुसरे पारितोषिक लायक व्यक्तींनाच मिळते. म्हणून तिसरे पारितोषिक हे एक प्रकारे दुसरे ठरते आणि पहिले हे तिसरे ठरते. आपली विद्यापीठे पदव्या देताना असेच करतात. आणि तरीही 'पहिले पारितोषिक मिळविणारा' असा मान संपादन करणे ही काही साधीसुधी गोष्ट नव्हे. " ते ऐकून डॉन लोरेंझो स्वतःशी म्हणाला, " हे सारे बोलणे ठीक आहे. मी याला वेडा मानू शकत नाही. चालू द्या हे बोलणे पुढे. " असे मनातल्या मनात म्हणून तो डॉन क्विक्झोट यांना म्हणाला, " महाराज, आपला विद्यालयाशी दाट परिचय दिसतो. तेव्हा आपण कोणत्या शास्त्राचा विशेष अभ्यास केला आहे, हे कृपया सांगा." डॉन क्विक्झोट एकदम ओरडले, " शिलेदारीचा. काव्याइतकाच तो चांगला विषय आहे – किंबहुना अधिक चांगला आहे. " डॉन लोरेंझो म्हणाला, " हे शास्त्र कोणते, ते मला माहीत नाही. फार काय, मी त्याचे नावही पूर्वी कधी ऐकले नाही. "

यावर डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "जगातील सर्व शास्त्रांचा–निदान बहुतेक

सर्व शास्त्रांचा–समावेश करणारे हे शास्त्र आहे. त्या शास्त्रात आपण पारंगत आहो, असे जो म्हणतो, त्याला कायद्याचे ज्ञान हवे. त्याला संयुक्त व विभक्त न्याय–शास्त्राची माहिती हवी, तरच तो सर्व मानवजातीला सन्मार्गावर आणू शकेल. तो धर्मगुरू असला पाहिजे आणि त्याने आपल्या श्रद्धेचे सकारण समर्थन केले पाहिजे, तसेच युक्तिवादाच्या बळावर आपला धर्म सिद्ध केला पाहिजे. वैद्यशास्त्रात–विशेषतः वनस्पतीशास्त्रात–तो निष्णात असला पाहिजे; म्हणजे त्याला औषधी वनस्पतींची माहिती मिळेल आणि जखमा बऱ्या करणाऱ्या वनस्पती तो मिळवू शकेल. कारण रानावनात वैद्यराज भेटतील अशी अपेक्षा कोणाही शिलेदाराला करता येणार नाही. तो ज्योतिर्विद असला पाहिजे. आकाशातील ग्रहांच्या गती त्याला समजल्या पाहिजेत आणि नक्षत्रे पाहून, रात्रीचा कोणता क्षण आहे, हे ओळखता आले पाहिजे. तसेच दैवाने आपल्याला कोणत्या अक्षांश–रेखांशाच्या वातावरणात फेकून दिले आहे, हे त्याने त्यावरून ताडले पाहिजे. तसेच गणिताच्या सर्व शाखांमध्ये तो प्रवीण असला पाहिजे. शस्त्रधारी माणसाला गणितशास्त्राचा उपयोग सतत होत असतो. तो किती असंख्य प्रकारांनी होतो, हे सांगणे कठीण! सारे दैवी आणि नैतिक गुण त्याच्या अंतःकरणात केंद्रित झाले पाहिजेत, हे मी तुम्हाला सांगण्याची गरज नाही. याहून क्षुद्र स्वरूपाची लक्षणे सांगावयाची तर त्याला माझ्याप्रमाणे पोहता यावयास पाहिजे, घोड्याला नाल कसे ठोकावेत हे माहीत पाहिजे आणि त्याचे खोगीर व लगाम दुरुस्त करता आले पाहिजेत. उच्च दर्जाचे गुण पुनः सांगावयाचे तर, त्याची ईश्वरावर आणि आपल्या हृदयस्वामिनीवर अव्यभिचारी निष्ठा असली पाहिजे. विचाराने शुद्ध, भाषेने नम्र, कृत्याने शूर नि उदार, विपत्काली शांत, दीनांविषयी उदार आणि शेवटी सत्याचे पालन करणारा–मग त्यासाठी प्राण गमवावे लागले तरी बेहत्तर! उत्तम शिलेदाराची ही लक्षणे होत. तर मग महाराज, आपणच निर्णय द्या की, शिलेदारीचे बिरुद धारण करणाऱ्या लोकांचे कार्य सोपे असते काय? महाविद्यालयात शिकविल्या जाणाऱ्या उत्तमोत्तम अशा सुविख्यात शास्त्रांची बरोबरी शिलेदारी शास्त्र करू शकणार नाही काय? हे आपणच सांगा.”

डॉन लोरेंझो याने उत्तर दिले, “असे जर असेल, तर अन्य सर्व शास्त्रांपेक्षा शिलेदारीच्या शास्त्राला श्रेष्ठत्व देणे योग्य!” ते ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, “असे असेल तर’ तुम्ही काय म्हणता?” तेव्हा डॉन लोरेंझो उत्तरले, “मी म्हणावयाचे तेच म्हणतो. इतक्या दुर्मिळ गुणांनी संपन्न असा एखादा तरी शिलेदार सध्या असेल काय?—किंवा पूर्वी कधी झाला असेल काय?—याविषयी, मला शंका आहे.” डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, “मी नेहमी जे बोलतो, त्यालाच याने पुष्टी मिळते. जगात केव्हा तरी शिलेदार होऊन गेले, असे पुष्कळ लोक मुळीं मानीतच नाहीत. ते तसे होऊन गेले आणि सध्याहि विद्यमान आहेत, अशी त्यांची खात्री पटण्यासाठी ईश्वराने काही चमत्कारच केला पाहिजे. नाही तर ते अश्रद्ध लोक आपल्या मताशी इतके चिकटलेले असतात की, अशा गोष्टीवर ते विश्वास ठेवीत नाहीत. ते किंवा तुम्ही

किती चुकीचे मत धारण करीत आहा, हे तुम्हाला पटविण्याचा खटाटोप करण्यात मी आता वेळ दवडीत नाही. आता मी जे काही करावयाचे योजले आहे, ते इतकेच की, तुम्हाला आपली चूक ईश्वराने पटवून द्यावी, प्राचीन काळी परोपकारी शिलेदार कसे होऊन गेले हे तुम्हाला कळावे, आणि त्या व्यवसायातील लोकांच्या साहाय्याने आपल्या काळीही लोकांना किती प्रचंड लाभ होतील, हे समजावे अशी मी प्रभूला प्रार्थना करीन. पण सांप्रत आपल्या पापांची शिक्षा म्हणून, स्त्रैणपणा, आलस्य, विलासीपणा आणि क्षुद्र सुखे, यांची चलती होत आहे." ते ऐकून डॉन लोरेंझो स्वतःशी म्हणाला, "या भल्या गृहस्थाने आपल्या स्वभावाची आंधळी बाजू दाखविली आहे, पण तरीही आपल्या अचाट कल्पनांवर तो विवेकाचा मुलामा देत आहे. मी जर त्याचेसंबंधी निराळी कल्पना केली असती, तर मी मूर्ख ठरलो असतो."

इतक्यात त्यांना भोजनाचे निमंत्रण आले. त्यामुळे त्यांचा संवाद थांबला. जाता जाता डॉन डिएगो याने आपल्या मुलाला एका बाजूस घेतले आणि विचारले, "या पाहुण्याबद्दल तुला काय वाटते?" तेव्हा डॉन लोरेंझोने उत्तर दिले, "बाबा, जगातील साऱ्या वैद्यांना याचा स्वभाव सुधारणे शक्य होणार नाही. सुधारण्याच्या पलीकडे त्याचा वेडेपणा गेला आहे. तथापि मधून मधून तो सुस्पष्ट विचार मांडतो." नंतर त्यांनी भोजन केले. आपण आपल्या पाहुण्यांना स्वच्छ भरपूर आणि सुव्यवस्थित जेवण देतो, असे त्या म्हाताऱ्या गृहस्थाने आमच्या शिलेदारजींना जे सांगितले होते, ते खरे करण्यासारखा तो भोजन-समारंभ झाला. पण डॉन क्विक्झोट यांना सर्वांत कौतुक कशाचे वाटले असेल तर, साऱ्या घरात त्यांना दिसून आलेली असामान्य शांतता–जणु काही मूक कार्थिसियनचा मठच. टेबलावरील चादर काढली गेली, भोजनोत्तर प्रार्थना म्हटली गेली आणि सर्वांनी आपापले हात धुतले. नंतर डॉन क्विक्झोट हे डॉन लोरेंझो याला म्हणाले, "काव्याच्या पारितोषकासाठी तुम्ही ज्या कविता केल्या आहेत, त्या पाहण्याची मला तीव्र इच्छा आहे." त्याने उत्तर दिले, "ठीक आहे, महाराज, लोकांनी आर्जव केल्यानंतरही आपल्या कविता दाखविण्यास नाराज असणाऱ्या कवींपैकी मी नाही. माझ्या कविता पाहण्याची कोणाला इच्छा नाही, पण आपल्याला आहे. म्हणून मी आपल्याला कंटाळा येईपर्यंत माझ्या कविता म्हणून दाखवीन, त्याबरोबरच मी माझी टिप्पणी नि रूपांतर हेही वाचून दाखवीन. केवळ माझ्या कल्पनेचा चाळा म्हणून मी ते लिहिले आहे––बक्षीस मिळविण्याच्या हेतूने नव्हे." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझा एक मित्र–मोठा समंजस आहे तो–मला एकदा म्हणाला, "तसे लेखन करण्यासाठी आपले डोके फोडून घेण्याचा उपदेश मी कोणास करणार नाही. कारण, टीपा किंवा टीका मूळ विषयाला क्वचीच स्पर्श करीत नाहीत–फार काय, पुष्कळ वेळा, मूळ विषय पूर्णपणे टाळतात–किंबहुना, कवीच्या विचाराशी विसंगत असे काही तरी सांगून जातात. शिवाय त्या विस्तृत नि मनोरंजक टीपा लिहिणाऱ्यावर रूढीमुळे जी बंधने आलेली आहेत, ती अत्यंत कडक आहेत. त्यात प्रश्न असता कामा नयेत. 'तो म्हणाला' किंवा 'मी

सांगू का ?' असे उद्‌गार काढता कामा नयेत, नामाची क्रियापदे बनविता कामा नयेत, विचारात काही बदल करता कामा नये, आणि याशिवाय दुसरी किती तरी बंधने भाष्य-कारावर येतात. ती तुम्हाला सारी माहीत असतील, हे खचित. टीका–टिप्पणी लिहिण्याच्या या तिरसट प्रकारामुळे ज्यांची मति गुंग होते, त्यांच्या डोक्यात या बंधनांचा जंजाळ माजतो." डॉन लोरेंझो म्हणाला, "महाराज डॉन क्विक्झोट, खरोखर आपण असे स्वैरालाप करीत असताना आपल्या युक्तिवादातली चूक काढावीशी मला वाटली असती, पण आपण वांब माशाप्रमाणे एकदम निसटून जाता." डॉन क्विक्झोट उत्तरले, "निसटून जाता, म्हणजे तुम्हाला काय म्हणावयाचे आहे, हे मला कळत नाही." तरुणाने उत्तर दिले, "ते मी आपल्याला पुनः केव्हा तरी सांगेन." तोपर्यंत काव्याचा विषय व त्याचे रूपांतर ऐकण्याची कृपा करावी. ते पुढीलप्रमाणे--

## विषय

महालाभ जरी नसे मम नशिबीं ।
गत सौख्याचें स्मरण निरंतर ।।
दुःख आजचे माझे सरता ।
येवो सुख ते माझ्या हाता ।।

## टीप किंवा रूपांतर

[ १ ]

पवनसम चंचळ ते । दैव सौख्य हरून नेते ।।
सदय त्यासि मी मानीत होतो । निर्दय आता दैव भोगितो ।।
चंचळ सौख्ये पळूनि जाती । दुःखे परि ती थबकत बसती ।।
चंचळ दैवा ! द्वेष धरूनी । नको संहरू शरणागत दासा ।।
कुरकुर नाही माझी काही । माझ्या नशिबा तूं कुरवाळी ।
करी कृपा या दासावर । गतसौख्याचे स्मरण निरंतर ।।

[ २ ]

दैव देतसे अनंत हस्ते । लाभ–सौख्य त्या मानवते ।।
भरती त्यांना खुशाल येवो । मम सुख परि कायम राहो ।।
सुख–दुःखाचा खेळ चालला । सुख–स्मृतीने गळा दाटला ।।
सुख ते जर क्षणभर मिळते । दुःख सकळ विलया जाते ।।
दैवहि दुर्बल सुख ना देते । काल चालला, कोण अडविते ? ।।
रचिले तितुके खचूनि जाते । यौवन पुनरपि कदा न मिळते ।।
आशा भुलवी भीति पोखरी । जीवन न दे मज आनंदा ।।
ये ये । मृत्यू ! दुःख–नाशना । सौख्याची तू दावि कल्पना ।।

डॉन लोरेंझो याने आपले हे काव्य–भाष्य वाचून दाखविले न दाखविले, तोंच डॉन क्विक्झोट आपल्या जागेवरून एकदम उठले आणि त्याचा हात पकडून मोठ्याने म्हणाले, " हे महाभाग युवका, गगनातील उत्तुंग नक्षत्रांची शपथ घेऊन मी सांगतो, तू जगातील सर्वश्रेष्ठ कवी आहेस. एका कवीने म्हटल्याप्रमाणे (ईश्वर त्याला क्षमा करो!) सायप्रस किंवा गीटा येथे नव्हे तर, अथेन्सचे विद्यापीठ अस्तित्वात असेल तर तेथे आणि पॅरिस, बोलोमा व सॅलामँका येथील विद्यापीठाकडून तुला विजयाचे तुरे मिळणे योग्य आहे. तुला पहिल्या पारितोषिकाचा सन्मान देण्याचे जे परीक्षक नाकारतील त्यांना काव्य-देवतेने आपल्या बाणांनी ठार मारले पाहिजे, आणि त्यांच्या निवासस्थानी जाण्यास देवी शारदेला घृणा वाटली पाहिजे. कविराज, आपल्या परमोच्च काव्यापैकी एक काव्य आपण मला वाचून दाखविण्याची कृपा करावी अशी माझी प्रार्थना आहे. कारण आपल्या प्रशंसनीय प्रतिभेचा पूर्ण आस्वाद मिळावा अशी माझी इच्छा आहे. " डॉन क्विक्झोट वेडे आहेत असे डॉन लोरेन्झो याला वाटत असले तरी त्यांनी केलेल्या आपल्या प्रशंसेमुळे तो फारच खूष झाला, हे मी सांगण्याची गरज नाही. एरवी आपण ज्यांचा तिरस्कार करतो, त्याच्याकडूनही मिळालेली प्रशंसा आपल्याला हृदयंगम व स्वागतार्ह वाटते. डॉन लोरेन्झो याने हा सिद्धान्त खरा करून दाखविला आणि डॉन क्विक्झोट यांच्या विनंतीला तत्काळ मान दिला. पिरॅमस व थिस्बे यांच्या कथेवरील पुढील सुनीत त्याने म्हणून दाखविले—

## पिरॅमस व थिस्बे

ते दोघे असती प्रिय परी ना भेट चक्रवाकापरी ।  
भेदी ती तटबंदि प्रेमळपणे स्वर्गांगना सुंदरी ।  
प्रीती जी अनुरक्त जीव सुखवी स्वर्गी विहारा करी ।  
आनंदा वितरी जनास भ्रमवी लोकीं गुणाते वरी ।। १ ।।  
कांतेचे भरते सदाचि मन ते प्रेमामृते सांडते ।  
प्रेमाते नच ती भयार्त अबला वाचा कधी फोडते ।।  
बोले ना सुभगा कदापि वचना निःश्वास ती सोडते !  
मौनाने हृदया करी प्रियकरी प्रेमार्द्र तेव्हा रिते ।। २ ।।  
आनंदी नयने सुकांत वदने भावाजिवा सांगती ।  
वेडे होउनि ते प्रवास करिती नाशाप्रती पावती ।।  
सौख्याने मुकती हताश बनती दैवासि की निंदिती ।  
प्रेमाचा पथ हाच, मृत्यु मिळतो, वाजे पुढे नौबती ।। ३ ।।

डॉन लोरेन्झो याचे काव्यगायन संपताच डॉन क्विक्झोट उद्‌गारले, " धन्य, धन्य, प्रभो ! मिळमिळीत कविता करणाऱ्यांच्या प्रचंड संख्येतून शेवटी मला एक माणूस पूर्ण कवी म्हणून सापडला—काव्यालंकारानी संपन्न असा माणूस सापडला. "

डॉन डीएगो याचे घरी डॉन क्विक्झोट चार दिवस राहिले. त्या सर्व काळात त्यांचा अत्यंत उदारतेने पाहुणचार झाला. नंतर त्यांनी तेथून जाण्याची इच्छा प्रदर्शित केली आणि त्याच्या प्रेमळ आतिथ्याबद्दल त्याला सहस्रशः धन्यवाद दिले, आणि म्हटले, "हे पहा, काही कार्य न करता यापुढे थांबणे हे माझ्या व्यवसायाच्या कक्षेत बसत नाही. साहसाच्या शोधार्थ बाहेर पडण्याची माझी योजना आहे. स्पेन देशाच्या या भागात साहस दाखविण्याजोगे प्रसंग विपुल आहेत, हे मला माहीत आहे. सॅरागोस्सा येथील संग्राम नि खेळांचे सामने सुरू होईपर्यंत मी साहसाच्या शोधामध्ये माझा वेळ घालविणार आहे. माझा मुख्य उद्देश सॅरागोस्सा येथे जाण्याचा आहे. पण मी प्रथम मॉंटेसिनोच्या गुहेकडे जाणार आहे. कारण, तिच्यासंबंधी त्या भागात कैक आश्चर्यकारक कथा सांगितल्या जातात. 'रिडेराची सरोवरे' म्हणून जी सर्वसामान्य लोकांना माहीत आहेत, त्या सात सरोवरांचे मूळ झरे आणि उगम शोधण्याचा आणि उघडकीस आणण्याचा प्रयत्न मी करणार आहे." त्यांच्या या उदात्त निश्चयाचे कौतुक डॉन डीएगो आणि त्याचा मुलगा यांनी उत्साहाने केले आणि आपल्या घरातून मिळणारी कोणतीही वस्तू मागून घेण्यास सांगितले. ते दोघे म्हणाले, "आपण असे काही मागितले, तर आम्ही मनापासून स्वागतच करू. आपल्या सन्मान्य व्यवसायाबद्दल आणि आपल्या स्वतःच्या विशिष्ट गुण–संपदेबद्दल आम्हाला फार आदर वाटतो आणि म्हणून आपली सर्व प्रकारची सेवा करणे, हे आम्ही आपले कर्तव्य मानतो."

सारांश, त्यांच्या प्रयाणाचा दिवस आला. डॉन क्विक्झोट यांना तो दिवस हर्षाचा व आनंदाचा वाटला, पण बिचाऱ्या सँकोला दुःखाचा व खेदाचा भासला. त्याला आपला मुक्काम हलविण्याची मुळीच इच्छा नव्हती. रानावनामध्ये कंदमुळे खाण्यापेक्षा आणि आपल्या कातडी पिशवीतील तुटपुंजे व भिकार पदार्थ सेवन करण्यापेक्षा डॉन डीएगो यांच्या घरातील विपुल खाद्यपदार्थ आणि आनंदी वातावरण त्याला आवडले होते. पण करणार काय ? त्याला स्थानांतर करावेच लागले. बदललेली परिस्थिती सुसह्य व्हावी म्हणून, त्याला योग्य वाटले त्या त्या पदार्थांनी त्याने आपली कातडी पिशवी ठासून गच्च भरली. डॉन लोरेन्झो याचा निरोप घेताना डॉन क्विक्झोट म्हणाले, "महाशय, मी आपल्याला पूर्वी हे सांगितले आहे की नाही, हे मला माहीत नाही, पण जर सांगितले असेल तरी ते पुनः एकदा सांगण्याची मला मुभा द्या. मला हे सांगावयाचे आहे की, कीर्तिमंदिराच्या शिखरावर, दुर्गम मार्गाने, चढून जाण्याची तुम्हाला महत्त्वाकांक्षा असेल तर त्याचा खात्रीचा मार्ग म्हणजे काव्याचा निरुंद रस्ता सोडणे आणि त्याहून निरुंद अशा शिलेदारीच्या वाटेवरून चालत जाणे, म्हणजे एका क्षणात तुम्ही सम्राटाच्या सिंहासनावर आरूढ व्हाल." या भाषणाने डॉन क्विक्झोट यांनी आपल्या मूर्खपणाच्या साऱ्या पुराव्यावर जणू कळस चढविला. तथापि आणखी काही बोलल्याशिवाय त्यांना आपले भाषण पूर्ण झाले असे वाटेना आणि म्हणून ते म्हणाले, "दीन–जनांचे रक्षण करण्यासाठी आणि गर्विष्ठ नि उर्मट अरेरावांना चिरडून

टाकण्यासाठी, लोरेन्झो याला माझ्याबरोबर नेण्याची आणि माझ्या शिलेदारीच्या व्यवसायाशी निगडित असलेल्या सद्गुणांची दीक्षा देण्याची मला फार फार इच्छा आहे. पण शिलेदारीच्या खडतर जीवनाला योग्य असे त्याचे वय नाही. त्याचे वय कोवळे आहे. शिवाय काव्यामध्ये त्याने प्रशंसनीय कामगिरी केलेली आहे. या दोन कारणांमुळे त्याला येथे रहावे लागत आहे. काव्यामध्ये कीर्ति संपादन करण्याचा एक मार्ग म्हणजे स्वतःपेक्षा दुसऱ्याच्या सारासार–विचाराने आपण चालले पाहिजे. कारण, स्वतःचे मूल कुरूप आहे, असे आई–बापांना स्वाभाविकपणेच वाटत नाही, आणि हा प्रमाद मानसिक अपत्याइतका अन्यत्र कोठे होत नाही. एवढी सूचना देऊनच मी संतोष मानला पाहिजे."

शहाणपणा आणि बेफाटपणा यांचे मिश्रण असलेले हे भाषण ऐकून, डॉन डीएगो व त्याचा मुलगा पुनः आश्चर्यचकित झाले. या बिचाऱ्या शिलेदाराच्या आशा-आकांक्षेचे एकमेव साध्य म्हणजे दुर्दैवी व साहसी प्रसंगांचा पाठलाग करणे. त्यासाठी तो किती जीव टाकीत आहे हे पाहून त्या पिता–पुत्रांना नवल वाटले. यानंतर एकमेकांनी परस्परांना पुष्कळ धन्यवाद दिले आणि एकमेकांची सेवा करण्याचे आश्वासन दिले. नंतर किल्ल्यातील मालकिणीची रजा घेऊन डॉन क्विक्झोट रोझिनांटवर व सँको डॅपलवर बसून तेथून निघाले आणि मजल दरमजल करीत चालले.



प्रकरण १९

## प्रेमवेड्या धनगराचा पराक्रम आणि इतर विनोदी उतारे

डॉन क्विक्झोट फार दूर गेले नाहीत, तोच त्यांना दोन माणसांनी गाठले. ती माणसे विद्यार्थ्यांसारखी किंवा पाद्र्यासारखी दिसत होती. त्यांच्याबरोबर दोन शेतकरी होते. सारेजण गाढवावर बसलेले होते. त्या दोघांपैकी एका विद्यार्थ्याच्या पाठीमागे तागाच्या कापडाचे लहानसे गाठोडे आणि पायमोजाचे दोन जोड होते. ते सारे हिरव्या ताडपत्रीत बांधलेले होते. त्यामुळे ती कपड्यांची कातडी पिशवी आहे असे वाटत होते. दुसऱ्या विद्यार्थ्याजवळ द्वंद्वयुद्धाच्या दोन तलवारी आणि ते करताना वापरण्याच्या बुटांची एक जोडी याशिवाय काहीच नव्हते. दोघा शेतकऱ्यांजवळ इतर वस्तूंचे गाठोडे होते. त्यावरून असे दिसत होते की, एखाद्या जवळपासच्या शहरात बाजारहाट करून ते आपापला माल घेऊन आता घरी परत जात होते. त्यांनी आजपर्यंत ज्या ज्या व्यक्ती पाहिल्या होत्या, त्यापेक्षा अगदी भिन्न स्वरूपाच्या डॉन क्विक्झोटना पाहून त्या सर्वांना मोठे नवल व कौतुक वाटले. ( त्यांना आजवर ज्यांनी ज्यांनी पाहिले होते, त्यांना त्यानाही खरोखर असेच वाटले होते.) शिलेदारजींनी त्यांना सलाम केला. आपल्याच मार्गाने ते जाणार आहेत असे पाहून त्यांनी त्यांना सोबत करण्याची तयारी दाखविली. मात्र जरा सावकाश चालण्याची त्यांनी त्यांना विनंती केली. कारण, यांच्या घोड्यापेक्षा त्यांच्या गाढवांची गति जलद होती. त्यांची करमणूक करण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी त्यांना आपल्या परिस्थितीची व व्यवसायाची ओझरती कल्पना दिली व ते म्हणाले, " साहसी प्रसंगांच्या शोधार्थ सर्व जगभर संचार करणारा मी एक शिलेदार आहे. माझे खरे नाव ला मांचा येथील डॉन क्विक्झोट असे आहे, पण माझे टोपण नाव ' सिंहाधीश शिलेदार ' असे आहे. " या साऱ्या बोलण्याचा ओ का ठो त्या खेडवळांना कळला नाही, पण विद्यार्थ्यांनी मात्र त्यांची सदोष बाजू तत्काळ ओळखली. तथापि आदरभावाने दूर राहून, त्यांपैकी एकजण म्हणाला, " शिलेदारमहाराज, आपल्या व्यवसायातील माणसे निश्चित स्थानाकडे निघालेली बहुधा नसतात. तसेच आपलेही असेल तर आपल्या संगतीचा मान आपण आम्हाला द्यावा, अशी विनंती आहे. तसे आपण केले तर एका अत्यंत सुंदर नि वैभवशाली विवाहसमारंभात आपले स्वागत होईल. असा समारंभ ला मांचा येथे किंवा त्याच्या पंचक्रोशीत-कधीही साजरा झाला नसेल." तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " कोणा तरुण राजपुत्राचा विवाह आहे काय ? " दुसऱ्याने उत्तर दिले, " नाही,

महाराज. एका शेतकऱ्याच्या मुलाचे त्याच्या शेजाऱ्याच्या मुलीशी लग्न होणार आहे. तो मुलगा या सर्व प्रदेशात अत्यंत श्रीमंत आहे आणि ती मुलगी तर इतकी देखणी आहे, की तशी दुसरी आपण कधी पाहिलीच नसेल. विवाहाचे वेळी जो रंजन-कार्यक्रम व्हावयाचा आहे, तो एकदम नवीन आणि अलौकिक स्वरूपाचा असेल. ती वधू ज्या गावात राहते, त्याच्याजवळच्या हिरवळीवर हा सारा समारंभ होणार आहे. तिच्या सौंदर्यामुळे लोक तिला ' देखणी क्विटेरिया ' म्हणतात. आणि त्या मुलाच्या श्रीमंतीमुळे त्याला ' श्रीमंत कॉमॅचो ' म्हणतात, दोघांची वये एकमेकांना अनुरूप आहेत. तिचे वय अठरा वर्षांकडे झुकत आहे आणि त्याचे वय बावीस वर्षांचे आहे. जगातील साऱ्या वंशावळी ज्यांच्या डोक्यात कोंबलेल्या आहेत, अशी काही चतुर माणसे तुम्हाला सांगतील की, मुलापेक्षा मुलीचे घराणे श्रेष्ठ दर्जाचे आहे. पण आता त्याला कोणी किंमत देत नाही. कारण, आपल्याला माहीतच आहे की, पैसा नाना दोषांना झाकून टाकतो. शिवाय हा कॉमॅचो एखाद्या राजपुत्रासारखा उदार आहे–आपल्या लग्नासाठी कितीही खर्च करण्याची त्याची तयारी आहे. त्याच्या डोक्यात अशी कल्पना आली आहे की, ती सारी हिरवळ झाडांच्या फांद्यांनी झाकली जावी आणि तिला लता–कुंजाचे सौंदर्य प्राप्त व्हावे. तसे झाले म्हणजे जमिनीवरचे हिरवेगार गवत पाहण्यासाठी सूर्य पाना–पानांतून डोकावून पाहण्याचा खूप प्रयत्न करील. त्याशिवाय तेथे जमलेल्या लोकांच्या मनोविनोदार्थ नाना प्रकारचे नृत्य–गायन–नाट्य–इत्यादी प्रयोग केले जाणार आहेत. काही नर्तकांच्या हातात तलवारी असतील तर काहींच्या हातात घंटा असतील. कारण तसे खेळ कौशल्याने करणारे तरुण त्या खेड्यात पुष्कळ आहेत. जे तरुण नृत्य करीत असताना आपल्या बुटांच्या तळव्यांनी करामती करतात, त्यांच्यासंबंधी मी काही बोलत नाही. ते मी पाहुण्यांच्या विचार–शक्तीवर सोपवतो. परंतु बिचारा बेसिल निराशेच्या भरात ज्या ज्या गोष्टी करील, असे मला वाटते; त्यांच्यापुढे या विवाहाच्या ज्या गोष्टी मी आपल्याला सांगितल्या–किंवा यापुढे सांगेन––त्या कःपदार्थ होत. हा बेसिल तरुण आहे आणि तो क्विटेरियाच्या बापाच्या बराशेजारीच राहतो. त्यामुळे, पूर्वी ज्याप्रमाणे पिरॅमिस आणि थिस्बे यांच्यामध्ये घडले, त्याप्रमाणे बेसिल आणि क्विटेरिया यांच्यामध्ये प्रेम उत्पन्न झाले आणि त्यातून त्याच्या प्रणय–लीला जन्मास आल्या. बेसिलची प्रेमभावना त्याच्या लहानपणापासून एकसारखी वाढत होती, आणि तिने त्याची ती भावना उत्तेजित केली. आपली सभ्यता संभाळून तिने शक्य त्या प्रेम-चेष्टा केल्या. त्या चिमण्याचे हे प्रेम-प्रकरण इतके वाढले की, साऱ्या गावाचा तो बोलण्याचा विषय झाला. पण क्विटेरिया वयात आली, तेव्हा तिच्या बापाने बेसिलला आपल्या घरी नेहमीप्रमाणे येण्यास प्रतिबंध केला. त्याचे पुढील खेळ थांबविण्यासाठी त्याने तिचे लग्न कॅमॅचोशी करण्याचा आपला निश्चय जाहीर केला. हा कॅमॅचो मालमत्तेच्या बाबतीत बेसिलपेक्षा वरचढ होता, पण इतर सर्व गुणांमध्ये खालच्या दर्जाचा होता. हे मान्य केलेच पाहिजे की, आम्हा लोकांमध्ये बेसिल हा अत्यंत चतुर

माणूस आहे. तो कसरतीचे खेळ खेळतो, कुस्ती मारतो आणि आपल्या भागातील वस्ताद खेळाडूंशी टेनिस खेळतो. काळवीटासारखा तो धावतो, हरिणासारख्या उड्या मारतो आणि चेंडूचा खेळ तर तो इतक्या सफाईने खेळतो की तुम्हाला वाटेल की, हा चेटूकच करतो की काय? चंडोल पक्ष्यासारखा तो गातो. गिटार-वाद्य तर असे खुबीने वाजवितो की, जणू काही ते वाद्य बोलू लागते. आणि त्याच्या या सर्व गुणांची सांगता करणारा गुण म्हणजे, एखाद्या लढवय्याप्रमाणे तो समशेर चालवितो."

हे सारे वर्णन ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, "या त्याच्या शेवटच्या एका गुणा-मुळेही तो 'देखण्या क्विटेरिया' लाच काय, पण राजकन्येलाही योग्य ठरेल, फार काय, आज जर राणी ग्विनेव्हर जिवंत असती, तर सर लॅन्सेलॉट वगैरे सरदारांच्या विरोधाला न जुमानता तिने त्याला वरिले असते." आतापर्यंत गप्प बसून त्यांचा संवाद ऐकणारा सँको आता म्हणाला, "छान! ज्याने त्याने आपल्याला अनुरूप अशा माणसाशी लग्न करावे, असे माझी बायको मला नेहमी सांगत असते. सारख्या–सारख्यांचे विवाह व्हावेत, अशा अर्थाची म्हणच आहे. मला एवढेच म्हणावयाचे आहे की, इमानी बेसिलने तिच्याशी लग्न करावे. मला तो माणूस भलताच आवडतो. ईश्वराने त्या दोघांचा जोडा जमवावा. परस्परांवर प्रेम करणाऱ्या जोडप्यांच्या लग्नात जो कोणी बिब्बा घालील, त्याला पटकी येऊ दे, असे मी म्हणतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "छेः छेः असे कसे होईल? लग्न हे जर नेहमी परस्परांच्या प्रेमाचे फल ठरेल, तर आईबापांच्या अधिकाराचे–आपल्या मुलावरील सत्तेचे–काय होईल? जर उद्या तरुण मुली आपले नवरे निवडू लागल्या, तर थोर–थोर घराण्यांतील मुलींची लग्ने त्यांच्या गाडीवानाशी आणि मोतद्दाराशी होतील. थोर घराण्यांच्या वारस असलेल्या तरुणी आपल्याला प्रथम भेटणाऱ्या बेफाम तरुणाच्या अंगावर कोसळतील. त्या तरुणांचे सारे भांडवल म्हणजे त्यांचा निर्लज्जपणा, त्यांचा बाहेरचा जामानिमा आणि अघळपघळ आश्वासने. यामुळे त्यांच्या श्रीमंतीविषयी त्या तरुणी भलत्याच कल्पना आपल्या मनाशी बांधतात. कारण, इतर व्यवहारांप्रमाणेच प्रेम–प्रकरणातही केवळ विवेकाने पसंती–नापसंती ठरविली पाहिजे. पण पुष्कळ वेळा तो विवेक प्रेम व स्नेह यामुळे अंध व दूषित होतो. विवाह ही आयुष्यातील इतकी सुंदर व महत्त्वाची घटना आहे की, त्यासाठी केवळ आपण सावध-गिरी बाळगून काम करण्याने भागत नाही, तर योग्य माणसाची निवड करण्यासाठी आपल्यापेक्षा वडील असलेल्या अधिकारी व्यक्तीचे मार्गदर्शनही लागते. जो कोणी लांबचा प्रवास करण्यास निघाला तो शहाणा असेल, तर प्रवासात आपल्या मनाजोगता सोबती मिळविण्याचा प्रयत्न तो अवश्य करील. तर मग, सर्व जीवनाचा दीर्घ प्रवास करण्यासाठी जो निघाला, त्याने आपला सहचर निवडण्यासाठी किती सावध असले पाहिजे? स्मशानात जाईपर्यंत त्या सहचराने त्याला सोडता कामा नये. खाण्यापिण्याचे आणि झोपण्याचे वेळी सदासर्वकाळ ते एकमेकांचे सोबती असले पाहिजेत आणि प्रवासातील सुख–दुःखांचे भागीदार असले पाहिजेत. पति–पत्नींचे संबंधही असेच असले पाहिजेत. पत्नी

म्हणजे काही भांडेकुंडे नव्हे– आपल्या मर्जीप्रमाणे केव्हाही फेकून देता येण्यासारखे. एकदा ती पदरी पडली म्हणजे अदलाबदल नाही, विक्री नाही किंवा विच्छेद नाही. ती पुरुषाशी अपघाताने पण अतूटपणे जोडलेली असते. लग्न हा एक फास आहे. तो गळ्याभोवती आवळलेला असतो. त्यातून सुटण्यासाठी आपण धडपड करू लागलो, तर तो अधिकच घट्ट बसतो. लग्न–गाठ ही कधीच तोडता येत नाही. ती आपल्या जीवनाच्या धाग्यामध्ये इतकी गुंडाळलेली असते की, फक्त मृत्यूच आपल्या कोयत्याने ती कापू शकतो. या विषयावर मी अधिक काही बोलत नाही. पण या गृहस्थाने बेसिलसंबंधी आणखी काही माहिती सांगावी अशी इच्छा मी व्यक्त करतो. ''

तेव्हा तो विद्यार्थी म्हणाला, '' मी तुम्हाला एवढेच सांगू शकेन की, निराश झालेल्या प्रेमिकांच्या अवस्थेत तो आहे. या संकल्पित विवाहाचे वृत्त ज्या क्षणी त्याच्या कानी पडले, तेव्हापासून तो कधी विचारपूर्वक बोललेला किंवा हसलेला दिसला नाही. तीव्र दुःखाच्या वेदना तो भोगीत आहे—खरोखर, भ्रांत उन्मादाच्या अवस्थेत तो आहे, असेच म्हटले पाहिजे. तो स्वतःशीच बोलत राहतो. त्याची बुद्धी ताळ्यावर नाही असे दिसते. तो क्वचितच जेवतो–झोपतो. उघड्या मैदानातील रानटी पशूप्रमाणे तो जगतो. एका लहान फळावरच तो आपले उदर–भरण करतो आणि खडबडीत जमीन हीच त्याची शय्या असते. कधी तो आपली नजर आकाशाकडे लावतो तर कधी भुईवर खिळवितो– पण या दोन्ही अवस्थांमध्ये, तो एखाद्या पुतळ्यासारखा उभा राहतो. सारांश, आता तो अशा अवस्थेला जाऊन पोचलेला आहे की, आमच्यासारख्या त्याच्या परिचितांना खरोखर वाटते, ' उद्या हे लग्न साजरे झाले की त्याचवेळी त्याला मृत्यू येईल. '' ते ऐकून सँको ओरडला, '' देव करो आणि असे न होवो. उद्या काय होईल हे कोण सांगू शकेल ? जो डोके फोडतो, तोच मलमपट्टी लावतो. आजचा दिवस निराळा आणि उद्याचा निराळा ! डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच किती तरी विलक्षण गोष्टी घडतात. वादळानंतर शांतता येते. कैक माणसे सुखाने झोपी जातात, पण दुसरे दिवशी सकाळी मेलेली आढळतात. भाग्यचक्रामध्ये अडथळा कोण आणू शकेल ? आपल्यापैकी कोणीच ते चक्र थांबवू शकणार नाही, अशी मला खात्री आहे. स्त्रीचा ' हो ' नि ' ना ' इतके जवळ जवळ असतात की, त्यामध्ये टाचणीचाही शिरकाव मी करू शकणार नाही. श्रीमती क्विटेरियाचे प्रेम श्रीयुत बेसिलवर असेल, तर ती कॅमॅचोला खिदमतगार बनवील. कारण लोक म्हणतात, जो कोणी प्रेमाच्या चष्म्यातून पाहतो, त्याला तांबे सोन्यासारखे, गाडी बग्गीसारखी आणि साधा मासा देवमाश्यासारखा दिसतो. '' तेव्हा डॉन क्विक्झोटनी विचारले, '' अरे सँको, तू कुठे भरकटत चालला आहेस ? जेव्हा तू दुर्दैवाने तुझ्या म्हणींची आणि साळकाया–माळकायांच्या भाकड वचनांची माळ गुंफू लागतोस, तेव्हा सैतानसुद्धा ( त्याने तुला पकडावयास हवे, अशी माझी इच्छा आहे. ) तुला थांबवू शकत नाही. अभागी जीवा, ते भाग्य आणि त्याचे ते चक्र किंवा दुसरे काही तरी– याची तुला रे काय कल्पना ? '' सँको उत्तरला, '' महाराज, खरोखर आपण

मला ओळखले नाही आणि म्हणून माझे बोलणे आपल्याला मूर्खपणाचे वाटते, यात काहीच नवल नाही. पण जाऊ द्या ते. मी मला स्वतःला ओळखतो आणि मला खात्रीने वाटते की, मी मूर्खासारखा बडबडलो नाही. पण खरोखर आपण रातकिड्यासारखे चलाख आहा." तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे मूर्खा, तुला 'रातकिडा' म्हणावयाचे नाही, मानवी वाणी दूषित करणारा टीकाकार, असे तुला म्हणावयाचे आहे." सँको म्हणाला, "म्हटले तर होय, म्हटले तर नाही. पण महाराज, आपण इतके रागावता का? मी कधी शाळेत किंवा विद्यापीठात शिक्षण घेतलेले नाही. मग मी एखाद्या क्लिष्ट शब्दाचा खून केव्हा करतो, हे मला कसे कळणार? शब्द कसे लिहावेत हेही मला माहीत नाही, मी कधी दरबारात गेलोच नाही. कुणी एका शहरात जन्मतो, तर दुसरा दुसऱ्या शहरात. कुणी सेंट जॅगो येथे तर कुणी टोलेडो येथे जन्मास येतो. अन् तरीही सर्वांनाच चांगले बोलता येते असे नाही."

ते त्याचे बोलणे ऐकून तो विद्यार्थी म्हणाला, "मित्रा, तुझे म्हणणे बरोबर आहे. टोलेडो शहरात जे लोक ढोरवस्तीत राहतात किंवा झोकोडोव्हरच्या बाजारात राहतात आणि हीन दर्जाचे संवाद करतात, त्यांची भाषा, त्या शहरातील सुसंस्कृत लोकांच्य भाषेसारखी असूच शकत नाही. आणि तरी ते सारे टोलेडोचेच रहिवासी. पण शैलीचे औचित्य, पावित्र्य आणि सौंदर्य हे गुण विचारी लोकांमध्ये आढळतील–मग ते कोठेही जन्मोत. कारण, विचार हा चांगल्या भाषेचा आत्मा असतो. अर्थात् सवयीने आणि दुसऱ्याचे उदाहरण पाहून पुष्कळ सुधारणा करता येते. माझ्यासंबंधी म्हणाल तर, मला चांगले शिक्षण सुदैवाने मिळालेले आहे. सॅलामँका येथे मी दिवाणी कायद्याचा अभ्यास केलेला आहे. योग्य भाषा वापरण्याचा–खेडवळाप्रमाणे किंवा पंडिताप्रमाणे न बोलण्याचा–प्रयत्न मी करीत असतो." दुसरा विद्यार्थी म्हणाला, "खरे आहे, महाशय, आपल्या गुणांमुळे आपल्याला एम्. ए. ची पदवी केव्हाच मिळाली असती. पण आपण आपल्याबरोबर ज्या तरवारी मूर्खपणे बाळगता, त्यांची काळजी घेण्यात आपण आपल्या शक्तीचा दुरुपयोग करता आणि म्हणून आपण आपल्यापेक्षा मागच्या वर्गात असलेल्या विद्यार्थ्यांच्याही मागे राहता." तेव्हा दुसरा विद्यार्थी म्हणाला, "भल्या माणसा, माझ्या या तरवारीबद्दल तुला जी तुच्छता वाटत आहे, ती चुकीची आणि मूर्खपणाची आहे. कारण, कैक निरपवाद सिद्धांतांनी मी खड्ग–युद्धाच्या विद्येची उपयुक्तता दाखवू शकेन." तेव्हा तो दुसरा विद्यार्थी–कोर्चुएलो–म्हणाला, "थांबा, मला ते सिद्धांत सांगू नका. मी तुमच्याच शस्त्रांनी तुमच्याशी लढेन. मला छटाक किंवा लिटर दारू काहीच कळत नाही. पण माझ्याजवळ शस्त्र आहे, शक्ति आहे आणि धैर्य आहे. त्या तुमच्या तलवारी मला द्या, त्यावर कितीही वर्तुळे, कोन, अंतरे दाखविलेली असली, तरीसुद्धा त्यात काही अर्थ नाही, हे मी तुम्हाला दाखवून देईन आणि मग तुमच्या डोळ्यात बुद्धीची चमक दिसू लागेल. ज्या माणसावर मी तुटून पडेन, तो जिवंत रहाणार नाही आणि माझ्याविरुद्ध जो आपल्या ठायी यशस्वीपणे उभा राहील, त्याच्या अंगी मानवी

शक्तीपेक्षा अधिक बळ असले पाहिजे. ”

तो कलावंत म्हणाला, “मी काही आपल्या स्थानी यशस्वीपणे उभा राहू शकणार नाही. पण महाराज, ही काळजी घ्या की, हुषार माणसावर तुम्ही पहिल्या धडाक्यासरशी हल्ला कराल तेव्हा त्याची तलवार मुठीपर्यंत तुमच्या अंगात घुसणार नाही. ” कोर्चुएलो म्हणाला, “ ते मी आताच करून दाखवितो. ” आणि आपल्या गाढवावरून झटदिशी खाली उतरून, त्याने त्या विद्यार्थ्याजवळची एक तलवार हिसकावून घेतली. तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, “ थांबा ! थांबा ! या सामन्यात मी पंच म्हणून काम करीन आणि दोन्ही बाजूचा खेळ निःपक्षपातीपणाने पाहीन.” आपला भाला मधे घालून ते घोड्यावरून खाली उतरले आणि त्या कलावंताला योग्य अंतरावर आपल्या पवित्र्यात उभे राहण्यास त्यांनी वेळ दिला. नंतर कोर्चुएलो त्या कलावंतावर तुटून पडला. मागे-पुढे उड्या मारून, इकडे तिकडे धावून त्याने त्याला पुढेमागे, वरखाली, घाव मारले आणि सिंहा प्रमाणे हल्ला चालू ठेवला. पण त्या दुसऱ्या विद्यार्थ्याने त्याच्या दातावर असा काही जबरदस्त रड्डा दिला की, त्यामुळे कोर्चुएलोच्या तोंडातून फेस येऊ लागला आणि त्याचा पराक्रम मध्येच थंडावला. त्याने त्याला आपल्या तलवारीच्या मुठीचे भक्तिभावाने चुंबन घ्यावयास लावले-जणु काही तो एक पूज्य अवशेषच आहे. सारांश, त्याने भोसकून त्याच्या झग्याची सारी बटने टिपली आणि त्याच्या झग्याची टोके पाडून माश्याच्या शेपटाप्रमाणे लोंबत ठेवली. त्याने त्याची टोपी दोनदा उडविली आणि शेवटी त्याला इतके जखमी केले व दमविले की, कोर्चुएलोने अत्यंत उद्वेगाने तलवार मुठीकडून धरली आणि अशा त्वेषाने फेकून दिली की, जवळून एक तद्देशीय नोंदणी-अधिकारी जात होता, त्याने ती तलवार तीन-चार कोस फेकली गेल्याचे नोंदलेले आहे. शक्तीवर कला मात करते, याची साक्ष या प्रसंगाने दिली आणि पुढील पिढ्याना देत राहील.

कोर्चुएलो धुमसत नि थरथरत होता, तो शेवटी विसावा घेण्यासाठी खाली बसला. त्याच्याजवळ जाऊन सँको म्हणाला, “ पंडितमहाशय, यापुढे माझ्यासारख्या मूर्खांचा सल्ला ऐका. कोणाही माणसाला तलवार खेळण्यास आव्हान देऊ नका-कुस्तीचे किंवा कसरतीचे आव्हान द्या. त्या खेळासाठी तुम्ही जन्मलेले दिसता. पण तलवारबाजी हा नाजूक खेळ आहे; त्याच्याशी लुडबूड करू नका. कारण, तुमचे काही शास्त्र-विशारद लोक असे म्हणताना मी ऐकले आहे की, ‘ आम्ही तलवारीच्या टोकाने सुईचे नेढे छेदू शकू. ” कोर्चुएलो याने कबूल केले की, अनुभवाने मला माझी चूक कळून आली. नंतर त्याने त्या कलावंताला आलिंगन दिले. या चकमकीमुळे त्यांची मैत्री वृद्धिंगत झाली. म्हणून ती तलवार शोधण्यासाठी जो नोंदणी-अधिकारी गेला होता, त्याची वाट न पाहता, ( तो लौकर परत येणारच नव्हता. ) ते सारेजण क्विटेरिया रहात असलेल्या शहराकडे निघाले. एकाच खेड्याचे ते सारे रहिवासी होते. रस्त्याने जाताना त्या विद्यार्थ्याने नानाविध कारणे देऊन आणि गणिताच्या विविध आकृती काढून, संरक्षण-शास्त्राचे महत्त्व त्या सर्वांना पटवून दिले. कोर्चुएलोचा अविश्वाससुद्धा नाहीसा झाला.

आता बराच काळोख पडला होता. पण ते खेड्यात पोचण्यापूर्वी त्यांना दुरून एक लखलखीत आरास दिसली. गाण्याचे, नगाऱ्याचे, तंतुवाद्यांचे, तुणतुण्याचे, ताश्या–वाजंत्रीचे संमिश्र पण आनंददायक असे कैक ध्वनी त्यांच्या कानावर पडले. ते गावाच्या-जवळ जसजसे गेले, तसतसे त्यांना वेशीवर लता-पल्लवानी सुशोभित अशी मोठी कमान दिसली. तिला खूप दिवे लावले होते आणि त्यांचा प्रकाश प्रखरपणे पडत होता. वाऱ्याच्या झोतामुळे त्यात काही अडथळा येत नव्हता. लग्न–समारंभातील करमणुकीच्या कार्यक्रमाचे जीव की प्राण म्हणजे गायक. ते त्या हिरवळीवरून इकडे–तिकडे गटागटानी हिंडत होते. थोडक्यात म्हणजे, काहीजण नाचत होते, काहीजण गात होते, काही-जण खेळत होते. त्या मधुर सौख्य–भूमीत आनंद आणि हर्ष यांना उधाण भरती आली होती. कॅमाचोच्या आनंददायक विवाहासाठी (तसेच बिचाऱ्या बेसिलच्या अंत्यविधीसाठी) जे करमणुकीचे खेळ खेळले जाणार होते, ते नीट पाहता यावेत म्हणून, बसण्याच्या उंच जागा तयार करण्यात बाकीचे लोक गुंतलेले होते. डॉन क्विक्झोट शहरात प्रवेश करण्यास तयार नव्हते. विद्यार्थ्यांनी आणि गावकऱ्यांनी कितीही आर्जव केली, प्रयत्न केले, तरी ते आपल्या निश्चयापासून ढळले नाहीत. त्याचे कारण त्यांनी असे दिले की, "सोनेरी राजवाड्यात, मऊ मऊ बिछान्यावर लोळत पडण्यापेक्षा, आकाशाच्या छताखाली, राना-वनात मुक्काम करणे, हे शिलेदारांना पसंत असते–तशी त्यांची वहिवाट असते." असे म्हणून ते रस्ता सोडून जरा दूर गेले. हे सँकोच्या इच्छेविरुद्ध घडले. कारण, त्याला डॉन डीएगोच्या घरात किंवा किल्ल्यात जो निवास व पाहुणचार मिळाला होता, त्याचे अद्याप विस्मरण झाले नव्हते.



## प्रकरण २०

# श्रीमंत कॅमाचोचा विवाह आणि गरीब बेसिलवरील संकट

लावण्यमयी उषा-देवतेने तेजोनिधी भगवान सूर्य-नारायणाला वाट करून दिली, आणि त्याने आपल्या सहस्र-रश्मींच्या तेजाने उषेच्या सोनेरी केशकलापावरील मोत्या-सारखे चंचल दंव-बिंदू थोड्याच वेळात आटवून टाकले. अशा उषःकाली, डॉन क्विक्झोट यांनी आपल्या सुस्त अंगोपांगावरील निद्रेचे पांघरूण उडवून लाविले आणि जागे होऊन त्यांनी आपल्या सेवकाला पाचारिले. पण सँकोची स्वारी अजून घोरत आहे, हे पाहून ते म्हणाले, " अरे अत्यंत भाग्यशाली मानवा, किती मधुर विसावा तू घेत आहेस ! कोणाच्याही मोठेपणाचा हेवा तुला वाटत नाही आणि तू कोणाचाही हेवा करीत नाहीस. त्यामुळे तू स्वस्थ नि शांत चित्ताने गाढ झोपी जातोस ! कोणाही जादू-गाराची जादू तुझा पिच्छा पुरवीत नाही आणि तू कोणाही मांत्रिकाच्या मंत्राला भीक घालीत नाहीत. झोप, झोप, हजारदा झोप ! प्रेमिकांचा हृदयभंग करणाऱ्या मत्सराचा वारा तुझ्या चित्ताला स्पर्श करीत नाही. तसेच, लोभी सावकारांचे भय तुझ्या मनाला शिवत नाही. पुढील अटळ अनर्थाच्या कल्पनेने तू कधी निराश होत नाहीस आणि एखाद्या क्षुधित-असहाय्य कुटुंबाला भाकरी कशी मिळेल, या चिंतेने तुला कधी जाग्रण घडत नाही. महत्त्वाकांक्षेमुळे तू कधी अस्वस्थ होत नाहीस आणि या जगाचा भपका नि बडेजाव पाहून तुझे मन कधी गोंधळत नाही. कारण, तुला एकाच गोष्टीची चिंता आहे-अन् ती म्हणजे आपल्या गाढवाची. तुझा देह आणि तुझे हित-हे सर्व तू माझ्यावर सोपविलेले आहेस. सेवकांच्या कार्याचा सर्व भार त्याच्या धन्याच्या शिरावर निसर्गाने आणि रूढीने ठेवलेला आहे. बडा गुलाम कोण ? सेवकाने थोडीफार कष्टाची कामे केली की त्याचे कर्तव्य संपते आणि मग तो सुखाने विश्रांती घेतो नि गाढपणे झोपी जातो. पण त्याच्या चिंतातुर धन्याला आपले डोळे मिटण्यास सवड सापडत नाही. आपल्या सेवकाच्या चरितार्थाची सोय करण्यासाठी त्याला रात्रंदिवस राबावे लागते. केवळ समृद्धीच्या काळातच नव्हे तर, अन्न-पाण्याची गरज दूर करण्यासाठी जरूर असणाऱ्या पर्जन्य-धारा सोडण्याचे जेव्हा वरुणराजा नाकारतो, अशा दुष्काळाच्या काळीही धन्याला सेवकाच्या पोटापाण्याची तरतूद करावी लागते. "

या सुंदर कान-उघाडणीला सँकोने एका शब्दानेही उत्तर दिले नाही-तो तसाच झोपून राहिला-धन्याच्या हाकांनी किंवा इतर कारणांनीही तो जागा झाला नाही. शेवटी

त्याच्या धन्याने त्याला आपल्या भाल्याच्या तीक्ष्ण टोकाने त्याच्या कुल्ल्यावर टोचले. तेव्हा कोठे त्याने आपल्या पापण्या अर्धवट उघडल्या. त्या चोळीत चोळीत त्याने तोंड उघडले, जांभई दिली आणि आपले सुस्त अवयव ताणले. मग त्याने इकडे तिकडे पाहिले, नाकाने ' सूं सूं ' केले आणि तो म्हणाला, " या सभोवतालच्या बागेतील साऱ्या वनस्पतींचा जो सुगंध दरवळत आहे, त्यापेक्षा उत्तम शिजविलेल्या मांसाचा शुद्ध वास माझ्या नाकाला अधिक सुखदायक वाटत आहे. देवाशपथ, ज्या लग्नाचा प्रारंभ इतक्या मधुर सुवासाने होत आहे, ते अत्यंत नामी असले पाहिजे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे अधाशी माणसा, ऊठ, ऊठ. चल आपण जाऊ या आणि लोकांनी झिडकारलेल्या बेसिलचे कसे काय चालले आहे, हे पाहू या. " त्यावर सँको म्हणाला, " आग लागो त्याला! तो जर मूळचा रंक असेल, तर अजूनही तो तसाच असेल–आणि म्हणून त्याने क्विटेरियाशी लग्न करण्याचे मनात आणू नये. खरोखर वेडी आशा आहे ती त्याची! त्याच्याहून मोठमोठ्या लोकांना जे मिळणे योग्य, त्याच्यासाठी तो रंक वेड्या-सारखा धावत सुटला आहे. मी पैजेवर सांगतो की, कॅमॅचो न्याहारीसाठी जो खर्च करील, तो त्याला जन्मात करता येणार नाही. त्याला पायापासून डोक्यापर्यंत चांदीच्या नाण्यांनी झाकून टाकले तरी कॅमॅचोला काही कमी पडणार नाही. आणि महाराज, आपल्याला असे वाटते काय की, कॅमॅचोने मॅडम क्विटेरियाला जे जे उंची कपडेलत्ते दिले, भपकेबाज पोशाख दिले आणि मोत्याचे, रत्नांचे दागदागिने व कंठे–हार वगैरे जडजवाहर दिले आणि यापुढेही जे देणे त्याला परवडेल, त्या सर्वांचा त्याग करून या भिकाऱ्याशी ती लग्न करील आणि आपल्या पोटापाण्यासाठी विणीत किंवा सूत कातीत बसेल? त्याच्या लाठीफेकीचे नि तरवारबहाद्दरीचे महत्त्व ते काय? त्यामुळे उपाहार–गृहात मापभर दारू तरी विकत मिळेल काय? त्याच्या या साऱ्या गुणांची बाजारात काय किंमत? त्यामुळे चुलीवर भांडे कसे चढेल? मरोत ते गुण! सुस्थितीतल्या माणसाला ते प्राप्त झाले तर त्याच्या कामी ते येतील हे खरे. भक्कम पायावर, चांगला माल घेऊन, एखादा माणूस उत्तम घर बांधू शकेल, पण जगात पैसा हाच कोणत्याही कार्याचा भक्कम पाया होय. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " प्रिय सँको, कृपा कर आणि तुझे हे कंटाळवाणे प्रवचन समाप्त कर. मला तर असे वाटते की, तू एकटा असलास आणि तुझी टकळी सुरू झाली म्हणजे तू आपल्या डोक्यातील विषय संपेपर्यंत वटवट करीत राहशील. खाण्या–पिण्याला किंवा झोपण्यालासुद्धा तू उसंत घेणार नाहीस. " ते ऐकताच सँकोने ताडकन् उत्तर दिले, " धनीमहाराज, आपली स्मरणशक्ती फार तोकडी आहे. मी जेव्हा या शेवटच्या प्रवासाला आपल्याबरोबर निघालो, तेव्हा आपण उभयतांनी एक करार केला होता. त्याची कलमे आपल्याला आठवत नाहीत असे दिसते. माझ्या इच्छेस येईल तेव्हा, मला वाटेल ते, मी बोलावे असे ठरले आहे. मात्र मी माझ्या शेजाऱ्याविरुद्ध किंवा आपल्या अधिकाराविरुद्ध काही बोलावयाचे नाही. मी या कराराचा भंग अद्याप

केलेला आहे, असे मला वाटत नाही. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " असा काही करार झाल्याचे मला आठवत नाही. आणि तो झाला असला तरी तू गप्प बसावेस आणि माझी सेवा करावीस, अशी माझी इच्छा आहे. कारण, काल रात्री आपण वाद्यांचा जो घोष ऐकला, तो आता साऱ्या दऱ्या-खोऱ्यात दुमदुमण्यास सुरवात झाली आहे. यावरून हा विवाह आज सकाळीच – सूर्याचा ताप वाढण्याच्या आधी– साजरा होईल हे निःसंशय. " यावर सँको काही बोलला नाही. त्याने रोझिनान्टेच्या पाठीवर जीन आणि तसेच डॅपलच्याही पाठीवर खोगीर घातले. नंतर ते दोघे स्वार होऊन त्या लताकुंजाकडे मंद मंद गतीने पण ऐटीत गेले.

सँकोच्या नजरेला सुखावणारे पहिले दृश्य तेथे जे दिसले, ते म्हणजे एका मोठ्या एल्म वृक्षाला एक खोंड सळईने खुपसून टांगला होता आणि त्याच्यापुढे मोठा जाळ पेटलेला होता. लाकडाची ती पेटलेली होळी पाहून, जणु काही वणवा लागलेला हा डोंगरच आहे, असे कोणास वाटले असते. या होळीभोवती सहा मोठी भांडी ठेवलेली होती. त्यांचा आकार नेहमीपेक्षा निराळा होता. ती प्रचंड सहा बंगाळेच होती. त्या-पैकी प्रत्येकामध्ये मांस शिजत होते. सबंध मेंढ्याच्या मेंढ्या त्यात बुडाल्या होत्या– कबुतरासारख्या शिजून निघत होत्या. सभोवतालच्या झाडांच्या फांद्यावर असंख्य सोललेले ससे आणि निरनिराळ्या जातींच्या कोंबड्या टांगलेल्या होत्या. आणि पिण्या-साठी साठ–पन्नास–शेरी बुधल्यात दारू भरून ठेवलेली सँकोने मोजली आणि ती त्याला नंतर चांगली चटकदार आढळली. एका बाजूला पांढऱ्या पावांची भलीमोठी भिंतच उभी होती, तर एकावर एक लावलेल्या विटांप्रमाणे, चीजची भव्य तटबंदी शोभिवंत दिसत होती. रंगाऱ्याच्या पिपापेक्षा मोठी अशी दोन भांडी तेलाने भरलेली होती. त्यात परोठे तळण्यासाठी टाकले जात होते. तेलात तळलेले ते परोठे याच प्रसंगासाठी आणलेल्या मधाच्या भांड्यात शिजविण्यात येत होते. हे सर्व खाद्यपदार्थ पकविण्यासाठी सुमारे पन्नास स्त्री–पुरुष आचारी तेथे होते व ते सारे स्वच्छ, हुशार आणि आनंदी दिसत होते. खोंडाच्या प्रशस्त पोटात त्या आचाऱ्यांनी बारा तान्ही डुकरांची पिले, स्वादिष्ट-पणा यावा म्हणून, शिवून टाकली होती. भोवताली सर्व प्रकारचे मसाले इतक्या विपुल प्रमाणात पडले होते की, ते ठोक भावाने विकत घेतलेले असावेत असे दिसत होते, थोडक्यात म्हणजे, तो सर्व खाद्य-संभार खेडवळ पद्धतीचा असला तरी, एकाद्या सैन्याला मेजवानी देण्याइतका भरपूर होता.

हे सारे दृश्य सँकोने आनंदाने व आश्चर्याने पाहिले. त्याच्या इन्द्रियांना प्रथम मोह पडला तो त्या प्रचंड अन्न–पात्रांचा ! त्यामुळे त्याच्या पोटात कावळे ओरडू लागले आणि त्याच्या तोंडाला पाणी सुटले. हळूहळू मद्य–पात्रावर त्याचे प्रेम जडले, शेवटी मांस तळावयाच्या तव्यावर त्याचे मन लुब्ध झाले. तळलेल्या मांसाच्या सुगंधामुळे त्याच्या पोटात अशी काही खळबळ माजली की, त्याला दम धरवेना. आपल्या कामात गर्क असलेल्या एका सैंपाक्याकडे तो गेला आणि त्याला सहजसाध्य असणाऱ्या आर्जवी

युक्तिवादाने त्याने खाण्यासाठी तळणीत थोडा पाव भिजवून घेण्याची परवानगी मागितली, तेव्हा तो सैपाकी म्हणाला, " ( संस्थापकाच्या कृपेने ) आज येथे आमच्याजवळ कोणीही भुकेला राहता कामा नये. मित्रा, ये, ये, खाली उतर. तुला जर पळी सापडत नसेल तर एक–दोन कोंबड्या कढईतून तशाच उचल, आणि त्यांनी तुझे चांगले भले होवो." सँको म्हणाला, "महाराज, येथे तर एकही पळी दिसत नाही." तेव्हा तो सैपाकी ओरडला, "किती मूर्ख माणूस आहेस तू ! मी पाहतो." असे म्हणून त्याने एक किटली घेतली आणि एका कढईत ती खुपसून एकाच दमात तीन कोंबड्या आणि दोन बदके वर उचलली व तो सँकोला म्हणाला, "हे घे दोस्ता, भोजन तयार होईपर्यंत या मळीवर तू आपली भूक भागव." सँको आनंदाने ओरडला, "देव तुझे भले करो, पण मी हे ठेवू कोठे ?" सैपाक्याने उत्तर दिले, "येथे ठेव. पळी वगैरे सारी भांडी घेऊन जा आणि संस्थापकाला पुनः एकदा धन्यवाद दे. तुला कुणीही अडथळा करणार नाही."

अशा प्रकारे उदर–भरणाच्या कामात सँको गुंतला असताना डॉन क्विक्झोट यांना शेतकऱ्यांची बारा तरुण मुले दिसली. त्या सर्वांचे पोषाख थाटामाटाचे होते. खेड्यामध्ये शक्य तेवढ्या श्रीमंतीने व भपक्याने शृंगारलेल्या रुबाबदार घोड्यांवर बसून ते येत होते. त्यांच्या घोड्यावरच्या साजाला लहान लहान घंटा लावलेल्या होत्या. एका गटाने येणाऱ्या त्या तरुणांनी हिरवळीवर इकडून तिकडे कित्येक फेऱ्या मारल्या आणि ते आनंदाने, मोठमोठ्याने ओरडले, "कॅमॅचो आणि क्विटेरिया दीर्घायू होवोत ! ती जितकी सुस्वरूप तितका हा सधन ! अलम दुनियेतील सर्वांत देखणी म्हणजे आमची क्विटेरिया !" हा त्यांचा जयघोष कानावर पडला तेव्हा डॉन क्विक्झोट मनात म्हणाले," अरेरे ! काय हे अडाणी लोक ! जसे तुमचे ज्ञान, तसे तुम्ही बोलता. अरे, तुम्ही जर माझ्या टोबोसोच्या डल्सीनियाला नुसते पाहिले असते, तरी येथे अशी प्रशंसेची पुष्पांजलि वाहिली नसती." थोड्याच वेळात त्या विस्तीर्ण लताकुंजाच्या निरनिराळ्या विभागात नर्तकांचा मोठा ताफा शिरला. त्यातच, सुंदर सुंदर सदरे घातलेले आणि नानाविध रंगांचे रेशमी हातरुमाल डोक्याला गुंडाळलेले चोवीस खेडवळ चपळ मुलगे तेथे आले. त्यांच्यापैकी प्रत्येकाच्या हातात तलवार होती. त्यांनी लष्करी थाटाचा नाच करून दाखविला आणि एकमेकांशी लढत दिली. आपल्या नागव्या तलवारींचे आघात–प्रत्याघात, विलक्षण चपळाईने आणि उत्साहाने, ते करीत होते. पण कोणाला थोडीसुद्धा दुखापत करीत नव्हते. हा लष्करी नाच पाहून डॉन क्विक्झोट यांना निरतिशय आनंद झाला. असे नाच त्यांनी पूर्वी पाहिले नव्हते असे नाही, पण जे पाहिले त्या सर्वांत हा उत्तम आहे असे त्यांना वाटले. तसाच त्यांना दुसराही एक नाच फार आवडला. चौदा ते सोळा वर्षांच्या अत्यंत रूपसंपन्न तरुणींनी तो केलेला होता. त्यांनी फिकट हिरव्या रंगाचे कपडे घातले होते आणि त्यांचे काही केस फितींनी बांधलेले होते, तर काही खांद्यावरून खाली लोळत होते. सूर्याच्या सोनेरी किरणांप्रमाणे ते चम् चम् करीत होते

आणि सुंदर दिसत होते. या सर्व सौंदर्याला शोभा आणणाऱ्या गुलाबांच्या, जास्वंदीच्या, कोरंटीच्या आणि सदाफुलीच्या माळा त्या सर्व युवतींनी धारण केलेल्या होत्या. त्या सर्वांना एका पूज्य वृद्ध माणसाने व प्रौढ स्त्रीने पुढे चालविलेले होते. त्या दोघांच्या वयावरून कोणालाही वाटेल त्यापेक्षा अधिक उत्साह आणि चपलता त्यांच्या अंगी होती. ते दोघे झामोरा पिशवी–पिपाण्यांच्या संगीतावर नाचू लागले. त्यांच्या दृष्टीत इतकी नम्रता होती आणि त्यांच्या पायात इतकी चपलता होती की, साऱ्या जगातील अत्यंत कुशल नर्तक ते आहेत, असे कोणासही वाटावे.

त्यानंतर एक कृत्रिम नृत्य किंवा काव्य–नाट्य सुरू झाले. त्यात आठ अप्सरांनी भाग घेतला होता. त्यांचे दोन विभाग पाडलेले होते. त्यांपैकी एकाचे नेतृत्व ' प्रीती 'ने केले होते, तर दुसऱ्याचे 'संपत्ती'ने. प्रीती–देवतेला पंख होते आणि तिच्या हाती धनुष्यबाण व पाठीशी भाता होता. ' संपत्ती 'च्या देवतेचा वेष विविधरंगी, भपकेबाज, जरतारीचा व रेशमाचा होता. ' काम–देवा 'च्या पथकातील अप्सरांच्या पाठीवर त्यांची नावे मोठमोठ्या अक्षरांनी लिहिलेली होती. पहिलीचे नाव होते ' काव्य–शारदा, ' दुसरीचे ' विवेकिनी ', तिसरीचे ' उदात्तता ' आणि चवथीचे 'शूरता'. 'संपद्–देवते'च्या अप्सरांची नावे होती–' उदारता,' ' तृती ' , ' निधी ' आणि ' समृद्धि '. त्यांच्यापुढे एक दृश्य आले. त्यात एक किल्ला होता. हिरवे पोशाख घातलेले चार रानटी लोक तो किल्ला ओढून आणीत होते. त्यांचे चेहरे उग्र व ओबड–धोबड दिसत होते आणि ते इतके खरे वाटत होते की, ते पाहून सँकोची गाळण उडाली. त्याच्या पुढील भागावर आणि प्रत्येक दिशेला ' सुज्ञ संयमाचा किल्ला ' अशी अक्षरे लिहिलेली होती. चार तज्ञ वादक पिपाण्या व खंजिऱ्या वाजवीत चालले होते. ' कामदेवा 'ने आपले नृत्य सुरू केले. नृत्याचे दोन प्रकार सादर केल्यानंतर त्याने त्या किल्ल्याच्या तटबंदीवर उभ्या असलेल्या एका कुमारिकेकडे दृष्टिक्षेप केला आणि त्या दिशेने आपले धनुष्य वाकविले व स्वतःविषयीचे तो पुढील पद्य म्हणू लागला :—

### प्रीती

" माझे नाव प्रेम, माझी सत्ता सर्वश्रेष्ठ,
सर्वाधिक सुख आणि सर्वाधिक दुःख,
वायु, पृथ्वी, सागर, माझ्या सामर्थ्याचे आज्ञांकित,
आणि प्रत्यक्ष देवांनी माझी शृंखला ओढली पाहिजे.

" प्रत्येक हृदयांत मी माझे सिंहासन ठेवतो,
माझ्या धाडसी जीवाला भीति कधीच विचलित करू शकली नाही;
खोल जलधीच्या हृदयांत मी आग पेटवतो,
आणि प्रगाढ रसातलाचे नियमन करतो. "

ही पदे म्हणून झाल्यानंतर ‘काम–देवा’ने किल्ल्यावर एक बाण मारला आणि तो आपल्या जागेवर परत येऊन बसला. नंतर आली संपत्ति–देवता. तिने दोन नृत्य–प्रकार करून दाखविले. मग संगीत थांबले आणि ती गाऊ लागली—

## संपदा

प्रेम माझी प्रेरणा आणि माझे फळ,
पण मी प्रेमापेक्षा महत्तर शक्ति आहे;
जरी पृथ्वीवर जन्मले तरी पृथ्वीहून श्रेष्ठ,
कारण संपदा हा दैवी वर आहे.
उज्ज्वल बाले, माझ्यासह घे आणि धन्य मान
सर्व यशाची निश्चित प्रतिज्ञा;
( मी ) सर्वांनी वांछिलेली, थोडयांनी योग्यपणे उपयोजलेली,
पण तू शोभा दिल्यावर सर्वोचित प्रदान केलेली. ”

संपत्ति–देवता मागे सरली आणि काव्य–शारदा पुढे आली. इतरांप्रमाणेच नृत्य–प्रकार केल्यावर तिने आपली नजर किल्ल्यावरील युवतीवर रोखली आणि पुढील पंक्ती म्हटल्या—

## कविता–शक्ति

मधुर काव्यशक्ति मन हेलावणाऱ्या कवनांनी
हृदयांत प्रीति आणि जीवांत संवेदना पोहोचवते;
पवित्र कोपाने स्वर लावून धन्यतेस किंवा दुःखास,
संपूर्ण मानवाला प्रवृत्त करते, आणि भूतलावरच स्वर्ग देते.
सकल लालित्यगुणांनी विभूषित आणि तेजस्वी अप्सरा,
ही उदात्त कविता तुझ्याकडून अव्हेरली जाईल काय ?
तुझ्या सौंदर्याचा सर्वाधिक गौरव करू शकेल बुद्धीच
तेव्हा मग काव्य–देवते उच्चपद दे, तिच्यामुळे तूही उच्चपद पावशील.

काव्य–शारदा मागे सरली आणि उदारता, संपदेच्या बाजूने पुढे सरकली. नृत्य केल्यावर ती म्हणाली :—

काटकसरी आणि सढळ यांच्यामधला
तो उदात्त मध्यममार्ग पहा;
उदारतेचे जेव्हा आचरण होते
तेव्हा शहाणपण आणि गुण दृष्टीस पडलाच पाहिजे.
पण तुझ्यासाठी मी मुक्तहस्त दिसेन
तुझ्याखातर मी समृद्धि मान्य करीन
कारण गुण जेथे परम आहे
तेथे प्रीतीचा अतिव्यय कोण करणार नाही ?

अशा प्रकारे प्रत्येक पथकातील सर्व व्यक्ती पुढे आल्या आणि आपापल्या कविता म्हणून गेल्या. त्यांपैकी काही छानदार तर बऱ्याच मूर्ख होत्या. डॉन क्विक्झोट यांची स्मरणशक्ती चांगली होती तरी त्यांच्या स्मरणात बाकीच्यांपैकी येथे दिलेल्या तेवढ्याच कविता राहिल्या. त्यानंतर दोन पथकांनी एका सुंदर ग्रामीण नाचात संयुक्तपणे भाग घेतला. कामदेवाने त्या किल्ल्याजवळून जाताना शरसंधान केले आणि संपत्तिदेवीने त्या किल्ल्यावर सोनेरी चेंडू फेकले—आणि रोमन धर्तीच्या भरगच्च दिसणाऱ्या मोठ्या थैलीतून काही नाणी काढून तिने ती त्या किल्ल्यावर फेकली. त्यामुळे तो किल्ला ज्या पुठ्ठ्याचा बनविला होता, ते मोडून खाली पडले. किल्ल्यावरील कुमारिकेचे संरक्षण नाहीसे झाले, तेव्हा संपत्ति-देवीने आपल्या पथकासह तत्काळ तिकडे कूच केले आणि त्या राजकन्येच्या गळ्याभोवती सोन्याची साखळी टाकून तिला कैद करून चालविले. हे पाहताच कामदेव आपल्या सेवकांसह तिच्या सुटकेसाठी धावून गेला. दोन्ही पक्षांचा सामना झाला. त्यांना त्या रानटी लोकांनी बाजूस सारले आणि खाली पडलेले पुठ्ठे सांधले. त्यामुळे ती राजकन्या पूर्ववत् परिवेष्टित झाली. या साऱ्या क्रिया संगीताच्या तालावर होत होत्या. त्यामुळे प्रेक्षक फार संतुष्ट झाले आणि तो नृत्य-समारंभ समाप्त झाला.

सारे संपल्यावर डॉन क्विक्झोट यांनी एका अप्सरेला विचारले, " हा सारा खेळ कोणी रचला ? " तिने उत्तर दिले, " आमच्या शहरात एक पाद्री राहतो. त्याला असे लिहिण्याची अलौकिक देणगी आहे. त्याने हे लिहिले आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मी पैज लावण्याचे धाडस करीन की, तो लेखक कॅमॅचोपेक्षा बेसिलचा मित्र अधिक असावा. प्रार्थना–पुस्तकापेक्षा नाट्य–पुस्तकाचे ज्ञान त्याला चांगले दिसते. तुमच्या नृत्याचे द्वारा त्याने बेसिलचे गुण आणि कॅमॅचोचे ऐश्वर्य अत्यंत सहजतेने चित्रित केले आहे. " हा संवाद ऐकत असलेला सँको म्हणाला, " राजा व कॅमॅचो यांच्यावर देव कृपा करो, एवढेच मी म्हणतो. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, आपला पक्ष झटपट बदलणारा तू भेकड नि लबाड माणूस आहेस. ' जेता अमर असो ' असा जयघोष करणाऱ्या सामान्य लोकांच्या घोळक्यातलाच तू एक आहेस. " सँको उत्तरला, ' मी कोणासारखा आहे हे मला माहीत नाही. पण मला एवढे माहीत आहे की, बदकांचे आणि कोंबड्यांचे हे पातेलेभर मांस कोणत्याही राजाला लाच म्हणून देण्यासारखे आहे. कॅमॅचोने माझे पोट भरले आणि म्हणून माझे हृदय जिंकले. बेसिलच्या कढईतून इतका नामी रस्सा मला पळीने केव्हा तरी काढून घेता येईल काय ? " जवळचे मांस धन्याला दाखवून त्याने त्यावर हात मारण्यास सुरुवात केली. " मग करायचे काय त्याचे कर्तृत्व ? मी त्याला थोडीदेखील किंमत देत नाही. पेरील तशी कापणी याला करू द्या आणि कापणी करतो आहे तसे पेरू द्या. माझी म्हातारी आजी ( तिच्या आत्म्याला शांति मिळो ! ) नेहमी म्हणायची, जगात दोनच घराणी आहेत–एक भरपूरवाल्यांचे नि दुसरे टंचाईवाल्यांचे. तिला नेहमी भरपूरवाल्या घराण्या-

विषयी मोठे प्रेम वाटे. डॉक्टर तुम्हाला सल्ला देतो, तो तुमच्या खिशाची नाडी तपासून. गाढव सोन्याने मढविले म्हणजे खोगीर घातलेल्या घोड्यापेक्षा चांगले दिसते. म्हणून मी पुनः म्हणतो, कॅमॅचो थोर आहे. " हे चऱ्हाट ऐकून डॉन क्विक्झोटनी विचारले, " अजून तुझे भाषण संपले की नाही ? " तेव्हा सँकोने उत्तर दिले, " मी ते संपवलेच पाहिजे. कारण, तुम्ही प्रक्षुब्ध होण्याच्या बेतात आहात असे मला दिसते. नाही तर तीनचार दिवस चालण्याइतके भाषण माझ्याजवळ तयार आहे. " तेव्हा डॉन क्विक्झोट म्हणाले, " बरोबर ! तुझे तोंड चिखलाने भरून जाईपर्यंत तू गप्प बसणार नाहीस. तू मेलास म्हणजेच मला थोडाफार विसावा मिळेल अशी आशा आहे. " सँको म्हणाला,

" मृत्यूची भाषा तुम्ही काढली हे काही ठीक नव्हे. मृत्यु म्हणजे काही पोरखेळ नव्हे. तुम्ही माझ्या जेवणाचा विचका केला. मेलेल्या माणसाच्या शुष्क हाडाच्या आणि जबड्याच्या नुसत्या कल्पनेने मी घाबरून जातो. ईश्वर आपणा उभयतांवर कृपा करो. अहो, मृत्यू सर्व–भक्षक आहे. कोवळे कोकरू आणि म्हातारी शेळी ही दोन्हीही तो गट्ट करतो. आमचा धर्मगुरू तर असे म्हणताना मी ऐकले आहे की, ' राजपुत्र आणि विदूषक या दोघांची किंमत मृत्यू सारखीच मानतो. त्याच्या जाळ्यात जे जे म्हणून येईल ते ते त्याची शिकारच. ते जाळे तो सर्वांवर टाकतो आणि त्यात सापडेल ते सर्व घेतो. गवत कापणाऱ्याप्रमाणे तो दुपारी डुलकी घेत नाही. हवा चांगली असो की खराब असो, तो हिरवे गवत आणि भरलेली ताटे–दोन्ही कापीत कापीत पुढे जातो. तो चोखंदळ नाही की हलक्या पचनशक्तीचा नाही. चर्वण न करता तो सर्व काही स्वाहा करतो आणि सारे पदार्थ आपल्या जठराग्नीत लोटतो. मृत्यूचे पोट काही तुम्हाला दिसत नाही. पण त्याला उदराचा रोग जडलेला असावा. त्यामुळे माणसांच्या प्राणांची तहान त्याला लागते. लहान मुलाने आईचे दूध गटागटा प्यावे, तसे तो माणसाचे प्राण गिळंकृत करीत असतो. " तेव्हा आमचे शिलेदारजी ओरडले, " थांब, थांब. आता पुढे काही बोलू नकोस ! कारण, तुझ्या भाषणात फारच उत्तम ठिकाण आले आहे. एखाद्या पद्धीच्या धर्मगुरूने मृत्यूवर प्रवचन करावे, तसे तू आपल्या घरगुती भाषेने केले आहेस. अरे गृहस्था, तुला तर प्रवचनाची कला चांगलीच साधली आहे. मी तुला एक व्यासपीठ आणि दक्षिणा–पात्र दिले पाहिजे, असे मला वाटते. " तेव्हा सँको म्हणाला, " ज्याचे वर्तन उत्तम, त्याचे प्रवचन उत्तम ! एवढाच धर्म मला कळतो. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " तुझ्या अंगी पुरेसा धर्म आहे. पण मला एकाच गोष्टीचे नवल वाटते, ती ही की, ईश्वराच्या भीतीतून ज्ञानाचा उगम होतो असे म्हणतात. मग जो तू सर्वज्ञ परमेश्वरापेक्षा पालीला अधिक भितोस, तो इतका शहाणा कसा ! " सँकोने उत्तर दिले, " महाराज, आपण आपल्या शिलेदारीचा विचार करीत राहा. दुसऱ्या माणसाच्या भीतीकडे लक्ष देऊ नका. कोणाही शेजाऱ्याइतकीच परमेश्वराची भीती मला वाटते. मला हे मांसाशन संपवू द्या. ( प्रामाणिक सँको, त्या मांसाने तुझे भले होवो. ) आपल्या या शिळोप्याच्या गप्पांचा हिशेब आपण पुढे

केव्हा तरी पुरा करू. मला त्या पातेल्यातून आणखी एक बचक घेऊ द्या." असे म्हणून त्याने त्या पातेल्यावर असा साहसी चविष्टपणे हल्ला केला की, त्यामुळे त्याच्या धन्याचाही जठराग्नी प्रदीप्त झाला. त्यानेही सँकोला सोबत केली असती पण एका प्रसंगामुळे त्यात अडथळा आला. तो प्रसंग मी पुढे सांगणे अवश्य आहे.



प्रकरण २१

## कॅमॅचोच्या विवाहाची पुढील हकीकत आणि इतर मजेशीर प्रसंग

पूर्वीच्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे, डॉन क्विक्झोट व सँको यांच्यामध्ये चर्चा चालू असतानाच ती खंडित झाली. एक मोठा आवाज ऐकू आला. घोडेस्वारांनी केलेला तो आनंदाचा आणि जयजयकाराचा आवाज होता. त्या तरुण जोडप्याला भेटण्यासाठी ते घोडेस्वार आरोळ्या ठोकीत दौडत जात होते. त्या जोडप्याभोवती हजारो वाद्ये वाजत होती. ते जोडपे लताकुंजाकडे निघाले होते आणि त्यांच्याबरोबर पाद्री, त्यांचे नातलग आणि शेजारपाजारचे बडेबडे लोक सणासुदीचे कपडे घालून आलेले होते. नवऱ्या मुलीला पाहताच सँको म्हणाला, " छान, छान ! आपल्याला येथे केवढी मौज पहावयास मिळत आहे ! वा ! ही खेडवळ मुलगी नाही– रेशमाचे आणि सॅटीनचे भरगच्च कपडे ल्यालेली ही दरबारातील सुंदर स्त्री आहे. धनीसाहेब, पहा, पहा ! तिने आपल्या गळ्यात काचमण्यांच्या माळा न घालता प्रवाळाचे भारी अलंकार धारण केले आहेत. क्वेंचाच्या हिरव्या लोकरी कापडाएवजी तिच्या अंगावर दाट मऊ लव असणारी उंची मखमल आहे. तिच्या वस्त्राची किनारही पांढऱ्या अंबाडी वस्त्राची आहे हे मी खात्रीने सांगतो – नव्हे ती सॅटीनच असली पाहिजे, नसेल तर, मी तिकडे पाहणारही नाही. धन्य, धन्य आहोत आपण ! तिच्या बोटात कसल्या आंगठ्या आहेत ते पहा तर खरे– शुद्ध सोन्याच्या– आणि त्यात मोती बसविलेले– अशा त्या आंगठ्या आहेत– काळे मणी किंवा काश्याचे नकली दागिने नाहीत. त्यातील प्रत्येक मोती दह्यासारखा पांढरा स्वच्छ आहे आणि एकेका डोळ्याइतका मौल्यवान आहे. ती नखशिखांत कशी चमकते आहे आणि भपकेबाज पोषाखाने किती शोभत आहे पहा– आणि तिच्या माथ्यावर किती सुंदर केस रुळत आहेत तेही पहा. ते केस जर नकली नसतील तर मी म्हणेन, इतके लांब केस मी माझ्या उभ्या आयुष्यात कधी पाहिलेच नाहीत. अहो, किती रुबाबदार दिसते ती ! तिच्या केसांत आणि तिच्या गळ्यांत किती चमकदार दागिने रुणझुणत आहेत ! खरोखर तिला पाहून मला फळभाराने लादलेल्या खजुराच्या झाडाची आठवण येते. माझ्या बुद्धीला तर असे वाटते की, ही वधू म्हणजे एक रसाळ फळ आहे, तडफदार पोरगी आहे— फ्लँडर्समध्येही ती शोभून जाईल. याहून अधिक काही मी बोलत नाही, पण एवढेच सांगतो की, ती ज्याला लाभली तो पुरुष सुखी ! "

सँकोने त्या नवऱ्या मुलीचे खेडवळ पद्धतीने केलेले वर्णन ऐकून डॉन क्विक्झोट यांना हसू आल्याशिवाय राहिले नाही. मात्र त्यांनाही त्याच वेळी तिच्याविषयी मोठे

कौतुक वाटत होते. आपली हृदय–स्वामिनी डल्सीनिया हिला वगळता, आपण पाहिलेल्या सर्व स्त्रियांमध्ये ती अत्यंत रूपवती आहे असे त्यांना वाटले. तथापि सुंदर क्विटेरिया त्यांना कांहीशी फिकट दिसली. त्याचे कारण म्हणजे बहुधा अंगावर छाप पाडण्यासारखा पोषाख घालण्यासाठी नवऱ्या मुली लग्नाआधीच्या रात्री फारशी विश्रांती घेत नाहीत. त्या हिरवळीच्या एका बाजूस एक मोठे व्यासपीठ उभे केलेले होते आणि लग्न-समारंभासाठी त्यावर गालिचे पसरलेले होते. तसेच त्यावर तोरणे बांधलेली होती. खेळ व मौजेचे प्रकार तेथून चांगले दिसत होते. या स्थानी मिरवणूक नुकतीच येऊन थडकली होती. तोंच सर्व लोकांच्या कानी एक भेदक किंकाळी पडली, "थांबा, मूर्ख लोकांनो, थांबा, घाई करू नका." साऱ्या माणसांनी वळून पाहिले, तेव्हा त्यांना आपल्याकडे एक माणूस येत असल्याचे दिसले. लाल किनारीचा आणि भडकत्या जरतारीचा काळा कोट त्याच्या अंगावर होता. त्याच्या मस्तकावर सुरूच्या पानांचा दुःख–प्रदर्शक गजरा होता. लोखंडी दंडुका त्याच्या हातात होता. तो जवळ येताच त्यांनी ओळखले की, हा शूर बेसिल आहे. त्याचे आगमन अनपेक्षित होते. तो आरडा–ओरडा करीत विचित्र पद्धतीने तेथे आला होता. त्यामुळे काही तरी भानगड उपस्थित होणार असे भय त्या सर्व मंडळींना वाटले. तो थकलेला होता. धापा टाकीत तो वधू–वरांजवळ गेला. नंतर आपल्या सोट्यावर रेलून क्विटेरियावर त्याने आपली नजर रोखली. तिचा चेहरा पांढराफटक पडला आणि ती थरथरा कापू लागली. तो तिला भयंकर मोठ्या आवाजात म्हणाला,

"हे कठोर क्विटेरिये, आपला सर्वांना पूज्य वाटणाऱ्या परमेश्वराच्या न्यायाची आणि सत्याच्या बंधनाची शपथ घेऊन मी असे जाहीर करतो की, जोपर्यंत माझ्या जिवात जीव आहे तोपर्यंत तुला दुसऱ्याशी लग्न करता येणार नाही, हे पक्के समजून ऐस. तुला हेही आठवत असेल की, कालांतराने आणि माझ्या उद्योगाने माझे नशीब उजळेल आणि मी तुझ्याबरोबरीचा जोडीदार ठरेन, या आशेवर मी आतापर्यंत थांबलो होतो. सन्मान्य प्रेमाच्या मर्यादा मी कधीच ओलांडल्या नाहीत आणि तुझ्या चारित्र्याला बाध आणणाऱ्या भेटीची याचना मी कधी केली नाही. पण तू आपल्यामधील सारी भाव–बंधने विसरून ती तोडण्यास आता निघाली आहेस आणि माझा हक्क दुसऱ्याला देण्यास तयार झाली आहेस. त्याची मालमत्ता फार मोठी असेल, पण मी तिचा हेवा कधीही केला नाही. आपल्या जिंदगीच्या बळावर त्याला इतर सर्व सुखे मिळू शकतील, पण तुला विकत घेणे शक्य नव्हते. पण पुरे झाले हे. दैवाची योजनाच तशी आहे—आणि ती तडीस नेण्यासाठी मी तुझ्या मार्गातील माझी दुर्दैवी धोंड बाजूस सारतो. अरे, श्रीमंत कॅमॅचो, जिवंत रहा, या कृतघ्न क्विटेरियासह पुष्कळ वर्षे सुखाने रहा, आणि हा बिचारा, अभागी बेसिल मरू दे. त्याच्या दारिद्र्याने त्याच्या सौख्याचे पंख कापून त्याला थडग्यात निजविले आहे."

हे शेवटचे शब्द उच्चारून त्याने आपल्या दिखाऊ दंडुक्यात लपवलेली एक आखूड कट्यार उपसून काढली. तिची मूठ जमिनीवर ठेवून तिच्या टोकावर तो अशा

प्रकारे पडला की, त्याच्या पाठीतून तिचे टोक रक्तबंबाळ होऊन बाहेर आले. तो बिचारा अभागी माणूस जमिनीवर रक्ताच्या थारोळ्यात लोळत होता. या दुःखद अपघातामुळे त्याचे मित्र विलक्षण गोंधळून गेले आणि त्याच्या मदतीस धावले. रोझिनांटला सोडून डॉन क्विक्झोट त्याच्या साहायास त्वरेने गेले. त्यांनी त्याला आपल्या बाहूत कवटाळले, तेव्हा त्याच्या शरीरात अजून जीव आहे असे त्यांना आढळून आले. त्याच्या शरीरातून ते कट्यार उपसून बाहेर काढणार होते, पण पाद्री म्हणाला, "याने धर्मानुसार पाप-निवेदन देऊन मृत्यूची तयारी करीपर्यंत तलवार उपसणे सोयीचे नाही. ती उपसताच रक्ताचा लोट वाहू लागेल आणि त्याला तत्काळ मृत्यू येईल." या मुद्यावर त्यांची चर्चा चालू असताना बेसिल थोडथोडा शुद्धीवर येत आहे असे दिसले. नवऱ्या मुलीला उद्देशून तो क्षीण व शोकपूर्ण आवाजात म्हणाला, "हे क्विटेरिये, आता माझ्या जीवनातील या अंतिम आणि सरत्या क्षणी – मृत्यूच्या भयंकर यातना मी भोगीत असतानाही– तू मला आपले पाणिग्रहण करू देशील काय? आणि माझी पत्नी होशील काय? तसे झाले तर मी भोगीत असलेल्या या यातनांचे बक्षीस मला मिळाले असे मी समजेन आणि माझ्या या साहसी कृत्यामुळे क्षणमात्र का होईना, मी तुझा झालो-याचा मला आनंद वाटेल आणि मी सुखाने मरेन." हे ऐकून पाद्र्याने त्याला कळकळीची विनंती केली की, "आपल्या आत्म्याच्या आरोग्याची काळजी घे, कारण बाह्य मानवी गरजा पूर्ण होण्यापेक्षा त्याचीच निकड यावेळी अधिक आहे. तुझे आयुष्य अगदी थोडे उरले आहे. आतापर्यंत केलेल्या सर्व पापांबद्दल– त्यातही या शेवटच्या आततायी कृत्याबद्दल– परमेश्वराची दया आणि क्षमा अत्यंत कळकळीने माग." त्याला बेसिलने उत्तर दिले, "क्विटेरिया माझ्या इच्छेला शरण येईपर्यंत मला कोणत्याही सुखाची कल्पनाच करता येत नाही. पण जर माझी इच्छा तिने पूर्ण केली, तर त्यामुळे होणाऱ्या संतोषाने माझे चित्त शांत होईल आणि मी अंतःकरणपूर्वक पाप–निवेदन देऊ शकेन."

हे ऐकून डॉन क्विक्झोट ओरडले, "बेसिलचे मागणे न्यायाचे आणि विवेकाचे आहे. श्रीयुत कॅमेचो याने थोर बेसिलची विधवा म्हणून हिचा स्वीकार सन्मानाने करावा. जणु काही तिच्या बापाच्या हातातून आपण तिचा स्वीकार करीत आहोत असे मानावे. बाईसाहेब, तुम्ही एक शब्द बोला-निराशा आणि अधोगती यापासून एका माणसाला वाचविण्यासाठी तुम्ही एकदाच तशी घोषणा करा. त्याने तुम्ही फार काळ बांधले जाणार नाही, कारण, या नवऱ्याची विवाह–शय्या मृत्यु–शय्या हीच होणार." हा सर्व वेळ कॅमेचो अत्यंत गोंधळलेल्या स्थितीत उभा होता, पण बेसिलच्या मित्रांनी वारंवार केलेल्या आर्जवांचा त्याच्या मनावर परिणाम झाला आणि मृत्युशय्येवरील त्या माणसाला क्विटेरियाने संतोष देण्यास त्याने संमति दिली. कारण तसे करण्याने तिचे स्वतःचे सौख्य काही क्षणच लांबणीवर पडणार होते. नंतर त्या सर्वांनी क्विटेरियाच्या चरणी आपली विनंती सादर केली. त्यावेळी काही जणांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले, तर काहींनी दयाबुद्धीने सुचणारे सारे प्रभावी युक्तिवाद केले. ती बराच वेळ निष्ठुरपणे

उभी होती. तिने काहीच उत्तर दिले नाही. शेवटी पाद्री तिच्याकडे गेला आणि म्हणाला, " काय करायचे ते नक्की ठरवा, आता बेसिल काही क्षणाचाच सोबती आहे. " तेव्हा ती बिचारी कुमारी भीतीने थरथरा कापू लागली. एकही शब्द न उच्चारता ती दुर्दैवी बेसिलजवळ गेली, त्यावेळी तो धापा टाकीत होता, आताच तो मरणार असे त्याच्या निश्चल डोळ्यांवरून वाटत होते. ती त्याच्याजवळ गुडघे टेकून बसली आणि शोकाच्या उबडउबड निदर्शनाने तिने त्याला हात पुढे करण्यास सांगितले, तेव्हा बेसिलने आपले डोळे उघडून आणि ते दुःखाने तिच्यावर रोखून म्हटले, " अगे क्विटेरिये, तुझी दया-बुद्धी उशीरा जागृत होते, पण तुझे हृदय शेवटी विरघळलेच. मृत्यूचे हात मला कव-टाळण्यासाठी पुढे आले, तेव्हा तुझे हात माझे दुःख हरण करण्यासाठी पुढे आले. पण हाय, हाय ! मृयूचे हात तुझ्यापेक्षा फार बळकट आहेत. हे प्राणघातक सुंदरी, मी तुझ्यापासून एवढीच इच्छा करतो की, तुझ्या सुंदर हाताने मला पूर्वीप्रमाणे आता फसवू नये, तू आता जे काय करीत आहेस ते स्वेच्छेने किंवा स्वतंत्रपणे केलेले आहे–कोणत्याही निर्बंधामुळे नव्हे, किंवा कोणाच्याही आज्ञेला मान तुकविण्यासाठी नव्हे हे तू कबूल कर. मी तुझा खरा व कायदेशीर नवरा आहे हे तू उघडपणे जाहीर कर. मृत्यूशय्येवरील माणसाशी तू कपट खचित करणार नाहीस. सर्व जन्मभर जो तुझ्याशी खरेपणाने वागला, त्याच्या मरणोन्मुख जीवाशी लबाडीने तू वागणार नाहीस. " असे बोलत असतानाच तो बेशुद्ध पडला. तेव्हा सर्वांना वाटले, तो मृत्यु पावला. बिचारी क्विटेरिया ! किंचित् लाजून, स्वतःवर एक प्रकारचा अन्याय झाला असतानाही, भावनेच्या मोठ्या आवेगाने, तिने त्याचा हात आपल्या हातात घेतला आणि ती म्हणाली, " कोणतीही शक्ती माझ्या इच्छेवर इतक्या प्रमाणात प्रभाव पाडू शकणार नाही. तूच माझा कायदेशीर नवरा आहेस हे मी येथे जाहीरपणे घोषित करते, आणि ते केवळ माझ्या स्वतंत्र बुद्धीने व इच्छेने करीत आहे,यावर विश्वास ठेव. याला माझा हात वचनबद्ध आहे. या वेदनामुळे नि या आकस्मिक अपघातामुळे तुझी सारी शुद्धी हरपली नसेल, तर तू आपला हात माझ्या हाती द्यावास अशी माझी अपेक्षा आहे. " कल्पनातीत हजर जबाबीपणाने बेसिल म्हणाला, " मी माझा हात तुझ्या हाती देतो आणि तुझा पति असल्याचे मान्य करतो." ती म्हणाली, " आणि मी तुझी पत्नी असल्याचे मान्य करते–मग तुझे आयुष्य दीर्घकाळ असो की याच क्षणी माझ्या हातातून तुला थडग्यात जावे लागो. " सँको म्हणाला, " अशा परिस्थितीत हा तरुण फारच बोलतो आहे. त्याने आपली प्रेम-याचना आता सोडावी आणि आपल्या आत्म्याच्या आरोग्याची काळजी वाहावी. त्याचा मृत्यु दातापेक्षा जिभेतच अधिक आहे असे मला वाटते. "

बेसिल व क्विटेरिया यांनी एकमेकांचे हात हातात धरून परस्परावरील विश्वास व्यक्त केला. हे पाहून कोमल मनाच्या पाद्रयाने डोळ्यांत आनंदाश्रु आणून त्या उभयतांवर विवाहाच्या मंगल आशीर्वादाचा वर्षाव केला आणि त्याबरोबरच प्रभूची प्रार्थना केली की, या नव-विवाहित पुरुषाच्या जीवावर दया दाखवा. अशा तऱ्हेने

त्याने अंत्य–विधि व लग्न–विधि यांचे मिश्रण केले. त्याने आशीर्वादाची घोषणा करताच बेसिल उत्साहाने ताडकन् उठून उभा राहिला आणि कोणाच्या ध्यानी–मनी येणार नाही अशा वेगाने त्याने आपल्या शरीरातील तलवार उपसून बाहेर काढली आणि आपल्या प्रिय क्विटेरियाला आपल्या बाहूमध्ये घट्ट कवटाळले. हे पाहून सर्वजण चकित झाले आणि काहीजण तर ओरडू लागले, "चमत्कार! चमत्कार!" बेसिल ओरडला, "छे, छे! चमत्कार–बिमत्कार काही नाही—हा केवळ लष्करी डावपेच आहे!" इतर सर्वांपेक्षा पाद्र्याला अधिक आश्चर्य व चिंता वाटली, आणि त्याने आपल्या दोन्ही हातांनी त्याची जखम चाचपून पाहिली. तेव्हा त्याला आढळले की, चतुर बेसिलच्या शरिरांतून ती तलवार कोठेच आरपार गेलेली नाही. त्याने आपल्या शरिरावर रक्ताने भरलेली पत्र्याची नळी कौशल्याने बसविलेली होती. ते रक्त गोठू नये अशी व्यवस्था त्याने केली होती, हे पुढे कळून आले. सारांश, पाद्री, कॅमॅचो आणि इतर मंडळी यांना आपण सर्वजण त्याच्या लबाडीने फसलो गेलो, असे वाटले. वधू मुळीच नाराज झाली नाही. कारण, अशा लबाड व फसव्या पद्धतीने बडवून आणलेले लग्न कायद्यात टिकत नाही, हे तिने ऐकले होते. तिने असे जाहीर केले की, हे लग्न न्यायाचे आहे आणि दोन्ही पक्षांना संमत आहे.

यावरून कॅमॅचो व त्याचे मित्र यांनी अनुमान बांधले की, ही लबाडी पूर्वीच योजून केलेली आहे आणि या कटामध्ये ती सामील आहे. या भयंकर निराशेने ते संतप्त झाले आणि म्हणून त्यांनी अन्य प्रबळ साधनांचा आश्रय घेतला. त्यांनी आप-आपल्या तलवारी बाहेर काढल्या आणि बेसिलवर त्वेषाने हल्ला चढविला. त्याच्या संरक्षणासाठी तितक्याच दुसऱ्या लोकांनी आपल्या तलवारी तत्काळ म्यानाबाहेर काढल्या. त्यांच्या अग्रभागी डॉन क्विक्झोट घोड्यावर स्वार होऊन हातातील भाला उंचावून आणि ढाल पुढे करून लगेच उभे राहिले. शत्रूवर हल्ला करून व त्यांची फळी फोडून ते दौडत गेले. सँकोला कोणतेही धोक्याचे काम आवडत नसे, म्हणून त्याने तटस्थ रहाण्याचे ठरविले, आणि ज्या प्रचंड भांड्यातून त्याला बहुमोल अंबिल चाखावयास मिळाली होती, त्याच्या कडेला तो उभा राहिला. या लढाईत कोणत्याही पक्षाचा विजय झाला तरी त्या भांड्याला कोणी हात लावणार नाही असे त्याला वाटले. कॅमॅचोच्या पक्षाला उद्देशून डॉन क्विक्झोट ओरडून म्हणाले, "सद्गृहस्थहो, थांबा, प्रेमाच्या जखमा शस्त्राने भरून काढणे, हा न्याय नव्हे. प्रेम आणि युद्ध या दोन्ही गोष्टी एकच आहेत. एकात जे धोरण व जे डावपेच क्षम्य, तेच दुसऱ्यातही. ईश्वराच्या अढळ आज्ञेनुसार, क्विटेरियाची योजना बेसिलसाठी आणि तो तिच्यासाठी असे ठरलेले आहे. कॅमॅचो आपल्या संपत्तीच्या बळावर दुसरी वधू विकत घेऊ शकेल आणि अन्यत्र सुखाने राहील. 'देवाने ज्यांची गाठ बांधली त्यांना मानवाने दूर सारू नये.' बेसिलला हेच एक कोकरू लाभले होते आणि ते त्याच्या जिवाभावाचे होते, म्हणून त्याच्या आयुष्यातील एकमेव आनंद हिरावून घेण्याचा प्रयत्न कोणी करू नये. यावेळी मी अशी

गंभीर घोषणा करतो की, तसा प्रयत्न जो कोणी प्रथम करील त्याला माझ्या शरिरातून आरपार जावे लागेल, आणि त्याच्या शरिरातून माझा हा भाला आरपार जाईल. ”

असे म्हणून त्यांनी आपला भाला हवेत इतक्या आवेशाने आणि कौशल्याने परजला की, ज्यांना या भयंकर वीराची काहीच कल्पना नव्हती, त्यांच्या अंतःकरणात एकदम धडकी भरली. सारांश, डॉन क्विक्झोट यांचे ते शब्द, भल्या पाद्याची चतुर मध्यस्थी आणि क्विटेरियाची चंचलता– यामुळे कॅमॅचो तह करण्यास तयार झाला. लग्नापूर्वी क्विटेरियाचे बेसिलवर ज्याअर्थी प्रेम होते, त्याअर्थी लग्नानंतरही तिने त्याच्यावर बहुधा प्रेम केले असते आणि म्हणून तिच्यापासून बरी आपली सुटकाच झाली, याबद्दल आपण परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. ती न मिळाल्याबद्दल दुःख करता कामा नये, असे त्याने विचारपूर्वक ठरविले. इतरही गोष्टींचा विचार करून त्या दोन्ही पक्षांनी बाजवी तडजोड करण्याचे ठरविले. दोष आहे तो बेसिलच्या धोरणापेक्षा क्विटेरियाच्या थिल्लरपणाचाच आहे, तेव्हा आपल्या निराशेमुळे आपल्याला संताप आलेला नाही, असे दाखविण्यासाठी कॅमॅचोने सर्व मंडळींना तेथे मुक्काम करण्याचे आणि तेथील भोजनात सहभागी होण्याचे निमंत्रण दिले. पण बेसिल गरीब असला तरी तो सद्गुणी होता आणि त्यामुळे त्याला पुष्कळ मित्र होते, म्हणून त्याने त्या मंडळींपैकी काही लोकांना आपल्याबरोबर व आपल्या वधूबरोबर तिच्या गावाकडे नेले. त्यात डॉन क्विक्झोटही होते. अलौकिक शौर्याचा व योग्यतेचा माणूस म्हणून त्यांना सर्वजण मान देत होते. बिचारा सँको जड अंतःकरणाने आपल्या धन्यामागोमाग गेला. रात्रीपर्यंत चाललेल्या कॅमॅचोच्या मेजवानीतील मौजेकडे पाठ फिरवणे त्याच्या मनाला रुचत नव्हते. त्या मेजवानीतील आपल्या आवडत्या खमंग मांसाहाराची विलक्षण ओढ त्याला होती, आणि ते मांस जरी त्याने प्रत्यक्षात मागे टाकले असले, तरी ते आपल्या मनात घोळवीत तो आपल्या धन्यामागोमाग गेला. त्याने आपल्या आवडत्या रश्शाचा चट्टा-मट्टा पूर्वीच केला होता, तरीसुद्धा आपले भांडार ज्या लाडक्या उदरमंजुषेत त्याने ठेवले होते, तिच्याकडे आणि रिकाम्या भांड्याकडे तो दुःखाने पहात होता. कॅमॅचोच्या मेजवानीतून आपल्या धन्याने अंग काढून घेतले, म्हणून वाटणारा राग त्याने गिळला आणि रोझिनांटच्या पाठोपाठ तो वैतागाने निघाला. त्याचे पोट नुकतेच भरलेले असले, तरी त्याचे मन नाराज होते.



## प्रकरण २२

# ला मांचा प्रदेशाच्या मध्यभागी असणाऱ्या मॉंटेसिनोच्या गुहेतील महान साहसी कृत्य आणि त्यामध्ये शौर्यशाली डॉन क्विक्झोट यांनी संपादिलेले यश-यांचा वृत्तांत.

त्या नवविवाहित दांपत्याने डॉन क्विक्झोट यांचा पाहुणचार मोठ्या थाटामाटने केला. आपले संरक्षण करण्यास ते तयार आहेत, याबद्दल जणु कृतज्ञतेची पावतीच त्यांनी त्यांना दिली. त्यांचे ज्ञान त्यांच्या शौर्याइतकेच आहे. ते शस्त्रकौशल्यात जणु सिड् आणि कलांमध्ये जणु सिसरो आहेत असे समजून त्या दांपत्याने त्यांना मोठा मान दिला. इमानी सँकोनेही तेथे जमवून घेतले, आणि त्यांची वृत्ती पुन्हा नेहमीप्रमाणे आनंदी झाली. त्याच्या धन्याने तेथे तीन दिवस मुक्काम ठोकला. नंतर बेसिलने त्यांना सांगितले, " माझ्या डावपेचाची काहीच माहिती क्विटेरियाला नव्हती. ती शक्कल माझीच. फक्त काही जिवलग मित्रांना मी ती सांगितली होती. हेतु हा की, प्रसंग ओढवला तर त्यांनी माझ्या पाठीशी उभे रहावे आणि माझी लबाडी उघडकीस आली तर त्यांनी मला घेऊन जावे. " डॉन क्विक्झोट म्हणाले," लबाडीपेक्षा चांगले नाव आपल्या योजनेला द्यावयाला हवे. कारण प्रेमी जोडप्याच्या विवाहात त्या योजनेचा चांगला आणि सन्मान्य शेवट झालेला आहे. महाराज, मी जाता जाता आपल्याला सांगतो की, प्रेमाच्या वाटेत सर्वात मोठा अडथळा असतो तो म्हणजे गरिबीचा-करंट्या नशिबाचा. पण परस्परांचे प्रेम सतत सांधणारे रसायन म्हणजे मौज, संतोष, समाधान आणि आनंद. कुशल माणसाने या गुणांची योग्य योजना केल्यास संसारातील सुखामध्ये विविधता येते. तीच ती गोष्ट या गुणांमुळे नवी आणि आल्हाददायक वाटू लागते. कधीही वीट न येणारी जी सुखे संसारात असतात, ती वाढत्या गरजांमुळे आणि गरीबीमुळे नाहीशी होतात आणि विवाहाचे जोखड अत्यंत तापदायक वाटू लागून संसाराचा भार असह्य होतो. "

हे शब्द डॉन क्विक्झोट यानी मुख्यतः बेसिलला उद्देशून उच्चारले होते. त्याने आपले मौजेचे खेळ आणि गमतीजमती सोडून द्याव्यात-त्यामुळे त्याला तारुण्यांत प्रशंसा मिळाली तरी वार्धक्यात भाकरी मिळणार नाही, असा इशारा देण्याचे त्यांचे मनात होते. आपल्याला लायकी मिळवून देणारा आणि उतरत्या वयात काही तरी पुंजी देणारा एखादा स्थिर आणि भक्कम व्यवसाय बेसिलने शोधावा असा सल्ला त्याला त्यांनी दिला. आपले संभाषण पुढे चालवून ते म्हणाले, " गरीब माणसाला ' सन्माननीय ' असे

विशेषण योग्य असेल तर मी म्हणतो, सन्माननीय दरिद्री माणसाला सुंदर पत्नी मिळणे, म्हणजे एखाद्या रत्नाचा लाभ होणेच होय. त्याच्यापासून तिला जो कोणी हिरावून नेईल, तो त्याचा सन्मान चोरून नेतो, नव्हे, त्याचे प्राण हरण करतो—असे म्हणता येईल. जी स्त्री सुंदर आहे आणि जी आपला पती गरीब असतानाही त्याच्यावर निष्ठा ठेवते तिला प्राचीन कालातील विजेत्याप्रमाणे, मानमरातबाने भूषविले पाहिजे. सौंदर्य ही मोठी आकर्षक वस्तू आहे आणि ती सर्व प्रेक्षकांची दृष्टी वेधून घेते. उंच उंच उडणारे पक्षी—आणि त्या पक्ष्यांचा राजा गरुड—हे सारे तिच्या मोहाला बळी पडून खाली येतात. पण जेव्हा तेच मोहक सौंदर्य संकटात सापडलेले आढळते, तेव्हा घारी आणि कावळे आणि वखवखलेले इतर पक्षी त्या मोहक भक्ष्यावर तुटून पडतात. अशा या भयंकर हल्ल्यामध्ये जी स्त्री टिकून राहू शकते, ती आपल्या पतीच्या मस्तकावरील मुकुट म्हणून शोभते. पण महाराज, हे आपण एका शहाण्या माणसाचे मत म्हणून आपल्याजवळ ठेवा. त्या शहाण्या माणसाचे नाव मी विसरलो आहे. तो म्हणत असे, ' जगात केवळ एकच चांगली स्त्री असते, आणि प्रत्येक विवाहित पुरुषाने आपली पत्नी ही तीच स्त्री आहे, असे मानावे, तरच त्याचा संसार सुखाचा होतो. ' हे तत्त्व मी मला स्वतःला लागू करण्याची गरज नाही. कारण माझे लग्नच झालेले नाही-आणि ते करण्याचा अद्याप माझा विचार नाही. पण जर तसा विचार असता तर, कोणत्याही स्त्रीच्या ऐश्वर्यापेक्षा तिच्या चारित्र्यामुळेच ती मला पसंत पडली असती. कारण लोकांमधील कीर्ती हेच स्त्रीचे खरे जीवन होय. बाह्यात्कारी जी स्त्री अब्रू संभाळते, ती खरोखर तशीच मानली जाते. सार्वजनिक दृष्ट्या असभ्य आचरण या जगात जितके निंद्य मानलेले आहे, तितके खाजगी जीवनातील पाप मानलेले नाही. एखादी स्त्री तुमच्या हृदयाशी प्रामाणिक असेल तर तिला जवळ ठेवणे सोपे आहे. तिचे गुण तुम्ही कदाचित वाढवू शकाल. पण जर एखादी भ्रष्ट स्त्री तुम्ही आपल्या शय्येवर आणली तर तिची सुधारणा करणे कठीण आहे. कारण स्त्रियांमध्ये गुण आणि दुर्गुण आत्यंतिक स्वरूपात असतात, आणि त्यांची टोके इतकी दूर असतात की, ती एकमेकांशी मिळविणे अशक्य नसले तरी अत्यंत असंभवनीत असते. ”

आपल्या धन्याचे हे भाषण सँको आतापर्यंत शांततेने ऐकत होता, पण आता त्या भाषणावर काही शेरे मारल्याशिवाय त्याला राहवेना. तो स्वतःशी म्हणाला, “ जेव्हा मी काही चांगल्या भरदार आणि रसदार गोष्टी बोलू लागतो, तेव्हा माझा धनी मला नेहमी असे सांगायचा की, तू एक व्यासपीठ आपल्या पाठीवर बांधून घे आणि तुझ्या शहाणपणाच्या गोष्टी सांगत सर्व जगभर हिंडत राहा. आता माझा धनी माझ्यासारखेच बोलत आहे, म्हणून मी त्याला खुशाल सांगेन की, ' तुम्ही आपली सारी वाक्ये एकत्र जोडली तर, एक व्यासपीठ तुम्हाला पुरणार नाही. प्रत्येक चोटागणिक दोन-दोन व्यासपीठे तुम्हाला हवीत, मग तुम्ही बाजारातून हिंडा आणि ओरडा, “ माझा माल कोण विकत घेणार ? सैतानाला लखलाभ असो असा शिलेदार ! सात शहाण्या गुरूंपैकी तो एक आहे असे मला वाटते. त्याला शिलेदारीशिवाय दुसरे काहीच माहीत नाही असे

मला वाटत होते, पण आता मला दिसून येते की, कोणतीही गोष्ट त्याच्या बुद्धीतून निसटलेली नाही. प्रत्येकाच्या होडीत त्याचे वल्हे आहे आणि प्रत्येकाच्या चुलीवरील पक्वान्नात त्याचे बोट आहे!" थोडयाशा मोठ्या आवाजात तो जे हे पुटपुटला, ते त्याच्या धन्याने सहजगत्या ऐकले आणि विचारले, "सँको, कसली कुरकुर चालली आहे तुझी?" सँको म्हणाला, "नाही महाराज, काही नाही. माझी इच्छा एवढीच होती की, आपण जे हे तत्त्वज्ञान उपदेशित आहा, ते माझ्या कानावर माझ्या लग्ना-आधी पडावयास हवे होते. मग मी कदाचित् ती जुनी म्हण म्हटली असती– 'धट्टया-कट्टया माणसाला वैद्याची गरज नसते." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "म्हणजे, टेरेसा इतकी वाईट आहे?" सँकोने उत्तर दिले, "तितकी वाईट नाही, पण मला पाहिजे तितकी ती चांगलीही नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "धिक्कार असो तुला, सँको. तुझ्या मुलांची जी चांगली आई आहे, त्या तुझ्या बायकोबद्दल तू वाईट बोलावेस हे ठीक नव्हे." सँको म्हणाला, "महाराज, दोघांत प्रेम पावळते आहे असे मुळीच नाही. तिला जेव्हां लहर येते– विशेषतः मत्सराची लहर येते– तेव्हा ती माझ्याबद्दल अशीच वाईट बोलते, त्यावेळची तिची बडबड सैतानसुद्धा ऐकू शकणार नाही."

अशा तऱ्हेने त्या तरुण दांपत्याबरोबर, एखाद्या राजासारखा पाहुणचार घेत डॉन क्विक्झोट तेथे तीन दिवस रेंगाळले. नंतर त्यांनी उत्तम खड्गयुद्ध करणाऱ्या त्या विद्यार्थ्याला विनंती केली की, "मॉंटेसिनोच्या गुहेकडे मला नेईल असा वाटाड्या मिळवून द्या, म्हणजे मी त्या गुहेमध्ये जाईन आणि त्या गुहेतील ज्या आश्चर्यकारक गोष्टींविषयी सर्व देशांत लौकिक आहे, त्या मी माझ्या स्वतःच्या डोळ्यानी पाहीन." विद्यार्थ्याने आपल्या एका जर्मन चुलत भावाचे नाव सुचविले, आणि म्हटले, "हा मोठा चुणचुणीत मुलगा आहे, हुशार पंडित आहे आणि शिलेदारीच्या ग्रंथाचा मोठा भोक्ता आहे. तो आपल्याला रूडेराचे विख्यात सरोवरही दाखवू शकेल. त्याची संगत शिलेदारजींना फार चांगली होईल. कारण मोठमोठ्या लोकांना अर्पण करण्यासाठी त्याने पुस्तकविक्रेत्यांसाठी पुष्कळ पुस्तके लिहून दिली आहेत." त्याप्रमाणे तो विद्वान चुलत-भाऊ बरोबर पिल्लू असलेल्या गाढवीवर बसून तेथे आला. त्याच्या गाढवीवर जुन्या गालिच्याचे किंवा ओबडधोबड कापडाचे खोगीर होते. नंतर सँकोने रोझिनांट व डॅपल यांना प्रवासास सिद्ध केले आणि आपल्या चामड्याच्या पिशवीत पुष्कळ पदार्थ भरले. शिवाय त्या विद्यार्थ्याच्या पडशीतही खाद्य पदार्थ कोंबले. त्या सर्वांनी तेथील मंडळींचा निरोप घेतला आणि मॉंटेसिनोच्या गुहेकडे सर्वात जवळच्या रस्त्याने कूच केले.

वेळ घालविण्यासाठी डॉन क्विक्झोट यांनी वाटाड्याला विचारले, 'तुम्ही कोणता अभ्यासक्रम करीत आहा?' तेव्हा त्या पंडिताने उत्तर दिले, "महाराज, लेखन हा माझा व्यवसाय आहे, आणि ग्रंथांच्या नकला हा माझ्या अभ्यासाचा मुख्य विषय आहे. मी काही पुस्तके प्रसिद्ध केलेली आहेत, आणि त्यांची जगाने वाहवा केली आहे, त्यापासून मला पुष्कळ फायदा झाला आहे. कदाचित् आपण माझे एक पुस्तक 'गणवेष

व चिन्हें यावरील प्रबंध' हे ऐकले असेल. त्यामध्ये मी गणवेषांच्या आणि प्रतीकांच्या सातशेतीन प्रकारांचे—त्यांचे रंग, ब्रीदवाक्ये आणि सांकेतिक शब्द—वर्णन करून जनतेला उपकृत केले आहे. त्यामुळे कोणाही दरबारी माणसाला कोणत्याही विशेष प्रसंगी आपल्या कल्पनेला किंवा परिस्थितीला योग्य असा गणवेष कसा घालावा हे सहज समजेल. त्यासाठी आपल्या वृत्तीला अनुकूल काय आहे हे शोधण्यासाठी त्याला आपली कल्पना-शक्ती चालवावी लागणार नाही. मत्सरी, परित्यक्त, तिरस्कृत, गैरहजर अशा कोणत्याही माणसाला कोणता गणवेष नखशिखांत योग्य ठरेल, हे मी सांगितलेले आहे. सध्या जे पुस्तक माझ्या ऐरणीवर घडविले जात आहे, त्याचे नाव मी 'काया-कल्प' किंवा 'स्पॅनिश ओव्हिड' असे देण्याचे योजले आहे. त्यातील माझा शोध एकदम अभिनव व अलौकिक आहे. थोडक्यात म्हणजे, ते 'ओव्हिडचे विडम्बन' आहे. त्यामध्ये सेव्हिलचा गिराल्डा कोण होता? मॅग्डेलनचा देवदूत कोण होता? कॉर्डोव्हाच्या व्हिसेन्गेराची नळी कशी होती, गिसँडोचे बैल किती होते, आणि सीएरा मोरेना, लेगॅनिटॉसचे झरे, माद्रिदचे लॅव्हापी, तसेच पियोजोचे निर्झर, सोनेरी नळ आणि प्रार्थना-मंदिर--या सर्वांचे वर्णन मी केलेले आहे. त्यांच्या दंतकथांना मी रूपकांनी नि भाषांतरानी असे नटविले आहे की, त्यांच्या वाचनाने बोध नि मोद या दोहोंचाही लाभ वाचकाला एकदम व्हावा. दुसरा ग्रंथ लवकरच छापखान्याकडे देण्याचा माझा विचार आहे. 'पॉलीडोर व्हर्जिलची पुरवणी' असे नाव मी त्याला देणार आहे. त्यामध्ये मी नाना शोधांचा विचार केलेला आहे. या ग्रंथामुळे लेखकाची गाढ विद्वत्ता प्रगट होईल आणि कदाचित् त्या प्राचीन ग्रंथकारापेक्षा अधिक चांगल्या शैलीने ती प्रगट होईल असे मी आपल्याला खात्रीने सांगतो. महाराज, उदाहरणार्थ, जगात पडश्याचा त्रास प्रथम कोणाला झाला? फ्रेंच रोगाने प्रथम कोण पछाडला गेला? हे सांगावयास तो प्राचीन ग्रंथकार विसरला. पण महाराज, मी याचा उलगडा ताबडतोब केला आहे आणि माझ्या विधानाला बळकटी आणण्यासाठी किमान चोवीस अधिकृत लेखकाची साथ दिलेली आहे. त्यांच्या नुसत्या अवतरणावरून आपल्याला कल्पना येईल की, जनतेला ज्ञान देण्यासाठी आणि तिचा फायदा व्हावा म्हणून मी किती कष्ट केले आहेत."

हे सर्व भाषण सँको मोठ्या आस्थेने ऐकत होता. त्याने वाटाड्याला विचारले, "महाराज, आपण जे जे लिहिता ते सर्व ज्या उजव्या हाताने लिहिता, त्याला योग्य मार्गदर्शन ईश्वर करो. मी आपल्याला विचारतो की, आपले डोके खाजविणारा पहिला माणूस कोण होता?" ग्रंथकाराने विचारले, "डोके खाजविणारा?" सँको म्हणाला, "होय महाराज, डोके खाजविणारा कोण होता? आपल्याला साऱ्या गोष्टी माहीत आहेत, तेव्हा आपण हेही मला सांगू शकाल. सर्वांचा वृद्ध पिता आदम याच्याविषयी आपल्याला काय वाटते?" पंडिताने उत्तर दिले, "वृद्ध पिता आदम? पाहू या बरे. पिता आदमला एक डोके होते, त्यावर केस होते, त्याला हात होते आणि तो खाजवू

शकत होता आणि पिता आदम हाच पहिला मानव. म्हणून आपले डोके खाजविणारा पहिला मानव पिता आदम हाच ठरतो. तुझे म्हणणे बरोबर आहे, हे स्पष्ट आहे." सँको म्हणाला, "वा, वा! असे आहे का? महाराज, आपल्या परवानगीने मी दुसरा प्रश्न विचारतो, या जगात पहिला डोंबारी कोण होऊन गेला?" विद्यार्थ्याने उत्तर दिले, "मित्रा, माझे ग्रंथ पाहिल्याशिवाय मी या प्रश्नाचा उलगडा खरोखर करू शकत नाही, पण मी घरी जाताच रात्रंदिवस अभ्यास करून या प्रश्नाचे उत्तर शोधून काढीन." सँको म्हणाला, "फक्त दोन नामी शब्दांत त्या प्रश्नाचे उत्तर आहे. मी आपला त्रास वाचवीन." ग्रंथकाराने विचारले, "त्या प्रश्नाचे उत्तर तू सांगू शकतोस?" सँको म्हणाला, "अर्थात्, मी ते सांगू शकतो. जगातील पहिला डोंबारी लुसि फर हा होता. त्याला जेव्हा स्वर्गातून फेकून देण्यात आले, तेव्हा तो पाताळात गडगडत कोसळत गेला." पंडित म्हणाला, "तुझे म्हणणे खात्रीने बरोबर आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, हे उत्तर तुला कोठे मिळाले? हे तुझे स्वतःचे नसले पाहिजे, हे मी शपथेवर सांगण्याचे धाडस करतो." सँको म्हणाला, "मौन धरावे महाराज, मूर्ख-पणाचे प्रश्न विचारण्याचे आणि सौदा करण्याचे काम एकट्या सँकोला करू द्या. मला शेजाऱ्यांच्या मदतीची गरज नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "बरोबर आहे, तुला कल्पना नसेल इतके चांगले विशेषण तू आपल्या प्रश्नाला दिले आहेस. कारण, जगात अशी काही माणसे असतात की, जी आपली डोकी खाजवून काही शोध लावण्यासाठी प्रचंड वेळ वाया घालवितात. आणि त्या शोधाचा उपयोग जगात कोणाला काहीच नसतो– असलाच तर तो म्हणजे त्या शोधकांची चेष्टा होण्यापुरता."

हे व असेच मनोरंजक संवाद करीत त्यांनी आपला प्रवास संपविला आणि दुसरे दिवशी ते त्या गुहेपाशी जाऊन पोहोचले. त्याच्या आदल्या रात्री रस्त्यांवरील एका सामान्य खेड्यात त्यांनी मुक्काम केला होता. तेथे त्यांनी सहाशे हात लांबीचा दोर विकत घेतला. तो डॉन क्विक्झोटना बांधून त्यांना गुहेच्या अगदी तळाशी जाऊ द्यावयाचे त्यांनी योजले. गुहेचा तळ पाताळाइतका खोल असला, तरी तो गाठण्याचा त्यांनी निश्चय केला होता. गुहेचे तोंड प्रवेश न करता येण्यासारखे होते– गवत, झाडी, काटेरी झुडुपे आणि रानटी अंजिराची झाडे यांनी ते पूर्णपणे झाकलेले होते. पण गुहेचे प्रवेशद्वार रुंद आणि ऐसपैस होते. त्या जागी येताच डॉन क्विक्झोट यांनी त्या पाताळातील मोहिमेची तयारी केली. त्यांनी त्या पंडिताला सांगितले, "खोल दरीइतका गुहेचा तळ खाली असला तरी तो गाठण्याचा माझा निर्धार आहे." सर्वजण आपापल्या वाहनांवरून खाली उतरल्यावर त्यांचा सेवक व वाटाड्या यांनी त्यांना दोराने घट्ट बांधले. ते काम चालू असताना सँको म्हणाला, "महाराज, आपण काय करीत आहा, याचा विचार करा. अशा दुष्ट नि कृष्ण विवरात उडी घेण्याचे धाडस करू नका. उडी घेण्यापूर्वी विचार करा. आपल्याला जिवंतपणी गाडून घेण्याइतके लहरी बनू नका. एखाद्या विहिरीत भिजण्या-साठी बाटलीप्रमाणे किंवा बादलीप्रमाणे तुम्ही स्वतः खाली जाऊ नका. खरोखर महाराज,

पृथ्वीतील प्रत्येक विवराचा असा शोध घेणे आणि निष्कारण रसातळ गाठणे, हे तुमचे काम मुळीच नव्हे. " शिलेदार म्हणाले, " गप्प बैस, भेकडा, मला घट्ट बांध. हे साहसी कृत्य खास माझ्यासाठीच राखून ठेवलेले आहे, हे खचित." विद्यार्थी म्हणाला, " महाशय, जेव्हा खाली जाल, तेव्हा त्या स्थळी ज्या दुर्मिळ वस्तू असतील, त्या सर्व शोधण्याचे आणि पहाण्याचे कामी आपण अत्यंत जागरूक राहावे—आपल्या नजरेतून काहीही सुटू नये. कुणी सांगावे, तेथे आपल्याला अशा वस्तूंचा शोध लागेल की, ज्या मला माझ्या 'कायाकल्प' ग्रंथात घालता येतील." सँको म्हणाला, " त्यांना काय करायचे ते करू द्या. ते शेवटापर्यंत जातील— मग त्यात बरेवाईट काहीही हाताला लागो— डुकर किंवा कुत्रे ! "

डॉन क्विक्झोट यांना त्यांच्या बंडीवर दोराने चांगले बांधले गेले—त्यांच्या चिलखतावर नव्हे. ते एक गोष्ट करावयाचे विसरले असे त्यांना वाटले. आणि ते म्हणाले, " आपण एक गोष्ट चुकलो. आपण छोटी घंटा घेतली नाही. ती मी माझ्याबरोबर खाली न्यावयास हवी होती, म्हणजे मला गरज पडेल त्याप्रमाणे कमीजास्त दोर सोडण्यासाठी मी ती वाजविली असती नि मी जिवंत असल्याचेही तुम्हाला कळविले असते. पण आता काय उपयोग ? प्रभूच माझा उत्कर्ष करो." नंतर त्यांनी गुडघे टेकले आणि 'अशा विचित्र आणि धोक्याच्या साहसामध्ये यश येण्यासाठी दैवी शक्तीने आपल्याला सहाय्य करावे.' म्हणून त्यांनी हळू आवाजात प्रार्थना केली. नंतर आपला आवाज उंचावून ते म्हणाले, " माझ्या जीवनाची आणि कार्याची स्वामिनी असणाऱ्या अत्यंत सुप्रसिद्ध नि अतुल्य अशा टोबोसोच्या डल्सीनिये, एखाद्या साहसी पण दूरस्थ अशा प्रेमिकाच्या प्रार्थना त्याच्या प्रियजनांच्या कानी जाऊन पोचणे शक्य असेल तर, तुझ्या अवर्णनीय सौंदर्याच्या शक्तीने मी माझ्या या भाग्याच्या परमोच्च क्षणी तुझ्या कृपेची आणि संरक्षणाची याचना अत्यंत कळकळीने करतो. या भयानक धाडसी कृत्यामध्ये मी आता स्वतःला झोकून देत आहे, याचे कारण जगाला हे कळले पाहिजे की, या शिलेदाराला अशक्य असे काहीच नव्हते. तुझ्या सौंदर्याच्या ध्वजाखाली, तुझ्या स्मिताच्या प्रभावाने, हा शिलेदार अत्यंत बिकट कार्य अंगावर घेत आहे. "

असे म्हणून ते पुनः उठून उभे राहिले आणि गुहेच्या तोंडाजवळ गेले. ते तोंड झाडा—झुडुपांनी झाकलेले आहे असे पाहून, जोराने आत प्रवेश करणे त्यांना भाग पडले. म्हणून त्यांनी आपली तलवार उपसली आणि गुहेचे तोंड झाकून टाकणारी झाडे—झुडुपे तोडण्यास सुरुवात केली. तेव्हा त्या गुहेतून असंख्य मोठमोठे कावळे आणि गिधाडे फडफडत आणि वेगाने धावत त्यांच्या कानापाशी आली. त्यांचा थवा इतका मोठा होता आणि इतक्या आवेशाने अंगावर येत होता की, त्यामुळे ते जमिनीवर धाडकन् पडले. पक्ष्यांचा हल्ला हा अपशकुन मानण्याइतके ते धर्मभोळे नव्हते. शिवाय त्यांना पाकोळ्या किंवा घुबडे अथवा रात्रीची दुसरी पाखरे न दिसल्यामुळे त्यांचा उत्साह कायम राहिला होता. म्हणून भयभीत न होता ते पुनः उठून उभे राहिले आणि त्या

काळ्याकभिन्न व भयानक दरीकडे जाऊ लागले. तेव्हा सँकोने प्रथमच त्यांना आशीर्वाद दिला आणि त्यांच्यावर क्रॉसच्या हजारो खुणा करून म्हटले, "ईश्वरच आपले मार्गदर्शन करो! फरान्समधील 'लेडी ऑफ दि रॉक' आणि गेईटा येथील त्रिमूर्ती आपले रक्षण करोत. आपण सर्व शिलेदारांचा तुरा आणि मोहरा आहा. आपण पोलादी अंतःकरणाचे आणि पितळी बाहूंचे जगभर संहार करणारे शूर वीर आहा. आपण आपल्या मार्गाने जावे. आता आपण ज्या भयंकर विवरात उडी घेत आहा, तेथून हातपाय शाबूत ठेवून आपण सुखरूप परत यावे आणि आता ज्याला आपण मागे सोडीत आहात, त्या तेजस्वी सूर्याचे पुनः एकदा दर्शन घ्यावे."

शिलेदाराने सुखाने परत यावे म्हणून त्या पंडितानेही तशीच प्रार्थना केली. डॉन क्विक्झोट यांनी आणखी दोर सोडण्यास सांगितले, तो त्यांनी हळू हळू सोडला. नंतर त्यांचा आवाज गुहेतील आवाजात लुप्त झाला आणि त्यांचा सारा दोर संपला. ते विचार करू लागले, डॉन क्विक्झोट यांना ताबडतोब वर ओढून घ्यावे की नाही? अर्धा तास थांबण्याचे त्यांनी ठरविले, नंतर त्यांनी दोर वर ओढण्यास सुरुवात केली. पण त्याच्यावर काहीच वजन नसल्याचे पाहून त्यांना विलक्षण विस्मय वाटला आणि त्यांनी निष्कर्ष काढला की, बिचारा भला माणूस गमावला हे खचित. सँकोच्या डोळ्यांतून अश्रूंचे लोट वाहू लागले आणि तो मोठमोठ्याने आक्रोश करू लागला. आपली पूर्ण खात्री करून घेण्यासाठी तो त्या दोराला घट्ट धरून ओढू लागला. त्यांनी सुमारे पाचशे फूट तो दोर ओढल्यानंतर त्यांना तो थोडासा जड वाटू लागला, तेव्हा त्यांना धीर आला. शेवटी त्यांना डॉन क्विक्झोटची मूर्ती स्पष्टपणे दिसली. ते दृष्टीस पडताच सँको ओरडला, "यावे, यावे, महाराज, आपले स्वागत असो. आपण पुनः येथे आला म्हणून मला आनंद वाटतो. आपल्या धाडसाची किंमत म्हणून आपल्याला तेथेच अडकून राहावे लागते काय असे मला भय वाटले." पण सँकोच्या या स्वागताला काहीच उत्तर मिळाले नाही. जेव्हां त्यांनी शिलेदारांना वर ओढले, तेव्हां ते जणू काही गाढ झोपी गेले आहेत, असे त्यांचे डोळे मिटलेले त्यांना आढळले. त्यांनी त्यांना जमिनीवर ठेवले आणि त्यांना बांधणारा दोर काढून टाकला. तरी जागेपणाची काही चिन्हे त्यांच्याठायी दिसेनात. त्यांनी त्यांना हालविले आणि इकडे तिकडे वळविले. पण ते शुद्धीवर येण्याचे दृष्टीने सारे व्यर्थ गेले. शेवटी, अत्यंत गाढ झोपेतून उठल्याप्रमाणे त्यांनी आपले हातपाय ताणले आणि इकडे तिकडे टकमक पाहून ते म्हणाले, "मित्रानो, ईश्वरच तुम्हाला क्षमा करो. कोणाही मर्त्य मानवाला लाभले नसेल असे अत्यंत मधुर जीवन मला गवसले होते आणि कोणाच्या नेत्रांनी कधी पाहिली नसतील अशी अत्यंत सुखद दृश्ये मला दिसत होती. पण त्यातून तुम्ही मला खेचून वर काढले. यावरून या क्षणभंगुर जीविततील सारी सुखे किती अशाश्वत आहेत, हे मला कळून आले. ती सुखे म्हणजे अपुरी स्वप्ने!– फुलाप्रमाणे ती कोमेजतात आणि सावलीप्रमाणे ती गुप्त होतात. अरे दुर्दैवी मॉंटेसिनो! दुर्दैवाने जखमी झालेला रानडुर्टे! अरे दुःखी बेलेर्मा! हे शोचनीय

ग्वाडियाना ! आणि रुडेराच्या संत्रस्त कन्यांनो ! तुमच्या देशातील वाहत्या पाण्यावरून, तुमच्या सुंदर डोळ्यांतून अश्रूंचे किती प्रवाह वाहिले असतील, याची कल्पना येते !" अत्यंत भावनेने आणि व्याकुळतेने त्यांनी उच्चारलेले हे शब्द ऐकून पंडित व सँको यांना नवल वाटले. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ काय आहे आणि पृथ्वीवरील पाताळात त्यांनी काय पाहिले हे जाणण्याची इच्छा त्यांनी व्यक्त केली. तेव्हा डॉन क्विक्झोट उत्तरले, " त्याला पाताळ म्हणू नका, त्याहून चांगले नाव देणे योग्य होईल. का, ते मी लवकरच सांगतो. पण प्रथम मला खावयास काही द्या, कारण मला अतोनात भूक लागली आहे." तेव्हा त्यांनी पंडिताचे ओबडधोबड खोगीर सतरंजीदाखल जमिनीवर पसरले आणि आपल्या पिशवीच्या जुन्या फडताळात काय आहे ते पाहिले. ते तिघेही गवतावर बसले आणि एकदोन वेळा जेवण हुकलेल्या माणसाप्रमाणे त्या तिघांनी एकत्र बसून पोटभर खाल्ले. ते झाल्यावर डॉन क्विक्झोट म्हणाले, "आता कोणीही हलू नये. स्वस्थ बसा आणि मी जे सांगतो, ते लक्षपूर्वक ऐका."



प्रकरण २३

## अद्वितीय डॉन क्विक्झोट यांनी मॉंटेसिनोजच्या खोल गुहेत जे पाहिल्याचे त्यांनी सांगितले, त्या विस्मयकारक गोष्टीविषयी : [ त्या गोष्टींची महती आणि अशक्यता यामुळे हे साहस शंकास्पद भासते. ]

यावेळी दुपारचे चार वाजले होते. सूर्य ढगामागे झाकला गेला होता. सूर्याच्या किरणामध्ये आलेले ते ढग डॉन क्विक्झोट यांना, काही ताप व त्रास न देता, आपली कथा निवेदन करण्यास पाचारण करीत होते. मॉंटेसिनोज्च्या गुहेत त्यांनी ज्या ज्या चमत्कारिक गोष्टी पाहिल्या होत्या, त्या ते आपल्या थोर श्रोत्यांना सांगू लागले—

" सुमारे बारा किंवा चौदा पुरुष खोल, या गुहेच्या गाभाऱ्यात, उजव्या हाताला, एखादा प्रचंड गाडा व खेचरे वगैरेंचा समावेश करण्याइतकी रुंद अशी एक पोकळी होती. हे ठिकाण पूर्णपणे अंधारात नव्हते. लहान लहान छिद्रातून आणि फटीतून अंधुक प्रकाश तेथे येत होता. ही छिद्रे दूरवरच्या भूपृष्ठापर्यंत होती. ही पोकळी सापडली, तेव्हा मी कमरेला दोर बांधलेला असल्यामुळे अगदी थकलेला होतो. माझ्या खालच्या जागेतील गाढ अंधारामुळे माझे मन खचून गेलेले होते. कोणी वाटाड्याही जवळ नसल्यामुळे मी कोठे जात आहे हे मला कळले नाही, म्हणून मी तेथेच थोडा वेळ विसावा घेण्याचे ठरविले. आणखी दोर सोडू नका असे सांगण्यासाठी मी तुम्हाला हाका मारल्या, पण त्या तुम्हाला ऐकू आल्या नाहीत असे दिसते. म्हणून मी त्या पोकळीत शिरलो आणि त्या दोराचे वेटोळे करून त्यावर अत्यंत दुःखाने बसलो. मार्ग दाखवावयाला किंवा आधार द्यायला कोणी नाही, तेव्हा मी तळाशी सुखाने कसा जाऊन पोहोचेन याचा विचार करीत बसलो. अशा तऱ्हेने विचारात न कळत मग्न होऊन मी खिन्न होऊन बसलो असता, आधी काही गुंगी आलेली नसताना मी झोपी गेलो, हे आश्चर्य. त्यानंतर कसे कोणास ठाऊक, मी जागा झालो आणि एका अत्यंत सुंदर, मधुर आणि आनंददायक अशा पाण—कुरणावर मी असल्याचे मला अनपेक्षितपणे आढळले. आतापर्यंत निसर्गाने जितके म्हणून सौंदर्य ओतले असेल किंवा अत्यंत तरल कल्पनेने जितके रम्य स्थान रंगविले असेल, तशी ती हिरवळ होती. हे स्वप्न किंवा भ्रम नाही, याची खात्री करून घेण्यासाठी मी माझे डोळे चोळले, माझ्या नाकावर ठोसे मारले, आणि

माझ्या शरीराचे पुष्कळ भाग चाचपून पाहिले. तेव्हा माझी खात्री पटली की, आपण खरोखर जागे आहो. या क्षणी माझ्या मानसिक शक्ती आणि माझी सारी इंद्रिये जितकी शाबूत व क्रियाशील आहेत, तितकीच ती त्यावेळी होती.

" लवकरच मला एक वैभवशाली राजवाडा दिसला. त्याच्या भिंती आणि तटबंदी स्वच्छ व पारदर्शक स्फटिकाच्या दिसत होत्या. त्याच वेळी त्यांचा प्रशस्त दरवाजा उघडला आणि त्यातून एक आदरणीय वृद्ध माझ्याकडे आला. जमिनीवर लोळणारा त्याचा लांब झगा फिकट रंगाचा होता. कॉलेजात वापरतात त्याप्रमाणे एक हिरवी सॅटिनची शाल त्याच्या खांद्यावर व छातीवर लपेटलेली होती. त्याच्या डोक्यावर मिलान पद्धतीची काळी टोपी होती. त्याची रुंद व पिकलेली दाढी कमरेपर्यंत पोहोचलेली होती. त्याच्या हातात कोणतेही शस्त्र नव्हते. अक्रोडाएवढ्या मोठ्या मण्यांची जपमाळ त्याच्या हातात होती. त्यातील धर्ममणी साधारण शहामृगाच्या अंड्याएवढे मोठे दिसत होते. त्या वृद्ध माणसाचे गंभीर व दरारा उत्पन्न करणारे स्वरूप, त्याची रुबाबदार चाल आणि त्याची एकंदर वागण्याची डौलदार पद्धत–यातील प्रत्येक गोष्ट आदर व आश्चर्य उत्पन्न करणारी होतीच, पण त्या सर्वांचा एकत्रित परिणाम माझ्या मनावर फार झाला. तो वृद्ध माझ्याकडे आला आणि कोणतेही प्रास्ताविक उपचार न करता त्याने माझी घट्ट अंगभेट घेऊन म्हटले, " अत्यंत कीर्तिमान शिलेदारजी, ला मांचा येथील डॉन क्विक्झोटसाहेब, या मंतरलेल्या एकांत–वासात वास्तव्य करणारे आम्ही लोक आपल्या भेटीची आशा फार काळ करीत आहोत. मॉंटेसिनोज्‌ची गुहा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या भूमिगत पोकळीत ज्या आश्चर्यकारक व प्रचंड वस्तू ठेवलेल्या आहेत, त्या मानवजातीला अज्ञात आहेत. त्यांचे ज्ञान आपण वरील जगताला द्यावे. हे साहसी कृत्य अजिंक्य धैर्याच्या आणि प्रचंड निश्चयाच्या आपल्यासारख्या शिलेदारासाठीच राखून ठेवलेले आहे. अहो, अत्यंत सुप्रसिद्ध शिलेदारजी, चला तर मग माझ्याबरोबर आणि या पारदर्शक किल्ल्यात ठेवलेल्या विस्मयकारक वस्तू पाहा. या किल्ल्याचा मी कायमचा अधिपती आणि मुख्य रक्षक आहे. या गुहेने ज्याचे नाव धारण केले आहे, तो मॉंटेसिनोज्‌ मीच आहे. "

" आपण कोण आहो, हे त्या आदरणीय वृद्धाने मला सांगताक्षणीच मी त्यांना विचारले, ' आमच्या जगात एक कथा प्रचलित आहे, ती खरी की खोटी हे मला कृपा करून सांगा. आपला मित्र डूरांडार्टे मृत्युशय्येवर असताना त्याने केलेल्या विनंतीप्रमाणे तो मृत्यू पावताच, त्याचे हृदय आपण एका लहानशा कट्यारीने बाहेर काढून घेतले आणि त्याची हृदय–स्वामिनी बेलेर्मा हिला अर्पण केले, अशी ती कथा आहे. " त्या वृद्ध माणसाने उत्तर दिले, ' हे अक्षरशः खरे आहे. फक्त कट्यारीचा एक उल्लेख चुकीचा आहे. मी त्यावेळी लहान किंवा मोठी कट्यार वापरली नाही. चांभाराच्या आरीसारखा तीक्ष्ण असा एक चकचकीत खंजीर मी वापरला. ' " सँको म्हणाला, " होझेच्या रेमंडने बनविलेल्या सेव्हिल येथील खंजीरांपैकी तो एक असावा असे मला खात्रीने वाटते, तसा तो नसेल तर मला फाशी द्या. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " असे

असणार नाही. कारण, तो शास्त्रकार परवा-परवाच होऊन गेला आणि ज्या युद्धामध्ये हे कृत्य घडले, ते रॉन्सेस व्हॅलेसचे युद्ध पुष्कळ वर्षापूर्वी लढले गेले, पण आपल्या गोष्टीत याला काही महत्त्व नाही." विद्यार्थी म्हणाला, "महाराज, आपले म्हणणे बरोबर आहे. आपण आपली कथा पुढे चालू ठेवा. ती ऐकून मला कल्पनातीत संतोष होत आहे." शिलेदार म्हणाले, "यामुळे ती कथा निवेदन करण्यातील माझा आनंद वाढतच आहे. ठीक आहे, मी पुढे सांगतो—त्या आदरणीय मॉंटेसिनोजने मला स्फटिकाच्या राजवाड्यात नेले आणि एका प्रशस्त आणि अत्यंत प्रशांत अशा दालनात बसविले. त्याला पांढऱ्या दगडांच्या भिंती होत्या. मध्यभागी एक संगमरवरी भव्य समाधी. ती कलेची परम सीमा वाटत होती. त्या समाधीवर एक शिलेदार संपूर्ण पसरलेला होता. इतर स्मारकांवर असतो तसा पाषाणाचा किंवा पितळेचा तो पुतळा नव्हता-तर शुद्ध हाडा-मांसाचा माणूस होता. त्याने आपले वक्षःस्थळ आपल्या उजव्या हाताने झाकले होते. त्या हातावर पुष्कळ केस होते आणि पुष्कळ शिरा तटाटलेल्या दिसत होत्या. ज्या शरीराचा तो हात होता, ते किती शक्तिशाली असेल, हे त्यावरून लक्षात येत होते. ते दृश्य मी आश्चर्यचकित होऊन पाहात आहे, हे लक्षात आल्यामुळे मॉंटेसिनोज म्हणाला, "आपल्या काळातील परमप्रेमी व शूर शिलेदारांचा तुरा आणि आदर्श असलेला माझा मित्र डूरांडार्टे तो पाहा. माझ्याबरोबर आणि अनेक स्त्री-पुरुषां-बरोबर त्याला येथे ब्रिटिश मांत्रिक मर्लिन याने मंतरून ठेवलेले आहे. तो मांत्रिक सैतानाचा मुलगा आहे, असे लोक म्हणतात, पण माझा त्यावर विश्वास नाही. त्याचें ज्ञान मात्र फार मोठे होते, म्हणून त्याला सैतानापेक्षा अधिक ज्ञान होते असे म्हणता येईल. येथे त्याने आमच्यावर जादू केलेली आहे असे मी म्हणतो. पण ती कशी आणि कां केली आहे हे कोणाही माणसाला सांगता येणार नाही. पण मला आशा आहे की, लौकरच काळ याचा उलगडा करील. माझ्या दैवातील अत्यंत विस्मयकारक गोष्ट ही आहे की, डूरांडार्टे माझ्या बाहूत मरण पावला हे निश्चित,—आता सूर्य प्रकाशत आहे, याच्याइतकेच निश्चित. —आणि या माझ्या हातांनी मी त्याचे हृदय बाहेर काढले आणि ते दोन रत्तलापेक्षा अधिक वजनाचे भरले. हेच त्याच्या धैर्याचे खात्रीचे लक्षण होय. निसर्गशास्त्राप्रमाणे अत्यंत शूर माणसांना खचित अत्यंत मोठी हृदये असतात. हा शिलेदार खरोखर मरण पावला आहे, तरी जणु काही तो जिवंत आहे, असे वाटण्या-सारखे तो कधीकधी सुस्कारे सोडतो आणि कण्हतो." मॉंटेसिनोजचे हे शब्द पूर्ण होतात न होतात तोंच दुर्दैवी डूरांडार्टे मोठ्याने ओरडून म्हणाला, "अरे माझ्या भाई मॉंटेसिनोज, तुझ्या या मृत्युपंथास लागलेल्या मित्राची अंतिम व मरतेवेळची विनंती अशी होती की, माझ्या छातीतून माझे हृदय कट्यारीने वा खंजीराने काढून घ्यावे आणि ते बेलेर्माला पोहोचते करावे."

हे ऐकून पूज्य मॉंटेसिनोज त्या दुःखी शिलेदारापुढे गुडघे टेकून बसला आणि डोळ्यात अश्रू आणून म्हणाला, "अरे माझ्या प्रियतम नातलगा—डुरॉंडर्टे, त्या थोर नि

घातुक दिवशी जेव्हा तुझे प्राणोत्क्रमण झाले, तेव्हा तू मला जी आज्ञा केलीस, ती मी पाळली. कल्पनेने करता येईल तितकी काळजी घेऊन मी तुझे हृदय बाहेर काढले–त्याचा एक कणही तुझ्या छातीत ठेवला नाही. मी ते हृदय माझ्या नाजुक विणीच्या हातरुमालाने हलकेच पुसले आणि ते घेऊन मी फ्रान्सला तातडीने निघून गेलो. त्यापूर्वी तुझे प्रिय अवशेष भूमातेच्या उदरांत मी ठेवले, आणि इतके अश्रू ढाळले की, तुझ्या पोटात खुपसलेल्या माझ्या हाताना जे रक्त लागले होते, ते सारे धुतले गेले. या वृत्तांताचा खरेपणा पटविण्यासाठी मी असेही सांगतो की, रॉन्सेसव्हॅलेसहून निघाल्यावर मी प्रथम ज्या ठिकाणी थांबलो तेथे मी तुझ्या हृदयावर थोडे मीठ टाकले. हेतु हा की, ते सडून जाऊ नये, आणि ते ताजे राहिले नाही तरी निदान त्याला दुर्गंधी सुटू नये. नंतर मी ते बेलेर्माच्या हाती अर्पण केले. ती, तू, मी, तुझ्या शागीर्द, ग्वाडियाना, आणि रूडेरा (त्या स्त्रीची दासी), तिच्या सात मुली, दोन पुतण्या, आणि तुझे पुष्कळ दोस्त नि परिचित माणसे–हे सारेजण येथे मांत्रिक मर्लिनच्या जादूटोण्यामुळे स्थानबद्ध होऊन राहिलेले आहेत. या मंतरलेल्या किल्ल्यात आपल्याला प्रथम आणण्यात आले, त्याला आता पाचशेहून अधिक वर्षे झाली, तरी आपण अद्याप जिवंत आहो. मात्र रूडेरा आणि तिच्या कन्या–पुतण्या यांच्या अश्रूंनी दया येऊन मर्लिनने त्यांचे रूपांतर अनेक तळ्यांमध्ये केलेले आहे, आणि जिवंत माणसांच्या जगात ती तळी अद्याप अस्तित्वात आहेत. ला मांचा या प्रांतात 'रूडेराची तळी' म्हणून ती प्रख्यात आहेत. त्यापैकी स्पेनच्या राजाच्या मालकीची सात तळी आहेत. आणि दोन पुतण्यांची तळी सेंट जॉनच्या अत्यंत थोर परंपरेतील शिलेदारांच्या मालकीची आहेत. तुमचा शागीर्द ग्वाडियाना आपल्या क्रूर दुर्दैवाबद्दल शोक करीत होता, म्हणून त्याचे रूपांतर एका नदीत करण्यात आले आणि त्याला त्याचे नाव देण्यात आले. तरी तुमच्यावरील संकटाची जाणीव त्याला अद्यापि इतकी आहे की, तो जेव्हा पृथ्वीच्या गर्भातून प्रथम बाहेर आला, नदीप्रमाणे वाहू लागला आणि त्याला जेव्हा निराळ्याच विश्वात सूर्य दिसू लागला, तेव्हा त्याने पाताळात उडी घेतली आणि आपल्या शोकाचा स्त्रोत जगापासून लपविण्याचा प्रयत्न केला. पण त्या नदीच्या पाण्याचा नैसर्गिक धर्म वर जाण्याचा असल्यामुळे, सूर्य व मर्त्य मानव ज्या पृथ्वीवर त्याला पाहू शकतील, तेथे त्याला पुन्हा यावे लागले. त्या तळ्यांतील पाणी त्याच्या हृदयात शिरत असल्यामुळे तो फुगला आणि वैतागाने पोर्तुगालला वाहात गेला. त्याच्या प्रवाहाचा गढूळ आणि चिखलासारखा रंग त्याचे तीव्र दुःख वारंवार व्यक्त करीत असतो. तो प्रवाह पाहून कोणालाही आनंद होत नाही, त्याचप्रमाणे सोनेरी टॅगस नदीत जसे सुंदर आणि चविष्ट मासे सापडतात, तसेही तो मानवाला देऊन त्यांची भूक शमवीत नाही. माझ्या प्रियतम डुरांडार्टे, हे सारे मी तुला पुष्कळ वेळा सांगितलेले आहे, पण तू मला कधीच काही उत्तर दिले नाहीस. त्यावरून मी असे समजतो की, तुझा माझ्यावर विश्वास नाही किंवा तू माझे भाषण ऐकत नाहीस. त्यामुळे (ईश्वरसाक्ष सांगतो) मला फार दुःख होते. पण आता तुला सांगण्यासारखी

दुसरी बातमी माझ्याजवळ आहे. ती ऐकून तुझे दुःख हलके झाले नाही, तरी ते वाढणार नाही हे खचित. आपले डोळे उघड आणि आपल्यासमोर उभा असलेला हा बलाढ्य शिलेदार पहा. त्याचे किती तरी चमत्कार ऋषी मर्लिनने पूर्वीच वर्तवलेले आहेत. मी म्हणतो ते हे ला मांचा येथील डॉन क्विक्झोट. आतापर्यंत विस्मृतीत दडून राहिलेल्या शिलेदारीचे कार्य यांनी जगामध्ये पुन्हा प्रचलित केले आहे, एवढेच नव्हे तर, जगाच्या बाल्यकाळातही त्या व्यवसायाला कधी लाभली नसेल अशी मोठी कीर्ति त्यांनी त्याला मिळवून दिली आहे. आपल्याला येथे डांबून ठेवणारी ही घातुक जादू त्यांच्याच सामर्थ्याने नाहीशी झालेली आपल्याला दिसेल, अशी आशा आपण करू या. कारण महान कृत्ये महान व्यक्तीसाठी राखून ठेवली जातात–आणि ते योग्यच आहे. ''

शोकाकुल डूरांडार्टे क्षीण आणि दुर्बळ आवाजात उत्तरला, " आणि असे होऊ नये काय ? अरे माझ्या पुतण्या, धीर धर आणि ' पत्ते पीस ' ( स्पॅनिश म्हण ) म्हणजे दुर्दैव निघून जाईल. " नंतर एका कुशीस वळून, एकही अधिक शब्द न बोलता, त्याने आपले नित्याचे मौन पुनः स्वीकारले. त्यानंतर करुण किंकाळ्या आणि शोकपूर्ण सुस्कारे व विव्हळणे माझ्या कानावर पडल्यामुळे मी दचकलो, आणि ते आवाज कोठून येत आहेत, हे पहाण्यासाठी मी एका बाजूस वळलो. नंतर मला त्या स्फटिकाच्या भिंतीतून असे दिसले की, अत्यंत सुंदर स्त्रियांची एक शोकपूर्ण पदयात्रा चाललेली आहे. त्या सर्व स्त्रियांच्या अंगावर काळे कपडे होते, आणि त्यांच्या डोक्यावर तुर्की पद्धतीची पागोटी होती. त्या स्त्रिया दोघी–दोघींच्या रांगांनी चाललेल्या होत्या. त्यांच्या शेवटी एक राजेशाही थाटाची महिला आली. तिचाही पोषाख शोकाचाच होता. तिच्या डोक्यावरून जमिनीपर्यंत पांढरा बुरखा तिने धारण केला होता. इतर स्त्रियांच्या डोक्यावरील सर्वात मोठ्या पागोट्यापेक्षा दुप्पट मोठे पागोटे तिच्या डोक्यावर होते. तिच्या भुवया किंचित् पुढे आलेल्या होत्या, तिचे नाक पसरट होते, तिचे तोंड रुंद होते, पण तिचे ओठ लाल होते. तिचे दात मधूनमधून दिसत, तेव्हा ते पुढे आलेले व बारीक असले तरी फिक्या बदामांसारखे शुभ्र वाटत. तिच्या हातात एक सुंदर हातरुमाल होता आणि त्यामध्ये मांसल हृदय असलेले मला दिसत होते.. ते इतके शुष्क आणि वठलेले होते की, मसाला घालून ठेवलेले प्रेतच वाटावे. मॉंटेसिनोजने मला सांगितले की, " ही मिरवणूक डूरांडार्टे व बेलेर्मा यांच्या सेवकांची आहे. त्या सेवकांना त्यांच्या धन्यासमवेत आणि धनिणीसमवेत येथे मंत्रबद्ध करून ठेवलेले आहे. शेवटी खुद्द बेलेर्मा आहे. ती आठवड्यांतून चार दिवस आपल्या सेविकांसह नेहमी असे गात गात किंवा आपल्या आप्ताच्या देहासाठी व हृदयासाठी शोकाने आक्रोश करीत जात असते. यावेळी बेलेर्मा काहीशी श्रांत झालेली दिसत होती. ती आपल्या हातातून जे हृदय नेत होती, त्याबद्दल तिच्या स्वतःच्या हृदयात दुःख दाटले होते. स्त्रीजातीच्या रोगांपासून ती मुक्त होती, पण तिच्या दुर्दैवामुळे तिचे डोळे खोल गेलेले होते आणि तिची मुद्रा कोमेजलेली होती. तथापि मला हे कबूल केले पाहिजे की, अशा दुर्दशेपूर्वी मी तिला पाहिले असते तर,

ला मांचामध्येच नव्हे तर अखिल विश्वात सुविख्यात असलेल्या टोबोसोच्या डल्सीनियालाही तिची बरोबरी डौलदारपणात आणि सौंदर्यात क्वचितच करता आली असती.' मी म्हणालो, 'सज्जन सिनॉर डॉन मॉंटेसिनोज, येथेच थांबा. तुलना केव्हाही अप्रियच असते, म्हणून अधिक तुलना न करता तुम्ही आपली गोष्ट सांगण्याचे काम पुढे चालू करावे अशी माझी विनंती आहे. टोबोसीची अद्वितीय डल्सीनिया जशी आहे, तशी आहे, आणि लेडी बेलेर्मा जशी होती आणि आहे, तशीच आहे. या विषयावर अधिक बोलणे न लगे.'

"मॉंटेसिनोजने उत्तर दिले, 'सिनॉर डॉन क्विक्झोट, मी आपली क्षमा मागतो. लेडी डल्सीनियाचे आपण शिलेदार आहा, हे मी तर्काने ओळखावयास हवे होते. स्वर्गापेक्षा कनिष्ठ असणाऱ्या कोणाशीही तिची तुलना करण्यापूर्वी मी माझी जीभ चावावयास हवी होती.' माझ्या हृदय-स्वामिनीची बेलेर्माशी तुलना केल्याबद्दल मी संताप प्रगट केला असता, पण मॉंटेसिनोज़सारख्या महापुरुषाने केलेला तो खुलासा मला पुरेसा वाटला आणि माझा संताप शमला." सँको म्हणाला, "मेरीशपथ, तुम्ही त्या डुकराला पकडून बदडून कसे काढले नाही, याचे मला नवल वाटते. तुम्ही त्याच्या, हनुवटीवर एक केस तरी कसा शिल्लक ठेवला?" डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले "तसे नाही, सँको, वडील माणसांना आदर दाखविणे योग्य असते – मग ते शिलेदार नसेनात का! ते जर शिलेदार असतील आणि मंत्राच्या भाराखाली दडपलेले असतील, तर त्यांना अत्यंत आदर दाखविणेच योग्य. पण मला हे समाधान आहे की, आम्हा उभयतांमध्ये जो संवाद झाला, त्यामध्ये माझा उपमर्द होईल, असे काहीही घडू न देण्याची काळजी मी घेतली." पंडिताने विचारले, "पण महाराज, इतक्या थोड्या वेळात आपण इतक्या विचित्र गोष्टी पाहिल्या कशा? ऐकल्या कशा? आपण ते कसे केले असेल, याची मला कल्पनाच करवत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी गुहेत किती काळ होतो, असा तुझा हिशोब आहे?" सँको उत्तरला, "एक तासाहून थोडे अधिक." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते अशक्य आहे. कारण प्रातःकाल आणि सायंकाल, सायंकाल आणि प्रातःकाल, मी तेथे गेल्यापासून तीनदा पाहिले. म्हणून या वरच्या जगातून तीन दिवसांपेक्षा कमी काळ मी गैरहजर नव्हतो." सँको म्हणाला, "वा, वा! माझ्या धन्याचे म्हणणे बरोबर आहे. त्याच्या सर्व व्यवहारामध्ये जादू-टोण्याचा भाग मोठा आहे. इतर माणसांना जो फक्त एक तास असतो, तो त्या जादूमुळे त्याला तीन दिवसांचा आणि तीन रात्रींचा वाटत असावा." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तसेच असले पाहिजे." पंडित म्हणाला, "त्या सर्व काळात आपण काही खाल्ले असेल, अशी मला आशा आहे." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "एक घासही नाही. मला खाण्याची काडीमात्र इच्छा नव्हती – त्या सर्व अवधीत खाण्याचा विचार-सुद्धा माझ्या मनात आला नाही." पंडिताने विचारले, "मंतरलेले लोक कधी काही खात नाहीत काय?" डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, "कधीच नाही आणि म्हणून

अन्नाच्या विसर्जनाचा प्रश्नही त्यांना कधी सतावीत नाही. त्यांची नखे, त्यांच्या दाढ्या आणि त्यांचे केस वाढत असण्याचाही संभव नाही." सँकोने विचारले, "ते कधी झोपत नाहीत काय?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "कधीच नाही. निदान मी त्यांच्यामध्ये होतो तोपर्यंत त्यांनी आपले डोळे कधीच मिटले नाहीत." सँको म्हणाला, "मीही माझे डोळे मिटले नाहीत, त्यामुळे 'तुझे सोबती कोण ते मला सांग, म्हणजे तू कोण ते मी तुला सांगेन.' ही म्हण खरी ठरते. खरोखर तुम्हा सर्वांवर येथे मंत्रविद्येचा प्रभाव पडलेला आहे. म्हणून तुम्ही काही खात नाही की कधी झोपत नाही, यात काही आश्चर्य नाही. जे लोक नेहमी उपवास करतात आणि जागे राहातात, त्यांच्या प्रदेशात तुम्ही होता. पण महाराज, मला वाटते ते तुम्ही मला बोलू द्याल काय? मी जे बोलेन त्याचे वाईट वाटून घेऊ नका. आपण जे काही बोलला, त्यातील एका शब्दावरही माझा विश्वास बसत नाही." विद्यार्थी म्हणाला, "मित्रा, तुझ्या म्हणण्याचा काय अर्थ? हे थोर डॉन क्विक्झोट खोटे बोलण्याचा गुन्हा करतात असे तुला वाटते काय? आपली कल्पनाशक्ती किंचित् ताणण्याचे त्यांचे मनात असते, तरी इतक्या थोड्या वेळात इतक्या गोष्टी रचण्याची सवड त्यांना होती, असे तू मानतोस काय?" सँको म्हणाला, "माझा धनी खोटे बोलत असेल, असेही मला वाटत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मग तुला काय वाटते?" सँको म्हणाला, "महाराज, खरे सांगतो, हाच लुच्चा माणूस, तुम्ही म्हणता त्याप्रमाणे मंतरलेला किंवा मंत्रबद्ध झालेला हा मर्लिन, आणि तुम्ही ज्यांची माहिती सांगितली, त्या लोकांचा तो जमाव– या सर्वांनी मंत्र घोकून तुम्ही सांगितल्या त्या गोष्टी तुमच्या मनात भरविल्या असतील, आणि जे चमत्कार सांगावयाचे असतील, तेही त्यांनी जादूने तुमच्या डोक्यात कोंबले असतील."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते अशक्य नाही, तसेही घडू शकेल; पण माझ्या बाबतीत निराळे घडले आहे, अशी मला खात्री वाटते. मी तुम्हाला जे जे काही सांगितले, ते सर्व मी माझ्या या डोळ्यांनी पाहिले आहे आणि या हातानी अनुभविले आहे, याविषयी माझी खात्री आहे. पण मी जर तुम्हाला आणखी एक आश्चर्यकारक गोष्ट सांगितली तर तुम्हाला काय वाटेल? ती गोष्ट म्हणजे, त्या मजेदार शेतातून तीन खेडवळ तरुणी रानशेळ्यांसारख्या उड्या मारीत आणि नाचत–बागडत चालल्या होत्या. त्यांच्यापैकी एकजण अद्वितीय डल्सीनिया आहे, हे मी प्रथम दर्शनीच ओळखले, आणि दुसऱ्या दोघीजणी म्हणजे टोबोसोच्याजवळ आपण ज्यांच्याशी बोललो त्या होत्या. मी मॉंटेसिनोजला विचारले, तुम्ही यांना ओळखता का? त्याने नकारार्थी उत्तर दिले. त्या नुकत्याच आलेल्या कोणी मंतरलेल्या स्त्रिया असाव्यात, असा त्यांचा तर्क होता. त्यांनी सांगितले की, तेथे प्राचीन काळातील आणि वर्तमान–काळातील पुष्कळ माणसे मंत्रबद्ध करून ठेवलेली होती. त्यात नवे चेहरे क्वचितच दिसत. तेथील माणसे निरनिराळ्या सोंगात असत. त्यांच्यापैकी सर लॅन्सेलॉट ब्रिटनहून येत असता त्याची चषकधारिणी म्हणून काम करणारी, राणी ग्विनेव्हरची दासी क्विंटॅनियोना, या त्यांना माहीत होत्या."

आपल्या धन्याचे अशा प्रकारचे भाषण ऐकून सँकोला स्वतःचा विसर पडण्याची वेळ आली. तो खो खो हसला असता. कारण त्याला पक्के माहीत होते की डल्सेनिया-वरील जादूटोणा ही एक थाप आहे, आणि ती थाप उठविणारे आपणच आहो–मुख्या मांत्रिक आपण स्वतःच आहो. आपला धनी पार वेडा झाला आहे असे ठरवून तो आपल्या धन्याला म्हणाला, " प्रिय धनीसाहेब, एका दुर्दिनी, एका दुर्दैवी क्षणी, आपण खालच्या जगात गेलात, आणि तेथे त्याहून दुर्दैवी क्षणी त्या दुष्ट मॉंटेसिनोजला भेटला. त्याने तुम्हाला या खेदकारक अवस्थेत परत पाठविले आहे. आपण येथून गेला तेव्हा चांगले शुद्धीवर होता, अधूनमधून चुणचुणीत बोलत होता, बोलतांना मधूनमधून तुमच्य सुंदर म्हणी आणि चतुर सुभाषिते येत असत, आणि ज्यांना हवा असेल, त्यांना आपण हिताचा सल्ला देत होता. पण आता काय ? तुम्ही आपला मेंदू जणू त्या सैतानाच्या खोलीत ठेवून आलात, अशा स्वरूपाचे तुम्ही बोलत आहा." डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, मी तुला ओळखतो, आणि म्हणून मी तुझ्या शब्दांना शक्य तितके कमी महत्त्व देतो. " सँकोने उत्तर दिले, " आणि मीही आपल्या शब्दांना तितकेच महत्त्व देतो. नाही, महाराज, मी जे काही बोललो किंवा बोलणार आहे, त्याबद्दल तुमची इच्छा असल्यास तुम्ही माझे हात–पाय तोडा किंवा मला ठार मारा. पण मी मेलो तरी माझ्या मनात जे आहे, ते बोलल्याशिवाय राहणार नाही. महाराज, आपल्या रागाचा पारा वर चढण्याच्या आत मला हे कृपा करून सांगा की, ती तुमची हृदय–स्वामिनी होती, हे तुम्हाला कसे कळले ? तुम्ही तिच्याशी बोलला काय ? ती तुम्हाला काय म्हणाली ? आणि तुम्ही तिला काय म्हणाला ? "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, तू जेव्हा तिला माझ्या नजरेस पाडलेस, त्यावेळी जे कपडे तिच्या अंगावर होते, तेच आताही होते, आणि म्हणून मी तिला पुनः ओळखले. मी तिच्याशी बोललो पण तिने काही उत्तर दिले नाही. ती एकदम वळली आणि वावटळीप्रमाणे माझ्यापासून दूर गेली. तिच्यापाठोपाठ जाण्याचा माझा विचार होता. पण मॉंटेसिनोजने मला सांगितले, त्याचा काही उपयोग होणार नाही. शिवाय त्याने मला असा इशारा दिला की, वरच्या जगात परत जाण्याची वेळ होऊन गेलेली आहे. भाषणाचा विषय बदलून त्याने मला सांगितले, " या सर्वांना जादूच्या प्रभावातून मुक्त करण्याची साधने तुम्ही यापुढे जाणून घ्या. " मॉंटेसिनोज आणि मी अशा रीतीने एकत्र बोलत असताना एक अत्यंत विचित्र अपघात घडून आला, आणि त्यामुळे आमचे संभाषण तुटले. त्या अपघाताच्या कल्पनेने मला अजून त्रास होत आहे. आमचे भाषण ऐन रंगात आले असताना मध्येच कोण येऊन टपकावे ? दुर्दैवी डल्से-नियाच्या सहचरींपैकी एकजण तेथे आली–आणि ते माझ्या ध्यानात येण्यापूर्वीच ती क्षीण व शोकाकुल स्वरात म्हणाली, " महाराज, टोबोसोची लेडी डल्सेनिया आपल्याला अभि-वादन करीत आहे आणि आपले क्षेम विचारीत आहे. सध्या तिला पैशाची चणचण असल्यामुळे तिची इच्छा अशी आहे की, " आपण अत्यंत प्रेमाने आणि दयाळूपणाने

या नव्या जाड्याभरड्या परकरावर सहा रील–किंवा आपण देऊ शकाल तितकी कमी-अधिक नाणी–उसनी द्यावी. ती रक्कम अल्पावधीत अत्यंत प्रामणिकपणे परत करण्याची काळजी मी घेईन. ”

“ या संदेशाने मला विलक्षण आश्चर्य वाटले. म्हणून मी मॉंटेसिनोज्कडे वळून त्याला विचारले, “ प्रतिष्ठित माणसे मंत्रमुग्ध झाली म्हणजे त्यांना पैशाची गरज असणे शक्य आहे काय ? ” तो म्हणाला, “ अगदी शक्य आहे महाराज, गरिबी सर्वत्र पसरलेली आहे. मंतरलेल्या किंवा न मंतरलेल्या प्रतिष्ठित माणसांना ती सोडीत नाही. म्हणून डल्सेनियाच्या इच्छेनुसार आपण तिला सहा रील उसने द्यावेत. त्यांना तारण पुरेसे आहे. सध्या तिच्याजवळ फारच थोडे पैसे आहेत, हे खचित. म्हणून आपण तिला पैसे द्यावेत. ” मी म्हणालो, “ तारण घेण्याचा मला तिटकारा आहे. पण माझे दुर्दैव हे आहे की, मी तिची इच्छा पूर्णपणे पुरी करू शकत नाही. कारण माझ्याजवळ फक्त चारच रील आहेत. ” आणि तेही सँको, गरीबांना वाटण्यासाठी तू मला परवा दिलेले होते. तथापि माझ्याजवळ जे होते ते सर्व मी त्या स्त्रीला दिले, आणि आपल्या धनिणीला पुढील निरोप सांगण्यास सुचविले, ‘ तुमची अडचण ऐकून मला फार दुःख झाले. श्रीमंत क्रीसस राजाजवळ होते, तेवढे सारे भांडार मजजवळ असते तर ते सारे मी आपल्या सेवेस अर्पण केले असते. तुमचा संजीवक सहवास मला मिळत नसल्याने मी क्षणोक्षणी मृत्यू पावत आहे. आता माझी नम्र नि कळकळीची विनंती अशी आहे की, या आपल्या बंद्या गुलामावर आणि उन्हाळे–पावसाळे खाल्लेल्या शिलेदारावर तुम्ही कृपा करावी आणि त्याला भेटून त्याच्याशी संभाषण करावे. तुमच्या ध्यानी–मनी नसेल अशा वेळी मी घेतलेल्या शपथेचे वृत्त तुमच्या कानी पडेल. मॉंटूआच्या मार्क्विसने, आपला पुतण्या बाल्डविन डोंगरावर प्राण सोडण्याच्या अवस्थेत आहे असे पाहून अशी शपथ घेतली की, त्याच्या मृत्यूचा सूड उगवेपर्यंत मी टेबलावर जेवण घेणार नाही, आणि इतरही अनेक सुख–साधने वर्ज्य मानीन. त्याचप्रमाणे मी गंभीरपणे शपथ घेईन की, तुम्हाला मी जादूपासून मुक्त करीपर्यंत या पृथ्वीतलावर भ्रमण करण्याचे आणि साता समुद्रावरून संचार करण्याचे मी कधीच थांबविणार नाही. पोर्तुगालचा राजपुत्र पेट्रो याच्यापेक्षाही अधिक अदम्य उत्साहाने मी संचार करीत राहीन. ”

“ आणि ती तरुणी म्हणाली, “ माझ्या धनिणीसाठी आपण हे–आणि याहून अधिक काही–करणे योग्यच आहे, ” नंतर चार रील घेऊन, माझे आभार न मानता, तिने हवेत आनंदाने सहा फूट उंच उडी मारली. ” सँको म्हणाला, “ आता ईश्वरच आपले रक्षण करो. माझ्या धन्यावर अशा रीतीने चेटूक करण्याची आणि अशा पद्धतीने त्याच्या खंबीर बुद्धीला वेड लावण्याची शक्ती कोणा दुष्ट मांत्रिकाचे किंवा जादूटोण्याचे अंगी असेल, यावर आतापर्यंत कोणाचा विश्वास बसला असता काय ? अरेरे, महाराज, देवासाठी तरी आपण आपली स्वतःची काळजी घ्या. जग तुम्हाला काय म्हणेल ? आपल्या झोपी जाणाऱ्या इंद्रियांना जागे करा आणि असल्या वेडेचाराचा छंद सोडा.

त्यामुळे आपल्या अलौकिक मस्तकाचे तुकडे उडाले आहेत, हे केवढे दुर्दैव!" डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, तुझ्या या अडाणीपणाच्या वटवटीने मला राग येत नाही. कारण तूं जे बोलतोस, ते माझ्यावरील प्रेमातून निघालेले असते. अरे बिचाऱ्या प्राण्या, तुला असे वाटते की, आपल्या कोत्या बुद्धीच्या आटोक्याबाहेर जे जे असेल, ते सारे अशक्य आहे. पण मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, असाही काळ येईल की, मी गुहेत खाली पाहिलेल्या पदार्थांचे वर्णन तुला सांगेन आणि मग त्याच्या खरेपणाची खात्री तुला पटेल. आता मी तुला ज्या गोष्टी सांगितल्या, त्या साऱ्या खऱ्या आहेत, हे निर्विवाद."



प्रकरण २४

## या भव्य इतिहासाचे सम्यक आकलन होण्यासाठी आवश्यक व अनावश्यक अशा हजारो लटपटींचा आणि गोष्टींचा वृत्तांत.

[ या प्रख्यात इतिहासाचा भाषांतरकार असे जाहीर करतो की, मॉंटेसिनोज्च्या गुहेतील पराक्रमाचे वर्णन करणाऱ्या या प्रकरणाचे प्रारंभी समासात एक टिपण, अरब ग्रंथकाराने स्वहस्ते लिहिलेले, मला आढळले, त्यातील शब्द पुढीलप्रमाणे :—

" आपल्यावर जे जे विस्मयकारक प्रसंग ओढवल्याचे डॉन क्विक्झोट यांनी सांगितले आहे, ते त्यांनी सांगितलेल्या वेळीच अचूक घडले, यावर माझा विश्वास बसत नाही – आणि त्यासाठी माझे मन तयार होत नाही. आतापर्यंत त्यांनी जे जे धाडसी पराक्रम केले, त्यांचा क्रम अगदी स्वाभाविक दिसत होता आणि संभाव्यतेची छाया त्यांच्यावर पसरलेली होती. पण या प्रकरणी तर्काशी सुसंगत असे काहीच दिसत नाही— प्रचंड विसंगतीचा हा एक गड्डा आहे. पण उलटपक्षी आपण जर थोर डॉन क्विक्झोट यांच्या प्रतिष्ठेचा, पात्रतेचा आणि प्रामाणिकपणाचा विचार केला, तर ते खोटे बोलण्याचा अपराध करतील, असा संशय घेण्यास आपल्याजवळ काडीमात्र कारण नाही. खोटे बोलण्यापेक्षा बाणानी खिळले जाणे ते अधिक पसंत करतील. शिवाय त्यांनी त्या पराक्रमाचे वर्णन इतक्या दक्षतेने केले आहे आणि त्याचा इतका तपशील दिला आहे की, ते सर्व वर्णन प्रक्षिप्त असावे असे घोषित करण्याचे धाडस मला होत नाही. शिवाय कपोलकल्पित कथांचा गुच्छ तयार करण्यास त्यांना पुरेसा वेळही नव्हता. म्हणून मी इतर मजकुराबरोबर याही मजकुराचा समावेश केला आहे. तो खरा की खोटा हे ठरविण्याच्या भानगडीत मी पडलो नाही. न्यायी वाचकाच्या विवेकावर मी ते काम सोपविले आहे. पण जाताजाता त्या वाचकाला मी हे सांगितले पाहिजे की, मृत्युशय्येवर पडलेले असताना डॉन क्विक्झोट यांनी, हे धाडसी कृत्य म्हणजे केवळ दंतकथा होती, असे म्हणून ते कृत्य आपल्या अंगाबाहेर झटकून टाकले, आणि ते म्हणाले, " केवळ माझ्या मनाला बरे वाटावे म्हणून मी ती कल्पित कथा सांगितली होती. पूर्वी मी अद्भुत कथांमध्ये ज्या गोष्टी वाचल्या होत्या त्यांना अनुरूप अशी ही साहसकथा मी तेव्हा बनवून – रंगवून सांगितली. " एवढे विषयांतर पुरे. ]

पंडिताला वाटे, सँको हा फार आगाऊ नोकर आहे, पण त्याचा धनी आपण पूर्वी कधी पाहिला नसेल इतका थंड डोक्याचा वेडा माणूस आहे. त्या धन्याच्या अंगी जो

शांतपणा दिसत आहे, तो त्याच्या सुस्वभावाचा आणि सहज वृत्तीचा परिणाम असावा. मंतरलेल्या अवस्थेत का होईना, पण आपली हृदयस्वामिनी डल्सिनिया हिच्या दर्शनाने त्याच्या अंतःकरणात थोडा उल्हास आला असावा असे त्याला वाटले, नाही तर त्याने सँकोला दटावले असते आणि त्याच्या हकीकतीपेक्षा वेडाचीच ती मोठी खूण ठरली असती. तो म्हणाला, " महाभाग डॉन क्विक्झोट, आपल्याबरोबर मी हा प्रवास सुरू केल्यामुळे मला अत्यंत आनंद वाटत आहे. त्या आनंदाची चार प्रमुख कारणे आहेत. पहिले, आपला परिचय होण्याचा सन्मान मला लाभला आहे. तो परिचय अलौकिक सौख्याचा आहे असे मी निरंतर मानीन. दुसरी गोष्ट म्हणजे, मॉंटेसिनोझूच्या गुहेतील गुप्त गोष्टी, ग्वाडिआनाचे रूपांतर, रूडेराची तळी, या जुन्या साऱ्या अद्‌भुत गोष्टी आपण मला सांगितल्या, त्या माझ्या "स्पॅनिश ओव्हिड" पुस्तकात फार मोठ्या चटकदार ठरतील; तिसरा लाभ मला झाला तो म्हणजे, पत्त्यांचा खेळ प्राचीन असल्याचा शोध लागला, चार्लस् दि ग्रेट या सम्राटाच्या काळीही तो करमणुकीचा प्रकार चालू होता, असे कळले. कारण मॉंटेसिनोझूच्या प्रदीर्घ भाषणानंतर, जागृत झालेल्या डुरांडार्टेने " पत्ते पिसा व धीर ( पेशन्स ) धरा. " हे शब्द उच्चारले. मंतरलेल्या अवस्थेत त्याने अशी प्राकृत म्हण कधीच वापरली नसती. त्यावरून हे सिद्ध होते की, त्या सम्राटाच्या काळी हा जेव्हा फ्रान्समध्ये रहात होता, तेव्हा त्याने ती ऐकली असावी. त्याचे ते विधान अगदी योग्य वेळी नोंदले गेले आहे. " पोलीडोर व्हर्जिल " या माझ्या पुस्तकाला ही पुरवणी योग्य होईल. त्याने पत्त्यांच्या डावाला स्पर्शही केला नव्हता, असे मला आठवते. महाराज, मी ते विधान अत्यंत महत्त्वाचे म्हणून माझ्या पुस्तकात समाविष्ट करीन हे मी खात्रीने सांगतो. कारण सर डुरांडार्टे यांच्यासारख्या अधिकृत आणि प्राचीन ग्रंथकाराची ती साक्ष होय. माझ्या सद्‌भाग्याचे चौथे कारण म्हणजे, आतापर्यंत मानवाने केलेल्या साऱ्या संशोधनांना अज्ञात असलेल्या ग्वाडियाना नदीचा खरा व नक्की उगम मला कळला. "

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " तुम्ही म्हणता त्यात पुष्कळ तथ्य आहे. पण महाशय, मला कृपा करून हे सांगा की, तुमचे पुस्तक प्रसिद्ध करण्यास तुम्हाला यदाकदाचित् परवानगी मिळाली, ( त्याबद्दल मला थोडाफार संशय आहे ) तर आपले आश्रयदाते म्हणून तुम्ही कोणाची निवड कराल ? " ग्रंथकाराने उत्तर दिले, " मी माझे पुस्तक ज्यांना अर्पण करावे, असे पुष्कळ सरदार स्पेनमध्ये खचित आहेत. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " खरे म्हणजे पुष्कळ नाहीत. पुस्तक अर्पण करण्याचा मान स्वीकारण्यास ज्यांचे गुण पात्र आहेत, असे काही लोक स्पेनमध्ये आहेत हे खरे, पण ते फार थोडे आहेत. ग्रंथकाराच्या कष्टाचे व प्रतिष्ठेचे चीज करण्याइतके पारितोषिक देण्याचे औदार्य त्या थोड्या लोकांच्याच अंगी आहे. मी हे कबूल केले पाहिजे की, अन्य राजपुत्रांचे ठायी असलेली उणीव भरून काढण्याइतके औदार्य अंगी असलेला एक राजपुत्र मला माहीत आहे. त्याचे औदार्य इतक्या प्रचंड प्रमाणाचे आहे की, त्याचे तपशीलवार वर्णन करण्याचे आणि त्याच्या थोर गुणांचे संकीर्तन करण्याचे धाडस मी केले तर,

चाराहून अधिक उदार माणसाच्या अंतःकरणांत उदात्त स्पर्धा मी चेतविल्यासारखे होईल. पण यासंबंधी पुनः केव्हा तरी बोलू. आता उशीर झाला आहे. आपल्या मुक्कामाचा विचार करणेच आता सोयीचे. ”

ग्रंथकार म्हणाला, “ महाराज, आपल्याजवळच येथे एक आश्रम आहे, तेथे एक भाविक मनुष्य राहात असतो. तो पूर्वी सैनिक होता असे म्हणतात. एक सज्जन खिश्चन म्हणून लोक त्याच्याकडे पाहातात. तो इतका उदार आहे की, केवळ पाहुण्याच्या सुख-सोयीसाठी त्याने स्वतःच्या खर्चाने एक लहानसे घर तेथे बांधले आहे. ” सँकोने विचारले, “पण त्याने तेथे कोंबडी बाळगली आहेत असे तुम्हाला वाटते काय ? ” डॉन क्विक्झोट म्हणाले, “ या युगात कोंबड्यांशिवाय राहणारे एकांतवासी थोडेच. त्यांची राहणी प्राचीन काळच्या इजिप्तच्या वाळवंटात राहणाऱ्या लोकांइतकी कडक व वैराग्य-पूर्ण असत नाही. प्राचीन काळचे ते भाविक लोक केवळ पाम वृक्षाची पाने पांघरून आणि जमिनीतील कंदमुळे खाऊन राहात. त्या प्राचीन लोकांविषयी मी चांगले बोलतो, याचा अर्थ मी इतरांवर शिंतोडे उडवितो असे समजू नका. माझ्या म्हणण्याचा अर्थ इतकाच की, सध्याच्या भाविकांचे तप प्राचीन काळातल्याइतके कठोर नसते. तरीही सध्याच्या काळातील तपस्वी लोक सज्जन असावयास काही अडचण नाही. मी त्यांच्या-कडे त्याच दृष्टीने पाहातो. निदान त्यांचे सोंग तसे असल्याने ते निंदेपासून बचावले जातात. उजळ माथ्याने वावरणाऱ्या पापी माणसापेक्षा पावित्र्याचा मुखवटा धारण करणारा ढोंगी माणूस कमी अपायकारक असतो हे निश्चित, ” अशा तऱ्हेने त्यांचा संवाद चालू असताना, त्यांना एक माणूस लांब लांब टांगा टाकीत येत असलेला दिसला. भाल्यांचा व परशूचा भार वाहणाऱ्या खेचराला तो जोराने हाकून नेत होता. तो त्यांच्या-पर्यंत जलदीने आला. आणि त्यांना अभिवादन करून पुढे गेला. तो वेगाने जात असलेला पाहून डॉन क्विक्झोट ओरडले, “ अरे भल्या माणसा, थांब. वेगाने चालणे ठीक आहे, पण इतकी घाई काय कामाची ? ” तो माणूस म्हणाला, “ महाराज, मी थांबू शकत नाही. कारण, तुम्हाला ही जी हत्यारे दिसत आहेत, ती उद्या सकाळीच वापरली जाणार आहेत. म्हणून माझी घाई. निरोप असावा; त्या आश्रमापलीकडे असलेल्या खानावळीत मी आज रात्री मुक्काम करीन. त्या वाटेने जाण्याचा योग तुम्हाला आला, तर तुम्ही मला भेटू शकाल. मग मी तुम्हाला विलक्षण बातमी सांगेन. म्हणून तुम्हा सर्वांना माझा नमस्कार. ”

नंतर आपल्या खेचराला फटके लगावून तो इतक्या त्वरेने पुढे गेला की, डॉन क्विक्झोट यांना त्याला आणखी प्रश्न विचारण्यास सवडच मिळाली नाही. आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठी शिलेदारजींच्या कानाला नव्यानव्या गोष्टी ऐकण्याची नेहमीच कंड असे. म्हणून त्यांनी तावडतोब सुचविले की, पंडिताने रात्रभर ज्या झोपडीत राह-ण्याचे योजिले होते, तेथे न थांबता सरळ खानावळीचा रस्ता धरावा. ते सर्वांनी मान्य केले, आणि ते आपल्या वाटेने झपाझप निघाले. पण जेव्हा ते त्या आश्रमापाशी आले,

तेव्हा पंडिताने डॉन क्विक्झोट याच्यापुढे अशी इच्छा व्यक्त केली की, येथील सज्जन माणसाला थोडे भेटून दाराशीच दारूचा एक पेला घेऊ. ही योजना कानी पडताच सँकोने आपले डॅपल गाढव त्या दिशेने वळविले आणि तो तिकडे गेला. पण दुःखाची गोष्ट अशी की, आतिथ्यशील तपस्वी दूरदेशी गेलेला होता आणि त्याच्या एका सवंगड्याशिवाय तेथे कोणीच नव्हते. "झोपडीत कडक दारू आहे काय?" असे विचारले असता, त्या सवंगड्याने उत्तर दिले, "ती येथे मुळीच मिळणार नाही. पण पाणी मात्र पोटभर मिळेल." सँको म्हणाला, "आग लागो त्या पाण्याला! मला काय पाण्याची तहान लागली आहे? तुमच्या थंड स्वागताला काय मी हपापलो आहे? रस्त्यावर भरपूर विहिरी आहेत. त्यातून मी माझ्या शरीरात ओतप्रोत पाणी ओतले असते. छेः! डॉन डीएगोच्या घरी काय गंमत होती! अन् कॅमॅचोच्या लग्नसमारंभात अन्नाच्या स्वादाचा किती घमघमाट सुटलेला होता! त्याची बरोबरी करणारा अनुभव मला केव्हा येईल?"

आता ते सारे खानावळीकडे वेगाने निघाले. रस्त्याने आपल्या गाढवाला खुराबर बदडीत असलेला एक तरुण त्यांना आढळला. कपड्यांचे गाठोडे टोकाशी अडकविली तलवार त्याने आपल्या खांद्यावर घेतलेली होती. त्या गाठोड्यात पायजम्यांची एक जोडी, एक अंगरखा आणि एक दोन सदरे असावेत असे दिसत होते. सॅटिनची किनार असलेले फाटके मखमली जाकीट त्याच्या अंगात होते. त्याचा सदरा बाहेर लोंबत होता आणि त्याचे पायमोजे रेशमी होते. त्याचे चढाव, दरबारी पद्धतीचे, बोटापाशी चौकोनी होते. त्याचे वय अठरा-एकोणीस वर्षांचे दिसत होते. तो दिसायला सुंदर मुलगा होता आणि त्याचा स्वभाव उत्साही आणि तरतरीत दिसत होता. आपल्या प्रवासाचा शीण घालविण्यासाठी तो सारा वेळ गाणे गात होता. ते सारे लोक त्याच्याजवळ आले, तेव्हा तो एका पोवाड्याचे शेवटचे शब्द गात होता. ते शब्द असे :—

"मरो ते दुर्दैव! आता हातचा पैसा सारा संपला
कंगालाच्या नशिबी लढाईवर रखडत जाणे आले
तरी मी उधळला तसा पैसा हाती असता
तर सैतानाशपथ एक पाऊल पुढे टाकले नसते."

डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, "अरे तरुण माणसा, तू अगदी खुशीत मजेने चालला आहेस, असे मला वाटते. पण तू कोठे चालला आहेस, हे मला कृपा करून सांग. हा प्रश्न विचारण्याचे धाडस मी करीत आहे." तरुणाने उत्तर दिले, "मी युद्धावर चाललो आहे. मी अशा तऱ्हेने प्रवास करीत आहे, याचे कारण ही उष्णता नि गरिबी." डॉन क्विक्झोट उत्तरले, "उन्हाळा, मी मान्य करतो, पण गरिबी का? ते सांगण्याची विनंती मी तुला करतो." मुलाने उत्तर दिले, "या गाठोड्यात आहेत त्यापेक्षा अधिक कपडे अंगावर घालण्यासाठी माझ्याजवळ नाहीत. रस्त्याने जाताना मी जर गाठोड्यातील कपडे वापरले, तर शहरात मी झकपक कसा दिसेन? नवे कपडे घेण्यासाठी माझ्याजवळ

पैसे नाहीत. येथून सुमारे अठरा कोसांवर पायदळाची एक तुकडी आहे. तीत नाव नोंदविण्यासाठी मी तिकडे चाललो आहे. तेथे गेल्यावर, कार्थाजेनाला पोहोचेपर्यंत मला कसलीच अडचण भासणार नाही. तेथे ते सैनिक जहाजावर चढणार आहेत, असे मी ऐकतो. देशात एखाद्या दरबाऱ्याचा भिकार नोकर होण्यापेक्षा परदेशात राजाची सेवा करणे मला पसंत आहे." पंडिताने विचारले, "तू नोकरीवर होतास तेव्हा काही पैसे साठविले नाहीस काय ?" तरुण म्हणाला, "तुमच्या त्या सरदारांची किंवा थोरामोठ्यांची सेवा मी केली असती, तर माझी चंगळ झाली असती आणि आतापर्यंत मला अम्मलदारीही मिळाली असती. त्यांचे वरगडीसुद्धा आता कॅप्टन आणि लेफ्टनंट—किंवा तसेच चांगले हुद्देदार—झालेले आहेत. पण धिक्कार असो त्यांना ! माझे नित्याचे दुर्दैव असे की, दीनवाण्या उपटसुंभांची आणि धाकट्या बंधूंची सेवाच मला करावी लागली. तेव्हा माझा पगार इतका तुटपुंजा होता—आणि तोही व्यवस्थितपणे मिळत नसे—की, माझे लोकरीचे कपडे धुण्यालाही अर्धा पगार पुरत नसे. अशा खडतर नोकरीत भिकारड्या नोकराला चांगली माया कशी साठविता येईल ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "पण इतक्या साऱ्या काळात तुला एक पूर्ण गणवेष मिळाला नाही हे कसे ?" मुलाने उत्तर दिले, "छान; महाराज, माझ्याजवळ दोन गणवेष होते, पण मठात शिकाऊ उमेदवाराशी जसे वागतात तसे माझे धनी माझ्याशी वागले. मठात अभ्यास पूर्ण होण्यापूर्वी नवशिके निघून गेले, तर त्यांना दिलेले नवे कपडे काढून घेऊन त्यांचे जुने कपडे त्यांना दिले जातात. ज्यांची नोकरी मी केली तसे लोक केवळ देखाव्यासाठी गणवेष विकत घेऊन दरबारात तोंड दाखवल्यानंतर हळूच खेड्यात निघून जातात आणि ते गेले म्हणजे त्या बिचाऱ्या सेवकांचे गणवेश काढून घेतले जातात, मग त्यांना आपली लक्तरे पुनः अंगावर घ्यावी लागतात."

डॉन क्विक्झोट, म्हणाले, "किती किळसवाणी लबाडी ! इटालियन लोक तिला म्हणतात, हलकट वागणूक. ठीक आहे. तू दरबार सोडलास म्हणून दुःख करण्याचे काहीच कारण नाही. तू चांगल्या हेतूनेच ते केले आहेस. प्रथम ईश्वराची सेवा करावी, त्यापेक्षा अधिक स्तुत्य कृत्य जगात दुसरे कोणतेही नाही. नंतर राजाची सेवा करावी—त्यातही शस्त्रविद्येचा व्यवसाय श्रेष्ठ. त्यामुळे माणसाला फारशी श्रीमंती मिळत नाही पण ज्ञान मिळते, आणि त्यामुळे मानही मिळतो. झगे घालणाऱ्या विद्वान लोकांची घराणी भरभराटीस येतात हे खरे, पण का कोणास ठाऊक, समशेर चालविणाऱ्या माणसांना विद्वानाहून अधिक लाभ होतो, हे खचित. इतर सर्व मानवांपेक्षा अधिक तेजाने व गौरवाने खड्गधारी माणसे चमकत असतात. पण मुला, माझा सल्ला मनात धर. लष्करी व्यवसायाने आपला उत्कर्ष करून घेण्याची तुला इच्छा असेल तर, आपल्यावर कोणती संकटे ओढवतील, या विचाराने तू कधीच अस्वस्थ होऊ नकोस. अरे, सर्वात मोठे संकट म्हणजे मृत्यू. तो जर मानाने आला तर तुझे भाग्य उजळेल आणि तू खरा सुखी होशील. रोमचा शूर सम्राट ज्यूलियस सीझर याला कोणी विचारले, 'कोणत्या प्रकारचा

मृत्यू चांगला ? ' तो म्हणाला, ' अनपेक्षितपणे अकस्मात येणारा मृत्यु चांगला. ' या त्याच्या उत्तरात रानटीपणाचा थोडासा अवशेष असला तरी, मानवी दौर्बल्य लक्षात घेता, त्याचे उत्तर विवेकाचे होते, असे म्हटले पाहिजे, नाही तर, असे समज की, पहिल्याच लढाईत तोफेच्या गोळ्याने किंवा सुरुंगाच्या स्फोटाने तुझे मुंडके उडविले, तर त्याचा काय उपयोग ? सारा खेळ खलास ! टेरेन्स म्हणतो, 'पळ काढून जिवंत व सुरक्षित राहणाऱ्या सैनिकापेक्षा रणांगणावर मृत्यू पत्करणारा सैनिक चांगला ! ' त्याची कीर्ति आणि उन्नती होण्याचा संभव अधिक. तो चांगली शिस्त पाळील, आज्ञा पाळील, अधिकार चांगला गाजवील. माझ्या मित्रा, हे लक्षात ठेव की, कस्तुरी किंवा अंबर यांच्यापेक्षा सैनिकाला बंदुकीच्या दारूचा वास अधिक मानाचा. या व्यवसायात तू म्हातारा झालास–सर्वांगावर तुला जखमा झाल्या–तू लुळापांगळा झालास–तरी तुला जो मान मिळेल, त्याचाच मोठा आधार वाटेल आणि गरिबीच्या लांच्छनापासून तू वाचशील–नव्हे, प्रत्यक्ष गरिबीतून तू मुक्त होशील. शूर पण पंगू सैनिकांना कशाची गरज लागू नये, अशी काळजी घेतली जाते. नीग्रो गुलामांना काही लोक जसे वागवितात, तसे त्या सैनिकांना कोणी वागवीत नाही. नीग्रो गुलाम म्हातारे आणि निकामी झाले म्हणजे, त्यांना स्वतंत्र करण्याच्या सबबीवर घरातून उघडे–नागडे बाहेर फेकले जाते, आणि त्यामुळे थंडी व भूक यांचे ते अधिकच गुलाम बनतात. त्या गुलामगिरीतून त्या अभागी जीवांना केवळ मृत्यूच मुक्त करू शकतो. पण या विषयावर या वेळी मी तुला अधिक काही सांगत नाही. माझ्या पाठीमागे बैस म्हणजे मी तुला खानावळीकडे घेऊन जाईन. तेथे तू माझ्याबरोबर रात्रीचे जेवण घे आणि उद्या सकाळी आपल्या वाटेने निघून जा. ईश्वर तुझ्या चांगल्या योजना पार पाडो ! "

शिलेदारजींच्या पाठीमागे बसण्याचे त्या शागीर्दाने क्षमा मागून नाकारले, पण त्यांचे भोजनाचे निमंत्रण मात्र मोठ्या खुशीने स्वीकारले. आपल्या धन्याचे हे सारे संभाषण सँको कान देऊन ऐकत होता. तो इतक्या शहाणपणाने बोलत आहे, हे पाहून त्याला नेहमीपेक्षा अधिक नवल वाटले असे म्हणतात. तो स्वतःशी म्हणाला, " अरे माझ्या धन्या, देव तुझ्यावर दया करो ! इतक्या चांगल्या गोष्टी बोलणारा हा माणूस इतक्या विचित्र आणि हास्यास्पद गोष्टीही कसा सांगू शकतो ? आणि मॉंटेसिनोजच्या गुहेतील गोष्टीवर आम्ही विश्वास ठेवावा अशी इच्छा तरी कशी धरतो ? प्रभूला सारे काही माहीत ! अनुभवानंतरच खरे-खोटे कळते. स्वयंपाकाची चव खाण्यानेच समजते." आता अंधार पडू लागला होता, ते खानावळीजवळ पोहोचले होते. घोड्यावरून खाली उतरताच डॉन क्विक्झोट यांनी विचारले, " भाले आणि परशू घेतलेला तो माणूस कोठे आहे ? " खानावळवाल्याने उत्तर दिले, " तो माणूस तबेल्यात आपल्या खेचराला खरारा करीत आहे. " आपला प्रवास संपला, हे पाहून सँकोला मोठा आनंद वाटला.

□ □

## प्रकरण २५

# गाढवाचे ओरडणे, कळसूत्री बाहुल्यांचा खेळ आणि भविष्य वर्तविणारे माकड, अशा गोष्टीविषयी

रस्त्यावर भेटलेल्या माणसाने जी गोष्ट सांगण्याचे कबूल केले होते, ती ऐकण्यास डॉन क्विक्झोट अत्यंत उत्सुक होते. म्हणून तबेल्यात जाऊन त्यांनी त्याला त्याच्या अभिवचनाची आठवण दिली आणि 'आताच सारी गोष्ट सांग' असा त्याला आग्रह केला. तेव्हा तो माणूस म्हणाला, "ती गोष्ट सांगण्याला काही काळ लागेल आणि उभ्याउभ्या ती सांगता येणार नाही. धनीसाहेब, थोडा धीर धरा. माझ्या खेचराची सेवा मला संपवू द्या. नंतर मी आपली सेवा करीन आणि आपल्याला थक्क करून सोडणाऱ्या गोष्टी सांगेन." डॉन क्विक्झोट उत्तरले, "त्याचा अडथळा नको. मी स्वतः तुला मदत करीन." असे म्हणून, त्यांनी त्याला मदत करण्यासाठी गव्हाण साफ केली आणि सातू निवडले. या त्यांच्या माफक मदतीमुळे त्या माणसाला आपली गोष्ट सांगण्यास अधिक उत्साह वाटला. म्हणून तो स्वतः एका बाकावर बसला आणि त्याच्याभोवती डॉन क्विक्झोट, पंडित, नोकर, सँको, आणि खानावळवाला--हा श्रोतृसमाज बसला. तेव्हा त्याने पुढीलप्रमाणे आपली गोष्ट सांगण्यास सुरुवात केली--

"एकदा असे घडले की, येथून सुमारे पंधरा मैलांवर असलेल्या शहरातील एका नगरपित्याचे गाढव हरवले. त्याच्या चावट दासीने ही लुच्चेगिरी केली असे लोक म्हणतात. पण त्याला काही महत्त्व नाही. गाढव गेले – गमावले हे नक्की, आणि ते खूप शोधून कोठेही सापडले नाही हे विशेष. एका पंधरवड्यापूर्वी– दोनचार दिवस आगेमागे– हेच गाढव चुकले होते, तेव्हा त्याच शहरातील दुसरा नगरपिता या नगर-पित्याला बाजारात भेटला असताना म्हणाला, 'भाई, मला योग्य पैसे दे म्हणजे मी तुला तुझ्या गाढवाची बातमी देतो.' तेव्हा तो म्हणाला, 'खरे की काय? मी तुला पैसे देतो. पण माझे ते गरीब बिचारे जनावर कोठे आहे ते मला सांग.' तेव्हा त्याने उत्तर दिले, 'आज सकाळी त्या पलीकडच्या डोंगरावर मला कोण भेटावे? अहो, ते तुमचेच गाढव. त्याच्या पाठीवर खोगीर किंवा दुसरे काही सामान नव्हते. आणि ते इतके कृश दिसत होते की, त्याच्याकडे पाहून माझ्या हृदयाला वेदना झाल्या. तरी पण ते इतके मोकाट नि नाचरे होते की, मी माझ्यापुढे घालून त्याला घरी आणणार, तोच अंगात भूत संचारल्याप्रमाणे ते धावत सुटले आणि गर्द झाडीत शिरले. आता आपली इच्छा

असेल तर आपण दोघे मिळून जाऊ आणि त्याचा शोध करू. मात्र मी प्रथम हे माझे गाढव ठेवण्यासाठी घरी जाईन. नंतर मी परत आल्यावर आपण दोघे तुमच्या गाढवाचा शोध करू.' तो म्हणाला, 'भाई, बरोबर आहे तुझे म्हणणे. मी तुझा फार ऋणी आहे– तुझ्यासाठी मीही दुसऱ्या एखाद्या वेळी पुष्कळ करीन.' गोष्ट इतकीच घडली– कमी नाही की जास्त नाही. पण ती ज्यांना ज्यांना म्हणून माहीत आहे, ते सारेजण मी सांगितली तशीच शब्दशः सांगतात. सारांश, ते दोघे नगरपिते हातात हात घालून निघाले. टेकड्यांवर पायी चढून गेले, खालीवर हिंडले, कंटाळा येईपर्यंत त्यांनी पायपिटी केली, तरी त्यांना ते गाढव काही सापडले नाही. तेव्हा ते गाढव ज्याने पाहिले होते, तो नगरपिता दुसऱ्याला म्हणाला, 'भाई, ऐक, आपले गाढव शोधून काढण्यासाठी माझ्या डोक्यात एक युक्ती आली आहे. ते पाताळात गेले असले तरी आपण त्याला शोधून काढू. ती युक्ती ऐक— लोकांना कौतुक वाटेल इतक्या बेमालूमपणे मी गाढवासारखे ओरडू शकतो हे तुला माहीत आहेच. तसेच तूही मोठ्याने ओरडू शकलास, तर आपले काम झालेच म्हणून समज.' दुसरा म्हणाला, 'मोठ्याने ओरडायचे ? देशातील कोणाही गाढवापुढे किंवा नगरपित्यापुढे मी मोठ्याने ओरडायला लाजणार नाही.' दुसरा म्हणाला, 'आपण प्रयत्न करून पाहू. माझी युक्ती अशी आहे की, टेकडीच्या एका बाजूस तू जावेस आणि दुसऱ्या बाजूस मी जावे. एकदा मी ओरडावे, तर एकदा तू. तुझे गाढव जवळपास असले, तर ते आपल्या ओरडण्याला प्रतिसाद खात्रीने देईल आणि मोठ्याने ओरडेल! दुसरा म्हणाला, 'वा! धन्य आहे! फार नामी युक्ती! तुझ्या युक्तिबाजपणाला तोड नाही.'

"लगेच ते दोघे कराराप्रमाणे एकमेकापासून दूर गेले. बरेच दूर गेल्यानंतर ते दोघेही गाढवासारखे ओरडू लागले— ते इतके हुबेहूब की, त्यांनी एकमेकाला फसविले. दोघांची भेट झाल्यावर प्रत्येकाला वाटले, आपल्याला गाढव सापडले. गाढवाचा मालक म्हणाला, 'भाई, आता जे ओरडले, ते माझे गाढव नसणे अशक्य आहे.' तेव्हा तो दुसरा नगरपिता उत्तरला, 'छेः! ते गाढव नव्हते– मी होतो.' मालक म्हणाला, 'याचा अर्थ ओरडण्याच्या बाबतीत तुमच्यात आणि गाढवात काही फरक नाही. इतके हुबेहूब ओरडणे मी माझ्या आयुष्यात पूर्वी कधी ऐकले नाही.' दुसरा म्हणाला, 'यात काय आहे, महाराज ? तुमच्या मानाने मी काहीच नाही. साऱ्या राज्यातील ओरडणाऱ्या लोकांपेक्षा आपण पैजेने दुप्पट चांगले ओरडता. तुमचा आवाज उंच आहे आणि फार रुंदहि. तुमचा तालही उत्तम आणि तानही उत्तम. तुमच्या आवाजातील लयही परिपूर्ण, आनंददायक आहे. थोडक्यात म्हणजे, मी तुमच्यापुढे हार कबूल करतो.' गाढवाचा मालक म्हणाला, 'भाई, निदान या एका गुणाच्या बाबतीत तरी माझ्याविषयी माझे स्वतःचे मत चांगले राहील. मी बरेच चांगले ओरडतो, हे मला माहीत होते, पण त्या कलेत मी इतका निपुण असेन असे मला कधी वाटले नाही.' दुसरा म्हणाला, 'अलौकिक गुणसुद्धा लोकांना कळले नाहीत तर वाया जातात, हे यावरून तुझ्या लक्षात

आले असेल. आपली शक्ती कसोटीला लावल्याशिवाय माणसाला तिची किंमत कळून येत नाही.' मालक म्हणाला, 'बरोबर आहे, भाई, आपण आता जे काम हाती घेतले आहे, ते जर आपण सुरू केले नसते, तर मला माझ्या अंगच्या या आश्चर्यकारक गुणांची ओळख कधीच पटली नसती. आता आपण त्या कामाला झटपट लागू या.' असे धन्यवाद एकमेकांना दिल्यानंतर ते पुनः दूर गेले, आणि एकजण टेकडीच्या या बाजूस, तर दुसरा दुसऱ्या बाजूस जाऊन गाढवासारखे ओरडत राहिले, पण व्यर्थ! पुनः ते आपल्या ओरडण्याने एकमेकांना फसवू लागले, आणि पूर्वीप्रमाणेच आवाज येत होता, तिकडे धावत जाऊन एकमेकांना भेटले.

"शेवटी त्यांनी असे ठरविले की, प्रत्येकाने लागोपाठ दोनदा ओरडावे, म्हणजे त्या खुणेवरून आपणच ओरडत आहो-गाढव ओरडत नाही, अशी आपली खात्री पटेल. पण व्यर्थ! छाती फुटेपर्यंत ते ओरडले, पण गाढवाने काही जाब दिला नाही, आणि तो बिचारा जीव जाब देणार तरी कसा? कारण, झाडीत शेवटी त्यांना ते गाढव आढळले, तेव्हा गिधाडानी ते अर्धेमुर्धे खाल्लेले होते. मालक ओरडला, 'हाय रे दैवा! आपल्या प्रेमळ मालकाकडे त्याने मुळीच लक्ष दिले नाही, याचे मला आता नवल वाटत नाही. ते जर जिवंत असते, तर ते पुनः ओरडले असते, हे खचित-ते गाढव तेथे होते हे जितके खरे, तितकेच हेही खरे. पण जाऊ द्या ते! भाई, मी गाढव गमावले असले तरी, माझी अलौकिक बुद्धिमत्ता मला गवसली, याचे समाधान मला आहे. या माझ्या दुःखात ते केवढे मोठे सांत्वन आहे!' दुसरा म्हणाला, 'अहो नगरपिते, कला योग्य माणसांच्याच हाती असते. महंत गाऊ लागला म्हणजे, त्याचे शिष्य मागे राहात नाहीत."

"असे म्हणून ते नगर-पिते घरी गेले, त्यावेळी त्यांची तोंडे पुष्कळच उतरलेली होती आणि त्यांचा आवाज बसलेला होता. तेथे गेल्यावर त्यांनी आपल्या साऱ्या शेजाऱ्यांना सारी हकीकत अक्षरन् अक्षर सांगितली. गाढवासारखे ओरडण्यात एकाने किती कसब दाखविले याची तारीफ दुसरा करी आणि दुसरा किती कौशल्याने ओरडला हे पहिला सांगे. सारांश, एकाने दुसऱ्याची साथ करावी-आणि दुसऱ्याने पहिल्याची साथ करावी असे चक्र चालू झाले. मग मुलेही ओरडू लागली आणि सारे रिकामटेकडे लोकही ओरडू लागले. त्यामुळे आमच्या साऱ्या गावांत एवढा काही गोंगाट आणि कलकलाट झाला की, कोणाला वाटावे, सारा यमलोकच येथे येऊन उतरला आहे. पण सैतान कधी नाल्यात मेलेला पडून राहात राहात नाही, हे तुमच्या लक्षात यावे आणि कोणत्याही आचरट गोष्टीने तो लोकांना कसे भरीस पाडतो, हे तुम्हाला कळावे म्हणूनच की काय, आमच्या शेजारच्या गावां-गावांनीही तसेच गाढवासारखे ओरडण्यास सुरुवात केली. आमच्यापैकी कोणी गावकरी त्यांच्या दृष्टीस पडला की, ते हाँ हाँ करून ओरडू लागत आणि आमच्या नगरपित्याच्या ओरडण्यावर मात करीत. यामुळे गावांगावांमध्ये वैर पेटले. आम्ही शेजाऱ्यावर खूप भडकलो-त्यांना शिव्या-शाप देऊ लागलो आणि शिव्यावरून हाणामारीकडे वळलो.

आमच्या गांवकऱ्यांचा हा गुण सर्वांना चांगला माहीत होता. भिकाऱ्याला आपली ताटली कशी आहे हे कळते, त्याप्रमाणे आमचे गुण शेजाऱ्यांना कळलेले होते. आम्ही जेथे जेथे जाऊ, तेथे तेथे ते आमची हुर्यो करू लागले आणि कायद्याची किंवा धर्माची पर्वा न करता आमच्या गावकऱ्यांशी झगडा करू लागले. त्यांनी आमची चेष्टा इतकी बेसुमार केली की, उद्या किंवा परवा आमच्या गावांतील ओरडणारे लोक शेजारच्या गावातील लोकांशी सामना देण्यास उभे ठाकतील. पांच–सहा मैल अंतरावर असणारे ते गावकरी आम्हाला नेहमी सतावीत असतात. म्हणून आपण पूर्ण तयारीत असावे यासाठी, मी हे भाले आणि परशू घेऊन चाललो आहे. ते तुम्ही पाहातच आहा. सभ्य गृहस्थ हो, ही आहे माझी कहाणी. ती तुम्हाला विलक्षण वाटली नसेल, तर ती सांगण्यात मी मोठी चूक केली असे होईल."

त्या भल्या माणसाने आपली गोष्ट येथे संपविली, त्याच वेळी एक माणूस तेथे आला. त्याने शामॉय चामड्याचा पायजमा व बंडी अंगात घातली होती. आपण कोणी बडे आहोत अशा आविर्भावाने तो ओरडून म्हणाला, "अहो मालक, येथे राहायला जागा आहे का? कारण भविष्य सांगणारे माकड आणि कळसूत्री बाहुल्यांचा खेळ—'मेलिसँड्राची मुक्तता'—आताच येथे येईल." ते ऐकून खानावळवाला आनंदाने ओरडला, "वा! वा! कोण, मास्टर पीटर आला काय? मग काय? आमची रात्र मजेत जाणार. अहो, इमानी मास्टर पीटर, आम्ही तुमचे मनापासून स्वागत करतो. पण ते माकड कुठं आहे आणि तो खेळ तरी कुठं आहे? मला तर काहीच दिसत नाही." पीटर म्हणाला, "ते सारे येतीलच इथं इतक्यात. तुमच्याकडे जागा रिकामी आहे काय, हे पाहण्यासाठीच मी पुढे आलो आहे." खानावळवाला म्हणाला, "अरे जागा काय? पीटरला जागा पाहिजे असेल तर मी आल्व्हाच्या ड्यूकलाही हाकून देईन. चल, ये, ये, तुझे सारे सामान आण. आज रात्री या घरात असे पाहुणे आले आहेत की, ते तुझे नामी गिऱ्हाईक बनतील, असे मी तुला खात्रीने सांगतो." पीटर म्हणाला, "हे ऐकून मला आनंद वाटला. त्या पाहुण्यांना खेळाकडे खेचून आणण्यासाठी मी माझे दर कमी करीन. आज रात्रीचे माझे भाडे वसूल झाले तरी पुरे, अधिक मिळविण्याची मला इच्छा नाही. आता मी माझी गाडी तात्काळ पुढे आणतो." असे म्हणून तो दरवाजातून वेगाने बाहेर पडला.

ह्याच मास्टर पीटरच्या डाव्या डोळयावर आणि अर्ध्या गालावर हिरव्या रेशमी कापडाचा पट्टा बांधलेला होता हे तुम्हाला सांगण्यास मी विसरलो. त्या पट्टयावरून कोणालाही असा तर्क करता आला असता की, त्याच्या तोंडाच्या त्या बाजूस काही तरी दुखत आहे. तो कोण आहे आणि त्याचे माकड व खेळ काय आहे, याची चौकशी डॉन क्विक्झोट यांनी केली. तेव्हा खानावळवाल्याने उत्तर दिले, "काय सांगावे महाराज? हा माणूस ह्या देशात पुष्कळ काळ आपला बाहुल्यांचा चमत्कारिक खेळ दाखवीत हिंडत आहे. मेलिसँड्रा व डॉन गेफेरोज यांची कथा तो या कठपुतळ्यांमार्फत

दाखवीत असतो. या राज्यात जी जी म्हणून उत्तम नाटके आतापर्यंत झाली, त्यांत ही कथा कधीही न विसरली जाणारी आहे. शिवाय त्याच्याजवळ एक माकड आहे. वा! किती चलाख आहे ते माकड ! पण आताच मी त्याबद्दल काही बोलत नाही. महाराज, आपण ते प्रत्यक्षच पाहाल. आपण आपल्या आयुष्यात ज्या ज्या गोष्टी केल्या असतील, त्या सर्व ते माकड तुम्हाला सांगेल. असा चमत्कार पूर्वी कोणी कधीच पाहिला नाही. त्याला तुम्ही प्रश्न विचारा, तो ते कान देऊन ऐकेल, आणि मग एकदम उडी मारुन ते आपल्या धन्याच्या खांद्यावर बसेल अन् आपल्या प्रश्नाचे उत्तर आपल्या धन्याच्या कानात हळूच सांगेल. मग मास्टर पीटर ते तुम्हाला सांगतील. पूर्वी काय झाले, त्याच-प्रमाणे पुढे काय होणार, हे ते माकड सांगते. पुढे काय घडणार हे त्याला नक्की नेहमी सांगता येत नाही, हे खरे, पण एकंदरीने पाहता, त्याचे उत्तर क्वचितच चुकते. त्यामुळे आपल्याला असे वाटू लागते की, अशा वेळी सैतान त्याला मदत करीत असावा. तो– किंवा त्याच्यातर्फे त्याचा धनी–दोहोंचा अर्थ एकच–ज्या प्रश्नाचे उत्तर देतो, त्याची किंमत प्रत्येकी दोन रील असते. वर्षाच्या शेवटी पैशाचा हिशेब झाला म्हणजे त्या गुलामाला चांगलीच कमाई झाली असे दिसून येते. त्यामुळे त्याचे कोट–कल्याण होते. तो एक भला माणूस आहे, सच्चा सोबती आहे, आणि मोठ्या मजेत आयुष्य घालवीत आहे. तो सहा माणसांइतके बोलतो आणि बारा माणसांइतकी दारू पितो. आपली वाणी, आपले माकड आणि आपला खेळ यांच्या जीवावर त्याची ही सारी मजा चालते. ”

हे बोलणे संपेपर्यंत मास्टर पीटर आपला कठपुतळीचा खेळ आणि आपले माकड यांना एका गाडीतून घेऊन आला. माकड चांगले गुबगुबीत होते. त्याला शेपूट नव्हते. त्याचे कुले बुरणुसासारखे उघडे होते. तरी ते फारसे कुरूप दिसत नव्हते. त्याला पाहता क्षणीच डॉन क्विक्झोट त्याच्यापाशी गेले आणि म्हणाले, “ अहो ज्योतिषीबुवा, आम्ही आज कोणते मासे पकडू आणि आज आमचे काय होईल, हे आम्हाला कृपा करून सांगा. त्यासाठी घ्या ही तुमची फी. ” असे म्हणून त्यांनी पीटरला दोन रील नाणी देण्याचा हुकूम सँकोला दिला. पीटरने उत्तर दिले, “ महाराज, या प्राण्याला भावी गोष्टींसंबंधी काही सांगता येत नाही. भूतकाळातील घटना तो थोड्याफार सांगू शकतो.– आणि वर्तमान काळातीलही थोडेफार तो सांगतो. ” सँको म्हणाला, ‘ विचित्र आहे हे ! मागल्या गोष्टी जाणून घेण्यासाठी मी फुटकी कवडीसुद्धा देणार नाही. कारण त्या मला जितक्या माहीत आहेत, तितक्या दुसऱ्या कोणास ठाऊक असणार ? मला जे आधीच माहीत आहे, त्यासाठी पैसे खर्च करण्याइतका मी वेडा नाही. पण सध्या काय चालले आहे, हे ओळखण्याइतके चातुर्य माकडाजवळ आहे असे तू म्हणतोस, तर माझी बायको टेरेसा आता काय करीत आहे आणि तिचा विचार काय चालू आहे, हे त्या भल्या माकडाने सांगावे. त्यासाठी हे घे माझे दोन रील. ’

मास्टर पीटर म्हणाला, ‘ आधी मी तुमचे पैसे घेणार नाही. ’ असे म्हणून त्याने आपल्या डाव्या खांद्यावर थोपटले. त्यासरशी ते माकड तेथून एका उडीत खाली आले

आणि आपले तोंड त्याच्या कानाशी नेऊन त्याने आपले दात त्याच्या गालावर घासले. माकडासारख्या वाकुल्या दाखवून आणि तसेच आवाज एकदोन मिनिटे काढून माकडाने दुसरी उडी घेतली आणि जमिनीवर ते आले. त्याबरोबर मास्टर पीटर डॉन क्विक्झोट यांच्याकडे धावत गेला आणि गुडघे टेकून व त्यांच्या पायांचे चुंबन घेऊन म्हणाला, " अहो, शिलेदारजींचे वैभवशाली उद्धारकर्ते, हर्क्यूलसच्या स्तंभाप्रमाणे आपल्या पायाचे चुंबन मी घेत आहे. खचलेल्या अंतःकरणाला संजीवन देणारे, पतितांचा आधार असणारे, पतित होणाऱ्यांना वाचविणारे आणि दीन-दुःखितांना आश्रयस्थान असणारे, ला मांचा येथील महापुरुष डॅान क्विक्झोट यांची पुरेशी स्तुति कोण करू शकेल ? " हे शब्द ऐकून डॉन क्विक्झोट चकित झाले, सँको कंपित झाला, शागीर्द चकित झाला ! गाढवासारखे ओरडणाऱ्याने मनात देवाचे नाव घेतले, खानावळवाला पाहातच राहिला आणि पंडित गूढ विचारात पडला. मास्टर पीटर याचे भाषण ऐकून सर्वांना इतके नवल वाटले. नंतर पीटर सँकोकडे वळून म्हणाला, " अरे इमानी सँको पँझा, जगातील उत्तम शिलेदाराचा तू उत्तम शागीर्द आहेस. तुझी भली बायको टेरेसा ही चांगली सुगरण आहे. त्याबद्दल तू आपल्या नशिबाला दुवा दे. यावेळी ती अच्छेर अंबाडी निवडीत आहे. आणि तिच्या डाव्या हाताला एक मोठी तोंड फुटलेली बरणी आहे. त्यात थोडीफार दारू आहे, तिचे घुटके घेत ती आपला उत्साह शाबूत ठेवते. " तेव्हा सँको म्हणाला, " तसे असणे शक्य आहे. कारण ती म्हणजे एक आनंदी जीव आहे— प्रामाणिक जीव आहे. मधून मधून तिला मत्सराचे झटके येत नसते तर तिला देऊन मी महाकाया राक्षशीण अँडोन डोनालादेखील मोबदल्यात घेतली नसती. ती फार चतुर होती असे माझा धनी सांगतो. कोणत्याही दोन पायांच्या बाईपेक्षा ती अधिक चतुर होती. हे प्रामाणिक टेरेसे, तुझे कल्याण असो. तू मुलाबाळांचा सांभाळ करण्याचे व्रत घेतले आहेस. पण तू सध्या उपासमार काढीत आहेस असे मला दिसते. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " ठीक आहे. वाचन, देशाटन आणि अनुभव यामुळे मोठे ज्ञान प्राप्त होते. भविष्यकथनाची देणगी माकडांना मिळालेली असते, हे मी माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहीपर्यंत मला खरे वाटले नसते. या हुशार प्राण्याने ज्याचे वर्णन केले, तो ला मांचा येथील डॉन क्विक्झोट खरोखर मीच आहे. पण त्याने ज्या गुण-संपदेचा वर्षाव माझ्यावर करण्याची कृपा दाखविली, तिला मी काहीसा अपात्र आहे, हे मी कबूल केले पाहिजे. तथापि सर्वांचे भले करण्याचा आणि कोणालाही न दुखविण्याचा माझा स्वभाव आहे. त्यामुळे माकडाने केलेल्या माझ्या प्रशंसेत औदार्य व दयाबुद्धी असली, तरी त्याचा मला खेद वाटत नाही. "

नंतर तो शिपाई शागीर्द म्हणाला, " माझ्याजवळ पैसे असते तर, युद्धात माझ्या नशिबी काय आहे हे या माकडमहाराजाकडून मी जाणून घेतले असते. " डॉन क्विक्झोटपासून दूर जाऊन उठून उभा राहिलेला मास्टर पीटर म्हणाला, " पुढे काय होणार आहे, हे सांगण्याच्या भानगडीत हे माकड पडत नाही हे मी आपल्याला पूर्वीच

सांगितले आहे. पण जर त्याला भविष्य सांगता आले असते, तर डॉन क्विक्झोट यांच्यासाठी मी तुमच्याकडून पैसुद्धा घेतली नसती. त्यांच्या उपयोगी पडण्यासाठी मी जगातील माझ्या सर्वस्वाचा होम करीन. त्याची खूण म्हणून, सभ्यगृहस्थ हो, मी माझा खेळ फुकट दाखवितो आणि या घरातील सर्व माणसांची करमणूक मोफत करतो. " हे ऐकून खानावळवाल्याचा आनंद पोटात मावेना. एका सोयीस्कर खोलीत आपला खेळ मांडण्याची सूचना मास्टर पीटर यांना देऊन तो तिकडे लगेच गेला.

तोपर्यंत डॉन क्विक्झोट यांनी सँकोला तबेल्याच्या एका कोपऱ्यात नेले. एक माकड इतक्या साऱ्या गोष्टी करू शकेल यावर त्यांचा विश्वास बसेना. म्हणून ते म्हणाले, " हे पाहा सँको, या माकडाच्या विलक्षण गुणांचा विचार मी करीत आहे आणि त्याचा अंदाज घेत आहे. त्यावरून मला असे वाटते की, मास्टर पीटर याने सैतानाशी गुप्त करार केलेला असावा. " 'करार ' हा शब्द नीट न समजल्यामुळे सँको म्हणाला, " छे, तसे असणार नाही. सैतानाने आणि त्याने एखादा गुप्त कारभार केला असेल तर तो बद-माशांचा कट आहे आणि ते दोघे बदमाश आहेत. एकमेकांना लखलाभ असोत ते." डॉन क्विक्झोट म्हणाले, " तुला माझे म्हणणे कळले नाही. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, सैतान आणि पीटर यांनी एक करार केला असावा. सैतानाने माकडाच्या डोक्यात हे ज्ञान घालावे म्हणजे त्याच्या मालकाला मोठी मिळकत विकत घेता येईल; उलट मानव-जातीच्या त्या विध्वंसक जादूगाराला पीटरने आपला आत्मा विकला असावा. कारण या माकडाचे ज्ञान नेमके सैतानाच्या ज्ञानाइतकेच आहे. भूतकाळातील व वर्तमानकाळातील गोष्टी सांगण्यापुरतेच त्याचे ज्ञान असते. भविष्यकाळाचे दर्शन त्याला होत नाही. इतर आनुषंगिक कारणांच्या पूर्वीच्या परिणामावरून भविष्याचा अंदाज बांधण्यापुरते आणि निष्कर्ष काढण्यापुरते त्याचे ज्ञान असते. खरे अचूक भविष्य वर्तविण्याचा पवित्र अधिकार ईश्वराचा आहे. तो सर्वचक्षु असल्यामुळे मागील, चालू आणि आगामी अशा सर्व काळाचे दर्शन त्याला नेहमी होत असते. कोणता कालखंड केव्हा सुरू होतो आणि केव्हा समाप्त होतो, याचा विचार ईश्वर करीत नाही; त्याला सारे काळ समान. यावरून मला हे उघड दिसते की, हे माकड म्हणजे सैतानाचे मुख आहे. त्याच्या द्वारे तो विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देतो. म्हणून या बदमाश माकडाचा न्यायनिवाडा केला पाहिजे आणि सत्य काय आहे हे त्याच्या बरगड्यातून बाहेर खेचून काढले पाहिजे. कारण हे माकड किंवा त्याचा बोलविता धनी यांना ज्योतिष-शास्त्राचा ओनामा तरी येत असेल असे कोणी म्हणणार नाही. तसेच एखादी योजना आखण्याइतके गणिताचे ज्ञान या माकडाला असेल असे मला वाटत नाही. मात्र येथे मला हे कबूल केले पाहिजे की, निरक्षर स्त्रिया, वाटसरू आणि चांभार, अशा मूर्ख लोकांच्या अंगी बेतावाताचीच बुद्धी असूनही ग्रहावरून निश्चित गोष्टी सांगण्याचे ढोंग सध्या ते करतात. पत्ते जसे झटाझट पिसावे तितक्या सहज हे बेअकली लोक भराभर भविष्य सांगत सुटतात. त्यामुळे या उदात्त शास्त्राला कलंक लागतो. ते शास्त्र आपल्याला अवगत असल्याची बढाई ते मारतात. अशा एका आकडेमोड्याला

एका स्त्रीने प्रश्न विचारला, 'माझ्याजवळ असलेल्या कुत्रीला पिले होतील काय ? आणि किती ? आणि कोणत्या रंगाची ? ' त्या जादूगाराने घाईघाईने काही रेषा मारल्या आणि त्यावरून मोठ्या गांभीर्याने भविष्य सांगितले, 'तुमच्या चिमुकल्या कुत्रीला तीन पिले होतील, एक हिरवे, एक तांबडे, आणि एक संमिश्र रंगाचे. मात्र त्यासाठी तिने सोमवारी किंवा शनिवारी, दुपारी किंवा रात्री, अकरा व बारा वाजण्याचे दरम्यान, कुत्र्याशी तिचा समागम घडविला पाहिजे.' त्याच्या या विद्येचे फळ नेमके अपेक्षेप्रमाणे मिळाले. कारण काही दिवसांनी ती कुत्री समागमाचे अजीर्ण होऊन मेली. पण त्या ज्योतिषीबुवाचा लौकिक सर्व गावभर 'उत्तम भविष्यवेत्ता' म्हणून झाला. अशा बहुतेक लोकांचे यश असेच असते.'

सँको म्हणाला, "म्हणून मला मास्टर पीटरच्या माकडाला असा प्रश्न विचारावासा वाटतो की, मॉंटेसिनोज़च्या गुहेतील जो वृत्तांत आपण आम्हांस सांगितला, तो खरा आहे की नाही. महाराज, आपल्याविषयी मी आदर बाळगतो, पण आपण सांगितलेला तो वृत्तांत मी दंतकथा, शिळोप्याच्या गोष्टी, किंवा निदान स्वप्ने यापेक्षा अधिक खरा मानीत नाही." डॉन क्विक्झोट उत्तरले, "तू तुझ्या मर्जीप्रमाणे काहीही मान. तुझ्या इच्छेप्रमाणे मी वागेन, पण अशी गोष्ट करण्यास माझी बुद्धी काहीशी कचरते हे मी कबूल करतो."

असा त्याचा संवाद चालला असताना मास्टर पीटर तेथे आला, आणि डॉन क्विक्झोट यांना म्हणाला, "आता खेळ सुरू होत आहे. तो पाहण्यासाठी आपण यावे अशी माझी इच्छा आहे. तो खेळ महाराजांना आवडेल अशी मला खात्री वाटते." तेव्हा शिलेदारजी त्याला म्हणाले, "प्रथम त्या माकडाला एक प्रश्न मला विचारावयाचा आहे. मॉंटेसिनोजच्या गुहेत ज्या ज्या गोष्टी घडल्या, त्या खऱ्या होत्या की स्वप्ने होती, हे त्याने मला सांगावे. कारण सत्य व स्वप्न याचे थोडे थोडे अंश तेथील घटनांमध्ये होते, अशी मला शंका येते." मास्टर पीटरने तत्काळ आपले माकड आणले, आणि शिलेदार व त्याचा सेवक, यांच्या अगदी समोर त्याला ठेवून तो म्हणाला, "अरे, माकडा, हे पाहा, मॉंटेसिनोजेच्या गुहेत यांना ज्या गोष्टी दिसल्या, त्या खऱ्या होत्या की नाही, हे तू सांगावेस अशी या सन्मान्य शिलेदारजींची इच्छा आहे."

मग नेहमीची खूण होताच ते माकड मास्टर पीटरच्या डाव्या खांद्यावर उडी मारून बसले आणि त्याने त्याच्या कानात आपले उत्तर हळूच सांगितले. ते पीटरने दुभाष्याप्रमाणे प्रश्नकर्त्यास निवेदिले, "महाराज हे माकड म्हणते, त्यापैकी काही घटना खोट्या होत्या आणि काही खऱ्या होत्या. या प्रश्नासंबंधी आता ते एवढेच सांगू शकते. अदृष्ट सांगण्याचा गुण आता त्याच्या अंगातून निघून गेला आहे आणि पुढील शुक्रवारपर्यंत तो परत येणार नाही. म्हणून तुम्हाला आणखी काही माहिती पाहिजे असेल तर तुम्ही तोपर्यंत थांबले पाहिजे. नंतर तुम्ही हवे तितके प्रश्न विचारा. याची उत्तरे ते देईल." सँको म्हणाला, "अगदी बरोबर, मी आपल्याला हेच

सांगितले नव्हते काय ? मॅंटेसिनोजच्या गुहेतील ज्या गोष्टी आपण आम्हास सांगितल्या, त्यांत काही तथ्य नाही." शिलेदारजींनी उत्तर दिले, "काळाच्या ओघातच खऱ्या-खोट्याचा निवाडा होईल. पृथ्वीच्या गर्भात पुरलेल्या गोष्टीही काळ उजेडात आणतो. पण आता हे पुरे. आपण बाहुल्यांचा खेळ पाहू या. त्यात पाहण्यासारखे काही तरी असेल असा माझा तर्क आहे." मास्टर पीटर उद्‍गारला. "काही तरी ? महाराज, आपल्याला पाहण्यासारख्या हजारो गोष्टी आता दिसतील. महाराज, असा दुसरा खेळ करून दाखविण्याचे आव्हान मी साऱ्या जगाला देतो. पण मी आता काही बोलत नाही. 'दिसेल त्यावर विश्वास ठेवावा. सांगण्यावर नको' हेच खरे. आता आपण सुरुवात करू या. उशीर होत आहे आणि आपल्याला बरेच काही करावयाचे आहे, सांगावयाचे आहे आणि दाखवावयाचे आहे."

डॉन क्विक्झोट व सँको यांनी ते मान्य केले आणि ज्या खोलीत तो खेळ मांडलेला होता तिकडे ते गेले. तेथे पुष्कळ लहान लहान मेणबत्त्या चोहो बाजूंनी पेटलेल्या होत्या. त्यामुळे तो सारा खेळ झगझगीतपणे चमकत होता. मास्टर पीटर आतमध्ये आपल्या जागी जाऊन बसला. तेथून तो कळसूत्री बाहुल्या हालविणार होता. समोर एक मुलगा उभा होता आणि तो, बाहुल्या काय म्हणतात हे सांगणार होता. त्याच्या हातात एक पांढरी काठी होती. नाना पात्रें आत–बाहेर जात–येत होती. त्यांच्याकडे लक्ष वेधण्यासाठी तो मुलगा त्या काठीचा उपयोग करीत होता आणि खेळाचे रहस्य उलगडून दाखवीत होता. सारे प्रेक्षक आपापल्या जागी बसले. डॉन क्विक्झोट, सँको, पंडित व सेवक यांना इतरांपेक्षा मानाच्या जागा दिलेल्या होत्या. या खेळाचा निवेदक असलेल्या त्या मुलाने एक कथा सांगण्यास सुरुवात केली, पुढील प्रकरण वाचण्याची तसदी जे घेतील, त्यांना ती कथा कळून येईल.



## प्रकरण २६

# बाहुल्यांच्या खेळांचा सुखद वृत्तांत, तसेच इतरही खरोखर चांगल्या गोष्टी.

सारे टिरियन व ट्रोजन गप्प होते– म्हणजे सर्व प्रेक्षकांचे कान त्या प्रयोगाच्या निवेदकाच्या तोंडाकडे लागलेले होते. आरंभी यंत्रातील नगाऱ्यांचे आणि तुताऱ्याचे प्रचंड आवाज ऐकू आले– आणि नंतर तोफांचा धडधडाट! हा प्रास्ताविक भाग लवकरच संपल्यावर तो मुलगा आवाज चढवून म्हणाला, "सद्गृहस्थहो, रस्त्यावरील मुलेसुद्धा स्पेनचे जे पवाडे गातात आणि जे प्रत्येकाच्या तोंडी घोळत असतात, त्यांच्या आधारे आणि फ्रान्सच्या बखरींचे आधारे आम्ही आपल्याला खराखुरा इतिहास सादर करीत आहोत. आता सॅरागोस्सा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सॅनसुवेना या शहरात डॉन गेफेरॉन याने स्पेनमधील मूर लोकांची बंदिवान असलेली आपली बायको मेलिसँड्रा हिला बंधमुक्त कसे केले हे या इतिहासात दाखविले जाईल. बहाद्दरहो! आता आम्ही आपल्यापुढे प्रथम जी व्यक्ती उभी करणार आहो ती म्हणजे डॉन गेफेरोज्–पोवाड्यात सांगितल्याप्रमाणे खेळ खेळत असलेला :

‘ आता गेफेरोज सारा दिवसभर
अहो, अत्यंत धिक्कारार्ह गोष्ट की, पट खेळत राहतो
आणि दरबारी असता इतर पतीसारखाच
आपल्या सुंदर आणि एकनिष्ठ पत्नीला विसरतो ’

"सद्गृहस्थहो, नंतर तुम्ही त्या दुसऱ्या श्रेष्ठ व्यक्तीकडे लक्ष द्या. डोक्यावर मुगुट आणि हातात राजदंड धारण करणारी ती व्यक्ती आतून डोकावून पाहात आहे. सुंदर मेलीसँड्राचा तो विख्यात पिता आहे—त्याचे नाव बादशाहा शार्लमेन. आपल्या जावयाने जो आळस व उपेक्षा केली त्याबद्दल संत्रस्त होऊन त्याची कानउघाडणी करण्यासाठी तो येत आहे. तो त्याला किती आवेशाने आणि त्वेषाने बोलत आहे याकडे कृपा करून तुम्ही लक्ष द्या. त्याच्या टाळक्यावर आपल्या राजदंडाने पाच–सात जबरदस्त तडाखे द्यावेत असे त्याच्या मनात असावेसे दिसते-नव्हे, काही लेखकांच्या मताने तर, त्याने तसे तडाखे दिलेही– आणि चांगले खरपूस दिले. त्याने इतर अनेक शब्दांसह आपल्या जावयाला बजावले, ‘ तू आपल्या बायकोला बंधनातून मुक्त करीपर्यंत तुझी अब्रू रक्त-बंबाळ होऊन पडली आहे. याहून अधिक काही मी सांगत नाही. ’ डॉन गेफेरोज्

याच्याकडे पाठ वळवून बादशहा तेथून कसा जातो, हे तुम्ही नीट पाहा. डॉन गेफेरोज् संतापलेला आहे. तो इकडे तिकडे हिंडतो आणि रागाच्या भरात एका बाजूला टेबले फेकतो, तर दुसऱ्या बाजूला माणसे भिरकावून देतो. शस्त्रे आणण्यासाठी तो घाईघाईने सांगतो, आपला पुतण्या ओर्लॅण्डो याची तलवार उसनी घेतो. त्याच्या या बिकट मोहिमेवर मदतीस जाण्याची तयारी डुरिनडाना दाखवितो. पण संतप्त व पराक्रमी शिलेदार त्याला परवानगी देत नाही. तो म्हणतो, 'शत्रूंनी माझ्या बायकोला पृथ्वीच्या अगदी केंद्रस्थानी दडवून ठेवले असले, तरी मी तुझ्या मदतीशिवाय तिला बंधमुक्त करीन.' आपल्या मोहिमेला प्रारंभ करण्यासाठी तो आता आपल्या अंगावर चिलखत चढवीत आहे.

"सद्गृहस्थहो, आता तुम्ही त्या पलीकडच्या बुरुजावर नजर फेका. सध्या ज्याला अल्जाफेरिया म्हणतात त्या सॅरागोस्माच्या किल्ल्याचा तो एक बुरुज आहे असे समजा. तेथे मूर पद्धतीचा पोशाख केलेली एक महिला सज्जात उभी असलेली तुम्हाला दिसेल. तीच ती अद्वितीय मेलिसँड्रा. ती वारंवार फ्रान्सकडे दुःखपूर्ण दृष्टी टाकीत आहे–पॅरिसचे आणि आपल्या पतीचे चिंतन ती करीत आहे. आपल्या बंदिवासात तिला तोच काय तो विरंगुळा. पण प्रेक्षकहो, शांत राहा. मी विनवितो, शांत राहा. आता एक अगदी नवीन असा उत्पात येथे घडत आहे. तसा तुम्ही पूर्वी कधी ऐकलाही नसेल. आपल्या तोंडात बोट घालून गुपचूपपणे येणारा आणि मेलिसँड्राच्या पाठीमागे हळूच उभा राहणारा, तो मूर तुम्हाला दिसत नाही का? तो तिचा रासवट मुका कसा घेत घेत आहे ते ऐका. आणि त्याच वेळी ती कशी थुंकते व आपल्या पांढऱ्या अंगरख्याच्या बाहीने आपले तोंड कसे पुसते हेही पाहा. आपला हा जो उपमर्द झाला, त्याचा निषेध करण्यासाठी म्हणून ती पिसाटपणे आपले सुंदर केस कसे उपटीत आणि तोडीत आहे हे पाहा. तसेच तिकडे त्या उघड्या गॅलरीमध्ये एक गंभीर मुद्रेचा मूर उभा आहे हेही पाहा. त्याचे नाव मार्सिलिअस. सॅन्सुएनाचा तो राजा. त्याने त्या मूराचा अतिप्रसंग आपल्या डोळ्याने पाहिला होता. तो त्याचा अत्यंत प्रिय असा नातलग होता. तरी राजाने हुकूम सोडला की, 'ह्याला ताबडतोब पकडा आणि दोनशे फटके लगावा. नंतर त्याची शहरातून धिंड काढा आणि त्याच्या अपराधाची दवंडी द्या. त्याच्या पाठीमागे न्यायदंड ठेवा. त्याने जो अपराध केला, त्याला जितका वेळ लागला असेल, त्यापेक्षाही कमी वेळात ही शिक्षा अमलात आणा.' आपल्या लोकांप्रमाणे या मूर लोकांवर आरोप शाबीत करण्याची किंवा कायदेशीर खटला भरण्याची काहीच गरज नसते हे तुम्हाला माहीत असेलच."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे मुला, तू आपली गोष्ट सरळ सांगत जा. इकडच्या तिकडच्या गोष्टी सांगून चऱ्हाट वळू नकोस आणि आम्हाला येथे तिष्ठत ठेवू नकोस. कोणतीही गोष्ट सिद्ध करण्यासाठी काही एक कार्यपद्धती आणि कायदेशीर न्यायपद्धती असावयास पाहिजे, हे मी तुला सांगतो." खेळाच्या मागे बसलेल्या मालकाने म्हटले, "मुला, साहेब सांगताहेत तसे कर. आपल्या अकलेचे तारे तोडू नकोस. आपली गोष्ट

सरळ सांग. तिला वळणे-आडवळणे देऊ नकोस. नाही तर सारा खेळ बिघडेल. ” मुलगा म्हणाला, “ ठीक आहे महाराज, मी तसेच करतो. प्रेक्षकहो, आता घोड्यावर बसलेल्या त्या माणसाकडे पाहा. गॅस्कोन पद्धतीचा अंगरखा गुंडाळलेला तो माणूस म्हणजे खुद्द डॉन गेफेरोज आहे. त्याला त्याची बायको बुरुजावरून पाहात आहे. तिच्यावर हात टाकणाऱ्या मूरचा सूड आता उगवला गेला आहे. तिला आपला नवरा हा कोणी नवखा माणूस आहे असे वाटते आणि त्या दृष्टीने ती त्याच्याशी बोलते, असे पोवाड्यात सांगितले आहे.

‘ म्हणाली मेलिसँड्रा, जर कदाचित्
प्रवासीमहाराज, आपण फ्रान्सला गेलात
तर तेथे गेल्यावर दयेखातर चौकशी करा
माझ्या प्रियपती गेफेरोजची ’

“लांबलचक गोष्ट सांगून तुम्हांला कंटाळा आणण्याची माझी इच्छा नाही. म्हणून एवढेच सांगतो, त्याने तिला आपली ओळख करून दिली आणि त्यामुळे तिला मोठा आनंद वाटला, तो दिसत आहे. आपल्या प्रेमळ पतीकडे जाऊन घोड्यावर त्याच्या पाठीमागे बसण्यासाठी ती आतुर झाली आहे. पण हायरे दुर्दैवा ! त्या सज्जाच्या एका खिळ्यात तिच्या झग्याचे टोक अडकले आणि ती हवेत लोंबकळू लागली – असहायपणे लटकत आहे. तिला खाली येता येत नाही; पण देव किती दयाळू आहे पाहा. अत्यंत संकटाचे काळी तो साहाय्यास येतो ! आता डॉन गेफेरोज घोड्यावरून तिच्याजवळ गेला आणि तिचा किंमती झगा फाटेल की काय याची भीती न बाळगता त्याने तो घट्ट धरला व एका झटक्यासरशी तिला खाली आणले. मग तिला एकदम उचलून त्याने आपल्या घोड्यावर पिछाडीस तिला बसविले. ‘ घट्ट बैस आणि आपले हात माझ्या खांद्यावर टाक म्हणजे तू पडणार नाहीस. ’ असे त्याने तिला बजावले. तशा प्रकारे घोड्यावर बसण्याची मेलिसँड्राला संवय नव्हती.

“ पहा हो ! आता तो घोडा कसा खिंकाळत आहे आणि आपल्या शूर धन्याचे व सुंदर धनिणीचे ओझे वहाण्यात त्याला किती अभिमान वाटत आहे हे पाहा. ते दोघे आपल्या पाठी वळवून त्या शहराचा निरोप कसा घेत आहेत आणि पॅरिसकडे मजेने कसे दौडत चालले आहेत हे पाहा. खऱ्या प्रेमिकांचे हे अद्वितीय जोडपे आहे. जा, जा, शांततेने जा—स्वदेशात तुम्ही सुरक्षितपणे आणि सुखरूपपणे जाऊन पोहोचा. तुमच्या प्रवासात कोणताही अडथळा किंवा दुर्दैव न येवो, आपल्या मित्रामध्ये आणि नातलगामध्ये तुम्ही शांततेने आणि निवांतपणे, ग्रीक पंडित नेस्टरप्रमाणे, दीर्घकाळ राहा. ” पीटर म्हणाला, “ मुला, सरळ सांग. तुझ्या कल्पनेच्या भराऱ्या नकोत. कारण कृत्रिमता ही सैतानी असते. ”

मुलाने त्याला काहीच उत्तर दिले नाही. तो बोलत राहिला, “ प्रेक्षकहो, काही रिकामटेकड्या लोकांना प्रत्येक गोष्टीत नाक खुपसण्याची सवय असते. तशा काही

लोकांनी मेलिसँड्राला पळून जाताना पाहिले. लगेच मार्सिलिअसकडे ते धावत गेले, आणि त्यांनी त्याला वर्दी दिली. तेव्हा त्याने धोक्याची सूचना देण्याचा हुकूम तत्काळ दिला. मग त्या शहरात किती आरडाओरड आणि गोंधळ झाला असेल याची कल्पना करा. साऱ्या मशिदीतून घंटांचा जो घणघणाट झाला, त्यामुळे ते शहर हादरून गेले." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मुला, चुकलास तू. मूर लोकांमध्ये घंटा नसतात. ते फक्त ताशे वाजवितात–नाताळातील तुताऱ्यासारखी किंवा सनईसारखी वाद्ये ते वाजवितात. म्हणून सॅनसूएनामध्ये घंटा वाजल्या असे जे तू म्हणतोस, ते निवळ निरर्थक आहे. श्री. पीटर, समजले ना तुम्हाला ?" पीटर म्हणाला, "जाऊ द्या महाराज, तो घंटांचा आवाज राहू द्या ! बारीकसारीक गोष्टीबद्दल तुम्ही आम्हाला छेडू लागला, तर आम्ही तुम्हाला कधीच संतुष्ट करू शकणार नाही. इतके कठोर चिकित्सक बनू नका. यापेक्षा मोठमोठ्या चुका असलेले आणि मूर्खपणाने ओतप्रोत भरलेले हजारो खेळ यश आणि स्तुती मिळवून जात नाहीत काय ? चल, मुला चल, पुढे सांग. सूर्यप्रकाशात जितके धूलिकण असतील तितके अडथळे तुला आले, तरी तू त्यांची पर्वा करू नकोस. तू गोष्ट चालू ठेव म्हणजे मला पैसे मिळतील." डॉन क्विक्झोट उत्तरले, "चांगले सांगितले." मुलगा बोलू लागला, "प्रेक्षकमहाराज, आता पाहा, त्या शहरातून लखलखणाऱ्या घोड्यांचे केवढे प्रचंड पथक बाहेर पडत आहे आणि त्या ख्रिश्चनप्रेमी युगलाचा पाठलाग करीत आहे. तुताऱ्या, रणशिंगे, ताशे आणि ढोलगी या सर्वांचा किती भीषण आवाज आकाशात घुमत आहे. मला अशी भीती वाटते की, हे घोडेस्वार त्या प्रेमिकांना गाठतील आणि आपल्या घोड्याच्या शेपटांना त्यांना बांधून अत्यंत रानटीपणाने त्या बिचाऱ्यांना फरफटत आणतील. खरोखर, तो अत्यंत दुःखाचा प्रसंग होईल."

मूर लोकांची संख्या पाहून आणि धोक्याचे असे आवाज ऐकून डॉन क्विक्झोटना वाटले, त्या पळून जाणाऱ्या प्रेमिकांना मदत करण्याची हीच वेळ आहे. म्हणून उभे राहून ते मोठ्याने म्हणाले, "डॉन गेफेरोज् यासारख्या विख्यात शिलेदारावर आणि धैर्यशाली प्रेमिकावर उघड उघड अन्याय होत असलेला मी सहन करणार नाही. मी जिवंत आहे तोपर्यंत मी तसे कोणाला म्हणू देणार नाही. म्हणून अरे दुष्ट बदमाशांनो, तुम्ही आपला अन्याय्य पाठलाग सोडून द्या आणि तेथेच थांबा, नाही तर माझ्या भयंकर क्रोधाला तोंड देण्यास सिद्ध व्हा." आपली ही धमकी खरी करून दाखविण्या-साठी त्यांनी आपली समशेर उपसली आणि एका उडीसरशी ते त्या रंगमंचावर जाऊन उभे ठाकले. त्या मूर बाहुल्यावर त्यानी अत्यंत त्वेषाने हल्ला केला आणि विलक्षण भीषण रीतीने त्या बाहुल्यांचे तुकडे तुकडे केले. काहींना त्यांनी वर फेकले तर काहींची मुंडकी उडविली. एका बाहुलीला त्यानी लुळेपांगळे केले, तर दुसरीचे राईराईएवढे तुकडे केले. आपल्या या निर्दय हल्ल्यात त्यांनी एक जबरदस्त तडाखा मोठ्या त्वेषाने दिला. त्यावेळी सुदैवाने पीटरने उडी मारली आणि तो जमिनीवर बसला म्हणून बरे, नाही तर कोणी सफरचंद जितके सहजपणे कापतो, तसे त्यांनी त्याचे डोके कापले असते.

तो थोडक्यात बचावला आणि ओरडून म्हणाला, "थांबा, थांबा, महाराज, दया करा. आपण काय करीत आहा, आपण ज्याचे असे तुकडे तुकडे करीत आहा, ते खरोखरच मूर लोक नाहीत, तर पुठ्ठयाच्या बनविलेल्या निरुपद्रवी बाहुल्या आहेत. अहो, तुम्ही काय करता याचा विचार करा. तुम्ही माझे कायमचे वाटोळे करीत आहा. अरेरे! मी कशाला जन्माला आलो? तुम्ही माझी अगदी धूळधाण उडविली."

पण त्याच्या शब्दांकडे लक्ष न देता डॉन क्विक्झोट यांनी जोरजोराने ठोसे देण्यास सुरुवात केली आणि आपले त्वेषाचे हल्ले दुप्पट केले. क्षणा दोन क्षणांत त्यांनी साऱ्या दोऱ्या आणि तारा कापून काढल्या, बाहुल्यांची मोडतोड केली आणि साऱ्या खेळाची नासाडी करून तो उद्ध्वस्त केला. राजे मार्सेलीअस यांची स्थिती शोचनीय झाली. बादशहा शार्लमेनचे मस्तक व मुगुट यांचे दोन तुकडे झाले. सारा श्रोतृसमाज दुःखी व भयभीत झाला. माकडाने घराच्या माथ्यावर उडी मारली. पंडिताची मती भीतीने गुंग झाली. शिपाईशागीर्द अत्यंत अस्वस्थ झाला आणि सँकोची तर फारच गाळण उडाली. हे सारे वादळ शमल्यावर त्याने शपथेवर सांगितले की, माझा धनी इतका रागावलेला मी कधीच पाहिला नाही.

बाहुल्यांचा पुरा धुव्वा उडविल्यानंतर डॉन क्विक्झोट यांचा क्रोध शांत होऊ लागला. ते अधिक शांत मुद्रा धारण करून तेथील मंडळीकडे वळून म्हणाले, "शिलेदारीला तुच्छ लेखणाऱ्या भोळसट लोकांना आता तरी आपली चूक कळून येईल, अशी मला आशा आहे. शिलेदारीचा व्यवसाय किती हितकारक आहे याचे अशंकनीय पुरावे आता त्यांना पाहावयास मिळाले असतील. बिचारा डॉन गेफेरोज आणि सुंदर मेलिसँड्रा यांची यावेळी, मी जर तेथे नसतो आणि त्यांच्या संरक्षणासाठी उभा राहिलो नसतो तर, किती शोचनीय अवस्था झाली असती! त्या पाखंडयांनी त्यांना पकडले असते आणि रानटीपणाने वागविले असते, याविषयी मला काडीमात्र शंका नाही. आता सारे ठीक झाले आहे. म्हणूत मी म्हणतो, 'शिलेदारी चिरायु होवो!'– जगातील कोणत्याही प्राणीमात्रापेक्षा ती अधिक चिरायु होवो."

श्री. पीटर दुःखी स्वराने म्हणाला, "होय, होय, शिलेदारी माझ्यासाठी तरी चिरायु होवो. तसे झाले म्हणजे मला मरण येईल, नाही तर आता इतक्या दुःखात मी जिवंत का राहावे? 'काल मी स्पेनमधील एक राजा होतो, आज जिला मी माझी म्हणेन अशी इंचभरही जमीन माझ्याजवळ नाही.' असे राजा रोड्रिगो म्हणत असे. तसेच मीही म्हणतो, अहो, अर्ध्या तासापूर्वी– नव्हे, एका क्षणापूर्वी– माझ्या हुकुमावर राजे-महाराजे नाचत होते. माझ्याजवळ पुष्कळ घोडे होते आणि सुंदर सुंदर वस्तूंनी भर-लेल्या पेट्या नि पिशव्या होत्या. पण आज मी एक गरीब आणि दुःखी असा माणूस झालो आहे, हे आता तुम्ही पाहात आहाच. माझी अगदी धूळधाण झाली आहे– मी भुईसपाट झालो आहे– थोडक्यात म्हणजे पुरापुरा भिकारी बनलो आहे. आणि सर्वांत वाईट गोष्ट ही की, मी माझे माकड गमावून बसलो आहे. ते पुनः पकडीपर्यंत मला घाम

गाळावा लागेल हे खचित. हे शिलेदारमहाराज अनाथांचे वाली आहेत, अन्याय निवारणारे आहेत आणि इतर सत्कृत्ये करणारे आहेत, असे म्हणतात, पण त्यांच्या बेहोष संतापामुळे मी मात्र शोचनीय अवस्थेस पोहोचलो आहे. त्यांच्या एकाही गुणाचा मला लाभ झाला नाही, त्यासाठी मी परमेश्वराचे आभार मानतो ! यांना मी 'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' म्हणून संबोधतो. कारण त्यांनी मला आणि माझ्याजवळच्या साऱ्या वस्तूंना दुःखाच्या खड्डयात लोटले आहे."

त्या कठपुतळीवाल्याचा विलाप ऐकून सँकोला त्याची दया आली आणि तो म्हणाला, "अहो श्री. पीटर, असा आक्रोश करू नका. तो ऐकून माझे अंतःकरण फुटून जात आहे. अरे मर्दा, खचून जाऊ नकोस. माझा धनी हा भला ख्रिश्चन आहे. आपल्यामुळे कोणा गरीब माणसाचे नुकसान तो होऊ देणार नाही. आपल्या हातून तुझ्यावर अन्याय झाला आहे, असे जेव्हा त्याला कळेल, तेव्हा तो नुकसानीची पै न् पै भरून देईल असे मी खात्रीने सांगतो." श्री. पीटर म्हणाला, "खरोखर, या महाराजांनी माझ्या ज्या बाहुल्यांची नासाडी केली आहे, त्या दुरुस्त करण्यासाठी त्यांनी मला पैसे दिले तर मी अधिक काही मागणार नाही. त्यांनी तसे केले तर, त्यांनी आपल्या हृदयाचा चांगुलपणा प्रगट केला असे होईल. कारण जो आपल्या शेजाऱ्याचे नुकसान करतो पण त्याची भरपाई करत नाही, त्याचा उद्धार होण्याची आशा मुळीच नसते हे खचित."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे मला मान्य आहे. पण सज्जन पीटरा, मी तुमचे थोडेही नुकसान कसे केले आहे, याची मला जाणीव नाही." श्री. पीटर ओरडला, "काय महाराज, आपण माझे काहीच नुकसान केले नाही ? या थंडगार जमिनीवर हे जे अभागी अवशेष पडलेले आहेत, ते तुमचा सूड उगविण्यासाठी का ओरडत आहेत ? तुमच्या शक्तिमान शस्त्राच्या अजिंक्य सामर्थ्यामुळेच ते उद्ध्वस्त होऊन तेथे अस्ताव्यस्त पडलेले नाहीत काय ? आणि हे अवशेष म्हणजे, महाराज, माझे अवयवच नव्हेत काय ? आणि त्यांच्याच आधारावर मी माझे पोट भरीत नव्हतो काय ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक, ठीक. यापूर्वी मी एक सिद्धांत मानीत होतो, त्याची आता मला पुरे-पूर खात्री पटली. तो सिद्धांत हा की, मला दररोज छळणारे ते दुष्ट मांत्रिक माझी फसवणूक करीत आहेत. ते खरोखर जसे असतात, तसेच मला प्रथम दिसतात आणि म्हणून मी संकटपूर्ण साहसे करण्यास सरसावतो आणि नंतर ते आपल्या इच्छेप्रमाणे साऱ्या वस्तूंचा चेहरामोहरा एकदम बदलून मला फसवतात. सद्गृहस्थहो, माझे भाषण ऐकणाऱ्या तुम्हा सर्वांना मी खरोखर शपथेवर सांगतो की, येथे जो काही खेळ करण्यात आला, तो मला वस्तुतः खराखुरा वाटला. मला मेलिसँड्रा ही मेलिसँड्रा वाटली, डॉन गेफेरोज हा डॉन गेफेरोज वाटला, मार्सिलिअस म्हणजे मार्सिलिअस आणि चार्लेमॅग्ने हा मला खराखुरा चार्लेमॅग्ने वाटला. असे झाल्यामुळे मला माझा क्रोध आवरेना. आणि त्रस्त माणसांची बाजू घेणे, हे तर माझ्या शिलेदारीच्या व्यवसायातील कर्तव्यच. त्यामुळे

मी तसे वागलो. माझ्या शुभ संकल्पाच्या अगदी विरुद्ध माझे वर्तन झाल्याचे आता सिद्ध झाले आहे; पण त्याचा दोष मला देऊ नका–मला छळणाऱ्या माझ्या शत्रूंना द्या. तरीही या दुर्दैवी घटनेबद्दल मला दुःख वाटते. म्हणून मी नुकसान-भरपाईची रक्कम देईन. ज्या मूर्तीची नासधूस झाली, तिची भरपाई करण्यासाठी आपल्याला किती पैसे मिळावेत हे श्री. पीटर यांनी सांगावे; म्हणजे मी तावडतोब कायदेशीर नाण्यांनी ती रक्कम देईन. ''

श्री. पीटर हांजीहांजी करीत म्हणाला, '' महाराजांवर ईश्वराची कृपा असो, साऱ्या दुःखी भटक्या लोकांचा खात्रीचा आधार आणि वाली असणारे ला मांचा येथील पराक्रमी डॉन क्विक्झोट यांच्या अलौकिक ख्रिस्ती धर्मभावनेपासून याहून मी कमी अपेक्षा करीत नाही. आता खानावळवाले आणि थोर सँको यांनी आपण व मी यामध्ये मध्यस्थाचे आणि मूल्यमापकाचे काम करावे अशी मी विनंती करतो. त्यांचा निवाडा मी मान्य करीन. '' दोघांनी हे कबूल केले. जमिनीवर पडलेली, सॅरागोस्साच्या राजाची–मार्सेलिअर्सची–मूर्ती ताबडतोब श्री. पीटर यांनी उचलली. त्या मूर्तीचे डोके उडालेले होते. तिच्याकडे बोट दाखवून तो म्हणाला, '' सभ्यगृहस्थहो, या राजाला त्याचे पूर्वीचे वैभव पुनः मिळवून देणे अशक्य आहे हे तुम्ही लक्षात घ्या. तुमच्या सद्भावाला शरण जाऊन मी असे म्हणतो की, या राजाच्या विनाशामुळे झालेली हानी भरून काढण्यासाठी आणि त्याच्या जागी दुसरा राजा आणण्यासाठी सत्तावीस पेन्स ही थोडीफार नुकसान-भरपाई होईल असे मला वाटते. '' डॉन क्विक्झोट म्हणाले, '' पुढे बोल. '' श्री. पीटर बादशहा चार्लेमॅग्नेची बाहुली उचलून म्हणाला,'' हिचे दोन तुकडे झाले आहेत. त्यासाठी एकतीस पेन्स हाफ्पेनी मिळणे म्हणजे भरपूर मोबदला आहे.'' सँको म्हणाला, '' फारसा भरपूर नव्हे. '' खानावळवाला म्हणाला, ''खरेच, ती रक्कम वाजवीच होईल, पण आपण ठोक आकड्यात बोलू या. या बिचाऱ्याला अर्धा क्राऊन मिळावा. '' डॉन क्विक्झोट म्हणाले,'' छेः, त्याला त्याची पूर्ण किंमत मिळाली पाहिजे. अशा क्षुल्लक गोष्टीत आपण घासाघीस करता कामा नये, म्हणून श्री. पीटर घाई करा, रात्रीच्या जेवणाची वेळ होत आली. आणि मी अन्नावर यथेच्छ हात मारीन, असे मला नक्की वाटते. ''

श्री. पीटर म्हणाला, '' ही सुंदर मेलिसँड्रा ! हिचे नाक उडाले आहे आणि एका डोळ्याने ती आंधळी झाली आहे. या बाहुलीची किंमत मी वाजवी सांगतो. मला चौदा पेन्स् द्या. मी माझ्या भावापासूनसुद्धा कमी किंमत घेणार नाही. '' डॉन क्विक्झोट म्हणाले, '' छेः ! असे असणार नाही. यावेळपर्यंत मेलिसँड्रा आपल्या पतीजवळ, निदान फ्रान्सच्या हद्दीवर, असेल. कारण त्या दोघांना ज्या घोड्याने वाहून नेले, तो दौडत नव्हता, तर उडत होता असे मला दिसले. पण तुम्ही मला आता नाक नसलेली मेलिसँड्रा दाखविता. माझी बालंबाल खात्री आहे की, ती आता फ्रान्समध्ये सुख-शय्येवर आपल्या पतीच्या बाहूंमध्ये विसावत आहे. मित्रा, चल आटप. ईश्वर सर्वांचे भले

करो. आपण चोख व्यवहार करू या, बोल पुढे. "

शिलेदारजी आपले जुनेच तुणतुणे वाजवीत आहेत असे पाहून श्री. पीटर याला भीती वाटली की, हे येथून निसटून जातील. म्हणून आपण थोडा विचार केला आहे, असे दाखवून तो म्हणाला, "महाराज, मी आपली करुणा भाकतो. माझी चूक झाली. खरोखर ही मेलिसँड्रा असू शकत नाही – तिची सेवा करणारी एक दासी असेल. तिला पाच पेन्स् पुरेत असे मला वाटते. " अशा प्रकारे तो मृत किंवा बायाळ व्यक्तींच्या किंमती सांगत सुटला. दोन्ही पक्षांना संतोष होईल, इतक्या प्रमाणात मध्यस्थांनी त्या किंमती कमी केल्या. वट्ट रक्कम चाळीस रील झाली. ती सँकोने त्याला तत्काळ दिली. आपले माकड पकडण्याच्या खटपटीबद्दल श्री. पीटर याने आणखी दोन रील मागितले. डॉन क्विक्झोट म्हणाले, "ते त्याला दे. माकड पकडण्यासाठी माकड सोड. डॉन गेफेरोज आणि मेलिसँड्रा हे दोघे फ्रान्समध्ये आपल्या मित्रांच्या मेळाव्यात सुखरूपपणे जाऊन पोहोचले अशी माझी खात्री जो कोणी पटवून देईल, त्याला आणखी दोनशे रील मी देईन. " श्री. पीटर म्हणाला, "माझ्या माकडाशिवाय ही बातमी नक्की कोणीच सांगू शकणार नाही. प्रत्यक्ष सैतानही त्याला पकडू शकणार नाही. भुकेमुळे किंवा माझ्या-वरील प्रेमामुळे आज रात्रीपर्यंत ते माझ्याकडे येईल. पण उद्याचे उद्या. तो नवा दिवस असेल. त्याच्या प्रकाशात आपण काय करावयाचे ते पाहू. "

सारा गोंधळ शांत झाल्यानंतर ते सर्वजण रात्रीच्या जेवणासाठी प्रेमाने निघाले. त्या सर्वांचा पाहुणचार डॉन क्विक्झोट यांनी केला. कारण ते मूर्तिमंत औदार्य होते. दुसरा दिवस उजाडण्यापूर्वी भाले – परशू घेतलेला माणूस खानावळीतून निघून गेला, थोड्या वेळाने पंडित व शिपाईशागीर्द शिलेदारजींचा निरोप घेण्यास आले. त्यांपैकी पहिला घरी जाणार होता आणि दुसरा आपला प्रवास पुढे चालू ठेवणार होता. त्याच्या खर्चासाठी डॉन क्विक्झोट यांनी बारा रील दिले. आता शिलेदारजींचे आपल्याकडे काही काम नाही, असे जाणून मास्टर पीटर याने बाहुल्यांच्या खेळातील भग्न वस्तू गोळा केल्या आणि आपले माकड पुन्हा मिळविले. आपल्या नशिबाचा शोध घेण्यासाठी तो सूर्योदयापूर्वी चालता झाला. खानावळवाल्याला डॉन क्विक्झोटचा स्वभाव पुरा माहीत नव्हता. मूर्खपणाइतकाच त्याचा उदारपणा पाहून तो चकित झाला. शेवटी, सँकोने आपल्या धन्याच्या हुकुमाप्रमाणे खानावळवाल्याला अत्यंत प्रामाणिकपणे पैसे दिले. आठ वाजण्यापूर्वी ते दोघे स्वार होऊन खानावळीतून बाहेर पडले आणि आपला प्रवास त्यांनी पुढे चालविला. येथेच आपण त्यांना सोडू या. या विख्यात इतिहासाचे योग्य आकलन होण्यासाठी अवश्य असणाऱ्या इतर गोष्टी निवेदन करण्याची संधी आता आपल्याला मिळेल.

□ □

प्रकरण २७

# मास्टर पीटर व त्याचे माकड कोण होते याचा उलगडा, गाढव–ओरडयाच्या साहसी प्रयत्नात आपल्याला जितके यश मिळेल, अशी डॉन क्विक्झोट यांना आशा व अपेक्षा होती, ते न मिळाल्याची कथा.

[ या विख्यात इतिहासाचे लेखक सिड् हॅमेट या प्रकरणाच्या आरंभी असे ठाम विधान करतात की, " खऱ्या कॅथॉलिक माणसाप्रमाणे मी शपथेवर सांगतो." या विधानाचे स्पष्टीकरण भाषांतरकार पुढीलप्रमाणे सोदाहरण करतो–हा इतिहासकार मुसलमान मूर असला, तरी खऱ्या कॅथॉलिकाप्रमाणे तो शपथेवर जे विधान करीत आहे, ते खरा कॅथॉलिक बोलत आहे, असे समजूनच आपण स्वीकारले पाहिजे. जेव्हा तो एखादी गोष्ट शपथेवर सांगतो किंवा करतो, तेव्हा तो ख्रिश्चनाप्रमाणे निःपक्षपातीपणे निवेदन करीत असतो. डॉन क्विक्झोट यांच्याबद्दल लिहिताना–विशेषतः मास्टर पीटर या नावाचा माणूस कोण होता आणि त्याचे भविष्यवादी माकड कोण होते, याचा वृत्तांत सांगताना-इतिहासकार जर शपथेवर सांगत असेल , तर तो आपण सत्य मानला पाहिजे. माकडाच्या उत्तरांनी किती गोंधळ माजविला आणि सर्व देशभर आश्चर्याची केवढी लाट उसळली हेही तो सांगत आहे. आणि तो इतिहासकार म्हणतो, " या इतिहासाचा पूर्वीचा भाग ज्याने वाचला असेल, त्याला सीएरा मोरेना येथे इतर पुष्कळ जहाजांवरील गुलामांबरोबर जिनेस डी पॅसामॉन्टे यालाही डॉन क्विक्झोट यांनी बंध-मुक्त केल्याचे आठवेल. शिलेदाराच्या या सेवा–कार्याबद्दल त्यांची भरपूर स्तुति करण्यात आली, पण त्या कृतघ्न बदमाशांच्या टोळीने त्यांना ज्या तऱ्हेने वागविले ते त्यांच्या बंधमुक्ततेला मुळीच शोभेसे नव्हते. सँकोचे गाढव चोरणारा माणूस म्हणजे हाच जिनेस डी पॅसामॉन्टे-किंवा डॉन क्विक्झोट म्हणत त्याप्रमाणे जिनेसिल्लो डी पॅरापिल्ला. सँकोचे गाढव त्याने कोणत्या वेळी व कोणत्या पद्धतीने चोरले हे या इतिहासाच्या पूर्वार्धात नमूद केलेले नाही. मुद्रकाच्या हलगर्जीपणामुळे हे घडले. पण काही लोकांना वाटते, लेखकाच्या अनवधानाने ते घडले. पण ही गोष्ट संशयातीत आहे की, सँको उताणा झोपला असताना जिनेसने ते चोरले. ॲलब्रॅकाच्या वेढ्याचे वेळी सॅक्रिपॅन्टेचा घोडा त्याच्या मांडीखालून ब्रूनेलो याने ज्या युक्तीने व हिकमतीने पळवून नेला, त्याच रीतीने

सँकोचे गाढव जिनेसने चोरले. पण सँकोला आपल्या गाढवाचा ताबा पुन्हा मिळाला, हे आम्ही आपल्याला पूर्वीच सांगितले आहे.

कायद्याच्या दृष्टीने गुन्हेगार म्हणून आपला कसून तपास होत आहे, ही भीती जिनेसला वाटत असे. त्याने आतापर्यंत इतकी मोठमोठी व असंख्य दुष्कृत्ये पुनः-पुनः केली होती की, त्यांचा त्याने स्वतः एक मोठा ग्रंथ लिहिला होता. त्या दुष्ट कृत्याबद्दल त्याला न्यायमंदिरात नेण्यासाठी सरकारचा तपास चालू होता. तो चुकविण्या-साठी अरॅगॉनच्या राज्यात जाणे त्याला योग्य वाटले, म्हणून त्याने आपल्या डाव्या डोळ्यावर एक पट्टी बांधून नव्या सोंगाने बाहुल्यांचा खेळ बनविण्याचा आणि तो घेऊन देशभर भटकण्याचा निश्चय केला. हातचलाखीने जादूचे खेळ करण्यासाठी त्याच्याजवळ कोणी माणूस नव्हता हे तुम्ही लक्षात घेतले पाहिजे. पुढे असे घडले की, तो आपल्या वाटेने चालला असताना बार्बेरीहून आलेल्या काही खिश्चन गुलामांच्या संगतीत तो आला. तेव्हा त्याने हे माकड त्यांच्यापासून विकत घेतले. काही खूण केली की माकडाने आपल्या खांद्यावर उडी मारावी आणि जणू काही आपल्या कानात कुजबुजत आहो असा हावभाव त्याने करावा, असे जिनेसने माकडाला शिकविले. माकडाला एवढे शिक्षण दिल्यानंतर तो शहराच्या आसपास हिंडत राहिला आणि कोणत्या माणसाला कोणता अपघात पूर्वी झालेला आहे याची माहिती त्याने मिळविली. त्याची स्मरणशक्ती अत्यंत तल्लख होती. शहरात गेल्यावर त्याने पहिली गोष्ट केली, ती म्हणजे आपला खेळ तेथील लोकांना दाखविला. सर्वसामान्य लोकांना माहीत असलेली आणि ग्रामीण माणसांना आवडणारी एखादी कथा तो त्या खेळात उभी करी–दुसऱ्या वेळी दुसरी कथा. त्याने दुसरी गोष्ट केली ती ही की, आपल्या माकडाच्या अलौकिक गुणांची तो तारीफ करू लागला आणि लोकांना सांगू लागला; "या प्राण्याला भूतकाळातील व वर्तमान काळातील घटना सांगण्याची देणगी आहे, पण भावी काळातील गोष्टी सांगण्याचे शिक्षण त्याला मुळीच मिळालेले नाही." प्रत्येक उत्तरासाठी तो बारा पेन्स मागे. गिऱ्हाइकांची नाडी ओळखून तो हा दर पुष्कळ वेळा कमी करी. काही काही वेळा, आपल्याला ज्यांची थोडीफार माहिती कळलेली आहे, अशा लोकांच्या घरी तो जाई. पैसे द्यावे लागू नयेत म्हणून त्यांनी त्या माकडाला काही प्रश्न विचारले नाहीत, तरी, तो आपल्या माकडाला खुणा करी आणि म्हणे, "मला या माकडाने अमुक अमुक गोष्ट सांगितलेली आहे." अर्थात्, त्याने ती गोष्ट आधीच माहीत करून घेतलेली असे. अशा प्रकारे सर्वसामान्य लोकांमध्ये त्याला मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली. त्यामुळे त्याच्यामागोमाग लोकांची मोठी गर्दी जमू लागली. काही वेळा एखाद्या माणसाबद्दल त्याला काहीच माहिती नसे. अशा वेळी तो आपल्या ज्ञानाची उणीव आपल्या सूक्ष्म चातुर्याने भरून काढी आणि त्या प्रसंगातून शिताफीने बाहेर पडे. माकडाला भविष्य-कथनाची ही देणगी कशी मिळाली हे सांगण्यास त्याला भाग पाडण्याइतकी चौकस-बुद्धी किंवा आग्रही-वृत्ती कोणी दाखवीत नसे. म्हणून तो प्रत्येकाच्या बुद्धीवर माकडाचे

भविष्य लादीत असे आणि आपल्या इच्छेप्रमाणे पैसे कमावीत असे.

त्या खानावळीत येताच त्याला कळले की, डॉन क्विक्झोट, सँको आणि इतर मंडळी येथे आहेत. या माहितीबद्दल त्याला जबर किंमत द्यावी लागली असती. राजे मॉर्सिलिअस यांचे मुंडके उडविताना आणि त्याच्या सर्व मूर घोड्यांना उधळून लावताना शिलेदारजींची समशेर किंचित खाली आली असती तर जिनेस प्राणास मुकला असता. मागील प्रकरणात वाचकांनी शिलेदारजींच्या या पराक्रमाचे वर्णन वाचलेच आहे. पीटर आणि त्याचे माकड यांच्या बाबतीत एवढे पुरे.

आता आपण ला मांचाच्या वीर–पुरुषाला गाठू या. खानावळीतून बाहेर पडल्यावर त्यांनी असे ठरविले की, सॅरागोस्साला जाण्यापूर्वी 'आपण एब्रो नदीचे आणि तिच्या सभोवतालच्या प्रदेशाचे दर्शन घ्यावे. बराच काळ ते संकटात सापडले नव्हते. पण त्या शहरातील द्वंद्व–युद्धामध्ये आणि सामन्यामध्ये लौकरच संकटे त्यांना भेटणार होती. त्यांच्या किंवा वाचकांच्या नजरेस याव्यात अशा काहीच गोष्टी दोन दिवस घडल्या नाहीत. पण प्रवासाचे तिसरे दिवशी एका टेकडीवर ते चढत असताना त्यांना नगारे, तुताऱ्या आणि तोफा यांचा मोठा आवाज ऐकू आला.

प्रथम त्यांना वाटले, सैनिकांची एखादी पलटण त्या बाजूने कूच करीत चालली असावी. ती जाताना आपण पाहावी म्हणून टेकडीच्या माथ्यावर जाण्यासाठी त्यांनी रोझिनांटला टाच मारून टेकडीच्या माथ्यावर नेले, तेव्हा त्यांना दिसले की, दोनशेहून अधिक माणसे खाली आहेत. आणि नाना तऱ्हेची हत्यारे त्यांनी धारण केलेली आहेत, असे त्यांना वाटले. भाले, परशू, धनुष्ये, बंदुका आणि पुष्कळ ढाली त्यांच्या हातात असलेल्या त्यांना दिसल्या, तेव्हा ते दरीत खाली उतरले आणि त्या पलटणीजवळ गेले. त्यांची निशाणे, त्या निशाणांचे रंग आणि त्या निशाणावरील चिन्हे नीट ओळखण्यासाठी ते अगदी जवळ गेले. त्यातही पांढऱ्या सॅटिनच्या निशाणावरील आकृती ते बारकाईने न्याहाळू लागले. ती एका लहानशा गाढवाची संपूर्ण आकृती होती. सार्डिनियामधील गाढवाच्या शिंगरासारखी ती आकृती होती. त्या शिंगराने आपले डोके वर उचलले होते, मान पुढे केली होती, आणि ओरडू पाहणाऱ्या गाढवाप्रमाणे आपली जीभ बाहेर काढली होती. त्याच्याभोवती त्या निशाणावर सुंदर अक्षरांनी पुढील लेख लिहिलेला होता :—

शून्यापेक्षा कारण अधिक होते ते—
ज्यामुळे एक आणि दुसरा बडा बेलिफ
दोघे गाढवासारखे ओरडले.

या ध्येय–वाक्यावरून डॉन क्विक्झोट यांनी असा तर्क केला की, हे सर्व लोक त्या गाढव–ओरडया गांवाचे नागरिक असावेत. आपण जे काही पाहिले, ते त्यांनी सँकोला सांगितले आणि म्हटले, "गाढवाचा आवाज करणाऱ्या दोन नगरपित्यांची गोष्ट ज्या माणसाने आपल्याला सांगितली त्याने चूक केली. कारण या निशाणावरील कवितेप्रमाणे

ती ओरडणारी माणसे बेलिफ होती–दोन नगरपिते नव्हते. " सँको म्हणाला, " तुम्ही त्यांना काय म्हणता, याला काडीचेही महत्त्व नाही. कारण जे नगर–पिते ओरडले, तेच काही काळाने या शहरातील बेलिफ बनले असतील. म्हणून त्यांना दोन्ही पदव्या मिळाल्या असतील. पण आपल्याला सांगितल्याप्रमाणे ती ओरडणारी माणसे नगर–पिते असली काय किंवा बेलिफ असली काय; त्याचे तुम्हाला किंवा मला किंवा त्या गोष्टीला काय महत्त्व ? नगर–पित्याप्रमाणे बेलिफ काय भुंकू शकत नाहीत ? "

सारांश, तो मालक आणि सेवक यांना स्वच्छ कळून चुकले की, गर्दभध्वनि करण्याबद्दल ज्यांची टर उडविण्यात आली, तीच ही हत्यारबंद माणसे होत. दुसऱ्या शहरातील लोकांशी लढण्यासाठी ती गोळा झालेली आहेत. भल्या शेजाऱ्यांनी वागू नये असे वागून त्यांनी त्यांना शिव्या दिल्या असतील. त्यावर डॉन क्विक्झोट या लोकांकडे निघाले. ते पाहून सँकोला मोठे दुःख झाले. अशा तऱ्हेचे साहस करण्याची आवड त्याला मुळीच नव्हती. तो जमाव शिलेदारजींच्याभोवती तत्काळ जमला. त्यांना वाटले, आपल्या मदतीस आलेला हा कोणी वीर–पुरुष असावा. पण डॉन क्विक्झोट आपल्या शिरस्त्राणाचे टोक वर उचलून मोठ्या रुबाबात चालत त्या निशाणापाशी गेले, तेव्हा त्या सैन्याचे सर्व मुख्य नेते त्यांच्याभोवती जमले आणि त्यांच्या शरीराचे निरीक्षण करू लागले. इतरांपेक्षा त्यांचा विलक्षण वेश पाहून ते चकित झाले होते. ते आपल्याकडे इतके उत्सुकतेने पाहात आहेत आणि त्यांच्यापैकी कोणीही एक शब्द किंवा एक प्रश्न विचारीत नाही, हे पाहून डॉन क्विक्झोट यांनी त्यांचे मौन पाहून आपले मौन मोडण्याची संधी साधली. आपला आवाज चढवून ते म्हणाले, " सभ्य गृहस्थहो, आता मी तुमच्यापुढे जे भाषण करणार आहे ते तुम्हाला बेचव किंवा कंटाळवाणे वाटले नाही, तर त्यात तुम्ही अडथळा आणू नये, अशी मी तुम्हाला अत्यंत प्रेमभावाने प्रार्थना करतो. दुर्दैवाने माझे भाषण तसे झाले तर, तुम्ही मला फक्त इशारा द्या म्हणजे मी माझे ओठ मोहोरबंद करीन आणि माझ्या तोंडाला कुलूप घालीन. "

ते सारेजण ओरडून म्हणाले, " आपण आपल्या इच्छेस येईल ते बोला, आम्ही आपले भाषण अंतःकरणापासून ऐकू. " असा परवाना मिळाल्यावर डॉन क्विक्झोट यांनी आपले भाषण पुढे चालू केले. ते म्हणाले, " सद्गृहस्थहो, मी एक शिलेदार आहे. शस्त्रे चालविणे हा माझा अभ्यास आहे. जे कोणी संकटग्रस्त असतील, त्यांना मदत करणे आणि ज्यांना उपकाराची गरज असेल, त्यांच्यावर उपकार करणे हा माझा व्यवसाय आहे. तुमच्या अस्वस्थतेचे कारण मला अपरिचित नाही. आपल्या उर्मट शेजाऱ्याचा सूड उगविण्यासाठी तुम्ही शस्त्र का उचलले आहे हे मला माहीत आहे. तुम्ही सर्वजण येथे एकत्र का आला आहात, याचा विचार करण्यासाठी मी माझ्या बुद्धीला पुष्कळ शीण दिला आणि असा तर्क केला की, आपला उपमर्द झाला आहे असे मानून तुम्ही शस्त्रविद्येनुसार स्वतःवरच खरोखर अन्याय केला आहे. कारण एखाद्या सबंध शहराचा किंवा मानव–समाजाचा उपमर्द कोणीही एक माणूस करू शकत नाही. त्यांच्यापैकी

कोणी राष्ट्रद्रोहाचा गुन्हा केला असे त्याला वाटले असेल, पण तसे देशद्रोही कृत्य कोणी केले हे त्याला नक्की कळत नसेल, म्हणून तो सरसकट सर्वांवर देशद्रोहाचा गंभीर आरोप करीत असेल, तरच तो एकटा माणूस सर्व शहराचा उपमर्द करू शकेल. असे एक उदाहरण आमच्याजवळ आहे. लाराचा डॉन डीएगो ऑर्डनिझ याने झॅमोराच्या साऱ्या नागरिकांना आव्हान पाठविले. त्या शहराच्या राजाच्या– आपल्या धन्याचा–खून व्हेलिडो डी ओल्सोस याने कोणाच्याही मदतीशिवाय केला आहे, हे त्याला माहीत नव्हते. म्हणून त्याने त्या सर्व नागरिकांवर बेधडक आरोप लादला. त्यापासून आपला बचाव करणे व त्याचा सूड उगविणे हे त्या सर्व लोकांचे कर्तव्य ठरले. अर्थात् हे कबूल केले पाहिजे की, डॉन डीएगो याने आपला आरोप फार ताणला आणि सर्वांना तुच्छ लेखण्यात पुष्कळ अविचार दाखविला. त्याने आपल्या आव्हानात उल्लेख केल्याप्रमाणे मेलेली माणसे आणि जन्मास यावयाची माणसे, पाणी आणि पाव व दुसऱ्या पुष्कळ क्षुल्लक गोष्टी यांचा उद्धार करण्याची काही गरज नव्हती. पण ते जाऊ द्या. कारण जेव्हा मनुष्य क्रोधाने उफाळतो, तेव्हा त्याची जीभ अनावर होते आणि तिला मर्यादा अशी काही उरत नाही. म्हणून कोणताही माणूस सर्व राज्याचा, प्रांताचा, शहराचा, राष्ट्रसमूहाचा किंवा राजकारणी संघाचा अपमान करू शकत नाही. हे लक्षात घेतले म्हणजे, अशा काल्पनिक अपमानाचा सूड घेण्याची गरज उरत नाही असा निष्कर्ष काढणे योग्य ठरेल. असा अपमान हा खरोखर उपमर्द होऊ शकत नाही आणि प्रक्षोभाला पुरेसे कारणही शोभत नाही. आपली सर्वत्र नालस्ती करण्यासाठी जे लोक आपले अभद्र श्वास खर्च करतात, त्यांच्यावर हल्ला करायला रेलोक्सा शहरातले लोक दररोज बाहेर पडले, तर तो मोठा शहाणपणाच होईल ! क्षुद्र लोक ज्यांच्या गावांना चक्काविक्यांचे किंवा भाजी-विक्यांचे अथवा मासे–विक्यांचे अगर साबणकऱ्यांचे गाव म्हणून टोपणनावे ठेवतात, अशा अनेक विख्यात शहरांतील नागरिकांनी आपला अपमान झाला, असे मानून सूडाचा विचार केला तर संपलेच. कोणत्याही रिकामटेकड्या व क्षुद्र भांडणासाठी एखादा वेडावाकडा शब्द कानी येताच त्यांनी आपली समशेर उपसू नये. छेः ! छेः ! ईश्वराने त्यांना तसे कधीच करू देऊ नये. पुढील चार कारणांशिवाय शहाणी व समंजस माणसे आणि सुयंत्रित सरकारे कधीच हत्यार उचलीत नाहीत की आपले देह आणि जिंदगी धोक्यातही घालीत नाहीत. त्या चार कारणांपैकी, पहिले कारण म्हणजे पवित्र कॅथॉलिक धर्माचे रक्षण. दुसरे ईश्वराच्या व निसर्गाच्या कायद्याप्रमाणे आपल्या प्राणाचे रक्षण करणे हे कर्तव्य ठरते. म्हणून आपले प्राण-संरक्षण हे दुसरे कारण होय. तिसरे कारण म्हणजे, स्वतःच्या लौकिक, आपल्या कुटुंबाची कीर्ती आणि आपल्या मालमत्तेचे संरक्षण – हे जतन करण्यासाठी हत्यार उचलावे. चौथे, न्याय्य युद्धात आपल्या राजाच्या सेवेसाठी शस्त्र चालवावे. याशिवाय आपली इच्छा असल्यास आपण पाचव्या कारणाची भर घालू शकतो – ते म्हणजे, स्वदेश–संरक्षण. हे कारण खरोखर दुसऱ्या कारणात समाविष्ट आहे. या पाच प्रमुख कारणांमध्ये आणखी पुष्कळ कारणांची भर

घालता येईल. त्या कारणांमुळे माणसांना आपला खरेपणा सिद्ध करण्यासाठी शस्त्राचाराचाही आश्रय घेता येईल. पण काही किरकोळ गोष्टींसाठी, ज्याकडे पाहून आपण तुच्छतेने हसू आणि चेष्टा करू पण सूड घेण्याचा विचार करणार नाही, अशा प्रसंगी शस्त्राचा अवलंब करणे म्हणजे आपल्या अंगी अकलेचा दुष्काळ आहे असे जाहीर करणे होय.

" याशिवाय, अन्यायी सूड घेण्याचा प्रयत्न करणे. ( खरे म्हटले तर, कोणताही मानवी सूड न्यायी असू शकत नाही. ) हे आपण स्वीकारलेल्या पवित्र धर्माशेशीं पूर्णपणे विसंगत आहे. ती आज्ञा आपल्याला आज्ञाविते, ' आपल्या शत्रूला क्षमा करा आणि आपला द्वेष करणाराचे भले करा. ' या आज्ञेचे मनापासून पालन करणे कठीण दिसते. पण या जगापेक्षा परलोकाचा विचार कमी करणाऱ्याला आणि आत्म्यापेक्षा देहाला अधिक मानणाऱ्यांनाच ते आज्ञा–पालन कठीण असते. कारण मानव–जातीच्या त्या 'तारणहाराने' असे म्हटले आहे की, (आणि त्याचे शब्द कधीच फसवे नसतात) ' त्याचे जोखड सुसह्य होते आणि त्याचे ओझे हलके होते. " म्हणून आपल्याला जे कार्य करणे अशक्य आहे, ते आपण करण्याची आज्ञा तो कधीच देणार नाही. सद्गृहस्थहो, बुद्धी आणि धर्म हे दोन्ही आपल्याला प्रेम आणि शांती यांचे धडे देत आहेत. म्हणून आपण सार्वजनिक शांततेचा भंग करून मानवी व दैवी अशा दोन्ही आज्ञा धाब्यावर बसविणार नाही अशी मला आशा वाटते. "

हे भाषण ऐकून सँको मनात म्हणाला, " हा माझा धनी धर्मगुरूच असला पाहिजे. एक अंडे दुसऱ्यासारखे असते, त्याप्रमाणे हा धनी दुसऱ्या कोणत्याही धर्मगुरूसारखा आहे. " श्वास घेण्यासाठी डॉन क्विक्झोट थोडा वेळ थांबले. आपला श्रोतृवृन्द आपले भाषण ऐकण्यास अजून उत्सुक आहे हे पाहून ते आपले प्रवचन पुढे चालविणार होते. पण त्यांच्या बुद्धी–कौशल्याबद्दल सँकोचे मत चांगले असल्यामुळे त्याने आता बोलण्याची संधी पकडली आणि तो म्हणाला, " सद्गृहस्थहो, माझा धनी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट याला पूर्वी ' दुःखी चेहऱ्याचा शिलेदार ' म्हणत आणि आता 'सिंहाचा शिलेदार' म्हणतात. ते एक अत्यंत न्यायी गृहस्थ आहेत. विद्यापीठातील तुमच्या कोणत्याही पंडिताप्रमाणे ते लॅटिन बोलू शकतात आणि आपली मातृभाषा बोलू शकतात. त्यांनी भाषणासाठी कोणताही विषय हाती घेतला तरी ते मुद्देसूद बोलतात– विद्वान माणसासारखे बोलतात. तुम्ही म्हणता, ते द्वंद्व–युद्धाचे आणि शिष्टाचाराचे सारे नियम आणि कायदे त्यांच्या जिभेच्या शेंड्यावर आहेत. म्हणून ते सांगतील तसे करणे, एवढेच तुमचे काम. त्यांच्या सल्ल्याप्रमाणे वागल्यामुळे तुम्ही जर कधी वाकड्या वाटेला लागला तर त्याचा दोष माझ्या माथ्यावर लादा. आपल्याला पूर्वीच सांगितल्याप्रमाणे, खरोखर कोणी गाढवासारखा ओरडतो म्हणून त्याची लाज वाटणे हे मूर्खपणाचे आहे. कारण, मला आठवते की, मी जेव्हा लहान होतो, तेव्हा मनास येईल तितक्या वेळा

मी तसा ओरडत असे आणि मला कोणी अडथळा केला नाही. मी गाढवाचा आवाज इतका हुबेहूब काढतो की, अभिमान न बाळगता मी सांगतो, माझे ओरडणे कानावर पडताच आपल्या शहरातील सारी गाढवे ओरडत सुटतील. असे असले तरी, मी सज्जन आईबापांचा मुलगा होतो. माझे घराणे कुलीन होते, समजलं? माझ्या या महान गुणवत्तेचा हेवा माझ्या विभागातील चार उत्तम तरुणांना वाटत होता हे खरे, पण त्यांच्या हेव्याला मी काडीची किंमत दिली नाही. मी तुम्हाला काही फुगवून सांगतो आहे, असें तुम्हांला वाटू नये, म्हणून तुम्ही माझे भाषण ऐका आणि मग निर्णय द्या· ही गाढव-ओरडयाची कला, पोहोण्याच्या कलेसारखीच आहे—एकदा शिकली म्हणजे कधी विसरली जात नाही."

असे म्हणून त्याने आपल्या दोन्ही हातांचे तळवे आपल्या नाकाजवळ नेले आणि इतक्या जोरजोराने गर्दभस्वर काढण्यास सुरुवात केली की, त्याचा आवाज शेजारच्या दऱ्यादऱ्यांतून घुमत राहिला. पण तो अशा तऱ्हेने ओरडत असताना, त्याच्याजवळ उभा असलेल्या एका माणसाला वाटले, आपणा सर्वांना वेडावण्यासाठी हा ओरडत आहे. म्हणून त्याने आपल्या हातातील दंडुक्याने सँकोच्या पाठीवर असा जबरदस्त रट्टा दिला की, त्यामुळे तो जमिनीवर कोसळला. आपल्या शागिर्दाची ही क्रूर चेष्टा पाहून डॉन क्विक्झोट आपला भाला उगारून त्या माणसाकडे भयप्रद आविर्भावाने धावत गेले. पण त्या दोघांमध्ये जमाव आडवा आला. म्हणून शिलेदारजींना आपल्या मनाप्रमाणे सूड घेणे अशक्य झाले. त्याच वेळी त्यांच्या कानाभोवती दगडांचा वर्षाव होऊ लागला. त्यांच्या स्वागतासाठी पुष्कळ खटक-बाण व बंदुका सज्ज झाल्या. हे पाहून त्यांनी रोझिनांटचे लगाम दुसरीकडे वळविले आणि त्याचे चार पाय आपल्याला जितक्या जलद नेतील, तितक्या जलदीने ते तेथून दौडत गेले. या संकटातून आपली मुक्तता करण्याची प्रार्थना त्यांनी प्रभूकडे मनोभावे केली. पाठीमागून कोणी तरी आपल्याला गोळी मारील आणि ती गोळी आपल्या छातीतून बाहेर पडेल, अशी भयंकर भीती त्यांना पावलोपावली वाटत होती. आपला श्वास कोंडू नये, म्हणून ते एकसारखे उसासे टाकीत होते. त्यांना पळताना पाहून त्या खेडवळ पलटणीचे समाधान झाले आणि तिने त्यांचेवर गोळी न झाडण्याचे ठरविले.

सँको पूर्ण शुद्धीवर येण्याच्या आधीच त्याला त्याच्या गाढवावर आडवा टाकण्यात आले होते. त्या रट्ट्याने त्याची शुद्ध हारपली होती. आता त्याने तेथून निसटण्याचा विचार केला. त्या बिचाऱ्या गाढवाचे अंगी त्याला नेण्याइतकी पुरेशी ताकत नव्हती. तरी डॅपल गाढवाने स्वेच्छेने रोझिनांटच्या पाठोपाठ जाण्यास सुरुवात केली. त्याच्यापासून तो क्षणभरही दूर जाऊ शकत नव्हता. त्या सशस्त्र समुदायापासून आपण बऱ्याच अंतरावर आलो आहोत असे पाहून डॉन यांनी चोहोकडे नजर फेकली, तेव्हा सँको आपल्या मागोमाग येत आहे आणि त्याच्यामागे कोणी त्रासदायक माणसे नाहीत

असे पाहून डॉन हे तो येईपर्यंत थांबले. अंधार पडेपर्यंत तो समुदाय त्याच ठिकाणी राहिला. त्यांच्या शत्रूंनी त्यांच्याबरोबर युद्ध करण्याचा पवित्रा घेतला नसल्याने ते आपल्या घरी निघाले. कोणताही धोका न पतकरता आपण आपले शौर्य दाखविले याचा त्यांना इतका आनंद वाटत होता की, ग्रीक लोकांची जुनी रूढी माहीत असण्याइतके ते सुसंस्कृत असते तर, त्यांनी त्या जागी एक स्मारक उभारले असते.



## प्रकरण २८

# या प्रकरणात लक्ष देऊन वाचल्या तरच कळतील अशा काही गोष्टी आहेत, असे इतिहासकार बेनिनजेली सांगत आहेत.

जेव्हा एखादा शौर्यशाली पुरुष पळ काढतो, तेव्हा त्याला काही तरी दुष्ट कारस्थानाचा सुगावा लागलेला असतो. अधिक अनुकूल संधीसाठी शहाणी माणसे आपले सामर्थ्य राखून ठेवीत असतात. हा सिद्धांत डॉन क्विक्झोट यांच्या बाबतीत खरा आहे. संतप्त आणि कारस्थानी जमावाच्या क्रोधाला बळी पडण्याऐवजी त्यांनी पलायनाचा आश्रय केला. तसे करताना त्यांनी आपल्या विश्वासू सेवकाला ज्या संकटामधे सोडले होते, त्याच्या आटोक्याबाहेर आपण गेल्याची खात्री पटेपर्यंत त्यांनी सँकोचा काहीच विचार केला नाही. आम्ही पूर्वी सांगितल्याप्रमाणे सँको गाढवावर टाकलेल्या अवस्थेत त्यांच्या मागोमाग गेला. शुद्धीवर आल्यानंतर शेवटी त्याने त्यांना गाठले, तेव्हा गाढवाच्या खोगिरावरून तो रोझिनांटच्या पायापाशी पडला. त्यावेळी त्याचे शरीर छिन्नभिन्न झाले होते आणि त्याची गत शोचनीय झाली होती. त्याच्या जखमा पाहण्यासाठी डॉन क्विक्झोट आपल्या घोड्यावरून तत्काळ खाली उतरले. हाडे मोडली नाहीत पण नखशिखांत सारी चामडी फाटलेली आहे असे त्यांना आढळले. तेव्हा ते म्हणाले, "ओरड, ओरड. व्याधिग्रस्त माणसाप्रमाणे जोरजोराने ओरड. अरे, ज्याचा बाप फाशी गेला, त्याच्या घरी फाशीच्या दोरीची चर्चा करणे, हा मोठाच शहाणपणा म्हणावयाचा ! अरे रेम्याडोक्या, तुझ्या त्या संगीताला काठ्यांच्या माराशिवाय दुसऱ्या कशाने जाब मिळणार ? देवाचे आभार मान की, त्यांनी तुला काठीने कोरडा आशीर्वाद दिला–सुऱ्याने तुझे तुकडे केले नाहीत."

सँको म्हणाला, "महाराज, आपल्या प्रश्नाचे उत्तर देण्यास सध्या माझ्या अंगी शक्ती नाही, पण माझी पाठ व माझे खांदे पुरेसे बोलके आहेत. या शापित भूमीपासून आपण लौकर पळ काढावा अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. मी पुनः ओरडलो तर माझ्या पोटावर दगडांचा वर्षाव पुन्हा होवो. पण हे म्हटल्याशिवाय मला राहवत नाही की, प्रसंग–विशेषी आपल्या विश्वासू सेवकांना त्यांच्या शत्रूच्या गराड्यात सोडून आणि सुक्या माशाप्रमाणे मार खाण्यास भाग पाडून तुमचे शिलेदार आत्मरक्षणासाठी पाठीला पाय लावून पळ काढतात." डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे सँको, सँको, हे

लक्षात ठेव की, माघार घेणे म्हणजे पळ काढणे असे नव्हे. धैर्याला जर शहाणपणाने मार्ग दाखविला नाही, तर ते धैर्य भित्रेपणाच्या कोटीत पडते. मूर्ख माणसांच्या कृत्यांना यश येते, ते त्यांच्या शौर्याने नसून सुदैवाने असते. मी माघार घेतली हे मी कबूल करतो, पण मी पळ काढला हे मला नाकबूल आहे. माघार घेण्यात मी पुष्कळ शूर वीरांचेच अनुकरण केले आहे. अविवेकाने आपले शरीर संकटात न लोटता त्या वीरांनी आपले सामर्थ्य भाग्यवान क्षणासाठी राखून ठेवले. अशा प्रकारची उदाहरणे इतिहासात भरलेली आहेत. ती मी तुला आता सांगत नाही. कारण त्यांच्यापासून तुझा जितका फायदा होईल, त्यापेक्षा मला अधिक कंटाळा येईल."

यावेळेपर्यंत डॉन क्विक्झोट यांनी सँकोला आपल्या गाढवावर स्वार होण्याचे कामी मदत केली होती. ते स्वतः रोझिनांटवर स्वार झाले आणि ते दोघे हळूहळू मार्ग आक्रमीत हिवराच्या झाडांच्या राईत गेले. ते जेथून निघाले तेथून ते स्थान सुमारे पाऊण मैल दूर होते. ते आपल्या वाहनावरून मंदगतीने चालले असले, तरी सँको अधून-मधून दीर्घ सुस्कारे टाकीत होता आणि दुःखाने कण्हत होता. डॉन क्विक्झोट यांनी त्याला विचारले, 'तू इतक्या मोठ्याने का विव्हळतोस ?' सँकोने उत्तर दिले, "ढुंगणा-पासून डोक्यापर्यंत मला अशा काही तीव्र वेदना होत आहेत की, त्यामुळे मला मरावेसे वाटते." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तुझ्या वेदना इतक्या तीव्र आहेत याचे कारण तुला त्यांनी ज्या दंडुक्याने बडविले, तो जाडजूड आणि लांबलचक होता. तो तुझ्या पाठीच्या काही भागावर आदळल्यामुळे ओरखडे निघाले ,आहेत आणि त्यामुळे तुला यातना होत आहेत. तो दंडुका याहून मोठ्या आकाराचा असता, तर तुझ्या यातना याहून मोठ्या झाल्या असल्या, हे खचित."

सँको म्हणाला, "खरोखर, आपण थोड्या शब्दात हा जो खुलासा केला, त्या-विषयी कोणालाच संशय नव्हता. वा! माझ्या दुःखाचे कारण तर्क केल्याशिवाय न कळण्यासारखे होते काय ? त्या शस्त्राने माझ्या शरीराच्या जेवढ्या भागावर प्रहार केला, तेवढा दुखत आहे, हे तुम्ही मला सांगावयास पाहिजे काय ? माझ्या घोट्याचे हाड दुखत असले, तर त्याचे कारण शोधण्यासाठी तुम्ही आपले डोके खाजवावे हे ठीक आहे. पण जेथे मला तडाखे बसले, ते माझे अंग दुखत आहे, हे तुम्ही सांगण्याची काय गरज ? कोणताही मूर्ख माणूस तो सांगू शकेल. खरोखर, धनीसाहेब, मी दिवसा-दिवसाला अधिक शहाणा होत आहे. तुम्ही साऱ्या जगासारखेच आहात- स्वतः-शिवाय दुसऱ्या कोणाचे दुःख मनाला लावून घेत नाही, असे मला आढळून येत आहे. आपण कोठे आहोत आणि तुमच्यापासून मला काय मिळणार आहे, हे आता माझ्या लक्षात आले आहे. यथेच्छ मार खाण्यासाठी आणि बरगड्या मोडून घेण्यासाठी मला तुम्ही यावेळी टाकून दिले, तसेच पूर्वी घोंगड्यात मला उडवून घ्यायला व नाचावयास लावले. अशा शेकडो-हजारो गमती-जमती आपल्या सेवेमध्ये माझ्या वाट्यास येतील अशी अपेक्षा मी धरली पाहिजे. सध्या अरिष्ट माझ्या खांद्यावर येऊन उतरले आहे. दुसऱ्या

खेपेस ते माझ्या डोळ्यावर आक्रमण करील, असे मला वाटते. किती मठ्ठड माझे डोके! मी एकसारखा वेडापिसा झालो आहे. जीवात जीव असेपर्यंत मी कधी शहाणा होणारच नाही. आपल्या मागोमाग वर–खाली, आडरस्त्यांनी आणि वाकड्या मार्गांनी ( पाखंडी लोकांनाही जे कधी सापडणार नाहीत. ) दौडत जाण्यापेक्षा – आणि तसे करतांना ख्रिश्चन माणसाला योग्य अशा पद्धतीने आपले ओठ ओले करण्यासाठी कधी दारू मिळावयाची नाही की भूक भागविण्यासाठी कुत्र्याच्या मांसांचीदेखील कढी मिळावयाची नाही – ख्रिश्चन माणसाच्या पोटाला साजेसे खाद्यपदार्थ कधीच मिळावयाचे नाहीत – मी सरळ माझ्या घरी माझ्या बायका–मुलांत जाऊन राहणे आणि देवाने जी थोडीफार अक्कल दिली असेल, तिचा भरपूर उपयोग करून घरचा कारभार पहाणे, चांगले नव्हे काय? चालून चालून पाय दुखून आल्यावर चांगल्या अंथरुणावर पडून रहाणे किती आनंदाचे! अशा वेळी धन्याने म्हणावे, 'अरे! तुला झोप आली काय? तुझ्यासाठी बिछाना तयार आहे. शागिर्दा, त्यावर तू नीज–सहा फूट लांबीच्या जमिनीवर पडून रहा. आपले मढे त्यावर ठेव. तेवढ्याने काम भागत नसेल तर आणखी जागा घे. तुला ती मिळेल. येथे खूप जागा आहे. तू खुशाल लोळ.' या शिलेदारीच्या मूर्ख लहरीवर ज्याने काही लोकांना सोडले असेल आणि त्यांच्या सेवकांना मूर्खपणाचा गड्डा बनवला असेल, त्या अभागी खोडसाळ माणसाला सैतान सांभाळो. अर्थात मी हे जुन्या काळच्या शिलेदारासंबंधी बोलत आहे. आपल्या काळातील शिलेदारासंबंधी वाईट बोलण्याइतका मी असंस्कृत नाही. छेः! मी त्यांना मान देतो. कारण आपल्यासारख्या थोर माणसांनी हा पवित्र व्यवसाय स्वीकारलेला आहे. आपले नाक दूरचा वास घेणारे. गिरणीच्या चक्कीतही आपण खोलवर पाहू शकता. सैतानालाही आपल्यापेक्षा अधिक बारकाईने पहाता येत नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी पैजेवर सांगतो की, आता तू अखंड बडबड करू शकतोस आणि तुझ्या साऱ्या शरीरात तुला कोठेही वेदना होत नाहीत. म्हणून म्हणतो, माझ्या बाळा, तुझ्या तोंडाला येईल ते आणि तुझ्या मेंदूला भार झालेले हवे ते तू बोल. कारण त्यामुळे तुझ्या यातना कमी होतील. तुझ्या उद्धट बोलण्याने माझे मन दुखावणार नाही, तर संतुष्टच होईल. तुला जर घरी जाऊन आपल्या बायका–मुलांत राहाण्याची इच्छा असेल, तर त्याला मात्र माझा मुळीच विरोध आहे. माझे पैसे तुझ्या हातात आहेत. आपण आपल्या घरून अलीकडे केव्हा निघालो, हे तू लक्षात घे आणि महिन्याचा हिशेब करून तू त्या माझ्या पैशातून आपला पगार घे." सँको म्हणाला, "जशी आपली मर्जी. आपल्याला परिचित असणाऱ्या त्या पंडिताचा बाप कॅरस्को याच्याकडे मी नोकरीला होतो. जेवणाशिवाय तो मला दरमहा दोन ड्यूकॅट देत असे. तशा शेतकऱ्याचा नोकर असण्यापेक्षा शिलेदाराचा शागीर्द असण्यात जास्त त्रास आहे, असे मला नक्की वाटते. तरी तुम्ही मला किती वेतन द्याल, हे मला माहीत नाही. शेतकऱ्याच्या नोकरीत असताना, गाडी हाकताना किंवा शेत नांगरताना आम्हाला

इतके कष्ट पडतात की, आम्ही घामाघूम होतो आणि आमच्या अंगात फाटका सदराही असत नाही. पण काही झाले तरी, रात्रीच्या वेळी आम्हाला पोटभर जेवण मिळते आणि अंथरुणावर पडून घोरता येते. पण आपल्या साऱ्या नोकरीमध्ये मला कधी चांगले जेवण मिळाल्याचे किंवा रात्री सुखाने विश्रांती मिळाल्याचे आठवत नाही. हां, डॉन डीएगोच्या घरी मात्र थोडा वेळ मला विश्रांती मिळाली अन् कॅमॅचोच्या कढईतील खमंग रश्शाचे भुरके मला मारता आले आणि श्री. बेसिल यांच्या घरी खाऊन–पिऊन झोपता आले. याशिवाय इतर सर्व वेळी थंडगार जमिनीवर आणि उघड्या शेतामध्ये मला माझा मुक्काम ठेवावा लागला आणि तुम्ही म्हणता त्याप्रमाणे, आकाशाचे आघात सोसावे लागले. चीजच्या चार तुकड्यांवर आणि बुरसलेल्या रोटीच्या चार साली खाऊन मला दिवस काढावे लागले. काही वेळा आपल्या वाटेत सहज भेटलेल्या झऱ्याचे किंवा ओहोळाचे पाणी मला प्यावे लागले."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक, मी हे सारे कबूल करतो. आता सँको, तू मला हे सांग की, तुला आपला मालक कॅरॅस्को याने दिले त्यापेक्षा माझ्याकडून तू किती अधिक पैसे इच्छितोस ?" सँको म्हणाला, "सांगतो ना. थॉमस कॅरेस्को मला देत होता त्यापेक्षा आपण मला दरमहा बारा पेन्स जादा दिले तर ते मला योग्य वाटेल आणि ते वेतन मला पत्करण्याजोगे वाटेल. पण आणखी एक गोष्ट आहे, आपण मला एक बेट बहाल करण्याचे वचन दिले होते, हे आपल्याला आठवत असेल. त्याच्या-ऐवजी जादा छत्तीस पेन्स आपण दरमहा मला देणे हे आपल्या बुद्धीला शोभेल. सर्व मिळून तीस रील–याहून कमी नाही की जास्त नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "फार छान ! आता आपण हिशेब करू या. आपण घरून निघाल्याला आज पंचवीस दिवस झाले. तेव्हा तू स्वतःला जो पगार ठरविलास, त्याला अनुसरून हिशेब कर आणि त्याप्रमाणे तूच पैसे घे म्हणजे झाले." सँको म्हणाला, "अरेच्या, आम्हाला हिशेबाचे मुळीच जमत नाही. आपण मला एका बेटाचे राज्यपाल करण्याचे वचन दिले होते. ते वचन जेव्हा दिले तेव्हापासून आजच्या दिवसापर्यंतचा हिशेब आपण केला पाहिजे.' डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "बरे तर, किती होतात ते दिवस ?" सँको म्हणाला, "मला बरोबर आठवत असेल तर, सुमारे वीस वर्षे झाली असतील— दोन–तीन दिवस इकडे की तिकडे."

आपल्या कपाळावर जोराने हात मारून डॉन क्विक्झोट मनापासून मोठमोठ्याने हसू लागले आणि म्हणाले, "आपल्या मोहिमेच्या अगदी प्रारंभापासून आतापर्यंत आपण पुरे दोन महिनेही बाहेर नाही. आणि या काळात आपण सीएरा मोरेना येथेच होतो आणि तेथेच आपला सारा प्रवास झाला आहे. आणि तरीही बेट देण्याचे वचन मी तुला दिले, तेव्हापासून आतापर्यंत वीस वर्षे झाली, असे म्हणण्याचा निर्लज्जपणा तुझ्या अंगी आहे काय ? माझे जे पैसे तुझ्याजवळ आहेत ते आपल्या पगारासाठी गिळंकृत करण्याची तुला इच्छा आहे, असे आता मला खात्रीने वाटते. तुझी तशीच इच्छा असेल तर फारच

छान ! घेऊन टाक ते सारे पैसे. त्यामुळे तुझे मोठे कल्याण होईल, तुझ्यासारखा नोकर ठेवण्याचा यापुढे त्रास घेण्यापेक्षा मी एकटा असलो तरी चालेल, मग मला पैचाही खर्च येणार नाही. पण नोकरासंबंधी शिलेदारीचे जे नियम आहेत ते तू उलटेपालटे करीत आहेस. दरमहा आपल्यांला इतके वेतन मिळावे म्हणून तू हुजत घालीत बसला आहेस. पण शिलेदाराशी त्याचा सेवक कधी अटी घालून हुजत घालीत बसल्याचे तू कोठे वाचले–ऐकले आहेस काय? अरे लुच्चा, अरे गळे-कापू बदमाशा, अरे पैशाच्या पिशाच्चा, शिलेदारांच्या इतिहास–सागरात उडी टाक आणि तू माझ्याकडे ज्या ज्या मागण्या केल्या आहेस, तशा करण्याचे किंवा मनात आणण्याचे धाडस पूर्वी कोणा सेवकाने केले असल्याचे मला त्या इतिहास–ग्रंथातून तू दाखव. मग मी तो दाखला कपाळावर चिकटवण्यास आणि माझ्या नाकावर चार तडाखे देण्यास तुला परवानगी देतो. चल, चालता हो. याच क्षणी तू आपल्या गाढवासह निघून आपल्या घरी जा. कारण यापुढे क्षणभरही तू माझ्या नोकरीत राहणार नाहीस. अरे, तुला मी किती भाकरी खायला दिल्या व किती वचनांचा व्यर्थ वर्षाव तुझ्यावर केला. अरे, लोचट नीचा, दुष्टा, तुझ्या अंगी मानवत्वापेक्षा पशुत्व अधिक आहे ! जेव्हा मी तुला मानाचे स्थान देणार होतो आणि तुझ्या बायकोची इच्छा नसतानाही लोक तुला जेव्हा 'महाराज, महाराज' म्हणणार होते, तेव्हाच तू माझ्यापासून चोरून निघून जात आहेस. अरे मठ्ठ माणसा, जगातील अत्यंत सुंदर बेटाचा स्वामी तुला, विलंब न लावता, करण्याचे मी जेव्हा नक्की ठरविले, तेव्हाच तू मला सोडून जात आहेस ! प्रामाणिकपणाची चव गाढवाच्या पिल्लांना नसते असे तू खरोखर म्हटले पाहिजेस. खरोखर तू शुद्ध गाढव आहेस–गाढवाप्रमाणे तू जगशील आणि गाढवाप्रमाणे मरशील. कारण आपण पशु आहोत, हे जाणण्याची अक्कल तुला तुझ्या जीवात जीव असेपर्यंत कधी येणार नाही, असे मी खात्रीने सांगतो."

अशा प्रकारे डॉन क्विक्झोट यांनी सँकोवर ताशेरे झाडले आणि त्याची खरडपट्टी काढली तेव्हा तो बिचारा अगदी निराश झाला. त्याच्या मर्मावरच घाव बसला. तो आपल्या धन्याकडे आशाळभूतपणे पहात राहिला. त्याच्या डोळ्यात दुःखाश्रू उभे राहिले. दुःखी आणि सौम्य स्वराने तो म्हणाला, "महाराज, आपण गोड स्वभावाचे थोर गृहस्थ आहा. मी पुरा गाढव होण्यास फक्त एका शेपटीचीच गरज आहे, हे मी कबूल करतो. महाराजांनी जर कृपा करून माझ्या पाठीशी शेपूट जोडले, तर ते चांगले बसले असे मी समजेन आणि माझ्या सर्व आयुष्यभर मी आपला अत्यंत विश्वासू गाढव म्हणून राहीन पण महाराज, मला क्षमा करा आणि माझ्या अजाण तारुण्यावर दया करा, अशी मी प्रार्थना करतो. माझे डोके अगदी मठ्ठ आहे, हे लक्षात घ्या. माझी जीभ कधी कधी स्वैर सुटते याचे कारण मी मूर्ख आहे–पण दुष्ट नाही, हे लक्षात घ्या. 'जो चुकतो आणि चूक दुरुस्त करतो, तो देवाच्या दयेस पात्र होतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तू आपल्या भाषणात चतुर म्हणी गुंफल्या नाहीस, तरच त्याचे मला मोठे नवल वाटेल. आता मी तुला एकदा क्षमा करतो. मात्र माझे मन दुखविणारे आपले दोष तू काढून टाकले पाहिजेस,

आणि आपला लोभी स्वभाव कमी झाल्याचे दाखविले पाहिजेस. धीर धर. मी जे वचन तुला दिले आहे, ते पूर्ण होण्याची आशा तू बाळग म्हणजे तुझ्या स्वभावात उदात्तपणा निर्माण होईल. बेट मिळण्यास उशीर झाला म्हणून ते मिळणे अशक्य आहे असे समजू नकोस. त्याची वेळ येईल." सँकोने प्रयत्नांची शिकस्त करण्याचे वचन दिले, पण स्वतःच्या शक्तीवर तो विसंबून राहू शकत नव्हता.

अशा प्रकारे साऱ्या गोष्टी सलोख्याने मिटल्यावर, ते दोघे झाडांच्या राईत मुक्कामास गेले. डॉन क्विक्झोट एल्म झाडाच्या पायथ्याशी बसले आणि त्यांचा सेवक बीच झाडाच्या पायथ्याशी बसला. त्यातील प्रत्येक झाडाला हात नसला, तरी पाय होता. सँकोला रात्रभर चांगली विश्रांती मिळाली नाही. कारण जखमामुळे त्याच्या हाडांना थंडीचा ताप नेहमीपेक्षा अधिक होत होता. डॉन क्विक्झोट आपल्या नेहमीच्या कल्पना-तरंगात रममाण झाले होते. तथापि त्या दोघांनाही झोप लागली होती. दुसरे दिवशी सूर्योदय होताच त्यानी एब्रो नदीकडे आपला प्रवास चालू केला. तेथे त्यांना भेटले– कोण ? ते पुढील प्रकरणात सांगितले जाईल.



## प्रकरण २९

# जादूच्या होडीचे विख्यात साहस

डॉन क्विक्झोट व त्यांचा सेवक हळुहळू मंद गतीने दोन दिवस घोड्यावरून गेल्यानंतर एब्रो नदीच्या काठी जाऊन पोहोचले. तेथील दृश्य शिलेदारजींना फारच रम्य वाटले. नदीच्या काठावरील ती लुसलुशीत हिरवळ आणि तिच्या पात्रातील ते उदंड पाणी – द्रवस्वरूप स्फटिकासारखे स्वच्छ – विस्तीर्ण पात्रातून शांतपणे वहात असलेले– हे सर्व पाहून त्यांच्या स्वैर कल्पनेच्या प्रवाहात हजारो प्रणय-तरंग उठले. विशेषतः मॉंटेसिनोजच्या गुहेत त्यांनी जे जे पाहिले, त्याविषयीचे त्यांचे विचार जागृत झाले. त्या गुहेतील चमत्कार अंशतः खोटा होता व अंशतः खरा होता असे मास्टर पीटरच्या माकडाने त्यांना खात्रीपूर्वक सांगितले असले, तरी ते सारे खरे असावे असे मानण्याकडे त्यांच्या मनाचा कल होता. उलट सँकोला वाटे, त्यातील प्रत्येक गोष्ट मृगजळाप्रमाणे खोटी होती.

अशा प्रकारे शिलेदारजींचे मन सुखी व संतुष्ट झाले असताना, त्यांच्या नजरेस एक लहानगी होडी पडली. तिच्यावर वल्ही नव्हती की शीड नव्हते. एका दोरखंडाने ती नदीकाठच्या एका झाडाच्या बुंध्यास बांधलेली होती. तेव्हा आपल्या आजूबाजूस पाहून आणि तेथे कोणी माणूस नाही हे लक्षात घेऊन शिलेदारजी घोड्यावरून तत्काळ खाली उतरले आणि तसेच करण्याचा हुकूम सँकोला त्यांनी दिला. जवळपासच्या एल्म किंवा वुइलो झाडाला आपली जनावरे बांधण्यास त्यांनी सँकोला सांगितले. सँकोने विचारले, 'या सर्वांचा अर्थ काय?' डॉन क्विक्झोट उत्तरले, "तुझ्या लक्षात हे आले पाहिजे की, ही होडी येथे पडली आहे. ती मला आत येण्याचे निमंत्रण देण्यासाठीच, हे नक्की. मोठ्या संकटात सापडलेल्या कोणा शिलेदाराच्या किंवा उच्च श्रेणीतील माणसाच्या मदतीसाठी मी जावे म्हणून ही होडी मला हाक मारीत आहे. शिलेदारीच्या ग्रंथात जादुगारांची अशी पद्धत सांगितलेली आहे की, आपण ज्याचे रक्षण करतो, असा एखादा शिलेदार एखाद्या अत्यंत महान संकटात सापडला आणि त्यातून त्याला शूर शिलेदाराशिवाय दुसरे कोणी मुक्त करण्यासारखे नसले, तर तो मांत्रिक त्या मदतनीस वीर पुरुषाला (मग त्या दोघामध्ये आठ–दहा हजार मैलांचे अंतर असेना का!) ढगातून, नाही तर होडीतून, डोळ्याचे पाते लवते न लवते तोंच, अंतराळातून किंवा पाण्यातून तातडीने घेऊन जातो, आणि जेथे त्याच्या मदतीची गरज असेल, तेथे त्याला

नेऊन ठेवतो. याच उद्देशाने ही होडी येथे पडलेली आहे हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहे. म्हणून सँको, फार उशीर झाला नाही तोच रोझिनांट व डॅपल यांना झाडाशी बांध, म्हणजे आपण दोघे ईश्वराच्या मार्गदर्शनाखाली मार्ग आक्रमू. अनवाणी चालणाऱ्या पाद्र्यांनी मला परावृत्त करण्याचा कितीही प्रयत्न केला तरी मी या होडीत बसून जाणारच." सँको म्हणाला, "छान ! छान ! मी येणे जरूर असेल, तर मी येणारच. या तुमच्या कार्यात पदोपदी संकटे आहेत. त्या कार्याला काय म्हणावे हे मला कळत नाही. पण त्या तुमच्या लहरी आहेत आणि त्या गोंधळात टाकणाऱ्या आहेत. त्यात मी काय करावे हे मला कळत नाही. पण म्हण अशी आहे ना–'धनी सांगेल तसे वाग – मग त्याच्या पंक्तीस जेवावयास सांगितले तरी तसे कर.' हे सारे खरे असले तरी मी माझ्या बुद्धीप्रमाणे वागले पाहिजे. म्हणून मी तुम्हाला स्वच्छ सांगतो की, मी आंधळा असलो तरी, अर्ध्या डोळ्याने मला हे दिसते की, ही होडी कोणा तरी कोळ्याची आहे– जादूची नव्हे. या नदीमध्ये अशा पुष्कळ होड्या आहेत. कारण या नदीच्या पाण्यात जगातील उत्कृष्ट मासे आहेत."

आपल्या धन्याला असा इशारा देताना सँको आपली जनावरे एका झाडाला बांधीत होता आणि त्यांचे रक्षण करण्याचे कार्य जादूगारावर सोपवीत होता. हे सारे त्याच्या अगदी इच्छेविरुद्ध घडत होते. डॉन क्विक्झोट त्याला म्हणाला, "अरे, या जनावरांना येथे सोडताना तू कसलीच चिंता करू नकोस. इतक्या दूरवरच्या रेखांशांतून आपल्याला जो साधुपुरुष प्रवासावर नेणार आहे, तो या जनावरांची काळजी घेईल हे खचित." सँको म्हणाला, "तसे नाही, तुमचे 'रेखांश' म्हणजे काय, हे मला कळत नाही. असला किचकट शब्द मी माझ्या आयुष्यात कधी ऐकला नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "रेखांश म्हणजे दूर अंतर. तुला हा शब्द कळला नाही याचे मला नवल वाटत नाही. कारण तुला लॅटिन भाषा माहीत असण्याची गरज नाही. पण तुला असे काही अडाणी धर्मेंडनंदन भेटतील की, ज्यांना काही कळत नसताना आपल्याला सारे काही कळत असल्याचे सोंग ते आणतात." सँको म्हणाला, "महाराज, आता जनावरे बांधली आहेत, पुढे काय करावयाचे?" डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "आता आपण ईश्वरावर हवाला ठेवून होडीचा नांगर उचलू या– स्पष्टच सांगावयाचे तर आपण होडीत बसू या, आणि दोरखंड कापून टाकू या."

असे म्हणून त्यांनी होडीत उडी टाकली आणि दोर कापला. त्यापूर्वी सँको त्यांचे मागोमाग गेला. मग नदीच्या प्रवाहात ती होडी किनाऱ्यापासून हळुहळू दूर गेली. आता आपण नदीच्या मध्यावर आलो आहोत, असे जेव्हा सँकोला दिसले तेव्हा तो भीतीने कापू लागला. डॅपल ओरडत आहे आणि रोझिनांट मुक्त होण्यासाठी धडपडत आहे, हे पाहून त्याच्या जीवाला फार दुःख झाले. तो म्हणाला, "महाराज, माझा गरीब डॅपल कसा ओरडत आहे ते ऐका. आपण त्याला सोडले म्हणून तो विलाप करीत आहे. तसेच बिचारा रोझिनांट आपला लगाम तोडण्यासाठी जोराने कसा धडपडत आहे,

हेही पहा. आपल्यामागे येण्यासाठी तो बेफाम झाला आहे. थांबा ! थांबा ! माझ्या गरीब लडिवाळ दोस्तांनो, तुम्ही जेथे आहा, तेथेच शांततेने राहा. आपल्या दुःखद वियोगाचे कारण असणारी ही वेडगळ लहर पस्तावा पावून जेव्हा नष्ट होईल, तेव्हा तुमच्या गोड सहवासाचा लाभ आम्हाला पुनः मिळेल. " असे म्हणून तो हुंदके देत देत मोठ्याने आक्रोश करू लागला. ते डॉन क्विक्झोट यांना सहन होईना. त्याच्याकडे रागाने पाहून ते म्हणाले, " अरे भित्र्या सश्या, तुला कशाची भीती वाटते ? तू का ओरडतोस ? तुझ्या पाठीमागे कोण लागले आहे ? अरे नीच मेकडा, घाबरट उंदरा, तुला कोण इजा करीत आहे ? भित्र्या, तुझे हृदय काय लोण्याचे आहे ? अरे हीन असंतुष्ट प्राण्या, तुला काय कमी आहे ? रिफेन पर्वताच्या खडबडीत खडकावरून अनवाणी चढून जाण्याचे तुझ्या नशिबी आले, तर तू काय म्हणशील ? अरे, एखाद्या सरदाराप्रमाणे तू येथे रुबाबात बसला आहेस. तुझ्या दोन्ही बाजूस रम्य व विपुल प्रदेश आहे. तू जर या आनंददायक नदीच्या प्रशांत प्रवाहातून हळूहळू वहात गेलास, तर मुख्य समुद्राला लौकरच जाऊन पोहचशील. आतापर्यंत आपण दीड दोन हजार कोस नदीतून खाली आलो आहोत. येथील अक्षांश मोजण्याचे यंत्र माझ्याजवळ असते, तर आपण किती पुढे आलो हे मी तुला सहज सांगितले असते. दोन ध्रुवांना सारख्या अंतरावर छेदून जाणारी अयन रेषा आपण ओलांडली आहे की लौकरच ओलांडणार आहोत; हे मला थोडेफार कळते. "

सँको म्हणाला, " आपण म्हणता त्या रेषेपर्यंत आपण जाऊन पोहोचलो, म्हणजे आपण किती दूर गेलो असे होईल ? " डॉन क्विक्झोट उत्तरले, " खूपच दूर, मी म्हणतो त्या रेषेखाली आपण आलो, म्हणजे आपण या भूगोलाचा अर्धा भाग आक्रमिल्यासारखे होईल. जगातील महान विश्वशास्त्रज्ञ टॉलेमी याच्या पद्धतीप्रमाणे आणि गणनेप्रमाणे हा भूभाग तीनशे साठ अंशांचा आहे. " सँको म्हणाला, " हायरे दैवा, तुम्ही तर आपल्या बोलण्याला प्रमाण म्हणून भल्या टॉल्मेसारख्या शहाण्या माणसाला त्याच्या ' भंजन '–कुंडादि सटरफटरसह–माझ्यापुढे उभे केले आहे. " सँकोच्या चुका ऐकून डॉन क्विक्झोट यांनी स्मित केले आणि ते पुढे म्हणाले, " ईस्ट इंडीजला जाण्यासाठी जे स्पॅनिश लोक आणि इतर माणसे कॅडिझला जहाजावर चढतात, त्यांना आपण विषुववृत्ताची रेषा ओलांडली की काय हे जाणण्याची इच्छा असते. त्यांचा नेहमीचा शिरस्ता असा आहे की, त्यासाठी आपल्या जहाजावरच्या खलाशांच्या अंगावर एखादी ऊ जीवंत आहे का हे पाहिले म्हणजे झाले. ती रेषा त्यांनी ओलांडली असेल, तर त्यांना जहाजात एकही ऊ आढळत नाही–मग त्यासाठी त्यांनी भारंभार सोने दिले, तरी ती सापडत नाही. म्हणून सँको, तू हे लक्षात घे की, तुझ्याभोवती अद्याप एखादी ऊ हिंडताना जर तुला आढळली, तर अजून आपण त्या रेषेच्या पलीकडे गेलो नाही असे समज. पण जर ती आढळली नाही, तर आपण ती रेषा ओलांडली हे नक्की. " सँको म्हणाला, " आपल्या या साऱ्या बोलण्यातील एका शब्दावरही माझा विश्वास बसत

नाही. तथापि आपण सांगता तसे मी करीन. पण महाराज, पुनः विचार करताना मला असे वाटते की, हा वाद करण्याची काय गरज आहे ? आपण किनाऱ्यापासून पंचवीस वार सुद्धा दूर आलो नाही, हे माझ्या दोन्ही डोळ्यांनी मला दिसत नाही काय ? पहा, पहा, आपण रोझिनांट आणि डॅपल यांना जेथे सोडले तेथेच ते आहेत. आणि एकंदर प्रकरणाचा मी बारकाईने विचार करून आपल्याला शपथेवर सांगतो की, गोगलगाय जितक्या वेगाने दौडत जाईल किंवा मुंगी जितक्या जलदीने पळत जाईल, त्यापेक्षा अधिक त्वरेने आपण चाललो नाही. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, "आता आणखी काही बोलू नकोस. मी सांगितला तसा प्रयोग कर आणि बाकीचे सारे सोडून दे. आकाशातील आणि पृथ्वीवरील गोल ज्यांचे बनलेले असतात, त्या रेषा, ग्रहणे, दोन ध्रुव, ग्रह, अक्षांश-रेखांश, बारा राशी क्रांतिवृत्त, विषुववृत्त, दक्षिणायन-उत्तरायण यांची तुला काहीच माहिती नाही. या सर्वांची–किंवा निदान काहींची–माहिती तुला असती, तर आपण कोणत्या अक्षांश-रेखांशातून पार पडलो आणि कोणत्या नक्षत्र-पुंजांना आपण मागे टाकले, हे तुला स्पष्टपणे कळले असते. म्हणून मी तुला पुनः सांगतो की, तू आपली अंग-झडती घे. एखाद्या पांढऱ्या कागदाच्या तुकड्यावर ऊ जशी दिसत नाही, तशी तुझ्या अंगावर नसेलच अशी मला खात्री नाही." त्यानंतर सँकोने आपल्या मानेच्या डाव्या बाजूकडे आपला हात अत्यंत काळजीने नेला आणि तेथे थोडा वेळ तो हालविला. मग त्याने आपले डोके वर केले आणि आपल्या मालकाच्या मुद्रेकडे चकित दृष्टीने पहात व माने-वरून काही वस्तू बाहेर काढीत तो म्हणाला, "पहा, पहा, महाराज, तुमचा नियम तरी चुकीचा असेल, नाही तर, तुम्ही सांगितलेल्या जागेपासून आपण पुष्कळ मैल दूर गेलेले असू." डॉन क्विक्झोट उत्तरले, "ते कसे ? सँको, तुला काही गवसले की काय ?" सँको म्हणाला, "होय, होय, महाराज, मला पुष्कळ गवसले." असे म्हणून त्याने आपली बोटे हालविली आणि झाडली. नंतर त्याने आपला सारा हात नदीत धुतला. त्या नदीच्या प्रवाहातून ती होडी हळूहळू चालली होती. तिला कोणी गुप्त जादूगार किंवा अज्ञात शक्ती चालवीत होती असे नव्हे, आतापर्यंत शांत व संथ असलेल्या नदीच्या प्रवाहानेच ती होडी ढकलली जात होती.

यावेळी नदीच्या मध्यभागी दोन मोठ्या पाणचक्क्या असल्याचे त्यांच्या नजरेस पडले. त्या दिसताच डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाला पाचारून म्हणाले, "अरे माझ्या सँको, पहा, पहा, पलीकडे असलेले ते शहर किंवा किल्ला तुला दिसतो काय ? तेथेच कोणी शिलेदार संकटात सापडलेला असेल किंवा कोणी राणी वा राजकन्या डांबून ठेवलेली असेल. त्यांच्या साहाय्यासाठीच मला तिकडे नेले जात आहे." सँको म्हणाला, "शहर किंवा किल्ला या तुमच्या म्हणण्याचा अर्थ काय ? हाय रे दैवा ! अहो, धान्य दळण्यासाठी नदीच्या मध्यभागी उभारलेल्या त्या पाणचक्क्या आहेत–दुसरे काही नाही–हे तुम्हाला कळत नाही काय ? महाराज, आपल्या तोंडावर नाक आहे, हे

जितके स्पष्ट आहे, तितकेच हेही उघड आहे." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले "सँको, शांत रहा, त्या पाणचक्क्यासारख्या दिसतात हे मी कबूल करतो, पण त्या तशा नाहीत. मी यापूर्वीच तुला किती तरी वेळा सांगितले नाही काय की, हे जादूगार आपल्या इच्छेप्रमाणे कोणत्याही वस्तूचे रूप बदलतात आणि ती वस्तू उलटीपालटी करतात. ते आपले जीवन बदलू शकत नाहीत, पण सोंग घेऊन आपले रूप मात्र बदलू शकतात. माझे एकमेव आशा-स्थान असलेल्या डल्सिनियाचे विद्रूप रूपांतर हे याचे उदाहरण होय."

आता ती होडी प्रवाहाच्या अगदी जोरात सापडली आणि म्हणून पूर्वीपेक्षा जरा जलद चालू लागली. पाणचक्कीवरील लोकांना ती होडी आपल्या गिरणीच्या थेट चक्रावर वहात वहात येत असल्याचे दिसले. म्हणून तिला थांबविण्यासाठी लांब लांब वासे घेऊन ते बाहेर आले. त्यांच्या चेहऱ्यावर आणि कपड्यावर धान्याचे पीठ सांडलेले होते, म्हणून त्यांचे रूप अत्यंत विलक्षण दिसत होते. शक्य तितक्या जोराने ओरडून ते म्हणाले, "अरे, कोण आहे तेथे? सैतान आला आहे की काय? होडीतील तुम्ही माणसे वेडी आहात काय? थांबा, थांबा, नाही तर तुम्ही पाण्यात बुडाल किंवा या गिरणीच्या चाकांनी तुमचा चक्काचूर होईल." डॉन क्विक्झोट त्या गिरणीवाल्यावर नजर टाकून म्हणाले, "सँको, मी तुला सांगितले नव्हते का, जेथे माझे शस्त्रसामर्थ्य दाखविणे जरूर आहे अशा ठिकाणी आपण पोहोचू? माझ्याशी टक्कर देण्याला हे नालायक लोक, हे भयंकर बदमाश पुढे सरसावले आहेत! माझी वाट अडविण्यास ही किती पिशाच्चे पुढे आली आहेत! अरे, यांची शरीरे तरी किती विद्रूप आहेत पहा-केवळ बागुलबुवा आहेत. पण नीचांनो, तुमचे सारे प्रयत्न किती फोल आहेत हे मी तुम्हाला दाखवून देतो."

नंतर होडीत उभे राहून त्यांनी संतप्त सुरात त्या गिरणीवाल्यांना धमकावण्यास सुरवात केली. ते ओरडले, 'अरे क्षुद्र गुलामांनो! जगातील नीच आणि बेछूट मूर्खांनो, तुम्ही आपल्या किल्ल्यात किंवा तुरुंगात ज्या बंदिवान माणसाला डांबून ठेवले आहे आणि ज्याचा छळ चालविला आहे, त्याला तत्काळ बंधमुक्त करा-मग तो उच्च कुळातील असो किंवा अधम कुळातील असो. अरे, मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. मला 'सिंहाचा शिलेदार' म्हणतात. दैवी आज्ञेने हे साहसी कृत्य सुखाने सिद्धीस नेण्याचे कार्य माझ्यासाठी राखून ठेवलेले आहे.'' असे म्हणून त्यांनी आपली तलवार उपसली आणि तिचे वार हवेवर करण्यास सुरुवात केली—जणू काही गिरणीवाल्याशी त्यांचे प्रत्यक्ष युद्धच जुंपले आहे. त्यांचे मूर्खपणाचे शब्द त्यांनी ऐकले, पण त्यांना त्यांचा काहीच बोध झाला नाही. ती होडी थांबविण्यासाठी ते हातात उंच काठ्या घेऊन उभे राहिले. आता ती होडी गिरणीच्या तटाजवळ आली होती आणि वेगवान प्रवाहामध्ये व चक्रांच्या अरुंद पट्ट्यामध्ये सापडण्याच्या बेतात होती.

मध्यंतरीच्या काळात सँकोने गुडघे टेकून भक्तिभावाने प्रार्थना करण्यास प्रारंभ

केला, “देवा! आतां एकदांच तू मला या प्रचंड संकटातून वाचव रे!” आणि काय सांगावे? त्याच्या प्रार्थनेला चांगले फळ आले. कारण, गिरणीवाल्याने आपल्या काठ्यांनी ती होडी थांबविली, पण ती उलटली. त्यामुळे डॉन क्विक्झोट व सँको नदीत पडले. शिलेदारजींना बदकाप्रमाणे पोहावयास येत होते, हे ठीक आहे. पण त्यांच्या अंगावरील चिलखताच्या वजनामुळे ते दोनदा बुडून नदीच्या तळाशी गेले. त्या गिरणीवाल्यांनी पाण्यात बुडी मारली नसती आणि त्या धन्याला व सेवकाला बाहेर खेचून काढण्याचा प्रयत्न केला नसता, तर त्या दोघांच्याही आयुष्याचा ग्रंथ तेथेच आटोपला असता. पण वजन उचलणाऱ्या यंत्राप्रमाणे त्यांनी त्यांना वर उचलून काढले.

त्या दोघांना किनाऱ्यावर जोराने ओढून नेण्यात आले. त्यावेळी ते तहानेल्यापेक्षा भिजून चिंबच झाले होते. सँकोने पुनः गुडघे टेकले आणि हात व डोळे उंचावून त्याने परमेश्वराची मनापासून प्रार्थना केली की, “प्रभो! माझ्या धन्याच्या मूर्ख व साहसी कृत्यापासून मला यापुढे वाचीव रे बाबा!”

आता त्या होडीचे मालक असलेले कोळी तेथे आले. आपल्या होडीचे तुकडे तुकडे झालेले पाहून ते सँकोवर तुटून पडले आणि त्याला बदडू लागले. आपल्या होडीचे नुकसान भरून देण्याची मागणी त्यांनी त्याच्याकडे व त्याच्या मालकाकडे केली. त्यांचे आपण काहीच नुकसान केले नाही, अशा निर्विकार भावनेने आणि मोठ्या गांभीर्याने त्यांनी त्या गिरणीवाल्यांना आणि कोळ्यांना सांगितले, “या किल्ल्यात अन्यायाने ज्यांना डांबून ठेवण्यात आले आहे, त्यांना तुम्ही जर सरळपणाने सोडले, तर मी होडीचे पैसे द्यावयास तयार आहे,” ते ऐकून गिरणीवाला म्हणाला, “अरे वेड्या, कोण माणसे आणि कसला किल्ला? आमच्या गिरण्यांमध्ये पीठ दळून घेण्यासाठी जे लोक आपले धान्य आणतात, त्यांना येथून पळवून नेण्याचा तुमचा विचार आहे काय?”

डॉन क्विक्झोट स्वतःशी म्हणाले, “मानव–जातीची खरवड असलेल्या अशा या माणसांची आर्जवे करून त्यांना एखादे शुभ व उदार कृत्य करावयास लावण्याची आशा धरणे, हे एखाद्या दगडी भिंतीपुढे प्रवचन करण्याइतकेच व्यर्थ आहे. या साहसी कृत्यामध्ये दोन शहाण्या जादूगारांचा सामना चाललेला दिसतो. एक दुसऱ्याला अडवीत आहे. एकाने मला होडी दिली, तर दुसऱ्याने मला तीत बुडविले. ईश्वर आम्हास चांगले दिवस दाखवो! येथे शहाला प्रतिशह आहे. या जगात एकाने दुसऱ्याचे कार्य उलथून पाडावे, तर दुसऱ्याने, उलट पहिल्याचे. बरे आहे, मी अधिक काही करू शकत नाही.” नंतर आपला आवाज चढवून आणि त्या पाणचक्क्याकडे दृष्टी रोखून ते म्हणाले, “अरे माझ्या प्रिय मित्रांनो, या तुरुंगात बंदिवान झालेले तुम्ही कोणीही असा, तुम्ही मला क्षमा करावी अशी माझी प्रार्थना आहे. माझ्या आणि आपल्या दुर्दैवाने असे निश्चित केलेले दिसते की, मी तुम्हाला तुमच्या बंदिवासातून मुक्त करू नये. ते काम दुसऱ्या कोणा तरी शिलेदारासाठी राखून ठेवलेले असावे.” असे म्हणून त्यांनी त्या कोळ्याशी समेट केला आणि होडीची नुकसान–भरपाई म्हणून त्यांना पन्नास रील

देण्यास सँकोला हुकूम दिला. सँकोने मोठ्या नाखुशीने ते पैसे काढले, आणि त्याहून अधिक नाखुशीने ते त्यांना दिले. त्यावेळी तो आपल्या ओठांमध्ये पुटपुटला, "अशा दोन मोहिमा निघाल्या की आमच्या पैशाचा सारा साठा खलास!"

मानवी प्रजेतील हे दोन विचित्र अवतार पाहून ते कोळी व गिरणीवाले यांना आश्चर्य वाटल्यावाचून राहिले नाही. त्या दोघांपैकी कोणीही इतर माणसाप्रमाणे बोलत नव्हता की वागत नव्हता. डॉन क्विक्झोट यांच्या बेफाम बोलण्याचा अर्थ काय, याचा त्यांना काहीच अंदाज करता येईना. म्हणून त्या दोघांना वेडे मानून ते तेथून निघून गेले – गिरणीवाले आपल्या गिरण्याकडे आणि कोळी आपल्या झोपड्याकडे. डॉन क्विक्झोट आणि सँको हेही निर्बुद्ध जनावरांच्या जोडीप्रमाणे आपल्या जनावरांकडे गेले. अशा प्रकारे मंतरलेल्या होडीची मोहीम समाप्त झाली.



प्रकरण ३०

# शिकारी सुंदरीशी डॉन क्विक्झोट यांचा घडलेला प्रसंग

भिजलेल्या शरिरांनी आणि दुःखी मनांनी शिलेदार व सेवक रोझिनांट व डॅपल यांच्याकडे परत गेले. त्या दोघांपैकी सँको मनाने अधिक खचलेला होता. त्याचे चित्त थाऱ्यावर नव्हते. आपला पैसा गमावला याचे दुःख त्याच्या अंतःकरणाला फार झाले. आपल्या हृदयाच्या रक्ताइतके किंवा आपल्या डोळयांच्या बाहुल्यांइतके तो पैशाला जपत असे. थोडक्यात सांगायचे तर, एकमेकाशी काही न बोलता ते त्या सुप्रसिद्ध नदीपासून निघाले आणि घोड्याजवळ गेले. डॉन क्विक्झोट आपल्या स्वच्छंद कल्पना–तरंगात बुडून गेले आणि सँको आपल्या बढतीच्या विचारात बुडाला. आपली बढती अजून फार दूर आहे, असे त्याला वाटले. तो कितीही मूर्ख असला तरी त्याला हे स्वच्छ दिसून आले की, आपल्या धन्याची सारी–निदान बहुतेक सारी–कृत्ये केवळ मूर्खपणाची आहेत. म्हणून धन्यापासून निसटून आपल्या घरी जाण्याच्या संधीची तो वाट पहात होता. आणखी काही हिशेब न करता किंवा निरोप घेण्याचा उपचार न करता तो निघून जाणार होता. पण त्याच्या अपेक्षेपेक्षा चांगला प्रसंग दैवाने त्याच्यापुढे वाढून ठेवलेला होता.

दुसरे दिवशी संध्याकाळचे सुमारास असे घडले की, ते दोघे जंगलातून बाहेर येत असताना डॉन क्विक्झोट यांची दृष्टी एका हिरव्यागार मैदानावरून फिरली. त्याच्या दूरच्या टोकाशी त्यांना काही माणसांचा समूह दिसला. जवळ जाऊन पाहिल्यावर त्यांना वाटले, ही घरंदाज माणसे असावीत आणि करमणुकीसाठी ती बहिरी ससाण्याची शिकार करीत असावीत. आणखी जवळ गेल्यावर त्यांना एक अत्यंत सुंदर स्त्री दिसली. हलुहळू चालणाऱ्या पांढऱ्या घोडीवर ती बसलेली होती. त्या घोडीच्या अंगावर हिरवा साज घातलेला होता आणि खोगिरावरील कापड जरीचे होते. खुद्द त्या स्त्रीचा वेश हिरव्या रंगाचा होता. तो इतक्या भारी किंमतीचा व डामडौलाचा होता की, त्याहून अधिक सुंदर जगात दुसरे काही असूच शकणार नाही. आपल्या डाव्या मुठीवर तिने बहिरीससाणा धारण केलेला होता. त्यावरून डॉन क्विक्झोट यांनी अनुमान केले की, ही स्त्री कुलवंताची असावी–तिच्याबरोबर असणाऱ्या पथकाची स्वामिनी असावी–आणि खरोखर ती तशीच होती. तेव्हा आपल्या सेवकाला हाक मारून ते म्हणाले, " माझ्या बाळा सँको, मुठीवर बहिरीससाणा घेतलेल्या व तट्टावर बसलेल्या त्या महिलेकडे धावत जाऊन तिला सांग, ' सिंहाचा शिलेदार ' मी बाईसाहेबांना अदबीने सलाम करतो. आपली मर्जी असेल तर

आपण मला आज्ञा करावी. ती स्वीकारण्यास मला अभिमान वाटेल. आपली सेवा करण्याची आणि आपल्या कोमल हस्तांचे चुंबन घेण्याची मला अनुज्ञा द्यावी. पण सँको, तू हा माझा संदेश नीट पोहोचविण्याची काळजी घे आणि मी केलेल्या प्रशस्ती-मध्ये तुझ्या म्हणींची भरती करू नकोस."

सँको म्हणाला, "हे मला कशाला सांगता? शब्दांच्या भरतीबद्दल आपण मला काही सांगण्याची गरज नाही. उच्च दर्जाच्या सामर्थ्यशाली महिलेकडे आपला दूत म्हणून यापूर्वी मी कधी गेलो नाही काय?" डॉन क्विक्झोट उत्तरले, "तसा तू कधी माझ्यासाठी तरी गेल्याचे मला माहीत नाही. मी तुला डल्सीनियाकडे पाठविले होते, तेवढाच एक प्रसंग मला आठवतो." सँको म्हणाला, "असेल, असेल, तसे असेल. पण चोख पैसे चुकते करणाराला जामीनाची गरज नसते. जेथे आहे लयलूट, तेथे पाहुण्यांना येत नाही खूट. याचा अर्थ इतकाच की, तुम्ही मला काही सांगण्या–शिकविण्याची गरज नाही. कारण मी जरी मूर्ख दिसत असलो, तरी मला प्रत्येक गोष्टीची थोडी थोडी माहिती आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक, ठीक. माझा त्यावर विश्वास आहे. जा तर मग चांगल्या मुहूर्तावर. ईश्वर तुला स्फूर्ती देवो आणि वाट दाखवो."

सँको आपल्या गाढवावर चढला. त्याने डॅपलला पूर्वीची मंदगति टाकून वेगाने दौडावयास लावले. त्या सुंदर शिकारी स्त्रीपाशी जाताच तो गाढवावरून खाली उतरला आणि गुडघे टेकून म्हणाला, "सुंदर बाईसाहेब, पलीकडे उभा असलेला आणि 'सिंहाचा शिलेदार' म्हणून ओळखला जाणारा शिलेदार माझा धनी आहे. मी त्याचा शागीर्द आहे आणि माझे नाव सँको पँझा आहे. या 'सिंहाच्या शिलेदाराला' काल-पर्यंत 'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' म्हणत असत. त्याने आपल्यासाठी माझ्यापाशी असा निरोप दिला आहे की, आपण कृपा करून आपल्या स्वर्गीय रूपाची सेवा करण्याची अनुज्ञा द्यावी. आपला 'कायमचा गुलाम' व्हावे एवढीच माझी मनीषा आहे. तरी त्यासाठी बाईसाहेबांनी आपल्या मर्जीनुसार परवानगी द्यावी. स्वतःच्या कल्याणासाठीच आपण ते केल्यासारखे होईल आणि मी ते आपल्या परम दयाळूपणाचे चिन्ह समजेन." ती स्त्री म्हणाली, "इमानी सेवका, अगदी बरोबर. अशा राजदूताच्या अंगी जे जे शोभिवंत गुण असावे लागतात, त्यांचा उपयोग करून तू आपले कर्तव्य चोखपणे पार पाडले आहेस. ऊठ, कृपा करून ऊठ. 'दुःखी चेहऱ्याच्या शिलेदारा'ची कीर्ती आणि गुणवत्ता आम्हाला अपरिचित नाहीत. अशा थोर शिलेदाराच्या शागीर्दाने गुडघे टेकून राहावे हे मुळीच योग्य नाही. म्हणून ऊठ आणि आपल्या धन्याला कळव की, आपल्या संगतीचा मान आपण आम्हांस द्यावा. माझे यजमान ड्यूक व मी जवळच असलेल्या आमच्या घरी त्यांचा सन्मान करू."

सँको उठला. तिच्या सौंदर्यापेक्षा तिच्या सौजन्याने तो अधिक विस्मित झाला. त्यातही आपल्या धन्याचे गुण तिला अपरिचित नाहीत, हे समजल्यामुळे तर तो

अधिकच चकित झाला. तिने आपल्या धन्याला 'सिंहाचा शिलेदार' म्हणून न संबोधिता 'दुःखी चेहऱ्याचा शिलेदार' म्हणून का म्हटले, याचे त्याला आश्चर्य वाटले नाही, कारण 'सिंहांचा शिलेदार' ही पदवी डॉन यांनी नुकतीच धारण केली होती. ती डचेस म्हणाली, ( तिची विशिष्ट पदवी आपल्याला अद्याप माहीत नाही ) "ला मांचा येथील सुविख्यात 'डॉन क्विक्झोट' या नावाने ज्याचा इतिहास छापून प्रसिद्ध झाला आहे, तो तुझा धनीच ना ? त्याच्या प्रेमाची स्वामिनी टोबोसोची डल्सीनिया नावाची कोणी तरुणी आहे, हे खरे ना ?" सँको म्हणाला, "अगदी बरोबर. तेच हे शिलेदार. आणि त्या ग्रंथात नोंदलेला असेल–किंवा असावा–तो त्याचा शागीर्द, सँको पँझा, मी स्वतःच आहे. छापखान्यात–त्या पाळण्यात–माझे नाव बदलले नसेल, असे मी समजतो." डचेस म्हणाली, "हे सारे ऐकून मला अतिशय आनंद वाटतो. मित्रा पँझा, जा तर मग आणि आपल्या धन्याला सांग, 'आमच्या प्रदेशात आपण आला, म्हणून मी आपले अभिनंदन करते. आपले स्वागत असो. आपल्या आगमनाच्या वार्तेने दुसऱ्या कोणत्याही वार्तेपेक्षा मला अधिक आनंद झाला आहे, हे तू त्यांना माझ्या वतीने ठामपणे सांग."

या आनंददायक उत्तराने अत्यंत हर्ष पावून सँको आपल्या धन्याकडे परत गेला आणि ती थोर स्त्री आपल्याला काय म्हणाली, हे सर्व त्याने त्यांना जसेच्या तसे सांगितले. तिचे महान लावण्य आणि सौजन्यपूर्ण स्वभाव यांचे वर्णन आपल्या विदूषकी भाषेत करून त्याने तिला अस्मानापर्यंत चढविले.

या शुभारंभाने संतुष्ट होऊन डॉन क्विक्झोट खोगिरावर ऐटीने बसले, आपल्या पायाची बोटे त्यांनी रिकिबीत घट्ट रोवली व आपल्या मुद्रेला शोभेल अशा स्वरूपात आपल्या शिरस्त्राणाचा पुढील भाग ठेवला आणि रोझिनांटला चेतविले आणि मोठा आशावाद बाळगून ते त्या डचेसच्या हस्ताचे चुंबन घेण्यासाठी पुढे निघाले. तिच्यापासून सँको दूर जाताच, तिने आपल्या पतीला – ड्यूकला – बोलावून घेतले आणि डॉन क्विक्झोटच्या दूताचा वृत्तांत त्याला सांगितला. तेव्हा ती दोघे त्यांच्या आगमनाची आनंदाने व उत्सुकतेने वाट पाहू लागली. या दोघांच्या इतिहासाचा पूर्वार्ध ड्यूक व डचेस यांनी वाचलेला असल्यामुळे त्यांचा परिचय करून घेण्यास ते अत्यंत उत्सुक होते. त्या दोघांनी असे ठरविले की, हे शिलेदार आपल्याबरोबर जितका काळ राहतील, त्या काळात त्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणे वागू द्यावयाचे आणि साऱ्या बाबतीत त्यांना आपण खूष करावयाचे. शिलेदाराच्या पाहुणचारासाठी जरूर ते सर्व उपचार आपण करू, असे ते म्हणाले. त्या उपचारांची त्यांना चांगली माहिती होती. कारण तशा प्रकारच्या पुस्तकाचा त्यांना चांगला परिचय होता.

आता डॉन क्विक्झोट आपल्या शिरस्त्राणाची झापड उचलून जवळ आले. ते घोड्यावरून खाली उतरण्याच्या तयारीत आहेत, असे पहाताच त्यांची रिकीब धरण्यासाठी सँको शक्य तितक्या त्वरेने तिकडे गेला. पण दुर्दैव असे की, तो स्वतः गाढवा-

वरून खाली उतरण्यासाठी आपला पाय खोगीरावरून काढीत असताना पट्ट्याप्रमाणे बांधलेल्या दोरामध्ये त्याचा पाय विलक्षण रीतीने गुरफटला गेला आणि तो त्याला काढता येईना. म्हणून तो टाचेने लोंबकळत राहिला आणि त्याचे नाक जमिनीला टेकले. उलट डॉन क्विक्झोट यांना अशी सवय होती की, ते जेव्हा घोड्यावरून खाली उतरत, तेव्हा रिकीब सँको घट्ट धरून ठेवी. आताही त्याने तसेच केले असेल, असे समजून त्यांनी आपला उजवा पाय खोगीरावरून वर घेतला. पण रिकिबीचा पट्टा नीट बांधलेला नसल्या-मुळे शिलेदारजी जमिनीवर कोसळले. तेव्हा ते शरमेने चूर झाले – गोंधळले आणि सँकोवर शिव्याशापांची लाखोली वाहू लागले– ते ओठातल्या ओठात पुटपुटू लागले. सँकोचाही पाय अजून अडकलेलाच होता.

त्या दोघांची ही दुर्दशा पाहून ड्यूकने त्यांना मदत करण्याचा आपल्या लोकांना हुकूम दिला. त्यांनी डॉन क्विक्झोट यांना वर उचलले. पडल्यामुळे त्यांची स्थिती अत्यंत वाईट झाली होती. तरी लंगडत–लंगडत डचेसला अभिवादन करण्यासाठी ते निघाले. तिच्या घोड्याच्या पायाशी गुडघे टेकून ते अभिवादन करणार होते. पण ड्यूक त्यांना तसे करू देईना. घोड्यावरून खाली उतरून ड्यूकने डॉन क्विक्झोट यांना आलिंगन दिले आणि ते म्हणाले, "अहो, दुःखी चेहऱ्याचे शिलेदारजी, माझ्या प्रदेशात आपले प्रथम आगमन होण्याचे वेळीच आपली अशी दुर्घटना घडावी, याचे मला दुःख वाटते. पुष्कळ वेळा नोकरांच्या हयगयीमुळेच भीषण अपघात घडून येतात." डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे उदार राजपुत्रा, येथे माझ्यावर जी आपत्ती कोसळली, तिचे मला मुळीच वाईट वाटत नाही. कारण महाराजांच्या दर्शनाचे सौख्य मला येथे लाभले. मी जरी अगदी पृथ्वीच्या केन्द्रात जाऊन पडलो असतो, तरी आपल्या या मुलाखतीच्या बळाने पुनः वर आलो असतो. माझा सेवक–तळपट होवो त्याचे!– आपल्या तिखट नि मोकाट जिभेला सैल सोडतो, पण खोगीर काही घट्ट बांधीत नाही. पण मी जमिनीवर पडलेला असलो, ताठ उभा असलो, घोड्यावर बसलेला असलो किंवा पायी चालत असलो, तरी महाराजांच्या आज्ञेचे पालन मी सदैव करीत राहीन– तसेच आपल्या सुयोग्य धर्म-पत्नीच्या – डचेसच्या – सेवेस सदा सिद्ध असेन. त्यांना मी 'सुयोग्य' म्हटले, ते अगदी खरे आहे. 'सौंदर्य–सम्राज्ञी' किंवा 'सौजन्य–सम्राज्ञी' असे त्यांना म्हणणेच योग्य." ड्यूक म्हणाला, "मला क्षमा करा. अहो ला मांचा येथील माननीय डॉन क्विक्झोट, जेथे अद्वितीय डल्सीनियाचे स्मरण होत आहे, तेथे इतर सर्व सौंदर्यवतींची प्रशंसा विसरली पाहिजे."

आता सँको त्या बंधनातून मोकळा झाला होता. आपल्या धन्याने उत्तर देण्या-आधी तो डचेसजवळ उभा राहून म्हणाला, "महाराणीसाहेबांची परवानगी असेल तर मी असे सांगू इच्छितो की, टोबोसोची डल्सीनिया ही अत्यंत सुंदर व देखणी आहे, हे कोणालाच नाकारता येणार नाही–स्पेनमधील कोणत्याही भागात नाकारता येणार नाही, हे मी ठामपणे सांगतो. पण अशी म्हण आहे ना, 'कल्पनाही नसते तिथून ससा बाहेर पडतो.'

तुमचे जाडेजाडे पंडित म्हणतात, जिला तुम्ही निसर्गदेवता म्हणता, ती कुंभारासारखी आहे. ज्याला एक चांगले मडके बनविता येते, तो दोन-तीनशे मडकी घडवू शकेल. याचा अर्थ असा की, या राणीसाहेब टोबोसोच्या डल्सीनियापेक्षा सौंदर्यात अणुमात्र कमी नाहीत." नंतर डॉन क्विक्झोट हे स्वतः डचेसला उद्देशून म्हणाले," महाराणीसाहेबांनी हे लक्षात घ्यावे की, माझ्या सेवकासारखा सतत बडबड करणारा आणि आपल्या शागीर्द-पणाची ऐट मिरविणारा दुसरा सेवक कोणाही शिलेदाराला कधी मिळाला नसेल. आपल्या सेवेत काही काळ काढण्याचा मान मला लाभला तर माझे हे बोलणे खरे असल्याचे आपल्या ध्यानी येईल. "

डचेस म्हणाली, " सँको इमानी आहे आणि अभिमानी पण आहे, याचा मला आनंद वाटतो. त्याच्या शहाणपणाचीच ही चतुर खूण आहे. कारण महाराज, आपल्याला हे माहीत आहे की, अभिमान किंवा ऐट ही मठ्ठ डोक्याच्या माणसाला कधी असत नाहीत. म्हणून सँको जर आनंदी–विनोदी असेल, तर तो बुद्धीमानही असला पाहिजे हे मी खात्रीने सांगते. " डॉन क्विक्झोट यांनी पुष्टी जोडली, " बाईसाहेब, तो वटवट करणाराही आहे. " ड्यूक म्हणाला, " मग फारच चांगले. जो माणूस चातुर्याने बोलतो तो कितीही बोलला तरी थोडेच. पण येथे आपला वेळ कशाला वाया घालवायचा ? दुःखी चेहऱ्याचे शिलेदारजी, चला. " सँको म्हणाला, " ' सिंहाचा शिलेदार ' असे राजे-साहेबांनी म्हणावे-' दुःखी चेहरा ' आता काळाच्या पडद्यामागे गेला आहे; म्हणून, ' सिंह ' खेळायला बाहेर येऊ द्यात. " ड्यूक म्हणाला, " ठीक तर ! ' सिंहाच्या शिलेदारांना ' मी प्रार्थना करतो की, जवळच असलेल्या माझ्या किल्ल्यात आगमन करण्याची कृपा करावी. तेथे त्यांच्यासारख्या सुविख्यात माणसाचा योग्य तो पाहुणचार केला जाईल. या मार्गाने प्रवास करणाऱ्या सर्व शिलेदारांना मी किंवा डचेस जे मान सन्मान देऊ शकत नाही, ते त्यांना प्राप्त होतील. "

हे बोलणे होईपर्यंत सँकोने रोझिनांटला तयार केले आणि त्याचे खोगीर घट्ट बांधले. मग डॉन क्विक्झोट आपल्या घोड्यावर स्वार झाले आणि ड्यूक स्वतःच्या उमद्या घोड्यावर बसले. त्या दोघांच्यामध्ये डचेस आपल्या तट्टावर होती. तीं तिघेजण किल्ल्याकडे चालली. सँको आपल्याजवळ नेहमी असावा, अशी डचेसची इच्छा होती. कारण त्याच्या चुमचुरीत म्हणींचा पगडा तिच्या मनावर फार पडला होता. सँकोची आर्जवे करण्याची गरज नव्हती. तो त्यांच्यामध्ये गर्दीने घुसला आणि त्यांच्या संवादातील चौथा भागीदार झाला. त्यामुळे ड्यूक व डचेस या उभयतांना मोठा संतोष वाटला. अशा भटकत्या शिलेदारजींचे आणि त्यांच्या धांदरट सेवकाचे स्वागत आपल्या किल्ल्यात करण्याची संधी मिळाल्यामुळे, ते स्वतःला अत्यंत भाग्यवान समजत होते.

□ □

## प्रकरण ३१

# पुष्कळ मोठमोठ्या गोष्टींचा परामर्श

आपल्यावर डचेसची इतकी मेहेरबानी आहे हे पाहून सँकोला अतिशय आनंद वाटला. डॉन डीएगो आणि बेसिल यांच्या घरी आपण जसे वागलो, त्याहून वाईट प्रकारे आपण डचेसच्या किल्ल्यात वागता कामा नये, असे त्याने आपल्या मनास बजावले. खाण्यापिण्याची लयलूट असावी असे त्याला नेहमी वाटे–समृद्ध जीवनाचा तो सच्चा दोस्त होता. म्हणून जेव्हा जेव्हा तशा संधी त्याला मिळत, तेव्हा त्या पकडण्यास तो कधी चुकत नसे.

आता या इतिहासात असे नमूद केलेले आहे की, ते दोघे किल्ल्यापाशी जाऊन पोहोचण्यापूर्वी ड्यूक त्यांच्यापासून दौडत पुढे गेला आणि डॉन क्विक्झोट यांच्याशी कसे वागावे, याच्या सूचना त्याने आपल्या नोकरांना दिल्या. त्यामुळे शिलेदारजी वेशी-पाशी येतात न येतात तोंच दोन मोतद्दारांनी त्यांचे स्वागत केले. लालभडक सॅटिनीचा, रात्री घालण्याच्या आंगरख्यासारखा पायघोळ झगा त्यांचे अंगावर होता. त्या दोघांनी शिलेदारजींना तत्काळ आपल्या बाहूत घेतले आणि गाजावाजा न करता त्यांना त्यांच्या घोड्यावरून उचलून जमिनीवर खाली ठेवले. ते म्हणाले, " महान् पराक्रमी महाराज, आता आपण पुढे व्हा आणि डचेसना खाली उतरण्यास मदत करा." तेव्हा डॉन क्विक्झोट तिकडे गेले आणि तसे करू लागले. तेव्हा उभयपक्षी अभिवादनांची देवाण-घेवाण झाली आणि त्यांनी एकमेकांचा पुष्कळ गौरव केला. पण शेवटी डचेसचाच निग्रह यशस्वी झाला. आपल्या पतीच्या हातूनच आपण आपल्या तट्टावरून खाली उतरू असा तिचा आग्रह होता. "इतक्या क्षुल्लक कामाचा भार घेण्याची तसदी आपल्या-सारख्या थोर शिलेदारांना मी देऊ शकत नाही याची क्षमा असावी." असे ती म्हणाली. तेव्हा ड्यूकने तिला खाली घेतले. आता ते सर्वजण एका प्रशस्त पटांगणात आले. तेव्हा दोन लावण्यवती युवती तेथे आल्या आणि त्यांनी डॉन क्विक्झोट यांच्या खांद्यावर उत्तम लाल रंगाचा एक मोठा झगा टाकला. क्षणार्धात त्या पटांगणाच्या भोवतालचे सगळे सज्जे स्त्री-पुरुषांनी गच्च भरून गेले. ती ड्यूकच्या घरातील माणसे होती. " शिलेदारीचा तुरा व फुलोरा असलेल्या वीर-पुरुषाचे स्वागत असो !" असा जयघोष त्यांनी केला. नंतर सर्वांनी नसले तरी बहुतेक सर्व माणसांनी डॉन क्विक्झोट, ड्यूक व डचेस यांच्यावर गुलाबपाण्याचे सिंचन केले. या सर्व स्वागतामुळे डॉन यांना

मोठा आनंद वाटला. खरोखर त्यांचा हा पहिलाच असा दिवस होता की, जेव्हा त्यांना वाटले आपण खरेखुरे शिलेदार आहोत आणि आपली शिलेदारी म्हणजे केवळ कल्पना-विलास नव्हे. प्राचीन काळी शिलेदारीच्या परंपरेतील आपल्या बांधवांचे जसे स्वागत झाल्याचे त्यांनी वाचले होते, तसेच थेट आपले स्वागत आज होत आहे, असा त्यांचा पक्का समज झाला.

सँकोचा आनंद तर गगनात मावेना. त्यामुळे त्याने आपल्या प्रिय डॅपललाही सोडून दिले आणि डचेसच्या जवळ राहून इतर लोकांबरोबर त्याने किल्ल्यात प्रवेश केला. पण आपल्या लाडक्या सोबत्याला एकटे सोडल्याबद्दल त्याची बुद्धी त्याला टोचू लागली. म्हणून तो डचेसच्या लवाजम्यातील एका पूज्य नि वृद्ध दासीकडे गेला आणि तिच्या कानात हळूच म्हणाला, "श्रीमती गोझॅलेस किंवा श्रीमती–नाही, आपण आपले नाव मला कृपया सांगाल काय ?" तेव्हा ती म्हातारी दासी म्हणाली, "माझे नाव डोन्ना रोड्रिगेझ डी ग्रिजाल्व्हा. माझ्याशी तुमचे काय काम आहे ?" सँको म्हणाला, "बाई-साहेब, माझी प्रार्थना आहे की, आपण किल्ल्याच्या वेशीपाशी जाण्याची तसदी घ्यावी. तेथे तुम्हाला माझे गाढव दिसेल. त्याला तबेल्यात नेऊन ठेवा किंवा तुमच्या घरी ठेवा. तो बिचारा प्राणी फार भित्रा आणि भेकड आहे. नवख्या ठिकाणी तो एकटा राहू शकणार नाही." तेव्हा ती म्हातारी चिडून म्हणाली, "नोकरापेक्षा मालकाला काही रीतभात नसेल, तर छानच वेळ आली म्हणायची ! अरे उर्मट इसमा, चालता हो येथून. माझा उपमर्द करण्यासाठी तुला ज्याने येथे आणले, त्याला नि तुलाही सैतान घेऊन जावो. अरे गधड्या, तुझ्या गाढवाची काळजी घेण्यासाठी दुसऱ्या बायांचा शोध अन्यत्र घे. अशी ढोरमेहनतींची कामे आमच्यासारख्या कुलीन स्त्रिया करीत नाहीत, हे समजून घे."

सँकोने उत्तर दिले, "बाईसाहेब, आपल्या नाकाला इतक्या मिरच्या झोंबून घेऊ नका. तुम्ही इतका शिष्टपणा करू नका. माझे काम तुमच्याइतक्या दर्जाच्या माणसांनी केले आहे. माझ्या धन्याला जगातील सारे इतिहास–ग्रंथ माहीत आहेत, तो माझा धनी मला सांगतो. जेव्हा सर लॅन्सेलॉट ब्रिटनमधून बाहेर आले, तेव्हा तरुणींनी त्यांची काळजी घेतली आणि दासींनी त्यांच्या घोड्याकडे लक्ष पुरविले. पण बाईसाहेब, मी खरे खरे सांगतो— मग त्यावर तुमचा विश्वास बसो वा न बसो— सर लॅन्सेलॉटच्या घोड्याची आणि माझ्या गाढवाची अदलाबदल मी कधीच करणार नाही." तेव्हा ती दासी म्हणाली, "या माणसाच्या डोक्यात मूर्खपणा भरलेला दिसतो. ऐक, मित्रा, तू जर विदूषक असशील तर आपली चेष्टा–मस्करी त्या नोकरांना दाखव. ते तुला चांगले पैसे देतील. पण तुझ्या खजिन्यात असतील त्या साऱ्या थट्टा–मस्करींना मी एक काडी-सुद्धा देणार नाही." सँको म्हणाला, "पुष्कळ झाले, तुमची इच्छाच असेल तर मी तुम्हाला गवताची काडीच देईन. हां, ती काडी चांगली हिरवीगार असेल. तुमची काडी वाळलेली, सुकलेली असेल. बस्स करा. तुमचे वय साठ वर्षांचे असेल, म्हणजे तुम्ही

मरणाच्या पंथास लागलेल्या असाल." तेव्हा ती दासी रागाने थरथरत ओरडली, "अरे, रांडलेका, बदमाशा, मी म्हातारी आहे की नाही, हे देवाला माहीत आहे. माझ्या वयाचा हिशेब तुझ्यासारख्या कंगाल माणसाला मी कधीच देणार नाही. लसूण – खाऊ माणसा, चालता हो." हे शब्द तिने इतक्या मोठ्याने उच्चारले की, ते डचेसच्या कानी पडले. आपल्या दासीचा चेहरा इतका बदललेला आहे – रागाने लाल झालेला आहे–हे पाहून "काय झाले?" असे तिने विचारले. तेव्हा ती दासी म्हणाली, "पहा बाईसाहेब, हा माणूस आपले गाढव तबेल्यात नेण्यास मला सांगत आहे. आणि वर एक रिकामटेकडी गोष्ट सांगत आहे की, कोणी एक लॅन्सेलॉट होता आणि त्याची काळजी स्त्रिया घेत असत नि त्याच्या घोड्याची काळजी दासी घेत असत. मी त्याच्या मोतद्दाराचे काम करीत नाही, म्हणून हा बेशरम माणूस मला 'म्हातारी' म्हणत आहे."

डचेस म्हणाली, "काय 'म्हातारी'? छेः छेः! कोणतीही स्त्री हा अपमान सहन करणार नाही. अरे, सच्चा सँको, तू चुकलास. ही रोड्रिगेझ अत्यंत तरुण आहे. तिने हा जो लांब झगा अंगावर घातला आहे तो म्हातारपणामुळे नव्हे, तर आपला अधिकार दाखविण्यासाठी– फॅशन म्हणून." सँको म्हणाला, "यापुढे मला जितका काळ जगता येईल, तितक्या काळात इतकी भली बाई मला दुसरी भेटणार नाही. मी जर तिची काही खोडी काढली असेल, तर त्याचे कारण मला माझ्या गाढवाविषयी स्वभावतःच फार प्रेम वाटते हे होय. म्हणून मला वाटले की, मी माझ्या गरीब जनावराला या मॅडम् रोड्रिगेझपेक्षा अधिक उदार स्त्रीच्या हाती सोपवू शकत नाही." डॉन क्विक्झोट वाकड्या नजरेने पहात सँकोला म्हणाले, "अरे, या स्थानाला तुझे हे बोलणे शोभले काय? आपण कोठे आहोत हे तुला कळते काय?" सँको म्हणाला, "महाराज, प्रत्येक माणसाने आपल्या गरजा सांगाव्यात – मग तो कोठेही असो. येथे मी डॅपलचा विचार करीत होतो, म्हणून मी त्याच्याविषयीच बोललो. तबेल्यात त्याची आठवण झाली असती, तर मी त्याच्याविषयी तेथे बोललो असतो."

ड्यूक म्हणाला, "सँकोची बाजूही कांहीशी बाजवी आहे. तरी त्याच्यावर कोणी रागावू नये. त्याने आता डॅपलची अधिक काळजी बाळगू नये. त्या गाढवाला पाहिजे तितका चारा मिळेल. सँकोप्रमाणेच त्याचीही व्यवस्था केली जाईल."

अशा किरकोळ कटकटीमुळे साऱ्या मंडळींची मोठी करमणूक झाली. त्याला अपवाद फक्त डॉन क्विक्झोट यांचा होता. त्यांना एका ऐटदार जिन्यावरून एका भव्य दिवाणखान्यात नेण्यात आले. तेथे उंची जरतारीचे खूप पडदे सोडलेले होते. त्यांच्या अंगावरील चिलखत सहा तरुणींनी काढले–नोकराऐवजी तरुणीनी ते काम केले. त्या सर्वांना ड्यूक व डचेस यांनी भरपूर सूचना दिलेल्या होत्या की, प्राचीन काळातील विख्यात शिलेदारांचा पाहुणचार जितका सुखदायक होत असे, तितका आपला झाला आहे, असे डॉन क्विक्झोट यांना वाटण्याइतकी तुम्ही त्यांची सरबराई चांगली करा.

जेव्हा त्यांच्या अंगावरील सर्व लष्करी वेष उतरविण्यात आला, तेव्हा ते केवळ

तंग तुमान व शामॉय चामड्याची बंडी या वेषात दिसू लागले. ते उंच आणि हाडकुळे दिसत होते आणि त्यांचा हेंगाडेपणा डोळ्यात भरत होता. त्यांच्या तोंडाच्या मध्यभागी त्यांचे लांब जबडे मिटलेले होते. थोडक्यात म्हणजे, त्यांची आकृती अगदी विचित्र दिसत होती. त्यांची सेवा करणाऱ्या तरुणींनी आपले हासू दाबून धरावे असा सक्त हुकूम ड्यूकने त्यांना केलेला असला, तरी आपले हासू दाबणे त्यांना कठीण जात होते. आपले कपडे काढून स्वच्छ सदरा घालण्याची परवानगी त्याने आपल्याला द्यावी, अशी त्या तरुणींची इच्छा होती, पण ते तशी परवानगी मुळीच देईनात. त्यांनी त्यांना समजावून सांगितले की, "शिलेदाराच्या अंगी शौर्याप्रमाणेच शालीनता हाही गुण प्रशंसनीय असतो. म्हणून तुम्ही सँकोकडे सदरा द्यावा अशी माझी इच्छा आहे." असे म्हणून ते शेजारच्या दालनात गेले आणि आपल्या सेवकासह आत कोंडून राहिले. तेथे एक उंची बिछाना होता. त्यांनी आपल्या अंगावरील कपडे काढले. मग ते दालनात इकडे–तिकडे हिंडू लागले. आता ते दोघेच तेथे होते, म्हणून त्यांनी सँकोची खरडपट्टी काढण्यास सुरुवात केली. ते म्हणाले,

"अरे जुन्या मध्थड डोक्याच्या आधुनिक विदूषका, तुला स्वतःसंबंधी काय म्हणावयाचे आहे? डोन्ना रोड्रिगेझसारख्या अत्यंत सन्माननीय आणि पूजनीय अशा वयोवृद्ध महिलेला अपशब्द बोलण्यास तुला कोणी शिकविले? तुझ्या डॅपलचा विचार करण्यास ती वेळ योग्य होती काय? अरे, जे गुणी लोक धन्याचे आतिथ्य थाटामाटाने करतात, ते त्याच्या जनावरांची तरतूद करण्यास विसरतील, असे तुला वाटले तरी कसे? अरे सँको, देवाखातर तरी तू आपले वर्तन सुधार आणि आपल्या गांवढळ संस्कृतीचे प्रदर्शन करू नकोस. नाही तर तू आपल्या धन्याला कलंक आहेस, असे लोक तुला मानतील. अरे उर्मट अडाण्या, जग हे सेवकाच्या शहाणपणावरून त्याच्या धन्याच्या शहाणपणाचा अंदाज पुष्कळ वेळा बांधीत असते, हे तुला माहीत नाही काय? आपल्यापेक्षा कनिष्ठ दर्जाच्या शिलेदारावर बडे शिलेदार मात करतात त्याचे एक कारण म्हणजे त्यांचे सेवक त्यांच्याइतकेच चांगले असतात. तू एक वेडपट खुषमस्कऱ्या आहेस किंवा मूर्ख विदूषक आहेस, असे जर लोकांना कळले, तर मी एक अलबत्या-गलबत्या शिलेदार किंवा कोणी लटपट्या कावळा आहे, असे लोक मानतील, हे तुझ्या टाळक्यात येत नाही काय? म्हणून लाडक्या सँको, माझी तुला प्रार्थना आहे की, अशा गैरसोयीच्या गोष्टी करण्याचे तू सोडून दे. कारण जो माणूस थट्टामस्करीच्या उड्या मारण्याकडेच अधिक लक्ष देतो, तो अडखळून आपटण्याचा संभव फार. शेवटी लोक त्याचा 'मूर्ख नि हास्यास्पद विदूषक' म्हणून तिरस्कार करतात. म्हणून बाबारे, आपली जीभ आवर, चांगला विचार कर आणि तोंडातून शब्द बाहेर पडण्यापूर्वी त्यांचे चिंतन कर. अरे, आपण अशा स्थानी आलो आहो की, ईश्वराच्या साहाय्याने आणि या माझ्या सामर्थ्यवान बाहुबलाने आपण येथून अधिक कीर्ती व संपत्ती मिळवून जाऊ, हे नक्की आहे, हे तू लक्षात घे."

"यापुढील काळात आपण चांगले वागू आणि पूर्ण विचार केल्याशिवाय वायफळ एकही शब्द बोलणार नाही, वाटल्यास आपण आपले ओठ शिवून घेऊ किंवा आपली जीभ तोडून टाकू." असे अभिवचन सँकोने आपल्या धन्याला दिले. आपण कोण आहोत हे कोणाला कळू देण्याचे भय मुळीच नाही, असेही त्याने त्यांना सांगितले. नंतर डॉन क्विक्झोट यांनी आपल्या अंगावर पोषाख चढविला, आपला पट्टा व तलवार धारण केली, आपल्या खांद्यावर आपला लाल अंगरखा टाकला आणि त्या तरुणींनी त्यांच्यासाठी ठेवलेली ऐटदार हिरव्या मखमलीची टोपी डोक्यावर ठेवली. असे सज्ज होऊन ते दिवाणखान्यात गेले. तेथे तरुण सेविकेंच्या दोन रांगा उभ्या असलेल्या त्यांना दिसल्या. त्यांना तोंड व हात धुण्यासाठी पाणी वगैरे साहित्य समारंभपूर्वक देण्यास त्या उभ्या होत्या. ते कार्य पार पाडताना त्या मोठ्या अदबीने व गांभीर्याने वागत होत्या. त्यांचा प्रक्षालन–विधि यथा-सांग झाल्याबरोबर बारा सेवक तेथे आले. त्यांच्या अग्रभागी मुख्य सेवक होता. त्या सर्वांनी त्यांना सांगितले, " ड्यूकसाहेब व डचेससाहेब आपली वाट पहात आहेत. " असे म्हणून त्यांनी त्यांना मोठ्या थाटामाटाने भोजनास नेले. काहीजण त्यांच्या मागे, तर काहीजण त्यांच्यापुढे चालत होते. त्यांनी त्यांना ज्या दुसऱ्या दालनात नेले, तेथे चार माणसांसाठी एक टेबल शोभिवंतपणे मांडलेले होते.

ते तेथे जाऊन पोहोचताच, त्यांच्या स्वागतासाठी ड्यूक व डचेस दारापर्यंत आले. त्यांच्याबरोबर गंभीर मुद्रेचा एक पाद्री होता. थोरामोठ्यांच्या घरांचा कारभार पहाण्यासाठी असे पाद्री असत. त्यांचा जन्म उच्च कुळात झालेला नसे, म्हणून उच्च कुळातील सरदारांना काय शिकवावे हे त्यांना कळत नसे – आणि म्हणून ते आपल्या मनाच्या संकुचितपणाच्या मापाने त्या थोरामोठ्यांचे औदार्य मोजीत असत. धन्याना काटकसरीचे धडे देण्याचा आव आणून ते त्यांना कंजूष बनवीत. डॉन क्विक्झोट यांच्या स्वागतार्थ ड्यूकबरोबर आलेला हा गंभीर मुद्रेचा पाद्री त्यांच्यापैकीच बहुधा असावा.

सर्वांनी एकमेकांना दरबारी पद्धतीची हजारो अभिवादने केली. शेवटी डॉन क्विक्झोट जेवणाच्या टेबलापाशी गेले आणि ते ड्यूक व डचेस यांच्यामध्ये उभे राहिले. त्याबरोबर एक नवाच तंटा निर्माण झाला. टेबलाच्या वरच्या टोकाची जागा डॉन क्विक्झोट यांना देण्यात आली. पण ती आपण नाकारली पाहिजे, असे शिलेदारजींना वाटले. पण ड्यूकने आग्रहपूर्वक त्यांची इतकी आर्जवे केली की, शेवटी शिलेदारजींना त्यांची विनंती मान्य करणे भाग पडले. त्यांच्यासमोर पाद्रीबुवा बसले आणि ड्यूक व डचेस दोन्ही बाजूला बसले.

हे सर्व होईपर्यंत सँको उभा होता. आपल्या धन्याचा होत असलेला सन्मान पाहून आश्चर्याने आ वासून तो उभा होता. आपल्या धन्याने टेबलाच्या उच्चस्थानी बसावे म्हणून ड्यूकने किती आर्जवे केली आणि त्या दोघांचे किती दरबारी शिष्टाचार झाले, हे पाहून तो म्हणाला, " कोणी कोठे बसावे याविषयी येथे आता जी खळबळ व गडबड झाली, त्या संदर्भात, आमच्या गावी एकदा काय घडले, हे मी महाराजांच्या

कृपेने सांगू इच्छितो." हे शब्द त्याच्या तोंडातून बाहेर पडतात न पडतात तोंच, डॉन क्विक्झोट थरथरा कापू लागले. हा काही तरी विचित्र गोष्ट सांगेल असे त्यांना वाटू लागले. त्यांच्यावर सँकोची दृष्टी खिळलेली होतीच. त्यांच्या हालचालीचा अर्थ चटकन लक्षात घेऊन तो आपल्या धन्याला म्हणाला, "महाराज, भिऊ नका. मी वेडेवाकडे काही बोलणार नाही, अशी ग्वाही देतो. आपल्या मुद्याला धरून असेल, तेवढेच मी बोलेन. कोठे किती बोलावे ? शहाणपणाचे बोलणे कोणते नि मूर्खपणाचे बोलणे कोणते ? याचे जे धडे आपण मला दिले, ते मी इतक्यात विसरलो नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तू काय म्हणतोस हे मला कळत नाही. तुझ्या इच्छेस येईल ते बोल– आणि ते पटकन् बोल."

ड्यूककडे वळून सँको म्हणाला, "ठीक आहे, मी जे सांगणार आहे, ते खडान्-खडा बरोबर आहे. मी माझ्या गोष्टीपासून थोडेही दूर जाऊ नये म्हणून माझा धनी येथे आहे. मी काही खोटे सांगितले तर तो माझी हजेरी घेईल." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे बाबा, तुला वाटेल तितके खोटे बोल, त्यात मी तुला अडथळा आणणार नाही. पण आपण काय बोलतो, याकडे जरा लक्ष दे." सँको म्हणाला, 'छेः छेः ! त्याची काळजी आपण करू नका. त्यासाठी आपण मला मोकळे सोडा. मी पुनः पुनः विचार केला आहे, हे आपल्या लक्षात येईलच, असे मी खात्रीने सांगतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "खरोखर महाराज, आपण या माणसाला या खोलीतून हाकलून लावले, तर ते सुखाचे होईल. नाही तर तो आपल्याला हजारो गोष्टी सांगून भंडावून सोडील." डचेस म्हणाली, "त्याबद्दल आपण आम्हाला क्षमा करावी. सँकोने माझ्या-पासून एक पाऊलही दूर जाऊ नये, असे मी ड्यूकची शपथ घेऊन सांगते. अगदी योग्य तेवढेच तो बोलेल, असे मी त्याच्या वतीने ठामपणे सांगते." सँको म्हणाला, "बाई-साहेब, आपण योग्य तितकी खूप खूप वर्षे जगावे. कारण माझ्याविषयी आपले मत चांगले आहे, अर्थात ते माझ्या गुणामुळे नसून आपल्या सौजन्यामुळे आहे. आता मी माझी गोष्ट सांगतो—

"एकदा काय झाले, मोठी जिंदगी आणि मोठे घराणे असलेला एक भला माणूस होता. मेडिना डेल कॅम्पोच्या अलॅमॉसच्या कुळातील तो होता. सेंट जॅगो यांच्या परंपरे-तील एक शिलेदार डॉन अलोन्झो डी मॅरॅनॉन यांची कन्या डोना मेन्सिया डी क्विनोनेस हिच्याशी त्याने लग्न केले. हेराडूरामध्ये बुडविला गेलेला शिलेदार तो हाच. त्याच्या-संबंधी आमच्या गावी पूर्वी बखेडा माजला होता आणि त्यामध्ये माझे धनी, डॉन क्विक्झोट हे गुंतलेले होते, त्याचप्रमाणे बॅलव्हॅस्ट्रो या म्हाताऱ्या नालबंदाचा वेडपट मुलगा, छोटा टॉम हाही गुंतला होता आणि त्याला त्यात बरीच दुखापत झाली होती. धनीसाहेब, हे सारे खरे आहे ना ? आपण खरे काय ते सांगा आणि सैतानाला लाजवा, म्हणजे या महाराजांना कळेल की मी बडबड्या नाही की थापाड्या नाही." पाद्रीबुवा म्हणाले, "आतापर्यंत तरी तू थापाड्या नसून बडबड्या आहेस असे मला वाटते. तुझ्या

गोष्टीतून हलुहळू काय निवणार आहे, हे मला सांगता येत नाही. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे, तू इतक्या लोकांच्या साक्षी काढीत आहेस आणि इतक्या प्रसंगांचे वर्णन करीत आहेस की, ते सारे खरे असल्याचा निर्वाळा देण्यासाठी मला साक्षीदार आणावे लागतील. पण चालू दे तुझी गोष्ट. मात्र ती थोडक्यात आटप. आता तू जी सुरुवात केली आहेस, त्यावरून तुझी गोष्ट दोन दिवसात आटोपेल की नाही याची मला शंका वाटते. " डचेस म्हणाली, " त्याला आपली गोष्ट थोडक्यात आटोपण्यास सांगू नका. त्याला आपल्या वाटेने जाऊ द्या–मग त्यामुळे सहा दिवस का लागेनात. मी त्याची गोष्ट आनंदाने ऐकेन आणि माझ्या आयुष्यात आता-पर्यंत जो काळ आनंदात घालविला असेल, तसाच हा काळ गेला असे मी मानीन. " सँको म्हणाला, " ऐका तर मग महाराज, मी आरंभी ज्या गृहस्थाविषयी सांगितले, त्याला मी चांगले ओळखतो–माझा डावा हात कोणता आणि उजवा हात कोणता, हे मी जसे ओळखतो, तसे. कारण त्याचे घर माझ्या घरापासून हाकेच्या अंतरावर आहे. या गृहस्थाने एकदा एका शेतकऱ्याला आपल्याबरोबर जेवावयास बोलावले. तो शेतकरी गरीब होता पण फार प्रामाणिक होता. " पाद्रीबुवा म्हणाले, " मित्रा, ज्या गतीने तू गोष्ट सांगत आहेस, त्यावरून मला वाटते, तू परलोकात जाईपर्यंत काही या गोष्टीचा शेवट होणार नाही. " सँको म्हणाला, " देवाची इच्छा असेल तर मी गोष्ट अर्ध्यावरच सोडीन. पाद्रीमहाशय, ख्रिश्चनाप्रमाणे अंमळ दम धरा. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, तो शेतकरी या गृहस्थाच्या घरी आला. कारण त्याला जेवावयास बोलावले होते. त्या बिचाऱ्या शेतकऱ्याच्या आत्म्याला देव शांति देवो ! कारण आता तो मेला आहे–एखाद्या देवदूताप्रमाणे तो मेला. तो मेला तेव्हा मी त्यांच्याजवळ नव्हतो, कारण त्याचवेळी टेंब्लिक नावाच्या गावी मी शेतातील कापणी करण्यासाठी गेलो होतो." पाद्री म्हणाला, " अरे प्रामाणिक माणसा, ते तुझे कापणीचे काम सोड आणि टेंबलिकहून ताबडतोब परत ये. त्याचे दफन करण्यासाठी तेथे थांबू नकोस, आणखीही कोणाची दफने करण्याची इच्छा मनात धरू नकोस. आटप–आटप तुझी गोष्ट लवकर आटप. "

सँको म्हणाला, " मग हे ध्यानात धरा की, ते दोघे टेबलापाशी बसण्याच्या तयारीत असताना–ते दोघे म्हणजे तो गृहस्थ व तो शेतकरी-आता मी माझ्या डोळ्यापुढे त्यांना पाहात आहे असे मला वाटते. माझ्या आयुष्यात मी जितक्या स्पष्टपणाने काही पाहिले नसेल, इतक्या ढळढळीतपणे मी त्यांना माझ्यासमोर पाहत आहे असे मला वाटते. " सँको आपली गोष्ट कशी पिंजून–पिंजून सांगत आहे हे पाहून ड्यूक व डचेस यांना अपरंपार आनंद झाला. तसेच, त्याचे लांबलचक भाषण ऐकून पाद्री किती चिडला आहे आणि डॉन क्विक्झोट संतापाने व त्रासाने किती चिडले आहेत, हे पाहूनही त्या दोघांना मोठी मजा वाटली. सँको म्हणाला, " ठीक आहे, मी माझी गोष्ट पुढे सांगतो. ते दोघे जेव्हां बसू लागले, तेव्हां तो गृहस्थ आपल्या जागेवर बसेपर्यंत शेतकरी खाली बसेना. पण उच्च स्थानावर बसण्यास त्याला त्या गृहस्थाने खूण केली, तेव्हा शेतकरी उद्गारला,

" छेः छेः, महाराज, तसे होणार नाही. " गृहस्थ म्हणाला, " बैस खाली. " शेतकरी म्हणाला, " महाराज–" गृहस्थ म्हणाला, " मी सांगतो तेथे बैस. " तरीही शेतकरी बसेना–' मला माफ करा ' असे म्हणू लागला. पण ' मी माझ्या घरचा राजा आहे. ' अशा सुरात त्या गृहस्थाने त्याला बसण्यास बजावले. शेतकऱ्याला वाटले, आपण मोठे कुलीन आहो– फार शिष्टाचारसंपन्न आहो असे दाखवावयास पाहिजे, म्हणून तो कांकूं करूं लागला–इकडे-तिकडे घोटाळू लागला–नकार देऊ लागला. शेवटी त्या गृहस्थाने मोठ्या आवेगाने त्याचे खांदे धरले आणि त्या शेतकऱ्याला खुर्चीत सक्तीने बसविले व म्हटले," अरे रेम्याडोक्या, बैस इथे. मी माझ्या मनास येईल तिथं बसेन. मी जेथे बसेन ते उच्च स्थान होईल–आणि तुला ते सन्मानाचे वाटेल. " महाराज, संपली माझी गोष्ट. मुद्याला सोडून मी काही बोललो नाही, असे मला वाटते. "

डॉन क्विक्झोट यांच्या मुद्रेवर हजारो रंग उमटले–आणि त्यामुळे त्यांच्या मूळच्या पिंगट रंगावर पट्टे उठले, तेव्हा ड्यूक व डचेस यांना आपली मौज आवरती घ्यावी लागली. सँकोच्या बेअकलीपणामुळे डॉन क्विक्झोट फार बिथरू नयेत असे त्यांना वाटले. सँकोने आणखी काही मूर्खपणाच्या गोष्टी सांगू नयेत म्हणून एकंदर संवादाला निराळे वळण लावण्यासाठी डचेसने डॉन क्विक्झोट यांना विचारले, " लेडी डल्सिनियाची काय बातमी आहे ? आतापर्यंत आपण कैक राक्षसांचा नि दरोडेखोरांचा समाचार निःसंशय घेतला असेल, त्यांना तिच्याकडे नजराणा म्हणून आपण पाठविल्याला किती दिवस झाले ? " त्यांनी उत्तर दिले, " बाईसाहेब, काय सांगू ? माझ्या दुर्दैवांना आरंभ आहे पण शेवट नाही असे मला वाटते. मी राक्षसांना, रानभुतांना आणि गळेकापूंना जिंकून त्यांना माझ्या हृदय–स्वामिनीकडे पाठविले, पण ती त्यांना कोठे आढळणार ? बाईसाहेब, तिच्यावर जादूटोणा करण्यात आला आहे आणि अत्यंत विद्रूप अशा गावढळ स्वरूपात तिचे रूपांतर करण्यात आले आहे. "

सँको म्हणाला, " महाराज, हे मला माहीत नाही. मी तिला अलीकडे जेव्हां पाहिले तेव्हां साऱ्या विश्वातील अत्यंत सुंदर स्त्री ती आहे, असे मला वाटले. शरीराची चपळाई आणि हव्या तशा उड्या मारणे या कामी कोणीही तिला हार खावयास लावणार नाही, हे माझ्या माहितीवरून तिच्या वतीने मी ठामपणे सांगू शकतो. बाईसाहेब, ती जमिनीवरून गाढवावर एखाद्या मांजरीप्रमाणे टुणकन् उडी मारून बसते, या माझ्या शब्दांवर विश्वास ठेवा. " ड्यूकने विचारले, " मंतरल्यानंतर तू तिला पाहिलेस का ?" " अहो, तिच्यावर हा जादूचा प्रयोग झाला आहे हे सर्वांअगोदर कोणी ओळखले ? अहो, मीच ! माझा बाप जितका पछाडलेला, तितकी तीही. "

राक्षस, रानभुते व जादूगिरी–याच्यासंबंधी चाललेले त्याचे हे बोलणे ऐकून पाद्री-बुवांना संशय आला की, ला मांचा येथील डॉन क्विक्झोट हाच असावा. त्याचा जीवन–वृत्तांत ड्यूक नेहमी वाचीत असे. त्याबद्दल पाद्री त्यांची कानउघाडणीही करी आणि म्हणे, " अशा मूर्खपणाच्या गोष्टी वाचणे हा वेडेपणा आहे. " आपला संशय

खरा आहे असे वाटल्यामुळे पाद्री मोठ्या रागाने ड्यूकला म्हणाला, " महाराज, या भिकार माणसाच्या आचरटपणाला वाव दिल्याबद्दल आपल्याला केव्हा ना केव्हा जाब द्यावा लागेल. हा डॉन क्विक्झोट किंवा डॉन क्वाइट सॉट–काय हवे ते नाव द्या त्याला– आपण ठरवू पाहाता तितका बेअक्कली खास नाही. आपणच त्याला कल्पना–तरंगावर विहार करण्यास मोकळे सोडीत आहा. " नंतर डॉन क्विक्झोटकडे आपल्या भाषणाचा रोख वळवून पाद्री म्हणाला, " अहो पोकळडोके, जरा ऐका. आपण शिलेदार आहो आणि राक्षसांना नि दरोडेखोरांना आपण जिंकले आहे, असे तुमच्या डोक्यात कोणी भरविले आहे ? जा, जा, आपल्या घरी जा, आपल्या मुलाबाळांची काळजी घ्या–तुम्हाला ती असतील तर !—आणि प्रामाणिकपणे कोणता तरी धंदा करा. हवेत मनोरे बांधून, आपल्याला ओळखणाऱ्या–किंवा न ओळखणाऱ्या– लोकांच्या चेष्टेचा विषय बनून जगभर भटकण्याचे सोडून द्या. शिलेदार म्हणून कोणी माणसे पूर्वी होऊन गेली–किंवा सध्या आहेत–असे तुम्हाला कोठून समजले ? स्पेनमधील राक्षस किंवा ला मांचा येथील पिशाच्चे तुम्हाला कोठे भेटणार ? तुमची ती मंतरलेली डल्सीनिया–आणि तुमच्या बाबतीत लहरीपणाच्या नि कल्पनेच्या ज्या ज्या कथा सांगितल्या जातात, त्या तुमच्या रिकाम्या डोक्याशिवाय दुसरीकडे कोठे सापडणार ? "

त्या पूज्य धर्मगुरूचे भाषण डॉन क्विक्झोट यांनी मोठ्या शांतपणे ऐकून घेतले. शेवटी तो गप्प बसला हे पाहून, ड्यूक व डचेस यांच्याविषयीचा आदरभाव बाजूस सारून, डॉन क्विक्झोट संतप्त व सावेश मुद्रेने उठून उभे राहिले आणि म्हणाले—ते काय म्हणाले हे सांगण्यास स्वतंत्र प्रकरणच द्यावयास हवे.

□ □

प्रकरण ३२

# डॉन क्विक्झोट यांचे निंदकाला उत्तर आणि दुसऱ्या गंभीर व गमतीच्या घटना

अशा प्रकारे डॉन क्विक्झोट गडबडीने उठून उभे राहिले. त्या वेळी त्यांचे शरीर चिडीने नखशिखांत कापत होते—जणु त्यांच्या हाडांत पारा असल्यासारखे. त्यांनी आपल्या अविचारी टीकाकाराकडे रागाने पाहिले. बोलण्याची घाई झाल्यामुळे संतापाने त्यांचे शब्द तोंडातल्या तोंडात गिळत होते आणि तोतरे येत होते. ते ओरडून म्हणाले, "मी माझ्या न्याय्य संतापाला आवर घालतो. कारण हे स्थान मानाचे आहे, येथे हे सन्माननीय लोक जमलेले आहेत आणि तुमच्या धर्माधिकाराबद्दल मला नेहमी आदर वाटत आलेला आहे. त्यामुळेच मी सूड घेण्यासाठी वळवळत असणारे माझे हात सभ्य माणसाप्रमाणे बांधून ठेवीत आहे. तुम्ही झगेवाले पुरुष आणि स्त्रिया आपल्या जिभाशिवाय दुसरे कोणतेही शस्त्र वापरीत नाही, हे सर्वांना माहीत आहे. म्हणून मी त्याच पातळीवरून आणि तुमच्याच शस्त्राने तुमच्याशी चांगला सामना देतो. पाद्र्याचा वेष धारण करणाऱ्या माणसापासून अशा गलिच्छ निंदेपेक्षा गंभीर टीकेची अपेक्षा मी केली असती. कोणत्याही चुकीची दुरुस्ती यापेक्षा निराळ्या प्रकाराने आणि अधिक संयमाने केली पाहिजे. उदार व निकोप मनाने ती दुरुस्ती होणे योग्य आहे. तुम्ही जाहीरपणे मला जी कटु दूषणे दिलीत, ती ख्रिस्ती धर्माच्या शासनपद्धतीची मर्यादा ओलांडणारी आहेत. याहून अधिक सभ्यतेने चूक सांगितली असती तर ते अधिक शोभून दिसले असते. ज्याला तुम्ही दोष दिला त्या अपराधाची काही शहानिशा न करता आणि चौकशी न करता अपराध लादणे आणि अपराधी माणसाला मूर्ख, वेडपट, बडबड्या म्हणणे योग्य आहे काय? महाराज, खरोखर कृपा करून मला हे सांगा की, तुम्ही इतके अपशब्द वापरावेत आणि मला बायकामुले आहेत की नाहीत हे माहीत नसताना त्यांची काळजी घेण्यासाठी मी घरी जावे असा हुकूम एखाद्या न्यायाधीशाप्रमाणे सोडावा, असे करण्याला कारणीभूत होणारे कोणते वेडपट कृत्य माझ्या हातून घडत असलेले आपण पाहिले आहे? जे लोक दुसऱ्या माणसांच्या घरात शिरून त्या घर-धन्यावर अंमल गाजविण्याचा आव आणतात त्यांचीच इतकी कडक निंदा करणे योग्य आहे असे तुम्हाला वाटत नाही काय? आपल्या पंचक्रोशीत घडणाऱ्या गोष्टीच ज्याला माहीत आहेत, अशा एखाद्या भिकार वाटसरूने शिलेदाराला नियम घालून द्यावेत,

आणि शिलेदारीचा व्यवसाय करणाऱ्यांचे गुणदोष मोजावेत, असे हे मोठे विचित्र जग आहे! जगातील सारी सुखे फेकून देऊन त्यांतील दुःखे व कष्ट सहन करण्याने आपण अमरत्वाच्या उच्च पदी पोहचू, अशी अभिलाषा पुण्यशील पुरुषांचे ठायी असते, आणि त्यासाठी ते जगभर संचार करीत असतात. पण तुम्हाला तो एक रिकामटेकडा उद्योग वाटतो आणि त्यासाठी खर्ची पडलेला वेळ वाया गेला, असे वाटते. जर सन्माननीय माणसे, शिलेदार, उमराव, सज्जन किंवा कुलीन लोक मला मूर्ख किंवा छचोर समजतील, तर तो मी माझा मोठाच अपमान समजेन – आणि त्या अपमानाची भरपाई कशानेही होणार नाही. पण ज्यांनी कधी शिलेदारीच्या मार्गावर पाऊल टाकलेच नाही, अशा केवळ पुस्तकी पंडितांनी मला मूर्ख म्हटले, तर मी त्यांना हसेन आणि त्यांचा तिरस्कार करीन. मी एक शिलेदार आहे– आणि त्या सर्वशक्तिमान परमेश्वराची इच्छा असेल तर शिलेदार म्हणूनच मी मरेन. काही लोक साभिमान महत्त्वाकांक्षेचा उच्च मार्ग पसंत करतात, तर काही लोक तोंडपुजेपणाचा नीच मार्ग अवलंबितात. तिसऱ्या प्रकारचे लोक लबाडीच्या व ढोंगाच्या वाममार्गाने जातात. पण खऱ्या धर्ममार्गाने जाणारे लोक थोडे–फारच थोडे-असतात. मी माझ्या नशिबातील ग्रहमानाप्रमाणे शिलेदारीचा अरुंद पथ आक्रमीत आहे—आणि त्यासाठी मी संपत्तीला तुच्छ लेखतो पण सन्मानाला नव्हे. मी आतापर्यंत अन्याय निवारले आहेत आणि अन्याय झालेल्या माणसांचे दुःख हरण केले आहे. मी अरेरावांना शासन केले आहे, शूरवीराना जिंकले आहे आणि राक्षसांना व पिशाच्चांना पायाखाली तुडविले आहे! मी प्रेम करतो – पण शिलेदारीच्या व्यवसाया-मुळे जेवढे प्रेम करणे अवश्य आहे तेवढेच करतो. सध्याच्या काळातील व्यसनी प्रेमिका-पैकी मी नाही, तर 'प्लॅटोनिक' ( बौद्धिक पातळीवरचे ) शुद्ध प्रेम करणारा मी आहे माझ्या साऱ्या संकल्पांचा रोख पुण्य साधण्याकडे असतो – कोणाही माणसावर अन्याय करावयाचा नाही पण साऱ्या जगाचे भले करावयाचे, हेच माझे धोरण असते. अहो, सर्वोत्तम ड्यूकसाहेब आणि डचेस बाईसाहेब, आपणच आता हा निवाडा द्या की, या सर्व गोष्टी कशा कराव्यात याचाच निदिध्यास ज्याला लागलेला आहे, अशा माणसाला मूर्ख म्हणून त्याची कानउघाडणी करणे योग्य आहे काय ? ”

सँको म्हणाला, “ छान सांगितलेत धनीसाहेब. आता आपण स्वतःसंबंधी काहीच बोलू नका. आपल्याला योग्य वाटेल तेव्हां थांबा. शब्दाने, विचाराने किंवा कृतीने आपण आपल्या बाजूने अधिक काही सांगण्यासारखे राहिलेले नाही. दुनियेमध्ये शिलेदार पूर्वी कधी होऊन गेले नाहीत आणि आताही ते नाहीत, असे सरळ सरळ म्हणण्याची छाती श्री. पाद्री यांनी केली आहे. आपण काय बोलतो, हे त्यांना कळत नाही, यात काही नवल नाही. ” पाद्री म्हणाला, “ अरे, तू तर सँको पँझा, हे मी खात्रीने सांगतो. तुझ्या धन्याने तुला एक बेट देण्याचे वचन दिले आहे असे लोक बोलतात. ” सँकोने उत्तर दिले, “ होय, होय, तोच मी. दुसऱ्या कोणाही माणसाइतकाच मी ते बेट घेण्याला लायक आहे. लोक उपदेश करतात ना—चांगल्या माणसांच्या संगतीत रहा, म्हणजे

तूही चांगला होशील. ज्यांच्या घराण्यात तू जन्मलास, त्यांच्यापेक्षा ज्यांच्याबरोबर तू जेवलास, त्यांच्याशी तू एकरूप हो, असे लोक सांगतात. मी तसाच एक माणूस आहे. ‘ उभा रहा चांगल्या झाडाखाली म्हणजे मिळेल तुला त्याची सावली, ’ अशी म्हण आहे. मी माझ्या भल्या धन्याला टेकून आणि घट्ट चिकटून उभा आहे. कैक महिने मी त्याच्या संगतीत आहे. आता तो आणि मी–सर्वस्वी एक आहो. तो जसा असेल, तसा मी देवदयेने राहीन. माझा धनी जिवंत आहे आणि मीही जिवंत आहे. त्याला शासन करण्यासाठी राज्ये नको आहेत आणि मला बेटे नको आहेत. ”

ड्यूक म्हणाला, “ अरे इमानी सँको, तसे होणार नाही. डॉन क्विक्झोट या महापुरुषाच्या वतीने मी तुला माझ्या एका बेटाचे राज्य बहाल करीन आणि ते बेट काही कमी महत्त्वाचे नाही. ” डॉन क्विक्झोट आनंदाने ओरडले, “ गुडघे टेक, सँको, गुडघे टेकून त्यांच्या पाया पड. या महाराजांनी केलेल्या कृपेबद्दल तू त्यांच्या चरणाचे चुंबन घे. ” सँकोने तसे केले. ते पाहून पाद्री रागारागाने उठून उभा राहिला आणि गरजला, “ महाराज, माझ्या धार्मिक पेशाला स्मरून मला आपल्याला हे सांगितल्यावाचून राहवत नाही की, या पापी नालायकांइतकेच आपणही वेडे आहात. त्याच्या वेडेपणाशी आपल्यासारखी शहाणी माणसे खेळ खेळतात आणि त्यांच्या बेहोषीला प्रतिष्ठा मिळवून देतात, तेव्हां त्यांनी वेडेचार का करू नयेत ? आपल्या इच्छेस येईल तर आपण त्यांना येथे खुशाल ठेवून घ्यावे आणि त्यांच्याबरोबर स्वतः रहावे. पण मी मात्र आपल्याला सोडून माझ्या घरी जाणार. जे मला सुधारता येत नाही, त्याबद्दल नुसती तक्रार करण्याची तसदी मी का घेऊ ? ” असे म्हणून, आपले राहिलेले जेवण मागे ठेवून, तो तेथून ताडकन् निघून गेला. त्याला ड्यूक व डचेस शांत करू शकले नाहीत. ड्यूक त्याच्याशी फारसे बोलू शकले नाहीत. कारण त्याच्या अकारण आवेशाला ते हसतच राहिले. आपले हास्य संपल्यावर ते डॉन क्विक्झोट यांना म्हणाले, “ सिंहाचे शिलेदारमहाशय, आपण स्वतःसंबंधी आणि स्वतःच्या व्यवसायासंबंधी इतके चोख उत्तर दिले आहे की, त्या भडकलेल्या पाद्रीबुवाचा सूड तुम्ही घेण्याची काही गरज नाही. तो हवे ते बडबडो, पण आपल्या योग्यतेच्या माणसाचा उपमर्द करणे हे त्याच्या शक्तिबाहेरचे आहे. कारण स्त्रिया आणि पाद्री यांच्याकडून कोणाचा उपमर्द होतच नाही. ”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “ अगदी खरे आहे महाराज, आणि त्याचे कारण हे की ज्याचा उपमर्द होता कामा नये, त्याने कोणाचा उपमर्द करताही कामा नये. स्त्रिया, मुले आणि धर्मगुरू यांच्यावर काही अन्याय झाला, तर ते सूड उगवू शकत नाहीत, आणि म्हणून त्यांना उपमर्दापासून अभय असते. महाराजांना माहीत आहेच की, उपमर्द व अन्याय यामध्ये फरक आहे. कोणी उपमर्द करून तो पुढे चालू ठेवला तर तो उपमर्द, अन्याय कुठल्याही प्रकारच्या लोकांकडून होऊ शकतो. समजा, एक माणूस आपल्या कामाला रस्त्याने चालला असता दहा सशस्त्र लोक त्याच्यावर हल्ला करून त्याला काठ्यांनी बडवतात; तो या अन्यायाच्या सूडासाठी तरवार उपसतो, पण हल्लेकरी त्याच्यावर

मात करतात, त्यामुळे सूडाचे समाधान त्याला मिळू शकत नाही. या माणसावर अन्याय झाला आहे, त्याचा उपमर्द नव्हे. हाच मुद्दा पक्का करण्यासाठी मी दुसरे उदाहरण देतो. समजा, एक माणूस दुसऱ्या माणसाच्या पाठीमागून येतो आणि त्याच्या कानावर ठोसा लगावतो व पळून जातो. दुसरा माणूस त्याचा पाठलाग करतो, पण त्याला गाठू शकत नाही. ज्याला ठोसा लगावला गेला, त्याच्यावर अन्याय झाला हे खरे; पण त्याचा उपमर्द झाला नाही. उपमर्द करण्यासाठी काही समर्थन असावे लागते. ज्याने दुष्टपणाने ठोसा लगावला त्याला काही कारण असेल आणि तो आपल्या प्रतिपक्ष्याला तोंड देऊ शकतो. पण ठोसा मारणाराने नीचपणे तो मारल्यानंतरही जागीच उभा राहून प्रतिपक्ष्याला तोंड दिले, तर ठोसा खाणाराला अन्यायही होतो आणि त्याचा उपमर्दही. त्याच्यावर भेकडपणाने हल्ला झाला हा अन्याय आणि उपमर्द असा की, ज्याने त्याला ठोसा लगावला तो आपल्या कृत्याचे समर्थन करण्यासाठी जाग्यावर उभा राहिला. म्हणून द्वंद्वयुद्धाच्या निश्चित नियमानुसार, माझ्यावर अन्याय झाला असेल, उपमर्द झालेला नाही. मुले रागावत नाहीत आणि स्त्रिया हल्ल्याला तोंड देऊ शकत नाहीत किंवा पळून जाऊ शकत नाहीत. पाद्र्यांची स्थिति तशीच आहे. संरक्षक किंवा आक्रमक अशी कोणतीच शस्त्रे ते बाळगीत नाहीत. तेव्हा आत्मरक्षणाच्या नियमाप्रमाणे स्वतःचा बचाव करणे त्यांना भाग पडले, तरी दुसऱ्याचा अपमान त्यांनी केला पाहिजे असे काही नाही. माझ्यावर अन्याय झाला, असे मी नुकतेच म्हटले असले तरी, पुन्हा विचार करता मला असे वाटते की, माझ्यावर अन्याय झालेला नाही. कारण ज्याचा उपमर्द होऊ शकत नाही तो दुसऱ्याचाही उपमर्द करू शकत नाही. यामुळे तो भला माणूस जे बोलला त्याबद्दल मला संताप येता कामा नये आणि खरोखर मला तो आलेलाही नाही. माझी इच्छा एवढीच होती की, त्याने थोडा वेळ थांबावयास हवे होते. म्हणजे मी त्याला त्याची चूक पटवून दिली असती. जगात कधी शिलेदार होऊन गेलेच नाहीत, असे मानण्याची चूक त्याने केली. अॅमॅडिसने किंवा त्याच्या असंख्य परिवारापैकी कोणी त्याचे भाषण ऐकले असते, तर त्याला ते फार जड गेले असते, अशी मी माननीय धर्मगुरुवर्यांना समज दिली असती."

सँको म्हणाला, "खचित, तसेच झाले असते. एखाद्या कालव्याप्रमाणे त्यांनी त्याची दोन छकले केली असती आणि पिकलेल्या खरबुजासारखा त्यांनी त्याला उभा चिरला असता, हे मी ठामपणे सांगतो. ते शिलेदार सारे खंदेगडी होते. त्यांनी अशी टीकेची गोळी कधीच गिळली नसती. मला खरोखर असे वाटते की, मॉंटलबॅनच्या रिनाल्डोने त्या भिऱ्या वेडकाची बडबड ऐकली असती, तर त्याने त्याची हाडे खिळखिळी केली असती आणि तीन वर्षे त्याला पुन्हा अशी बडबड करता आली नसती. वा! वा! त्यांच्या तावडीत तो सापडावयास हवा होता, म्हणजे त्यातून तो कसा बाहेर पडतो ते आपण पाहिले असते!"

सँकोकडे पाहून हसता हसता डचेसची मुरकुंडी वळली. तो आपल्या धन्यापेक्षा

अधिक मूर्ख आहे पण अधिक गमत्या आहे असे तिला वाटले, आणि तिला एकटीलाच तसे वाटले असे नव्हे. सारांश, डॉन क्विक्झोट शांत झाल्यावर सर्वांनी आपली जेवणे आटोपली. तेव्हा नोकरांनी टेबलावरील चादर काढून नेली. त्यानंतर चार तरुण सुंदरी तेथे आल्या. एकीने चांदीचा पसरट वाडगा आणला होत, दुसरीच्या हातात त्याच धातूची सुरई होती, तिसरीच्या हातावर काही उत्तम टॉवेल होते, आणि चौथीच्या हाताच्या बाह्या कोपरापर्यंत वर घेतलेल्या होत्या. तिचे ते हात कमालीचे पांढरेशुभ्र होते– श्वेत-कमलाप्रमाणे दिसत होते. नेपल्सचा मोठा साबण तिच्या हातात होता. जिने वाडगा घेतला होता, ती अत्यंत अदबीने लगेच पुढे झाली आणि डॉन क्विक्झोट यांच्या हनुवटीला तिने तो टेकवला. हा विलक्षण थाटमाट पाहून डॉनला विस्मय वाटला. पण त्याने कल्पना केली की, या प्रदेशात हाताऐवजी तोंड धुण्याची पद्धत असावी. म्हणून त्यांनी चकार शब्द न काढता आपली लांब हनुवटी त्या थाळीत खुपसली. नंतर खुजातील पाणी त्यांच्या तोंडावर भराभर ओतण्यात आले. साबण आणणाऱ्या तरुणीने आता आपले काम सुरू केले. त्यांची दाढी साबणाच्या फेसाने इतकी भरून गेली की, त्या फेसाचे बुडबुडे बर्फाच्या मोठ्या कणासारखे दिसू लागले. स्वस्थ बसलेल्या शिलेदारजींच्या तोंडावर ते बुडबुडे पसरले–इतके की, त्यांना आपले डोळे मिटून घेणे भाग पडले.

हे काय घडत आहे, याची ड्यूक व डचेस यांना काहीच कल्पना नव्हती. सफाईचे हे विलक्षण काम केव्हा संपणार, याची वाट पहात ते उभे होते. त्या फेसाच्या बुडबुड्यात शिलेदारजींचा चेहरा थोडा वर उचलून नापित स्त्रीने साबण सुकण्याची वाट पाहिली. तिने दुसऱ्या दासीला आणखी पाणी आणण्यासाठी खुजा देऊन पाठविले. " पाणी येईपर्यंत हे सद्गृहस्थ थांबतील. " असेही तिने सांगितले. तेव्हा ती दासी तेथून गेली. आता शिलेदारजींचे ध्यान इतके काही चमत्कारिक दिसत होते की, त्याची कल्पना कोणाला करता येणार नाही. त्या साऱ्या लोकांसमोर ते बसून राहिले होते. त्यांची मान हातभर लांब पुढे आली होती. त्यांची आखूड दाढी पांढऱ्या स्वच्छ फेसामध्ये गुरफटलेली होती. अक्रोडासारखी त्यांची कान्ति त्या फेसामुळे मुळीच सुंदर दिसत नव्हती. ती पाहून तेथील लोकांना मोठमोठ्याने हसणे कसे आवरता आले, हीच मोठी विलक्षण गोष्ट होय. ते सारेच दृश्य अत्यंत विनोदी होते. या सर्व कारस्थानामध्ये त्या खोडसाळ तरुणींचा हात होता. वर पाहण्याचे त्यांना धैर्य नव्हते. तसेच आपला धनी किंवा धनीण यांच्या डोळ्याला डोळा भिडविण्याचे धैर्यही त्यांना नव्हते. क्रोध आणि मौज यांच्यामध्ये ड्यूक व डचेस यांची मने विभागलेली होती. त्यांना कळत नव्हते की, या बाबतीत आपण काय करावे––धिटाई दाखविल्याबद्दल त्या मुलींना आपण शिक्षा करावी की तशा स्थितीत शिलेदारजींना पाहून आपली करमणूक झाली म्हणून त्यांना बक्षिस द्यावे.

शेवटी ती दासी पाणी घेऊन आली. दुसरीने साबण धुऊन टाकल्यावर तिसरीने

शिलेदारजींची दाढी व चेहरा टॉवेलानें हलकेच पुसून कोरडा केला. हे सारे उरकल्यावर त्या चौघींनी अत्यंत अदबीने मुजरे केले आणि त्या खोलीतून त्या बाहेर निघाल्या. पण आपली कुणी चेष्टा करीत आहे, असा संशय डॉन क्विक्झोट यांना येऊ नये म्हणून, ड्यूकने वाडगा नेणाऱ्या तरुणीला बोलावले आणि " माझेही तोंड धू. " असा हुकूम तिला सोडला. त्यासाठी पाणी भरपूर असल्याची खात्री करुन घेण्यास त्याने तिला सांगितले. ती दासी चतुर व चुणचुणीत होती. ती ड्यूकच्याजवळ गेली आणि डॉन क्विक्झोट यांचे बाबतीत केले तसे—पण त्यापेक्षा झटपट– तिने ड्यूकच्या हनुवटीखाली ती थाळी धरली. त्यांचे तोंड स्वच्छ धुतल्यानंतर त्या सर्वजणी ड्यूकला अभिवादन करून तेथून सटकल्या. शिलेदारजींप्रमाणेच आपलीही सेवा करण्यास आपल्या धन्याने आपल्याला का सांगितले, हे त्यानी बरोबर ओळखले. त्यांनी तसे केले नसते, तर ड्यूकने त्यांना या मस्करीबद्दल चांगले शासन करण्याचे ठरविले होते, हे नंतर कळले.

मुख–प्रक्षालनाचा हा सारा समारंभ सँको मोठ्या दक्षतेने पहात होता. तो पाहून तो म्हणाला, " शिलेदाराप्रमाणे त्या शागीर्दाची दाढी धुण्याची पद्धत या देशात नाही काय, हे मला समजून घ्यावयाचे आहे. कारण माझ्या समजुतीप्रमाणे माझी दाढी धुण्याची अधिक गरज आहे. एवढेच काय पण, त्यानी जर माझ्या दाढीला वस्तरा लावला तर फारच बेश होईल. " डचेसने विचारले, " सँको, तू आपल्याशीच काय पुटपुटत आहेस ? " सँको म्हणाला, " बाईसाहेब, मी इतर घरांमध्ये असे ऐकले आहे की, टेबलावरील चादर काढून नेली की, लोकांना आपले हात धुण्यास पाणी देण्याची पद्धत असते, पण दाढी साफ करण्यासाठी साबणाचे बुडबुडे देण्याची पद्धत नाही. माणसाने जगावे आणि शिकावे हे चांगले, असे का म्हणतात हे मला आता कळले. ' ज्याचे आयुष्य मोठे, त्याच्या यातना कठीण. ' अशी एक म्हण आहे. पण माझा असा प्रचंड अंदाज आहे की, दाढी धुण्याच्या यातना दुःखदायक नसाव्यात-आनंददायक असाव्यात." डचेस म्हणाली, " ठीक आहे सँको, आता तू काही तसदी घेऊ नकोस. माझी एक दासी तुझी दाढी धुईल—प्रसंग पडला तर ती तुला पाण्यात बुडवीलदेखील, अशी व्यवस्था मी करते. " सँको म्हणाला, " सध्या मला फक्त माझी दाढी धुऊन घ्यावयाची आहे. बाकीच्याबद्दल आपण पुन्हा केव्हा तरी विचार करू. " डचेसने एका नोकराला बोलावून सांगितले, " सँकोला जे पाहिजे ते तू कर–आणि त्याची इच्छा असेल त्या पद्धतीनेच कर. " नोकराने बाईसाहेबांना सांगितले, " श्रीयुत सँकोना काहीही कमी पडणार नाही. " त्याने सँकोला आपल्याबरोबर जेवणास नेले.

डॉन क्विक्झोट हे ड्यूक व डचेस यांच्याशी निरनिराळ्या गोष्टीसंबंधी बोलत राहिले. अर्थात् त्या साऱ्या गोष्टी शस्त्रे व शिलेदारी यांच्याबद्दलच होत्या. नंतर डचेसने संधी साधून अशी इच्छा प्रदर्शित केली की, " शिलेदारांनी टोबोसो येथील लेडी डल्सीनियाच्या सौंदर्याचे आणि गुणसंपदेचे विशेष वर्णन सांगावे. स्मृती चांगली असल्या-मुळे ते वर्णन उत्तम प्रकारे करू शकतील, याविषयी शंका नको. तिचा जो लौकिक

कानी आला आहे, त्यावरून ती अखंड दुनियेत—आणि म्हणूनच साऱ्या ला मांचामध्ये–अत्यंत लावण्यवती असली पाहिजे यात संशय नाही. ”

हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी दीर्घ सुस्कारा सोडला आणि ते म्हणाले, “ बाईसाहेब, मी जर माझे हृदय कापून व एका तबकात ठेवून ते या टेबलावर आपल्या दृष्टीसमोर मांडले, तर माझ्या जिभेला जे वर्णन करता येत नाही, ते करण्याचे माझे श्रम वाचतील. जिभेने वर्णन केले तरी ते आपल्याला खरे वाटणार नाही, पण माझ्या हृदयात तिचे चित्र हुबेहूब रंगविल्याचे बाईसाहेबांना आढळेल. त्या अप्रतिम डल्सीनियाच्या एक-एका संपूर्ण गुणाचे विस्ताराने वर्णन करण्याचे कार्य मी माझ्या शिरावर का घ्यावे ? तो भार माझ्यापेक्षा अधिक शक्तिशाली असणाऱ्या शिरावरच झेलला जाईल. पॅरासियस्, टिमँटेस् आणि ॲपेलेस् यांच्या कुंचल्यानाच – किंवा लिसिपस्च्या कोरीव कामाच्या आयुधांनाच ते शक्य आहे. उत्तमोत्तम चित्रकार आणि शिल्पकार यांचे हातच त्या रंग-कामास– किंवा संगमरवरी पाषाण किंवा कोरिन्थिअन पितळ कोरण्यास–लागले पाहिजेत, तरच तिच्या सौंदर्याचे अचूक दर्शक बडेल. तिच्या गुणसंपदेचे स्तवन करण्यास सिसरोचे व डेमॉस्थेनिसचे वक्तृत्व हवे. ” डचेसने विचारले, “ डेमॉस्थेनियन् या शब्दाचा आपला अर्थ काय आहे, महाराज ? ” डॉन क्विक्झोट म्हणाले, डेमॉस्थेनियन् वक्तृत्व म्हणजे डेमॉस्थेन्सचे वक्तृत्व. सिसेरोनिअन् वक्तृत्व म्हणजे सिसेरोचे वक्तृत्व. जगात आजपर्यंत होऊन गेलेल्या साऱ्या वक्त्यांमध्ये हे दोघे महान् वक्ते होते. ”

ड्यूक म्हणाला, “ हे खरे आहे. प्रिय बाईसाहेब, असा प्रश्न विचारून आपण केवळ आपल्या अज्ञानाचे प्रदर्शन केले आहे. तथापि आमची इच्छा अशी आहे की, थोर डॉन क्विक्झोट यांनी, आपल्या मर्जीस येईल तर, आपल्या प्राणप्रियेचे चित्रण करण्याचा प्रयत्न आता करावा आणि आम्हाला अत्यंत उपकृत करावे. कारण तिच्या अवयवांचे ओझरते स्वरूप त्यांनी ओबडधोबडपणे रेखाटले, तरी तिचे रूप इतके मोहक दिसेल की, अन्य नारी-रत्नांना तिचा हेवा वाटू लागेल, याविषयी माझ्या मनात मुळीच शंका नाही. ” डॉन क्विक्झोट म्हणाले, “ महाराज, खरोखर तसेच घडेल. पण तिच्या-वर अलीकडेच जे दुर्दैव ओढवले आहे, त्यामुळे माझ्या स्मृति–पटलावरून तिचे चित्र साफ पुसले गेले आहे. म्हणून तिच्या सौन्दर्याचे वर्णन करण्याऐवजी तिच्या रूपांतराबद्दल शोक करणेच मला भाग आहे. महाराजांना हे माहीत असले पाहिजे की, तिच्या हाताचे चुंबन घेण्यासाठी आणि नव्या साहसाच्या शोधार्थ तिची अनुज्ञा नि आशीर्वाद मिळविण्यासाठी, मी नुकताच तिच्याकडे गेलो असताना, माझ्या कल्पनेपेक्षा अगदी निराळीच आकृती मला तेथे दिसली. तिच्यावर कोणी तरी जादू केली आहे असे मला आढळले. राजकन्येतून गांवढळ मोलकरणीमध्ये, सौंदर्यातून कुरूपतेमध्ये, दरबारी थाटातून खेडवळपणामध्ये, शालीन महिलेतून उड्या मारणाऱ्या दांडगीमध्ये, मूर्तिमंत माधुर्यातून घाणेरड्या प्राण्यामध्ये, प्रकाशातून अंधारामध्ये, देवदूतीतून सैतानामध्ये, सारांश, टोबोसोच्या डल्सीनियातून सायागोच्या शेतकरिणीमध्ये तिचे रूपांतर झालेले मला

आढळले. " तेव्हा ड्यूक मोठ्या आवाजात म्हणाले, " कोणा दुष्टाने जगाची अशी हानी केली ? तिचे सौंदर्य म्हणजे पृथ्वीचा अलंकार होता आणि तिच्या मोहक हालचाली म्हणजे पृथ्वीचा आनंद होता, फार काय, तिचे गुण म्हणजे या धरणीचा सन्मान होता. या सर्वांचे हरण कोणी केले ? "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " अहो, दुसरे कोण असणार ? माझा अखंड छळ करणाऱ्या त्या दुष्ट जादुगारांपैकी किंवा माझा मत्सर करणाऱ्या असंख्य पिशाच्चांपैकी कोणी तरी ते दुष्कृत्य केले असावे. सज्जन नि शूर माणसांच्या वैभवाला ग्रहण लावण्यासाठी आणि त्यांच्या पराक्रमाला कलंक लावण्यासाठी पाताळातील ही अवलाद या जगात आलेली आहे. खलपुरुषांच्या कृत्यांचा महिमा वाढविण्याचा प्रयत्न ते करतात. या दुष्ट जादुगारांनी माझा पिच्छा पुरविला आहे. आताही ते माझा पाठलाग करीत आहेत— आणि विस्मृतीच्या खोल दरीत मी आणि माझी शिलेदारीची उत्तुंग कृत्ये बुडवीपर्यंत ते माझा छळ करीत राहणार. माझ्या मर्मस्थानावर आघात करण्याचेच त्यांनी ठरविले आहे हें खचित. कारण त्यांना हे माहीत आहे की, एखाद्या शिलेदारापासून त्याची हृदय-स्वामिनी दूर नेणे म्हणजे तो ज्यांनी जग पहातो, ते डोळे चोरून नेणे होय. त्याचे जीवन ज्यामुळे प्रकाशित होते, तो सूर्य आणि ज्यावर तो जगतो, ते अन्न हिरावून घेण्यासारखेच हे कृत्य आहे. कारण, मी नेहमी म्हणत असतो की, स्त्रीशिवाय शिलेदार म्हणजे पानाशिवाय झाड किंवा चुन्याशिवाय इमारत अथवा देहाशिवाय सावली होय. "

डचेस म्हणाली, " हे सारे मला मान्य आहे. पण आपल्या जीवनाचा जो इतिहास नुकताच प्रसिद्ध झाला आहे आणि सर्वांकडून प्रशंसिला गेला आहे, त्यावर विश्वास ठेवावयाचा म्हटले तर, माझ्या अचूक आठवणीप्रमाणे, आपण लेडी डल्सीनियाला कधीच पाहिलेले नाही—तशी स्त्री जगात कोणी नाहीच-असे दिसते. आपल्या कल्पना-विश्वातून ती जन्मास आलेली आहे. आपल्या कल्पनेच्या बळावर आणि तरलपणावर तिची आकृती जोपासलेली आहे. तिच्या अंगी जे जे सौंदर्य आणि सद्गुण असावेत असे आपल्याला वाटते, ते सर्व आपण तिला चिकटविलेले आहेत. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " या विषयावर पुष्कळ बोलता येण्यासारखे आहे. या जगात डल्सीनिया आहे की नाही ? ती काल्पनिक आहे की खरी आहे ? हे परमेश्वरालाच माहीत. ही गूढ रहस्ये आहेत आणि ती अशा घाईघाईने उलगडता येणार नाहीत. त्या स्त्रीला मी जन्म दिलेला नाही किंवा माझ्या कल्पनेने जोपासलेले नाही. खरोखर ती माझ्या चिंतनाचा विषय होऊन राहिलेली आहे. एखाद्या व्यक्तीला जागतिक कीर्ती मिळवून देण्यासाठी जे जे गुण लागतात, ते सर्व तिच्या अंगी आहेत असे मी मानतो. तिचे सौंदर्य निष्कलंक आहे, ती शालीन असली तरी गर्विष्ठ नाही, प्रेमळ असली तरी मर्यादशील आहे, आणि तिचा स्वभाव सौजन्यशील असल्यामुळे ती सर्वांना प्रिय वाटणारी आहे. उदार शिक्षणामुळे आणि थोर कुळामुळे तिच्या अंगी हे सौजन्य आलेले आहे. हलक्या कुळात जन्मलेल्या स्त्रियांचे सौंदर्य पूर्णत्वाने विलसत नाही, पण

थोर कुळात जन्मलेल्या स्त्रीच्या सौंदर्याची प्रभा पूर्णत्वाने प्रकाशत असते."

ड्यूक म्हणाला, "आपले मत योग्यच आहे. पण तो इतिहास वाचल्यामुळे माझ्या मनात जी एक शंका आली आहे, ती आपल्यापुढे मांडण्याची, महाराज, आपण मला अनुज्ञा द्यावी. शंका अशी की, टोबोसो येथे-किंवा अन्यत्र- डल्सीनिया म्हणून कोणी असेल-आणि आपण वर्णन केल्याप्रमाणे ती सुंदरही असेल, पण ओरिआना अलॅक्स्ट्रजारिआ, मॅडासिमाज वगैरेंची आणि आपल्याला परिचित असलेल्या इतिहास - ग्रंथात आम्ही ज्या हजारों युवतींची वर्णने वाचतो, त्यांची सर उच्च कुळाचे बाबतीत कोणत्याही प्रकारे तिला येईल काय ? ही माझी शंका आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "या शंकेला माझे उत्तर असे की, डल्सीनिया ही आपल्या स्वतःच्या कृतींचे अपत्य आहे. तिच्या गुणांनीच तिच्या कुळाला उच्चत्व प्राप्त झालेले आहे. उच्च कुळातील दुर्जनापेक्षा नीच कुळातील सज्जनाचे महत्त्व अधिक मानले पाहिजे. शिवाय, डल्सीनियाचे अंगी दुसरे असे काही गुण आहेत की, त्यामुळे तिला राजमुकुटावर व राजदंडावर हक्क सांगता येईल. तिच्या जातीच्या कैक सुंदरींना सिंहासनाचा लाभ झालेला आहे. ज्याच्या अंगच्या उत्तम गुणांस सीमा नाही, त्याच्या आशांना मर्यादा नाही. गुणी व देखणी असणे हे अत्यंत लाभदायक असते. तशा व्यक्तीला प्रचंड ऐश्वर्यावर, कायदेशीर नसला तरी, प्रत्यक्ष अधिकार प्राप्त होतो."

डचेस म्हणाली, "महाराज, मी हे कबूल करते की, आपल्या साध्या संभाषणामध्ये आपण आपल्या विवेकाचा गळ वादाच्या जळात टाकता आणि त्याची खोली अजमावता. म्हणून मी असे सांगते की, टोबोसोची डल्सीनिया विद्यमान आहे-आणि आज ती जिवंत आहे-ती लावण्यवती व कुलीन आहे. एका शब्दात सार सांगावयाचे तर, डॉन क्विक्झोट यांच्यासारख्या उदात्त आणि महान् शिलेदारांची सेवा स्वीकारण्यास ती पूर्णपणे पात्र आहे-यावर विश्वास ठेवण्याचा निश्चय या क्षणापासून मी केला आहे- आणि त्याबरोबरच माझ्या घरातील सर्व नोकरचाकरांना, फार काय, माझ्या यजमानांना-सुद्धा तसा विश्वास ठेवण्यास मी भाग पाडीन. तरीही मी हे कबूल केले पाहिजे की, मला अस्वस्थ करणारे एक शल्य माझ्या मनाला अद्याप टोचत आहे-आणि त्यामुळे सँको-विषयी माझे मत वाईट होत आहे. ते शल्य म्हणजे, जेव्हा सँको पँझा आपले पत्र घेऊन लेडी डल्सीनियाकडे गेला, तेव्हा त्याला ती अत्यंत खराब असा गहू पाखडणीत असल्याचे आढळले, असे इतिहासात म्हटलेले आहे. त्यामुळे तिच्या सांपत्तिक स्थितीविषयी बराच संशय येतो."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले. "बाईसाहेबांनी हे लक्षात घ्यावे की, अन्य शिलेदारांच्या बाबतीत ज्या गोष्टी घडत असत, त्या साऱ्या माझ्या बाबतीत अगदी उलट घडत गेल्या. त्याला कारण दैवाची अगाध लीला आहे की कोणा मत्सरी मांत्रिकाचा निष्ठुर द्वेष आहे, हे मला सांगता येत नाही. कारण, आमच्यापैकी बहुतेक सर्व शिलेदारांच्या कपाळी काही ना काही विशिष्ट गोष्टी असतात हे निःसंशय. कोणी शिलेदार

जादूटोण्याच्या आटोक्याबाहेर असतो, तर प्रख्यात ओर्लँडोसारखा शिलेदार अजिंक्य असतो. फ्रान्समधील बारा शिलेदारांपैकी तो एक होता. त्याच्या डाव्या पायाच्या तळव्या-शिवाय त्याचे बाकीचे सारे शरीर अभेद्य होते असे म्हणतात आणि त्या तळव्यावरसुद्धा प्रचंड खिळीच्या टोकाशिवाय दुसऱ्या कोणत्याही शस्त्राने जखम होत नसे. म्हणून कार्पियोच्या बर्नर्डोने जेव्हा असे पाहिले की, आपल्या समशेरीने याला जखम होणार नाही तेव्हा त्याने त्याला जमिनीवरून उचलले आणि आपल्या बाहूमध्ये घट्ट आवळून त्याला रॉन्सेसवॅलेस येथे ठार केले. पृथ्वीचा पुत्र म्हणून मानला गेलेला क्रूर राक्षस ॲंटियस याला हर्क्युलसने कसे मारले हे त्याच्या लक्षात होते. अशा उदाहरणावरून मी असा तर्क करतो की, कुणाच्या तरी विशिष्ट कृपेमुळे माझे संरक्षण होत असावे. पण मी अजिंक्य मात्र नाही. कारण माझ्या अनुभवास असे अनेक वेळा आले आहे की, माझे मांस कोवळे आहे, अभेद्य नाही. तसेच मंत्रशक्तिपासून मुक्त असण्याचा विशेष हक्क मला मिळालेला नाही. कारण एका पिंजऱ्यात मी अडकलेला होतो, हे मला माहीत आहे. सारे जग मला तसे कोंडून ठेवू शकले नसते. पण पिशाच्च–विद्येच्या मंत्रतंत्राच्या बळाने ते घडून आले. त्या पिंजऱ्यातून मी पुन्हा मुक्त झालो, त्यावरून मला वाटते की, मंत्र–शक्तिसुद्धा मला पुन्हा तेथे डांबून ठेवू शकणार नाही. म्हणून हे जादूगार माझ्या-वर आपल्या दुष्ट विद्येचा प्रत्यक्ष प्रभाव पडत नाही असे पाहून मला अत्यंत आदरणीय असलेल्या व्यक्तीवर सूड उगवितात. जिच्यासाठी आणि जिच्या आधारावर मी जगतो आहे, त्या डल्सीनियाच्या जीविताचा छळ करून ते माझे जीवित हरण करण्याचा प्रयत्न करीत आहेत. म्हणून मला असे वाटते की, जेव्हा माझा सेवक माझा संदेश देण्यासाठी तिच्याकडे गेला, तेव्हा त्यांनी तिचे रूपांतर एका गांवढळ, गबाळ्या मुलीत केले आणि गहू पाखडण्याच्या हलक्या आणि तुच्छ कामात ती गढून गेल्याचे दाखविले. पण मी खात्रीने सांगतो की, ते गहू नव्हते की हुलगे नव्हते, तर ते मोठे मोती होते. हे सिद्ध करण्यासाठी महाराजांना मी हे सांगणे अवश्य आहे की, परवा मी टोबोसोवरून जात असताना मला डल्सीनियाचा राजवाडा काही सापडला नाही. पण दुसरे दिवशी जेव्हा माझा सेवक गेला, तेव्हा त्याला ती आपल्या मूळच्या सौंदर्यासह दिसली. जगातील अत्यंत लावण्यवती स्त्री ती त्याला वाटली ! त्यानंतर लगेच मी तिला भेटलो, तेव्हा ती मला कुरूप, गांवढळ, खेडवळ, ओबडधोबड आणि असंस्कृत अशी दिसली. पण खरोखर ती म्हणजे मूर्तिमंत संस्कृती आहे. माझ्यावर जादूचा काही परिणाम होत नाही, म्हणून त्या बिचाऱ्या स्त्रीवर जादू टाकण्यात आली असली पाहिजे आणि तिचे रूप छिन्नविछिन्न नि विद्रूप केले असले पाहिजे. अशा प्रकारे माझ्या शत्रूंनी तिचा द्वेष करून माझ्यावर सूड उगविला आहे. तिला आपले सकलगुणालंकृत स्वरूप पुन्हा प्राप्त होईपर्यंत मी शोकाच्या गर्तेत पडलो आहे.

"या बाबतीत मला असे सांगायचे आहे की, ती धान्य चाळीत बसली होती, या सँकोच्या म्हणण्याकडे कोणी लक्ष देऊ नये. कारण, मला जर ती बदललेली दिसली,

तर त्याला ती तशी दिसावी यात नवल काय ? सारांश, डल्सीनिया सुविख्यात आहे आणि सुकुलीन आहे. टोबोसोमधील अत्यंत प्राचीन आणि अत्यंत थोर घराण्यात तिचा जन्म झालेला आहे. त्या घराण्याचे रक्त तिच्या शिरातून भरपूर वहात असल्याची मला खात्री वाटते. हेलेनमुळे ट्रॉयची किंवा कॅव्हामुळे स्पेनची जशी कीर्ती पसरली, तशी–पण अधिक सन्माननीय कारणामुळे– टोबोसोची कीर्ती ' डल्सीनियाची जन्मभूमी ' म्हणून या-पुढील काळात सर्वत्र दरवळेल यात मला शंका वाटत नाही.

" सँको पँझासंबंधी सांगावयाचे तर, मी महाराजांना असे खात्रीने सांगतो की, कोणाही शिलेदाराची आजवर सेवा करणाऱ्या सेवकांपेक्षा तो अधिक सुखद सेवक आहे. काही काही वेळा तो अशा काही भोळ्याभावड्या गोष्टी सांगतो की, तो दुष्ट आहे की मूर्ख आहे, असा गमतीचा संभ्रम कोणाकोणाला पडतो. हा लबाड माणूस असावा, असे वाटावयास लावण्याइतका दुष्टपणा या नोकराचे अंगी आहे–पण त्याहून त्याचे अज्ञान फार मोठे आहे. म्हणून त्याला मूर्ख समजले पाहिजे. प्रत्येक गोष्टीचा तो संशय घेतो, पण तरीही प्रत्येक गोष्टीवर तो विश्वास ठेवतो. धडधडीत वेडेपणाच्या गोष्टीत तो गर्क आहे आणि त्यातून त्याला बाहेर काढणे कठीण आहे, असे आपल्याला जेव्हा वाटत असते, तेव्हा तो त्यातून अकस्मात् इतक्या चातुर्याने बाहेर पडतो की, त्याची प्रशंसा दशदिशा दुमदुमत असते. सारांश, मला एखादा बुद्धिमान असा सेवक मिळाला आणि त्याच्या भरीला एक शहर भेट म्हणून मिळाले, तरी त्या सेवकाच्या बदल्यात मी सँकोला देणार नाही. म्हणून महाराजांनी कृपावंत होऊन त्याला जे राज्य देऊ केले आहे, तिकडे त्याला जाऊ द्यावे की नाही, हे मला कळत नाही. पण मला हे कबूल केले पाहिजे की, त्याची बुद्धी त्या मार्गाने हळुहळू चालली आहे. त्याच्या बुद्धीला थोडी धार पाजली की कोणत्याही राजाप्रमाणे तो आपले राज्य चांगले चालवील. राज्यपालाला विद्वत्तेची किंवा इतर गुणांची फार गरज असते असे नाही, असे अनुभवाने आपल्याला शिकविले आहे. ज्यांना अक्षरही वाचता येत नाही अशी शेकडो माणसे बहिरीससाण्याच्या तीक्ष्ण दृष्टीने राज्यकारभार करू शकतात, हे आपण पाहिले नाही काय ? राज्यकर्त्यांचे मुख्य कार्य म्हणजे आपला उद्देश चांगला ठेवणे आणि प्रयत्नांची पराकाष्ठा करण्याचा निश्चय करणे. त्यांना शहाणपण शिकविण्यास समर्थ सल्लागारांची वाण कधीच पडत नाही. पंडित नसलेले पण शस्त्रधारी असलेले—अशा राज्यकर्त्यांना मार्गदर्शन करण्यासाठी दरबारात पुष्कळ सल्लागार असतात. सँकोला माझा उपदेश हा आहे की, " बाबा रे, तू कधी लाच घेऊ नकोस आणि आपले हक्क सोडू नकोस. त्याला देण्यासाठी दुसऱ्या काही लहान लहान सूचना माझ्या डोक्यात आहेत. योग्य वेळी मी त्या त्याला सांगेन. त्यामुळे त्याचा स्वतःचा तर लाभ होईलच, पण ज्या बेटाचे राज्य तो करणार आहे, त्यातील जनतेचेही कल्याण होईल. "

ड्यूक, डचेस व डॉन क्विक्झोट हे अशा प्रकारे आपापसात बोलत असतांना घरात मोठा गोंगाट झाल्याचे त्यांच्या कानी आले. आणि थोड्याच वेळात ते बसले होते त्या

खोलीत सँको अकल्पितपणे धावत आला. तो अत्यंत भयभीत झालेला होता. त्याच्या गळ्याला एक मळके फडके बांधलेले होते. सैंपाकघरातील वाढपी वगैरे नोकर लोक गोंगाट करीत त्याच्यामागे धावत आले. त्यापैकी एकाच्या हातात पाण्याने भरलेली छोटीशी परात होती. ती सँकोच्या हनुवटीखाली धरण्याची खटपट तो करीत होता. त्यातील पाण्याने त्या बिचाऱ्या सेवकाची दाढी धुण्यास दुसरा नोकर तयार होता. डचेस म्हणाली, " अरे, कसली गडबड आहे ही ? या भल्या माणसाला तुम्ही काय करीत आहात ? अरे, तो नियोजित राज्यपाल आहे, हे तुम्हाला माहीत नाही काय ? " त्यांच्यापैकी न्हाव्याचे काम करणारा वाढपी म्हणाला, " बाईसाहेब, आपले ड्यूकसाहेब, आणि याचे धनीसाहेब यांच्याप्रमाणे हे सद्गृहस्थ आम्हाला आपल्या शिरस्त्याप्रमाणे दाढी धुऊ देत नाहीत. "

सँको अत्यंत संतापाने म्हणाला, " देईन, देईन मी माझी दाढी धुऊन ! पण त्यासाठी स्वच्छ साबण हवे, स्वच्छ टॉवेल हवेत आणि असे गैदी पंजे नकोत. कारण माझा धनी आणि मी यांच्यामध्ये तसा काही फरक नाही. मग त्यांची दाढी धुण्यासाठी स्वर्गातले पाणी का ? आणि माझ्यासाठी पाताळातले पाणी का ? थोर लोकांच्या घरातील चालीरीतींमुळे जर कोणाचा अपमान होत नसेल, तरच त्या चांगल्या. पण या डबक्यातल्या गुरासारखे न्हाणे ही एखाद्या महंताचे फटके खाण्यापेक्षा खडतर प्रायश्चित आहे. माझी दाढी पुरेशी स्वच्छ आहे. ती धुण्याची काही गरज नाही. तुम्ही बाजूला सरा म्हणजे झाले. मला धुण्यासाठी–किंवा माझ्या केसाला म्हणतो–माझ्या दाढीला स्पर्श करण्यासाठी जो कोणी पुढे सरसावेल, त्याच्या कानावर मी असा ठोसा लगावीन की, त्याची आठवण त्याला पुढे बारा महिने राहील. या सर्व मंडळींना पूज्य असणारे ड्यूकसाहेब, अशा प्रकारचे विधि आणि साबणाचे खेळ हे चेष्टामस्करीसारखे वाटतात–पाहुण्यांच्या सभ्य स्वागतासारखे वाटत नाहीत. "

सँकोचा तो त्वेष आणि स्वतःचे त्याने केलेले समर्थन पाहून व ऐकून डचेसच्या हसून हसून मुरकुंड्या वळायची वेळ आली. पण सँकोच्या गळ्याभोवती ते घाणेरडे कापड बांधलेले पाहून आणि सैंपाक–घरातील नोकरांनी त्याचे खेळणे केलेले पाहून डॉन क्विक्झोट यांना फारसे बरे वाटले नाही. म्हणून बोलण्याची परवानगी मागण्यासाठी त्यांनी ड्यूकला खाली वाकून अभिवादन केले आणि त्या वाढप्याकडे नजर टाकून अत्यंत गंभीरपणे ते म्हणाले, " ऐका, सद्गृहस्थहो, या माणसाला सोडा आणि तुम्हाला योग्य वाटत असेल तर, आलात तसे येथून निघून जा. माझा सेवक दुसऱ्या कोणत्याही माणसाइतका स्वच्छ आहे. तुम्ही आणलेली परात चालायची नाही. त्यापेक्षा दारूचा पेला आणला असतात तरी ठीक होते. माझे ऐका आणि येथून चालते व्हा ! त्याला सोडा, कारण असा आडमुठ्या विनोद त्याला किंवा मला चालणार नाही. " आपल्या धन्याच्या तोंडचे हे शब्द ऐकून सँको म्हणाला, " छेः छेः ! ते येथे असू द्यात आणि आपला खेळ चालवू द्यात. मी माझ्या न्हाव्यांना मोबदला देईन हे मी आपल्याला

खात्रीने सांगतो. माझ्या दाढीशी लुडबूड करणे म्हणजे सिंहाच्या दाढीला हात घालण्यासारखे आहे हे त्यांना कळेल. त्यांनी एक कंगवा आणावा आणि माझी दाढी विंचरून काढावी. त्या दाढीत असू नये असे काही त्याना सापडले तर, त्यांनी माझे बारीक बोटाएवढे तुकडे करावेत. त्याला माझी परवानगी आहे. " डचेस अजून हसतच होती. ती म्हणाली, " सँको म्हणतो, ते बरोबर आहे. तो जे जे बोलेल ते ते सर्व बरोबरच असणार. तो शक्य तितका स्वच्छ आणि नीटनेटका आहे. तुम्ही त्याला स्नान घालण्याची गरज नाही. अंग धुण्याची आपली पद्धत त्याला आवडत नसेल, तर त्याच्या इच्छेप्रमाणे त्याला करू द्या. शिवाय दुसऱ्याला स्वच्छ करण्याचा आव तुम्ही आणता, पण तुम्ही स्वतः किती गबाळे आणि गलिच्छ आहात पहा. उद्धटही आहा, असे मी म्हणावे की काय हे मला समजत नाही. अशा माणसाला–आणि अशा दाढीला–सोन्याचा खुजा नि सोन्याचे पातेले आणि सुंदर टॉवेल आणण्याऐवजी तुम्ही हे भांडे आणि हे घाणेरडे कापड आणता याला काय म्हणावे? तुम्ही सारे नोकर गांवढळ आहात, पक्के बदमाष आहात, म्हणूनच शिलेदारांच्या सेवकाचा द्वेष प्रगट केल्याशिवाय तुम्हाला राहवत नाही. "

डचेस खरेपणाने बोलत आहे असे त्या मळकट चाकरांच्या पलटणीला आणि त्यांच्या म्होरक्याला वाटले. म्हणून त्यांनी सँकोच्या गळ्यातील कापड काढून घेतले आणि ते दृष्टीआड फेकून दिले. आपल्यावरील संकटाचे भय नाहीसे झाल्याचे पाहून सँको डचेसकडे धावत गेला आणि गुडघे टेकून म्हणाला, " बाईसाहेब, ईश्वर आपल्यावर कृपा करो! थोर माणसेच थोर दया दाखवू शकतात. आता आपण माझ्यासाठी जे काही केले, त्याची भरपाई मी कशी करावी हे मला कळत नाही. माझी इच्छा एवढीच की, आपल्यासाठी मी एक सशस्त्र शिलेदार बनावे आणि आपल्यासारख्या थोर स्त्रीच्या सेवेमध्ये माझ्या आयुष्याचे सारे दिवस खर्च करावे. मी एक गरीब खेडवळ माणूस आहे. माझे नाव सँको पँझा. मला मुले आहेत. शिलेदाराचा शागीर्द म्हणून मी नोकरी करतो. यापैकी कोणत्याही भूमिकेवरून मी जर आपले काही भले करू शकणार असलो, तर आपण फक्त उच्चार करायचा अवकाश. हुकूम सोडण्याचे कामी आपण जितके तत्पर असाल, त्यापेक्षा त्याची तामिली करण्यात मी अधिक तत्पर असेन ! "

डचेस म्हणाली, " सँको, मूर्तिमंत सौजन्याच्या शाळेत तू सभ्यतेचे धडे शिकलेला आहेस आणि शिष्टाचाराचे शिरोमणि आणि उपचाराचे कंठमणि असणारे डॉन क्विक्झोट यांच्या पंखाखाली तू वाढलेला आहेस. अशा शिलेदाराला आणि अशा सेवकाला सर्व सुखे प्राप्त होतात. एकजण शिलेदारीचा उत्तर ध्रुव, तर दुसरा निष्ठावंत सेवेचा तेजोगोल! अरे, माझ्या मित्रा सँको, ऊठ, आणि अशी खात्री बाळग की, तुझ्या या साऱ्या सभ्य वर्तनाचा मोबदला म्हणून तुझ्या ताब्यात एखादे राज्य शक्य तितक्या लौकर द्यावे म्हणून मी माझे स्वामी ड्यूक यांचे मन वळवीन. ते राज्य देण्याचे वचन त्यांनी तुला पूर्वीच दिले आहे. " यानंतर डॉन क्विक्झोट वामकुक्षी करण्यास गेले. पण डचेसने अशी इच्छा

सँकोपुढे प्रदर्शित केली की, " तुला जर फार झोप आली नसेल, तर माझ्याबरोबर आणि माझ्या सख्यांबरोबर एका थंडगार खोलीत तू ही दुपार घालव. " सँकोने उत्तर दिले, " चांगली भक्कम वामकुक्षी करण्याची मला सवय आहे, हे खरे. उन्हाळ्यात तर दुपारच्या वेळी मी चांगले चार-पाच तास झोप घेतो. पण बाईसाहेबांचा सन्मान राखण्या-साठी मी माझ्या या जुन्या प्रथेचा आज भंग करतो आणि जागा राहून आपली सेवा करतो. " दुसऱ्या बाजूने ड्यूकने असे नवे हुकूम सोडले की, " डॉन क्विक्झोट यांचा पाहुणचार शिलेदारासारखा तंतोतंत करावा— शिलेदारीच्या ग्रंथात आढळून येणाऱ्या शिष्टाचाराच्या मार्गावरून रतिमात्र चळू नये. "



प्रकरण ३२

# डचेस आणि तिच्या सख्या यांचा सँको पँझाशी जो चविष्ट संवाद झाला, तो वाचनीय व लक्षणीय भाग

या कथेत पुढे असे सांगितले आहे की—

त्या दिवशी दुपारी सँकोने एक डुलकीसुद्धा घेतली नाही. आपण दिलेल्या वचनाप्रमाणे तो डचेसच्या सेवेस सिद्ध राहिला. त्याच्या विनोदी बोलण्याची विलक्षण छाप तिच्या मनावर पडलेली असल्यामुळे तिने त्याला एका ठेंगण्या खुर्चीवर आपल्याजवळ बसण्यास सांगितले. पण सँकोला शिष्टाचार चांगले माहीत असल्यामुळे त्याने तसे करण्यास पूर्ण नकार दिला. तिने त्याला आग्रहाने सांगितले, " तू राज्यपालासारखा बैस आणि सेवकासारखा बोल. या दोन्ही भूमिकात तुझी प्रख्यात वीर सिड रू डायंस याच्या आसनावर बसण्याची योग्यता आहे. " सँकोने आपले खांदे उडविले आणि डचेसची आज्ञा पाळली. तिच्या साऱ्या सख्या तिच्याभोवती उभ्या राहून तिचे बोलणे ऐकू लागल्या. तेव्हा तिने संवाद सुरू केला. ती म्हणाली :—

" आता आपण एकांतात आहो. आपले बोलणे ऐकण्यास दुसरे कोणी नाही. म्हणून राज्यपालसाहेब, माझी इच्छा अशी आहे की, थोर डॉन क्विक्झोट यांच्या मुद्रित इतिहासामधील ज्या काही शंकांमुळे माझ्या मनाचा फार गोंधळ उडतो, त्या दूर कराव्या. पहिली शंका ही की, भल्या सँकोने डल्सीनियाला– टोबोसोच्या लेडी डल्सी-नियाला, असे मी म्हणावयास पाहिजे होते.– कधीच पाहिले नव्हते आणि आपल्या धन्याचे पत्र तिच्याकडे कधीच नेले नव्हते. कारण त्याने पत्राची वही सीएरा मोरेना येथे मागे ठेवली होती. मग त्याने तिचे उत्तर आणल्याचे सोंग कसे केले आणि ती गहू वाफाणीत असताना आपल्याला दिसली, असे कसे सांगितले ? त्या अप्रतिम डल्सीनियाच्या कीर्तीला कलंक लावणारी ही कल्पित कथा विनोदी म्हणायची काय ? तिच्यामुळे त्या निष्ठावंत सेवकाच्या चारित्र्याला केवढे मोठे लांछन लागते ! " हे ऐकून, काही न बोलता, सँको उठून उभा राहिला आणि आपल्या ओठावर बोट ठेवून व आपले शरीर वाकवून तो त्या सर्व खोलीत सावधपणे पावले टाकीत फिरला. त्याने पडदे वर उचलले आणि कोना–कोपऱ्यात निरखून पाहिले. आसपास कोणीही नाही असे पाहून, शेवटी तो आपल्या जागेवर परत आला आणि म्हणाला, " बाईसाहेब, आता येथे आपल्याशिवाय दुसरे कोणी नाही असे मला दिसते. म्हणून कोणाच्या रागा–लोभाची पर्वा न करता मी

खरीखुरी गोष्ट आपल्याला सांगतो—त्याशिवाय आपण विचाराल तेही सांगतो. पण ' पुडिंग ' या पदार्थासंबंधी मात्र शब्दही सांगणार नाही. पहिली व प्रमुख गोष्ट मी आपल्याला सांगितली पाहिजे ती ही की, माझा धनी पुरा पुरा वेडा आहे असे मी मानतो. काही काही वेळा काही विचित्र म्हणींच्या जुडग्यावर ते अडखळून पडतात. त्या म्हणींचा अर्थ सैतानाला-सुद्धा सांगता येणार नाही. मार्च महिन्यातील ससासारखा तो वेडा आहे, हे मी माझ्या डोक्यातून काढू शकत नाही, हा महत्त्वाचा मुद्दा आहे. त्यांची आंधळी बाजू कोणती आहे हे मला पक्के माहीत असल्याने माझ्या डोसक्यात ज्या ज्या कल्पना येतात, त्यांना काही आगा–पिछा नसला तरी, त्या मी माझ्या धन्याला खऱ्या म्हणून पटवू शकतो. त्याच्या पत्राचे उत्तर हे या प्रकारचे होते. आणि परवाच मी त्याच्याशी एक लबाडी केली आणि ती अद्याप छापलेली नाही– ती म्हणजे लेडी डल्सीनियावर जादूटोणा झाल्याची. तुम्हाला म्हणून सांगतो, चंद्रावरील माणसाइतकीच तिच्यावर जादू झालेली आहे, हे आपण पक्के समजा. " असे म्हणून, डचेसच्या विनंतीनुसार, त्याने जादूच्या ढोंगाचा सारा वृत्तांत अत्यंत प्रामाणिकपणे निवेदन केला. त्यामुळे श्रोत्यांची मोठी करमणूक झाली.

डचेस म्हणाली, " याच्यापेक्षाही अगम्य अशी दुसरी एक शंका या प्रकरणी माझ्या मनात आलेली आहे. माझ्या कानात कोणी तरी असे गुणगुणत आहे आणि विचारीत आहे की, ला मांचा येथील डॉन क्विक्झोट हे जर इतक्या उथळ मनाचे असतील, तर त्यांची अशी माहिती असणाऱ्या सँको पँझाने या वेड्याची सेवा का करावी ? आणि त्याच्या पोकळ व बेफाम वचनांवर विसंबून का राहावे ? यावरून मी एवढाच तर्क करते की, धन्यापेक्षा सेवकच अधिक मूर्ख असला पाहिजे. आणि जर तसे असेल तर, ज्याला स्वतःवर राज्य करता येत नाही, त्याला एका बेटाचे राज्य किंवा लोकांवर शासन करण्याची सत्ता बहाल करणारी मॅडम डचेस हीही त्या दोघांइतकीच मूर्ख मानली जाणार नाही काय ? " सँको म्हणाला, " देवाशपथ, आपली शंका भोजनाच्या वेळीच आलेली आहे, मग ती आपल्या कानात गुणगुणत का राहावी ? ती आपण स्वच्छपणे बोलून दाखवावी—आणि आपल्या मर्जीस येईल तितक्या मोठ्याने बोलून दाखवावी. मी मूर्ख आहे हे निःसंशय. मी शहाणा असतो तर मी माझ्या धन्याला पूर्वीच सोडले असते. पण माझे नशीबच तसे आहे. भटकंतीची मला दुष्ट खोड आहे. त्यासंबंधी सांगता येण्यासारखे आहे ते एवढेच. मी माझ्या धन्याच्याबरोबर सुख-दुःखांमध्ये सतत राहिले पाहिजे. आम्ही दोघेही एकाच शहरीं जन्मलेलो. त्याची भाकरी मी खाल्लेली. मी त्याच्यावर खूप प्रेम करतो आणि आम्हा दोघांमध्ये प्रेम कमी झालेले नाही. तो मला भरपूर पगार देतो. त्याने मला तीन शिंगरे दिली आहेत. मी त्याची सेवा इमानेइतबारे करतो आणि मी त्याचा विश्वासू सेवक आहे. मृत्यूशिवाय दुसरे कोणीही आम्हास दूर करू शकणार नाही. बाईसाहेबांना मला राज्य बहाल करणे योग्य वाटत नसेल तर न वाटो. मी जन्मलो गरिबीत आणि मी मरेन तेही गरिबीत. राज्य न मिळत

मी इहलोकातून गेलो तरी माझ्या मनाला संतोष वाटेल. मी वेडा आहे हे खरे आहे, पण तरीही मला या म्हणीचा अर्थ चांगला कळतो की, किडीचा नाश व्हावा म्हणून मुंगीला पंख असतात. कदाचित् राज्यपाल सँकोपेक्षा सेवक सँको स्वर्गात लौकर जाईल. येथे जो पाव भाजला जातो तो फ्रान्समधील पावाइतकाच खमंग असतो–आणि अंधारांत माझ्या बायकोसारखीच कोणतीहि प्रतिष्ठित बाई. रात्रीच्या वेळी सारी मांजरे एकाच करड्या रंगाची. दुपारी दोनपर्यंत ज्याला सकाळची न्याहारी मिळाली नसेल तो खरा दुःखी. भरपूर न्याहारीनंतर उपास करणे चांगले. कोणाही माणसाचे पोट दुसऱ्यापेक्षा हातभर मोठे नसते. पण ते पोट कितीही मोठे झाले तरी ते भरायला चारा नि कडबा भरपूर असेल. भरले पोट म्हणजे भरले पोट. बहिरीससाणा वेगाने उडतो, चिमणीही वेगाने उडते. लोकरीचे भारी कापड उत्तम, पण भरड कापडही उबदार असते. एकाचा चार वारांचा तुकडा आणि दुसऱ्याचा चार वारांचा तुकडा—दोघांची लांबी सारखीच. ( या लोकातून ) जाण्याचा क्षण आला म्हणजे आपणा सर्वांना आपले चंबुगबाळे गुंडाळावे लागते. राजपुत्र असो की ऊ असो, दोघांनाही एकाच वाटेने शेवटी जावे लागते. एकापेक्षा दुसऱ्याला चांगली वाट मिळते असे नाही. चर्चमधील नोकरापेक्षा पोपच्या देहाला अधिक जागा लागत नाही–मग त्याचा देह अधिक उंच असेना का. ( दफनाच्या ) खड्ड्यात आली की सारी माणसे सारखी नसली तरी सारखी केली जातात आणि मग त्याचा निरोप घेऊन जातात. मी आपल्याला पुनः सांगतो की, मी मूर्ख आहे म्हणून बेट देण्यास पात्र नाही, असे आपल्याला वाटत असेल, तर आपण काय करता आणि काय करीत नाही, याची पर्वा न करण्याइतका मी शहाणा होईन. ' सैतान क्रॉसच्या मागे लपलेला असतो ' अशी एक जुनी म्हण आहे. जे जे चकाकते ते सारे सोने नसते. नांगर हाकणाऱ्या बांबाला स्पेनचा राजा करण्यात आले आणि रेशमी वस्त्रे ल्यालेल्या रोडेरिगोला श्रीमंती असूनही सापांच्या तोंडी फेकण्यात आले, असे प्राचीन पोवाड्यात सांगितलेले आहे. ते पोवाडे प्राचीन असल्यामुळे खोटे सांगणार नाहीत. "

सँकोचे हे भाषण इतरांप्रमाणेच म्हातारी दासी–डोन्ना रॉड्रिगेझ–कान देऊन ऐकत होती. ती म्हणाली, " ते पोवाडे खरे सांगतात. मला आठवते, एका पोवाड्यात असे म्हटलेले होते की, बेडूक, साप आणि सरडे यांनी भरलेल्या एका थडग्यात डॉन रोडेरिगो याला जिवंत कोंडलेले होते. दोन दिवसांनंतर तो हलक्या आणि दुःखी आवाजात थडग्यातून ओरडत होता, ' अरे, [आता हे मला खात आहेत. माझ्या शरीराच्या ज्या भागाने मी फार पाप केले, ते हे कुरतडत आहेत. ' यावरून या माणसाचे म्हणणे बरोबर आहे असे दिसते. कृमि–कीटकांनी कुरतडून टाकलेला राजा होण्यापेक्षा गरीब मजूर होणे चांगले, हे त्याचे म्हणणे मला योग्य वाटते. "

म्हणींनी भरलेले सँकोचे सिद्धांत आणि त्यावर त्या भोळ्या–भाबड्या दासीने केलेले भाष्य–यामुळे डचेसची चांगलीच करमणूक झाली. ती म्हणाली, " अरे इमानी

सँको, तुला हे माहीत आहे ना की, एखाद्या सज्जनाने किंवा शिलेदाराने दिलेले वचन हे त्याला स्वतःच्या प्राणाइतके मोलाचे व पवित्र वाटते. माझे स्वामी ड्यूक हे तुझ्या धन्याच्या श्रेणीतील नसले तरी एक शिलेदार आहेत. म्हणून तुला राज्य देण्याचे बाबतीत ते आपला शब्द न चुकता पाळतील, याविषयी मला काडीमात्र शंका नाही. म्हणून सँको, धीर धर. साऱ्या जगाने द्वेष आणि मत्सर केला तरी, तुझ्या ध्यानीमनी नसताना, तू एके दिवशी अकस्मात आपल्या राज्याचा पूर्ण सत्ताधीश झाल्याचे तुला आढळून येईल. आपल्या सत्तेची सारी चिन्हे आणि अलंकार धारण करून व उंचीउंची वस्त्रे परिधान करून तू आपल्या सिंहासनावर बसशील हे नक्की. पण आपल्या नोकरा-चाकरांना खरा न्याय देण्याची तू काळजी मात्र घे. आपल्या निष्ठेमुळे आणि विवेकामुळे तुझ्याकडून ते शुद्ध न्यायाची अपेक्षा करतील."

सँको म्हणाला, "राज्यकारभारासंबंधी आपण काय ते माझ्यावर सोपवा. गोर-गरिबांचे बाबतीत मी नेहमीच उदारपणे वागत आलो आहे. दुसऱ्या माणसाच्या तोंडातील घास काढून घेण्याचा मला तिटकारा आहे. उलटपक्षी त्या नोकरांनी माझ्याशी कपटाने न वागण्याची काळजी घ्यावी. नाही तर देवाशपथ बरवर पाहता, मी एक म्हातारा कुत्रा आहे. माझ्या इच्छेस येईल तेव्हा मी कुत्र्यासारखा झोपू शकतो, पण दुसऱ्या कोणत्याही माणसाप्रमाणे माझी नजर तीक्ष्ण आहे आणि त्या नजरेत जळमटे येऊ न देण्याची मी काळजी घेतो. जोडा कोठे आवळतो हे मला कळते. कोण कोण माणसे एकोप्याने वागतात हे मला समजते. सचोटी हीच व्यवहाराची उत्तम हातोटी. ती मी घट्ट धरीन. सज्जनांना माझा हात आणि हृदय मिळेल, पण दुर्जनांना माझे पाय किंवा संगतही मिळणार नाही. राज्यकारभारामधील मुख्य मुद्दा, माझ्या मते, चांगली सुरुवात करणे हा आहे. जवाच्या ताटांचा भार जितका मी बरोबर हाताळीन, तितकाच या बेटाचा कारभार मी पंधरवड्याच्या आत चांगला चालवीन, हे मी, माझ्या प्राणांची पैज मारून, सांगतो. सँको येथे बसला आहे, हे जितके सत्य, तितकेच हेही."

डचेस म्हणाली, "सँको, तू योग्य बोलतोस. कालगतीने सर्व गोष्टी पक्व होतात. कोणताही माणूस जन्मतःच शहाणा नसतो. धर्मगुरू माणसातूनच येतात—पाषाणातून नव्हे. पण आपण लेडी डलसीनियाकडे पुनः वळू. आपल्या धन्याशी हातचलाखी करण्याचे सँकोने जे कारस्थान रचले, त्यामुळे तोच अधिक फसला, असे मला फार फार वाटते. कारण माझी अशी खात्री आहे की, ज्या प्राण्याला तू गावढळ मोलकरीण समजलास आणि जिला आपल्या धन्याने टोबोसोची डलसीनिया मानावे म्हणून तू फार कष्ट केलेस ती खरोखर टोबोसोची डलसीनियाच होती, आणि डॉन क्विक्झोट समजतात त्याप्रमाणे तिच्यावर खरोखरच जादूटोणा झालेला होता. तुझ्या धन्याचा छळ करणाऱ्या जादुगारांनी ही कथा रचली आणि तुझ्या डोक्यात घातली. तू हे लक्षात घे की, येथे आमच्याजवळ आमचे मांत्रिक आहेत. ते आमच्यावर प्रेम करतात आणि जगात जे जे घडते त्याचा वृत्तांत आम्हास प्रामाणिकपणे आणि निःपक्षपातीपणे निवेदन करतात. त्यात काही लबाडी

नसते की मोघमपणा नसतो. माझ्यावर विश्वास ठेव की, उड्या मारणारी ती गांवढळ पोर टोबोसोची डल्सीनिया होती आणि अजून आहे. तिच्या आईने तिला जन्म दिला हे जितके खरे, तितकेच तिच्यावर जादू झाली आहे हेही खरे. आपल्याला काहीही कल्पना नसताना, ती आपल्याला खऱ्या स्वरूपात आणि मूळच्या तेजात पुनः दिसेल. मग आपलीच फजिती झाली असे सँकोला आढळून येईल."

सँको म्हणाला, "बाईसाहेब, हे सारे खरे असेल, तर माझा धनी मला मॉंटेसिनोच्या गुहेबद्दल जे सांगतो, त्यावर विश्वास ठेवण्याकडे आता माझ्या मनाचा कल होत आहे. 'डल्सीनियावर जादू झाली आहे' असे सांगण्याचे माझ्या डोक्यात जेव्हा आले, तेव्हा मी तिला ज्या सुंदर स्वरूपात आणि वस्त्रालंकारात पाहिले असे त्याला मी सांगितले होते, तशाच स्वरुपात माझ्या धन्याने तिला गुहेत पाहिले, असे तो सांगतो. बाईसाहेब, आपल्या लक्षात आले असेलच की, मला जे वाटत होते, त्याच्या अगदी उलट हे त्याचे बोलणे होते. देव आपले भले करो! माझ्यासारख्या रेम्याडोक्याच्या मेंदूत अशी चलाख युक्ती एकाएकी येईल, अशी कल्पना सैतान तरी करू शकला असता काय ? शिवाय, माझ्यासारख्या बेअकली माणसाच्या एका वाक्यावरून इतक्या विलक्षण गोष्टीवर विश्वास ठेवण्याइतका माझा धनी वेडपट असेल, असे कोणास वाटेल ? पण ते काहीही असले तरी, आपण मला लुच्चा मानणार नाही, अशी मला आशा आहे. माझ्यासारखा ठोंब्या दुष्ट मांत्रिकांच्या लांड्यालबाड्या जाणू शकेल असे मानता येत नाही. मी ती थाप ठोकली याचे कारण एवढेच की, माझा धनी मला चिडविण्याचे थांबेना. पण त्याच्या स्वभावाचा दुरुपयोग करावा अशी मला मुळीच इच्छा नव्हती. हेतूवेगळे काही घडले, तर त्याला कोण काय करणार ? ईश्वर माझ्या अंतःकरणाचा साक्षी आहे."

डचेसने उत्तर दिले, "सँको, हे तू प्रामाणिकपणे सांगितलेस. पण मॉंटेसिनोच्या गुहेसंबंधी तू काय बोलत होतास, ते मला कृपा करून सांग. ती कथा ऐकण्याची मला मोठी जिज्ञासा आहे." नंतर सँकोने डचेसला सारा वृत्तांत निवेदन केला. तेव्हा ती म्हणाली, "हे पाहा, आताच मी तुला जे म्हटले, ते तंतोतंत खरे असल्याचे सिद्ध होत आहे. टोबोसोहून आलेल्या सँकोला जी गांवढळ पोर भेटली, तीच आपल्याला तेथे दिसली, असे थोर डॉन क्विक्झोट म्हणत आहेत, त्यावरून ती डल्सीनिया होती हे पूर्णपणे संशयातीत आहे. यावरून हे दिसून येते की, मांत्रिक हे सूक्ष्म बुद्धीचे लोक आहेत. त्यांना सर्व गोष्टी कळतात आणि त्यांची खबर ते तत्काळ व अचूक देतात." सँको म्हणाला, "टोबोसोच्या लेडी डल्सीनियावर जादू करण्यात आलेली असेल तर ते तिचे दुर्दैव. माझ्या धन्याच्या साऱ्या वैऱ्याशी मी भांडण कशाला करू ? माझ्या माहितीप्रमाणे तसे वैरी थोडथोडके नाहीत आणि त्यांच्याशी सामना करणे फार कठीण आहे. मी इतकेच म्हणू शकतो की, मी पाहिलेली ती स्त्री गांवढळ मोलकरीण होती. मी तिला तसेच मानले आणि तसेच मानून मी तिचा निरोप घेतला. आता तीच गबाळ पोर खरोखर डल्सीनिया

असेल तर त्याला मी काय करू ? त्यासाठी माझी कोणी हजेरी घेण्याचे कारण नाही. आपण आपले खोगीर योग्य त्या घोड्यावरच घालावे, नाही तर काम कधी संपणारच नाही. ' सँकोने मला असे सांगितले, ' असे एक जण म्हणतो, तर ' सँकोने मला तसे सांगितले ' असे दुसरा म्हणतो. सँको इकडे आहे, सँको तिकडे आहे. सँकोने हे केले, सँकोने तेही केले. जणु काही, सँको कोण आहे हे मला माहीतच नाही. सॅम्सन कॅरॅको मला सांगतो, सँको हा ग्रंथांमधून सर्व जगभर प्रवास करून आलेला आहे आणि कॅरस्को हा सलॅमँका विद्यापीठाचा पदवीधर आहे. असे लोक इच्छा झाल्याखेरीज मुद्दाम खोटे बोलत नाहीत, किंवा खोटे बोलण्याचा काही उपयोग असेल तरच खोटे बोलतात. म्हणून कोणाही माणसाने याविषयी माझ्याशी भांडण उकरून काढू नये किंवा माझ्या बोलण्यात लुडबुड करू नये. कारण मी एक कीर्तीमान माणूस आहे, आणि कीर्तीची किंमत संपत्ती-पेक्षा मोठी असते असे माझा धनी म्हणतो. तुम्ही मला या राज्यकारभारात एकदा अडकवा म्हणजे तुम्हाला नाना चमत्कार दिसतील. जो चांगला सेवक होता, तो चांगला धनी ठरेल. विश्वासू सेवक हा अलौकिक राज्यपाल झाल्याचे तुम्हाला आढळून येईल अशी मी ग्वाही देतो. " डचेस म्हणाली, " देववाणीसारखे सँको बोलतो. तो बोलतो, त्यातील प्रत्येक वाक्य कटोच्या किंवा निदान मायकेल व्हेरिनोच्या अगदी अर्क विधाना-सारखे असते. व्हेरिनो तारुण्यातच मरण पावला. त्याच्या भाषेत सांगावयाचे तर वाईट डगल्याच्या आत चांगला पिवय्या सांपडतो का पहा. "

सँको म्हणाला, " बाईसाहेब, मी माझ्या आयुष्यात कधी दुष्ट बुद्धीने दारू प्यायलो नाही, पण तहानेमुळे केव्हा तरी प्यालो असेन. माझ्या अंगी ढोंग लवमात्र नाही. जेव्हा कारण असेल तेव्हा मी दारू पितो आणि केव्हा केव्हा कारण नसतानाही दारू पितो. मी काही गर्विष्ठ माणूस नाही हे आपण पहाताच आहा. मला कोणी दारू देऊ केली, तर ती मी चटकन् घशाखाली उतरवितो—त्यानी मला उद्धट किंवा क्षुद्र मानू नये म्हणून. मी स्वतः कोण आहे आणि शिष्टाचार म्हणजे काय आहे हे मला कळत नाही, असे त्यांना वाटू नये म्हणून. जेव्हा एखादा मित्र किंवा सज्जन माणूस स्वतः मद्यपान करतो आणि मद्याचा प्याला दुसऱ्याच्या ओंठाला लावतो, तेव्हां त्याला नकार देण्याइतका पाषाण-हृदयी कोण असेल ? त्याने फक्त आपले तोंड उघडायचे—दुसरे काही करायचे नसते. तथापि मी नेहमी उडी मारण्यापूर्वी अंदाज घेत असतो आणि जरूरीपेक्षा जास्त दारू कधीच घेत नाही, त्या दृष्टीने शिलेदाराच्या आमच्यासारख्या गरीब सेवकाकडून मोठा मर्यादातिक्रम कधी होण्याची धास्ती नसते. शुद्ध पाणी हेच आमचे रोजचे मद्य. ते शुद्ध मिळाले नाही तर खळग्यातील, जंगलातील, वाळवंटातील, डोंगर दऱ्यातील मिळेल ते पाणी, आम्हाला प्यावे लागते. दयाबुद्धीने कोणी मद्याचा एक थेंब कधी देत नाही—एका घोटासाठी आपला एक डोळा गमवायला आपण तयार असलो तरी. "

डचेस म्हणाली, " सँको, माझा तुझ्यावर विश्वास आहे. पण आता वेळ फार झाला म्हणून तू जा आणि विसावा घे. नंतर आपण पुष्कळ वेळ बोलत बसू. तू म्हणतोस त्याप्रमाणे, राज्यकारभारात तुला अकस्मात 'अडकविण्याचे' उपाय मग आपण योजू." सँकोने डचेसच्या हाताचे पुनः एकवार चुंबन घेतले आणि प्रार्थना केली, "बाईसाहेब, माझ्या डॅपलची खास काळजी घ्या. तो माझ्या डोळ्यातील बाहुली आहे." डचेसने विचारले, " हा डॅपल कोण ? " सँकोने उत्तर दिले, " माझे जनावर–माझे गाढव, असे मी आपली माफी मागून म्हणतो. गाढव हा शब्द माणसामध्ये सर्वसामान्य झाला आहे, म्हणून मी त्याला तसे म्हणत नाही. मी त्याला डॅपल म्हणतो. मी या किल्ल्यात प्रथम जेव्हा आलो, तेव्हा त्या स्त्रीच्या ताब्यात हाच पशू मी देणार होतो, पण ती तत्काळ भांडायला उठली. जणू काही मी तिला कुरूप चेहऱ्याची म्हातारी चेटकीण–किंवा असेच–काही म्हणालो आहे, असे वाटून ती भडकून उठली नि निघून गेली. पण तिच्यासारख्या पोक्त गंभीर दासींनी शोभिवंत दालनात आवळलेल्या मुद्रेने शोभा आणण्यासाठी बसून राहण्यापेक्षा गाढवांची देखभाल करणे अधिक योग्य आहे की नाही याचा निवाडा कोणीही द्यावा. माझ्या हृदयाची व्यथा काय सांगू ? आमच्या शहरातील–त्याचे नाव मी सांगत नाही–एका सद्गृहस्थाला अशा प्राण्याबद्दल किती भयंकर तिटकारा वाटत होता ! हे प्राणी म्हणजे या म्हाताऱ्या परिवारातल्या पाठीराखणी ! " डचेसची दासी डोन्ना रोड्रिगेझ म्हणाली, " कोणी तरी गलिच्छ विदूषक तसे म्हणाला असेल. तो जर संभावित गृहस्थ असता किंवा सुसंस्कृत असता तर त्याने त्यांची वारेमाप स्तुती केली असती. "

डचेस म्हणाली, " पुरे झाले हे ! डोन्ना रोड्रिगेझने आपली जीभ आवरावी आणि श्रीयुत सँको पँझाने आपल्या विसाव्याच्या ठिकाणाकडे जावे. त्याने आपल्या डॅपलचा चांगला पाहुणचार करण्याचे काम मजवर सोपवावे. सँकोच्या जंगम मालमत्तेपैकी तो एक असल्यामुळे मी त्याला जिवाच्या कप्प्यात ठेवीन. " सँको उत्तरला, " बाईसाहेब, त्याला आपण तबेल्यात ठेवा. तीच त्याची योग्यता आपण म्हणता त्या ठिकाणी त्याला मिनिटभरही ठेवणे, हे त्याच्या किंवा माझ्या दृष्टीने योग्य नव्हे. आपण त्याची अशी सोय करण्यापेक्षा खाटकाची सुरी माझ्या आतड्यात खुपसली गेली तर बरे. मला चांगले वळण मिळालेले आहे. माझा स्वामी आणि धनी याने मला वर्तनाचा असा धडा दिला आहे की, आपण कोणतीही गोष्ट कमी न करता अधिक करावी. पण जेव्हा गाढवाचा आणि जिवाच्या कप्प्याचा प्रश्न येतो, तेव्हा दोनदा विचार करणे चांगले. "

डचेस म्हणाली, " ठीक आहे. तुझे गाढव तुझ्याबरोबर त्या राज्यावर येईल. तेथे तू आपल्या इच्छेप्रमाणे त्याचे लाड कर, चोचले पुरव आणि हवे ते खायला घाल. " सँको म्हणाला, " बाईसाहेब, असे करणे हे विचित्र आहे असे मानू नका. पुष्कळ गाढवे आतापर्यंत सरकारात गेलेली मी पाहिली आहेत. माझे गाढवही सरकारात गेले तर ती काही नवलाईची गोष्ट होणार नाही. "

सँकोचे हे शब्द ऐकून डचेस पुनः हसत सुटली. विसावा घेण्यासाठी त्याची रवानगी करून ती ड्यूककडे गेली आणि त्या सेवकाशी झालेल्या आपल्या गमतीच्या संवादाचा सारा वृत्तांत तिने त्याला सांगितला. नंतर त्या दोघांनी असे ठरविले की, डॉन क्विक्झोटची गंमत करण्यासाठी आपण काही विशेष योजना करावी आणि त्याच्या शिलेदारीची चेष्टा करण्यासाठी काही मौजेची युक्ती योजावी. ती योजना करण्यात ते इतके यशस्वी झाले की, या विख्यात-इतिहास ग्रंथातील ते एक उत्तम साहस गणले जाईल.



प्रकरण ३४

# टोबोसोच्या अप्रतिम डल्सीनियाला जादूतून मुक्त करण्याचे मार्ग व उपाय : या साऱ्या ग्रंथातील एक अत्यंत सुप्रसिद्ध साहस–प्रकरण

ड्यूक आणि डचेस यांची आपल्या पाहुण्यांच्या विनोदाने फार मोठी करमणूक झाली. म्हणून त्यांनी आपला हा खेळ सुधारण्याचे ठरविले. एखाद्या साहसाचे स्वरूप जिला देता येईल, अशी काही गमतीची योजना अमलात आणण्याचे त्यांनी योजिले. एक विलक्षण आनंद देणारा विषय डॉन क्विक्झोट यांनी दिलेल्या मॉंटेसिनोच्या गुहेतील वृत्तांतात सापडला. टोबोसोच्या डल्सीनियावर खरोखर जादू करण्यात आली आहे असे मानण्याइतका सँकोचा भोळेपणा आहे, हे पाहून डचेसला विस्मय वाटला. त्या जादूच्या कहाणीचा पहिला प्रवर्तक वास्तविक सँकोच होता आणि तोच तिचा एकमेव जादूगार.

त्याप्रमाणे त्यांनी रानडुकराची शिकार करण्यासाठी एक दिवस ठरविला. शिकारीत कोणत्याही गोष्टीची उणीव भासता कामा नये, अशा सूचना त्यांनी आपल्या नोकरांना दिल्या. पाचसहा दिवसांत त्यांची शिकारीस जाण्याची तयारी झाली. एखाद्या श्रेष्ठ राजपुत्राला शोभेल असा शिकाऱ्या–हाकाऱ्यांचा व नोकर–चाकरांचा लवाजमा बरोबर होता. त्यांनी डॉन क्विक्झोट यांना एक शिकारी पोशाख दिला पण त्यांनी तो नाकारला. " त्याची काही गरज नाही, कारण थोड्याच वेळात मी शस्त्रांची कसून कवाईत करण्यासाठी लौकरच परत येणार आहे आणि म्हणून माझ्याबरोबर कपड्यांचे संच किंवा ओझ्याची जनावरे नकोत, " असे ते म्हणाले. पण सँकोने मात्र सुंदर हिरवा पोशाख तत्काळ स्वीकारला. संधी मिळताच तो विकून टाकण्याचा त्याचा बेत होता.

ठरलेला दिवस उजाडला. डॉन क्विक्झोट सशस्त्र झाले आणि सँको आपल्या नव्या वेशात सजला. त्याला एक उत्तम घोडा देऊ केला होता. पण तो घेऊन आपले गाढव सोडण्यास तो तयार नव्हता. गाढवावर स्वार होऊन शिकाऱ्यांच्या गर्दीत तो घुसला. डचेसही वेगळाच आणि मौजेचा पोशाख करून त्या मंडळीत सामील झाली होती. अदबशीर शिलेदारजी तिच्या तट्टाचे लगाम मोठ्या तत्परतेने धरण्यास तयार झाले. पण त्यांना तसे करू देण्यास ड्यूक नाराज दिसले. थोडक्यात म्हणजे ते सर्वजण शिकारीच्या जागी आले. दोन अत्यंत उंच पर्वतांच्या मध्यभागी ते जंगल होते. तेथे ते सारेजण उतरले आणि त्यांनी निरनिराळ्या जागा धरल्या. रानडुकरे ज्या वाटेने नेहमी जात

असत, अशा जागी डचेस, हातात एक टोकदार भाला घेऊन, तयार राहिली. तिच्याजवळ ड्यूक व डॉन क्विक्झोट होते. शिकारी लोक आपापल्या सोयीप्रमाणे निरनिराळ्या वाटांवर खडे राहिले. पण सँकोने आपल्या डॅपलसह सर्वांच्या मागे थांबणे पसंत केले. आपल्या त्या बिचाऱ्या प्राण्याला काही दुःखद अपघात होईल, या भीतीने तो त्या गाढवाला क्षणभरही विसंबत नसे.

आता शिकार जोरात सुरू झाली. मोठी आरडाओरड झाली. कुत्र्यांनी सुरुवात केली. शिंगे वाजू लागली आणि शिकारी एकमुखाने इतक्या तारस्वराने आरोळ्या ठोकू लागले की, कोणाचे बोलणे कोणाला ऐकू जाईना. थोडयाच वेळात प्रचंड आकाराचे एक भयानक रानडुक्कर धावून आले. आपले दात आणि सुळके घाशीत आणि तोंडाने फेस गाळीत येत असलेल्या त्या प्राण्याचा पाठलाग कुत्र्यांनी आणि शिकाऱ्यांनी जोराने चालविला. डॉन क्विक्झोट ज्या जागी उभे होते तिकडे ते रानडुक्कर त्वेषाने धावत गेले. तेव्हा शिलेदारजींनी आपली ढाल घट्ट धरून आपली समशेर उपसली आणि त्य खवळलेल्या जनावराशी सामना करण्यासाठी ते पुढे सरसावले. भलामोठा भाला घेऊन ड्यूक त्यांच्या मदतीस गेले–आणि डचेसही पुढे गेली असती पण ड्यूकने तिला प्रतिबंध केला. सँको एकटा होता. ते भयंकर धूड पाहून त्याने तेथून निघून जाण्याचे ठरविले. डॅपलला तेथेच सोडून एका उंच ओक वृक्षाकडे तो धावत सुटला. त्याचे पायातील तितक्या वेगाने तो धावत होता. त्या वृक्षाच्या माथ्याकडे तो कष्टाने चढू लागला. तो चढत असताना दुर्दैवाने एक फांदी तुटली आणि तो खाली पडू लागला. पण दुसऱ्या एका फांदीच्या खुंटाने त्याचा नवा कोट धरून ठेवला आणि त्याचे पतन थांबविले. तो आकाशात लोंबकळू लागला. त्याला वर जाता येईना की खाली येता येईना. त्याचा सुंदर हिरवा कोट फाटला. क्षणोक्षणी त्याला असे वाटत होते की, ते रानडुक्कर जबड्यातून फेस गाळीत आणि भीषण सुळके उगारीत, आपले तुकडे तुकडे करण्यासाठी आपल्याकडे धावून येत आहे. तो इतका गोंधळला की, तो मदतीसाठी ओरडू लागला– आरोळ्या ठोकू लागला– जणु काही कोणी रानटी पशू त्याचा प्रत्यक्ष स्वाहाकार करीत आहे.

शेवटी त्या सुळकेवाल्या रानडुकराला जमिनीवर लोळविण्यात आले. त्याच्या शरीरात किती तरी टोकदार भाले घुसलेले होते. सँकोच्या ओरडण्यामुळे डॉन क्विक्झोट घाबरले. त्याचा आवाज त्यांनी सहजच ओळखला. ते इकडे–तिकडे पाहू लागले, तेव्हा त्यांना दिसले, सँको झाडावरून खाली लोंबकळत आहे– त्याचे डोके जमिनीकडे वळलेले आहे. आणि बिचारा डॅपल त्याच्याजवळच उभा आहे. खऱ्या मित्राप्रमाणे त्याने त्याला संकटकाली कधी सोडले नाही. (सिड् हॅमेट म्हणतात) ते दोघे खरे मित्र होते– इतके अविभाज्य होते की, डॅपलशिवाय सँको क्वचितच दिसे आणि सँकोशिवाय डॅपलही कधी दिसत नसे. डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाकडे गेले आणि त्यांनी त्याला खाली उतरविले. संकटातून सुटका होताच त्याने आपल्या ऐटदार शिकारी वेशाची किती हानी झाली, हे पाहण्यास सुरुवात केली, तेव्हा त्याच्या जिवाला वेदना झाल्या. कारण

तो त्या वेशाला फार किंमत देत असे– जणु काही त्या वेशाने त्याला मोठ्या जहागिरीचा वारसच केले होते.

तोपर्यंत त्या रानडुकराला एका मोठ्या खेचरावर ठेवण्यात आले आणि सुगंधी फुलझाडांच्या फांद्यांनी त्याचा देह झाकण्यात आला. त्या विजयी शिकाऱ्यांनी आपली ती शिकार मोठ्या थाटात त्या जंगलात उभारलेल्या तंबूकडे चालविली. मालकाच्या वैभवाला शोभेल अशी उत्कृष्ठ मेजवानी तेथे देण्यात आली.

सँको डचेसजवळ गेला आणि आपला फाटका कोट दाखवून तिला म्हणाला, " आपण जर सशाची शिकार करीत असतो किंवा चिमण्या पकडीत असतो, तर हा माझा कोट न फाटता रात्रीपर्यंत तसाच राहिला असता. मला हे कळत नाही की, एखाद्या पशूसाठी जंगल झोडपण्यात काय आनंद आहे ! तो पशू तुमच्याकडे जर धावून आला तर, तुमच्या आतड्यात आपले दुष्ट सुळे खुपसेल आणि त्यामुळे तुमचा मृत्यु ओढवेल. या बाबतीत एक जुने गाणे आहे, ते मी विसरलेलो नाही. ते गाणे असे—

फॅविलाचे दुर्दैव तुझ्या कपाळी येवो
आणि तुला अस्वले नि डुकरे यांचे भक्ष्य बनवो !

डॉन क्विक्झोट म्हणाले, " तो फॅविला गॉथचा राजा होता. तो एकदा शिकारीस गेला असताना एका अस्वलाने त्याला गट्ट केले. " सँको म्हणाला, " तेच तर मी म्हणत आहे. राजे आणि दुसरे मोठमोठे लोक संकटाच्या मार्गाने का जातात ? त्या-शिवाय दुसरे खेळ पुष्कळ आहेत की ! माझ्यावर दया करा आणि मला हे सांगा की, ज्याने तुमचे कधी काही वाकडे केले नाही, अशा गरीब जनावराला ठार मारण्यात तुमच्यापैकी कोणाला काय आनंद वाटतो ? " ड्यूक म्हणाला, " सँको, तू चुकतोस. रानटी जनावरांची शिकार करणे हा शिलेदारांचा आणि राजांचा अत्यंत योग्य असा व्यायाम आहे. धष्टपुष्ट आणि उमद्या जनावराचा पाठलाग करण्यात सारी युद्ध–कला प्रगट होत असते. युद्धातील डावपेच, धोरण आणि दबा धरून बसणे या सर्वांचा वापर त्यात करावा लागतो. आपण सुरक्षित राहून शत्रूचा पाडाव करण्यासाठी जे इतर डावपेच नेहमी युद्धात खेळले जातात, ते शिकारीलाही लागतात. शिकारीमध्ये थंडी आणि ऊन याच्या कडाक्याला तोंड द्यावे लागते. या क्रीडेमध्ये स्वास्थ्य आणि आळस यांना स्थान नसते. यामुळे आपण श्रम व कष्ट याना सरावतो, आपले अवयव भक्कम होतात, आपले सांधे चपळ होतात आणि आपले सारे शरीर सुदृढ व कार्यक्षम बनते. सारांश, हा व्यायाम असा आहे की, ज्यामुळे पुष्कळ लोकांना लाभ व्हावा पण नुकसान कोणाचेच होऊ नये. या खेळाचा अत्यंत आकर्षक गुण म्हणजे तो दुर्मिळ आहे–सामान्य लोकांच्या आटोक्याबाहेरचा आहे. त्यांनी अन्य प्रकारचे खेळ खेळून आपली करमणूक करून घ्यावी–पण हा उमदा खेळ त्यांना खेळता येणार नाही. बहिरी ससाण्याच्या सहाय्याने आकाशात पाखरे मारण्याचा खेळही गरीब लोकांचा नाही. तो राजे लोकांसाठी आणि ऐपतदारांसाठी राखून ठेवलेला आहे. म्हणून सँको, तू राज्यपाल होण्यापूर्वी आपले हे

मत बदलावेस असा माझा सल्ला आहे. राज्यपाल झाल्यानंतर अशा खेळापासून आणि मजेपासून तुला मोठा लाभ होईल. ”

सँको म्हणाला, “ महाराज, आपले म्हणणे गैरलागू आहे. अशा प्रकारे चौफेर भटकण्यापेक्षा राज्यपालाचे पाय मोडून तो घरी निजून राहिलेला बरा. जेव्हा थकले-भागलेले गरीब लोक एखादे काम घेऊन राज्यपालाकडे येतात, त्यावेळी त्याने मजेखातर जंगलात भटकणे हा धंदा बरा की ! तसा राज्यकारभार खरोखर फार छान होईल, नव्हे ! असे खेळ आणि मौज राज्यपालांना योग्य नव्हे-ज्यांना काही कामधंदा नाही त्यांना ते ठीक आहे. छे, आपण म्हणता तो शिकारीचा खेळ माझ्या धंद्याच्या आणि मनाच्या विरुद्ध आहे. मी माझी करमणूक करून घेईन ती नाताळात पत्ते खेळून आणि रविवारी व इतर सुट्टीच्या दिवशी चेंडूचा खेळ खेळून. ” ड्यूक म्हणाला, “ तू आश्वासन देतोस तितका चांगला राज्यपाल तू व्हावेस अशी माझी मनापासून इच्छा आहे. पण बोलणे आणि करणे या भिन्न भिन्न गोष्टी आहेत.” सँको म्हणाला,“ ते काय व्हायचे ते होवो, पण मी म्हणतो, प्रामाणिक माणसाचा शब्द हा त्याने केलेल्या करारासारखा असतो. ईश्वर-कृपेने सारे ठीक घडेल. पोट माणसाच्या पायांना चालविते, पण पाय पोट चालवीत नाहीत. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, ईश्वराच्या कृपेने आणि माझ्या प्रामाणिक प्रयत्नांनी, मी दुसऱ्या कोणाहीपेक्षा चांगला राज्यकारभार करून दाखवीन. माझ्या तोंडात तुम्ही आपले बोट ठेवा म्हणजे मला ते चावता येते की नाही हे तुम्हाला कळून येईल.”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “ अरे, तुझा व तुझ्या या फालतू म्हणींचा धिक्कार असो ! अशा अप्रिय गोष्टींचा मालमसाला भरल्याशिवाय शहाणपणाचे शब्द तुला कधी बोलताच येणार नाहीत काय ? महाराज, मी आपल्याला अशी प्रार्थना करतो की, या निरंतर मूर्खाचा आपण कैवार घेऊ नका. नाही तर, तो हजारो अप्रस्तुत आणि क्षुद्र म्हणींनी आपल्या जिवाला चिडवीत राहील. त्या म्हणींमुळे मला तर अशी इच्छा होते की, त्याचे तोंड शिवून टाकावे. त्याचे भाषण ऐकून ऐकून मी स्वतःच मूर्ख बनत चाललो आहे. ” डचेस म्हणाली,“महाराज, सँकोच्या म्हणी शहाणपणाचा आव आणणाऱ्या असल्या तरी थोडक्यात असतात, म्हणून त्या ऐकणाऱ्याला नेहमी आनंद देतात. जरी छापील संग्रह असल्याइतक्या त्या असंख्य वाटल्या, तरी त्यांच्यापेक्षा चांगल्या आणि विषयाला धरून असलेल्या इतर म्हणींपेक्षा मला त्याच्याच अधिक आवडतात ही मी खात्री देते. ”

या आणि अशा प्रकारच्या इतर मनोरंजक संभाषणानंतर ते तंबूतून बाहेर पडले आणि जंगलात चालत गेले. आपल्या जाळ्यांमध्ये एखादी शिकार येऊन पडली आहे की काय हे पाहण्याचा त्यांचा उद्देश होता. आपल्या खेळामध्ये ते सारेजण असे व्यग्र असतानाच हळूहळू रात्र पडू लागली. उन्हाळ्याचा तो मध्यकाल होता. त्यावेळी सामान्यतः असतात त्यापेक्षा अधिक ढगांनी आकाश झाकोळलेले होते. त्यामुळे ड्यूक व डचेस यांनी योजलेले कारस्थान तडीस नेणे सोपे झाले. संध्याकाळ उलटल्यानंतर थोड्या वेळाने जेव्हा गडद काळोख पडला, तेव्हा ते सारे अरण्य पेटल्यासारखे दिसू लागले. प्रत्येक

कोपऱ्यातून ज्वाळा उफाळू लागल्या. त्याबरोबर तुताऱ्यांचा आणि अन्य रणवाद्यांचा भयानक घोष कानी येऊ लागला. साऱ्या बाजूंनी ती वाद्ये एकमेकांना प्रतिसाद देत आहेत, असे वाटत होते–जणु काही घोडेस्वारांची नान पथके त्या अरण्यातून वेगाने दौडत जात आहेत. नंतर थोडयाच वेळाने मूर लोकांचा ओरडण्याचा अस्पष्ट आवाज कानी आला. युद्धात दाखल होण्यासाठी जसा ओरडा केला जातो, तसा तो होता आणि त्याबरोबर नगाऱ्यांचा घोष, तुताऱ्यांचा व इतर रणवाद्यांचा प्रचंड आवाज यामुळे साऱ्या वातावरणात असा काही भीषण व भयानक नाद दुमदुमला की, त्यामुळे ड्यूक विस्मित झाला; डचेस चकित झाली, डॉन क्विक्झोटना आश्चर्य वाटले, आणि सँको वावटळीत सापडलेल्या पानासारखा थरथर कापू लागला. या सर्व प्रकारचे कारण ज्यांना माहीत होते, तेही घाबरून गेले.

या भयग्रस्त अवस्थेमुळे सारेजण गप्प झाले. इतक्यात एक माणूस, सैताना-सारख्या पोशाखात, तेथे धावत आला आणि प्रचंड पोकळ शिंग वाजवीत या मंडळींच्या जवळून जाऊ लागला. त्याच्या शिंगाचा घोगरा आवाज भयंकर होता. ड्यूक म्हणाला, " अरे घोडेस्वारा, थांब, इतक्या जलदीने कोठे चाललास ? तू कोण आहेस ? आणि या जंगलातून कूच करणाऱ्या सैनिकाच्या या तुकडया कोणाच्या आहेत ? " घोडेस्वार भीषण स्वरात म्हणाला, " मी सैतान आहे आणि ला मांचा येथील डॉन क्विक्झोटच्या शोधार्थ निघालो आहे. या वाटेने जे लोक येत आहेत ते मंत्रविद्या जाणणाऱ्या लोकांच्या सहा टोळ्यांचे आहेत. ते टोबोसोच्या अद्वितीय डल्सीनियाला मंत्रमुग्ध करून एका विजयी रथातून नेत आहेत. तिच्या सेवेला फ्रेंच शूर शिलेदार– मॉंटेसिनोज– हा आहे. तिला जादूपासून मुक्त कसे करता येईल, ही माहिती सांगण्यासाठी तो येत आहे, " ड्यूक म्हणाला, " तुझ्या भयंकर आकृतीवरून दिसतोस तसा सैतान तू खराच असतास, तर तुला हे कळावयास हवे होते की, तुझ्यापुढे उभा असलेला हा शिलेदार म्हणजे तू ज्याचा शोध करीत आहेस तो ला मांचा येथील डॉन क्विक्झोट होय. " सैतानाने उत्तर दिले, " देवाशपथ आणि माझ्या सद्बुद्धीशपथ मी सांगतो की, ते मला सुचलेच नाही. माझ्या डोक्यात इतक्या गोष्टींची गर्दी झाली आहे की, त्यामुळे माझे मन भांबावून गेले आहे आणि माझ्या कामगिरीचे मला पूर्ण विस्मरण झाले आहे. " सँको म्हणाला, " खरोखर, हा सैतान अत्यंत प्रामाणिक माणूस आणि सज्जन ख्रिश्चन असला पाहिजे. कारण तो ईश्वराची आणि स्वतःच्या सच्चेपणाची शपथ माझ्याइतक्याच भावभक्तीने घेत आहे. त्यावरून मला आता असे वाटू लागले आहे की, पाताळातसुद्धा काही चांगले लोक असावेत. "

याचवेळी सैतानाने, खाली न उतरता, डॉन क्विक्झोटकडे पाहून म्हटले, " अरे सिंहाच्या शिलेदारा, ( त्या सिंहाच्याच पंजात तू पक्का सापडावास अशी माझी इच्छा आहे ! ) तुझ्याकडेच मला शूर पण दुर्दैवी मॉंटेसिनोजने पाठविलेले आहे. तो याच जागी येत आहे–आणि टोबोसोची डल्सीनिया असे जिला म्हणतात तिला घेऊन येत

आहे. तिच्यावरील जादू नष्ट करण्यासंबंधीच्या सूचना देण्यासाठी तो येत आहे. माझा संदेश मी सांगितला. आता मला उड्डाण केले पाहिजे. माझ्यासारखे सैतान तुझ्या सांगाती असोत आणि बाकीच्या लोकांचे संरक्षण देवदूत करोत." असे म्हणून त्याने आपले राक्षसी शिंग वाजविले व उत्तराची वाट न पाहता तो दिसेनासा झाला.

या प्रकारामुळे सर्वांची अगदी गाळण उडाली, पण सर्वांत अधिक आश्चर्य वाटले डॉन क्विक्झोट व सँको यांना. सँकोला आश्चर्य वाटले याचे कारण, वस्तुस्थिती तशी नसताना, मंतरलेली डल्सीनिया त्याच्याकडे येणार होती. आणि शिलेदारजींच्या आश्चर्याचे कारण म्हणजे मॉंटेसिनोज्च्या गुहेतील चमत्कार खरे ठरत होते. या गोष्टीचे चिंतन करीत करीत शिलेदारजी उभे असताना त्यांना उद्देशून ड्यूक म्हणाला, "ठीक आहे. महाराज, आपण आता काय करायचे योजले आहे? आपण येथे थांबणार काय!" डॉन क्विक्झोट म्हणाले, "थांबणार का नाही? पाताळातल्या सान्या ज्वाळांनी मला वेढून टाकले तरी मी येथे धैर्याने आणि निर्भयतेने थांबणार!" सँको म्हणाला, "आपली इच्छा असेल तर तसे करा. पण जर आणखी सैतान किंवा शिंगे येथे आली, तर त्यांना मी दूर फ्लँडर्समध्ये आढळेन."

आता रात्रीचा अंधार वाढत चालला. अरण्यातून कैक ज्योती खालीवर चमकू लागल्या—आकाशातून पडणाऱ्या उल्कांप्रमाणे किंवा धरणीतून निघणाऱ्या पेटत्या फूत्कारांसारख्या त्या दिसत होत्या. नंतर एक भयानक आवाज ऐकू आला. मोठ्या गाड्यांच्या वंगण नसलेल्या चाकांच्या किंचाळण्यासारखा तो आवाज होता. तो भेदक व भीषण आवाज ऐकून अस्वले आणि लांडगेसुद्धा पळून जातात असे म्हणतात. या अप्रिय व कर्कश आवाजानंतर त्याहून मोठा असा दुसरा आवाज ऐकू आला. त्या जंगलाच्या प्रत्येक कोपऱ्यावर चाललेल्या चार लढायासारखा तो भयानक व धक्के देणारा घोष होता. त्यात मिसळलेल्या सान्या हाणामाऱ्यांचे आवाज आणि धावपळ कानी पडत होती. एकीकडे तोफांचे गडगडाट ऐकू येत होते, तर दुसरीकडे बंदुकीच्या गोळ्यांचे लहान-लहान पण असंख्य ध्वनि निनादत होते. एकीकडे जवळच लढत असणाऱ्या सैनिकांच्या आरोळ्या, तर दुसरीकडे दूर अंतरावर असणाऱ्या मूर लोकांच्या किंकाळ्या! सारांश, नगारे, तुताऱ्या, बिगुल, शिंगे यांचे सरमिसळ झालेले विचित्र ध्वनी, चाकांची करकर आणि लढवय्यांच्या आरोळ्या—या सर्वांमुळे, कल्पनेत येणार नाही, इतका भयानक कल्लोळ तेथे ऐकू येऊ लागला— आणि त्यामुळे डॉन क्विक्झोट यांचे धैर्य मोठ्या कसोटीस लागले. पण बिचारा सँको पार सपाट झाला आणि डचेसच्या कपड्यावर बेशुद्ध होऊन पडला. ती त्याची शुश्रूषा करू लागली. त्याच्या तोंडावर मारण्यासाठी तिने पाणी मागविले. शेवटी तो शुद्धीवर आला. त्याचवेळी किरकिरणाऱ्या गाड्यांपैकी सर्वांत पुढची गाडी तेथे आली. चार मजबूत बैल ती गाडी ओढीत होते. बैलाच्या पाठीवर सुतकी कपडे घातले होते. प्रत्येकाच्या एकएका शिंगावर मोठी पेटलेली मशाल होती. त्या गाडीच्या अग्रभागी एक उंच जागा होती. तिच्यावर एक आदरणीय म्हातारा माणूस बसलेला होता.

त्याची दाढी बर्फासारखी शुभ्र आणि त्याच्या कमरेपर्यंत पोहोचण्याइतकी लांब होती. काळ्या ओबडधोबड कापडाचा लांब झगा त्याने घातला होता. दुसऱ्या गाड्या चालविणारे दोन सैतानही त्याच पोशाखात होते. ते दोघेही इतके कुरूप आणि हिडिस दिसत होते की, त्यांना एकदा पाहिल्यावर सँकोला आपले डोळे मिटून घ्यावे लागले. त्यांचेकडे पुनः पाहण्याचे धैर्य त्याला झाले नाही. आतमध्ये दिव्यांचा झगमगाट असलेली गाडी त्या जागी येताच तो पूज्य म्हातारा माणूस उठून उभा राहिला आणि मोठ्या आवाजात म्हणाला, " मी साधु लिर्गँडिओ आहे. " याहून एक शब्दही न बोलता ती गाडी पुढे गेली. नंतर आली दुसरी गाडी! तिच्यावरही एक गंभीर चेहऱ्याचा म्हातारा बसलेला होता, त्याने आपली गाडी सोयीस्कर अंतरावर थांबविली. आपल्या उच्चासनावरून उठून पहिल्या माणसाइतक्याच खोल आवाजात तो म्हणाला, " अज्ञात उर्गांडाचा निकट मित्र साधु अल्क्विफ् मी आहे. " असे म्हणून तो पुढे गेला. नंतर आली तिसरी गाडी. ती त्याच गंभीर गतीने चालली होती. तिच्यावर बसलेला माणूस इतरांइतका जुनाट नव्हता पण सुदृढ व धट्टाकट्टा, आंबट चेहऱ्याचा व कुरूप होता. इतरांप्रमाणेच तोही आपल्या सिंहासनावरून उठला आणि त्यांच्यापेक्षा अधिक पोकळ व आसुरी स्वरात म्हणाला, " मी जादूगार अर्कॅलस आहे. गॉलचा अमॅडिस आणि त्याचा सर्व वंश यांचा मी कट्टा वैरी आहे. " असे म्हणून तोही इतरांप्रमाणे तेथून निघून गेला. लहानसे वळण घेऊन त्याची गाडी थांबली, तेव्हा त्या गाडीच्या चाकाची किरकिर थांबली आणि मधुर संगीताचा उत्तम स्वरमिलाफ कानी येऊ लागला. त्यामुळे बिचाऱ्या सँकोला परम संतोष वाटला. तो त्याला शुभशकूनच वाटला. तो डचेसला म्हणाला, (तो तिच्यापासून इंचभरही दूर जाण्यास तयार नव्हता) " जेथे संगीत आहे, तेथे संकट असणार नाही हे नक्की. " डचेस म्हणाली, " अगदी खरे! जेथे तेज आहे, प्रकाश आहे, तेथे तर हे विशेषच. " सँको उत्तरला, " हो, पण अग्नी असल्याशिवाय प्रकाश असत नाही. आणि तेज येते ते बहुधा ज्वाळांतून. कोणी सांगावे, आपल्या भोवतालचे लोक आपल्याला जाळून टाकायचे. पण मी मानतो की, संगीत हे नेहमी मौज आणि मेजवानी यांचे चिन्ह असते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " यातून काय निघते, ते आपण लवकरच पाहू. " त्यांचे म्हणणे खरे होते का?— ते पुढील प्रकरणी कळेल.



## प्रकरण ३५

# डल्सीनियाला जादूतून मुक्त कसे करावे ही माहिती डॉन क्विक्झोट यांना या प्रकरणात दिलेली आहे. शिवाय, इतरही आश्चर्यकारक उतारे

ते सुखद संगीत जेव्हा जवळ आले तेव्हा एक भव्य, विजयी रथ दिसू लागला. सहा करड्या रंगाची खेचरे तो रथ वाहून आणीत होती. त्यांच्या पाठीवर पांढरे कापड घातलेले होते. प्रत्येक खेचरावर पांढरा पोशाख केलेला आणि हातात मोठी पेटलेली मशाल घेतलेला व पश्चात्ताप-व्रत घेतलेला माणूस बसलेला होता. पूर्वीच्या गाड्यांपेक्षा हा रथ दुप्पट-तिप्पट लांब होता, दुसरी बारा पश्चात्ताप-व्रती माणसे रथावर आणि रथाच्या सर्व बाजूस बसलेली होती. त्यांचाही वेष पांढरा होता. त्यांच्यापैकी प्रत्येकाने पेटलेली मशाल हातात घेतलेली होती. यामुळे सारा देखावा झगझगीत व आश्चर्यकारक दिसत होता. रथाच्या दुसऱ्या टोकावर एक उंच सिंहासन उभारलेले होते. त्यावर जरतारी पोशाख केलेली एक अप्सरा बसलेली होती. तिच्या रुपेरी झग्यावर असलेल्या असंख्य सोनेरी टिकल्या तिच्याभोवती चमकत होत्या. त्यामुळे तिचा वेश भारी नसला तरी तेजस्वी दिसत होता. तिचा चेहरा एका पातळ पारदर्शक वस्त्राने झाकलेला होता. त्या वस्त्राच्या वाहत्या चुण्यांमधून आतील चेहरा अत्यंत सुंदर दिसत होता. मशालीच्या लख्ख उजेडात असे सहज दिसून येत होते की, तिचे वय सतरा वर्षांपेक्षा कमी आणि वीस वर्षांपेक्षा अधिक नसावे. तिच्याजवळ एक आकृती बसलेली होती. तिच्या अंगावरचा दण्डाधिकाऱ्या-सारखा झगा पायापर्यंत लांब होता. त्या आकृतीचे डोके काळ्या बुरख्याने झाकलेले होते. जेव्हा ते या मंडळींच्या अगदी समोर आले, तेव्हा पूर्वी वाजत असलेल्या पिपाण्या ताबडतोब बंद झाल्या. तसेच रथात असलेले स्पॅनिश पावे व वीणा यांचाही आवाज थांबला. नंतर झगा घातलेली ती आकृती सुतकी बुरखा फेकून व अंगावरचे कपडे बाजूस सारून उभी राहिली. तेव्हा तेथे जो उघडा-नागडा हाडांचा सांगाडा दिसला, तो मृत्यूचे विकृत रूप दर्शवीत होता. तो पाहून डॉन क्विक्झोट दचकले आणि सँकोच्या शरीरातील हाडे भीतीने कडकडा वाजू लागली. ड्यूक आणि डचेससुद्धा नेहमीपेक्षा अधिक अस्वस्थ झालेले दिसले. हा जिवंत कृतांत अशा प्रकारे उभा राहिल्यावर, जड व मंद अशा झोपाळू स्वरात– जणु त्याची जीभ अजून नीट जागी झाली नव्हती– बोलू लागला :—

## मर्लिनचे भाषण

पहा हा वृद्ध मर्लिन, अद्भुतरम्य कथांत
चुकीने याला म्हटले आहे ' पाताळाचे कल्पित संतान; '
प्राचीनतेच्या नावाने हे असत्य चालू आहे.
झरतुष्ट्री शास्त्राचा अधिपति म्हणून मी राज्य करतो —
जे ( शास्त्र ) पुष्कळदा कठिण शक्तींना आवाहन करते
आणि त्यांची हजेरीही घेते. गतकालीन शिलेदारीच्या
समकालीन असे जे दैवाचे आकाशातले भयानक पट्टलेख,
त्यांचे भांडार ( मी आहे ); सारे शूर फिरते शिलेदार
मी माझे पाल्य मानले आहेत, ते माझ्या प्रेमाचें वारसदार
आणि माझ्या जादूलाही ते प्रिय.
इतर जादूगार कल्याण–विरोधी, अनर्थकारी आणि
दुःखाच्या अग्निकुंडासारखे प्राणघातक असतात; पण
शक्ति आणि दया एकत्र जेथे येतात, तो माझा उदात्ततर आत्मा
सर्वत्र कल्याण पसरवितो– जसे ते जादूगार आपत्ती उधळतात.
माझा निवृत्त आत्मा मूकपणे गूढ आकृती आणि प्रचंड मंत्र
रचीत जेथे बसतो, त्या खोल रसातळात, भकास गुहांमध्ये,
मला अद्वितीय डल्सीनियाचे करुण स्वर ऐकू आले.
तिची विपत्ती, तिचे भयानक रूपान्तर, राणीचे वैभव
आणि देवासारखे रूप जाऊन रासवट राणीची
तिला आलेली हीनकळा, दुष्ट जादुगाराने द्वेषापोटी केलेले हे सारे
घातक अपकृत्य
मला समजले. मला सहानुकम्पा वाटली, आणि मी
जादूटोण्याच्या पन्नास हजारांच्या दुप्पट पट्टलेखांना घुसळून काढले.
पाताळाच्या काळ्या पंथातल्या माझ्या
या कलेचा मला वीट आला. मग या हाडांच्या खोडात हा
भयंकर देह ठेवून बंद केला– हा मानवाचा भग्न पुरावशेष.
आणि दयेने प्रेरित होऊन उठलो आहे, अशा थोर दुःखाचा
परिहार करण्याचा उपाय उघड करण्यासाठी, आणि ती शापित
करणी मोडण्यासाठी. हे लोहकवचाला आणि वज्रखड्गाला
शोभा देतील अशा सर्वांच्या दैदीप्यमान कीर्तिवरा, विषयाच्या
क्षुद्र चिंता आणि मृदु शय्या यांचा त्याग करण्याचे धाडस करून
शस्त्र चालविण्याचा अभ्यास, सतत कष्ट,
संकटे, दुखापती आणि रक्त या व्रताचा अंगीकार जे करतात,

त्यांचा तू प्रकाश, दीप, पंथ, ध्रुवतारा आणि मार्गदर्शक;
अपार योग्यतेच्या असीम स्तुतिपात्र शिलेदारा, शहाणपण व
शौर्य यांच्या एकरूपा, थोर क्विक्झोट, तुला हे महान सत्य
मी सांगत आहे : की पूर्वीची अवस्था व रूप
टोबोसोची अभिमाननिधाना अतुलनीय डल्सिनिया हिला परत
प्राप्त होण्यासाठी, दैवाची राजाज्ञा आहे की तुझा भला
शागीर्द सँको याने आपल्या लठ्ठ उघड्या कुल्ल्यांवर तीन हजार
फटके द्यावे, आणि तीनशे आणखी वाढवावे, ते असे
की, प्रत्येक फटक्याने त्याला इजा होऊन दंश जाणवून मानखंडना वाटावी.
तरच तिच्या विपत्तीचे सूत्रधार आपला कठोरपणा सोडतील,
त्यांची भयानक इच्छा काय आहे
हे मी सांगत आहे—डल्सिनिया बरी व्हावी म्हणून. ”

सँको म्हणाला, “ हाय रे दैवा ! तीन हजार फटके ! मी मला तीनसुद्धा फटके मारणार नाही. त्यापेक्षा मी माझ्या आतड्यात तीनदा खंजीर खुपशीन. तुम्ही आणि तुमची ती जादू नष्ट करण्याची क्लृप्ती खड्डयात जावो. त्या काळ्या विद्येचा माझ्या कुल्ल्यांशी काय संबंध ? स्वामी मर्लिन, लेडी डल्सीनियावरची जादू नाहीशी करण्यास तुझ्याजवळ दुसरा चांगला उपाय नसेल तर तिच्या मृत्यूच्या दिवसापर्यंत तिला तशीच मंतरलेली पडू दे. ”

डॉन क्विक्झोट ओरडले, “ अरे बदनाम बदमाषा, अरे लसूणखाऊ, बेट्या कुत्र्या, मी तुला जन्मताना होतास तसा नागवा करून झाडाला बांधून केवळ तीन हजार तीनशेच फटके देणार नाही, तर सहा हजार सहाशे देईन, पाजी माणसा ! आणि ते फटके असे सणसणीत लगावीन की, तू आपली पाठ तीन हजार वेळा चोळलीस, तरी तिची हुळहुळ कायम राहील. अरे बदमाशा, गुंडा, एका शब्दाने तर मला तू उलट उत्तर दे की मी तुझी आतडी फाडून बाहेर काढतो. ” हे ऐकून मर्लिन ओरडला, “ थांबा, थांबा, असे होता कामा नये. प्रामाणिक सँकोवर जे फटके बसावयाचे ते स्वेच्छेने बसले पाहिजेत, त्यात सक्ती असता कामा नये. आणि त्याला जेव्हा अत्यंत सोयीस्कर वेळ असेल तेव्हाच ते मारले जावे. या कामासाठी कोणतीही वेळ निश्चित केलेली नाही. आपली ही शिक्षा निम्मी कमी करावी अशी त्याची इच्छा असेल तर तसे करण्यास परवानगी आहे. मात्र जेवढे फटके द्यावयाचे, तेवढे दुसऱ्या माणसाने जोराने लगावले पाहिजेत. ”

हे ऐकून सँको म्हणाला, “ जरा थांबा, दुसऱ्या माणसाचे काय किंवा माझे काय, जोराचे काय किंवा हलके काय, कोणतेच फटके माझ्या ढुंगणावर बसता कामा नयेत. टोबोसोंच्या मॅडम डल्सीनियाला मी या जगात कशाला आणले की तिच्या डोळ्यांनी केलेल्या जखमेची भरपाई माझ्या पाठीला करावी लागावी. माझा धनी डॉन क्विक्झोट

याने स्वतःला खुशाल फटके लगावून घ्यावेत. तो तिचा अंश आहे. पदोपदी तो तिला " माझा प्राण, माझा आत्मा, माझा आधार, माझा संतोष. " असे सर्व काही म्हणत असतो. म्हणून त्याने आपल्या ढुंगणावर फटके ओढून तिला जादूतून हिसकून काढावे. पण मला फटके मारण्याला माझा साफ नकार आहे, ती शिक्षा मी सपशेल फेटाळून लावतो. "

सँकोने आपले मन असे खुले करताच मर्लिनच्या पिशाच्चाजवळ झगमगत्या पोशाखात बसलेली ती अप्सरा उठून उभी राहिली आणि आपल्या तोंडावरील पातळ बुरखा वर सारून तिने आपले अत्यंत लावण्यसंपन्न मुख सर्वांस दाखविले. पुरुषी रुबाबात आणि काहीशा भसाड्या आवाजात ती सँकोला म्हणाली, " अरे घातुक सेवका, तुझा जीव फुटक्या गाडग्यासारखा आहे, काळीज बुचासारखे कमकुवत आहे, गारगोटीसारखे कोरडे आहे. अरे नीचा, चोरा, उंच बुरुजावरून जमिनीवर सरळ उडी मारण्यास तुला हुकूम दिला असता, किंवा एक डझन बेडूक, दोन डझन पाली आणि तीन डझन साप खाण्याचा आदेश तुला दिला असता, अथवा तू आपल्या बायका-मुलांची कत्तल कर म्हणून तुला विनंती करण्यात आली असती, तर तुझ्या 'नको, नको' म्हणण्याचे मला नवल वाटले नसते. पण मानवजातीच्या वैऱ्या, शाळेतील लहान मुलगा-सुद्धा दरमहा जी शिक्षा सहज भोगतो, ती तीन हजार तीनशे फटक्यांची शिक्षा पत्करण्यास तू इतकी कांकू करतोस हे खरोखर आश्चर्यकारक आहे. तुझे भाषण ऐकणाऱ्या या साऱ्या लोकांच्या कोमल व सदय अंतःकरणांनाही ते नवलाईचे वाटेल. तुझ्या सेवेला हा कायमचा कलंक लागेल. अरे पाषाणहृदया, दुष्टा, वर पाहा, वर पाहा आणि तुझे बटबटीत डोळे माझ्या तेजस्वी नेत्रांवर रोख. अरे, त्या नेत्रातून अश्रूंचे जे स्रोत खाली येत आहेत आणि माझ्या गालावर फुलाच्या बगीच्यातून वाहात आहेत, ते पाहा. अरे हलकट पिशाच्चा, जरा नरम ये. माझ्या दुःखाची काही जाणीव तुझ्या रानटी हृदयाला होऊ दे. या दुष्ट रूपांतरामुळे माझे यौवन सुकून-झिजून चालले आहे. त्याच्या कोमलतेने तुझ्या हृदयाला पाझर फुटू दे, म्हणजे माझ्या उमलत्या सौंदर्याला झाकून टाकणाऱ्या या गावढळपणाचे टणक कवच फुटून जाईल. मर्लिनने आपल्या सौजन्याने मला माझे मूळचे रूप पुनः धारण करण्यास परवानगी दिली, पण ती आता व्यर्थ आहे. कारण त्या परवानगीमुळे किंवा सुंदरीच्या दुःखाश्रूंमुळे तुझे खत्रुड हृदय पाझरत नाही. अरे, सुंदर स्त्रीच्या दुःखाश्रूंनी कठोर खडक कापसासारखे मऊ होतात आणि वाघ शेळ्यासारखे कोमल बनतात असे म्हणतात. अरे आडमुठ्या जनावरा, तुझ्या मठ्ठ डोक्यावर टोके मारून घे- ते तुझ्या जाड्याभरड्या बुद्धीचे भरड आवरण फेकून दे, म्हणजे तू आपल्या सुस्त जीवनातून जागा होशील. आता तू केवळ खाण्याकरताच जगत आहेस आणि आपल्या आळशी शरीराचे चोचले पुरवीत आहेस- आपली खादाड भूक भागविण्यात दंग आहेस. अरे, मला माझ्या त्वचेची कोमलता, स्वभावाची मधुरता आणि मुखाची मोहकता पुनः मिळवून दे. पण जर माझ्या आर्जवांनी आणि आसवांनी

तू माझे म्हणणे शहाण्यासारखे मान्य केले नाहीस, तुझी करुणाबुद्धी जागृत व्हावी इतकी माझी शोचनीय अवस्था अजूनही झाली नसेल –तर निदान त्या दुःखी शिलेदाराची – तुझ्या कोमल–हृदयी धन्याची– व्यथा पाहून तरी तुझे अंतःकरण द्रवू दे. अरेरे, याचा जीव त्याच्या गळ्यात घुटमळत असलेला मला दिसत आहे. त्याच्या ओठापासून दहा अंगुळावरदेखील तो राहिलेला नाही. तुझे कठोर वा सदय उत्तर ऐकण्यासाठी तो उत्सुक आहे. ते उत्तर ऐकून एक तर त्याचा जीव त्याच्या मुखातून उड्डाण करील किंवा त्याच्या हृदयात परत जाऊन बसेल. "

हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी अन्ननलिकेवर हात ठेवून व ड्यूककडे वळून म्हटले, " महाराज, डल्सीनियाचे म्हणणे बरोबर आहे. बंदुकीतून गोळी जशी सरळ जावी, त्याप्रमाणे माझा जीव माझ्या या घशातून वरवर जात आहे असे मला वाटते. " डचेस म्हणाली, " सँको, यावर तुझे उत्तर काय ? " सँको म्हणाला, " मी पूर्वी म्हणालो, तेच आता म्हणतो. फटके मारण्यास माझा स्पष्ट खडखडीत धिक्कार आहे. " ड्यूक म्हणाला, " नकार, असे तुला म्हणावयाचे आहे. " सँको म्हणाला, " महाराज, शब्दांची निवड करण्यास आणि त्यांचे अचूक उच्चार करण्यास मला आता वेळ नाही. मला दुसऱ्या भाकरी भाजावयाच्या आहेत. या दुष्ट फटके–प्रकारामुळे मी अगदी बेचैन झालो आहे. मी काय बोलतो– करतो, हे माझे मलाच कळेनासे झाले आहे. एखाद्या सराईत भिकाऱ्याप्रमाणे अशी याचना करण्यास टोबोसोच्या लेडी डल्सीनियाला कोणत्या संस्कारांनी शिकवले, हे जाणण्याची मला इच्छा आहे. कच्च्या मांसाप्रमाणे रक्तबंबाळ करण्यासाठी माझ्या पाठीवर आसूड ओढण्याची तिला इच्छा का व्हावी ? साक्षात् सैतानालाही सहन होणार नाहीत, असे अपशब्द तिने मला उद्देशून का वापरावेत ?– फुटके गाडगे, राक्षस, पशु, चोर अशा किती तरी घाणेरड्या टोपणनावांचा शेणसडा तिने माझ्यावर केला आहे ! हे स्वामिनी, माझे कातडे पितळेचे आहे असे तुला वाटले काय ? तू जादूतून सुटलीस म्हणजे मला काही मिळणार आहे काय ? माझे दुःख सौम्य करण्यासाठी तिने आपल्याबरोबर जी सुंदर देणगी आणली असेल, ती तिची तिलाच ठाऊक. उत्तम सणाच्या कापडाची, उंची सदऱ्यांची, टोप्यांची आणि पायमोज्यांची (मी ते काहीच वापरीत नाही. ) पेटी तिने आणली असती तर ठीक होते. पण माझ्यावर तुटून पडण्याचा अणि घाणेरड्या शब्दांची लाखोली वाहण्याचा काय उपयोग ? काहीच नाही ! जुन्या म्हणी लक्षात घ्या – ' सोन्याचे ओझे हलके भासते ', ' चिरेबंदी तटबंदी फोडतात सुंदर देणग्या ', ' माझी विजार तू ओरखडलीस तर तुझे कोपर मी बोचकारीन ' ' हातातील एक पक्षी झुडुपातल्या दोन पक्ष्यांच्या मोलाचा.' छेः छेः, कोणाला वाटेल की, अशा वेळी माझा धनी मला एखादी रम्य कथा सांगेल आणि साखरेत घोळलेल्या शब्दांनी माझ्या जीवाला संतुष्ट करील. पण कसचे काय नि कसचे काय ! तो तर मला झाडाला बांधून घालण्याची आणि दुप्पट फटके मारण्याची भाषा बोलत आहे. आपण कोणाशी बोलत आहो याचा या उपद्रवी लोकांनी विचार करावा असे मला वाटते. स्वतःला ज्याने

फटके मारावयाचे, तो काही केवळ एक सेवक नाही. – राज्यपाल आहे. त्यांना वाटते, उठावे आणि घोड्यावर स्वार व्हावे – दुसरे काही करावयास नको. त्यांनी जरा शिष्टाचार शिकावा. प्रत्येक गोष्टीला काही वेळ असते आणि साऱ्या गोष्टींनाही वेळ असते. लहान गोष्टींची आणि मोठ्या गोष्टींची विशिष्ट वेळ असते. तुमचे अर्ज ऐकण्याच्या मनःस्थितीत मी आहे, असे तुम्हाला वाटते काय ? अहो, माझा नवा कोट फाटल्यामुळे माझे हृदय फुटायच्या बेतात आले आहे, अशा वेळी सैतानाच्या नावाने माझे मांस मी स्वतः तोडून टाकावे अशी त्यांची इच्छा आहे. पण माझी इच्छा तशी मुळीच नाही– जशी नरमांसभक्षकांच्या संगतीत राहण्याची नाही. ”

ड्यूक म्हणाला, “ मी तुला माझ्या इज्जतीशपथ सांगतो की, तू जर पिकलेल्या अंजिरासारखा मऊ झाला नाहीस आणि फटक्यांची शिक्षा स्वीकारली नाहीस, तर तुला राज्य मिळणार नाही. दु.खी तरुणींच्या अश्रूंनी किंवा शहाण्या प्राचीन आणि प्रभावी मांत्रिकांच्या उपदेशांनी ज्याचे हृदय द्रवत नाही अशा एकाद्या निर्दय, पाषाण-हृदयी जुलमी माणसाला त्या बेटावरील लोकांमध्ये मी पाठवले म्हणजे झालेच ! सारांश, महाशय, फटके नाहीत तर राज्य नाही. ” सँको म्हणाला, “ पण याचा विचार करण्यास मला एक–दोन दिवस तरी मिळावयास हवेत की नाही ? ” मर्लिन ओरडला, “ एक मिनिटसुद्धा नाही. तुझा निश्चय काय आहे तो तू याच क्षणी, याच स्थळी, जाहीर केला पाहिजेस. कारण डलसीनियाचे रूपांतर गांवढळ पोरीमध्ये पुनः करून तिला मॉंटेसिनोजच्या गुहेत तत्काळ परत नेले पाहिजे. नाही तर सध्याच्या स्वरूपात ती पुण्यलोकाला जाईल आणि फटक्यांची संख्या भरेपर्यंत तेथे राहील. ” डचेस म्हणाली, “ अरे, इमानी सँको चल, चल, थोडे धैर्य धर आणि आपल्या धन्याविषयीची कृतज्ञता प्रगट कर. त्याचे मीठ तू खाल्ले आहेस. त्याच्या उदार स्वभावामुळे आणि शिलेदारीच्या थोर पराक्रमामुळे आपण सर्वजण त्याचे ऋणी आहोत. बाळा, ये, संमति दे आणि त्या सैतानाचे चाळे बंद कर. भीतीला मूठमाती दे. दुबळ्या हृदयाला सुंदर स्त्री कधीच लाभत नाही. श्री साहसावर कृपा करते हे, मी सांगण्यापेक्षा तुला चांगले माहीत आहे. ” डचेसला काही उत्तर न देता सँको म्हणाला, “ अहो, मर्लिनराव ऐका, मला एक गोष्ट सांगाल का ? आपल्यापूर्वी जो घोडेस्वार येथे आला त्याने माझ्या धन्याला असा संदेश दिला की, श्रीयुत मॉंटेसिनोज इकडे येत आहेत. पण तरीही आतापर्यंत मॉंटेसिनोजची काहीच बातमी आपल्या कानी आलेली नाही. ” मर्लिन उत्तरला, “ छीः ! सैतान गाढव आहे, लबाड आहे, बदमाष आहे. तो मॉंटेसिनोजकडून आला नाही–माझ्याकडून आला. तो बिचारा मॉंटेसिनोज अद्याप आपल्या गुहेतच आहे. ज्या मंत्रविद्येने आपल्याला गुहेत स्थानबद्ध करून ठेवले आहे, ती नष्ट होण्याची वाट तो पहात आहे. अजून तो मुक्त झालेला नाही. याहून मोठी संकटे पुढे यावयाची आहेत. पण जर तो तुझे काही पैसे देणे लागत असला किंवा त्याच्याशी तुझे काही काम असले, तर तू म्हणशील तेव्हा व तेथे तो येईल. पण आता या गोष्टीचा निकाल लाव. ही

छोटीशी शिक्षा भोग. त्यामुळे तुझे अपार कल्याण होईल. औदार्यामुळे तुझ्या आत्म्याचा विकास तर होईलच, पण आरोग्याच्या दृष्टीनेसुद्धा या शिक्षेने तुझ्या शरीराला चांगला व्यायाम घडेल. सँको, तुझे शरीर रक्ताने कसे सळसळत आहे. त्यातील थोडे रक्त गेल्याने तुझे काही नुकसान होणार नाही."

सँको म्हणाला, "बरोबर आहे. या जगात वैद्यांची काही उणीव नाही. जादूगार-सुद्धा वैद्य म्हणवूं लागतात. ठीक आहे, जर प्रत्येकजण असेच सांगत असेल (पण त्यावर माझा विश्वास नाही) तर माझ्या इच्छेस येईल तितक्या लांब मुदतीमध्ये मी मला फटके द्यावेत, ही अट मान्य असल्यास मी मला तीन हजार तीनशे फटके देण्यास राजी आहे. शक्य तितक्या लौकर मी या ऋणातून मुक्त होईन. तरी लक्षात ठेवा, जगाला टोबोसोच्या डल्सीनियाचे सुंदर मुख दिसल्याशिवाय राहता कामा नये. ते इतके सुंदर आहे असे मला पूर्वी कधी वाटले नव्हते, हे मी कबूल करतो. एक मुद्दा, माझ्या शरीरातून रक्त वाहवण्याचे बंधन माझ्यावर नाही हे नक्की. आणि एखादा फटका चुकला तरी तो मारला गेला आहे असे समजावे. दुसरा मुद्दा, फटके मोजण्याचे काम श्री. मर्लिन यांनी करावे. (कारण ते सर्वज्ञ आहेत.) ठरल्यापेक्षा एकही फटका मी मला अधिक लगावणार नाही हे ध्यानात धरा." मर्लिन म्हणाला, "तशी भीती नाही. शेवटचा फटका बसताच लेडी डल्सीनिया जादूतून मुक्त होईल, तुझ्याकडे सरळ येईल आणि तुला अभिवादन करून धन्यवाद देईल. कोणाही माणसाला अन्याय करून त्याच्या डोक्याच्या केसालाही मी धक्का लावणे शक्य नाही." सँको म्हणाला, "ठीक तर. व्हायचे ते होणारच. मी माझ्या दुर्दैवाला शरण आहे-वरील अटींवर मी माझे प्रायश्चित्त भोगण्यास तयार आहे."

सँकोचे हे बोलणे पुरे होते न होते तोंच संगीत पुनः सुरू झाले आणि तात्काळ त्याच्या अभिनंदनार्थ लहान लहान गोळ्यांची फैर झडली. डॉन क्विक्झोट सँकोच्या गळ्यात पडले आणि हजारदा त्याचे चुंबन घेऊ लागले. ड्यूक, डचेस आणि सारी मंडळी यांना अपरंपार आनंद झाला. रथ पुढे चालू लागला. तो जाताना देखण्या डल्सीनियाने ड्यूक व डचेस यांना मुजरे केले आणि सँकोला लवून अभिवादन केले.

आकाशाच्या पूर्व भागात आनंदी उषा आपली सस्मित दृष्टी पसरवू लागली. शेतातील पुष्पे आपल्या हृदयातील मधुर गंध दरवळवू लागली. शांत-स्वच्छ असणारे झरे मंजुल नादाने करड्या शिंपल्याशी खेळू लागले आणि पाण्याची वाट वाहणाऱ्या नद्यांना आपल्या स्फटिकांसारख्या शुभ्र जलसंपत्तीचा नजराणा देण्यासाठी वाहू लागले. आकाश स्वच्छ होते. वातावरण शांत होते. उदयास येणाऱ्या रविराजाच्या स्वागतार्थ धावत सुटलेले वारे वस्तुजात स्वच्छ करीत होते. सारे पदार्थ संमीलित होऊन—आणि स्वतंत्रपणेही— आपला हर्ष व्यक्त करीत होते आणि सुंदर उषेचे स्वागत करीत होते. तिच्याप्रमाणेच तेही पुढील दिवस चांगला जाणार असल्याचे भाकित करीत होते. ड्यूक व डचेस हे

शिकारीच्या व्यवस्थेमुळे व यशामुळे आणि त्या बनावट साहसामुळे–खूप खूष झाले होते. ते किल्ल्याकडे परतले. या बनावट साहसापासून त्यांना कोणत्याही खऱ्या शिकारीपासून होणार नाही इतका आनंद मिळाल्यामुळे पुनः तसाच दुसरा एक प्रयोग करण्याचे त्यांनी आपल्या मनाशी ठरविले.



## प्रकरण ३८

# हताश प्रौढा एलियस आणि सरदारीण ट्रिफाल्डी यांचे विलक्षण व अकल्पित साहस, त्याचबरोबर सँको पँझाचे आपली पत्नी टेरेसा पँझा हिला पत्र

मागच्या साहसाची सर्व योजना ड्यूकच्या कारभाऱ्याने आखलेली होती. तो एक गमत्या, थट्टेखोर आणि तरल कल्पनेचा माणूस होता. त्या कविता त्यानेच केल्या होत्या आणि मर्लिनचे सोंगही त्यानेच वठविले होते. डल्सीनियाचे सोंग घेण्याची सूचना त्यानेच एका नोकरास केली होती. आता आपल्या मालकाच्या आज्ञेप्रमाणे त्याने मौजेचा दुसरा एक प्रयोग तयार केला होता. कोणाला कल्पना करता येणार नाही, इतका तो सुखद, कलापूर्ण आणि विस्मयकारक होता.

दुसरे दिवशी डचेसने सँकोला विचारले, "डल्सीनियाला जादूतून मुक्त करण्यासाठी तू स्वतःला शिक्षा करून घेण्याचे काम सुरू केलेस काय?" सँको म्हणाला, "होय, होय, मी माझ्या ढुंगणावर पाच फटके केव्हाच घेतले आहेत." डचेसने विचारले, "कशाने?" सँकोने उत्तर दिले, "माझ्या हाताच्या तळव्याने." डचेस म्हणाली, "तुझ्या हाताने? अरे सँको, ते फटके नव्हेत—थपडा होत. इतक्या सोप्या शिक्षेने बाबा मर्लिन समाधान पावतील की नाही याविषयी मला शंका आहे. एवढी थोर महिला इतक्या थोड्या किमतीत स्वतंत्र कशी होणार? छेः, चांगल्या झिणझिण्या येतील, असे फटके तू स्वतःला लगावले पाहिजेस. एखाद्या महंताचा आसूड किंवा नऊ वाद्यांचा चाबूक अथवा पश्चात्तापाने प्रायश्चित घेणाऱ्या माणसाचा प्रतोद याने तू फटके लगावून घेतलेस तर ठीक होईल. अरे, रक्ताने लिहिलेलीच अक्षरे टिकून राहतात. मेंगळेपणाने व थंडपणाने केलेली दयाबुद्धीची कामे व्यर्थ होतात. त्यांचे गुण नाहीसे होतात." सँको म्हणाला, "तर मग बाईसाहेब, आपल्याला नामी वाटेल अशी एक सोयीस्कर छडी मला देण्याची आपण कृपा करावी. मात्र तिने मला फार झिणझिण्या येता कामा नयेत. अहो, मी एक विदूषक असलो तरी माझ्या शरीराचे मांस या देशातील कोणत्याही महिलेच्या इतके कोमल आहे. अर्थात् कोणाच्याही कुळाला कमीपणा आणण्याचा माझा हेतू नाही," ती म्हणाली, "सँको, ठीक आहे. तुला चाबूक देण्याचे काम माझ्याकडे लागले. तो तुझ्या कोमल कायेला अनुरूप असेल. जणु काही ती काया आणि तो चाबूक ही जुळी भावंडे आहेत."

सँको म्हणाला, " प्रिय बाईसाहेब, मी माझी बायको टेरेसा पँझा हिला एक पत्र लिहिले आहे, हे आपल्याला माहीत व्हावे. त्यामुळे तिला माझ्या परिस्थितीची कल्पना येईल. ते पत्र माझ्या छातीपाशी आहे आणि ते रवाना करण्याची अगदी तयारी आहे. त्यात उणीव कसलीच नाही. फक्त आपण मार्गदर्शन करावे. आपण आपल्या चातुर्याने ते वाचावे आणि ते राज्यपालाने लिहिल्यासारखे वाटत नाही का–म्हणजे राज्यपालांनी लिहावे त्या शैलीत लिहिलेले नाही का ? हे आपण मला सांगावे अशी माझी इच्छा आहे, " डचेसने विचारले, " अरे, तयार कोणी केले ? " सँको म्हणाला, " हे काय विचारणे झाले ? मी निरक्षर असलो तरी माझ्याशिवाय दुसरे कोण ते तयार करणार ? " डचेस म्हणाली, " आणि ते लिहिलेसुद्धा तूच का ? " सँको म्हणाला, " छे:, मी नाही ! मला लिहिता-वाचता येत नाही. – फक्त मी माझा अंगठा उठवू शकतो. " डचेस म्हणाली, " पाहू ते पत्र. त्यात तू आपली बुद्धी कारणी लावली असशील असे मी खात्रीने सांगते. " सँकोने आपल्या छातीजवळून ते पत्र काढले. ते बंद नव्हते. ते घेऊन डचेसने पुढीलप्रमाणे वाचले—

## सँको पँझाचे आपली पत्नी टेरेसा पँझा हिला पत्र

" मला फटक्यांचा प्रसाद खरपूस मिळाला असला तरी, त्यामुळे मला राज्य मिळाले आहे— मला चांगले राज्य मिळाले आहे. त्यासाठी मला पुष्कळ फटके खावे लागले आहेत. प्रिय टेरेसा, आता हे तू ध्यानी धर की, यापुढे तू रथातून प्रवास करावास असे मी ठरविले आहे. दुसऱ्या कोणत्याही वाहनाने जाणे म्हणजे मांजराप्रमाणे चार पायांवर सरपटत जाण्यासारखे आहे, असे मला वाटते. आता तू एका राज्यपालाची बायको आहेस ! तुझ्या अगदी पाठोपाठ चालण्याची छाती कोण दाखवील ? मी तुला एक हिरव्या रंगाचा शिकारी पोशाख पाठवीत आहे. तो मला लेडी डचेसने दिला आहे. तो पाहा आणि आपल्या मुलीसाठी त्याचे परकर-पोलके कर. या प्रदेशातील लोक माझा धनी डॉन क्विक्झोट यांच्यासंबंधी बरेवाईट बोलण्यास अगदी तयार आहेत. ते म्हणतात, ' तुझा धनी दीडशहाणा आहे– एक गंमत्या वेडा आहे आणि तू त्याच्यापेक्षा रतिमात्र कमी नाहीस. ' आम्ही मॉंटेसिनोजच्या गुहेत होतो. डल्सीनियाला जादूतून सोडविण्याचे कार्य जादूगार मर्लिनने माझ्या माथी मारले आहे. जिला तुम्ही लोक अल्डोंझा लोरेंझो म्हणता, तीच ही डल्सीनिया. जेव्हा मी स्वतःला तीन हजार तीनशे ( उणे पाच ) फटके लगावीन, तेव्हा ती आपल्या जन्मदात्या आईइतकीच जादूतून मोकळी होईल. पण याबद्दल कोठे काही बोलू नकोस. तू जर आपल्या बडबड्या बायकांच्या गप्पागोष्टीत हकीकत सांगितलीस, तर कोणी म्हणतील, ती पांढरी आहे, तर कोणी म्हणतील ती काळी आहे. मला माझ्या राज्याकडे एकाएकी जायचे आहे. तेथे पैका कमविण्याची मला फार फार इच्छा आहे. सारे नवे राज्यपाल असेच करतात, असे लोक मला सांगतात. तेथे गेल्यावर परिस्थिती कशी आहे हे मी प्रथम पाहीन आणि मग तू तिकडे

येणे चांगले की नाही, हे मी तुला कळवीन. डॅपल खुशाल आहे आणि माझी सेवा नम्रपणे करीत आहे. मला कोणी तुर्कांचा बादशहा करतो म्हणाले, तरी मी त्याला सोडणार नाही. लेडी डचेस तुझ्या हातांचे हजारदा चुंबन घेत आहेत. तिच्या एका चुंबनाची परतफेड तू दोन हजार चुंबनांनी करावीस अशी माझी प्रार्थना आहे. कारण माझा धनी म्हणतो, गोड शब्दांपेक्षा स्वस्त काहीच नाही. तुला वाटत असते तशी, सोन्याची शंभर नाणी असलेली आणखी एखादी पिशवी मला गवसावी, अशी कृपा ईश्वराने अद्याप केलेली नाही. पण सारे काही योग्य वेळी घडेल. तू त्यामुळे कष्टी होऊ नकोस. सखे, राज्य मिळाल्यावर सारी भरपाई होईल हे मी तुला खात्रीने सांगतो. एक गोष्ट मात्र माझ्या मनात टोचत आहे. त्या कारभाराची चव मी एकदा घेतली म्हणजे मग मी माझी बोटेसुद्धा चावण्यास राजी होईन. इतकी ती चीज रुचकर आहे असे म्हणतात. तशी ती असेल तर मी निकामी ठरेन. तसे पाहावे तो अधू व थोटे भिकारी-देखील चांगले खातात-पितात आणि चर्चला मिळणाऱ्या देणग्याप्रमाणे कमाई करतात. तेव्हा प्रिये, ते कसेही असो, साऱ्या गोष्टी मजेत होणार-तू श्रीमंत आणि सुखी होणार. प्रभूने तुला तसे करावे आणि तो करीलही- आणि तुझ्यासाठी मला जिवंत ठेवावे. "

या किल्ल्यातून, "तुझा पती-राज्यपाल

२० जून १६१४, सँको पँझा"

हे पत्र वाचून डचेस म्हणाली, "अहो श्री. राज्यपाल, आपण दोन बाबतीत चूक केली आहे, असे मला वाटते. पहिली म्हणजे, तुम्ही आपल्याला लगावलेल्या फटक्यांसाठी हे राज्य आपल्याला अर्पण करण्यात आले आहे असे तुम्ही कळवता, पण जादू काढण्याच्या प्रकरणाचे स्वप्न पडण्यापूर्वी ते राज्य तुम्हाला बहाल करण्यात आले होते, हे तुम्हाला आठवत असेल! दुसरी चूक म्हणजे तुमचा हावरेपणा उघडकीस आला. राज्यपालाच्या अंगी हावरेपणाचा दोष अत्यंत निंद्य आहे. कारण त्यांचा स्वार्थ नेहमी न्यायाचा बळी देऊन साधला जातो. 'लोभाने पोते फाटते, आणि त्या दुर्गुणाने राज्यपालाला प्रजाजनावर जुलूम करण्यास व लुबाडण्यास सदा प्रेरणा मिळते' ही म्हण तुम्हाला माहीत असेलच." सँको म्हणाला, "बाईसाहेब, खरोखर माझ्या मनात काही पाप नव्हते. मी जे लिहिले त्याचा मी परिपूर्ण विचार केला नव्हता. पूज्य बाईसाहेबांना माझे हे पत्र आवडले नसेल तर ते मी फाडून टाकतो आणि दुसरे तयार करतो. पण एक जुनी म्हण लक्षात ठेवा, 'आहे त्यापेक्षा अधिक चांगले क्वचितच घडते.' दुसऱ्या पत्रासाठी मी माझे डोके खाजवले तर ते वाईट पत्र आणखीच वाईट होईल." डचेस म्हणाली, "नको, नको, या पत्राने काम भागेल. ड्यूकने ते पहावे असे मला वाटते."

ते बागेत गेले. त्या दिवशी ते तेथे जेवणार होते. तेथे तिने ड्यूकला ते विद्वत्तापूर्ण पत्र दाखविले. त्याने ते मोठ्या आनंदाने वाचले.

भोजनोत्तर सँको आपल्या काही चटकदार संवादांनी साऱ्या मंडळींची मोठी

करमणूक करीत होता. इतक्यात एकाएकी सर्वांच्या कानावर मुरलीचा शोकपूर्ण ध्वनी आणि त्याबरोबरच नगाऱ्याचा भसाडा आवाजही ऐकू आला. तो त्रासदायक आवाज ऐकून सारी मंडळी चकित आणि अस्वस्थ झाली. पण गंभीर लष्करी संगीताने डॉन क्विक्झोट इतके घाबरून गेले की, त्यांचे विचार सैरावैरा धावू लागले. सँकोच्या मनावर भीतीने निःसंशय नेहमीसारखाच परिणाम केला. तो डचेसजवळ जाऊन बसला.

सर्वांची अशी घाबरगुंडी उडाली असताना, जमिनीवर लोळणारे सुतकी झगे धारण केलेले दोन लोक बागेत शिरले. त्या दोघांपैकी प्रत्येकजण एक मोठा नगारा वाजवीत होता. तो नगाराही काळ्या कापडाने झाकलेला होता. त्या दोघांबरोबरच सुतकी पोशाखात असलेला तिसरा माणूस मुरली वाजवीत होता. त्या तिघांनी एका धिप्पाड आकृतीच्या माणसाला आत आणले. लांब काळ्या झग्याने त्याचे सर्वांग लपेटलेले होते, त्यामुळे त्याचे स्वरूप अधिकच भेसूर दिसत होते. त्याच्या झग्याची लांबी फार मोठी होती. त्या झग्यावर एक काळा रुंद पट्टा बांधलेला होता आणि त्याला मोठ्या आकाराची एक समशेर लटकविलेली होती. त्याच्या तोंडावर पातळ काळा बुरखा होता. त्यातून त्याची दाढी दिसत होती. ती फार लांब होती आणि बर्फाइतकी पांढरीशुभ्र होती. त्या संगीताच्या गांभीर्याशी सुसंवादी अशीच त्याची गंभीर चाल होती. थोडक्यात म्हणजे, त्याची आकृती, त्याची चाल, त्याचा कृष्णवर्ण आणि त्याचे सेवक–हे सर्व प्रत्येक बाबतीत आश्चर्यकारक आणि विस्मयजनक होते. अशा थाटात आणि औपचारिकपणे तो पुढे आला आणि ड्यूकपासून सोयीस्कर अंतरावर त्याने गुडघे टेकले. तो उठेपर्यंत ड्यूकने त्याला काही बोलू दिले नाही. ते प्रचंड ध्यान उभे राहून त्याने आपला बुरखा फेकून दिल्यावर, त्याची अत्यंत भीषण, प्रचंड, शुभ्र, पसरट, उग्र आणि पिंजारलेली दाढी दिसू लागली. कोणाही माणसाच्या डोळ्यांनी अशी भयप्रद दाढी पूर्वी कधी पाहिली नसेल. नंतर त्याने आपले डोळे ड्यूकवर रोखले आणि आपल्या विस्तृत फुप्फुसांच्या प्रशस्त गुहेतून मोठ्याने निघणाऱ्या दीर्घ व खणखणीत आवाजात म्हटले, "परमोच्च आणि शक्तिमान प्रभो, माझे नाव 'पांढऱ्या दाढीचा ट्रिफाल्डिन' असे आहे. मी ट्रिफाल्डी सरदारणीचा शागीर्द आहे. तिला लोक 'उदासीन मेट्रन' म्हणतात. तिचा दूत म्हणून मी महाराजांकडे आलो आहे. आमच्या बाईसाहेबांना आपल्यासारख्या थोर माणसाच्या सान्निध्यात येण्याची आणि आपल्या आश्चर्यकारक आणि दुःखी दुर्दैवाची कहाणी सांगण्याची त्यांना इच्छा आहे, त्यासाठी मी आपली परवानगी मागत आहे. पण प्रथम आमच्या बाईसाहेबांना ही माहिती पाहिजे आहे की, ला मांचा येथील शूर व अजिंक्य शिलेदार डॉन क्विक्झोट यांचे वास्तव्य सांप्रत आपल्या किल्ल्यात आहे काय? कारण, त्यांचा शोध घेण्यासाठीच आमच्या बाईसाहेब, घोडेगाडी न घेता, भुकेल्या—तहानेल्या राहून, येथपर्यंत प्रवास करीत आल्या आहेत. कँडायाच्या राज्यापासून आपल्या प्रदेशापर्यंत सर्व प्रवास त्यांनी आपला उपास न सोडता केला आहे. या गोष्टीवर कोणाचा विश्वास बसणार नाही. मंत्रामुळेच घडणारा तो

चमत्कार आहे असे कोणास वाटेल. सांप्रत त्या या किल्ल्याच्या वेशीबाहेर आहेत. प्रवेश करण्यासाठी महाराजांच्या परवानगीचीच त्या वाट पहात आहेत." असे म्हणून तो शागीर्द खोकला आणि त्याने आपली अजस्र दाढी खालपासून वरपर्यंत आपल्या दोन्ही हातांनी कुरवाळली. तो औपचारिक गांभीर्याने ड्यूकच्या उत्तराची वाट पहात राहिला.

ड्यूक म्हणाला, "पांढऱ्या दाढीच्या सत्पात्र सेवका ट्रिफाल्डिन, ट्रिफाल्डी सरदारणीच्या दुर्दैवाची हकिगत आम्ही पुष्कळ दिवस ऐकत आहो. तिला जादूगारांनी 'हताश प्रौढा' अशी संज्ञा मिळवून दिली आहे. म्हणून अरे अत्यंत धिप्पाड सेवका, तू आपल्या बाईसाहेबांना येथे येण्यास सांग. आणि असेही कळव की, ला मांचा येथील शूर डॉन क्विक्झोट सध्या येथेच आहेत. त्यांच्या उदार सहाय्यावर त्यांनी आपल्या दुःखहरणासाठी खुशाल विसंबून राहावे. तसेच माझ्या बाजूने असेही सांग की, माझ्या मदतीची आपल्याला काही गरज लागली तर आपली सेवा करण्यास मी सदैव सिद्ध आहे, ही खात्री बाळगा. मी एक शिलेदार असल्यामुळे माझे हे कर्तव्यच आहे की, संकटग्रस्त सर्व स्त्रियांना–त्यातही आपल्या बाईसाहेबांसारख्या प्रौढ विधवांना–शक्य तितकी मदत केलीच पाहिजे."

हे ऐकून ट्रिफाल्डिनने ड्यूकना अभिवादन केले आणि मुरली व नगारे यांना निघून जाण्याचा इशारा दिला. ते सारेजण ज्या गांभीर्याने व मिरवणुकीने तेथे आले होते, तसेच बाहेर पडले. त्या माणसाच्या भव्यपणाचे आणि रुबाबाचे सर्व प्रेक्षकांना मोठे कौतुक वाटले.

नंतर डॉन क्विक्झोटकडे वळून ड्यूक म्हणाला, "शिलेदारजी पहा, मत्सर आणि अज्ञान यांचे मेघ भेदून सद्गुणांचे तेज आणि वैभव आपले किरण कसे फेकतात आणि पृथ्वीच्या दूरदूरच्या प्रांतात कसा प्रकाश पडतात! आपण आपल्या वास्तव्याने या किल्ल्याचा सन्मान करून अवघे सहा दिवस झाले असतील, पण तेवढ्यात दूरदूरच्या प्रांतातून दुःखी आणि संत्रस्त लोक येथे धावत येत आहेत–रथातून किंवा उंटावरून नव्हे–तर पायी येत आहेत–वाटेने काही न खाता येत आहेत. इतका त्यांचा विश्वास आपल्या शस्त्र सामर्थ्यावर आहे. त्या शस्त्रांनी आपण जे पराक्रम केले त्यांची कीर्ती सर्वत्र पसरत गेली आहे. आपल्या पराक्रमाचा परिचय अखिल जगताला झालेला आहे."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "खरोखर, महाराज, यावेळी तो धार्मिक पंडित येथे असावयास हवा होता. परवाच त्याने शिलेदाराला आपल्या भोजनप्रसंगी धारेवर धरले होते. त्याची चूक किती मूर्खपणाची होती, हे त्याला स्वतःच्या डोळ्यांनीच पटवून दिले असते. प्रचंड दुर्दैवाने आणि असाधारण संकटाने ग्रासलेले सौख्यहीन व संत्रस्त लोक आपले दुःख नाहीसे व्हावे म्हणून भुणभुण करणाऱ्या पाद्र्याकडे किंवा खेड्यातील छोट्याशा धर्मगुरूकडे धाव घेत नाहीत किंवा आपल्या पंचक्रोशीबाहेर कधी न जाणाऱ्या खेड्यातल्या प्रतिष्ठित लोकांच्या शेकोटीकडेही अभागी लोक कधी वळत नाहीत, अथवा

आळसात लोळणाऱ्या दरबारी लोकांकडेही त्यांचे पाय कधी वळत नाहीत. कारण, दरबारी माणूस पुनर्निवेदनासाठी म्हणून त्यांच्या केवळ बातम्या ऐकतो, त्यांचे दुःख नाहीसे करण्यासाठी उल्लेखनीय कृत्ये करीत नाही. अहो, तरुणींचे संरक्षण करणे, विधवांचे सांत्वन करणे, दुःखितांचे दुःख-हरण करणे आणि निराधारांना आधार देणे–या सर्व गोष्टींची पूर्ण अपेक्षा उदार शिलेदाराकडूनच केली जाते–दुसऱ्या कोणाकडून नव्हे. शिलेदारीचा व्यवसाय पत्करून दुःखी लोकांच्या गरजा भागविण्यास मला ईश्वराने पात्र केले, म्हणून मी त्याला सहस्रशः धन्यवाद देतो. मला जे कष्ट आणि अपघात सोसावे लागतात. त्यामुळे मी निराश होत नाही. कारण ते सर्व अत्यंत उदात्त ध्येयासाठी सोसावे लागतात, या प्रौढेची विनंती काय आहे, हे आपल्याला कळावे म्हणून तिला आपण प्रवेश द्यावा. म्हणजे तिच्या दुःखाचे निवारण करण्यासाठी मी माझ्या शस्त्र-बलाचा आणि माझ्या धैर्यशाली हृदयातील निश्चल निश्चयाचा उपयोग करीन."



## प्रकरण ३७

# हताश प्रौढेचे सुप्रसिद्ध साहस

आपल्या योजनेला अत्यंत अनुकूल असा निश्चय डॉन क्विक्झोट यांनी केला, हे पाहून ड्यूक व डचेस यांना परम आनंद झाला. पण हे सारे संभाषण ऐकणाऱ्या सँकोला फारसा संतोष वाटला नाही. तो म्हणाला, "मला असे मोठे भय वाटते की, या परिचारिकाबाई माझ्या बढतीला पायबंद घालतील. मला माहीत आहे की, टोलेडो येथील एक वैद्य पोपटासारखा बोलत असे, तो म्हणे, 'म्हातारी दासी आली घरी। सुदैव त्याचे फिरे माघारी।' अहो, त्याला त्या दासींची खडान्‌खडा माहिती असे. म्हणून तो त्याप्रमाणे त्यांना जोखीत असे. त्या साऱ्यांना त्याने मीठ लावून खाऊन टाकले असते. त्यातल्या उत्तम जर इतक्या उर्मट व उपद्रवकारक असतील, तर दुःखाच्या उकिरड्यावर लोळणाऱ्या कशा असतील? ही तिपदरी सरदारीण तशीच असेल– तीन परकरवाली किंवा तीन शेपूटवाली – तिला तुम्ही काहीही म्हणा." डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, आपली जीभ आवर. माझा शोध करीत जी ही प्रौढा येथे येत आहे, ती इतक्या दूर राहते की, तिच्यावर त्या वैद्याच्या उपहासात्मक टीकेचा फटका बसणार नाही. शिवाय तू हे ध्यानात घे की, ती एक सरदारीण आहे. अशा थोर कुलातील स्त्रिया जेव्हा परिचारिका होतात, तेव्हा त्या फक्त राण्या–महाराण्यांचीच सेवा करतात. पण स्वतःच्या घरी इतर स्त्रियांप्रमाणेच त्या पूर्णपणे कुलीन महिला म्हणून वागतात आणि त्यांच्या सेवेला दुसऱ्या दासी असतात."

तेथे हजर असलेली डोन्ना रोड्रिगेझ म्हणाली, "होय, होय. त्या प्रकारे लेडी डचेसची सेवा करणाऱ्या येथेही काही दासी आहेत. त्यांचे नशीब चांगले असते तर त्या सरदारणी झाल्या असत्या. पण आपण सारेच काही श्रीमंत होण्यासाठी जन्मास आलेलो नाही, पण प्रामाणिक होण्यासाठी आहो. म्हणून कोणीही परिचारिकासंबंधी– त्यातही पोक्त व अविवाहित असणाऱ्यांसंबंधी– वाईट बोलू नये. मी काही त्यांच्यापैकी नव्हे, तरी मला सहज समजते की, कुमारी सहचरीला विधवा सहचरीपेक्षा अधिक लाभ असतो. हे सारे खरे असले तरी, सोबतिणींच्या बाबतीत जो कोणी लुडबुड करील, त्याचा काही लाभ होणार नाही.पुष्कळजण लोकर आणायला जातात आणि भादरले जाऊन परत येतात." सँको म्हणाला, "ते काही असले तरी, माझ्या न्हाव्याने सांगितले ते खरे असेल तर, तुमच्या या दासींजवळ, दुसऱ्या कोणी हिरावून नेण्यासारखे काहीच

नसते असे मात्र नाही; म्हणून पातेल्यात भात चिकटलेला असला, तरी त्यांनी तो ढवळू नये. ''

डोन्ना रोड्रिगेझने उत्तर दिले, '' हे शागीर्द नेहमी आमच्याविरुद्ध नाक उडवीत असतात. दुष्ट पिशाच्चांच्या तांड्याप्रमाणे ते नेहमी खाजगी दालनात डोकावीत असतात. तेथून आमची जाण्यायेण्याची घाई ते नेहमी पाहात असतात. सर्व दिवसभर त्यांना काही काम नसते हे ईश्वर जाणतो. म्हणून त्यांना एकच करमणूक माहीत असते आणि ती म्हणजे आमची नालस्ती करणे, आमच्याविषयी गटारगप्पा सांगणे, आमची पुरलेली हाडे बाहेर काढणे आणि आमची अब्रू जमिनीत गाडणे. पण त्यांच्या बोलण्याने निंदा होत नाही. म्हणून मी त्या मूर्ख शागीर्दांना सांगते की, तुम्ही कितीही बेपर्वाई केली, तरी आम्ही वरचढ राहू, भुकेल्या राहिलो तरी अधिक कुलीन घरात आम्ही राहू आणि आमचे देह कोमल असोत – नसोत, काळ्या झग्यांनी ते झाकून घेऊ – एखादी मिरवणूक चालली असताना उकिरडा भरतकामाने झाकतात तशा. महाराज, ही वेळ जर योग्य असती, तर मी आपली आणि साऱ्या जगाची अशी खात्री पटवून दिली असती की, दासीच्या काचोळीत मावणार नाही असा कोणताच सद्‌गुण नाही. '' डचेस म्हणाली, '' मला वाटते, इमानी रोड्रिगेझचे म्हणणे बहुतांशी बरोबर आहे. पण या वादासाठी आपण दुसरी चांगली वेळ निवडली पाहिजे, त्या दुष्ट वैद्याचे वाईट मत उधळून टाकायला आणि त्याबरोबरच या थोर सँको पँझाच्या अंतःकरणात जे विचार खेळत आहेत तेही उडवून लावायला. '' सँको म्हणाला, '' माझ्यापुरते म्हणाल तर, मी तिच्याशी वाद करणार नाही. कारण, राज्यपाल होण्याचे विचार माझ्या मेंदूत इतक्या जोराने उसळत आहेत की, शागिर्दाविषयींची माझी सारी चिंता गडप झाली आहे. दुनियेतील साऱ्या सख्यांची आता मला काडीइतकीहि किंमत नाही. ''

या विषयावर त्यांची चर्चा अधिक काळ चालली असती, पण हताश प्रौढेच्या आगमनाची वर्दी देणाऱ्या मुरलीचा आणि नगाऱ्याचा आवाज तेथे येऊन थडकला. तिचे योग्य स्वागत कसे करावे, असा प्रश्न डचेसने ड्यूकला केला. सरदारीण या नात्याने तिचा किती थाटमाट करणे उचित होईल ? असे तिने विचारले. ड्यूकने उत्तर देण्या-पूर्वीच सँको मध्येच उद्‌गारला, '' हे पहा, या बाबतीत मी असा सल्ला देईन की, सरदारीण म्हणून आपण अर्ध्या रस्त्यापर्यंत जाऊन तिचे स्वागत करावे. पण दासी म्हणून तिचे स्वागत करण्यासाठी एक पाऊलही उचलू नये. '' डॉन क्विक्झोट म्हणाले, '' अरे, तुला इतकी तसदी घेण्यास कोणी सांगितले ? '' सँकोने उत्तर दिले, '' कोणी सांगितले ! मीच मला सांगितले. महाराज, मी आपला सेवक नाही काय ? त्यामुळे शिष्टाचाराची उमेदवारी मी केलेली नाही काय ? आपल्यासारखे धनी म्हणजे शिष्टा-चाराचे तुरे ! आपण मला वारंवार सांगितले आहे की, एक पत्ता कमी किंवा एक जास्त असला तरी एकतीस पत्त्यांनी माणूस हरू शकतो. तल्लख बुद्धी उडी घेते, शहाण्याला एक शब्द पुरे. '' ड्यूक म्हणाला, '' सँकोने चांगले सांगितले. स्वागताचा निर्णय

करण्यासाठी आपण प्रथम हे पाहू की, ती सरदारीण कोणत्या दर्जाची आहे, आणि मग त्याप्रमाणे वागू."

आता पावा व नगारे पूर्वीप्रमाणे वाजत आले. पण ग्रंथकाराने हे छोटे प्रकरण येथेच संपविले आणि नवे प्रकरण सुरू केले. त्यात याच साहसाची कथा पुढे सांगितली आहे. ही कथा म्हणजे या इतिहास-ग्रंथातील अत्यंत लक्षणीय भाग आहे.



प्रकरण ३८

# उदासीन मेट्रनने आपल्या दुर्दैवाची जी कहाणी सांगितली, तिचा वृत्तांत

नगारे व पावे यांचे दुःखपूर्ण स्वर ऐकू आल्यावर त्या मंडळींना बारा पोक्त दासी, दोघी – दोघीच्या जोडीने, बागेत शिरत असताना दिसल्या. सर्वांचे पोशाख सुतकी स्वरुपाचे होते. ते लोकरी कापडाचे होते. त्यावर त्यांनी पांढरे कापडी बुरखे घेतले होते. ते इतके लांब होते की, त्यामुळे त्यांचे काळे पोशाख दिसत नव्हते. फक्त त्या पोशाखाच्या तळच्या कडा दिसत होत्या. नंतर आली सरदारीण ट्रिफाल्डी. पांढऱ्या दाढीच्या तिच्या सेवकाने-ट्रिफाल्डीनने–तिचा हात धरला होता. तिने उत्तम लोकरीचा पोशाख धारण केला होता. त्यावर फुले काढली असती तर ती राऊन्सिव्हल वाटाण्याइतकी मोठी दिसली असती. तिच्या पोशाखाचे टोक - शेवट–किंवा शेपूट म्हणा–तीन सारख्या कोनांमध्ये किंवा परकरात विभागलेला होता. सुतकी वेषातील तीन नोकरांनी तिच्या झग्याची टोके उचलून धरली होती. तिचा लवाजमा अशा सुंदर त्रिकोणी आकृतीत बसलेला असल्याने तिला ट्रिफाल्डी म्हणत असावेत, असा प्रत्येकाचा तर्क होई – जसे तिपदरी–किंवा तीन–परकरांची–सरदारीण असेही कोणी म्हणावे. बेनेनगेलीचे मत असेच आहे. पण तो असे सांगतो की, तिची खरी पदवी लोबुनाची–लांडग्याची-सरदारीण. तिच्या देशात खूप लांडगे जन्मास येतात. जर तेथे कोल्हे असते, तर त्याच नियमां-प्रमाणे तिला झोरूनाची–कोल्ह्यांची–सरदारीण म्हटले असते. त्या राष्ट्रामध्ये अशी वहिवाट होती की, आपल्या देशात जी वस्तू मुबलक प्रमाणात असेल, तिचे नाव थोर लोकांनी धारण करावे. तथापि, या सरदारणीने स्वतःच शोध करून नाव धारण करण्याची नवी वहिवाट पाडली आणि म्हणून तिने आपले लोबुना हे नाव टाकून ट्रिफाल्डी हे नाव धारण केले.

तिच्या बारा सेविका पदयात्रेच्या गतीने तिच्याबरोबर तेथे आल्या. त्यांच्या चेहऱ्यावर काळे बुरखे होते. पण ते ट्रिफाल्डिनप्रमाणे पारदर्शक नव्हते–त्याचे स्वरूप पूर्णपणे झाकण्याइतके ते दाट होते. सर्व दासींचा तो ताफा आत येताच, ड्यूक, डचेस व डॉन क्विक्झोट उठून उभे राहिले– आणि त्यांच्याबरोबर असलेल्या लोकांनीही तसेच केले. नंतर दोघी–दोघींच्या रांगा करून बारा स्त्रिया उभ्या राहिल्या आणि सरदारणीला त्यांच्यामधून जाण्यास त्यांनी वाट करून दिली. त्याप्रमाणे सरदारीण त्या वाटेने गेली.

तिचा शागीर्द ट्रिफाल्डिन हा अजून तिला वाट दाखवीत होता. ड्यूक, डचेस आणि डॉन क्विक्झोट हे तिला भेटण्यासाठी सुमारे बारा पावले पुढे गेले. ती आपले गुडघे टेकून बोलू लागली. तिचा आवाज स्वच्छ आणि नाजूक नव्हता तर घोगरा आणि खरबरीत होता. ती म्हणाली, " आपला निष्ठावंत सेवक असलेल्या माणसाचे म्हणजे बाईचे स्वागत इतक्या थाटामाटाने आणि समारंभाने करण्याची तसदी महाराजानी घेऊ नये. माझ्या दुर्दैवाच्या जाणीवेमुळे माझी सारी बुद्धी नष्ट झाली आहे. म्हणून आपल्या समंजस मताला धरून मी काही बोलू शकणार नाही. माझी समजशक्ती मला सोडून गेली आहे– वाऱ्यावर भरकटत आहे– फार फार दूर आहे. तिचा मी जितका अधिक शोध करीन तितकी ती मला सापडण्याचा संभव थोडा." ड्यूकने उत्तर दिले, " बाईसाहेब, आपल्या बुद्धिमत्तेला अभिवादन करण्यासाठी आणि आपल्या थोरवीविषयी आदर दाखविण्यासाठी आम्ही हा सन्मान करीत आहो. आपल्या आकृतीनेच आपली योग्यता आणि उत्तम गुणवत्ता प्रगट होते. " नंतर तिचा हात आपल्या हातात घेण्याचा मान आपल्याला मिळावा अशी त्याने याचना केली आणि मग तिला वर नेले व आपल्या डचेसजवळ एका खुर्चीवर बसविले. प्रसंगाला अनुरूप अशा थाटामाटाने डचेसने तिचे स्वागत केले.

हे सर्व होईपर्यंत डॉन क्विक्झोट काही बोलले नाहीत. सँको त्या स्त्रीकडे चोरून पहात होता–तिच्या दासींच्या बुरख्याआतून डोकावून बघत होता; पण व्यर्थ. कारण त्या दासी एकमेकींना अगदी चिकटून उभ्या होत्या आणि गप्प होत्या. शेवटी त्या सरदारिणीने पुढीलप्रमाणे बोलण्यास सुरुवात केली :—

" हे त्रिवार–प्रभावशाली स्वामिन्, त्रिवार–सुंदर स्वामिनी आणि त्रिवार–बुद्धिमान प्रेक्षकहो, मला असा विश्वास वाटतो की, माझ्या परम दुःखाला नि दुर्दैवाला आपल्या अत्यंत उदार नि दयामय अंतःकरणात–त्या करुणेच्या गाभाऱ्यांत–स्थान मिळावे. पाषाण, पोलाद किंवा पहाड यांना वितळून टाकण्याइतके माझे दुःख दारुण आहे. पण माझ्या दुर्दम्य दुर्दैवाची कहाणी मी आपल्याला निवेदन करण्यापूर्वी मी आपल्याला कळकळीची विनंती करते की, आपल्या या कीर्तिमंत श्रोतृवर्गामध्ये ला मांचीसिमाचे डॉन क्विक्झोट आणि त्यांचा सुविख्यात शागीर्दवर पँझा यांचे अस्तित्व सर्वांना भूषवीत आहे ना ? हे मला कळावे. " याचे उत्तर दुसऱ्या कोणी देण्याआधी सँको म्हणाला, " हा काय मी इथं आपल्या कोपऱ्यापाशी आहे ? आणि तसेच डॉन क्विक्झोटही. म्हणून, परम–दुःखमग्न बाईसाहेब, आपण आपली कथा कथन करावी, म्हणजे आम्ही आपले सेवा-कार्य, आमच्या शक्तीची पराकाष्ठा करून, करीत राहू–त्यासाठी आम्ही तत्पर आहो, इत्यादि. "

नंतर डॉन क्विक्झोट पुढे झाले आणि सरदारणीला उद्देशून म्हणाले, " हे संकटग्रस्त ललने, शिलेदाराच्या सामर्थ्याने आपली दुःखे दूर होण्यासारखी असतील, तर मी माझी सारी शक्ति नि धृति आपल्या सेवेसाठी अर्पण करतो. मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट असून माझा व्यवसाय, दुःखितांच्या मदतीला धावून जाणे, हा आहे.

म्हणून, उपचारार्थ काही प्रास्तविक न बोलता किंवा वक्तृत्वशैलीचा फुलोरा न पसरता, मी आपल्या साहाय्यास येतो–ते माझे कर्तव्यच आहे. म्हणून, बाईसाहेब, आता प्रार्थना इतकीच की, आपल्यावरील संकटांचा सरळ व संक्षिप्त वृत्तांत आपण आम्हास निवेदन करावा आणि त्यावर कोणते उपाय योजावेत हेही सांगावे. आपले दुःख उपचाराच्या पलीकडचे असले, तर आपल्या दुःखाशी आम्ही सहानुभूती बाळगू आणि आपल्या यातनामध्ये आम्ही आपल्याला समाधान देऊ, एवढी तरी खात्री बाळगा."

हे ऐकून सरदारणीने आपले शरीर डॉन क्विक्झोटच्या चरणावर झोकून दिले. तसे न करण्याबद्दल त्यांनी तिला प्रेमाने विनंती केली, पण त्यांच्या पायाला मिठी मारण्याच्या प्रयत्नात ती म्हणाली, " अत्यंत अजिंक्य असे शिलेदारजी, आपल्या चरणी मी शरण आले आहे. कारण, हे आपले चरण म्हणजे शिलेदारीच्या कोनशिला आहेत – माझ्या गलितगात्र वृत्तींचे आधारस्तंभ आहेत. त्या चरणांचा संचार अकुंठित असतो आणि त्यामुळे माझे दुःख-हरण लौकर होईल व माझ्या यातना संपुष्टात येतील. हे शौर्यशाली शिलेदारा, आपल्या जातिवंत पराक्रमामुळे अॅमडिसेस एस्प्लॅंडिअन्स व बेलियानिसेस या सर्वांच्या शौर्य-कथांना खग्रास ग्रहण लागले आहे, आणि त्या साऱ्या दंतकथा पार लोपल्या आहेत." नंतर डॉन क्विक्झोटकडून वळून व सँकोच्या खांद्यावर हात ठेवून तिने त्याचे हात जोराने दाबून म्हटले," अरे, तू परम निष्ठावंत सेवक आहेस. महानुभाव शिलेदारांची सेवा तुझ्याइतकी दुसऱ्या कोणीच केली नसेल. माझा भालदार ट्रिफाल्डिन याच्या दाढीपेक्षा तुझी सुजनता अधिक विस्तृत आहे ! अरे, या एकट्या डॉन क्विक्झोट यांच्या ठायी सर्व शिलेदारीचा लढाऊपणा एकवटला आहे–केंद्रित झाला आहे. त्यांच्या शिस्तीत वागण्याचे शिक्षण तुला मिळाले, हे तुझे केवढे भाग्य ! तुझ्या ग्रहांनीच तुला हे सौख्यकारक भाग्य मिळवून दिले आहे. माझी तुला कळकळीची विनंती आहे की, एवढ्या थोर धन्याशी तू जी निष्कलंक निष्ठा बाळगीत आहेस, त्यामुळे आणि सौजन्यावरील तुझ्या प्रेमामुळे, तू माझ्या वतीने मध्यस्थी करणारे हृदयस्पर्शी वक्तृत्व कर म्हणजे या विनम्र व परम उदासीन सरदारणीवर तुझ्या धन्याच्या कृपेचा प्रकाश तत्काळ पडेल."

सँको म्हणाला, " बाईसाहेब, असे पहा, आपल्या सौजन्याचा विस्तार आपण आपल्या सेवकाच्या दाढीने मोजला, याबद्दल मला काही म्हणावयाचे नाही. ते महत्त्वाचे नाही. महत्त्वाचे हे आहे की, माझे हे आयुष्य संपल्यावर माझा जीव स्वर्गात जावा. जगातील साऱ्या दाढ्यांची मला किंमत नाही. आपण माझी ही विनवणी किंवा खुशामत न केली, तरी मी आपल्यासाठी माझ्या धन्यापाशी माझा शब्द खर्च करीन. त्याचे माझ्यावर प्रेम आहे हे मला माहीत आहे. शिवाय, या वेळी एका विशिष्ट कार्यासाठी त्याला माझी गरज आहे – म्हणून आपल्यासाठी शक्य ते सर्व काही तो करील. पण कृपा करून आपल्या मनावरचा भार उतरून टाका. तुमची दुःखे काय आहेत ती पाहू द्या, आणि मग बाकीच्या गोष्टींचा बंदोबस्त आमच्यावर सोपवा."

आपला साहसाचा प्रयोग इतक्या मजेशीरपणे रंगत चाललेला आहे, हे पाहून

ड्यूक व डचेस यांचे पोट हास्याने फुटण्याची वेळ आली. त्याबरोबर त्यांनी ट्रिफाल्डीचे सोंग मोठ्या चातुर्याने केल्याबद्दल कौतुक केले. आपल्या जागेवर पुनः बसून ती आपली कहाणी सांगू लागली—

" केप कामोरिनच्या पलीकडे सुमारे सहा मैलांवर दक्षिण–समुद्र व महान टॅप्रोबॅना यांच्यामध्ये कॅण्डायाचे सुप्रसिद्ध राज्य वसलेले आहे. त्याची राणी लेडी डोन्ना मॅगुंटिया. तिचा पती राजा आर्किपेलो. त्याने आपल्या मृत्यूसमयी आपल्या एकुलत्या एक अपत्याला–राजकन्या अँटोनोमॅसिया हिला–आपल्या राज्याचे वारस केले. या राजकन्येचे शिक्षण व संगोपन माझ्या देखरेखीखाली व मार्गदर्शनाखाली झाले. कारण, तिच्या आईची–राणीची–मी वयाने सर्वांत मोठी आणि सर्वश्रेष्ठ दासी होते. कालंतराने ती तरुण राजकन्या चौदा वर्षांची झाली. तिचे लावण्य इतके परिपूर्ण होते की, त्यात काही भर घालणे निसर्गाच्या शक्तीबाहेरचे होते. विशेष म्हणजे तिचे मन तिच्या शरीराइतकेच चातुर्याने अलंकृत झालेले होते. साक्षात चातुर्य हे तिच्यापुढे वेडे ठरत होते. ती अखिल दुनियेत अत्यंत लावण्यवती स्त्री होती–आणि जितकी लावण्यवती तितकीच बुद्धिमती होती. अजून ती तशीच असेल–जर कोणा मत्सरी व कठोर भगिनींच्या घातक सुऱ्याने किंवा तीक्ष्ण कात्रीने तिच्या आयुष्याचा धागा तोडला नसेल तर ! पण तसे करून पृथ्वीची हानी परमेश्वर होऊ देणार नाही हे नक्की. या जगद्–उद्यानाची शोभा वाढविणाऱ्या त्या अत्यंत कमनीय शाखेची अकाली काटछाट कधीच होणार नाही.

" माझी वाणी असंस्कृत, ती तिच्या लावण्याचे वर्णन पूर्णपणे कशी करू शकेल ? सर्वांचे नेत्र तिच्या लावण्याने वेधून घेतले. तिला असंख्य भक्त लाभले. त्यांपैकी पुष्कळ जण राजपुत्र होते. ते तिचे शेजारी होते. त्याशिवाय दूरदूरच्या राजपुत्राचेही मन तिने खेचून घेतले होते. इतर प्रियकरांमध्ये एक खाजगी शिलेदार होता. तो दरबारात रहात असे. त्या स्वर्गीय लावण्याने नटलेल्या राजकन्येपर्यंत आपल्या विचारांची झेप घेण्याचे धाडस त्याने केले. दरबारी शिक्षणामुळे त्याला जे लष्करी ज्ञान प्राप्त झाले होते, त्यावर त्याने प्रभुत्व संपादिले होते. आपल्या यौवनावर, आपल्या देखण्या चेहऱ्यावर, आपल्या आकर्षक स्वरूपावर व वेषावर, आपल्या डौलदार हालचालीवर, आपल्या सहज सुचणाऱ्या चतुर संभाषणावर–आणि अशाच इतर कैक गुणांवर विसंबून तो युवक अत्यंत उत्कट भावनेच्या आहारी गेला. तो एक अलौकिक माणूस होता, हे मी सांगितले पाहिजे. गिटार–वाद्य तो इतक्या कुशलतेने वाजवी की, तो कोणालाही चमत्कारच वाटावा. त्याचे ते वाद्य केवळ कानाशी नव्हे, तर थेट जीवाशी गुजगोष्टी करी. त्याचे नृत्य कौतुकास्पद होते. पक्ष्यांचे पिंजरे बनविण्याची त्याची कला तर असामान्य होती–केवळ त्या कलेवर त्याने मोठी जिंदगी मिळविली असती. आणि या त्याच्या सर्व गुणांवर कळस म्हणजे तो कवि होता. त्याचे इतके थोर थोर गुण पर्वत हलविण्यालाही समर्थ होते, मग तरुण, कोमल, कुमारिकेचे हृदय हलविण्यास ते समर्थ कसे नसतील ? पण माझ्या ताब्यात असलेल्या त्या सुंदर कुमारिकेच्या शीलामुळे आणि संकोचामुळे त्या

युवकाच्या या साऱ्या ललित–कला आणि सौख्यदायी वर्तणूक फोल ठरली असती–जर एका धूर्त दुष्टाने माझ्या हृदयाचा कबजा आधी घेतला नसता तर. त्या लावण्याच्या किल्ल्याच्या किल्ल्या हस्तगत करण्यासाठी त्या फसव्या दुष्टाने मला फूस लावण्याचा प्रयत्न केला. थोडक्यात म्हणजे त्याने लहानलहान पण मोठ्या सुखद अशा गोष्टी करून माझ्या अंतःकरणात चोरून प्रवेश केला आणि शेवटी माझ्यावर पुरीपुरी मोहिनी घातली. जी गोष्ट करण्यास मी कधीच परवानगी द्यावयास नको होती, ती माझ्या ध्यानी येण्यापूर्वीच त्याने संपादन केली. त्याचा उद्देश साध्य करण्याचे कामी मी प्रथम कशाला वश झाली असेन आणि माझे शील उध्वस्त केले असेन, ते म्हणजे त्याची एक शापित कविता. एका रात्री माझ्या खिडकीखाली उभा राहून त्याने ही कविता गाण्यास सुरवात केली. ती कविता अशी—

## एक गीत

‘ माझे हृदय एक गुप्त आग जाळीत आहे  
आणि माझ्या भडकलेल्या वेदना वाढवण्यासाठी  
ज्या मोहक वैरिणीने आग पेटवली  
ती मला तक्रार करण्याचे स्वातंत्र्य नाकारीत आहे.  
पण प्रेमात जाणवणारे परम सौख्य आणि दुःख  
आपण झाकून ठेवावे हे खरोखर न्याय्य;  
कारण, अहो ! स्वर्गाचे आनंद आणि पाताळाच्या यातना  
कोणत्या मानवी वाचेला सांगता येतील ? ’

“ त्याचे ते शब्द म्हणजे मला वक्तृत्वाचे मोती वाटले आणि त्याचा आवाज तर काय ? माझ्या कानांना साखरेपेक्षा गोड वाटला. या कवितांनी माझ्यावर जे दुर्दैव ओढवले, त्याचा विचार केला म्हणजे मला राहून राहून वाटते की, प्लेटोने आपल्या आदर्श व सुयंत्रित राज्यातून कविजनांना–त्यातही स्वैरपणे कामुक लेखन करणाऱ्या कवींना–हद्‌पार करण्याची योजना आखली, ही प्रशंसनीय गोष्ट होय. शेकोटीजवळ बसलेल्या बायका मुलांना रडविणाऱ्या मँटुआच्या मार्क्विसच्या खेदजनक कवितांऐवजी हे कामुक कवी श्रोत्यांच्या आत्म्यावर असे काही आघात अत्यंत कौशल्याने करतात की, त्यामुळे माणसाच्या मनातील साऱ्या सद्‌भावना जळून खाक होतात. दुसऱ्या एकेवेळी त्याने पुढील गीत गाऊन मला संतुष्ट केले—

## एक गीत

“ ‘ मृत्यो, काही तरी दयाळू वेष घे  
आणि तात्काळ माझ्या हृदयाला चकित कर.  
कारण जगणे हा असा शाप आहे  
आणि मरणे हे इतके परम सौख्य आहे

की तू आधी काही सूचना दिलीस
तर आनंदाने मी जीवनातच परत पडेन.' "

" अशा प्रकारच्या दुसऱ्या कैक कविता त्याने मला ऐकविल्या. त्या वाचत असताना मन मुग्ध होत असे, पण त्या गायिल्या जात असताना तर माझा आनंद गगनात मावत नसे. तुम्ही हे जाणताच की, जेव्हा आपले विख्यात कवी प्रेमगीते आणि नृत्यगीते रचण्याच्या अधोमार्गावर पाऊल ठेवतात ( अशी गीते सध्या कॅण्डायामध्ये फार रूढ आहेत ) तेव्हा ती गीते श्रोत्यांच्या कानी पडताच त्यांच्या जीवांचे नर्तन सुरू होते, त्यांच्या कल्पनाशक्तीला पंख फुटतात, त्यांच्या वृत्ती थरारून जातात आणि जणु काही त्यांच्या अंगोपांगातून वारे वहात आहे अशा स्वरूपात त्यांचे सर्व शरीर एका विलक्षण अस्वस्थतेमध्ये डुलत राहते.

" म्हणून पुन्हा एकदा मी असे घोषित करते की, हे कवी अत्यंत धोकेबाज असतात आणि सरडयांच्या बेटात हद्दपार करण्याच्या लायकीचे असतात. अर्थात् मला हे कबूल केले पाहिजे की, या कवीवर भाळणारे मूर्ख लोक आणि आचरट पोरी यांच्यावरच सारा दोष येऊन पडतो. कारण, माझ्या अधिकाराला अवश्य असणारी सावधगिरी मी बाळगली असती तर, त्याच्या प्रणय-गीतांनी माझे हृदय हलले नसते आणि ' मी मृत्यू जगत आहे, ' ' मी बर्फात जळत आहे, ' ' मी ज्वाळांमध्ये कुडकुडत आहे, ' ' मी निराशेत आशावादी आहे, ' ' मी थांबलो आहे पण चालत आहे ' अशा त्याच्या सहस्र काव्यात्मक विरोधाभासावर मी विश्वास ठेवला नसता. अशा प्रकारच्या काव्यरचनेमध्ये असे विरोधाभास पुष्कळच असतात. अरबस्तानच्या फिनिक्सची वचने, एरियाडनेचा मुकुट, सूर्याचे घोडे, दक्षिण समुद्रातील मोती, टॅगसचे सोने, पँचायाचे मलम-अशा कैक गोष्टींप्रमाणेच कवीचे हे सारे शब्दजाल हास्यास्पद असते. जाता जाता हे ध्यानात धरले पाहिजे की, हे कवीजन आपल्या ज्या दैवी देणग्या मुक्तहस्ते उधळतात, त्या खऱ्या कधीच होणार नाही हे त्यांना माहीत असते.

" पण हाय रे दुर्दैवा, हे अभागी स्त्रिये, कोठे भटकत चाललीस तू ? मी स्वतः असंख्य दोषांना जबाबदार असताना दुसऱ्यांच्या दोषांवर बोट ठेवण्याचा वेडेपणा मी का करावा ? हाय ! हाय ! त्याच्या कवितांनी नव्हे तर माझ्या स्वतःच्या प्रवृत्तीने, त्याच्या संगीताने नव्हे पण माझ्या स्वतःच्या थिल्लरपणाने, त्याच्या चातुर्याने नव्हे पण माझ्या मूर्खपणाने डॉन क्लॅव्हिजोचा ( त्या शिलेदाराचे नाव हे होते ) मार्ग खुला झाला- सरळ झाला.. सारांश, मी त्याला प्रवेश मिळवून दिला आणि मी कानाडोळा केल्यामुळे तो ॲटोनोमॅसियाला वारंवार भेटू लागला. त्या बिचाऱ्या स्त्रीची फसवणूक त्याच्यापेक्षा मीच अधिक केली. पण मी दुष्ट असले तरी विवाहाच्या सन्मान्य भूमिकेवर उभी होते. तिचा पती होण्याचे त्याने मान्य केले नसते तर तिच्या बुटाच्या नाडीच्या सावलीलाही त्याला स्पर्श करता आला नसता-छेः, छेः, मुळीच करता आला नसता. विवाह ! - विवाह अवश्य झाला पाहिजे. त्याशिवाय मी कोणाच्याही अशा प्रकरणात

कधीही पडणार नाही. या प्रकरणात सर्वात मोठा दोष म्हणजे त्या दोघांच्या परिस्थितीचे वैषम्य. तो केवळ एक खाजगी शिलेदार–आणि ती, राज्याची वारस ! त्यांचे हे कारस्थान माझ्या सावधपणामुळे काही काळ अगदी गुप्त राहिले. पण शेवटी, अँटोनोमॅसियाचे पोट एक प्रकारे फुगले आणि कुजबूज सुरू झाली. खूप चर्चा करून आम्हाला एकच मार्ग आढळला. तो म्हणजे डॉन क्लॅव्हिजोने धर्मगुरूपुढे जाऊन या तरुण स्त्रीला मागणी घालावी. त्यासाठी त्याने कोणते वचन द्यावे हे मी सांगितले. सॅम्सनच्या सर्व शक्तीलाही जे बंधन तोडता आले नसते, असे बंधन त्या वचनात अंतर्भूत होते. या योजनेची अंमलबजावणी झाली– पाद्र्यापुढे वचन–चिठ्ठी ठेवली गेली. त्याने राजकन्येची तपासणी केली. तिचा कबुलीजबाब एकंदर कराराच्या धोरणाशी सुसंगत आहे असे पाहून त्याने तिला एका अत्यंत प्रामाणिक हवालदाराच्या ताब्यात ठेवले. " सँको म्हणाला, " काय ? तुमच्या देशात कवी आहेत, गीते आहेत आणि कविता आहेत – तसेच हवालदारही आहेत. खरोखर जग हे सर्वत्र सारखेच आहे. पण ट्रिफाल्डीबाईसाहेब, आपली कथा चालू द्या अशी माझी विनंती आहे. या लांब वळणाच्या गोष्टीचा शेवट ऐकेपर्यंत माझे मन काट्यावर ठेवल्यासारखे आहे." सरदारीण उत्तरली, " सांगते. "



## प्रकरण ३९

# ट्रिफाल्डी आपली प्रचंड व संस्मरणीय कथा पुढे सांगते

सँकोच्या प्रत्येक शब्दाने डचेसला नवा नवा आनंद होत होता, पण तितकेच दुःख डॉन क्विक्झोट यांना होत होते; म्हणून त्यांनी त्याला गप्प रहाण्यास बजावले आणि प्रौढेला कथा पुढे सांगण्यास संधी दिली. ती म्हणाली, " सारांश, या प्रकरणाची चर्चा बराच काळ झाल्यावर आणि खूप प्रश्नोत्तरे झाल्यावर, राजकन्येने आपला पहिला निश्चयच ठामपणे नि आग्रहाने मांडला. तेव्हा डॉन क्लॅव्हिजो याच्या बाजूने निर्णय दिला गेला. तो तिच्या आईने– राणी मॅग्युनटियाने–जिवाला इतका लावून घेतला की, सुमारे तीन दिवसांनंतर आम्ही तिचे दफन केले. " सँको म्हणाला, " तर मग ती मेली हे नक्कीच. " ट्रिफाल्डीनने उत्तर दिले, " ते स्पष्टच आहे. कारण, कॅण्डायामध्ये जिवंत माणसाला पुरत नाहीत– मेलेल्याला पुरतात. " सँको उत्तरला, " पण शागीर्दजी, आपल्या परवानगीने मी हे सांगतो की, बेशुद्ध झालेल्या कैक लोकांना आतापर्यंत जिवंत-पणी पुरण्यात आले आहे. मला वाटते, राणी मॅग्युनटियाला फक्त मूर्च्छा आली असावी– आणि खरोखर इतक्या लौकर मरण्याची घाई तिने केली नसावी. अहो, जीव आहे तोवर आशा आहे. साऱ्या गोष्टींवर इलाज आहे– पण मृत्यूवर नाही. आईने जीवाला इतके लावून घ्यावी, अशा वाममार्गाने ती तरुणी इतकी वाहवली नव्हती. खरे म्हणजे, तिने एखाद्या हुजऱ्याबरोबर– किंवा कुटुंबातील एखाद्या नोकराबरोबर– लग्न केले असते ( पुष्कळांनी असे केल्याचे मी ऐकले आहे ) तर ती फार वाईट गोष्ट झाली असती– आणि मग काही इलाज नसता. पण राजकन्येने इतक्या सुसंस्कृत तरुण शिलेदाराशी लग्न केले, तर राणीने इतका हलकल्लोळ करण्याचे काहीच कारण नव्हते. तिने सारे प्रकरण नीटपणे मिटवावयास हवे होते. राजकन्येकडून चूक झाली हे खरे, पण ती काही इतकी घोर नव्हती, असेच कोणीही म्हणेल. माझा धनी नेहमी म्हणतो– ( आणि तो मला खोटे बोलू देणार नाही. ) पंडितांचे पाद्री होतात, त्याप्रमाणे शिलेदारांचे राजे-महाराजे कोणालाही सहज करता येतील. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " खात्रीनेच. दोन दिडक्यांचे दैव देऊन तुम्ही एखाद्या शिलेदाराला दुनियेत मोकळे सोडा की, तो दुनियेचा सर्वांत बडा शहेनशहा होऊन बसेल पण बाईना आपली कथा सांगू द्या. आतापर्यंत त्यांची कथा आनंददायक झाली, पण मला शंका येते की, अत्यंत कटु भाग अद्याप सांगितला जायचा आहे. " तिने उत्तर दिले,

' खरे आहे महाराज, या कथेचा अत्यंत कटु भाग असा आहे की, त्याच्या तुलनेने कडू कारले मधासारखे गोड लागेल. राणी मूर्च्छित झालेली नव्हती– मृत झालेली होती, म्हणून आम्ही तिला पुरली, तिचे अंत्यविधि केले आणि अखेरचा निरोप घेतला. ( ही दुःखद कथा सांगताना अश्रूंच्या पुरात कोण बुडून जाणार नाही ?) "

इतक्यात मृत राणीचा पुतण्या– मॅलॅम्ब्रुनो राक्षस– त्या स्मशानभूमीवर आला. तो क्रूर स्वभावाचा होता आणि मांत्रिकही होता. एका लाकडी घोड्यावर बसून तो आला. त्याच्या भयंकर रागीट मुद्रेवरून तो आपल्या नातलगीच्या मृत्यूचा सूड उगविण्यासाठी तेथे आला आहे, असे दिसत होते. डॉन क्लॅव्हिहजोला त्याच्या धाष्टर्याबद्दल आणि ॲंटोनोमॅसियाला तिच्या नजरचुकीबद्दल शिक्षा करण्यास तो आला होता. म्हणून, त्याने त्या दोघांवर त्या थडग्यावरच तत्काळ मंत्र टाकून, त्याने त्यांची रूपे पालटली– तिचे रूपांतर पितळेच्या माकडीत केले आणि त्या तरुण शिलेदाराचे रूपांतर भयानक मगरात केले– कोणत्या धातूत, हे माहीत नाही. त्या दोघांच्यामध्ये त्याने एक शिलालेख उभारला. त्यावर सिरियाक भाषेत जो मजकूर लिहिलेला होता, त्याचे भाषांतर नंतर कॅंडेयन् भाषेत करून घेतले. मग स्पॅनिश भाषेत त्याचा अनुवाद करण्यात आला, तो असा—

" या दोन उद्धट प्रेमिकांना आपले पूर्वरूप कधीच प्राप्त होणार नाही, मात्र ला मांचा येथील शूर शिलेदाराने एकाकीपणे माझ्याशी सामना दिला, तर त्यांना मूळचे रूप प्राप्त होईल. त्या शिलेदाराच्या अश्रुतपूर्व अशा धैर्यासाठी हे अश्रुतपूर्व साहसी कृत्य राखून ठेवावे, अशी नियतीची अटळ आज्ञा आहे. "

" एवढे बोलून त्याने प्रचंड आकाराची एक भलीमोठी कट्यार काढली आणि माझे केस घट्ट पकडून माझा गळा कापण्याची किंवा माझे डोके उडविण्याची तयारी केली. मी घाबरून गेले—आपण मरतो, असे वाटले. माझ्या अंगावर काटा उभा राहिला आणि माझी जीभ माझ्या टाळ्याला चिकटून बसली. तरी, मी शक्य तितका धीर धरून कापत कापत व रडत रडत त्याची करुणा भाकली—ती इतक्या हृदयस्पर्शी भाषेत आणि कोमल व पाझर फोडणाऱ्या शब्दांनी की, माझ्या काकुळतीचा परिणाम त्याच्या मनावर झाला आणि त्याने आपले क्रूर कर्म करण्याचे थांबविले. त्याने दरबारांतील साऱ्या दासींना आपल्यापुढे उभे करण्याचा हुकूम सोडला—त्याच दासी तुम्हाला येथे दिसत आहेत. आमच्या विश्वासघातावर, आमच्या लबाड व्यवहारावर, पैशासाठी कोणतेही नीच कृत्य करण्याच्या आमच्या संवयीवर–त्याने लाखोली वाहिली. आमच्या व्यवसायाची त्याने यथेच्छ निंदा केली. वास्तविक या सर्व शिव्याशापांना मीच एकटी जबाबदार होते. तो म्हणाला, ' तत्काळ मरण देणारी शिक्षा मी तुला करणार नाही; कायमचे व शाश्वतचे दुःख देणारी शिक्षाच मी तुला ठोठावणार आहे. ' आमच्या या शिक्षेचा उच्चार त्याने करताच आम्हाला भासले, आमच्या मुद्रेवरील सारी रंध्रे उघडली जात आहेत आणि सुया–टाचण्या टोचल्याप्रमाणे तेथे भयंकर वेदना होत आहेत. नंतर आम्ही

आमचे हात आमच्या मुद्रेवरून फिरविले, तेव्हा आम्हाला काय आढळले, हे तुम्हीच पहा म्हणजे झाले."

असे म्हणून त्या निराश प्रौढेने आणि तिच्या सेवकांनी आपापले बुरखे फेकून दिले, तेव्हा त्या सर्वांच्या चेहऱ्यावर काही तांबड्या, काही काळ्या, काही पांढऱ्या तर काही संमिश्र रंगाच्या केसाळ दाढ्या उगवलेल्या दिसल्या. ड्यूक व डचेस यांनी कौतुक केले, डॉन क्विक्झोट व सँको यांना आश्चर्य वाटले आणि बघ्या लोकांना विस्मयाचा धक्का बसला. सरदारीण पुढे सांगू लागली, "अशा प्रकारे त्या खुनी नि रक्तपिपासू मॅलॅम्ब्रूनोने आमची वाट लावली आणि आमच्या तोंडावर या खरबरीत नि भयंकर केसाळ दाढ्या लावल्या–नाही तर आमच्या मुद्रा अत्यंत कोमल नि गुळगुळीत होत्या. अशा कुंचल्यानी आमचे चेहरे विद्रूप करण्यापेक्षा त्याने आपल्या प्रचंड कट्यारीने आमची डोकी उडविली असती, तरी बरे झाले असते! सभ्य गृहस्थहो, तुम्ही जर योग्य विचार केला तर तुमच्या लक्षात येईल की, मी जे काही सांगितले, ते सांगताना माझ्या डोळ्यातून अश्रूंचा पूर वहावयास हवा होता. परंतु या शोककारक विषयावर माझ्या डोळ्यातून आजवर अश्रूंच्या इतक्या नद्या आणि समुद्र वाहिले आहेत की, आता माझे डोळे भुसाप्रमाणे शुष्क झाले आहेत. म्हणून या वेळी तरी मला, आसवे न न गाळता, बोलू द्या. आपल्या हनुवटीवर इतकी झुडुपे वाढली असताना आपले मस्तक कोणाला दाखविण्यास एकादी दासी धजेल कशी? कोणता उदार माणूस तिला जवळ करील? कोणते नातलग तिला आपली म्हणतील? फार तर, आम्ही आमचे चेहरे काम-चलाऊ बनवू–त्यासाठी हजारो साबण नि उटणी लावू–लोकांनी आमच्याकडे लक्ष द्यावे म्हणून आम्हाला किती तरी खटाटोप करावा लागेल! आपल्या चेहऱ्यावर हे जंगली जंजाळ बाळगणाऱ्या स्त्रीचे पुढे काय होणार? माझ्या दुःखात सहभागी होणाऱ्या स्त्रियांनो, कोणत्या अशुभ क्षणी प्रभूने आम्हाला जन्मास घातले आणि त्याहीपेक्षा अधिक अशुभ काळी आम्ही या जगात आलो?" असे बोलून ती हताश प्रौढा मूर्च्छित पडत आहे असे दिसले.



प्रकरण ४०

# या साहसी प्रसंगाला धरून आणि या संस्मरणीय इतिहासाला अनुलक्षून काही घटना

[ अशा प्रकारचे इतिहास वाचण्याची आवड ज्यांना आहे अशा सर्व लोकांनी या इतिहासग्रंथाचा मूळ लेखक सिड हॅमेट यांचे फार आभार मानले पाहिजेत हे खचित. कारण, या ग्रंथकाराने प्रत्येक बारीकसारीक घटना पूर्णपणे स्पष्ट करण्यासाठी काळजी घेतली आहे. यातील विनोदाला भरती आणणारा लहानसहान प्रसंगही त्याने दडविलेला नाही. तसेच जो प्रसंग वगळला असता या कथेतील तेज व सत्य झाकोळले गेले असते, असा प्रसंगही त्याने गाळलेला नाही. तो विचारांची जिवंत चित्रे रेखाटतो, कल्पनेच्या भराऱ्या मारतो, गूढ गोष्टी जाणण्याची इच्छा तृप्त करतो, संशय नाहीसे करतो आणि अपेक्षा विरघळवून टाकतो. थोडक्यात म्हणजे अत्यंत चौकस माणसाची बारीकसारीक इच्छासुद्धा तो पुरवितो. अरे, सुविख्यात ग्रंथकारा ! अरे सुदैवी डॉन क्विक्झोटा ! हे कीर्तिशाली डल्सीनिया ! हे विनोदी सँको ! धन्य आहे तुमची ! तुम्ही सर्वजण स्वतंत्रपणे व संयुक्तपणे जिवंत राहा–मानवाच्या अगदी शेवटच्या पिढीपर्यंत जिवंत राहा ! त्यामुळे मानवजातीला आनंद व मौज लाभेल. पण आता आपण कथेकडे वळू. ]

प्रौढा मूर्च्छित झालेली पाहून सँको म्हणाला, " खरोखर असा प्रकार मी यापूर्वी कधीच ऐकला नव्हता की पाहिला नव्हता हे मी माझ्या घराण्यातील सर्व माणसांची शपथ घेऊन प्रामाणिकपणे सांगतो. माझ्या धन्यानेही मला कधी असे सांगितले नाही. फार काय, त्याच्या डोक्याच्या कारखान्यातही असे साहस कधी जन्मास आले नाही. आता हे जादूगार रांडलेका, अरे दुष्ट मॅलॅम्ब्रूनो राक्षसा, पाताळातील सर्व पिशाच्चांनी ( मी कोणाला शाप देत नाही, पण ) तुला पळवून न्यावे ! अरे, या पामर पातक्यांना देण्यासारखी दुसरी काहीच शिक्षा तुला सापडली नाही काय ? तू त्यांच्या हनुवटीला दाढ्यांचे कुंचले का चिकटविलेस ? देवी येवोत तुला ! अरे, त्यांची नाके निम्मी कापली असतीस, तरी बरे झाले नसते का ? ते थोडा वेळ बावरेबुवरे झाले असते इतकेच. पण आता तू त्यांच्या तोंडावर दाढ्यांचे हे जंगल लावले आहेस; ही अवदसा तुला का आठवली ? त्यांच्या दाढ्या करण्यासाठी लागणारा पैसाही या बिचाऱ्याजवळ नसेल, असे मी प्रतिज्ञेवर सांगतो. "

त्यांच्यापैकी एकजण म्हणाली, " आमच्या दाढ्या काढून टाकण्यासाठी लागणारा

पैसा आमच्याजवळ नाही हे अगदी खरे. म्हणून पैसा वाचविण्यासाठी आमच्यापैकी काहीजणींना डांबराचे थर ठेवावे लागतात. त्यामुळे दाढ्यांची पाळेमुळे ओरबाडून निघतात आणि त्यांच्या हनुवटीखालच्या तळांसारखी गुळगुळीत होतात. खरे म्हणजे कॅण्डायामध्ये अशा प्रकारच्या स्त्रिया आहेत की, ज्या घरोघर जाऊन बायकांच्या तोंडावरील केस काढतात, त्यांच्या भुवया कोरतात आणि बायकांसाठी करावी लागणारी छप्पन्न बारीक-सारीक कामे करतात. पण आम्ही आमच्या बाईसाहेबांच्या पाठराखिणी आहोत ना! आम्ही तशा स्त्रियांशी काडीमात्र संबंध ठेवीत नाही. कारण, त्यांचा लौकिक चांगला नाही. पूर्वी त्यांना कोठेही प्रवेश मिळे आणि त्या नात्यागोत्याच्या मानल्या जात हे खरे. पण आता त्यांना कुंटिणीपेक्षा चांगले कोणी समजत नाही. म्हणून लॉर्ड डॉन क्विक्झोट यांनी आम्हास दुःखमुक्त केले नाही तर आम्ही जिवंत असेपर्यंत या दाढ्या आम्हाला चिकटून राहतील." डॉन क्विक्झोट उत्तरले, "तुम्हाला तुमच्या दाढ्यांपासून मी जर मुक्त केले नाही, तर माझा केसन्‌केस मूर लोकांकडून मी उपटून घेईन." याचवेळी शुद्धीवर आलेली सरदारीण ट्रिफाल्डी आनंदाने ओरडली, "अहा रे शूरवीर शिलेदारा, तुझ्या अभिवचनाचा मधुर स्वर माझ्या कानी पडला. तेव्हा मी मूर्च्छेच्या पूर्णपणे आहारी गेलेले होते, पण त्या मधुर स्वरामुळे माझी सारी इंद्रिये पुनः पूर्णपणे शुद्धीवर आली आहेत. म्हणून हे महाविख्यात वीर-पुरुषा, अजिंक्य शिलेदारा, तुझे हे उदार अभिवचन तत्काळ सिद्धीस जावो, अशी मी तुला पुनः पुनः प्रार्थना करते." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "बाईसाहेब, हयगय केल्याचा दोष माझ्याकडे कधीच येणार नाही. आपण फक्त मार्ग दाखवा की मी आपली सेवा करण्यास सिद्ध असल्याची खात्री आपल्याला तत्काळ पटेल."

ती दुःखी स्त्री म्हणाली, "महाराज, आपण हे लक्षात घ्या की, या स्थानापासून कँडायाचे राज्य सुमारे पाच हजार कोस दूर आहे–दोन–तीन कोस कमीजास्त असतील–हे आम्ही मोजून पाहिले आहे. पण तुम्ही जर आकाशातून सरळ रेषेने घोड्यावरून दौडत गेला तर हे अंतर तीन हजार दोनशे सत्तावीस कोसांपेक्षा अधिक नाही. शिवाय आपण हे लक्षात की, मॅलॅम्ब्रूनोने मला सांगितले आहे, 'जेव्हा तुमच्यावरील जादू नाहीशी करणारा शिलेदार तुम्हाला सुदैवाने सापडेल, तेव्हा तुम्ही त्याला एक उमदा घोडा द्या. तो सुस्त नसावा तर चपळ आणि हिकमती असावा. नेहमी भाड्याने जी म्हातारी घोडी दिली जातात, त्यांच्यापेक्षा तरतरीत घोडा तुम्ही शिलेदाराला द्यावा. सुंदर मॅगलोनोला शौर्यशाली पीटर ऑफ प्रॉव्हेन्स याने ज्या लाकडी घोड्यावरून चोरून पळवून नेले, तसा तो असावा. त्याच्या कपाळावर लगामाऐवजी लाकडी खुंटी बसविलेली असावी. मग तो आकाशातून इतक्या त्वरेने उड्डाण करील की, जणु काही पाताळातली सारी पिशाच्चे त्याचा पाठलाग करीत आहेत किंवा त्याच्या शेपटीला आग लावीत आहेत. अशी घोडी साधू मर्लीन बनवीत असतो. आपल्या काही खास मित्रांनाच तो ती भाड्याने देतो किंवा चमचमीत मेजवानी मिळाली तर देतो. त्याच्या इतर मित्रांप्रमाणे प्रॉव्हेन्सच्या पीटरनेही

त्यांचेकडून एक घोडे उसने घेतले आणि त्याच्या अद्‌भुत वेगामुळे तो सुंदर मॅगॅलोनोला घोड्याच्या पाठीवर मागे बसवून पळवून नेऊ शकला. ते घोडे दोन माणसांना नेऊ शकत होते, हे लक्षात घ्या. त्या घोडयाने आकाशात एकदम उंच उडी मारली. त्यामुळे तो जेथून निघाला त्या स्थानाजवळ उभे असलेले सारे लोक 'आ' वासून आश्चर्याने टकमका पाहू लागले.

"त्या प्रवासानंतर त्याच्या पाठोपाठ कोणी गेल्याचे आम्ही ऐकले नाही. पण आम्हाला हे माहीत आहे की, त्यानंतर मॅलम्ब्रूनोने आपल्या कलेने ते घोडे मिळविले आणि जगाच्या सर्व भागात तो त्यावरून जाऊन आला. आज तो येथे असेल, तर उद्या फ्रान्समध्ये, आणि परवा अमेरिकेत ! घोड्याचा एक विशेष गुण असा की, ते संभाळ-ण्यासाठी एक पैचाही खर्च येत नाही. कारण, ते काही खात नाही की झोपत नाही की त्याला कधी नाल बसवावे लागत नाहीत. त्याला पंख नसले तरी ते आकाशातून इतक्या सहज गतीने चालू शकते की, तुम्ही आपल्या हातात पाण्याने भरलेला पेला घेऊन एक हजार लीग गेला, तरी पाण्याचा एक थेंब खाली पडणार नाही. म्हणून त्या सुंदर मॅगॅलोनाला त्याच्याबरोबर घोडयावरून प्रवास करणे फार फार आवडले."

सँको म्हणाला, "छे:, जलद वाहन म्हणाल तर माझा डॅपलच आहे. तो आकाशात उंच उड्डाण करू शकत नाही हे खरे. पण राजमार्गावर कोणताही चतुष्पाद प्राणी जितक्या जलदीने पळू शकेल, तितका तो जातो." हे ऐकून सारी मंडळी खो: खो: करून हसू लागली. पण ती हताश प्रौढा पुढे म्हणाली, "आमचे दुर्दैव समाप्त करण्याची इच्छा मॅलम्ब्रूनोला असेल तर अंधार पडल्यावर अर्ध्या तासाचे आत तो घोडा येथे येईल. माझा मोक्षभाता कोण आहे हे ओळखण्याची ती खूण आहे." सँकोने विचारले, "हा घोडा, प्रसंग पडला तर, एका वेळी किती माणसांना नेऊ शकेल ?" तिने उत्तर दिले, "दोन." एक खोगिरावर आणि दुसरा पाठीमागे. हे दोघे म्हणजे बहुधा शिलेदार व त्याचा सेवक असतात. हरण केलेली कोणी तरुणी नसेल, तर सेवक असतो." सँको म्हणाला, "सज्जन नि निराश बाईसाहेब, या तट्टाचे नाव जाणण्याची मला इच्छा आहे." तिने उत्तर दिले, "बेलेफोरोनचा पेगॅसस, अलेक्झांडरचा बुसेफॅलस, ओरलँडोचा ब्रिलॅडोरो, रिनाल्डोचा बेयर्ड, रोजेरोचा फ्रॉंटिन् बूटेस, किंवा पिरिथॉल असे काही सूर्याच्या घोड्यासारखे नाव त्या घोडयाचे नाही. तसेच रोड्रिगोच्या घोडयाप्रमाणे ओरेलिया असेही त्याचे नाव नाही. रोड्रिगो म्हणजे गॉथिक वंशातील स्पेनचा शेवटचा राजा. त्याने त्या दुर्दैवी दिवशी घोडयावरून पळ काढला आणि आपले युद्ध, आपले राज्य आणि आपले जीवित—हे सारे तो गमावून बसला." सँको म्हणाला, "मी पैजेवर सांगतो की, यांपैकी कोणतेही सुप्रसिद्ध नाव त्या घोडयाचे नाही. तसेच माझ्या धन्याच्या घोडयाचे रोझीनांट हेही त्याचे नाव नसले पाहिजे."

तेव्हा ती दाढीवाली स्त्री उत्तरली, "अगदी बरोबर ! त्याचे नाव अगदी समर्पक

आणि अर्थपूर्ण आहे. त्याला क्लॅव्हिलेनो म्हणतात. तसेच त्याच्या कपाळावर असलेल्या लाकडी खुंटीवरूट त्याला ' वेगवान् लाकडी खुंटी ' म्हणतात. रोझिनांटप्रमाणेच त्याचे नाव अर्थपूर्ण आहे. " सँको म्हणाला, " त्याच्या नावात मला काही दोष दिसत नाही, पण त्याच्यावर कसले खोगीर किंवा पट्टा तुम्ही ठेवता ? " तिने उत्तर दिले, " मी तुला पूर्वीच सांगितले आहे की, त्या खुंटीप्रमाणे तो चालतो. ती खुंटी इकडे किंवा तिकडे वळविली की, तो त्याप्रमाणे चालतो. कधी तो आकाशात उंच उड्डाण करतो किंवा कधी तो जमीनीवरून झाडीत जातो, नाही तर मधल्या मार्गाने तो उड्डाण करतो. आयुष्यातील सर्व गोष्टींमध्ये मधला मार्गच खरोखर पसंत केला पाहिजे. " सँको म्हणाला, " हा चिमणा देखणा घोडा पहाण्यास मला आनंद वाटेल, पण त्याच्या पाठीवर, मागे किंवा पुढे, बसण्याची मात्र मला मुळीच इच्छा नाही. कारल्याच्या वेलीपासून रसाळ द्राक्षाची अपेक्षा करण्यासारखे ते आहे, असे मी पवित्र कुमारी मातेची शपथ घेऊन सांगतो. रेशमासारखे मऊ मऊ खोगीर असताना, माझ्या स्वतःच्या डॅपलवर मी कसा बसा बसतो. मग माझ्या ढुंगणाखाली गादी किंवा बशी नसताना त्या कठीण लाकडी घोड्यावर मी कष्टाने बसणे ही एक क्षुद्र थट्टाच होईल. देशातील उत्तमोत्तम स्त्रीची दाढी काढून टाकण्यासाठीसुद्धा मी माझी बैठक हुळहुळी करून घेणार नाही. ज्यांना त्या दाढ्या चिकटल्या असतील त्यांनी त्या तशाच धारण कराव्यात, किंवा त्यांना योग्य वाटेल त्या मार्गाने त्या दूर कराव्यात. इतका लांबचा प्रवास मी माझ्या धन्याबरोबर कधीच करणार नाही. डल्सीनियाच्या प्रकरणी मी जसे लक्ष घातले तसे या दाढ्या कापण्याचे बाबतीत लक्ष घालण्याचे मला कारण नाही. " ट्रिफाल्डीने उत्तर दिले.

" महाराज, असे कसे होईल ? आपण लक्ष घालण्याची फार गरज आहे. तुमच्याशिवाय काहीच होणार नाही. " सँको म्हणाला, " ईश्वर राजाचे रक्षण करो ! आमच्या धन्याच्या साहसी कृत्याशी आम्हा सेवकांचा काय संबंध ? सारा त्रास भोगावा लागतो आम्हाला आणि सारे श्रेय घेऊन पळून जातात आमचे धनी ! जे लोक शिलेदारांच्या कथा लिहितात ते जर आपल्या ग्रंथात सेवकांना योग्य श्रेय देत असतील, तर त्याला काही अर्थ आहे. त्यांनी असे लिहावयास हवे, ' अमुक अमुक शिलेदाराने आपले साहसी कृत्य सिद्धीस नेले, पण ते आपल्या अमुक अमुक सेवकाच्या सहाय्याने. ते नसते, तर त्याला कधीच काही करता आले नसते. ' पण हे ग्रंथकार आपल्या इतिहासात फक्त इतकेच लिहितील की, " तीन चांदण्याचा शिलेदार सर पॅरलिपोमेनन याने सहा राक्षसांना ठार केले. ' त्याच्या सेवकाचा एका शब्दानेही उल्लेख त्या साऱ्या वृत्तांतात येत नाही. तो बिचारा सेवक सारा वेळ त्या शिलेदाराजवळ असला, तरी तेथे कोणीही माणूस नव्हता, असेच त्या इतिहासकारांना वाटते. सारांश, सज्जनहो, मी सांगतो की, हे मला आवडत नाही. मी पुनः म्हणतो, सँकोला सोडून माझ्या धन्याने एकट्यानेच जावे. त्यामुळे त्याला आनंद मिळेल. मी येथेच राहीन आणि डचेसबाईसाहेबांच्या संगतीत राहीन. माझा धनी परत येईल तेव्हा त्याला बहुधा असे आढळेल की, लेडी

डलसीनियाचे काम पुष्कळच पुढे गेलेले आहे. कारण जेव्हा मला दुसरे काही काम नसेल, तेव्हा मी माझ्याकडून शिकस्त करीन. ”

डचेस म्हणाली, “ अरे प्रामाणिक सँको, तसे जरी असले तरी, या साहसी कार्यात तू असणे अवश्य असेल तर तू गेले पाहिजेस. सारे सज्जन लोक तुला तशी विनंती कर्तव्य–बुद्धीने करतील. केवळ तुझ्या पोकळ भीतीमुळे त्या बिचाऱ्या स्त्रियांची तोंडे अशी खडबडीत आणि केसाळ राहिली तर ते फार वाईट दिसेल. ” सँको म्हणाला, “ ईश्वर राजाचे रक्षण करो, असे मी पुन्हा म्हणतो. कोणा सज्जन नि विचारी सभ्य स्त्रीच्या अथवा दवाखान्यातील निष्पाप मुलीच्या संरक्षणासाठी असे औदार्य दाखवावयाचे असते, तर त्या दृष्टीने काही बोलता आले असते. पण रिकामटेकड्या भटक–भवानी-साठी मी आपली बैठक सुजवून घेणे आणि माझी मान धोक्यात घालणे हे विचित्र आहे. त्यांनी आपली दाढी काढून घेण्यासाठी न्हाव्याकडे कोठेही जावे, पण मी त्यांच्या दाढ्या नाहीशा व्हाव्यात म्हणून काहीही करणार नाही. त्यांच्यातील वरिष्ठापासून कनिष्ठापर्यंत आणि गर्विष्ठांपासून लोचटापर्यंत– त्या साऱ्या स्त्रियांच्या तोंडयाने दाढ्या धारण केल्या आणि त्यामुळे त्या मेंढ्यासारख्या दिसू लागल्या, तर त्यांना तसे पाहण्यात मला आनंद वाटेल. ” डचेस म्हणाली, “ सँको, तू दासींवर फार रागावलेला आहेस. तुझ्या अंगी काही औषधामुळे हा कडवटपणा आलेला दिसतो. पण मित्रा, त्याबद्दल तुलाच दोष दिला पाहिजे. कारण माझ्या कुटुंबात अशा काही दासी आहेत की, इतर दासींना त्या चातुर्याच्या आदर्श वाटतील. येथे असलेली डोन्ना–रोड्रिगेझ ही मला हेच सांगावयास लावील. ” डोन्ना रोड्रिगेझ म्हणाली, “ वा, वा ! बाईसाहेब आपल्या इच्छेस येईल ते आपण सांगावे. ज्या जगात आपण राहतो ते निंदकांचे आहे. पण प्रभू सर्वांना जाणतो. आम्ही दासीजन भल्या–बुऱ्या किंवा दाढीवाल्या वा बिनदाढीवाल्या कशाही असो, इतर स्त्रियांप्रमाणे आम्हालाही आया होत्या. आम्ही जशा आहो तशा परमेश्वराने घडविलेल्या आहो. त्यानेच आम्हाला या जगात आणून सोडले आहे. का ते त्यालाच माहीत. त्याच्या दयेवर आमचा विश्वास आहे – कोणाच्याही दाढीवर नाही. ”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “ पुरे, डोन्ना रोड्रिगेझ, लेडी ट्रिफाल्डी आणि इतर संत्रस्त प्रौढा हो, तुमच्या दुःखाकडे प्रभू करुणापूर्ण दृष्टी लवकरच टाकील अशी मला आशा आहे आणि सँको माझ्या इच्छेप्रमाणे वागेल. माझी इच्छा इतकीच आहे की, क्लॅव्हिलेनोने एकदा येथे यावे म्हणजे मी मॅलम्ब्रूनोशी सामना देईन. कारण मला खात्री आहे की, तुम्हा स्त्रियांची दाढी कापून टाकण्यात वस्तरा जितका झटपट काम करील, त्यापेक्षा माझी समशेर त्या राक्षसाचे मुंडके त्याच्या खांद्यावरून लौकर उडवील. ईश्वर दुष्ट लोकांना काही काळ सवलत देतो, पण कायमचीच देत नाही. ”

ती हताश प्रौढा म्हणाली, “ हे अत्यंत पराक्रमी वीर पुरुषा ! आमच्या दुर्दैवी व्यवसायाला पाठिंबा देण्यास आपले औदार्य आणि शौर्य सिद्ध झाले आहे, तेव्हा त्यावर स्वर्गलोकातील सर्व तारांगणांनी आपली पुण्याई अर्पण करावी. हुजऱ्यांनी आणि

शागीर्दांनी आमच्या व्यवसायाची उगाच निंदानालस्ती केली आहे आणि वैदूनी विषारी द्वेष फैलावला आहे. आता एखाद्या भित्र्या राणीने आपल्या ऐन तारुण्यात दासीपेक्षा-जोगीण होण्याचे ठरविले नाही, तर ते तिचे दुर्दैव म्हटले पाहिजे. वास्तविक आम्ही दासी साक्षात ट्रॉयच्या हेक्टरपासून आनुवंशिक परंपरेने जन्मास आलेलो आहे. तरी आम्हाला एकाकी नि तुच्छ जीवन जगावे लागते. एखादे राज्य मिळत असले तरी, तुमच्यापेक्षा अधिक सभ्यतेने स्त्रियांनी आमच्याशी बोलणे चांगले नव्हे काय ? अरे पराक्रमी मॅलॅम्ब्रूनो, तू जादूगार असलास तरी आपला शब्द पाळणारा आहेस. म्हणून त्या अप्रतिम क्लॅव्हिलेनोला आमच्याकडे पाठव म्हणजे आमचे दुर्दैव समाप्त होईल. कारण, आता आहे त्यापेक्षा हवा जर अधिक गरम झाली आणि या खडबडीत दाढ्य आमच्या तोंडावर फोफावत गेल्या, तर आमची किती शोचनीय अवस्था होईल !"

त्या निराश स्त्रीने हा विलाप इतक्या करुण स्वराने केला की, तेथील सर्व प्रेक्षकांच्या डोळ्यात ती गाऱ्हाणी ऐकून अश्रू उभे राहिले. सँकोनेसुद्धा अश्रु ढाळण्यास सुरुवात केली आणि शेवटी त्या मोहिमेत भाग घेण्याचे त्याने मोठ्या मेहेरबानीने कबूल केले. त्या दासींच्या पूज्य मुद्रांवर पसरलेले तण साफ करण्याचे कामी आपला काही हात-भार लागावा म्हणून, आपल्या धन्याची सेवा जगाच्या शेवटच्या टोकाशी जाईपर्यंत करण्याचे त्याने मान्य केले.



प्रकरण ४१

# क्लॅव्हिलेनो (ऊर्फ लाकडी खुंटी) चे आगमन आणि या कंटाळवाण्या मोहिमेची समाप्ती

असे संवाद चालू असताना रात्र पडली– आणि त्याबरोबरच सुप्रसिद्ध क्लॅव्हिलेनोच्या आगमनाची नियोजित वेळही आली. त्याला येण्यास विलंब लागल्यामुळे डॉन क्विक्झोट अत्यंत अस्वस्थ झाले होते. त्यांना अशी भीती वाटू लागली की, या साहसी कार्यासाठी राखून ठेवलेले शिलेदार आपण नाही की काय? अथवा त्या धिप्पाड मॅलॅम्ब्रूनोला आपल्याशी एकाकी सामना देण्याचे धैर्य नाही काय? पण अनपेक्षितपणे त्या उद्यानात हिरव्यागार वेलींनी सर्वांग आच्छादिलेली चार जंगली माणसे येऊन टपकली. त्यांच्या खांद्यावर एक मोठा लाकडी घोडा होता. तो त्यांनी त्या लोकांसमक्ष डॉनच्या पायाजवळ ठेवला. नंतर त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, "ज्याचे अंगी धैर्य असेल, त्याने या यंत्रावर आरूढ व्हावे." सँको मध्येच उद्गारला, "मी तो नाही. माझ्याजवळ धैर्य नाही आणि मी शिलेदार पण नाही." तो जंगली माणूस पुढे बोलू लागला, "त्या धैर्यशाली माणसाजवळ त्याचा सेवक असेल, तर त्याला त्याने आपल्या पाठीमागे बसवावे. पराक्रमी मॅलॅम्ब्रूनोचे अभिवचन असे आहे की, काही कपट केले जाणार नाही आणि मी त्याच्यावर तलवारीशिवाय दुसऱ्या कशानेही आघात करणार नाही. आता फक्त तुम्ही ही खुंटी पिळावयाची की लगेच हा घोडा तुम्हाला आकाशातून घेऊन जाईल आणि जेथे मॅलॅम्ब्रूनो तुमच्या आगमनाची वाट पहात आहे, तेथे नेऊन सोडील. पण तुम्ही आपले डोळे घट्ट बांधून टाका. नाही तर प्रचंड उंचीवरून होणाऱ्या तुमच्या प्रवासाच्या झगमगाटामुळे तुम्हाला चक्कर येईल. आपल्या प्रवासाच्या मुक्कामाला आपण येऊन पोचलो हे तुम्हाला या घोड्याच्या खिंकाळण्यावरून कळून येईल." असे भाषण केल्यानंतर तो जंगली माणूस आपल्या सोबत्यासह पाठ वळवून निघाला आणि क्लॅव्हिलेनोला तेथे सोडून ते सर्वजण आलेल्या वाटेने ऐटीने परत गेले.

हताश प्रौढेने त्या घोड्याकडे पाहिले आणि डोळ्यांत अश्रु आणून डॉन क्विक्झोट यांना ती म्हणाली, "शूर शिलेदारजी, मॅलॅम्ब्रूनो हा आपले वचन पाळणारा माणूस आहे. घोडे येथे आहे आणि आमच्या दाढ्या वाढत आहेत. म्हणून मी आणि आमच्यापैकी प्रत्येकजण, आपल्या हनुवटीवरील साऱ्या केसांची शपथ घेऊन, आपली विनवणी करतो की, आम्हाला लौकर सोडवा. कारण त्यासाठी दुसरे काही करावयास नको.

फक्त तुम्ही आणि तुमच्या सेवकाने उठून आपल्या संकल्पित प्रवासाचा शुभारंभ करावा." डॉन क्विक्झोट उत्तरले," बाईसाहेब, मी तसे अगदी मनापासून करीन. गादीसाठी किंवा टाच मारण्यासाठी मी क्षणभरही थांबणार नाही. मी घोडयावर तत्काळ स्वार होईन. कारण, बाईसाहेबांचा चेहरा दाढीविरहित करण्यास आणि तुम्हा सर्वांना पूर्वीचे सौंदर्य पुनः प्राप्त करून देण्यास मी अत्यंत उत्सुक आहे. " सँको म्हणाला, " हे नाही माझ्या हातून होणार ! मला इतकी द्राड घाई सुटलेली नाही. त्या घोड्याच्या खडबडीत पाठीवर मी बसलो नाही म्हणून या बायांच्या तोंडावरील झपाट्याने वाढणारे जंगल तुटणार नसेल, तर माझ्या धन्याने दुसरा सेवक खुशाल घ्यावा आणि या बायांनी कोणी तरी न्हावी मिळवावा. केरसुणीवर बसून या वेगाने आकाशातून उड्डाण करणारा मी कोणी जादूगार नाही ! एखाद्या कागदी पतंगाप्रमाणे आपले राज्यपाल हवेत उडत चालले आहेत, हे ऐकून माझ्या बेटावरील प्रजाजन काय म्हणतील, याचा विचार तुम्ही केला आहे काय ? शिवाय येथून कँडाया तीन-चार हजार कोस दूर आहे. वाटेत घोडे थकले तर काय ? किंवा त्या धिप्पाड माणसाने आमची चेष्टा केली तर आमचे काय होईल ? आम्हाला परत येण्यास सात वर्षे लागतील. तोपर्यंत माझ्या राज्याचे काय होईल, हे देव जाणे ! माझे बेट किंवा ओसाड मैदान या बिचाऱ्या सँकोची पुनः ओळख ठेवणार नाही. छेः छेः, मला यापेक्षा दुसऱ्या चांगल्या गोष्टी करावयाच्या आहेत. ती जुनी म्हण आहे ना ? ' विलंब झाला की धोका आला, ' ' तुम्हाला कोणी एखादी गाय दिली, तर तिला दाव्याने बांधून तत्काळ पळून जा. ' या सभ्य स्त्रियांचा मी एक नम्र सेवक आहे, पण त्यांनी नि त्यांच्या दाढ्यांनी मला क्षमा करावी. ' सेंट पीटर रोममध्येच असणे चांगले. ' याचा अर्थ असा की, येथे माझे चांगले चालले आहे आणि येथील घर-मालकाच्या सदिच्छेने मी राज्यपाल होईन अशी मला आशा वाटते. "

ड्यूक म्हणाला, " मित्रा सँको, तुझ्या बेटाविषयी म्हणशील तर ते पाण्यावर तरंगत नाही की हलत नाही. म्हणून तू परत येईपर्यंत ते कोठे पळून जाण्याची भीती नाही. अगदी खोल खोल भू-गर्भात त्या बेटाची पाळेमुळे पक्की रोवलेली आहेत. आता तुला हे कळले पाहिजे की, कोणतेही महत्त्वाचे अधिकारपद या ना त्या प्रकारची लाच किंवा खुशी दिल्याशिवाय मिळू शकत नाही. या राज्यावर तुला आरूढ करण्यासाठी माझी अपेक्षा एवढीच आहे की, या मोहिमेत तू आपल्या धन्याची सेवा करावीस म्हणजे या संस्मरणीय साहसी कार्याचा शेवट होईल. मी तुला प्रतिज्ञेवर सांगतो की, तू क्लॅव्हिलेनोवरून अत्यंत वेगाने परत आलास— अथवा दुर्दैवाने एखाद्या यात्रेकरूप्रमाणे तुला दारोदार भीक मागत पायी परत यावे लागले—या खाणावळीतून त्या खाणावळीत जात जात तू परत आलास— तर तू आपले बेट जेथे सोडलेस तेथेच ते असल्याचे तुला आढळेल आणि त्या बेटावरील प्रजाजन आपले राज्यपाल म्हणून तुझे स्वागत अत्यंत आनंदाने करतील. श्रीमान् सँको, माझ्यापुरते विचारशील तर, मी तुला इष्ट ते करण्यास सिद्ध आहे की नाही याविषयी तू आपल्या मनात तिळमात्र शंका बाळगलीस, तर तू

माझ्या मैत्रीवर फार मोठा अन्याय केला आहेस असे मी खचित समजेन." सँको म्हणाला, "पुरे, पुरे, महाराज. अधिक काही बोलू नका. मी केवळ एक पामर सेवक आहे, आपल्या सौजन्याचा भार मी सहन करू शकत नाही. पण खड्ड्यात जाऊ द्यात या साऱ्या क्षुल्लक गोष्टी. धनीसाहेब ,चढा घोड्यावर. कोणी तरी माझे डोळे बद्ध बांधा आणि माझा प्रवास सुखाचा होवो अशी प्रार्थना करा. पण सज्जनहो, मला एक सांगा, मी जेव्हा घोड्यावर बसेन आणि आकाशातून उडत जाईन, तेव्हा मी प्रार्थना म्हणू नये काय ? आणि माझ्या सहाय्यासाठी देवदूतांचा धावा करू नये काय ?"

ट्रिफाल्डीने उत्तर दिले, "होय, होय, तू खुशाल प्रार्थना म्हण आणि धावा कर. कारण मॅलॅब्रनो मांत्रिक असला तरीही ख्रिश्चन आहे. तो साऱ्या गोष्टी मोठ्या शहाणपणाने करतो. ज्याच्याशी आपला संबंध नाही, त्यामध्ये तो लुडबुड करीत नाही." सँको म्हणाला, "चला तर मग. प्रभू आणि गेईटा ( चर्च ) येथील पवित्र त्रिमूर्ती मला सहाय्य करोत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे सँको, एखाद्या भोळ्या माणसाला तुझी भीती अशुभ वाटेल. पिठाच्या गिरणीवरील मोहिमेपासून आतापर्यंत मी तुला इतका भयभीत झालेला कधीच पाहिले नाही. पण ऐक, या थोर मंडळींच्या परवानगीने मी तुझ्याशी काही खाजगी बोलणार आहे." नंतर त्या उद्यानाच्या दूरच्या भागात जाऊन व झाडाखाली उभे राहून ते म्हणाले, "प्रिय सँको, आपण एका मोठ्या प्रवासावर निघणार आहोत हे तू जाणतोस. आपण परत येण्याची खात्री किती आहे हेही तू जाणतोस. त्या साऱ्या काळात आपल्याला किती सवड किंवा सोय सापडेल हे फक्त देवच सांगू शकेल. म्हणून मी तुला विनवून सांगतो की, जणू काही आपल्या प्रवासासाठी तयार होण्याकरता म्हणून तू आपल्या खोलीत सटकावेस आणि जे तीन हजार तीनशे फटके घेण्याचे तू कबूल केले आहेस त्यातील फक्त पाचशे फटके तू तत्काळ खावेस. हे काम ताबडतोब होऊन जाईल. 'कोणत्याही कामाची नामी सुरुवात, म्हणजे अर्धी अधिक मात,' हे तू जाणतोसच." सँको ओरडला, "ठार वेडे आहा, तुम्ही महाराज ! तुम्हाला असे सांगताना शरम कशी वाटत नाही, यांचे मला नवल वाटते—'मला झाली आहे घाई आणि तुम्ही मागता माझी डोई' या म्हणीसारखेच तुमचे बोलणे आहे. मी त्या लाकडी घोड्यावर आताच स्वार होणार आहे आणि तुम्ही इच्छा धरता माझ्या पाठीची सालडी काढण्याची ! खरोखर, यावेळी तुमचे डोके अगदी फिरले आहे. महाराज, असे पाहा, एकामागून एक गोष्ट आपण करू या. आधी आपण या बायांच्या दाढ्या काढून टाकू या आणि मग मी डल्सीनियासाठी सारे फटके खाईन. यासंबंधी सध्या मला अधिक काही बोलावयाचे नाही." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "अरे, सच्चा सँको, मी तुझ्या शब्दावर एकदा विश्वास ठेवतो. तू आपले शब्द खरे करशील अशी मला आशा आहे. कारण, तू दुष्ट नसून मूर्ख आहेस असा माझा विश्वास आहे." सँको म्हणाला, "मी जो काही आहे तो आहे. मी कोणीही असेना का, मी माझा शब्द पाळीन. तुम्ही त्याची भीती बाळगू नका."

एवढे बोलून ते दोघे आपल्या मंडळीत परत आले. घोडयावर स्वार होण्याच्या ऐन सुमारास डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, आपले डोळे बांध आणि घोडयावर चढ. ज्याने आपल्यासाठी हा घोडा इतक्या दूर पाठविला, त्याच्या मनात आपल्याला फसविण्याचा डाव असणे मुळीच शक्य नाही. त्याच्या सन्मान्य शब्दावर जे लोक विसंबून आहेत, त्यांना फसविणे हे श्रेयस्कर होणार नाही. आपल्या इच्छेस अनुरूप असे यश जरी आपल्याला लाभले नाही, तरी एवढा पराक्रमी प्रयत्न केल्याची कीर्ती आपल्याला नक्की लाभेल. आणि तिला ग्रहण लावण्याचे सामर्थ्य कोणाही मत्सरी माणसाच्या अंगी असणार नाही." सँको ओरडला, "घोड्याकडे चला महाराज, घोड्याकडे चला. त्या दाढीवाल्या बिचाऱ्या स्त्रियांच्या आसवांनी माझे हृदय विरघळून गेले आहे. माझ्या हृदयाला त्यांच्या दाढीचे केस चिकटले आहेत असे मला वाटते. त्यांच्या हनुवटी पूर्वीइतक्या गुळगुळीत होईपर्यंत आणि त्यांचे ओठ मऊ होईपर्यंत मी अन्नाचा एक कण खाणार नाही. म्हणून मी म्हणतो महाराज, घोडयावर स्वार व्हा आणि प्रथम आपण स्वतः आपले डोळे घट्ट बांधा. मी जर पाठीमागे बसणार आहे, तर माझ्याआधी आपण घोडयावर चढले पाहिजे हे सरळच आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे बरोबर आहे." असे म्हणून त्यांनी आपल्या खिशातून हातरुमाल काढला आणि आपले डोळे घट्ट बांधण्यासाठी हताश प्रौढेच्या हाती दिला. तिने तसे केले. पण तत्काळ आपले डोळे मोकळे करून डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझी आठवण बरोबर असेल तर, आम्ही व्हर्जिलच्या काव्यात ट्रॉयच्या पॅलेडियमसंबंधी असे वाचले आहे की, सशस्त्र शिलेदारांनी संपन्न असलेल्या पॅलेसला ग्रीक लोकांनी जो लाकडी घोडा अर्पण केला, तो त्या प्रसिद्ध नगरीच्या पूर्ण विध्वंसाला पुढे कारणीभूत झाला. म्हणून या घोडयाच्या अंतरंगात शिरून त्याच्या पोटात काय आहे हे आपण त्याच्यावर आरूढ होण्यापूर्वी पाहणे शहाणपणाचे ठरेल." सरदारीण ट्रिफाल्डी म्हणाली, "तुम्ही तसे करण्याची काही गरज नाही. असे तर्क–कुतर्क करण्याला काहीच जागा नाही असे मी खात्रीने सांगते. कारण मॅलॅम्ब्रूनो हा एक सन्माननीय माणूस आहे. तो कोणताही नीच किंवा विश्वासघातकी प्रकार होऊ देणार नाही. जर तुमच्यावर काही अरिष्ट कोसळले तर त्याला जबाबदार मी आहे." तेव्हा डॉन क्विक्झोट काही उत्तर न देता घोडयावर चढले. आपल्या सुरक्षिततेबद्दल आपण अधिक आग्रह धरला तर ते आपल्या शौर्याला कमीपणाचे ठरेल असे त्यांना वाटले. म्हणून त्यांनी खुंटी पिळण्यास सुरवात केली. ती सहज पिळली गेली. रिकिबी नसल्यामुळे आपले लांब पाय त्यांनी दूरवर ताणून ते बसले होते. त्यामुळे जुन्या वेलबुट्टीच्या वेषातील एखाद्या प्राचीन विजयी रोमन वीराच्या आकृतीप्रमाणे ते दिसत होते.

त्यांच्यामागून सँकोला नाखुषीने आणि मोठ्या कष्टाने घोड्यावर चढावे लागले. घोडयाच्या पट्टयावर तो कसाबसा बसला, तेव्हा त्याला मोठे अवघड वाटले. म्हणून ड्यूककडे पहात तो म्हणाला, "महाराज, मला बसावयाला काही द्याल काय? आपल्या नोकराच्या बिछान्यावरील उशी किंवा डचेसची वैभवशाली गिरदी अथवा तशीच

कोणतीही मऊ वस्तू चालेल. कारण या घोड्याची पाठ इतकी खडबडीत आहे की, ती लाकडाची नसून संगमरवरी दगडाची आहे असे मला वाटते." सरदारीण म्हणाली, "त्याची काही गरज नाही. कारण क्लॅव्हिलेनोला आपल्या अंगावर काही सामानसुमान ठेवलेले खपत नाही. म्हणून सँको, तू बायकाप्रमाणे एका बाजूला पाय सोडून बैस म्हणजे तुला मोठा आराम वाटेल." सँकोने तिचा सल्ला ऐकला आणि सर्व मंडळींचा निरोप घेतला. त्यांनी त्याच्या डोळ्यावर कापडाचा एक तुकडा बांधला, पण तत्काळ तो वर उचलून सँको अश्रुपूर्ण नेत्रांनी सर्व प्रेक्षकाकडे करुण दृष्टी टाकीत म्हणाला, "अहो सज्जन आणि कोमलहृदयी ख्रिश्चनांनो, आपला बंधू आता येथून चालला आहे, त्याच्यासाठी तुम्ही प्रभूपाशी आणि मेरीपाशी थोडी प्रार्थना करा. तुम्ही अशा परिस्थितीत असता तर अशीच करुणा भाकली असती." डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे बदमाषा, काय हे? आपण आता फाशीच्या फळीकडे चाललो आहो आणि मृत्यूच्या दाढेत शिरत आहो असे तुला वाटते काय? आणि म्हणून तू अशा शोकपूर्ण स्वरात विलाप करीत आहेस काय? अरे भित्र्या दुष्ट माणसा, अरे निर्जीव प्राण्या, तुला हे माहीत नाही का की, सुंदर मॅगलोना एकदा तुझ्याच जागी बसली होती आणि तेथून ती जेव्हा खाली उतरली तेव्हा ती फ्रान्सच्या सिंहासनावर चढली– थडग्यात गेली नाही. इतिहास जर काही खरा असेल तर हे मानलेच पाहिजे. पण पाजी माणसा, तुझे काळीज सशाचे आहे. अरे, मी तुझ्याजवळ बसलेलो नाही का? प्रॉव्हेन्सच्या पराक्रमी पीटरशी मी स्पर्धा करीन. त्याने जे हे स्थान पूर्वी बसून दाबले असेल, तेच आता मी दाबून येथे बसलो आहे. अरे चैतन्यशून्य जनावरा, चल आपले डोळे बांध. निदान माझ्यासमोर तरी भीतीचे अणुमात्र चिन्ह तू व्यक्त केलेले मला दिसता कामा नये." सँको म्हणाला, "ठीक आहे. बांधा माझ्या डोळ्यावर झापडे. पण तुम्ही कोणाला प्रार्थना म्हणून देत नाही किंवा त्याच्यासाठी दुसऱ्याला प्रार्थना म्हणू देत नाही, म्हणून मला जर भीती वाटली, तर त्यात काही नवल नाही. मला हे नक्की माहीत आहे की, आपल्याला लवकरच बांधून सैतानाच्या मुखात फेकून देण्यासाठी पिशाच्चाच्या पलटणी आपल्या भोवताली जाणार आहेत."

दोघांचेही डोळे बांधले गेले. प्रवासाची सारी सिद्धता झाली आहे, असे डॉन क्विक्झोट यांना दिसले. म्हणून त्यांनी खुंटी पिळण्यास सुरवात केली. तिच्यावर त्यांनी आपला हात ठेवला न ठेवला तोंच, त्या दासी आणि ती सारी मंडळी आपला घसा खरडून ओरडली, "शूर शिलेदारजी, दौडा, दौडा. वेगाने दौडा. निर्भय सेवका, तुझा वाटाड्या प्रभूच असो. आता तुम्ही उंचउंच उड्डाण करणार. एखाद्या बाणापेक्षाही अधिक त्वरेने ते हवा कापीत कसे जातात हे पाहा. आता ते चढले– वर चढले– उंच गेले– भरारी मारू लागले. त्यांच्या प्रयाणाकडे सारे जग आश्चर्याने टकमका पहात आहे. अरे धैर्यवान सँको, घट्ट बैस, घट्ट बैस. तू स्थिर बसला नाहीस. खाली न पडण्याची काळजी घे. डोळे फिरविणाऱ्या त्या उंचीवरून तू खाली पडलास तर, सूर्याचा रथ भलत्या

मार्गाला नेणाऱ्या महत्त्वाकांक्षी तरुणापेक्षा तुझा अधःपात मोठा होईल." हे सारे सँकोने ऐकले आणि आपल्या धन्याच्या कमरेला त्याने आपल्या हाताचा घट्ट विळखा घातला व तो म्हणाला, "महाराज, आपल्याला त्यांचे आवाज ऐकू येत आहेत, तरी ते म्हणतात, आपण फार उंच गेलो आहो हे कसे काय? खरोखर त्यांचे शब्द मला इतक्या स्पष्टपणे ऐकू येत आहेत की, ते आपल्याजवळच आहेत असे एखाद्याला वाटावे." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "तिकडे लक्ष देऊ नकोस. अशा अलौकिक उड्डाणामध्ये आपले श्रवणेंद्रिय आणि दर्शनेंद्रिय हीही अलौकिकच असणार असे आपण समजले पाहिजे. पण मला इतके घट्ट धरू नकोस, नाही तर तू मला खाली पाडशील. अरे, पण तुला इतके थरथरा कापायला काय झाले? मला तर वाटते, माझ्या साऱ्या आयुष्यात मी इतक्या सुखाने घोड्यावरून कधीच प्रवास केला नाही. आपला घोडा तर असा चालला आहे की, जणू काही तो जागचा मुळीच हलत नाही असे वाटावे. म्हणून धीर धर. आपण आंदोलने घेत जाऊ आणि मोठ्या मजेने प्रवास करू." सँको म्हणाला, "मलाही तसेच वाटते. माझ्या पाठीशी कितीतरी भाते वाऱ्याचे झोत सोडीत आहेत असे मला वाटते. माझ्या अंगावर वारा कसा झपाट्याने येत आहे." सँकोचे म्हणणे मुळीच चुकीचे नव्हते. कारण त्यावेळी दोन-तीन भाते खरोखरच त्याच्या दिशेने लावले होते व त्यातून विपुल वारे सुटले होते. ड्यूक, डचेस आणि त्यांचा कारभारी यांनी या मोहिमेचा सारा व्यूह इतका कौशल्याने रचला होता की, विनोदासाठी आणखी कशाचीही गरज नव्हती.

शेवटी आपल्या अंगाला वारा झोंबत आहे असे पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "खात्रीने आपण वातावरणाच्या मध्यभागी आलो असलो पाहिजे. वारे, तुफाने, बर्फ, मेघांचा गडगडाट, विजेचा लखलखाट आणि आकाशातील इतर उत्पात येथेच निर्माण होतात. अशाच वेगाने आपण वर चढत गेलो तर लवकरच आपण अग्नि-प्रदेशात प्रवेश करू. तेथे आपण जिवंतपणी होरपळून-भाजून जाऊ नये म्हणून ही खुंटी कशी फिरवावी हे मला माहीत नाही, ही दुःखाची गोष्ट होय." याचवेळी काही दाहक पदार्थ तागामध्ये घालून तयार ठेवलेले होते. ते एका लांब काठीच्या टोकाला बांधले गेले आणि त्यांना आग लावली गेली. शिलेदारजी व सेवक यांच्या नाकापासून ही आग थोड्याच अंतरावर असल्यामुळे तिची धग व धूर त्या दोघांना जाणवली. सँको म्हणाला, "आपण म्हणता त्या अग्नि-प्रदेशात किंवा त्याच्या अगदी जवळ आपण खचित येऊन पोहोचलो आहोत. हे खोटे असेल तर मला फाशी द्या. माझी अर्धी दाढी केव्हाच होरपळून गेली आहे. या झापडातून डोकावून पहाण्याची आणि आपण कोठे आहो हे समजून घेण्याची मला फार मोठी इच्छा आहे."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "तसे मुळीच करू नकोस. डॉक्टर टोरॅल्व्हाची विचित्र पण खरी गोष्ट मला आठवते. त्याला सैतानाने डोळे बांधून आणि एका बोरूवर बसवून बारा तासात नोनाच्या बुरुजावर आणून सोडले. त्या शहरातील एका रस्त्यावर तो बुरुज

होता. तेथे बोर्बानच्या सेनापतीवर हल्ला होऊन त्याला ठार करण्यात आल्याचे आणि त्यामुळे भयंकर गोंधळ माजल्याचे त्याने पाहिले व दुसरे दिवशी सकाळी आपण माद्रीद-मध्ये आहो असे त्याला आढळले. तेथील लोकांना त्याने तो सारा वृत्तांत सांगितला. त्यात त्याने असेही सांगितले की, "मी आकाशातून जात असताना सैतानाने मला डोळे उघडण्याचा हुकूम केला. म्हणून मी तसे केले तेव्हा मला आढळले, मी चंद्राच्या इतक्या जवळ आहे की, मी माझे बोट त्याला लावू शकेन. पण मी पृथ्वीकडे पाहण्यास धजलो नाही. नाही तर त्या महान अंतरामुळे माझे डोके गरगरा फिरावयास लागले असते." म्हणून सँको, आपण आपले डोळे मोकळे करता कामा नये. आपण ज्याच्या ताब्यात आहो त्याच्या योजनेवर आणि दक्षतेवर आपण पूर्णपणे विश्वास ठेवला पाहिजे. अरे, तू मुळीच भिऊ नकोस. कारण आपण उंच उंच जात आहोत ते केवळ कँडायाच्या राज्यात एखाद्या बहिरी–ससाण्याप्रमाणे वेगाने खाली उतरण्यासाठी. आपण तेथे लवकरच पोहोचू. आपण त्या उद्यानातून निघून अर्धाच तास झाला आहे असे जरी वाटत असले, तरी आपण आकाशातील विस्तीर्ण पट्टा ओलांडला आहे." सँकोने उत्तर दिले, "त्यातले मला काही कळत नाही. मला एवढेच पक्के कळते की, तुमची ती मॅडम मॅगूलेन किंवा मॅगॅलोना (तिला तुम्ही कोणत्या नावाने हाक मारता?) या लाकडी भिकार जागेवर, चांगली उशी खाली न घेता, बसली असेल, तर माझ्यापेक्षा तिचे ढुंगण अधिक कठीण असले पाहिजे."

त्यांचा हा संवाद ड्यूक, डचेस आणि इतर मंडळी या सर्वांना आनंददायक वाटत होता. अखेरीस या विलक्षण मोहिमेचा शेवट करण्याचे ठरवून त्यांनी आपल्या एका सेवकाला आज्ञा केली, "कॅव्हिलेनोच्या शेपटीला आग लाव." (आतापर्यंत या मोहिमेने त्यांची चांगली करमणूक केली होती.) त्या घोडयाच्या पोटात फटाके, भुइनळे वगैरे दारूकाम ठासून भरलेले होते. आग लागताच त्याचा स्फोट झाला आणि प्रचंड आवाज होऊन घोडयाचे तुकडे तुकडे झाले. शिलेदारजी एका बाजूला पडले आणि त्यांचा सेवक दुसऱ्या बाजूला आदळला. दोघेही पुरेसे होरपळून निघाले होते. हे होईपर्यंत ती निराश मेट्रन आणि ती दाढीवाली पलटण त्या बागेतून अदृश्य झाली होती. बाकीच्या लोकांनी मूर्च्छित पडल्याचे सोंग केले व ते जमिनीवर उताणे पडले. डॉन क्विक्झोट व सँको यांना भयंकर भाजले होते. त्यांनी उठण्याचा प्रयत्न केला आणि आजूबाजूस पाहिले. ज्या बागेतून आपण घोडा घेतला, तेथेच आपण आहोत आणि कैक माणसे जमिनीवर मरून पडलेली आहेत असे पाहून ते आश्चर्यचकित झाले. पण त्यांचे आश्चर्य एका मोठ्या भाल्याने खेचून घेतले. तो भाला जमिनीत पुरलेला होता आणि त्याच्या टोकाला दोन हिरव्या रेशमी दोऱ्यांनी एका पांढऱ्या चर्म–पटाची गुंडाळी घट्ट बांधलेली होती. त्या चर्म-पटावर सोनेरी अक्षरात पुढील लेख लिहिलेला होता—

ला मांचा येथील सुविख्यात शिलेदार डॉन क्विक्झोट यांनी सरदारीण ट्रिफाल्डी (अन्यथा निराश मेट्रन) आणि तिच्या सख्या यांना संकटातून मुक्त करण्याचा प्रयत्न

करून त्यांचे दुःख-निवारण केले. त्यामुळे मॅलॅम्ब्रूनोला पूर्ण संतोष वाटत आहे. दासी-जनांच्या दाढ्या गळून पडल्या. राजे क्लॅव्हिजो आणि राणी ॲन्टोनोमॅसिया यांना आपले पूर्वीचे स्वरूप पुन्हा प्राप्त झाले. सेवकाची तपश्चर्या जेव्हा पुरी होईल तेव्हा त्या सुंदरीचा पिच्छा पुरविणाऱ्या दुष्ट ससाण्याच्या तावडीतून श्वेत कबूतर बाहेर पडेल आणि तिच्या-साठी झुरणारा तिचा प्रियकर तिला आपल्या बाहूत घेऊन शांतपणे झोपवील. सर्व मांत्रिकातील श्रेष्ठ मांत्रिक साधु मर्लिन याने हे सारे पूर्वीच नियोजित केलेले आहे."

हा दिव्य लेख वाचल्यावर डॉन क्विक्झोट यांना असे वाटले की, डल्सीनियावरील जादूचा प्रयोग नष्ट करण्याशी याचा संबंध असावा. तिची संकटातून मुक्तता केल्याबद्दल त्यांनी परमेश्वराला धन्यवाद दिले आणि ते ड्यूक व डचेस यांचेजवळ गेले. अद्याप ते मूर्च्छित आहेत असे त्यांना दिसले. म्हणून ड्यूकचा हात धरून ते म्हणाले, "उदार महाराजा, धैर्य दाखवा. आता संकट कोठे आहे ? रक्तपात न करता ही मोहीम यशस्वी झाली आहे. तिची नोंद त्या चर्मपटावर केलेली आपण वाचू शकाल."

गाढ झोपेतून जागे झाल्याप्रमाणे ड्यूकने जांभई दिली आणि आळोखेपिळोखे दिले. हळूहळू आपण शुद्धीवर आल्याचे भासविले. डचेसनेही तसेच केले-आणि इतर मंडळींनीही. त्या सर्वांनी आपल्याला आश्चर्य वाटल्याचा अभिनय इतका बेमालूम केला की, एकंदर प्रकारातील चेष्टा कोणाच्याही नजरेस न यावी. ड्यूक आपले डोळे चोळीत तो चर्मपट वाचण्यासाठी तिकडे निघाला. नंतर डॉन क्विक्झोट यांना मिठी मारून त्याने त्यांच्या पराक्रमाची आकाशाला भिडण्याइतकी प्रशंसा केली आणि त्यांना बजावून सांगितले, "आतापर्यंत या पृथ्वीतलावर जे जे शिलेदार निर्माण झाले, त्या सर्वात तुम्ही अत्यंत शूर आहा." त्या निराश मेट्रनच्या तोंडावरील झुडुप नाहीसे झाल्यानंतर आता तिचे तोंड कसे दिसत असेल हे पाहण्यासाठी सँको बागेत खालीवर पहात होता. पण त्याला असे सांगण्यात आले की, जेव्हा क्लॅव्हिनो आकाशातून झळाळत खाली आला, तेव्हा ती सरदारीण आपल्या दासींसमवेत तत्काळ अदृश्य झाली. तेव्हा त्यांच्यापैकी एकीच्याही हनुवटीवर एकही केस दिसत नव्हता.

डचेसने सँकोला विचारले, "तुझ्या या दीर्घ प्रवासात काय काय घडले ?" त्याने उत्तर दिले, "काय सांगावे बाईसाहेब ? मी किती तरी चमत्कार पाहिले. मी माझ्या डोळ्या-वरून कापडाचा पट्टा काढून टाकणे माझ्या धन्याला सहन होण्यासारखे नव्हते, तरीही प्रत्येक गोष्ट जाणण्याची मला एक प्रकारची खाज आहे, आणि जे करू नको म्हणून कोणी सांगितले असेल त्याचा पिच्छा पुरवण्याची माझी विचित्र वृत्ती आहे. म्हणून, आपण अग्नि-प्रदेशातून उड्डाण करीत चाललो आहोत असे जेव्हा माझा धनी सांगत होता, तेव्हा मी माझा हातरुमाल माझ्या नाकावर थोडा सरकविला आणि खाली पाहू लागलो. तेव्हा मला काय दिसले असेल असे आपल्याला वाटते ? माझ्या फार खाली (ईश्वर आपल्यावर कृपा करो) मला पृथ्वी मोहरीएवढी दिसली अन् तिच्यावर इकडे-तिकडे चालणारी माणसे उंबरापेक्षा मोठी वाटली नाहीत. आम्ही अस्मानात फार उंच

गेलो नव्हतो काय, हे आपणच ठरवा. " डचेस म्हणाली, " मित्रा, तू काय बोलतोस याची काळजी घे. माणसे उंबराएवढी आणि पृथ्वी मोहरीएवढी, असे असेल तर एक माणूस साऱ्या पृथ्वीपेक्षा मोठा असला पाहिजे आणि तिला झाकून टाकणारा असला पाहिजे. मग तू पृथ्वी कशी पाहणार ? "

सँकोने उत्तर दिले, " अगदी तसेच. तसे असले तरी मी पृथ्वीचा एक भाग एका बाजूने पाहिला आणि दुसरा भाग दुसऱ्या बाजूने. " डचेसने उत्तर दिले, " हे पाहा, सँको, तसे म्हणता येणार नाही, कोणतीही वस्तू, तिचा केवळ एक अंश पाहून, पूर्णपणे पाहता येणार नाही. " सँको म्हणाला, " ठीक, ठीक, बाईसाहेब, तुमचे ते अंश आणि पूर्ण हे काही मला कळत नाही. मी पृथ्वी पाहिली. बस्स ! तेथेच सारी गोष्ट संपली. आपण असे समजले पाहिजे की, आम्ही जसे जादूने उडत गेलो, तसेच जादूने पहात गेलो. कोणत्याही बाजूने मी पाहिले असले तरी मला पृथ्वी दिसली आणि सारी माणसेही दिसली. आपल्याला खरे वाटणार नाही पण मी सांगतो की, मी माझ्या भुवयांचे वर माझा हातरुमाल सरकविला, तेव्हा मी स्वर्गाच्या अगदी जवळ होता— इतका की, माझ्या टोपीचे टोक आणि मुख्य आकाश यामध्ये दीड–वितीचेही अंतर नव्हते, हे मी ठामपणे सांगतो. खरोखर ईश्वर आपल्यावर कृपा करो. अहाहा ! स्वर्ग म्हणजे किती विशाल प्रदेश आहे ! सात मेंढ्यांच्या तारकासमूहातून आम्ही जेव्हा प्रवास केला, तेव्हा त्या मेंढ्याबरोबर खेळण्याची मला इच्छा झाली ( एकेकाळी मी धनगर होतो ना ? ) मी जर त्यांच्याशी खेळलो नसतो, तर रडून रडून मी आकांत केला असता असे मला वाटते. त्या तारका माझ्या नजरेस पडताच मी काय केले असेन ? माझ्या घन्याच्या पाठीमागून अत्यंत शांतपणे मी चोरून त्यांच्याकडे पाहिले आणि त्या चुणचुणीत मेंढ्याबरोबर सुमारे पाऊण तास मी नाचलो- बागडलो–कोणाही जिवंत प्राण्याला कळू न देता. झेंडूच्या किंवा गुलमोहराच्या फुलासारख्या सुंदर आणि गोड त्या मेंढ्या होत्या. हा आमचा खेळ होईपर्यंत इमानी लाकडी घोड्याने एक पाऊल काही उचलले नाही. " ड्यूकने विचारले, " मेंढ्याबरोबर सँको खेळत होता, तेव्हा डॉन क्विक्झोट काय करीत होते ? " शिलेदारजींनी उत्तर दिले, " साऱ्याच गोष्टी आपल्या नैसर्गिक क्रमापासून चळलेल्या आहेत याची मला जाणीव असल्यामुळे सँको जे सांगतो ते मला फारसे विचित्र वाटत नाही. पण माझ्यापुरते सांगावयाचे तर, मी स्वर्ग किंवा नरक, समुद्र किंवा किनारा—काहीही पाहिले नाही. मला खरोखर एवढेच दिसले की, आम्ही आकाशाच्या मध्यभागातून चाललो आहो आणि अग्नि–प्रदेशाच्या अगदी जवळ आहो. पण सँको सांगतो त्याप्रमाणे, आम्ही स्वर्गाच्या अगदी सन्निध गेलो यावर माझा मुळीच विश्वास बसत नाही. कारण तसे असते तर, आम्ही अग्नि–प्रदेशातून पार गेलो असतो. तो प्रदेश चंद्राची कक्षा आणि आकाशाचा उच्च प्रांत यामध्ये आहे. सँको ज्यांना ' सात, मेंढ्या ' म्हणतो, त्या प्लीएडेस या तारका जेथे आहेत, तेथे जाऊन पोचणे आम्हाला अशक्य होते. तेथे पोचण्यापूर्वी आम्हाला अग्नीने

भस्मसात् केले असते. पण ज्याअर्थी त्या अग्नीच्या ज्वालातून आम्ही निसटलो, त्या-अर्थी आम्ही इतके उंच उड्डाण केले नाही. सँको खोटे बोलत असावा किंवा स्वप्न पहात असावा."

सँकोने उत्तर दिले, "मी खोटे बोलत नाही की स्वप्न पहात नाही. वाः! वाः! त्यापैकी प्रत्येक मेंढीचा रंग आणि खुणा मी तुम्हाला सांगू शकेन. माझ्यावर तुमचा विश्वास नसेल तर मला प्रश्न विचारा आणि माझी कसोटी पाहा. मग मी खरे बोलतो की नाही, हे तुम्हाला सहज कळून येईल." डचेस म्हणाली, "ठीक आहे. सँको, मला आता मेंढयांचे रंग सांग पाहू." सँको उत्तरला, "हे पाहा, त्यांपैकी दोन हिरव्या, दोन पिंगट, दोन निळया आणि एक संमिश्र रंगाची होती." डयूक म्हणाला, "खरेच, तुला आढळलेल्या त्या मेंढया नवीनच जातीच्या होत्या. सँको, पृथ्वीवर अशा रंगांच्या मेंढया आम्हाला कधी दिसत नाहीत." सँकोने उत्तर दिले, "खरे आहे, महाराज. स्वर्गीय मेंढया आणि या जगातील मेंढया यामध्ये तुम्ही काही फरक कराल ना?" डयूकने विचारले, "पण काय रे सँको, त्या मेंढयांमध्ये एखादा पुरुष नव्हता का?-शिंगे असलेला पुल्लिंगी प्राणी एकही नव्हता का?" सँको म्हणाला, "एकही नव्हता, महाराज. चंद्राशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्राण्याला शिंग नव्हते. मला असे सांगण्यात आले आहे की, कोणाही मेंढयाला किंवा शिंगवाल्या प्राण्याला चंद्राच्या शिंगापेक्षा आपली शिंगे उंच करता येत नाहीत."

सँकोला त्याच्या अस्मानी सफरीबद्दल आणखी काही प्रश्न विचारणे, त्यांना योग्य वाटले नाही. त्याच्या मनाची स्थिती त्यांनी बरोबर ओळखली. या सर्व काळात तो त्या उद्यानातून इंचभरही बाहेर गेला नसला, तरी तो स्वर्गात भटकल्याच्या आणि तेथे केलेल्या कामांच्या वार्ता सांगत सुटेल असे त्यांना वाटले.

सारांश, हताश प्रौढांची मोहीम अशा प्रकारे समाप्त झाली. तिच्यामुळे डयूक व डचेस यांना केवळ त्या काळापुरती नव्हे तर आपल्या उरलेल्या सर्व आयुष्यभर पुरेशी मौज चाखावयास मिळाली. सँको तितका काळ जगला असता तर, पिढयान्‌पिढयांना युगानुयुगे पुरेल इतके विषय त्याला बोलण्यास मिळाले असते. डॉन क्विक्झोट त्याच्या कानात कुजबुजले, "सँको, तू स्वर्गात जे पाहिलेस, त्यावर आम्ही विश्वास ठेवावा, अशी तुझी इच्छा आहे ना? मग मी मॉंटेसिनोज्‌च्या गुहेत जे जे पाहिले, त्यावर तू विश्वास ठेवावास अशी माझी इच्छा आहे. आता आणखी एक शब्द बोलू नकोस."



प्रकरण ४२

# सँको पँझा आपल्या बेटाचा राज्यकारभार करण्यासाठी निघण्यापूर्वी त्याला डॉन क्विक्झोट यांनी दिलेल्या सूचना आणि इतरही महत्त्वाच्या गोष्टी

हताश प्रौढेच्या मोहिमेला सुयश लाभल्यामुळे डयूक व डचेस यांना संतोष वाटला आणि असाच दुसरा काही आनंददायक प्रयोग करण्याचा उत्साह त्यांना वाटला. डॉन क्विक्झोट आणि त्याचा सेवक यांच्या भोळेपणाचा फायदा घेऊन आपण नवा प्रयोग सहजगत्या पार पाडू असा विश्वास त्यांना वाटू लागला. लाकडी घोडयाच्या प्रसंगानंतर दुसरे दिवशी डयूकने आपल्या सेवकांना आणि गुलामांना सँकोशी त्याच्या राज्यात कसे वागावे याच्या सूचना दिल्या, आणि त्याबरोबरच सँकोला आपल्या राज्याचा ताबा घेण्यासाठी सिद्ध असण्याचा व त्याची तयारी करण्याचा आदेशही दिला. कारण, आता त्या बेटावरील लोक कोरडया उन्हाळ्यात पावसाची जशी वाट पहात असत, तशीच सँकोच्या आगमनाची अंतःकरणापासून वाट पहात होते. सँकोने आदबीने मुजरा केला आणि डयूककडे गंभीरपणे पाहून म्हटले, " महाराज, मी स्वर्गातून खाली उतरलो आहे व तेथून मला पृथ्वी लहान दिसली. त्यामुळे राज्यपाल–पदाचा मला पूर्वी जितका आनंद होत होता, त्याच्या निम्मासुद्धा आता होत नाही. एखाद्या तुट-पुंज्या प्रदेशाचा – एखाद्या मोहरीच्या छोट्याशा कोपऱ्याचा – अधिपती होण्यात काय मोठेपण आहे? उंबरापेक्षा मोठी नसलेल्या अर्ध्या डझन माणसांवर राज्य करण्यात कोणाला काय प्रतिष्ठा आणि सत्ता मिळणार? साऱ्या जगात पाचसहापेक्षा अधिक माणसे असतील असे मला वाटत नाही. छेः मला ते नको. महाराजांनी कृपा करून स्वर्गातील अत्यंत लहान प्रदेश – मग तो मैलभर का असेना – मला बहाल केला, तर पृथ्वीवरील अत्यंत विशाल बेटापेक्षाही त्याचा स्वीकार मी अधिक आनंदाने करीन. " डयूकने उत्तर दिले, " दोस्ता सँको, स्वर्गातील इंचभरही जागा मी तुला देऊ शकत नाही. कारण तो फक्त ईश्वराचा अधिकार आहे. जे देणे मला शक्य आहे, ते मी तुला देत आहे. ते म्हणजे एक बेट – भक्कम आणि हुशार, वाटोळे आणि डौलदार, इतके सुपीक आणि धनधान्यांनी समृद्ध की, साऱ्या गोष्टींची व्यवस्था योग्य प्रकारे करण्याची कला व अक्कल तुझ्या ठायी असेल, तर तू इहलोकीचे व परलोकीचे अशी दोन्हीही भांडारे साठवून ठेवशील. "

सँको म्हणाला, " ठीक तर मग, असू द्या मला हे बेट ! मी त्याचा चांगला राज्य-पाल होण्यासाठी पराकाष्ठेचा प्रयत्न करीन. त्यामुळे कितीही बदमाष लोक आडवे आले तरी मला केव्हा ना केव्हा स्वर्गातील लहानसा कोपरा मिळाल्याशिवाय राहणार नाही. मी काही अधाशीपणाने घरच्या लहानशा खाटेवरून उठून त्या बेटाकडे जात नाही आणि राज्यपाल म्हणून मिरवीत नाही. पण राज्यपाल होणे म्हणजे काय आहे, हे केवळ जाणण्यासाठी मी तिकडे जात आहे. " ड्यूक म्हणाला, " अरे सँको, एकदा का तू सत्तेची चव चाखलीस म्हणजे तू आपली बोटे चाटण्याचे काम कधीच सोडणार नाहीस लोकांवर हुकमत गाजवणे आणि त्यांना आपल्या आज्ञा पाळावयास लावणे ही गोष्टच इतकी गोड आणि चटका लावणारी आहे. तुझा धनी जेव्हा बादशहा होईल, ( त्याच्या कार्याच्या प्रगतीवरून तो होणार यात शंकाच नाही ) तेव्हा तो बादशहाची गादी कोणत्याही विचाराने सोडणार नाही अशी मला खात्री वाटते. आपण बादशहा लौकर का झालो नाही याचेच त्याला दुःख वाटेल. "

सँको उत्तरला, " खरे आहे, महाराज. माझे मत आपल्यासारखेच आहे. हुकमत गाजविणे–मग ती मेंढ्यांच्या कळपावर का असेना–ही एक नामी गोष्ट आहे. " ड्यूक म्हणाला, " अरे सँको, तुझ्याबरोबर जगावे आणि मरावे असे मला वाटते. कारण, प्रत्येक गोष्टीकडे तू बारकाईने पहातोस. तुझ्या शहाणपणामुळे जशी तुझी योग्यता कळून येते, त्याचप्रमाणे तू चांगला राज्यपाल ठरशील अशी मला आशा वाटते. पण यावेळी अधिक बोलणे न लगे. उद्या आणखी विलंब न करता तू आपल्या बेटाकडे कूच करावेस. आज दुपारी तुझ्या अधिकाराला अनुरूप असा वेष आणि सामान तुला मिळेल. त्याचप्रमाणे तुझ्या प्रवासासाठी आवश्यक त्या साऱ्या वस्तूही तुला मिळतील. "

तो म्हणाला, " त्यांच्या इच्छेप्रमाणे ते मला पोशाख चढवोत, पण मी पूर्वीचाच सँको पँझा राहीन. " ड्यूक म्हणाला, " ते खरे आहे. पण प्रत्येक माणसाने आपल्या पदाला नि प्रतिष्ठेला अनुरूप असे कपडे वापरले पाहिजेत. वकिलाने सैनिकासारखा वेष धारण करू नये आणि सैनिकाने पाद्र्याचा पोषाख पेहरू नये. सँको, तुला सेनानी आणि न्यायाधीश या दोघांचीही स्थाने धारण करावी लागतील, आणि म्हणून त्या दोघांच्या वेषाचे मिश्रण तुझ्या पोशाखात होईल. कारण, मी तुझ्यावर जो राज्यकारभार सोपवीत आहे, त्यामध्ये शस्त्राइतकीच विद्येचीही गरज आहे विद्वानाइतकीच समशेरबहाद्दराचीही गरज आहे. " सँको म्हणाला, " विद्वत्तेबाबत मी फारसे काही बोलू शकत नाही. कारण अजून मला मुळाक्षरांची तोंड–ओळखही झालेली नाही. पण त्यापूर्वी ख्रिस्ताच्या क्रूसची जी खूण केली जाते, ती माझ्या स्मरणात राहिली, तरी मी चांगला राज्यपाल होईन. शस्त्रासंबंधी म्हणाल तर, मला शक्य असेल तोंपर्यंत मी माझे हत्यार टाकणार नाही. प्रभु आपला पाठीराखा असो !" ड्यूक म्हणाला, " जोपर्यंत या गोष्टींची आठवण सँकोला आहे, तोपर्यंत त्याच्या हातून काही चूक होणार नाही. "

यावेळी डॉन क्विक्झोट तेथे आले. ड्यूकच्या परवानगीने सँको आपल्या

राज्याकडे अकस्मात् जात आहे, हे कळल्यानंतर त्यांनी त्याला एका बाजूस नेले. आपले कार्य पार पाडण्यासाठी त्याने काय करावे याच्या काही चांगल्या सूचना देण्याचा त्यांचा हेतू होता.

डॉन क्विक्झोटच्या खोलीत गेल्यानंतर आणि खोलीचे दार लावल्यानंतर त्यांनी सँकोला आपल्याजवळ बळेबळे बसवून घेतले. नंतर गंभीर आणि विवेकी स्वरात ते बोलू लागले.

" मित्रा सँको, माझ्या आशा पूर्ण झाल्याचे समाधान मला मिळण्यापूर्वी तुझ्या आकांक्षा सफल झाल्याचे पाहून मी परमेश्वराला अनंत धन्यवाद देतो. तुझ्या आकांक्षा पूर्ण करण्यासाठी तुझे नशीब वेगाने धावून येत आहे. तुझ्या सेवेचे बक्षीस, मला सुयश लाभल्यानंतर, तुला देण्याचे मी कबूल केले आहे. पण अद्याप ते यश प्राप्त होण्याच्या वाटेवर आहे. तू मात्र आपल्या सर्व आशा–आकांक्षाचे अंतिम ध्येय गाठलेस, हे समंजसपणे केलेल्या अपेक्षेच्या पलीकडचे आहे. काही माणसे परिश्रम करतात, आर्जवे करतात, आग्रह धरतात, लौकर पुढे होतात, लाच देतात, विनवणी करतात, हट्ट धरतात, कोणाकडूनही नकार घेत नाहीत, आपल्या मागणीचा अट्टाहास धरतात आणि तरीही शेवटी त्यांना इष्ट फल मिळत नाही ते नाहीच. पण दुसरा माणूस येतो आणि नशिबाच्या लहरीसरशी किंवा योगायोगाने, बक्षीस घेऊन जातो. जे यश मिळविण्यासाठी पुष्कळ माणसे व्यर्थ खटाटोप करीत असतात, ते तो सहज हस्तगत करतो त्यामुळे पुढील म्हण सिद्ध होते " सुखी लोकांना त्यांचे दिवस येतात आणि तेच ते निवडतात. असुखी लोकांना येतात केवळ धटका आणि त्याही ते गमावतात. " अरे, तू तर अगदी ठोंब्या आहेस. रात्री कधी जागत नाहीस की पहाटे कधी उठत नाहीस— कोणतेही कष्ट किंवा त्रास सोशीत नाहीस. फक्त शिलेदारीची हवा तुझ्या अंगावरून वहात आहे. पण तू क्षणार्धात एका बेटाचा राज्यकर्ता झाला आहेस–जणु काही तसे होणे ही अगदी क्षुल्लक गोष्ट आहे— तिला काही महत्त्व नाही. प्रिय सँको, मी हे जे बोलत आहे, ते तुझी निंदा करण्यासाठी नव्हे किंवा मत्सरामुळेही नव्हे. तर केवळ तुला हे समजावून देण्यासाठी की, हे सारे यश आपल्याला आपल्या गुणांमुळे मिळाले असे तू मानू नयेस. मानवी व्यवहारांचे नियंत्रण करणाऱ्या त्या प्रेमपूर्ण स्वर्गीय शक्तीमुळेच हे सारे तुला प्राप्त झाले आहे. म्हणून तू त्या दैवी शक्तीचे आभार मानले पाहिजेस. त्या दैवी शक्तीच्या खालोखाल शिलेदारीच्या श्रेष्ठ व्यवसायाला तू आपल्या सौख्याचे श्रेय दिले पाहिजेस. अशा सन्मानाचे आणि वैभवाचे भांडार शिलेदारीच्या व्यवसायात साठविलेले असते.

" अरे माझ्या बाळा, मी तुझा कॅटो★ आहे. मी तुला यापूर्वीच जे काही सांगितले आहे, ते ठाम आहे. तरीही मला आणखी काही सांगावयाचे आहे, त्याकडे तू लक्ष दे, माझा उपदेश ऐक, असे माझे सांगणे आहे. ज्या वादळी समुद्रात तू आता आपली

★ एक रोमन तत्त्वज्ञ.

होडी सोडत आहेस, त्यातून तुला योग्य मार्ग दाखवून सन्मानाच्या बंदरात सुरक्षितपणे पोहोचविणारा मी तुझा ध्रुवतारा आहे. अधिकार आणि मोठमोठ्या नोकऱ्या या गोंधळात टाकणाऱ्या खोल खाड्या असतात यात शंका नाही. अरे माझ्या मुला, ईश्वराचे भय बाळग. कारण ईश्वराच्या भयातून शहाणपणाचा जन्म होतो आणि शहाणपणामुळे तू वाममार्गाला लागणार नाहीस.

" दुसरी गोष्ट म्हणजे, आपण कोण होतो याचा विचार कर. स्वतःला ओळखणे हे आपले कर्तव्य मान. जगातील अत्यंत अवघड धडा आहे तो हाच; पण या धड्यापासूनच तू हे शिकशील की, बैलाएवढे मोठे होण्याची बेडकाची मूर्ख महत्त्वाकांक्षा टाळावी. नाही तर तू पूर्वी डुकरे हाकीत होतास या विचारामुळे, तुझ्या भाग्यचक्राला, मोराच्या कुरूप पायाप्रमाणे, अडथळा येईल. "

सँको म्हणाला, " खरे आहे. तेव्हा मी एक लहान मुलगा होतो. पुढे मी जेव्हा वाढलो नि मोठा झालो तेव्हा हंस हाकू लागलो— डुकरे नव्हे. पण आपल्या मुद्याशी याचा काही संबंध नाही असे मला वाटते. कारण सारे राज्यपाल काही राजेमहाराजांच्या वंशातून आलेले नसतात. "

डॉन क्विक्झोटनी आपले भाषण पुढे चालविले, " अगदी खरे. म्हणून जे लोक थोर कुळात जन्माला आलेले नसतात, त्यांनी आपल्या अधिकाराचा कडकपणा सौम्य व सभ्य करावा. कोणताही अधिकार किंवा स्थान मत्सराच्या कुजबुजीपासून मुक्त असत नाही. पण सौम्यता व नम्रता यांना चातुर्याची दिशा लाभली तर ती कुजबूज नष्ट होते.

" सँको, तुझ्या घराण्याच्या हलकेपणावर तू संतुष्ट राहा. आपण कामकरी कुटुंबात जन्माला आलो हा स्वतःचा कमीपणा मानू नकोस. तुला जर त्याची लाज वाटत नसेल, तर दुसरा कोणीही तुला त्याबद्दल लाज वाटावयास लावणार नाही. गर्विष्ठ आणि व्यसनी असण्यापेक्षा, नम्र आणि सद्गुणी असे लोकांनी आपल्याला मानावे, म्हणून तू प्रयत्न कर. खालच्या दर्जाच्या गांवढळ घराण्यात जन्माला येऊन पोपची खुर्ची आणि बादशहाचे सिंहासन अशा परमोच्च पदाला पोहोचलेल्या माणसांची संख्या खरोखर अनंत आहे. हे सिद्ध करण्यासाठी मी तुला इतकी उदाहरणे देईन की, त्यामुळे तुला कंटाळा येईल आणि तुझा धीमेपणा संपुष्टात येईल.

" तुझ्या सर्व कृत्यांचे सूत्र सद्गुण हे असावे. मग ज्या लोकांना केवळ जन्मामुळे मोठेपणा किंवा राजेपणा प्राप्त होतो त्यांचा हेवा करण्याचे तुला काही कारण रहाणार नाही. सुकुलीनता ही आनुवंशिक असते, पण गुणवत्ता स्वसंपादित असते– आणि उच्च कुलीनतेपेक्षा गुणवत्ता ही केव्हाही श्रेष्ठच.

" तुझ्या गरीब नातलगांपैकी कोणी तुला भेटण्यास आला तर त्याला कधी झिडकारू नकोस किंवा हेटाळू नकोस. उलट मोठ्या मेहेरबानीने त्याचे स्वागत करून पाहुणचार कर. असे केल्याने तुझ्या स्वभावाची उदारता प्रगट होईल आणि त्यामुळे प्रभूला संतोष वाटेल. प्रभूने जे जे निर्माण केले आहे, त्याचा तिरस्कार कोणी करू नये

अशी त्याची इच्छा आहे.

" तू ज्या अधिकारपदावर असशील तेथे माणसाने बायकोशिवाय फार काळ रहाणे योग्य नव्हे. तिने आपल्या पतीच्या भाग्यात सहभागी होणे अवश्य आहे. म्हणून तू तिला बोलावून घेतलेस तर तिला चांगले शिक्षण दे आणि शक्य तितके उत्तम संस्कार दे. त्यामुळे तिचा उपजत गांवढळपणा जाऊन तिचे वर्तन सुंदर व सुसंस्कृत होईल. पुष्कळ वेळा सज्जन व विवेकी पतीने जे कार्य उभारले असेल, ते त्याची असंस्कृत पत्नी धुळीस मिळविते.

" तू जर विधुर झालास ( ते अशक्य नाही ) आणि तुला उच्च कुळातील नवरी तुझ्या अधिकारपदामुळे सांगून आली तर, मासे पकडणाऱ्या गळाप्रमाणे, केवळ लाच घेण्याचे काम करणारी वधू पतकरू नकोस. कारण मी सांगतो यावर विश्वास ठेव की, न्यायखात्यातील लहानमोठ्या कोणत्याही अधिकाऱ्याला आपल्या कर्तव्याचा काटेकोर जाब द्यावा लागतो. आपल्या पत्नीने जे काही घेण्यास त्याने संमती दिली असेल, त्याचे प्रायश्चित्त त्याला मरण-काळी कठोरपणे द्यावे लागते.

" तू स्वतःविषयी मोठेपणाची भलती कल्पना मनात बाळगू नकोस. आपल्या ज्ञानाची बढाई जे अज्ञानी लोक मारतात, त्यांचा तो दोष आहे.

" श्रीमंत लोकांच्या पुराव्यापेक्षा गरीब लोकांच्या अश्रूमुळे तुझ्या मनात अधिक न्यायबुद्धी निर्माण न झाली तरी करुणा उत्पन्न होऊ दे.

" धनिकांच्या भेटी आणि नजराणे, तसेच गरिबांचे हुंदके आणि विनवण्या या आड आल्या तरी सत्य शोधून काढण्याचे कामी तू सारखाच दक्ष राहा. जेथे न्याय घडावयास हवा, तेथेहि अपराधी माणसावर कायद्याचा बडगा फार उचलला जाऊ नये. कारण, न्यायाधीशाने दयाळू असण्यापेक्षा कठोर असणे हा काही त्याचा मोठा गुण नव्हे.

" जेव्हा कायद्याचा कठोरपणा सौम्य करावा लागतो, तेव्हा त्याचा हेतू दया हा असावा- लाच हा नसावा. "

" तुझ्या शत्रूचा दावा तुझ्यापुढे असेल तर तू आपल्या पूर्वग्रहावर मात करून वास्तव गोष्टीकडे लक्ष दे.

" दुसऱ्या माणसाच्या खातर तू स्वतःच्या तीव्र भावनेने अंध होऊ नकोस. कारण त्यामुळे झालेल्या चुकांवर बहुधा काही उपाय नसतो. त्या चुका दुरुस्त करणे तुझ्या संपत्तीला व कीर्तीला फार महाग पडेल.

" जेव्हा एखादी सुंदर स्त्री तुझ्यापुढे येईल, तेव्हा तिच्या आसवांवरून तू आपली दृष्टी काढून घे आणि तिच्या विलापाकडे तू कानाडोळा कर. तिच्या सुस्काऱ्यामुळे आणि अश्रूमुळे आपली बुद्धी आणि सचोटी वाहून जाऊ नये असे तुला वाटत असेल, तर तू तिच्या अर्जाचा विचार शांतपणे करण्यासाठी काही वेळ घे.

" ज्यांच्या अपराधामुळे तू त्यांना प्रत्यक्ष शिक्षा करणार असशील, त्यांची निंदा शब्दांनी करू नकोस. ती शिक्षा त्या दुर्जनांना पुरेशी असते. तीत अपशब्दाची भर

कशाला ?

" गुन्हेगारांच्या खटल्यांचे वेळी आरोपीविषयी द्वेषभाव न बाळगता शक्य तितका विचार कर. आरोपीला काही संरक्षण नसते आणि आपल्या भ्रष्ट व दुष्ट स्वभावाला बळी पडण्याचा त्याला मोह होतो, हे लक्षात घेऊन तू त्याचेवर दया आणि अनुअनुकंपा दाखव. कारण ईश्वराचे सारे गुण सारखे असले, तरी त्याच्या न्यायबुद्धीपेक्षा त्याची दयाबुद्धी आपल्या दृष्टीने अधिक आकर्षक नि आनंददायक असते.

" सँको, हे नियम तू पाळलेस तर तुला दीर्घ आयुष्य, शाश्वत कीर्ती, पूर्ण पारितोषिक आणि अवर्णनीय सौख्य प्राप्त होईल. मग तू आपल्या मनीच्या इच्छेप्रमाणे आपल्या मुलांची आणि नातवांची लग्ने लावशील. त्यांना कोणत्याही हुद्याची गरज पडणार नाही. सर्व लोकामध्ये तू प्रिय होशील आणि तुझे आयुष्य शांति–समाधानात जाईल. तुला चांगले नि पूज्य वार्धक्य प्राप्त होऊन मग मृत्यु येईल, तेव्हा तुझ्या नातवंडाची मुले आपल्या कोवळ्या लुसलुशीत हातांनी तुझे डोळे झाकतील.

" आतापर्यंत मी तुला तुझ्या मनाच्या कल्याणासाठी आणि अलंकारासाठी काही आदेश दिले, आता तुझे शरीर भूषविण्यासाठी मी ज्या सूचना देणार आहे, त्याकडे लक्ष दे. "



प्रकरण ४३

# सँको पँझा याला डॉन क्विक्झोट यांनी केलेल्या उपदेशाचा उत्तरार्ध

अशा प्रकारे डॉन क्विक्झोट यांनी आपल्या सेवकाला जो बोध केला, त्यावरून ते असामान्य चातुर्याचे आणि उत्तम नीतिमत्तेचे गृहस्थ असावेत असे कोणास वाटणार नाही ? मात्र आम्ही या इतिहास-ग्रंथात वारंवार सांगितल्याप्रमाणे, शिलेदारीच्या थोड्याही उल्लेखाने साऱ्या गुणांचे मातेरे होई आणि त्यांची बुद्धी गढूळ होई. त्याशिवाय इतर सर्व बाबतीत त्यांची निर्णायक बुद्धी अगदी स्वच्छ असे आणि त्यांची आकलन-शक्ती अत्यंत तीव्र असे. त्यामुळे क्षणोक्षणी त्यांची कृत्ये त्यांच्या बुद्धीला बदनाम करीत आणि त्यांची बुद्धी त्यांच्या कृत्यांना बदनाम करी. पण त्यांनी सँकोला मोजक्या शब्दात जे आदेश दिले, त्यावरून ते रम्य कल्पनाशक्तीचे प्रभु असल्याचे दिसते. त्यांची न्याय-बुद्धी आणि कल्पनाविलास यांचा संगम समान प्रमाणात झालेला दिसतो. त्यांचे सारे सद्विचार आपल्या मनात नोंदविण्याची आणि कृतीत उतरविण्याची आशा बाळगून सँकोने त्यांच्या बोलण्याकडे पुष्कळच अवधान दिले. त्यांच्या उपदेशामुळे आपण आपले कर्तव्य, एकाद्या सन्माननीय माणसाप्रमाणे, बजावू शकू, याविषयी त्याला काडीमात्र शंका नव्हती.

डॉन क्विक्झोट पुढे म्हणाले, " तुझ्या शरीराच्या आणि कुटुंबाच्या व्यवस्थेसंबंधी माझी पहिली आज्ञा म्हणजे स्वच्छता. तुझी नखे काढीत जा. काही लोक ती वाढवितात, तसे करू नकोस. लांब नखामुळे हाताचे सौंदर्य वाढते, असे त्यांना त्यांच्या मूर्खपणामुळे वाटते आणि मग ती माणसाच्या नखापेक्षा जनावराच्या पंज्यासारखी दिसतात. ते दृश्य घाणेरडे आणि भेसूर आहे.

" तुझे कपडे अंगावर घट्ट बसलेले असावेत. कारण सैल भोंगळपणा हा बेपर्वा मनाचा द्योतक असतो. अर्थात् काही धूर्त उद्देशाने ज्युलियस सीझरप्रमाणे असा भोंगळपणा करणे ही गोष्ट निराळी.

" एका वर्षात आपली मिळकत किती होईल याचा विचार शहाणपणाने कर. तुझ्या सेवकांना गणवेश देण्यास ती मिळकत पुरेशी असल्यास ते गणवेश सभ्य आणि टिकाऊ असावेत–देखाव्यासाठी भपकेबाज नसावेत. तू चांगली काटकसर केल्या-मुळे तुझा पैसा शिल्लक रहात असेल तर तो गरिबांना देऊन टाक. सहा नोकर ठेवणे

तुला शक्य असले, तर तीनच ठेव आणि तिघांना लागणारा पैसा धर्मार्थ खर्च कर. त्यामुळे तुला पृथ्वीप्रमाणेच स्वर्गातही नोकर–चाकर मिळतील. आमचे पोकळ बडे लोक असे वागत नाहीत आणि म्हणून त्यांना स्वर्गात नोकर मिळत नाहीत.

“ कांदे आणि लसूण खाऊन तू आपला श्वास बिघडवू नकोस. नाही तर त्या श्वासाच्या दुर्गंधीमुळे तू शेतकरी आहेस हे प्रगट होईल.

“ गंभीरपणे चालावे आणि विवेकाने बोलावे. पण जणू काही आपण आपलेच शब्द ऐकत आहो असे कोणास वाटू नये, कोणतीही कृत्रिमता म्हणजे दोषच.

“ दुपारी थोडे जेवावे आणि रात्री त्याहून कमी जेवावे. कारण पोट म्हणजे आरोग्याचे कोठार आहे. तेथून सर्व शरीराला आरोग्य मिळते.

“ मद्यपान माफक करावे. कारण दारुडा माणूस कोणतीही गोष्ट गुप्त राखू शकत नाही की आपले वचन पाळू शकत नाही.

“ तोंडाच्या दोन्ही बाजूंनी अन्न चावून खाऊ नकोस म्हणजे आपले तोंड अन्नाने पुरेपूर भरू नकोस. चार मंडळीमध्ये ढेकर न देण्याची काळजी घे. ”

सँको म्हणाला, “ ढेकर म्हणजे काय ? तो अवघड शब्द मला कळत नाही. ” डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, “ ढेकर देणे म्हणजे पोटातून गुरगुर आवाज तोंडाने काढणे. पण आपल्या भाषेतील हा शब्द अत्यंत अर्थवाहक व समर्पक असला तरी अत्यंत अप्रिय व जंगली आहे. म्हणून सभ्य माणसे गुरगुरणेऐवजी ढेकर देणे हा लॅटिन भाषेतून घेतलेला शब्द वापरतात. आता तो खेडवळ माणसांना कळत नसला तरी फारसे बिघडत नाही. सवयीने आणि वहिवाटीने तो सर्वांना कळू लागेल आणि परिचित होईल. अशा नवनव्या शब्दामुळेच भाषा समृद्ध होतात. बहुजनसमाज असे शब्द वापरतो आणि वहिवाटीने ते शब्द भाषेमध्ये रूढ होतात. ”

सँको म्हणाला, “ बरोबर आहे. आपल्या साऱ्या उपदेशापैकी मी हा उपदेश कधीच विसरणार नाही. कारण माझ्या पोटातून प्रचंड गुरगुर होत असते. ” डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, “ ढेकर देतो म्हण, गुरगुर होते असे म्हणणे सोडून दे. ” सँको म्हणाला, “ ठीक आहे. आपण म्हणता तसेच होऊ दे. ढेकर हा शब्द मी नक्की लक्षात ठेव. ”

शिलेदारजी म्हणाले, “ सँको, दुसरी गोष्ट म्हणजे तुझ्या नेहमीच्या बोलण्यात म्हणींची रेलचेल करू नकोस. तुला तसे करण्याची नेहमी सवय आहे. म्हणी म्हणजे संक्षिप्त आणि सारभूत वचने होत हे खरे, पण तू त्यांचा एवढा मोठा गठ्ठा आपल्या भाषणात आरपार फेकून देतोस की ती सारी वचने मूर्खपणाची वाटू लागतात. ”

सँको म्हणाला, “ हाय ! हाय ! महाराज, माझा हा रोग एकटा ईश्वरच बरा करू शकेल. एका ग्रंथात मावतील त्यापेक्षा अधिक म्हणी माझ्या संग्रही आहेत. जेव्हा मी बोलू लागतो तेव्हा त्या माझ्या ओठावर इतक्या वेगाने आणि गर्दीने धावून येतात की, त्यापैकी प्रथम कोणी प्रगट व्हावे याविषयी त्यांच्यामध्ये भांडण लागते. म्हणून माझी जीभ त्या

म्हणी शक्य तितक्या जलदीने बाहेर टाकीत असते. प्रथम आलेली म्हण प्रथम बाहेर पडते. त्यात माझा काही हेतू नसतो. पण यापुढे मी माझ्या ओठावर पहारा ठेवीन आणि त्यातून एकाही म्हणीला बाहेर जाऊ देणार नाही. माझ्या अधिकार-पदाच्या गांभीर्याला शोभतील तेवढ्याच म्हणी मी तोंडातून बाहेर काढीन. " श्रीमंताच्या घरी, चटकन पसरतात चादरी, जेथे धान्याच्या राशी, तेथे पाहुणे उपाशी." कोणताही दोष दाखविला गेला नाही तोपर्यंत तो दोष नव्हे. घंटेखाली उभा रहाणारा सुरक्षित असतो. आपली भाकरी तुम्ही खाल्ली तर ती तुमच्याजवळ राहणार नाही, संग्रह करणे हा काही त्रास नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, " चालू दे, चालू दे, मित्रा, तुझे टाके घालण्याचे काम चालू दे. म्हणींवर म्हणी रचण्याचे काम चालू दे. अरे माणसा, साऱ्या म्हणी ओकून टाक. येथे कोणी येत नाही. माझी आई मला चाबकाने मारते आणि मी गाडींवर चाबूक मारतो. प्रत्येक ठिकाणी म्हणीचे चऱ्हाट वळण्याचे तू सोडून दे. जुन्या म्हणींचे पुराण सांगण्याची चूक तू नेहमी करीत असतोस. पण गेल्या वर्षीच्या बर्फाप्रमाणे त्यांचा काही उपयोग नसतो. सँको, माझे म्हणणे नीट लक्षात घे. म्हणींचा उपयोग करणे मी निषिद्ध मानीत नाही, पण त्यांची अशी खिचडी करण्याने आणि गोंधळ करण्याने सारे संभाषण खोटे आणि भिकार वाटू लागते. तू तसे करतोस. म्हणींमागून म्हणी केसाने बांधून तू फरफटत आणतोस आणि फेकून देतोस.

" तू जेव्हा घोड्यावर बसशील, तेव्हा आपले सारे शरीर घोड्याच्या ढुंगणावर झोकून देऊ नकोस आणि आपले पाय ताठ ठेवू नकोस नि घोड्याच्या पोटापासून ते फाकवू नकोस. आपण अजून डॅपलवर बसलो आहो असे समजून तू आपले पाय सैल सोडू नकोस. कारण घोड्यावर बसण्याच्या ऐटीवरून नि रुबाबावरून हा माणूस मोतद्दार आहे की सभ्य आहे हे कळून येते. झोप माफक घे. कारण जो माणूस सूर्याबरोबर उठत नाही त्याचा बहुतेक सारा दिवस वाया जातो. शिवाय सँको, हे लक्षात ठेव की, उद्योगशीलता ही भाग्याची जननी आहे. उलट, आळशीपणामुळे कोणतेही चांगले व सदिच्छेचे कार्य तडीस जात नाही.

" आता समारोपादाखल मी तुला जो उपदेश करणार आहे, तो तुझ्या शरीर–शोभेला अनुलक्षून नसला तरी तू आपल्या स्मृतीत कायमचा कोरून ठेव. मी आतापर्यंत तुला केलेल्या उपदेशाइतकाच हाही उपदेश तुला लाभदायक होईल, असे मला वाटते. आणि तो उपदेश हा—

" कोणतेही भांडण अंगावर घेऊ नकोस. घराण्याच्या मोठेपणाविषयीच्या कोणत्याही वादाचा निर्णय करू नकोस. कारण तुलना केली की एक दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठ ठरतो. तू ज्याला कनिष्ठ ठरविशील तो तुझा द्वेष करील. पण ज्याला तू श्रेष्ठत्व देशील, तो स्वतःला तुझा उपकृत मानणार नाही.

" पोशाखासंबंधी सांगावयाचे तर, घट्ट पायजमा आणि पायमोजे, लांब कोट

आणि त्याहून लांब असा अंगरखा घालीत जा. घोट्यापाशी रुंद असलेले पायजमे किंवा सैल पायमोजे घालण्यास मी तुला सांगत नाही. कारण, ते योद्धयांना किंवा व्यापाऱ्यांना शोभत नाहीत.

" मित्रा सँको, यावेळी मी तुला करावयाचा सारा उपदेश इतकाच ! यानंतर तुझ्याकडून मला काही वार्ता कळली, तर प्रसंगास आणि अडचणीस अनुसरून योग्य तो उपदेश मी तुला देईन. "

सँको म्हणाला, " महाराज, आपण मला जे काही सांगितले, ते सारे फारच चांगले आहे, उपयुक्त आहे आणि कार्याला पोषक आहे हे मला चांगले कळते. पण मी जर ते डोक्यात ठेवू शकलो नाही, तर मी सुधारणार कसा ? नखे काढण्यासंबंधी आपण मला जे सांगितले तें मी सहजासहजी विसरणार नाही. आणि माझ्या बायकोचे दफन करण्याचे भाग्य मला लाभले तर, पुनः लग्न करण्याचे बाबतीत आपण दिलेल्या सूचना मी विसरणार नाही. पण बाकीचे सारे भरताड आणि इतर सटर–फटर गोष्टी यांच्यातील एक अक्षरसुद्धा मला आठवणार नाही. गेल्या वर्षी आकाशात जमलेल्या ढगांचे आकार जसे माझ्या आठवणीत राहात नाहीत, तसेच हे होईल. म्हणून माझी विनंती अशी आहे की, आपण मला हे सारे पांढऱ्यावर काळे करून लिहून द्या. आता हे खरे की, मला लिहिता–वाचता काही येत नाही. पण मी आपले लेखन माझ्या पाद्र्याकडे देईन आणि तो ते प्रसंगानुसार माझ्या डोचक्यात ठाकून–ठोकून बसवील. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " हाय रे देवा ! राज्यपालाला लिहिता–वाचता येत नाही हे किती निंदास्पद दिसते ! सँको, मी तुला हे सांगणे अवश्य आहे की, माणसाने इतके निरक्षर किंवा अडाणी असणे याचा अर्थ त्याचे आई–वडील अत्यंत गरीब आणि क्षुद्र असले पाहिजेत किंवा त्याचा स्वभाव इतका विचित्र असला पाहिजे की, ज्ञानाचे किंवा कोणत्याही चांगल्या गोष्टीचे संस्कार ते ग्रहण करू शकत नसेल. अभागी जीवा, मला तुझी दया येते. तुझ्या अंगी खरोखर हा फार मोठा दोष आहे. अरे, निदान आपले नाव लिहिण्यास तरी शीक. " सँको म्हणाला, " अं:, तेवढे मला चांगले येते. मी माझे नाव लिहू शकतो. जेव्हा मी आमच्या प्रार्थना–मंदिरात काम करीत होतो, तेव्हा काही अक्षरे खरडण्यास मी शिकलो. मालाच्या गठ्ठ्यांवर लोक काही अक्षरे लिहीत आणि ती माझ्या नावाचीच आहेत असे ते मला सांगत. शिवाय माझा उजवा हात थोटा आहे, असे सोंग मी करीन आणि म्हणून डाव्या हाताने सही करीन. अहो, मृत्यूशिवाय साऱ्या गोष्टींवर उपाय आहे. माझ्या अंगी शक्ती असल्यामुळे माझ्या इच्छेस येईल ते काम मी करीन. कारण, अशी म्हणच आहे ना ? ' ज्याचा बाप न्यायाधीश असतो तो आपल्या खटल्यासाठी न्याय–मंदिरात निर्धास्तपणे जातो, ' आणि मी राज्यपाल आहे– म्हणजे न्यायाधीशापेक्षा मोठा आहे असे मी समजतो. नवे राजे, नवे कायदे. कोणीही यावे आणि माझ्याशी डावपेच खेळावे. ते जर माझ्या तोंडावर माझी निंदा करू लागले, तर मी त्यांची निंदा करीन. ते माझ्याकडे लोकर मागावयास आले, तर मी त्यांच्या अंगावरील लोकर काढून

घेईन. ‘देव कृपा करी, सुख त्याचे घरी.’ या जगात श्रीमंत माणसांची मूर्ख वचने शहाणपणाची मानली जातात. म्हणून मी श्रीमंत असल्यामुळे – राज्यपाल असल्यामुळे– त्यातही उदार असल्यामुळे ( तसे होण्याची माझी इच्छा आहे. ) माझ्या अंगी काहीही दोष राहणार नाहीत, हे आपण लक्षात घ्या. ‘तुम्ही आपले अंग मधाने माखा म्हणजे माशांचा तुटवडा तुम्हाला कधी पडणार नाही.’ माझी म्हातारी आजी म्हणे, ‘माणसाजवळ जितकी संपत्ती असेल, तितके त्याचे स्थान भक्कम असते.’ ‘मांजराच्या गळ्यात घंटा कोण बांधणार ?”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “पुनः तू म्हणींचा गोंधळ पोटभर केलास. छप्पन्न हजार सैतान तुला आणि तुझ्या भिकार म्हणींना आपल्या ताब्यात घेवोत. याक्षणी तू त्या म्हणी, कांद्याच्या माळेप्रमाणे, एकत्र गुंफीत आहेस आणि त्यांचे विष मला चारीत आहेस. मी खात्रीने सांगतो, या दुष्ट म्हणी एखादे दिवशी तुला फासावर लटकवितील. तुझ्या बेटावरील लोक त्या म्हणीमुळे तुला अधिकारपदावरून खाली खेचतील-निदान सर्वांना उपद्रव देणारा म्हणून तुला ते टाळतील. अरे, तू अज्ञानाचा अर्क आहेस! तू या म्हणी कोठून गोळा करून आणल्यास ? आणि त्यांचा वापर करण्यास तुझ्या मठ्ठ डोक्याला कोणी शिकविले ? एक म्हण जरी उच्चारावयाची आणि योग्य रीतीने वापरावयाची म्हटले तर मी घामाघूम होतो– जणू काही मी जमीन खणीत आहे किंवा धान्य मळीत आहे.”

सँको म्हणाला, “भले धनीसाहेब, किती क्षुद्र गोष्टीमुळे आपण धावत–पळत सुटता ? माझ्या मालमत्तेचा मी कसा उपयोग करावा, याबद्दल सैतानाने का चिंता करावी ? माझ्याजवळ दुसरी काही मालमत्ता नाही. म्हणींमागून म्हणी हीच माझी मालमत्ता–माझा सारा साठा. आता चार म्हणी माझ्या तोंडातून बाहेर पडण्याच्या बेतात आहेत. एखाद्या टोपलीत फळे भरगच्च भरलेली असावीत, तशा माझ्या डोक्यात म्हणी साठलेल्या आहेत. पण आता आळीमिळी. मौन हेच आता माझे नाव.”

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, “छेः, मी तुला बडबड्या व वटवट्या म्हणेन. तू हट्टी-गप्पिष्ट आहेस, पण आपल्या विषयाला अनुरूप अशा ज्या चार संस्मरणीय म्हणी तुझ्या ओठावर घोळत आहेत त्या मी आनंदाने ऐकेन. माझी स्मृती बरीचशी चांगली आहे. तरी पण मला एकही म्हण आठवत नाही.” सँको म्हणाला, “महाराज, या म्हणींपेक्षा चांगल्या म्हणी दुसऱ्या कोणत्या असतील ? ‘दोन दुधाच्या दातामध्ये तू आपले आंगठे कधी ठेवू नकोस,’ ‘जेव्हा एखादा माणूस तुम्हाला म्हणतो, ‘माझ्या बायकोशी तुला काय करायचे आहे ? तू माझ्या घरातून चालता हो,’ तेव्हा तू काहीही उत्तर देऊ नयेस.” आणखी एक म्हण ‘गाडगे दगडावर आपटले काय आणि दगड गाडग्यावर पडला काय ? शेवटी गाडगेच फुटणार.’ महाराज, या साऱ्या म्हणी तंतोतंत माझ्याशी जुळतात. राज्यपालाच्या कारभारात कोणी ढवळाढवळ करू नये. केल्यास त्याला पश्चात्ताप करावा लागेल, हे निश्चित. दोन दुधाच्या दातांमध्ये (ते दुधाचे दात

नसून साधे दात असले तरी चालेल ) आपले बोट घालणाऱ्या माणसाला असाच पस्तावा करावा लागतो. दुसरी गोष्ट म्हणजे, राज्यपाल काहीही बोलला तरी त्याला कोणी उलटून बोलता कामा नये. ' माझ्या बायकोशी तुला काय करावयाचे आहे ? तू माझ्या घरातून चालता हो, ' असे जर कोणी म्हटले तर, आपण गप्प बसले पाहिजे. तसेच हे आहे. ' गाडगे आणि दगड ' यांच्या म्हणीचा अर्थ आंधळ्या माणसालाही दिसेल. ज्याला दुसऱ्या माणसाच्या डोळ्यातील कुसळ दिसते, त्याने आपल्या डोळ्यातील मुसळ बाहेर काढले पाहिजे म्हणजे लोक असे म्हणणार नाहीत की, गाडगे मडक्याला काळे म्हणून हिणविते. मेलेल्या बाईलाही पिसूची भीती वाटते. शिवाय महाराजांना हे माहीतच आहे की, शहाण्या माणसाला दुसऱ्याच्या घरी जितके ज्ञान असते, त्यापेक्षा मूर्ख माणसाला स्वतःच्या घरी अधिक असते. "

डॉन क्विक्झोट उत्तरले, " सँको, चुकतोस तू. मूर्खाला कसलेच ज्ञान नसते—मग तो स्वतःच्या घरी असो की दुसऱ्याच्या. कारण मूर्खपणाच्या भुसभुशीत पायावर ज्ञानाची भक्कम इमारत कधीच उभारता येत नाही. पण आपण हा संवाद तोडू या. तू जर चांगल्या राज्यपालाचे कर्तव्य पार पाडले नाहीस, तर तो तुझा दोष ठरेल. पण त्याचे अपश्रेय मला मिळेल आणि त्याची मला लाज वाटेल. तरीही मला एवढे समाधान राहील की, मला शक्य तितका उत्तम आणि अत्यंत उपयुक्त असा उपदेश तुला करण्याचे कर्तव्य मी केलेले आहे. तुझ्या राज्यकारभारात प्रभू तुला मार्गदर्शन करो आणि तुझा उत्कर्ष होवो. त्या भिकार बेटामध्ये तू साऱ्या गोष्टी उलट्यापालट्या करशील, ही माझी भीती प्रभू खोटी ठरवो. तुझ्या अंतरंगाचे पूर्ण ज्ञान मी जर ड्यूकला करून दिले, आणि तुझे गिचमीड डोके म्हणजे केवळ म्हणींचे कोठार आणि लुच्चेपणाने भरलेले पोते आहे, असे मी त्यांना जर पटवून दिले, तर त्यामुळे तुला त्या बेटाचे राज्य मिळण्यास प्रतिबंध होईल. पण मला तसे करावयाचे नाही. "

सँको म्हणाला, " हे पहा महाराज, या राज्यपदाला मी योग्य नाही असे आपल्याला वाटत असेल, तर यापुढे मी त्याचा विचारही करणार नाही. म्हणतात ना, तसा माझ्या जीवाच्या नखाचा तुकडासुद्धा मला माझ्या साऱ्या शरीरापेक्षा अधिक प्रिय आहे. मी साधासुधा सँको म्हणून राहू शकेन आणि कोंबडी खाणाऱ्या राज्यपालाइतकाच लसूण—भाकरीचे जेवण करून मी संतुष्ट राहीन. राव—रंक किंवा उच्च—नीच सर्वांना मृत्यू आणि निद्रा समान करते. माझ्या डोसक्यात ही राज्याची कल्पना प्रथम कोणी घातली हे आपण जरा आठवा म्हणजे आपणच ते काम केले आहे असे आपल्याला आढळेल. बेटे आणि राज्यपाल यांच्या अधिकारात काय वसते हे एकाद्या आंधळ्या पक्ष्यापेक्षा मला जास्त माहीत नाही. मी राज्यपाल झालो तर सैतान माझा कबजा घेईल असा तुमचा तर्क असेल, तर मला साधा सँको राहून स्वर्गात जाऊ द्या. राज्यपाल होऊन पाताळात जाण्यापेक्षा ते चांगले. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, तुझ्या या अखेरच्या शब्दांमुळे तू हजार

बेटांचे राज्य करण्यास लायक आहेस, असे सिद्ध होते, असे माझे मत आहे. तुझा स्वभाव मूळचा चांगला आहे. सुस्वभावाशिवाय सारे ज्ञान अपूर्ण असते. त्या दैवी शक्तीवर विश्वास ठेव आणि सरळ मार्गापासून कधीही च्युत होऊ नकोस. तुझ्यापुढे जी जी कामे येतील, त्यांची पूर्ण माहिती घे आणि आपला निश्चय व हेतु कायम ठेव. न्यायाने वाग. ईश्वराची कृपा नेहमी सद्भावावर असते. आता आपण भोजनास जाऊ या. कारण ड्यूक आणि डचेस आपली वाट पहात असतील, असे मला वाटते."



## प्रकरण ४४

# सँको पँझाला त्याच्या राज्याकडे कसे नेण्यात आले आणि डॉन क्विक्झोट यांच्यावर त्या किल्ल्यात कोणते विचित्र संकट कोसळले याचा वृत्तांत

[ या इतिहास-ग्रंथाच्या परंपरागत वृत्तांतावरून आपल्याला हे कळून येते की, या प्रकरणाच्या आरंभी मूळ अरबी मजकूर आणि त्याचे भाषांतर यामध्ये उघड उघड फरक आहे. सिड् हॅमेट याने मूळ लेखात स्वतःवर टीका करण्याची संधी साधली आहे. डॉन क्विक्झोट व सँको यांचा फक्त इतिहास सांगण्याचे शुष्क व मर्यादित कार्य अंगावर घेतल्याबद्दल आणि मनोरंजक व वजनदार असा उपकथांचा व विषयांतराचा मजकूर लिहिण्याचे स्वातंत्र्य स्वतः गमावल्याबद्दल त्याने स्वतःवरही टीका केलेली आहे. आपली कल्पनाशक्ती, आपला हात आणि आपली लेखणी एकाच विषयाला बांधून टाकलेली आहेत आणि आपल्या कल्पना काही थोड्या पात्रांच्याच भाषणापुरत्या मर्यादित आहेत, ही अडचण दूर करण्यासाठी त्याने या इतिहासाच्या पूर्वार्धात 'असंतुष्ट पिशाच्च' व 'बंदिवान' अशा कादंबऱ्या समाविष्ट केल्या. अर्थातच त्या मूळ कथानकापासून अगदी वेगळ्या होत्या. त्या भागात त्याने ज्या इतर गोष्टी सांगितल्या त्या डॉन क्विक्झोट यांच्या कार्याच्या कक्षेत सहजच पडतात आणि म्हणून त्यांना या ग्रंथात स्थान मिळणे अवश्य आहे. तसेच त्या ग्रंथकाराने आपले असे मत नमूद केले आहे की, डॉन क्विक्झोट यांच्या साहसी कृत्याकडे वाचकांचे पुष्कळसे लक्ष वेधले जाणे स्वाभाविक आहे आणि वरील कादंबऱ्यांचे स्वागत वाचकवर्ग उदासीनपणे करील—किंवा निदान त्यावर वरवर नजर टाकील, पण त्यांची कृत्रिम रचना अगदी उघड असली तरी वाचकांच्या ध्यानी येणार नाही. डॉन क्विक्झोट यांच्या वेडपटपणाचा किंवा सँकोच्या आगाऊपणाचा भाग मधूनमधून न येता त्या कादंबऱ्या स्वतंत्रपणे प्रसिद्ध झाल्या असत्या, तर तो कृत्रिमपणा उघडकीस आला असता. म्हणून ग्रंथकाराने या उत्तरार्धात साऱ्या पृथक् व स्वतंत्र गोष्टी गाळल्या आहेत. फक्त मुख्य कथानकातून सहजगत्या निघणाऱ्या उपकथानकांचा त्याने समावेश केला आहे. त्या उपकथाही क्वचितच आलेल्या आहेत आणि शक्य तितक्या गांभीर्याने निवेदिलेल्या आहेत. ग्रंथकाराने स्वतःला अशी संकुचित मर्यादा घालून घेतली असल्यामुळे आणि आपली बुद्धी व इतर गुण सीमित केले असल्यामुळे व प्रस्तुत ग्रंथाच्याच विषयाला आपली सारी बुद्धी ( अन्य विशाल विषय

हाताळण्याची तिची पात्रता असतानाही ) वाहिलेली असल्यामुळे या ग्रंथाचे महत्त्व वाढेल असे त्याला वाटते. म्हणून आपण जे लिहिले, त्यापेक्षा आपण जे लिहिण्याचे टाळले, त्याबद्दल आपली प्रशंसा होईल, असे त्याला वाटते. यानंतर त्याने आपले इतिहास–कथन पुढीलप्रमाणे चालू केले आहे— ]

जेवण आटोपल्यावर डॉन क्विक्झोट यांनी आपल्या तोंडी सूचना एका कागदावर लिहून सँकोला दिल्या आणि त्या कोणाकडून तरी वाचून घेण्यास बजावले. पण त्या सूचनांचा कागद हाती पडतो न पडतो तोंच त्या सेवकाच्या हातातून तो खाली पडला– आणि पडला तो नेमका ड्यूकच्या हातात. ते त्याने डचेसला सांगितले. तेव्हा त्या दोघांना वाटले, डॉन क्विक्झोट यांचा समंजसपणा व स्वैरपणा यांच्या मिश्रणाचे कौतुक करण्यास ही नवी संधी आपल्याला मिळाली आहे. आपली विनोदी योजना पुढे चालविण्यासाठी त्यांनी त्या दिवशी दुपारी सँकोला योग्य तो लवाजमा देऊन त्याच्या राज्याकडे रवाना केले. ते राज्य कोठेही असले तरी सँकोच्या दृष्टीने बेटच होते.

या नव्या व्यूहाची व्यवस्था ड्यूकच्या एका कारभाऱ्याकडे सोपविली होती. तो अधिकारी थट्टेखोर स्वभावाचा होता. एखादी मजेदार योजना सुरू करण्याचे चातुर्यच त्याच्या अंगी होते असे नव्हे, तर ती अंमलात आणण्याचा शहाणपणाही त्याचे अंगी होता. हे दोन्ही गुण एकत्र आले म्हणजे मोठा सुखद संगम साधला जातो. मात्र सदभिरुची संभाळल्याशिवाय कोणतीही योजना खरोखर सुखद होत नाही. यापूर्वी त्याने सरदारीण ट्रिफाल्डीचे सोंग अत्यंत यशस्वीपणे घेतले होते आणि सँकोशी कसे वागावे यासंबंधी आपल्या धन्याने दिलेल्या सूचनांचे पालन इतके चोख केले होते की, त्याचे कोणालाही आश्चर्यच वाटावे. आता घडले ते असे की, सँकोने त्या अधिकाऱ्यावर आपली नजर टाकताच त्याला भास झाला की, आपण ट्रिफाल्डीचाच चेहरा पहात आहोत. म्हणून आपल्या धन्याकडे वळून तो म्हणाला, "येथे ड्यूकचा जो कारभारी आहे त्याचे तोंड थेट लेडी ट्रिफाल्डीसारखे आहे असे मी म्हणतो. ते आपल्याला मान्य नसेल तर सैतान मला खाऊन टाको." डॉन क्विक्झोटनी त्या अधिकाऱ्याकडे अत्यंत बारकाईने पाहिले आणि त्याचे नखशिखांत निरीक्षण केले व ते म्हणाले, "सँको, या गोष्टीचा निर्णय करण्यासाठी तुला सैतानाच्या तोंडी जाण्याची गरज नाही. त्या दोघांचे चेहेरे अगदी सारखे आहेत हे मला दिसते. तरीसुद्धा हा कारभारी आणि ती निराश महिला एकच असू शकणार नाहीत. कारण त्यामुळे फार मोठा घोटाळा होईल. किचकट आणि अवघड अशा शंका–कुशंकामध्ये आपण सापडू आणि त्यांची चर्चा किंवा छाननी करण्यास आता आपल्याला वेळ नाही. मित्रा, या दुष्ट जादूटोण्याच्या प्रभावातून मुक्त होण्याइतकी आपली निष्ठा उत्कट नाही हे तू लक्षात घे." सँको म्हणाला, "महाराज, आपल्याला वाटत असेल की मी चेष्टा करीत आहे, पण आत्ताच त्याने आपले तोंड उघडले तेव्हा त्याचे शब्द माझ्या कानावर पडले असताना मला वाटले, मॅडम ट्रिफाल्डीचाच स्वर माझ्या कानात घुमत आहे. पण आता मी गप्प रहातो–काही बोलत

नाही–मात्र माझा संशय खरा की खोटा हे शोधून काढण्यासाठी मी त्याच्या हालचाली-वर नजर ठेवीन. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " ठीक आहे. तसे कर. या बाबतीत तू जे जे शोध लावशील ते आणि तुझ्या राज्यातील इतर घटना मला कळविण्यास चुकू नकोस. "

शेवटी सँको असंख्य माणसांचा लवाजमा घेऊन निघाला. त्याच्या अंगावर लांब झगा होता आणि आत इतर कपड्यांवर एक पांढरा डगला व डोक्यावर टोपी होती. तो एका नर–खेचरावर आखूड रिकिबीने बसला होता. ड्यूकच्या हुकुमावरून त्याच्या-मागे डॅपलला नेले जात होते. एखाद्या दरबारी घोड्याप्रमाणे डॅपलच्या तोंडी लगाम व पाठीवर खोगीर घातलेले होते आणि त्यावर भपकेबाज रेशमी झुली टाकलेल्या होत्या. ते पाहून सँकोला इतका आनंद वाटला की, त्याच्याकडे पाहण्यासाठी तो वारंवार मागे वळून पाही. तेव्हा त्याला इतके सुख वाटत होते की, जर्मनीच्या सम्राटाशीही त्याने आता आपल्या नशिबाची अदलाबदल केली नसती. तेथून निघताना त्याने ड्यूक व डचेस यांच्या हातांचे चुंबन घेतले व आपल्या धन्याचे आशीर्वाद मिळविले. त्यावेळी डॉन रडू लागले आणि सँको तर खूप वेळ ओक्साबोक्शी रडू लागला.

वाचकहो, आता त्या थोर राज्यपालाला शांततेने जाऊ द्या आणि आपण त्याचा प्रवास सत्वर पूर्ण होवो अशी इच्छा करू या. त्याचा राज्यकारभार जेव्हा सुरू होईल तेव्हा तुम्हाला हसू येईल. तोपर्यंत आपण त्याच रात्री त्याच्या धन्याच्या नशिबी काय आले हे पाहू या. त्यामुळे तुम्हाला मोठे हसू लोटणार नसले, तरी तुमचे ओठ आत जातील आणि माकडाप्रमाणे तुम्ही आपले दात दाखवाल. त्याच्या पराक्रमाचे वैशिष्ट्य हेच की, त्यामुळे आश्चर्य किंवा मौज नेहमी वाटत असते.

या इतिहासात असे नमूद केले आहे की, सँकोच्या प्रयाणानंतर लगेच डॉन क्विक्झोट यांना त्याचा विरह जाणवू लागला. त्यांच्या आटोक्यात असते तर त्यांनी आपला अधिकार गाजवून त्याचे नियोजित कार्य त्याच्यापासून हिरावून घेतले असते. त्यांची अस्वस्थता पाहून आणि त्यांच्या खिन्नतेचे कारण समजावून घेण्याची इच्छा असल्यामुळे, डचेसने त्यांना सांगितले, " सँकोच्या वियोगामुळे आपण जर इतके अस्वस्थ झाला असाल, तर त्याच्या जागी आपण सांगाल ती सेवा करण्यास, मी पुरेसे सेवक आणि तरुणी पाठवीन. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " बाईसाहेब, हे खरे आहे. सँकोच्या वियोगामुळे मी काहीसा अस्वस्थ झालो आहे. पण माझ्या सध्याच्या अस्वस्थतेचे दुसरेच एक भक्कम कारण आहे. राणीसाहेबांनी माझ्यावर ज्या कृपा–प्रसादांचा वर्षाव केला आहे, त्यांचा स्वीकार करण्याचे मी नाकारतो याची क्षमा असावी. ज्या सदिच्छेने आपण माझ्यावर हे सारे अनुग्रह केले आहेत, तिचाच तेवढा स्वीकार मी करतो. यापुढे मला अभिलाषा आहे ती फक्त, मी माझ्या खोलीत एकटाच राहून स्वतःचा सेवक होण्यास राणीसाहेबांनी मला अनुज्ञा द्यावी, हीच आहे. " डचेसने उत्तर दिले, " महाराज, मी आपली क्षमा मागते. आपण एकटे रहावे याला मी संमती देऊ

शकत नाही. गुलाबाप्रमाणे फुलणाऱ्या चार दासी आपल्या सेवेस सिद्ध आहेत." डॉन क्विक्झोट उत्तरले, "त्या मला गुलाबासारख्या वाटणार नाहीत– माझ्या बुद्धीला टोचणारे ते काटे वाटतील. त्या जर माझ्या खोलीत आल्या तर त्यांना खिडकीतून उडी मारून बाहेर जावे लागेल. माझ्यासारख्या नालायक माणसावर आपण आपल्या अनुग्रहांची जी रास रचली आहे, तिच्यावर कळस चढविण्याची आपली इच्छा असेल तर मी आपली विनवणी करतो की, मला एकट्याला मोकळे सोडा आणि माझ्या हातांनी माझी सेवा करू द्या. बाईसाहेब, माझ्या खोलीच्या दारातून कोणत्याही वासना आत शिरता कामा नयेत. कारण माझ्या खोलीच्या भिंती या नेहमी माझ्या पावित्र्याच्या तटबंदी ठरलेल्या आहेत. आपण माझ्यावर कितीही औदार्याचा वर्षाव केला, तरी मी माझ्या या नियमाचे उल्लंघन कधीच करणार नाही. थोडक्यात म्हणजे, दुसऱ्या कोणी माणसाने माझ्या अंगावरील कपडे उतरविण्यापेक्षा मी रात्रभर तसाच पडून राहीन."

डचेस म्हणाली, "उमद्या शिलेदारा, पुरे, पुरे. मी माझा आग्रह सोडते. आपल्या एकांताचा भंग करण्यास एखादी आगंतुक दासीच काय, पण एखादी गुणगुणणारी माशीसुद्धा येता कामा नये असे हुकूम मी सोडते. सभ्यतेचे उल्लंघन ज्यामुळे डॉन क्विक्झोट यांना करावे लागेल, अशी कोणतीही गोष्ट मी त्यांच्यावर लादणार नाही. माझा तर्क बरोबर असेल तर ज्या अनेक गुणांनी ते अलंकृत आहेत, त्यामध्ये विनय हा त्यांचा अनन्यसाधारण गुण आहे. म्हणून महाशय, आपले मर्जीप्रमाणे आणि आपल्या इच्छेस येईल तेव्हा आपण आपल्या अंगावर स्वतः कपडे चढवा किंवा उतरवा. तुम्हाला कोणाचाही उपद्रव होणार नाही. नैसर्गिक विधीसाठी तुम्हाला आपल्या खोलीचे दरवाजे उघडण्याची पाळी येऊ नये म्हणून, तुमच्या खोलीत रात्रीच्या वेळी तुम्हाला ज्या ज्या वस्तू लागतील त्या सर्व ठेवण्याची काळजी घेतली जाईल. आपल्यासारख्या पराक्रमी, पवित्र व एकनिष्ठ शिलेदारजींचे प्रेम जिने आपल्या गुणांनी संपादन केले आहे, ती टोबोसोची महान डल्सीनिया सहस्रयुगे जगो आणि अखिल पृथ्वीतलावर तिची कीर्ती फैलावो. कृपाळू परमेश्वराने आमचे राज्यपाल सँको पँझा यांच्या मनात आपली शिक्षा सत्वर पूर्ण करण्याचे आणावे म्हणजे एवढ्या महान महिलेचे सौंदर्य पुन्हा विस्मित जगाच्या दृष्टीस पडेल." डॉन क्विक्झोट उत्तरले, "बाईसाहेब, आपल्याला शोभेल असेच आपण बोलला. आपल्यासारख्या सर्वोत्तम स्त्रीच्या तोंडून स्वतःच्या भलेपणाला व उदारपणाला शोभतील असेच शब्द बाहेर पडणार. आपल्यासारख्यांनी प्रशंसा केल्यामुळे डल्सीनियाला विशेष सुख वाटेल हे खचित. जगातील उत्तमोत्तम वक्त्यांनी तिची थोरवी लोकांपुढे मांडली असती, त्यापेक्षा आपल्यासारख्या राणीसाहेब तिच्या स्तुतिपाठक झाल्या म्हणून तिची प्रतिष्ठा खचित उंचावली आहे."

हा संवाद बाजूस सारून डचेस म्हणाली, "महाशय, रात्रीच्या भोजनाची वेळ झाली. माझे स्वामी आपली वाट पहात आहेत. चला तर मग भोजनाला. म्हणजे आपण योग्य वेळी झोपी जाल. कारण काल आपण कॅन्डायापर्यंत जो दीर्घ प्रवास केला,

त्यामुळे आपण अद्याप थकलेले असाल." डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले. "बाईसाहेब, खरे सांगायचे तर मला थकवा मुळीच वाटत नाही. कारण क्लॅव्हिलेनोपेक्षा अधिक जलदीने जाणाऱ्या पण सुखाने नेणाऱ्या दुसऱ्या घोड्यावर मी कधीच बसलेलो नाही, हे मी आपल्याला शपथेवर सांगतो. असा वेगवान आणि शांत घोडा सोडण्यास मॅलॅमब्रूनो का तयार झाले आणि अशा प्रकारे त्याला जाळून टाकण्यासही का प्रवृत्त झाले, याची मला कल्पना करता येत नाही." डचेस म्हणाली, "याचे कारण असे मानले पाहिजे की, सरदारीण ट्रिफाल्डी आणि तिच्या सेविका यांनाच नव्हे तर, इतर पुष्कळ लोकांना त्याने जो अपाय केला, त्यामुळे त्याला दुःख वाटले. जादूगार व मांत्रिक म्हणून त्याने जी पुष्कळ दुष्कृत्ये खचित केली असतील, त्याचा पश्चात्ताप झाल्यामुळे आपल्या दुष्ट व्यवसायाची साधने नष्ट करण्याची इच्छा त्याला झाली असावी. त्यातील मुख्य साधन म्हणजे क्लॅव्हॅलिनो, ते त्याने भस्मसात् केले. त्या यंत्राच्या साहाय्याने तो सर्व जगभर भटकला होता. कदाचित असेही कारण असू शकेल की, डॉन क्विक्झोटसारखा महा-पुरुष ज्याच्यावर स्वार झाला, त्या घोड्यावर बसण्यास दुसरा कोणताही माणूस लायक नाही असे त्याला वाटले असावे. म्हणून त्याने त्या घोड्याचा विध्वंस केला. त्यामुळे, आणि त्याने उभारलेल्या चर्मपटावरील लेखाने, आपले शौर्य शाश्वत स्वरूप पावले आहे."

डॉन क्विक्झोट यांनी डचेसला प्रति-धन्यवाद दिले. भोजनोत्तर ते आपल्या खोलीत गेले. आपल्या सेवेस कोणी येऊ नये असे त्यांना वाटत होते. शिलेदारीचा तुरा आणि आदर्श अशा अॅमॅडिसची निष्ठा त्यांनी आपल्या मनश्चक्षुपुढे कित्ता म्हणून ठेवली होती. आणि म्हणून आपल्या डल्सीनियाला त्यांनी जी निष्ठा अर्पण केली होती, तिला धोक्यात आणणारा कोणताही मोहाचा प्रसंग आपल्यावर येऊ नये असे त्यांना वाटत होते. म्हणून ते खोलीत गेल्यावर त्यांनी खोलीचे दार बंद केले आणि दोन मेणबत्त्यांच्या उजेडात आपल्या अंगावरचे कपडे स्वतः उतरले. पण काय सांगावे ? अशा थोर माणसावर कधी ओढवू नये असे दुर्भाग्य त्यांचेवर ओढवले. आपले पायमोजे ओढून काढण्याचा प्रयत्न ते करीत असताना एका पायमोज्यावरचे चोवीस टाके उसवल्याचे त्यांना दिसले. त्यामुळे तो पायमोजा जाळीदार खिडकीसारखा दिसत होता. त्यांच्या स्वच्छतेला कमी-पणा आणण्यासारखे त्यात काही नव्हते, तरी पण या भल्या शिलेदारजींना फार दुःख झाले. हिरव्या रेशमाचा तुकडा मिळविण्यासाठी त्यांनी त्यावेळी औंसभर चांदी दिली असती. 'हिरवे रेशीम' असे मी म्हणतो, ह्याचे कारण त्यांचे पायमोजे हिरवे होते.

येथे बेनेनगेलीला पुढील उद्गार काढल्याशिवाय रहावले नाही, "दारिद्र्या ! अरे दारिद्र्या ! तुला 'महान दैवी देणगी' म्हणून कोर्डोव्हा या महाकवीने का संबोधिले ? मी मूर असलो तरी पुष्कळ ख्रिश्चन लोकांशी माझे जे बोलणे झाले आहे त्यावरून मला असे कळले आहे की, पावित्र्यात औदार्य, नम्रता, श्रद्धा, आज्ञाधारकता व दारिद्र्य यांचा समावेश होतो. दरिद्री असतानाही जो माणूस संतुष्ट राहू शकतो, त्याला ईश्वराच्या विशिष्ट कृपेचे पाठबळ मिळालेले असते. तसे नसेल तर, वरील गुणांच्या

यादीत समाविष्ट झालेले दारिद्र्य म्हणजे मनोवृत्तीचे दारिद्र्य होय. त्यामुळे आपल्याला वाटते, या जगातील वस्तूंचा उपभोग त्या आपल्या नाहीत असे समजून घ्यावा. हे दुसऱ्या प्रकारचे जे दारिद्र्य आहे ते फार घातुक आहे. त्याविषयीच मी आता बोलत आहे. इतर लोकांपेक्षा सज्जनावर आणि कुलीन माणसावर या दारिद्र्याचा आघात का व्हावा ? त्यामुळे त्याला आपले जोडे शिवावे लागतात आणि आपल्या फाटक्या बंडीला, कोठे रेशमाचे तर कोठे केसाचे ठिगळ लावावे लागते आणि काचेची बटणे शिवावी लागतात. त्यामुळे त्यांचे दैन्य अधिकच उघड होते. त्यांच्या गळ्याभोवतालचा कापडी गजरा भिकार रंगाचा असतो आणि त्याला सुरकुत्या पडलेल्या असतात– खळ न लावलेल्या घाणेरड्या लक्तरांचा गजरा त्यांना का घालावा लागतो ? ( यावरून तुमच्या लक्षात येईल की, खळ व करडा यांचा उपयोग किती प्राचीन काळापासून केला जात आहे. ) आपली प्रतिष्ठा राखण्यासाठी ज्या दरिद्री सज्जनाला स्वतःची उपासमार करावी लागते, दुःखाने जीवन कंठावे लागते किंवा आपल्या लहानशा एकाकी खोलीत कोणाला नकळत उपास काढावे लागतात आणि नंतर शक्य तितका चांगला मुखवटा धारण करून व आपले दात उगीचच कोरीत जो बाहेर येतो, अशा माणसाचे जिणे किती लाजीरवाणे ! त्याचे वर्तन म्हणजे सन्माननीय दंभ होय ! चांगला व्यायाम करण्याची गरज ज्यामुळे लागते, असे सकस अन्न त्याला कधीच खावयास मिळत नाही. खरोखर तो माणूस किती दुःखी की, ज्याची प्रतिष्ठा सदैव धोक्यात असते, ज्याच्या जोड्याला दिलेले ठिगळ सारे लोक एक मैल अंतरावरून पहात आहेत असे त्याला वाटते, ज्याच्या कपाळीचा घाम त्याच्या जुन्यापुराण्या मळलेल्या टोपीने शोषला जातो, ज्याचे कपडे अगदी तुटपुंजे असतात आणि ज्याच्या उपाशी पोटात भुकेची आग भडकलेली असते ! ”

असे सारे खिन्न विचार डॉन क्विक्झोट यांच्या मनात, त्यांच्या पायमोज्यातील छिद्रामुळे नव्याने उसळले; पण आपल्या मनाच्या समाधानासाठी त्यांनी असा विचार केला की, सँकोने आपल्याला ज्या सपाता ठेवल्या आहेत, त्या आपण उद्या घालू म्हणजे झाले.

सारांश, खिन्न व जड अंतःकरणाने ते झोपी गेले. सँकोच्या गैरहजेरीचा विचार आणि आपल्या पायमोज्याची कधी भरून न येणारी हानी — यामुळे ते बेचैन झाले. दुसऱ्या रंगाचे रेशीम त्यांना मिळाले असते तर त्यांनी त्या पायमोज्याला रफू केला असता. कोणत्याही गरीब सज्जनाच्या दीर्घ दैन्यावस्थेत त्याच्या दैन्याचे प्रदर्शन करणारी ती मोठी खूण होय.

शेवटी त्यांनी दिवे मालविले. पण त्यावेळी इतका भयंकर उष्मा होत होता की, त्यांना विसावा घेणे शक्य नव्हते. म्हणून ते उठले आणि एका जाळीच्या खिडकीचे लहानसे दार त्यांनी उघडले. त्या खिडकीतून सुंदर उद्यान दिसत होते. त्यात काही माणसे हिंडत–बोलत आहेत असे त्यांच्या चटकन लक्षात आले. ते कान देऊन ऐकू लागले. बागेतील माणसांनी आपला आवाज चढविला असल्यामुळे त्यांना त्यांचा संवाद

चोरून सहज ऐकता आला.

एक दुसरीला म्हणत होती, " प्रिय एमेरेनिया, पुरे कर, पुरे कर, मला गाण्याचा आग्रह करू नकोस. तुला माहीतच आहे की, हा पाहुणा ज्या क्षणी या किल्ल्यात आला, तेव्हाच माझे दुःखी डोळे त्याच्यावर खिळले. तेव्हापासून दुःख आणि अश्रू हे माझे सांगाती आहेत. म्हणून मी गाऊ शकत नाही किंवा गाण्यात रस घेऊ शकत नाही. अरेरे ! जेव्हा आपला जीव थाऱ्यावर नसतो तेव्हा सारे संगीत आपल्याला त्रासदायक वाटू लागते. शिवाय तुला हे माहीत आहे की, माझी धनीण खुट्ट झाले की जागी होते. तिने आपल्याला येथे पहावे असे मला मुळीच वाटत नाही — साऱ्या जगाचे राज्य मिळाले तरी मला वाटणार नाही. पण ती जागी होणार नाही असे आपण समजू. तरी माझ्या गाण्याने काय होणार ? मला दुःखात लोटण्यासाठी हा जो नवा एनीअस आपल्या वस्तीस आला आहे, तो जर झोपी गेलेला असेल आणि माझ्या गाऱ्हाण्याचे गाणे त्याच्या कानी पडणार नसेल, तर माझ्या गाण्याला काय अर्थ आहे ? " दुसरी म्हणाली, " प्रिय आल्टिसिडोरा, या विचाराने तू अस्वस्थ होऊ नकोस, अशी माझी प्रार्थना आहे. कारण डचेस गाढ झोपी गेली आहे हे निःसंशय. आपण आणि तुझी इष्ट देवता याशिवाय या घरातील सर्वजण झोपलेले आहेत. तुझा तो प्रियकर जागा आहे हे खचित. आताच त्याने आपली खिडकी उघडली, तो आवाज मी ऐकला. म्हणून म्हणते, माझ्या दुःखी जीवा गा, गा आणि तुझ्या सौम्य स्वराला तुझ्या तंतुवाद्याच्या मधुर संगीताची जोड दे. आपले बोलणे आपल्या धनिणीने कदाचित ऐकले तर आपण थोडी हवा खाण्यासाठी बाहेर आलो, असे सोंग करू. आपल्या खोलीतील उष्मा आपला बचाव करील. " आल्टिसिडोराने उत्तर दिले, " हाय, हाय ! त्याचे मला मोठेसे भय वाटत नाही. माझे विचार माझ्या गाण्यातून प्रगट व्हावेत असे मला वाटत नाही. प्रेमाची जबरदस्त शक्ती ज्यांना माहीत नाही ते मला तुच्छ नि मूर्ख प्राणी समजतील. पण तुझी इच्छाच असेल तर मी गाणे म्हणण्याचे धाडस करते. हृदयात दुःख असण्यापेक्षा तोंडावर लज्जा असणे चांगले. "

असे म्हणून तिने आपल्या तंतुवाद्यावरून इतक्या नाजूकपणे बोटे फिरविण्यास सुरुवात केली की त्यामुळे डॉन क्विक्झोट यांना अत्यंत आनंद झाला. शिलेदारीच्या ग्रंथात त्यांनी रिकामपणी ज्या ज्या पराक्रमाच्या असंख्य गोष्टी वाचल्या होत्या, त्यांनी त्यांच्या मनात एकच गर्दी केली. त्या खिडक्या, त्यांच्या त्या जाळ्या, त्या बागा, त्यातील ती प्रेमगीते, त्या प्रेमपूर्ण भेटीगाठी, त्यांचे ते सुखसंवाद आणि तो नखरेबाजपणा—हे सारे त्यांच्या कल्पनासृष्टीत उभे राहिले. चटकन् त्यांनी असा तर्क केला की, डचेसची एखादी सखी आपल्या प्रेमात पडली असावी आणि आपली प्रेमभावना लपविण्यासाठी ती आपल्या शालीनतेशी झगडत असावी. आपल्या निष्ठेला कोणता धोका येऊ पहात आहे, या कल्पनेने त्यांना भीती वाटली. पण मोहाच्या प्रचंड शक्तीशी सामना देण्याचा त्यांनी पक्का निश्चय केला. आपली हृदय—स्वामिनी, टोबोसोची डल्सीनिया, हिच्यावरील

आपली निष्ठा दृढतर करून त्यांनी ते गीत ऐकण्याचा निश्चय केला. गीत गाणाऱ्या त्या ललनांना, आपण जागे आहोत हे कळावे म्हणून, त्यांनी शिंक आल्याचे सोंग केले. तो आवाज कानी पडताच त्या दोघींना फार आनंद वाटला. कारण, आपण जी थट्टा आरंभिली आहे, ती वाया जाणार नाही अशी खात्री पटण्यासाठी, त्यांना तेच पाहिजे होते. नंतर आल्टिसिडोराने आपले वाद्य पुन्हा नीट लावले आणि पहिला झंकार काढल्यावर ती पुढील गीत गाऊ लागली :—

## नाटकी प्रियाराधनगीत

शिलेदारमहाराज, जागे व्हा, आता प्रेम आक्रमण करीत आहे. उंची गाद्यावर आणखी निजून राहू नका. अप्सरा प्रियाराधन करीत असता, घोरणे ही अतिलज्जास्पद गोष्ट आहे. तुमच्या नेत्र – किरणांनी हृदय जळून कोळसा होत असलेली, उंच आणि कृशांगी सुंदरी अत्यंत दुःखी अवतारात गात आहे ते ऐका ! लोक म्हणतात, तुमची रोजची चिंता असते सुंदरींना संकटातून सोडवण्याची, मग तुम्ही एका विद्ध कुमारिकेच्या जखमेला लेप द्यायला नाही म्हणाल ? बहाद्दर जवाना, मला सांग कुणी शापून तुला अशा लहरींनी कमनशिबी केले, तुझी का कोणी नाराज अस्वली दाई होती की व्यालमादीने तुला पाजले ? अशा जवानाची बढाई त्या आडदांड डल्सीनियाने मारावी हे ठीकच आहे. तिचे नाव वर आले आहे आणि टोलेडोपासून माद्रिदपर्यंत ते जाईल. तिच्या प्रीतीचा ठेवा जर ती मला नुसता देऊन टाकील, तर माझा सगळ्यात चांगला परकर नी झगा मी तिला बदल्यात देईन ! दैवाने तुझा घात योजला तर मी सुखी होईन. नुसते तुझ्या शय्येपाशी असावे–तुला कुरवाळावे–आणि थोपटावे, तुझे केस विंचरावे आणि तुझ्या भरीव डोक्यावरून शिकार शोधीत राहावे–अशी मागणी मी मनापासून मागते. असे मी कधी करू नये असा संदेह येतो. मला नुसते तुझ्या पायाच्या अंगठ्याचे चुंबन घेऊन तुझ्या पावलाची लांबी किती तो वाजवी अंदाज घेता येईल ! मी तुला किती नटवीन–सजवीन आणि किती वैभव तुझ्या हाडावर लादले जाईल ! टोप्या नि मोजे ! डगले नि तुमानी, अजोड मोती नि मोलाची रत्ने ! नीरोसारखा वरतून मला जळत असलेली पाहून माझ्या दुःखाची उपेक्षा करू नकोस, तर माझ्या ज्वाळा विझविण्यासाठी, माझ्या वीरा, एक कृपाकटाक्ष खाली टाक–खरोखर, मी कुमारिका कोंबडी आहे. माझ्याहून कोवळी कधी दिसली नसेल–नुकतीच वाढलेली मी एक पिली आहे. अजून पंधरा पुरी झाली असली तर मला फाशी दे ! हातीपायी धडधाकट आहे मी, माझे केस पायांपर्यंत लटकतात, ती मी सरळ आहे. शंका असेल तर पाहून डोळ्यांवर विश्वास ठेव, खाली येऊन पहा ! माझ्या चिमुकल्या नाकाला जोड नाही आणि चिमणीसारखे तोंड नि दात वैडूर्य मण्यासारखे सारे पिवळे. इथे मला सारे सुंदरी समजतात !

तुम्ही जाणता, मी किती दुर्मिळ संगीतकार (ऐकत असलात तर) तुमच्या मान्यतेसाठी अनुनय करीत आहे. मला सांगता येईल की, माझ्या आवाजाइतकाच माझा स्वभाव

मोहक आहे! अशी नि यासारखी आकर्षणे माझ्यापाशी पुष्कळ आहेत. मी या ठिकाणची तरुणी आहे. अल्टिसिडोरा तुम्हाला मोह पाडो, नाही तर तिची अवस्था कठीण आहे."

प्रणयाराधन करणाऱ्या त्या युवतीने आपले गीत येथे संपविले आणि ज्याचे प्रणयाराधन केले गेले ते शिलेदारजी कुरकुरू लागले. आपल्या अंतःकरणाच्या तळा-पासून दीर्घ श्वास सोडून ते म्हणाले, " मी इतका दुर्दैवी शिलेदार कसा की, कोणतीही तरुणी माझ्या प्रेमात पडल्याशिवाय माझ्याकडे पाहू शकत नाही? टोबोसोची अप्रतिम डल्सीनिया इतकी अभागी कशी की, माझ्या परमोच्च निष्ठेचा अनुभव एकदाही घेण्याची संधी तिला न मिळावी? राण्यांनो, तुम्ही तिचा हेवा का करता? महाराण्यानो, तुम्ही तिचा छळ का करता? वयात आलेल्या युवतींनो, तुम्ही तिचा हक्क लुबाडून घेण्याचा प्रयत्न का करता? सोडा, त्या अभागी सुंदरीला मोकळे सोडा. प्रेमामुळे मी माझे हृदय-कमल तिला वाहिलेले आहे. त्याचा आस्वाद शांतपणे घेण्याचा आनंद तिला लुटू द्या. त्यातच तिचा विजय आहे, वैभव आहे. तिला शरण गेलेल्या माझ्या जीवावर तिचे पूर्ण स्वामित्व आहे. प्रेमळ आगंतुकांनो, गर्दी करून सोडणाऱ्या अप्रिय तरुणींनो, दूर व्हा. फक्त डल्सीनिया माझी मर्दानी वृत्ति सौम्य करू शकेल आणि आपल्या इच्छेप्रमाणे मला घडवू शकेल. तिच्या बाबतीत मी मूर्तिमंत माधुर्य आहे-तुमच्या बाबतीत मी साक्षात् कटुता आहे. तुमच्यामध्ये मला सौंदर्य, शहाणपण, विनय, आनंदी वृत्ती किंवा उदारपणा काही काही दिसत नाही. फक्त डल्सीनियामध्ये हे सारे गुण मला दिसतात. तिच्याशी तुलना केली म्हणजे मला इतर साऱ्या स्त्रिया कुरूप, वेड्या, स्वैराचारी आणि हलक्या कुळात जन्मलेल्या वाटतात. तिच्या सेवेला मी स्वतःला वाहून घ्यावे म्हणूनच निसर्गाने मला या भूतलावर आणले आहे. आल्टिसिडोरा रडो किंवा गावो, जादूगार मूरच्या भयंकर किल्ल्यात जिच्यासाठी मी इतके ठोसे सहन केले त्या डल्सीनियाचा-आणि खास तिचाच-मी अद्याप आहे. दुनियेतील साऱ्या पिशाच्च-विद्यांना तोंड देऊन जिवंत वा मेलेला, कर्तव्यदक्ष, निष्कलंक आणि अढळ निष्ठेचा असा मी तिचा दास आहे." असे म्हणून त्यांनी घाईघाईने खिडकी बंद केली आणि अंथरुणावर आपले अंग झोकून दिले. जणू काही आपला मोठा अपमान झाला आहे, अशा कल्पनेने त्यांना भयंकर संताप आलेला होता. त्यांना आपण थोडा वेळ तेथेच सोडू या. महान सँको पँझा आपला सुप्रसिद्ध राज्यकारभार सुरू झालेला पहाण्यास आपल्याला बोलावीत आहे.



प्रकरण ४५

# महान सँको पँझाने आपल्या बेटाचा ताबा कसा घेतला आणि त्याचा राज्यकारभार कसा सुरू केला, याचा वृत्तांत

[ हे पाताळाच्या निरंतर साक्षीदारा, हे विश्वप्रकाशक तेजोगोला, हे स्वर्गलोकच्या नेत्रा, हे मधुर जल-शोषका, तुला कोणी टिंब्रिअस म्हणतात, तर कोणी फ्रीबिअस म्हणतात, कोठे तुला धनुर्धारी म्हणून संबोधतात तर कोठे भिषग्वर म्हणून संबोधतात ! तू काव्याचा जनक आहेस, संगीताचा संशोधक आहेस, शाश्वतचा जगच्चालक आहेस ! तू कधी अस्त पावताना दिसत असलास तरी तू नित्य उदय पावतोस. हे भास्करा ! तुझ्या साहाय्यानेच मानव मानवाला जन्म देतो. तुझ्या साहाय्याची मी याचना करतो. मी तुझी अशी प्रार्थना करतो की, मला स्फूर्ती दे, माझी मंद कल्पना-शक्ति सतेज व उज्ज्वल कर. त्यामुळे माझे निवेदन, सँको पँझासारख्या महापुरुषाने आपल्या सबंध राज्यकारभारात जी जी कृत्ये केली, त्यांना साजेसे होईल. तुझ्या सामर्थ्यशाली प्रभावाविना मी सुप्त, खिन्न व संभ्रांत होईन. आता मी माझे निवेदन पुढे चालवितो—]

सँको आपल्या सर्व लवाजम्यासह एका शहरात आला. तेथे सुमारे एक हजार रहिवासी राहत होते. ड्यूकच्या सत्तेखालील ते एक उत्तम ठिकाण होते. त्या रहिवाश्यांनी त्याला सांगितले," या ठिकाणचे नाव ' बॅरॅटॅरियाचे बेट ' असे आहे. त्याचे कारण, या गावाचे नाव ' बॅरॅटॅरिया ' ( किंवा स्वस्त गाव) हे आहे किंवा तुम्हाला हे राज्य इतक्या स्वस्तात मिळाले. "[१] त्या शहराला तटबंदी होती. तो वेशीपाशी येताच मुख्य मुख्य अधिकारी व नागरिक आपापल्या औपचारिक पद्धतीने त्याच्या स्वागतासाठी पुढे आले. घंटा वाजू लागल्या. जनतेने आपल्या आनंदाचे सार्वत्रिक प्रदर्शन केले. नंतर नव्या राज्यपालांना मोठ्या थाटामाटाने, ईश्वराला धन्यवाद देण्यासाठी, मोठ्या प्रार्थनामंदिराकडे नेण्यात आले. काही हास्यास्पद समारंभ झाल्यानंतर, त्यांनी सँकोला वेशीच्या किल्ल्या दिल्या आणि बॅरॅटॅरिया बेटाचे कायमचे राज्यपाल म्हणून त्यांचे स्वागत केले. तोपर्यंत सँकोचा पोशाक, त्याची चालचलणूक, त्याची प्रचंड दाढी, आणि नव्या राज्यपालाची बुटकी व जाड आकृति-हे सर्व पाहून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले-या थट्टा-मस्करीची

१ बॅरॅटो म्हणजे स्वस्त.

काहीच कल्पना ज्यांना नव्हती त्यांना तर ते वाटलेच, पण त्या कटांत सामील असणाऱ्या लोकांनाही वाटले.

सारांश, त्यांनी त्याला प्रार्थना–मंदिरातून न्याय–मंदिरात नेले आणि तेथे त्याच्या आसनावर बसविले. नंतर ड्यूकचा कारभारी त्याला म्हणाला, " राज्यपालसाहेब, या देशाची अशी प्राचीन वहिवाट आहे की, या सुप्रसिद्ध बेटाचा ताबा जो कोणी घेईल, त्याने आपल्याला विचारलेल्या काही अवघड व गुंतागुंतीच्या प्रश्नाची उत्तरे दिली पाहिजेत. त्याच्या उत्तरावरून लोक त्याच्या ज्ञानाची नाडी जाणतात आणि त्याच्या कर्तृत्वाचा अंदाज बांधतात. त्यावरून ते ठरवितात की, या माणसाच्या आगमनामुळे आपण हर्ष मानावा की खेद मानावा. "

तो कारभारी बोलत असताना सर्व वेळ सँको आपल्यासमोरील भिंतीवर मोठमोठ्या अक्षरांनी लिहिलेल्या लेखावर नजर रोखून पहात होता. त्याला वाचता येत नसल्यामुळे त्याने विचारले, " त्या भिंतीवर जी अक्षरे रंगविलेली आहेत, त्यांचा अर्थ काय ? " त्याने सांगितले, " महाराज, ज्या दिवशी आपण या बेटाचा कब्जा घेतला त्या दिवसाचा तो वृत्तांत आहे. तो लेख असा आहे—" आज रोजी, अमुक अमुक वर्षाच्या, अमुक अमुक महिन्याच्या, अमुक अमुक दिवशी लॉर्ड डॉन सँको पँझा यांनी या बेटाचा ताबा घेतला. त्याचा उपभोग ते दीर्घकाळ घेवोत. " सँकोने विचारले, " काहो, ज्याला हे लोक डॉन सँको पँझा म्हणतात, तो कोण आहे ? " कारभाऱ्याने उत्तर दिले, " महाराज, आपणच. कारण या बेटावर या आसनावर आरूढ झालेल्या आपल्याशिवाय दुसरा कोणी पॅन्झा आम्हाला माहीत नाही. " सँको म्हणाला, " मित्रा, मग तू हे लक्ष्यात घे की, डॉन हे उपपद माझे नाही आणि माझ्यापूर्वी माझ्या घराण्यातील दुसऱ्या कोणी ते धारण केलेले नाही. फक्त सँको पॅन्झा हे माझे नाव आहे. माझ्या बापाला सँको म्हणत, माझ्या आजाला सँको म्हणत. आम्ही सारे जण पँझा आहोत–डॉन किंवा डोन्रा असे उपपद आमच्या नावाला जोडलेले नाही. तुमचे डॉन हे या बेटातील दगडधोंड्याइतके सवंग असतील असा माझा तर्क आहे. माझ्या म्हणण्याचा अर्थ काय आहे, हे प्रभू जाणतो–आणि ते मला पुरेसे आहे. माझे राज्य फक्त चार दिवसच टिकले, तरी मी माश्यांप्रमाणे त्रासदायक असणाऱ्या साऱ्या डॉनच्या तांड्याची या बेटातून हकालपट्टी करीन. सज्जन कारभाऱ्या, चल पुढे ये, आता तुझा प्रश्न. त्याचे उत्तर मला शक्य तितके चांगले मी देईन–मग त्यामुळे या गावाला खेद वाटो वा हर्ष वाटो. "

त्याच क्षणी त्या न्यायमंदिरात दोन माणसे आली. त्यांपैकी एकाचा पोशाख खेडवळासारखा होता आणि हातात मोठी कात्री घेतलेला दुसरा माणूस शिंप्यासारखा दिसत होता. शिंपी म्हणाला, " महाराज, मी आणि हा शेतकरी आपल्याकडे आलो आहो. हा इमानी माणूस काल माझ्या दुकानी आला. मी एक शिंपी आहे आणि मला चांगले दोस्त लाभलेले आहेत. याने मला कापडाचा एक तुकडा दाखविला आणि

म्हटले, “माझी एक टोपी होण्याइतके हे कापड पुरेसे आहे का?” तेव्हा मी ते कापड मोजले आणि त्याला उत्तर दिले, “होय,” प्रामाणिक शिंप्याविषयी भलतीच शंका घेऊन याने अशी कल्पना केली असेल (अशी माझी कल्पना आहे) की, त्याच्या कापडाचा काही भाग चोरण्याची मला इच्छा असावी (कदाचित् त्याची कल्पना बरोबर असेल). तो म्हणाला, ‘दोन टोप्यांना पुरेल इतके कापड नाही का?’ त्याचा हेतु मी ओळखला आणि त्याला सांगितले ‘पुरेसे आहे.’ नंतर हा दुष्ट थेरडा (जर महाराजांना त्याचे असे वर्णन केलेले आवडेल तर) त्याच सुरात बोलत राहिला आणि ‘त्या कापडाच्या तीन टोप्या होणार नाहीत का?’–शेवटी, ‘पाच टोप्या होणार नाहीत का?’ म्हणून मला विचारू लागला. त्याची गंमत करण्याचे मी ठरविले आणि म्हटले, “होतील.” मग आम्ही करार केला. आता तो टोप्या मागण्यासाठी आला. त्या मी त्याला दिल्या आणि पैसे मागितले. तेव्हा तो म्हणतो, “माझे कापड परत दे, नाही तर त्याची किंमत दे.” सँको शेतकऱ्याला म्हणाला, “इमानी माणसा, हे खरे आहे का?” त्याने उत्तर दिले, “होय महाराज, पण याने माझ्यासाठी ज्या पाच टोप्या बनविल्या, त्या त्याने दाखवाव्या अशी माझी विनंती आहे.” शिंपी म्हणाला, “अलबत्, मी मनापासून त्या दाखवितो.” नंतर आपल्या अंगरख्यातून आपला हात बाहेर काढून त्याने पाच छोट्या छोट्या टोप्या दाखविल्या. खुंट्यावर ठेवाव्या त्याप्रमाणे त्या टोप्या त्याच्या चार बोटांवर व अंगठ्यावर ठेवलेल्या होत्या. तो म्हणाला, “हा भला म्हातारा ज्या पाच टोप्या मागतो, त्या या पहा. त्याच्या कापडाचा लहानसा तुकडाही मी वाया घालविलेला नाही किंवा एक टाकाही मी अधिक घातलेला नाही. कोणाही कारागिराने याचा निवाडा करावा.” त्या टोप्या पाहून आणि तो विचित्र प्रकार जाणून सारे न्यायमंदिर खो खो हसू लागले. फक्त सँको गंभीरपणे बसला होता आणि विचार करीत होता. नंतर तो म्हणाला, “हा खटला फार रेंगाळत ठेवण्याची गरज नाही असे मला वाटते. आणखी काही गाजावाजा न करता न्यायबुद्धीने याचा निवाडा करता येईल. म्हणून हे न्यायमंदिर असा निर्णय देते की, या शिंप्याची ही कारागिरी वाया जावी आणि खेडवळाला आपले कापड गमवावे लागावे. या टोप्या गरीब कैद्यांना देण्यात याव्यात. अशा प्रकारे या प्रकरणाचा शेवट व्हावा.”

सँकोच्या या शिक्षेने सर्व न्यायमंदिरात खसखस पिकली असली, तरी त्याने दिलेल्या दुसऱ्या शिक्षेने त्याचे तितकेच कौतुक झाले. राज्यपालाची आज्ञा अमलात आल्यानंतर दोन म्हातारी माणसे त्याच्यापुढे उभी राहिली. त्यांपैकी एकाच्या हातात लांब छडी होती. तिचा उपयोग तो आधारासाठी काठीसारखा करीत होता. हातात छडी नसलेला दुसरा म्हातारा म्हणाला, “महाराज, काही काळापूर्वी या माणसावर कृपा करून मी त्याला सोन्याचे दहा क्राऊन उसने दिले. मी मागताच त्याने ते पैसे परत करावयाचे होते. मी बराच काळ त्याला ते पैसे मागितले नाहीत. कारण त्याने जेव्हा ते पैसे उसने घेतले, तेव्हा त्याला जितके कष्ट झाले असतील त्याहून

अधिक कष्ट, त्याला ते परत करताना होतील असे मला वाटले. पण मला पैसे देण्याकडे तो काहीच लक्ष देत नाही असे पाहून मी त्याला माझ्या पैशाची मागणी केली; नव्हे, मी त्याला जोराचा तगादा लावला. त्याने मला पैसे देण्याचे नाकारले, एवढेच नव्हे तर, तो माझे काही देणे लागतो हेही त्याने नाकारले आणि म्हटले, " जर तू मला इतके पैसे उसने दिले असलेस, तर मी तुला ते नक्की परत केले असले पाहिजेत. " आता हे कर्ज मी दिले तेव्हा कोणी साक्षीदार नव्हता आणि त्याने बतावणी केल्याप्रमाणे कर्जाची परतफेड झाली तेव्हाही कोणी साक्षीदार नव्हता. म्हणून महाराजांना माझी अशी प्रार्थना आहे की, त्याला शपथ घ्यायला लावा. मला पैसे दिल्याची शपथ त्याने घेतली तर मी त्याला देवासमक्ष आणि जगासमक्ष मोकळ्या मनाने क्षमा करीन. " सँकोने विचारले, " छडीधारी म्हातारेबुवा, यावर आपले काय म्हणणे आहे ? " म्हाताऱ्याने उत्तर दिले, " महाराज, ह्याने मला सोने उसने दिले हे मी कबूल करतो. त्याला आता माझी शपथ पाहिजे आहे, तर मी आपल्याला विनंती करतो की, आपण आपल्या हातातील न्याय-दंड खाली ठेवण्याची कृपा करावी म्हणजे मी ह्याचे पैसे किती सत्याने व प्रामाणिक-पणाने परत केले याची शपथ त्या न्यायदंडाला स्पर्श करून घेईन. "

त्यानंतर राज्यपालांनी आपला न्याय-दंड खाली ठेवला आणि आरोपीने आपल्या हातातील छडी, जणू काही तिची अडचण होत आहे असे वाटून, फिर्यादीचे हाती दिली. मग त्या न्यायदंडावर क्रूसची खूण करून त्याने शपथ घेतली व जाहीर केले, " या माणसाने मला दहा क्राऊन उसने दिले हे खरे आहे, पण ती रक्कम मी त्याच्या हातात खरोखर परत केली आहे. ते तो विसरला आहे आणि म्हणून मला त्या रकमेची मागणी एकसारखा करीत आहे असे मला वाटते. " हे ऐकल्यावर थोर राज्य-पालांनी त्या सावकाराला विचारले, " यावर तुझे उत्तर काय ? " तो उत्तरला, " माझ्या प्रतिपक्ष्याने शपथ घेतली आहे म्हणून माझे समाधान झाले आहे. मी उलट शपथ घेण्यापेक्षा त्याला चांगला ख्रिश्चन मानीन. माझे पैसे परत केले गेले असतील आणि मी ते कदाचित विसरलोही असेन. " नंतर त्या आरोपीने आपली छडी पुन्हा हातात घेतली आणि न्यायाधीशांना नम्र अभिवादन करून तो न्यायमंदिरातून तावडतोब जाऊ लागला. सँकोने ते पाहिले आणि छडीची देवाणघेवाण कशी झाली हा विचार तो करू लागला. सावकाराच्या शांतपणाचे त्याला कौतुक वाटले. डोके पोटावर टेकून आणि अंगठ्याजवळचे बोट नाकावर फिरवून थोडा वेळ विचार केल्यावर सँकोने त्या छडीधारी म्हाताऱ्याला परत बोलाविण्याचा हुकूम अकस्मात् दिला. तो परत आला तेव्हा सँको म्हणाला, " अरे प्रामाणिक माणसा ! ती छडी मला जरा पाहू दे. मला तिचा उपयोग आहे. " तो उत्तरला, " अवश्य, अवश्य, महाराज, ही घ्या. " असे म्हणून त्याने त्याला ती दिली. सँकोने ती घेतली आणि दुसऱ्या म्हाताऱ्याला ती देऊन तो म्हणाला, " आता तू आपल्या मार्गाने जा. ईश्वर तुझा पाठिराखा असो. आता तुझे पैसे तुला मिळाले. " म्हातारा ओरडला, " हे कसे महाराज ? ही छडी सोन्याचे दहा क्राऊन किंमतीची

आहे असे आपल्याला वाटते काय ? " राज्यपाल उद्गारले, " अलबत्! नाही तर मी या दुनियेतील महामूर्ख माणूस ठरेन. आता तुला कळेल की, सर्व राज्याचे शासन करण्याइतकी मला अक्कल आहे. " असे म्हणून त्याने त्या छडीचे त्या उघड्या कोर्टात तुकडे करण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणे करताच त्यातून दहा क्राऊन बाहेर पडले. सारे प्रेक्षक स्तंभित झाले आणि आपला राज्यपाल हा प्रति सॉलोमन आहे असे मानू लागले. ते सँकोला विचारू लागले, " या छडीत दहा क्राऊन आहेत असा तर्क आपण कसा केला ? " त्याने त्यांना सांगितले, " जेव्हा आरोपीने शपथ घेतली तेव्हा त्याने फिर्यादीच्या हातात छडी कशी दिली हे मी पाहिले. ' मी त्याच्या हातात दहा क्राऊन परत दिले ' अशी शपथ त्याने घेतली आणि नंतर फिर्यादीकडून आपली छडी परत घेतली. या सर्व गोष्टीचा विचार केला तेव्हा माझ्या डोक्यात असे आले की, हा पैसा या छडीत ठेवलेला असावा. यावरून तुम्ही हे लक्षात घ्या की, काही काही वेळा राज्यकर्ते बेअकली असले तरी ईश्वर त्यांना योग्य न्याय देण्याचे कामी पुष्कळ वेळा मार्गदर्शन करतो. शिवाय, माझ्या प्रदेशातील पाद्र्याकडून मी अशाच एका व्यवहाराची हकीकत पूर्वी ऐकली होती. जे जे म्हणून लक्षात ठेवण्याची माझी इच्छा असते, ते ते सर्व मी विसरून जातो हे खरे, तथापि माझी स्मृति तल्लख आहे. या सर्व बेटात माझ्यापेक्षा अधिक आठवणीचा माणूस सापडणार नाही. "

शेवटी ते दोन म्हातारे तेथून गेले— एकजण मोठ्या संतोषाने आणि दुसरा कायमची काळोखी व लज्जा घेऊन. सारे प्रेक्षक आश्चर्यचकित झाले. सँकोच्या वाणीची आणि करणीची नोंद करण्याचे आणि त्याच्या वर्तनाकडे लक्ष देण्याचे काम ज्याच्याकडे सोपविलेले होते, त्याला हे ठरविता येईना की, ह्याला शहाणा माणूस म्हणावे की आपण समजतो त्याप्रमाणे मूर्ख म्हणावे ?

हा खटला संपतो न संपतो तोंच, एखाद्या आडदांड धनगरासारखा दिसणाऱ्या माणसाला ओढीत ओढीत एक स्त्री तेथे आली आणि मोठ्याने म्हणाली, " न्याय द्या, राज्यपालसाहेब, मला न्याय द्या. या पृथ्वीवर मला न्याय मिळाला नाही तर स्वर्गातून मला तो घ्यावा लागेल. राज्यपालसाहेब, हा दुष्ट माणूस मला एका शेतामध्ये भेटला आणि त्याने माझ्या देहाचा पूर्ण उपभोग घेतला. त्याने मला एखाद्या फडक्यासारखे हाताळले. गेली तेवीस वर्षे मी जे संरक्षिले, ते याने हिरावून नेले. धिक्कार असो मला ! स्वदेशी व विदेशी, खिश्चन व पाखंडी या सर्वांपासून मी माझ्या शीलाचे संरक्षण केले होते. एखाद्या खडकाप्रमाणे मी टणक होते. गरीब बिचारी मी जितकी सुरक्षित होते, तितका अग्नीत जिवंत रहाणारा प्राणी आगीत कधी राहिला नसेल किंवा काट्याकुट्यातून लोकर बचावली नसेल, पण या रानटी माणसाने आपल्या घाणेरड्या हातांनी मला अशा प्रकारे हाताळले. "

सँको म्हणाला, " बाई, बाई, इतक्यात शेरे मारू नका. या बहाद्दराचे हात घाणेरडे होते की स्वच्छ होते हा मुद्दा नाही. " नंतर त्या धनगराकडे वळून तो म्हणाला

" मित्रा, या बाईच्या तक्रारीबद्दल तुला काय म्हणायचे आहे ? " आपण फार घाबरलो आहो आणि त्यामुळे आपली मती गुंग झाली आहे असे दाखवीत त्या माणसाने उत्तर दिले, " महाराज, मी एक गरीब गुराखी आहे आणि डुकराचा व्यापार करतो. म्हणून आज सकाळी, चार डुकरे विकण्यासाठी ( सांगण्यात चुकलो तर जरूर ती दुरुस्ती करण्यास मी तयार आहे ) मी या गावाबाहेर गेलो होतो. अधिकाऱ्यांच्या जकातीमुळे आणि लांड्यालबाड्यामुळे मला त्या जनावरांचे फारसे पैसे मिळाले नाहीत. पण जे मिळाले ते घेऊन मी घरी परत येत होतो, तेव्हा वाटेत मला या हलकट बाईशिवाय दुसरी कोण भेटावी ? सैतानाला तर प्रत्येक गोष्टीत नाक खुपसण्याची सवय असते आणि त्याचे अंगी मोठी शक्ती असते. त्याने आम्हा दोघांची गाठ बांधली. कोणाही समंजस स्त्रीचे समाधान होईल इतके पैसे मी हिला दिले. पण तिचे समाधान झाले नाही. तिला आणखी पैसे पाहिजे होते. ती मला सोडीना–येथे ती मला फरफटत घेऊन आली. मी तिच्यावर बलात्कार केला असे ती आपल्याला सांगेल, पण मी जी शपथ घेतली आहे– किंवा घेणार आहे–त्यावर मी सांगतो की, ही खोटे बोलत आहे–ती चिखलातील बेडकासारखी आहे हे माझे सांगणे अक्षरशः खरे आहे. " सँकोने विचारले, " भल्या माणसा, तुझ्याजवळ चांदीची काही नाणी आहेत का ? " धनगराने उत्तर दिले, " आहेत महाराज, माझ्या छातीवर असलेल्या कातडी पिशवीत चांदीचे सुमारे वीस डयूकॅट आहेत. " सँको म्हणाला, " ते पैसे आणि सारे काही या फिर्यादीला देऊन टाक. "

हुकूम झाल्याप्रमाणे त्या माणसाने कापऱ्या हाताने पैसे दिले. ते त्या स्त्रीने घेतले आणि तेथील मंडळींना सहस्रशः अभिवादन केले. आईबाप नसलेल्या गरीब मुलांची आणि दूषित केलेल्या कुमारिकांची विशेष काळजी घेणाऱ्या सज्जन राज्यपालाला हजारो आशीर्वाद देण्यासाठी तिने गुडघे टेकले. नंतर ती पिशवी आपल्या दोन्ही हातांत घट्ट धरून ती न्यायमंदिरातून चलाखीने बाहेर निसटली. त्या पिशवीत चांदीची नाणी आहेत की नाही हे पाहण्यासाठी तीत डोकावण्याची दक्षता तिने पूर्वीच घेतली होती. तो धनगर आपल्या डोळ्यांत आसवे आणून उभा होता. जणू काही आपल्या द्रव्याबरोबर आपले रक्तही गेले आहे, इतका दुःखी तो दिसत होता. ती स्त्री जाताच त्या माणसाकडे वळून सँको म्हणाला, " मित्रा, धाव, धाव, त्या स्त्रीला गाठ. तिची इच्छा असो वा नसो. तिच्याकडून ती पिशवी घे आणि इकडे आण. " दोनदा सांगावे इतका बहिरा किंवा वेडा तो धनगर नव्हता. तो आपल्या पैशामागे विजेसारखा पळत गेला. सारे न्यायमंदिर अत्यंत उत्कंठित झाले. या प्रकरणाचा शेवट काय होतो हे कोणालाच कळेना. पण थोड्याच वेळात तो माणूस आणि ती स्त्री दोघेही परत आले– तो तिला ओढीत होता आणि ती त्याला ओढीत होती. तिने आपली चोळी वर केली आणि ती पिशवी आपल्या छातीवर ठेवली. ती तिच्यापासून घेण्यासाठी त्याने आपले सर्व सामर्थ्य उपयोगात आणले, पण व्यर्थ. ती स्त्री आपल्याला मिळालेल्या बक्षिसाचे संरक्षण इतके चांगले करीत होती की, त्याचे सारे पौरुष कुचकामी ठरले.

ती म्हणाली, " न्याय हवा, सज्जनहो, ईश्वराला स्मरून मला न्याय द्या. महाराज, आपणच पहा की हा उर्मट, बदमाष राजमार्गावर–नव्हे, नव्हे, न्यायमंदिरासमोर–माझी पिशवी हिरावून घेत आहे. हीच पिशवी मला देण्याचा हुकूम आपण त्याला दिला होता. " राज्यपालाने विचारले, " त्याला ती पिशवी तुझ्यापासून मिळाली काय ? " ती स्त्री म्हणाली, " मिळाली ? मी ती पिशवी गमावण्याआधी माझे प्राण गमावीन. त्याने माझे नाक कापले तेव्हा मी छोकरी होते. आता या भिकार, रोगट, खत्रूड, क्षुद्र कुत्र्यापेक्षा दुसरी मोठी कुत्री तुम्ही माझ्यावर सोडली पाहिजेत. चिमटे, हातोडे, छिन्नी–वगैरे कोणत्याही हत्यारांनी ती पिशवी माझ्या कचाट्यातून हिसकवून घेता येणार नाही. फार काय, सिंहाच्या पंज्यांनाही तसे करतो येणार नाही. माझे पैसे घेण्यापेक्षा माझे प्राण त्यांना आधी घेता येतील. " तो माणूस म्हणाला, " महाराज, ती खरे सांगत आहे. मी अगदी खलास झालो आहे. ही बया माझ्यापेक्षा मोठी ताकद्वान आहे. मी तिला पकडू शकत नाही. " नंतर सँकोने त्या स्त्रीला म्हटले, " सचोटी हवी. तू भयंकर स्त्री आहेस, मला ती पिशवी पाहू दे. "

त्या स्त्रीने त्याला ती पिशवी दिली, त्याने ती त्या माणसाला परत दिली. सँको तिला म्हणाला, " बाई ग, माझं ऐक. आपल्या पिशवीचे संरक्षण करताना तू जे सामर्थ्य व शौर्य प्रगट केलेस, ते ( नव्हे त्याच्या निम्मेही ) तू जर आपल्या शरीराचे संरक्षण करण्यासाठी खर्च केले असतेस, तर सामर्थ्यवान हर्क्युलसही तुझ्यावर सक्ती करू शकला नसता. म्हणून हे उर्मट स्त्रिये, माझ्या दृष्टीपुढून चालती हो. तुझ्यावर रोग पडो. या बेटात किंवा त्याच्या पंचक्रोशीत तू राहू नकोस. राहिलीस तर तुला दोनशे फटके खावे लागतील. हे लबाड, निर्लज्ज, हलकट स्त्रिये, तू येथून शक्य तितक्या जलदीने दूर जा. "

ती बाई अत्यंत बावरली आणि तेथून निघून गेली. काळोख्या रात्री कृष्ण कृत्य करीत असताना पकडले गेलेल्या स्त्रीप्रमाणे लज्जेने खाली मान घालून ती गेली. नंतर राज्यपाल त्या माणसाला म्हणाले, " आता मित्रा, तू आपले पैसे घेऊन घरी जा. प्रभू तुझ्या पाठीशी असो. पण जर तुला पुन्हा अशा संकटात सापडावयाचे नसेल, तर अशा जनावराशी गाठ बांधू नकोस. " धनगराने त्यांचे शक्य तितके आभार मानले आणि तो तेथून निघून गेला. नव्या राज्यपालाची न्यायबुद्धी आणि त्यांनी दिलेल्या शिक्षा पाहून सर्व लोक त्यांचे पुन्हा कौतुक करू लागले. त्याचा चरित्र–लेखक म्हणून ज्याची नेमणूक झाली होती, त्याने हा सर्व वृत्तांत लिहून घेतला आणि लगेच ड्यूककडे पाठविला. ड्यूक त्याची आतुरतेने वाट पहात होता. आता आपण इमानी सँकोला येथेच सोडू या, कारण त्याच्या धन्याकडे आपण लक्ष देणे अवश्य आहे. आल्टिसिडोसच्या प्रेमगीताने त्याचे चित्त फारच अस्वस्थ झालेले आहे.

▣ ▣

## प्रकरण ४६

# आल्टिसिडोराचे प्रेम-प्रकरण चालू असताना, घंटा व मांजरे यांनी डॉन क्विक्झोट यांना जी भयंकर भीति दाखविली, त्याचा वृत्तांत

प्रेमलुब्ध आल्टिसिडोराच्या प्रेमगीताने थोर डॉन क्विक्झोट यांना विचार-सागरात बुडविले असताना आपण त्यांना सोडले होते. ते अंथरुणावर पडले पण तेथे त्यांनी आपल्याबरोबर ज्या चिंता व उत्कंठा आणल्या होत्या, त्यांनी त्यांना असंख्य माश्यां-प्रमाणे सतावून विश्रांती घेऊ दिली नाही. शिवाय त्यांच्या फाटक्या पायमोज्याच्या दुःखाची भर त्यांच्या यातनात पडली होती. पण काळाची गती जलद असते. तिला कोणताही अडथळा किंवा बेड्या रोखू शकत नाहीत.

पळापळांच्या पंखावर आरूढ होऊन प्रभात मंद मंद गतीने आली. प्रकाशाचे पुनरागमन झाल्यानंतर डॉन क्विक्झोट यांनी सूर्योदयापूर्वीच आपल्या पराच्या मऊ शय्येचा त्याग केला आणि आपल्या अंगावर चामड्याचा पोशाख चढविला. फिरण्याच्या वेळचे बूट त्यांनी पायात घातले आणि आपल्या पायमोज्यावरील संकट एका बुटात लपविले. त्यांनी आपला लालभडक अंगरखा आपल्या खांद्यावर टाकला आणि आपल्या शौर्यशाली मस्तकावर जरतारी किनार असलेली हिरव्या-जांभळ्या रंगाची टोपी बसविली. आपल्या उजव्या खांद्यावर त्यांनी एक पट्टा सोडला. त्यांची विश्वासू व कर्तबगार समशेर अडकविलेली होती. त्यांच्या मनगटावर एक जपमाळ होती. ती ते नेहमी आपल्या-बरोबर नेत. अशा रीतीने मोठ्या रुबाबाचा आणि ऐटीचा पोशाख करून ते माजघरात गेले. तेथे ड्यूक व डचेस पोशाख करून त्यांच्या आगमनाची वाट पहात होते.

एका सज्जातून जात असताना शिलेदारांना आल्टिसिडोरा व तिची सखी भेटली. त्या दोघी त्यांची त्या मार्गावर वाट पहात होत्या. त्यांना पाहताक्षणीच आल्टिसिडोराने आपल्याला मूर्च्छा आल्याचे सोंग केले आणि आपल्या सखीच्या बाहूमध्ये ती एकदम कोसळली. त्या सखीने तिच्या काचोळीच्या नाड्या सैल करण्यास लगेच सुरुवात केली. हे पाहताच डॉन क्विक्झोट तिचे जवळ गेले आणि त्या सखीला म्हणाले, " या सर्वांचा अर्थ काय ? आणि असे अपघात कशामुळे होतात, हे मला माहीत आहे. " त्या मदतनीस दासीने उत्तर दिले, " माझ्यापेक्षा आपल्याला ते चांगले माहीत आहे. पण मला खात्रीने असे माहीत आहे की, आल्टिसिडोरापेक्षा चांगले आरोग्य उपभोगणारी

दासी या घरात दुसरी कोणी आतापर्यंत आलेली नाही. आरोग्यासंबंधी थोडीही तक्रार तिने कधी केल्याचे मला माहीत नाही. खरोखर, जगातील सारे शिलेदार इतके कृतघ्न असतील तर त्यांचा सूड घेतला गेला पाहिजे. लॉर्ड डॉन क्विक्झोटसाहेब, कृपा करून आपण परत जा. कारण जोपर्यंत आपण जवळ आहात, तोपर्यंत ही दुर्दैवी स्त्री शुद्धीवर येणार नाही." शिलेदारजींनी उत्तर दिले, "बाईसाहेब, आज संध्याकाळी माझ्या खोलीत एक तंतुवाद्य आणून ठेवण्याची मी आपल्याला विनंती करतो. मग मी या महिलेचे दुःख शक्य तितके हलके करीन. कारण प्रणयाच्या प्रारंभ–कालात, पुरुषांची नापसंती किंवा त्याचे अन्यत्र असलेले प्रेमसंबंध कळल्याने असे रोग बरे होतात."

असे म्हणून ते त्यांना सोडून निघून गेले. हेतू हा की, त्या वाटेने जाणाऱ्या माणसांनी आपल्याला एकट्याला त्या दोन दासीसमवेत पाहू नये. ते जाताच आल्टिसिडोराची नकली मूर्च्छा तत्काळ संपली. आपल्या सखीकडे वळून ती म्हणाली, "त्यांना तंतुवाद्य अवश्य द्या. आपल्याला काही संगीत ऐकविण्याची शिलेदारजींची इच्छा असेल यात शंका नाही. त्यामुळे आपली भरपूर करमणूक होईल." नंतर त्या दोघी डचेसकडे गेल्या आणि आपल्या कामगिरीचा परिचय त्यांनी तिला करून दिला व डॉन क्विक्झोट यांना तंतुवाद्य पाहिजे असल्याचेही सांगितले. तेव्हा योग्य संधी आली आहे, असे पाहून डचेसचा आनंद पोटात मावेना. तिने ड्यूक व आपली दासी यांच्या साहाय्याने एक नवे कारस्थान रचले. डॉनची शुद्ध गंमत करावी हा तिचा हेतु. त्यानंतर ते सर्वजण, मोठ्या आनंदाने व उत्कंठेने, रात्रीची वाट पहात बसले. दिवसाप्रमाणेच रात्रही लौकरच आली. ड्यूक व डचेस यांनी सारा दिवस डॉन क्विक्झोट यांच्याशी सुख–संवाद करण्यात घालविला. त्याच दिवशी डचेसने आपला एक विश्वासू नोकर (त्यानेच अरण्यात डल्सीनियाचे सोंग घेतले होते.) टेरेसा पँझाकडे पाठविला. तिच्या नवऱ्याचे पत्र आणि त्याने तेथे ठेवलेल्या कपड्यांचे गाठोडे डचेसने त्या नोकराचे हाती दिले. "तुम्हा दोघांमध्ये जे जे काही घडेल त्याचा प्रामाणिक वृत्तांत मला परत येऊन सांग." असे तिने त्याला बजावले.

शेवटी रात्रीचे अकरा वाजले, तेव्हा डॉन क्विक्झोट आपल्या खोलीत गेले. तेथे त्यांना तंतुवाद्य आढळले, ते त्यांनी नीट लावले. नंतर त्यांनी खिडकी उघडली. तेव्हा बागेत कोणी तरी फिरत आहे असे त्यांना दिसले. त्यांनी त्या वाद्याच्या तारांवरून आपली बोटे झरझर फिरवली. पुन्हा त्या तारा नीट लावून आणि खोकून, आपला घसा साफ करून, संगीताला विसंवादी नसलेल्या काहीशा घोगऱ्या आवाजाने त्यांनी पुढील गीत गाइले. ते गीत त्यांनी त्याच दिवशी रचले होते.

## उपदेश

"प्रेम हा प्रबळ कारस्थानी वैरी बेसावध हृदयांना सहज फसवतो. तुमच्या आळसामुळे अरक्षित राहिलेले ते हृदय त्याच्या आघाताचा प्रतिकार करू शकेल ? तुम्ही रिकाम्या असलात तर तुमचा नाशच। तो आपल्या साऱ्या युक्त्या तुमच्यावर चालवतो.

पण तुम्ही सावध नि कामात रहा, की तो हतबुद्ध प्रलोभक सरळ पळून जातो। मर्यादेने शोभणाऱ्या कौतुकास्पद तरुणींना भाग्योदय हवा असेल तर त्यांनी मूकपणे घरात राहावे, त्यांचे सच्चरितच त्यांचे गुणगान करील। शस्त्रजीवी असोत की दरबारी असोत, शहाणे पुरुष या बाबतीत सहमत असतात की, स्वैरिणींशी जरी खेळ केला तरी पत्नी म्हणून निवड सद्गुणी स्त्रीचीच! भटकते मुशाफिर बेछूटपणे वाटेवर जी प्रेमप्रकरणे जमवतात, ती सकाळी ताजी नि मजेची असतात पण संध्याकाळी थंड नि नष्ट होतात। आतुरघाईने येणारे प्रेमसंबंध तितक्याच घाईने निघून जातात, कारण कशीबशी उमटवलेली प्रतिमा हृदयातून लौकरच अदृश्य होते। सुंदर नी सत्य चित्रावर दुसरी मुद्रा कोण रंगवील ? अधिक सौंदर्य स्थानापन्न असताना अन्य सौंदर्य त्याला निश्चित नमवू शकणार नाही। टोबोसोची स्वर्गीय सुंदरी डल्सिनिया हिचा माझ्यावर सर्वस्वी हक्क आहे, ती माझ्या जीवाशी एकरूप झालेली असताना तिची प्रतिमा कशानेही फाटू शकणार नाही। तेव्हा दैव प्रसन्न असो की संतत असो, माझी निष्ठा कशानेही दूर होणार नाही. प्रेमिकाचा मुकुट म्हणजे अखंड इमान. त्याला प्रीतीत चमत्कार घडवता येतात। ''

डॉन क्विक्झोट यांचे गीत ड्यूक, डचेस, आल्टिसिडोरा आणि किल्ल्यातील बहुतेक सारे लोक यांनी सारा वेळ लक्ष देऊन ऐकले. ते गीत संपते न संपते तोंच शिलेदारजींच्या खिडकीच्या अगदी वर असलेल्या उघड्या सज्जातून एक दोर खाली आला. त्याला निदान शंभर लहान लहान मंजुळ घंटा बांधलेल्या होत्या. त्यानंतर एका मोठ्या पोत्यातून सोडलेली असंख्य मांजरे खाली आली. त्यांच्या शेपट्यांना त्याहून लहान घंटा बांधलेल्या होत्या. त्या घंटांचा किणकिणाट आणि त्या मांजरांची आरडाओरड यामुळे असा काही भीषण आवाज निर्माण झाला की, त्यामुळे ही थट्टा करणारे लोकही थोडा वेळ दचकले. डॉन क्विक्झोट यांना तर विलक्षण आश्चर्य वाटले– आणि ते स्तिमित झाले. त्याचवेळी दुर्दैवाने दोन–तीन बावरलेली मांजरे त्यांच्या खिडकीच्या सळयातून उडी मारून आत आली आणि पिशाच्चाप्रमाणे त्या खोलीत इकडून तिकडे नाचू लागली. ते पाहून कोणाला वाटले असते, सैतानांची सबंध पलटणच खोलीत नाचत आहे. तेथे जळत असलेल्या मेणबत्या त्या मांजरांनी विझविल्या आणि बाहेर जाण्याचा त्यांनी प्रयत्न केला. मोठ्या घंटा बांधलेला दोरखंड खाली–वर ओढला जात होता. ज्यांना या कार-स्थानाची काहीच कल्पना नव्हती, ते फार आश्चर्यचकित झाले. शेवटी डॉन क्विक्झोट यांचे आश्चर्य ओसरले, तेव्हा त्यांनी आपली तलवार उपसली. आणि ती गरगरा फिरवून आपल्याजवळ खिडकीपाशी ठेवली व ते मोठ्याने ओरडले, '' अरे दुष्ट मांत्रिकांनो ! अरे सैतानी बदमाषांनो ! मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. तुमच्या साऱ्या दुष्ट कृत्यांचा माझ्यावर काहीही परिणाम होणार नाही. '' नंतर खोलीभर उड्या मारीत असलेल्या मांजरांच्या मागे धावत जाऊन त्यांनी त्यांच्यावर त्वेषाने हल्ला केला आणि ती बाहेर जाण्याचा प्रयत्न करीत असताना त्यांना कापून टाकण्यास त्यांनी प्रारंभ केला. पण शेवटी मांजरांनी त्या खिडकीतून आपली सुटका करून घेतली. त्यांच्यापैकी एका मांजराला

मात्र तसे करणे जड गेले. त्याने त्यांच्या तोंडावर झेप घेतली आणि आपल्या पंज्यांनी व दातांनी त्यांच्या नाकाचा चावा घेतला. त्यामुळे डॉन यांना इतक्या वेदना झाल्या की, ते शक्य तितक्या मोठ्याने ओरडू लागले. त्यांच्या ओरडण्याचे कारण काय असावे याची कल्पना करून ड्यूक व डचेस त्यांच्या साहाय्यास तत्काळ धावून गेले. एका गुरुकिल्लीने त्यांनी त्यांच्या खोलीचे दार उघडले, तेव्हा त्यांना तो दुर्दैवी शिलेदार त्या मांजराशी निकराने झटापट करीत असल्याचे आढळले. त्यांच्यावरील आपली पकड सोडण्यास ते मांजर तयार नव्हते. ती विषम झुंज त्यांनी आपल्या मेणबत्त्यांच्या प्रकाशात पाहिली. ड्यूकने मध्ये पडून त्या प्राण्याला दूर नेण्याची तयारी दाखविली, पण तसे करण्यास डॉन क्विक्झोट त्यांना परवानगी देईनात. ते म्हणाले, "कोणीही त्याला पकडू नये. या सैतानाशी, या जादुगाराशी, या मांत्रिकाशी मी एकटा आमनेसामने झुंज देईन! ला मांचा येथील डॉन क्विक्झोटशी सामना करणे म्हणजे काय, हे मी त्याला समजावून देईन."

त्यांच्या धाकदपटशाकडे मुळीच लक्ष न देता ते मांजर गुरगुरत राहिले आणि त्यांना घट्ट धरून बसले. शेवटी ड्यूकने त्याचे पंजे शिलेदारजींच्या मासात रुतले होते ते उपसून काढले आणि त्या प्राण्याला खिडकीवाटे भिरकावून दिले. डॉन क्विक्झोट यांच्या चेहऱ्यावर भेसूर ओरखडे निघाले होते आणि त्यांच्या नाकाची स्थितीही फारशी चांगली नव्हती. पण त्या दुष्ट मांत्रिकाला आपल्या हातातून ड्यूकने सोडविले, यामुळे त्यांना जितका खेद झाला तितका दुसऱ्या कशानेही झाला नाही. लगेच मलम मागविण्यात आले. खुद्द आल्टिसिडोराने आपल्या शुभ्र कर–कमलांनी त्यांच्या जखमांवर मलम लाविले. त्यांची शुश्रूषा करीत असताना ती त्यांच्या कानात कुजबुजली, "क्रूर पाषाण–हृदयी शिलेदारा, तू जो आडमुठा हट्टीपणा आणि तिरस्कार दाखविलास, त्याबद्दल योग्य शिक्षा म्हणून, ही सारी संकटे तुझ्या कपाळी आली आहेत, तुझा सेवक सँको स्वतःला फटके मारण्याचे विसरो म्हणजे तुझी लाडकी डल्सीनिया मंत्रातून कधीच मुक्त होणार नाही आणि तुला तिच्या आलिंगनाचे कधीच सुख मिळणार नाही. निदान तू उपेक्षिलेली पण तुझी भक्त असलेली मी जोपर्यंत जिवंत आहे, तोपर्यंत तरी तसे घडणार नाही."

याला डॉन क्विक्झोट यांनी काहीही उत्तर दिले नाही. त्यांनी फक्त एक दीर्घ श्वास टाकला. ड्यूक व डचेस यांचे आभार मानून ते विसावा घेण्यास गेले. उड्या मारणाऱ्या व ओरडणाऱ्या त्या बदमाष जादुगाराशी सामना देताना त्या दोघांनी आपल्याला मदत केली म्हणून त्यांनी आभार मानले नाहीत. कारण त्या जादूगारांची त्यांना पर्वा नव्हती, पण ड्यूक व डचेस यांच्या प्रेमळपणाबद्दल आणि सद्भावाबद्दल त्यांचे त्यांनी आभार मानले. आपल्या चेष्टेला हे वळण लागल्याचे पाहून ड्यूक व डचेस यांना फार खेद वाटला. आपली चेष्टा शिलेदारजींना इतकी घातुक ठरेल की, त्यामुळे ते आपल्या खोलीत पाच दिवस पडून राहतील, असे त्यांना वाटले नव्हते. ते दोघे तेथून निघून गेले.

त्यानंतरच्या पाच दिवसांत डॉन क्विक्झोट यांच्यापुढे दुसरे साहस दत्त म्हणून उभे राहिले. ते पूर्वीपेक्षा अधिक आनंददायक होते पण ते आताच सांगता येत नाही. कारण आपल्या राज्यकारभारामध्ये अत्यंत व्यग्र असलेल्या आणि त्यात मोठी गोडी चाखत असलेल्या सँको पँझाकडे इतिहासकाराने वळणे अवश्य आहे.



प्रकरण ४७

# सँको पँझाच्या राज्यकारभारात त्याने केलेल्या वर्तनाचा आणखी वृत्तांत

या इतिहास–ग्रंथात असे सांगितलेले आहे की, सँकोला त्या न्याय–मंदिरातून एका ऐश्वर्यशाली राजवाड्यात नेण्यात आले. त्यातील एका प्रशस्त दालनात त्याला असे दिसून आले की, भोजनासाठी टेबलावर चादर घातलेली आहे आणि अत्यंत सुव्यवस्थित व श्रीमंती थाटाचे खाद्यपदार्थ त्यावर ठेवलेले आहेत. त्या दालनात त्यांनी प्रवेश करताच संगीताचे निनाद सुरू झाले आणि त्याचे हात धुण्यासाठी चार नोकर त्याच्या सेवेस सादर झाले. त्याने मोठ्या गांभीर्याने आपले हात धुतले. आता वाद्यांचे निनाद थांबले. तेव्हां सँको टेबलाच्या वरच्या टोकास बसला. कारण तेथे तेवढेच एक आसन होते आणि एकाच माणसासाठी चादर घातलेली होती. एक माणूस तेथे आला आणि सँकोच्या कोपरापाशी उभा राहिला. त्याच्या हातात देवमाश्याच्या हाडाची कांडी होती. तो वैद्य असल्याचे पुढे कळून आले. नंतर टेबलावर नाना तऱ्हेची फळे आणि इतर खाद्य–पदार्थ आले. विद्यार्थ्यासारख्या दिसणाऱ्या नोकराने प्रार्थना म्हटली, एका सेवकाने सँकोच्या हनुवटीखाली लेसचा रुमाल अडकविला, तिसऱ्या नोकराने त्याच्यापुढे फळांची बशी ठेवली. सँकोने त्यातील एक तुकडा आपल्या तोंडात घातला असेल–नसेल, तोंच त्या वैद्याने आपल्या कांडीने त्या बशीला स्पर्श केला. क्षणार्धात एका नोकराने ती बशी दूर नेली. तिच्याजागी मांसाने भरलेली दुसरी बशी तत्काळ आणून ठेवण्यात आली. तिची चव सँको घेणार, तोंच त्या वैद्याने आपल्या कांडीने पूर्वीच्या फलाहाराच्या बशी–प्रमाणेच तीही बशी नाहीशी केली. अशा बश्या भराभर नाहीशा होत असलेल्या पाहून सँकोला नवल वाटले. आपल्याजवळच्या मंडळीकडे पाहून त्याने त्यांना विचारले, "अशा प्रकारे खाणाराच्या डोळ्यांना अन्न पुरवून आणि पोटाला उपाशी ठेवून तुम्ही पाहुण्यांना खेळवीत असता काय ?" वैद्याने उत्तर दिले, "राज्यपालसाहेब, जेथे राज्यपाल आहेत अशा अन्य बेटातील वहिवाटीप्रमाणे आणि रूढीप्रमाणेच आपल्याला येथे खाना येईल. मी शरीर–शास्त्राचा डॉक्टर आहे आणि राज्यपालाच्या आरोग्याची काळजी घेण्यासाठी मला या बेटात पगार दिला जातो. माझ्या स्वतःच्या आरोग्यापेक्षा राज्यपालाच्या आरोग्याची काळजी मी अधिक घेतो. त्यांच्या शरीर–प्रकृतीचा अभ्यास मी रात्रंदिवस करतो, म्हणजे ते आजारी पडले असताना त्यांना कोणते औषध द्यावे हे मला चांगले

कळते. मी मुख्य गोष्ट करतो, ती ही की, त्यांच्या भोजनाचे वेळी मी नेहमी हजर असतो आणि त्यांना जे पोषक असेल, तेच त्यांना खाऊ देतो व त्यांच्या आरोग्याला जे बाधक आणि त्यांच्या पोटाला जे उपद्रवकारक आहे, असे मला वाटते, ते मी त्यांनी खाण्यास प्रतिबंध करतो. म्हणून मी फळे घेऊन जाण्याचा हुकूम केला. कारण ती फार थंड आणि ओली होती. दुसऱ्या बशीतील पदार्थ फार उष्ण आणि मसाला घालून फार तळलेले होते. त्यामुळे खाणाऱ्याची तहान वाढली असती. म्हणून ती बशी घेऊन जाण्यास मी सांगितले. जो माणूस खूप दारू पितो, त्याच्या शरीरातील मूळची आर्द्रता नष्ट होते. ती आर्द्रता म्हणजे जीवनाचे इंधन होय."

सँको म्हणाला, "तर मग भाजलेल्या बदकांची ही बशी मला काही अपाय करणार नाही ना?" वैद्य म्हणाला, "थांबा, राज्यपालसाहेबांनी ते खाऊ नये. ते खाण्याला प्रतिबंध करण्यास मी येथे जिवंत उभा आहे." सँकोने विचारले, "का खाऊ नये?" वैद्याने उत्तर दिले, "कारण, आमचे वैद्यराज– हिप्पोक्रेटस्– वैद्यशास्त्राचे उत्तरध्रुव व तेजोगोल– एका सूत्रात म्हणतात, 'खूप खाणे वाईट आणि खूप बदके खाणे हे सर्वांत वाईट.'" सँको म्हणाला, "असे जर असेल तर मग वैद्यराजांनी या टेबलावरील या सर्व बश्यांपैकी कोणत्या बशा मला अत्यंत उपयुक्त आहेत आणि कमी अपायकारक आहेत हे पहावे, म्हणजे मला त्या बश्यांतील पदार्थांनी पोटभर जेवता येईल. वैद्यराजांनी आपल्या कांडीने साऱ्या बश्या अदृश्य करू नयेत. कारण, मी आशेवर आणि या राज्याच्या सौख्यावर जगत आहे. भुकेने मरण्यास मी तयार नाही. (वैद्यराज काहीही म्हणोत पण) कोणताही खाद्यपदार्थ मला खाऊ न देणे हा माझे आयुष्य कमी करण्याचा मार्ग आहे– लांबविण्याचा नव्हे." वैद्याने उत्तर दिले, "अगदी खरे आहे, महाराज. तथापि माझे मत असे आहे की, सश्याचे हे पदार्थ केसाळ व मऊ असल्यामुळे आपण ते खाता कामा नये. तसेच गायीच्या वासराची ही सागुती आपण चाखू नये. ती जर भाजलेली– तळलेली नसती तर तिच्या बाजूने काही तरी म्हणता आले असते. पण आता आहे त्या स्थितीत ती मुळीच खाता कामा नये." सँकोने विचारले, "ठीक, तर मग पलीकडे जिच्यातून इतका धूर निघत आहे, त्या भल्या मोठ्या बशीसंबंधी आपले मत काय आहे? त्यात मांस आणि भाजी असेल असे मी समजतो. त्यांत नाना तऱ्हेच्या खाद्यपदार्थांची खिचडी असल्यामुळे मला मानवेल आणि पोषक असेल, असेच पदार्थ तेथे मला सापडतील असे वाटते." वैद्य म्हणाला, "छेः छेः, असा दुर्विचार आमच्यापासून फार दूर आहे. त्या मिसळीपेक्षा जगातील दुसरा कोणताही खाद्यपदार्थ आरोग्याला अधिक बाधक नाही. ती श्रीमंती मिसळ तुमच्या श्रीमंत भिक्षूसाठी आणि पाद्र्यांसाठी राखून ठेवा– महाविद्यालयातील तुमच्या गुरुंना आणि खेड्यातील लग्नाच्या जेवणावळीवर अधाशीपणाने हात मारणाऱ्या लोकांना ते पदार्थ द्या, पण राज्यपालांच्या टेबलांना त्या खाद्यपदार्थांचा भार होता कामा नये. तेथे ताजे लुसलुशीत व कोवळे खाद्य–पदार्थ, मिसळ न करता, ठेवले पाहिजेत. याचे कारण असे की, संमिश्र

औषधांपेक्षा साधी निर्मळ औषधे साधारणतः चांगली मानली जातात. कारण मिश्रण म्हटले की, त्याचे घटक विषम प्रमाणात घातले जाण्याची चूक होण्याचा संभव असतो. पण साध्या औषधात असा अपाय होण्यास जागा नसते. म्हणून सध्या राज्यपालांना योग्य आहार कोणता, हे मी सांगतो. त्यामुळे त्यांचे आरोग्य कायम राहून ते वाढेल. तो आहार म्हणजे बटाट्याचे लहान शंभर काप आणि नारिंगाच्या मुरंब्याचे थोडेसे पातळ तुकडे. त्यामुळे त्यांचे पोट भरेल आणि त्यांच्या पचनशक्तीला मदत होईल." हे ऐकून सँको आपल्या खुर्चीवर मागे रेलला आणि वैद्याच्या तोंडाकडे बारकाईने पाहून अत्यंत गांभीर्याने त्याने त्याला विचारले, "तुमचे नाव काय? तुम्ही हा अभ्यास कोठे केला?" त्याने उत्तर दिले, "महाराज, ॲगोरोचा डॉक्टर पेड्रो रेझिओ असे मला म्हणतात. मी जेथे जन्मलो, त्या गावाचे नाव टिर्टीफुएरा असे आहे. ते गाव कॅराक्वेल व कॅपोडेल अल्मोडाव्वार यांच्यामध्ये वसलेले आहे. मी माझी डॉक्टरीची पदवी ओसुना विद्यापीठातून घेतली आहे."

सँको अत्यंत चिडून म्हणाला, "अरे, श्री. पेड्रो रेझिओ डी ॲगेरो, कॅराक्वेल व कॅपोडेल अल्मोडाव्वार यांच्यामध्ये वसलेल्या टीर्टीफुएरा येथे जन्मलेला, आणि ओसुना विद्यापीठातून डॉक्टरची पदवी घेणारा– वगैरे, वगैरे जो कोणी तू आहेस, तो येथून चालता हो! याचक्षणी ही खोली सोड. नाही तर या सूर्यप्रकाशाशपथ मी एक भला मोठा सोटा घेऊन तुझ्या शरीरावर तो चालवीन आणि या बेटातील साऱ्या वैद्यांना असे बडवून काढीन आणि त्यांच्या बरगड्या मोडून टाकीन की, येथे त्या अडाणी वैद्यांच्या टोळीतील एक माणूस शिल्लक रहाणार नाही. विद्वान आणि समंजस वैद्यांचा मात्र मी पुष्कळ गौरव करीन आणि देवदूताप्रमाणे त्यांचा सन्मान करीन. अरे, पेड्रो रेझिओ, मी पुनः सांगतो, तू माझ्या दृष्टीपुढून दूर हो. नाही तर ज्या खुर्चीवर मी बसलो आहे ती हातात घेऊन मी तुझ्या डोक्याच्या चिंधड्या करीन. मग त्याबद्दल मला, हे अधिकारपद सोडल्यावर, कोणी कोर्टात खुशाल खेचो. मला त्याची पर्वा नाही. माझी बाजू स्वच्छ करण्यासाठी मी म्हणेन, 'मानवजातीचा शत्रू असणाऱ्या नालायक वैद्यापासून जगाची मी सुटका केली, ही त्या जगाची मोठी सेवाच होय! अरे, मला खाऊ द्या. नाही तर हे तुमचे राज्य परत घ्या. कारण, जे पद माणसाला पोटभर खाऊ देत नाही, त्याची किंमत दोन बाटाण्याइतकीही नसते." राज्यपालाचा पारा इतका चढलेला पाहून वैद्य घाबरला. त्याच क्षणी त्या खोलीतून तो गुपचुप निघून गेला असता, पण रस्त्यातील शिंगाचा आवाज त्याचवेळी सर्वांना ऐकू आला. तो ऐकताच कारभाऱ्याने खिडकीबाहेर पाहिले आणि मागे वळून म्हटले, "ड्यूककडून तातडीचा खलिता आलेला दिसतो. त्यात काही महत्त्वाचे पत्र असेल हे निःसंशय."

दूत घाम गाळीत लगेच तेथे आला. त्याच्या मुद्रेवर त्वरा व चिंता कोरलेली दिसत होती. आपल्या छातीवरून एक पाकीट काढून त्याने ते राज्यपालाला दिले. राज्यपालाने ते कारभाऱ्याला दिले आणि पत्रातील मजकूर वाचण्यास त्याला फर्मावले. तो असा

होता— " बॅराटेरिया बेटाचे राज्यपाल डॉन सँको पँझा यांस— खुद्द त्यांच्या किंवा त्यांच्या सचिवाच्या हातात देण्यासाठी. " सँको म्हणाला, " माझा सचिव कोण आहे ? " शेजारचा एक मनुष्य म्हणाला, " मी आहे, महाराज. कारण, मला लिहिता-वाचता येते आणि मी बिस्केन गावचा आहे. " सँको म्हणाला, " या तुझ्या शेवटच्या गुणामुळे तू सम्राटाचाही सचिव होऊ शकशील. मग उघड ते पत्र आणि त्यात काय लिहिले आहे ते पाहा. " त्या नव्या सचिवाने तसे केले आणि ते पत्र स्वतःशी वाचले व राज्यपालांना सांगितले, " फक्त खाजगी जागेत सांगावा असा विषय या पत्रात आहे. " तेव्हा सँकोने कारभारी व आचारी याशिवाय बाकी सर्वांना तेथून जाण्यास फर्मावले. नंतर सचिवाने पुढील पत्र वाचले :—

" लॉर्ड डॉन सँको पँझा, मला अशी माहिती मिळाली आहे की, या एक-दोन रात्री आपले काही शत्रू तुमच्या बेटावर मोठ्या आवेशाने हल्ला करण्याचा बेत करीत आहेत. म्हणून तुम्ही जागरूक राहिले पाहिजे आणि स्वतःचे संरक्षण केले पाहिजे. पूर्वतयारी आपण केली नाही असे होऊ नये. विश्वासू हेरांनी मला अशीही माहिती पुरविली आहे की, तुमचा खून करण्यासाठी चार माणसे वेषांतर करून शहरात शिरलेली आहेत. शत्रूच्या योजनेला तुमच्या कर्तृत्वाचा मोठा अडथळा आहे असे ते मानतात. आपल्याभोवती पहा, आपल्याशी बोलण्यासाठी येणाऱ्या नवख्या माणसांना परवानगी देताना काळजी घ्या आणि आपल्यापुढे जे जे ठेवलेले असेल ते मुळीच खाऊ नका. तुम्हाला गरज असल्यास मी कुमक पाठवीन. सर्व बाबतीत मी तुमच्या शहाणपणावर विसंबून आहे—किल्ल्यातून, ता. १६ ऑगस्ट, पहाटे चार वाजता.

आपला मित्र,
ड्यूक. "

ही बातमी ऐकून सँकोला आश्चर्य वाटले आणि त्याच्याजवळ तेथे असलेल्या लोकांनाही मोठी चिंता वाटली. पण शेवटी सँको त्या कारभाऱ्याकडे वळून म्हणाला, " या बाबतीत प्रथम कोणती गोष्ट करावयास हवी-आणि अत्यंत जलदीने करावयास हवी-हे मी तुम्हाला सांगतो. त्या डॉक्टर रेझिओला अंधारकोठडीत डांबून टाका. मला ठार मारण्याचा हेतू कोणाचा असेल तर तो त्याचाच. माझी उपासमार करून मला हळु-हळु मृत्यूच्या मुखात लोटणारा तोच आहे. सर्व प्रकारच्या मृत्यूमध्ये हा अत्यंत वाईट." आचारी म्हणाला, " तथापि माझे मत असे आहे की, येथे आपल्यापुढे जे पदार्थ मांडलेले आहेत, त्यांपैकी कोणताही महाराजांनी खाऊ नये. कारण ते काही भिक्षुणींनी पाठविलेले आहेत. 'सैतान प्रभूच्या पाठीशी उभा राहून डोकावत असतो ' अशी म्हणच आहे. " सँको म्हणाला, " ते कोणीच नाकारणार नाही. म्हणून मला यावेळी पाव आणि सुमारे चार पौंड सुका मेवा फराळासाठी आणून द्या—त्यामध्ये काही विष असणार नाही. काही खाल्ल्याशिवाय मी जिवंत राहू शकत नाही. आपल्याला जर त्या लढाया मारण्यासाठी तयार राहावयाचे असेल तर आपण पोटभर खाल्ले पाहिजे. कारण

पोट हृदयाला संभाळते—हृदय पोटाला नव्हे. तोपर्यंत, हे सचिवा, तू ड्यूकसाहेबांना उत्तर पाठव आणि कळव की, आपली आज्ञा न चुकता सर्वतोपरी पाळली जाईल. डचेसना माझी आठवण कृपया ठेवण्यास लिही. तसेच माझी बायको टेरेसा पँझा हिच्याकडे माझे पत्र व गाठोडे घेऊन कोणाला तरी पाठविण्यास विसरू नका अशी विनंती कर. डचेसने तसे केले तर ती मी खास कृपा समजेन आणि मी त्यांची सेवा माझ्या सर्वशक्तीनिशी करण्याची काळजी घेईन. माझा धनी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट यांचे विस्मरण मला झालेले नाही किंवा त्यांच्याशी मी कृतघ्न पण नाही, हे आपण त्यांना सांगावे. बाकीचा मजकूर मी तुझ्यावर सोपवितो. तुझ्या इच्छेप्रमाणे तो काहीही लिही. चांगल्या सचिवाप्रमाणे आणि कट्टया बिस्केनरप्रमाणे तू आपले काम कर. आता हे पदार्थ घेऊन जा आणि खाण्यासाठी काही तरी मला आण. मग तुला दिसून येईल की, माझ्याशी व माझ्या बेटाशी गडबड करण्यास धजणाऱ्या साऱ्या हेरांना, जादूगारांना आणि गळेकापू कुत्र्यांना वठणीवर आणण्यास मी समर्थ आहे."

यावेळी एक नोकर खोलीत येऊन म्हणाला, "महाराज, आपल्याशी एका महत्त्वाच्या कामासंबंधी बोलू इच्छिणारा एक खेडवळ माणूस आला आहे." सँको म्हणाला, "ही कामे घेऊन येणाऱ्या माणसांचा उपद्रव अजून मला होत आहे हे विलक्षण आहे. ही कामाची वेळ नाही, हे न कळण्याइतके ते मूर्ख असले पाहिजेत. त्यांना असे वाटते का की, आम्ही राज्यकर्ते आणि न्यायदाते पोलाद-पाषाणाचे बनविलेले असतो आणि हाडा-मासाच्या इतर प्राण्यांप्रमाणे आम्हाला विश्रांतीची व खाण्या-पिण्याची काही गरज नसते? हे माझे राज्य फार काळ टिकणार नाही असा तर्क करण्याइतका मी चतुर आहे. पण ते टिकलेच तर ईश्वराला आणि माझ्या बुद्धीला स्मरून मी सांगतो, मी या साऱ्या कामाच्या माणसांना पाठीला पाय लावून पळावयास लावीन. बरे तर, येऊ द्या त्या माणसाला आत. पण माझा खून करणारा कोणी दुष्ट बदमाष किंवा हेर तो नाही ना याकडे लक्ष द्या." नोकर म्हणाला, "तो बिचारा गरीब जीव आहे. कटात त्याचा हात नाही हे मी खात्रीने सांगतो. तो तसा काही करणार नाही असा दिसतो. त्याच्या अंगी अपाय करण्याची शक्तीच नाही. चांगल्या पावाप्रमाणे तो निरुपद्रवी दिसतो." कारभारी म्हणाला; "आम्ही सारेजण आपल्याजवळ आहो, तेव्हा भीतीचे काहीच कारण नाही." सँको म्हणाला, "अहो, पण आधी माझे बोलणे ऐका. आता डॉक्टर रेझिओ गेला आहे. मग मी पोट भरण्यासारखे काही खाऊ नको का?—मग तो पावाचा पापुद्रा आणि कांदा का असेना!" आचारी म्हणाला, "रात्री खा. मग महाराजांना कुरकुरण्यास काही जागा राहणार नाही. दुपारच्या जेवणाची उणीव रात्रीचे जेवण भरून काढील." सँको म्हणाला, "देव करो आणि तसे होवो."

नंतर तो खेडवळ माणूस आत आला. त्याच्या स्वरूपावरून तो एक सज्जन, निरुपद्रवी पण मूर्ख जीव असावा, असे दिसत होते. खोलीत प्रवेश करताच त्याने विचारले, "राज्यपाल कोण?" सचिवाने उत्तर दिले, "खुर्चीवर बसलेले आहेत तेच,

दुसरे कोण ? " तो माणूस म्हणाला, " मी राजेसाहेबांना नम्रतेने अभिवादन करतो. " गुडघे टेकून त्याने सँकोला त्याच्या हाताचे चुंबन घेऊ देण्याची विनंती केली. ती सँकोने झिडकारली आणि म्हटले, " ऊठ, ऊठ आणि तुला काय म्हणायचे असेल ते मला सांग. " मग तो खेडवळ उठून उभा राहिला आणि म्हणाला, " महाराज, सिउडॅड-रीलपासून पाच-सहा मैलांवर असलेल्या मिगेल टुर्रा या शहरातील मी एक शेतकरी आहे. " सँको म्हणाला, " हे दुसरे टीर्टीफयुएरा आले. पण मित्रा, पुढे सांग. ते शहर मला चांगले माहीत आहे. आमच्या गावापासून ते फार दूर नाही. " खेडवळ म्हणाला, " आपली मर्जी असेल तर मी माझे काम सांगतो. देव-दयेने माझे लग्न रोमन कॅथॉलिक चर्चमधील आपल्या 'पवित्र माते'समोर झाले. मला दोन मुले आहेत आणि ती कॉलेजात शिकत आहेत. लहान मुलगा कलेचा विशारद होण्याचा आणि मोठा मुलगा पारंगत होण्याचा अभ्यास करीत आहे. माझी बायको मेली असल्यामुळे मी विधुर आहे. खरे सांगायचे तर तिला एका दुष्ट डॉक्टराने ठार मारले, असे कोणीही म्हणेल. ती गरोदर असताना त्याने तिला रेचक दिले. ईश्वराची कृपा असती आणि तिने एका मुलाला जन्म दिला असता तर मी त्याला डॉक्टरीचा अभ्यास करण्यासाठी पाठविले असते. मग त्याला आपल्या भावांचा हेवा करण्याचे काही कारण राहिले नसते. "

सँको म्हणाला, " याचा अर्थ असा की, तुझी बायको जर मेली नसती-किंवा त्यांनी तिला जर मारले नसते-तर तू विधुर झाला नसतास. " त्याने उत्तर दिले, " अगदी खरे. " सँको म्हणाला, " आपली मते अगदी जमत आहेत. अरे इमानी मित्रा, पुढे सांग-भरभर सांग. कारण आता माझी दुपारची वामकुक्षी घेण्याची वेळ झाली आहे-कामकाजाचे बोलणे करण्याची नव्हे. " शेतकरी पुढे म्हणाला, " महाराज, आता मी आपल्याला हे सांगितले पाहिजे की, तो जो माझा मुलगा कला-विशारद आहे-किंवा होणार आहे,- त्याचे प्रेम आमच्याच शहरातील एका कुमारिकेवर बसले आहे. तिचे नाव क्लॅरा पर्लेरिना. अत्यंत श्रीमंत शेतकरी अँड्रयू पर्लेरिना याची ती मुलगी ! पर्लेरिनो हे नाव काही बरोबर नाही. पण त्यांच्या सर्व पिढीला अर्धांगवायु झालेला असल्यामुळे पर्लेटिकोसा या रोगाच्या नावावरून त्यांचे नाव पडले. पण आता त्यांना पर्लेरिनो या नावानेच सारे जण ओळखतात. ते नाव त्या तरुणीला फारसे शोभत नाही. कारण तिचे सौंदर्य अमोल मोत्यासारखे आहे. तिच्या उजव्या बाजूला उभे राहून तुम्ही तिच्याकडे पाहिले तर तुम्हाला ती रानातील फुलासारखी दिसेल. डाव्या बाजूने मात्र ती इतकी चांगली दिसत नाही. कारण देवीमुळे तिचा डावा डोळा गेला आहे आणि तिच्या सर्व तोंडावर पुष्कळ खोल खड्डे खणले गेले आहेत. पण तिचे हितचिंतक म्हणतात, ' यामुळे काही बिघडले नाही. प्रेमिकांची हृदये पुरण्यासाठी ही थडगी आहेत. ' ती इतकी स्वच्छ आहे की, ती आपले नाक आपल्या ओठावर येऊ देत नाही. ती ते वट्ट आवळून धरते. तिच्या नाकपुड्या दोन्ही बाजूस वळलेल्या आहेत-जणु काही त्यांना तिचे तोंड पहावयाचे नाही. त्या नाकपुडया काहीशा रुंद आहेत पण एकंदरीत ती फार चांगली दिसते. तिला

दहा–बारा दुधाचे दात किंवा दाढा आलेल्या नाहीत ही गोष्ट वगळली, तर या देशातील एक अत्यंत चतुर कुमारिका ती ठरेल. तिच्या ओठाचे वर्णन कसे करावे हे मला कळत नाही. ते इतके पातळ आणि कोमल आहेत की, रेशमाप्रमाणे ओठांची गुंडाळी करण्याची पद्धत असती तर, तिच्या सर्वांगाची गुंडाळी करता आली असती. शिवाय सर्वसामान्य ओठाचा नेहमीचा वर्ण त्या ओठांना नाही. आतापर्यंत कोणी पाहिला नसेल असा अत्यंत आश्चर्यकारक वर्ण त्या ओठांचा आहे. निळा, हिरवा आणि नारिंगी अशा रंगांचे मिश्रण तेथे आहे. या चित्राचे इतके विस्ताराने वर्णन मी केले म्हणून राज्यपालसाहेबांनी मला क्षमा करावी. आज ना उद्या ती माझी मुलगी होणार आहे, म्हणून तिच्या अनेक अलौकिक अवयवांचे वर्णन मी केले. त्या मुलीविषयी मला मनापासून जे प्रेम आणि स्नेह वाटतो त्यामुळेच मी हे वर्णन केले."

सँको म्हणाला, "तुझ्या इच्छेप्रमाणे ते चित्र तू कितीही काळ रंगव. अशा रंग-कामाची मोहिनी माझ्यावर जबरदस्त पडते. माझे जेवण जर झालेले असते, तर याहून चांगली करमणूक व्हावी अशी मी इच्छा केली नसती." खेडवळ म्हणाला, "मी आणि आपले सेवक – निदान आपण– आताच या गोष्टीचा निकाल करण्याची वेळ आलेली आहे. पण महाराज, त्याला काही अर्थ नाही. तिचा सुंदर डौल आणि तिचे स्वरूप मी जर आपल्या डोळ्यांपुढे उभे केले तर आपण तिचा गौरव कराल. पण तसे होणार नाही. कारण, तिचे शरीर इतके वाकडे-तिकडे आणि चोळामोळा झालेले आहे की, तिचे गुडघे तिच्या हनुवटीला भिडतात. आणि तरीही कोणालाही असे दिसेल की, ती जर ताठ उभी राहू शकली तर तिचे डोके छताला लागेल. तिने माझ्या कला–विशारद मुलाच्या हातात लग्नासाठी आपला हात यापूर्वीच दिला असता. पण ती तो हात लांबवू शकत नाही. कारण, त्याच्या शिरा अगदी आकसलेल्या आहेत. तथापि त्या हाताच्या लांब–रुंद नखांमुळे त्याला मोठी शोभा आली आहे. तिचा हात किती चांगला घडविलेला आहे हे आपल्याला कळून येईल."

सँको म्हणाला, "झाले इतके पुरे, पण आपण असे समजू या की तू तिचे चित्र नखशिखांत रेखाटले आहेस. आता तुला काय हवे आहे ? मित्रा, इतकी वळणे–वाकणे न घेता आणि विषयांतर न करता मुद्यावर ये." शेतकरी म्हणाला, "महाराज, आपण माझ्या सुनेच्या बापाला शिफारसीचे पत्र देण्याची कृपा करावी आणि त्याने हे लग्न घडवून आणावे असे आपण त्याला सांगावे अशी माझी इच्छा आहे. कारण मालमत्तेच्या बाबतीत किंवा शारीरिक स्थितीचे बाबतीत आम्ही समान आहो. राज्यपालसाहेब, आपल्याला खरे सांगायचे तर, माझ्या मुलावर चेटूक झाल्यासारखे झाले आहे. त्याच असा एक दिवस जात नाही की, जेव्हा तीन–चारदा दुष्ट पिशाच्चे त्याला झपाटीत नाहीत. प्रेमाच्या आगीत पडण्याचे दुर्दैव एकदा त्याच्या कपाळी आले, म्हणून त्याच्या तोंडाची त्वचा चामड्यासारखी कोरडी पडली आहे आणि त्याचे डोळे एकसारखे

दुःखाश्रु गाळीत आहेत. असे जरी असले तरी त्याचा स्वभाव देवदूतासारखा आहे. पण आता त्याला झटके आले म्हणजे तो वारंवार स्वतःला बडवून बुक्क्या मारून घेतो, तसे नसते तर आपण त्याला ' संत ' म्हटले असते. "

सँको म्हणाला, " अरे प्रामाणिक माणसा, तुला आणखी काही मागावयाचे आहे काय ? " शेतकरी म्हणाला, " आणखी एकच गोष्ट. पण ती बोलण्याचे मला जरा भय वाटते. तरी मी ती माझ्या हृदयात कुजत–सलत ठेवू शकत नाही. म्हणून ती मी सांगितलीच पाहिजे. माझी इच्छा एवढीच आहे की, महाराजांनी माझ्या कला-विशारद मुलाला संसार थाटण्याला आणि घर घेण्याला तीनशे किंवा सहाशे ड्यूकॅट देणगी म्हणून द्यावे. म्हणजे सासऱ्याच्या कटकटींना शरण न जाता ते स्वतंत्रपणे राहू शकतील." सँको म्हणाला, " वा ! वा ! तुला आणखी काही पाहिजे असेल तर माग. त्या मागणीच्या आड भीती किंवा लज्जा येऊ देऊ नकोस. भल्या गृहस्था, बोलून टाक. " शेतकरी म्हणाला, " काही नाही महाराज. " त्याच्या तोंडून हे शब्द निघतात न निघताच तोंच राज्यपाल ताडकन् उठून उभे राहिले आणि ज्या खुर्चीवर ते बसले होते, तिला धरून म्हणाले, " अरे उद्धट मूर्खा, खेडवळ वेड्या, याच क्षणी माझ्यापुढून निघून जा. नाही तर पँझा घराण्याची शपथ घेऊन मी सांगतो की, या खुर्चीने मी तुझ्या मठ्ठ डोक्याचे तुकडे तुकडे करीन. अरे रांडलेका, बदमाषा, तू सैतानाचा रंगारी आहेस. यावेळी माझ्याकडे सहाशे ड्यूकॅट मागण्यासाठी तू येतोस काय ? अरे घाणेरड्या, लूत भरलेल्या कुत्र्या, तुझ्या डोक्यात चिखल भरलेला आहे काय ? इतके पैसे माझ्याजवळ कोठून असणार ? आणि असले तरी तुझ्यासारख्या वेड्या नि म्हाताऱ्या बदमाषाला मी ते का द्यावेत ? तुझ्या त्या मिगेल टुर्राची किंवा पर्लेरिनोजूच्या पिढ्यान्‌पिढ्यांची मला काय पर्वा ? या खोलीतून चालता हो, असे मी सांगतो. ड्यूकच्या प्राणाची शपथ घेऊन मी सांगतो, मी माझे शब्द खरे करीन आणि तुझा मूर्ख मेंदू डोक्यातून बाहेर फेकून देईन. तू मिगेल टुर्राचा रहिवासी नाहीस–सैतानाची अवलाद आहेस. माझ्या सहनशक्तीचा अंत पहाण्याचे सैतानाचे काम घेऊन तू येथे आला आहेस. अरे, मी राज्यपाल होऊन दीड दिवससुद्धा झाला नाही. पण तू ठोंब्या माझ्याजवळ सहाशे ड्यूकॅट मागतोस ! "

कारभाऱ्याने त्या शेतकऱ्याला तेथून निघून जाण्याची खूण केली. त्याप्रमाणे तो खाली मान घालून निघून गेला. राज्यपाल आपल्या संतापाच्या धमक्या खऱ्या करील, या भीतीने ते फार घाबरल्याचे दिसत होते. त्या दुष्ट लुच्च्याला आपले सोंग कसे वठवावे हे चांगले माहीत होते. पण आता आपण सँकोला त्याच्या संतप्त मनोवृत्तीत सोडू या. त्याला शांतता व निवांतपणा मिळू द्या. आपण डॉन क्विक्झोटकडे वळू या. मांजराने त्यांच्या तोंडावर ओरखडे काढल्यामुळे त्यांचे तोंड मलमपट्ट्यांनी झाकलेले असताना आपण त्यांचा निरोप घेतलेला होता. त्या जखमांमुळे त्यांना आठ दिवस विश्रांती घेणे

भाग पडले. त्या काळात जे काही घडले ते आता सिड् हॅमेट निवेदन करणार आहेत. या इतिहासातील कोणताही प्रसंग कितीही क्षुद्र असला, तरी ते योग्य वेळी पूर्ण सत्यनिष्ठेने तो निवेदितात, तसाच हाही वृत्तांत सांगण्याचे वचन त्यांनी दिले आहे.



प्रकरण ४८

# डचेसची दासी डोन्ना रोड्रिगेझ हिच्याशी डॉन क्विक्झोट यांचा काय संबंध आला ? तसेच वाचकांच्या स्मृतीमध्ये कायमचे स्थान मिळविणारे व नमूद करण्यासारखे दुसरे काही उतारे

डॉन क्विक्झोट यांना अशा प्रकारे दुर्दैवाने दुखापती झाल्या. त्यामुळे ते अत्यंत खिन्न व चिडखोर बनले. त्यांचा चेहरा, देवदूताच्या हाताने नव्हे, पण मांजराच्या पंज्याने ओरबाडला गेला. शिलेदारीच्या जीवनात हा प्रसंग दुर्दैवी होय. सहा दिवस ते लोकांपुढे येऊ शकले नाहीत. एके दिवशी रात्री ते आपल्या खोलीत अशा प्रकारे अंथरुणावर पडले असताना जागे होते आणि आपल्या दुर्दैवाचा व आल्टीसिडोराच्या आर्जवांचा विचार करीत होते. तेव्हा कोणी तरी आपल्या खोलीचे दार किल्लीने उघडीत आहे असे त्यांना दिसले. तत्काळ त्यांनी तर्क केला की, ती प्रेमलुब्ध दासी आपल्या पावित्र्याचा भंग करण्यासाठी आणि टोबोसोच्या लेडी डल्सीनियाच्या चरणी आपण जी निष्ठा अर्पण केली आहे ती नष्ट करण्यासाठी या खोलीत येत असावी. या कल्पनेने भारले जाऊन, कोणालाही ऐकू जाईल इतक्या मोठ्या आवाजात ते म्हणाले, "माझ्या हृदयाच्या गाभाऱ्यात आणि माझ्या वक्षःस्थलाच्या अत्यंत गुह्य भागात ज्या मोहिनीची मूर्ती कोरलेली आहे, तिच्यावरील माझी भक्ती कोणतीही विश्व-सुंदरी नाहीशी करू शकणार नाही– मुळीच करू शकणार नाही. माझ्या हृदयाच्या एकमेव स्वामिनीचे रूपांतर एखाद्या शुद्ध खेडवळ मोलकरिणीत झाले किंवा सोनेरी टॅगस नदीच्या अप्सरेमध्ये होऊन ती मागावर रेशमी व जरतारीचे कापड विणू लागली, तरी माझी तिच्यावरील निष्ठा उणी होणार नाही. हे माझ्या एकमेव हृदयस्वामिनी, मर्लिन किंवा मॉंटेसिनोज यासारख्या मांत्रिकांनी आपल्या मर्जीप्रमाणे तुला कोठेही स्थानबद्ध करून ठेवले आणि तू कोठेही असलीस, तरी तू माझी आहेस आणि मी कोठेही असलो तरी, मी तुझाच असेन– आणि असलो पाहिजे."

त्यांचे हे भाषण संपते न संपते तोंच दरवाजा उघडला. तत्काळ ते अंथरुणात उठून उभे राहिले. त्यावेळी त्यांचा देह डोक्यापासून पायापर्यंत सॅटिनीच्या पिवळ्या रजईमध्ये गुंडाळलेला होता आणि त्यांच्या डोक्यावर लोकरी टोपी होती. त्यांचे तोंड आणि त्यांच्या मिशा कपड्याने बांधलेल्या होत्या. त्यांचे ओरखडे भरून निघावेत म्हणून

तोंड बांधलेले होते आणि मिशा खाली लोंबू नयेत म्हणून त्या बांधलेल्या होत्या. अशा वेषात ते एखाद्या विचित्र भुतासारखे दिसत होते. कल्पना करता येणार नाही इतके ते विचित्र दृश्य होते. त्यांनी आपले डोळे दारावर रोखले. खिन्न व शरणागत अशी आल्टीसिडोरा आपल्याला दिसेल अशी त्यांची अपेक्षा होती. पण एक अत्यंत आदरणीय प्रौढा येत असताना त्यांच्या दृष्टीस पडली. तिच्या अंगावर पांढरा बुरखा होता. तो इतका लांब होता की, त्याने तिचा देह डोक्यापासून पायापर्यंत झाकला होता. तिने आपल्या डाव्या हाताच्या बोटात अर्धी जळती मेणबत्ती धरलेली होती. आणि मेणबत्तीचा प्रकाश आपल्या डोळ्यावर पडू नये म्हणून तिने आपला उजवा हात आपल्या तोंडापुढे धरला होता. तिचे डोळे भल्यामोठ्या चष्म्याने झाकले होते. ती अगदी हळू हळू, अत्यंत मंद गतीने येत होती. डॉन क्विक्झोट तिच्या हालचाली बारकाईने पहात होते. तिचा झगा आणि तिचे मौन पाहून त्यांना वाटले, कोणी चेटकीण किंवा जादूगारीण आपल्यावर दुष्ट जादू टाकण्यासाठी या वेषात आली असावी. म्हणून त्यांनी शक्य तितक्या त्वरेने क्रूसाच्या खुणा सुरू केल्या. तोपर्यंत ती मूर्ती पुढे पुढे येत होती. खोलीच्या मध्यभागी येताच तिने आपली नजर वर केली. तेव्हा डॉन क्विक्झोट आपल्या छातीवर क्रूसाच्या हजारदा खुणा करीत असल्याचे तिला दिसले.

त्या मूर्तीच्या दर्शनाने त्यांना जर आश्चर्य वाटले असेल, तर त्यांच्या दर्शनाने तिला तितकेच भय वाटले. म्हणून पिवळ्या पोषाखात गुंडाळलेला त्यांचा देह पाहताच–तो सडपातळ आणि पट्टया बांधलेला व रजईत गुंडाळलेला तो देह पाहताच– ती म्हणाली, " माझ्यावर कृपा करा. हे काय आहे ? " आकस्मिक भयामुळे तिच्या हातातील मेण-बत्ती खाली पडली. खोलीत अंधार पसरला. ती पळून बाहेर जाऊ लागली. तिच्या लांब झग्यामुळे ती अडखळू लागली आणि त्या खोलीच्या मध्यभागी खाली पडली. त्यामुळे डॉन क्विक्झोट यांना मोठी चिंता वाटली आणि ते म्हणाले, " अरे पिशाच्च्या–किंवा जो कोणी असशील तो, तू कोण आहेस ? माझ्यापासून तुला काय हवे आहे हे मला कृपा करुन सांग, अशी माझी विनंती आहे. तुझा जीव यातना भोगीत असेल तर तसे मला सांग, म्हणजे मी माझ्या शक्तीची पराकाष्ठा करून त्याला स्वास्थ्य मिळवून देण्याचा प्रयत्न करीन. कारण मी कॅथॉलिक ख्रिश्चन आहे आणि अखिल मानवजातीचे कल्याण करण्याची मला इच्छा आहे. त्याच कारणाने मी शिलेदारीचा व्यवसाय माझ्या शिरावर घेतला आहे. त्याची कर्तव्ये अनंत आहे. पापलोकातील जीवांचा उद्धार करण्याचे काम मी करीत असतो. "

त्या बिचाऱ्या म्हातारीने त्याची ही विनंती ऐकली आणि आपल्या भीतीवरून डॉन क्विक्झोटच्या भीतीची कल्पना केली. ती खिन्न व खालच्या स्वरात म्हणाली, " अहो लॉर्ड डॉन क्विक्झोट, ( आपण ते असाल तर ) मी पिशाच्च नाही किंवा भूत नाही अथवा आपण कल्पना करता त्याप्रमाणे पापलोकात खितपणारा जीवहि नाही. डचेसची मानकरीण डोन्ना रोड्रीगेझ मी आहे. काही गाऱ्हाणी घेऊन मी आपल्याकडे आले आहे.

आपण जी गाऱ्हाणी दूर करता, तशाच स्वरुपाचे हे आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " डोन्ना रोड्रीगेझ, प्रेमाचे काही कारस्थान रचण्यासाठी तू येथे आली नाहीस काय, हे मला सांग. पण त्यासाठी जर तू येथे आली असशील तर तुझे श्रम वाया जातील हे मी सांगतो. टोबोसोच्या लेडी डल्सीनियाच्या अप्रतिम सौंदर्याला धन्यवाद असोत! अशा काही कामगिरीवर, बाईसाहेब, तुम्ही आला नसाल तर तुम्ही आपली मेणबत्ती पेटवा आणि परत या. आपण तुमच्या इच्छेस येईल त्या कोणत्याही विषयावर बोलू. पण लक्ष्यात ठेवा, दुष्ट हेतूने केलेली सारी भाषणे, प्रेमासाठी केलेले सारे मोहाचे चाळे मी टाळतो." मेट्रन म्हणाली, " काय, दुसऱ्यांना मुली पुरविणारी मी कुंटीण आहे? महाराज, आपण मला ओळखत नाही असे दिसते. असा भिकार धंदा करण्याइतकी मी अजून शिळी झालेली नाही. अद्याप माझ्या अंगावर भरपूर मांस आहे आणि तोंडात सारे दात आहेत– त्याबद्दल मी प्रभूचे आभार मानते. या अरॅगॉन प्रांतात ज्या व्याधी विपुल आहेत, त्यांनी माझे थोडे दात खाल्ले आहेत, इतकेच. पण अंमळ थांबा. मी माझी मेणबत्ती पेटवते. मग मी माझ्या दुर्दैवाची कहाणी आपल्याला सांगेन. कारण, जगातील साऱ्या गोष्टी ठाकठीक करणारे आपणच आहा. " असे म्हणून, उत्तराची वाट न पाहता, ती तेथून निघून गेली.

डॉन क्विक्झोट यांनी काही काळ तिची वाट पाहिली, पण त्यांच्या चलाख डोक्यात या नव्या साहसासंबंधी हजारो कल्पना लौकरच खेळू लागल्या. आपल्या हृदय–स्वामिनीवरील निष्ठेला बाध आणणाऱ्या नुसत्या विचाराला तरी आपण शरण गेलो, ही आपली चूक झाली, असे त्यांना वाटले. ते स्वतःशी म्हणाले, " सरदारिणी, उमराविणी, डचेस, राण्या–महाराण्या यांच्याकडून माझा पराभव करणे सैतानाच्या शक्तीबाहेरचे असेल आणि म्हणून तो एका म्हाताऱ्या दाईकडून माझा असा पराभव करीत असेल. कोणी सांगावे, खरे काय ते! मी पुष्कळदा मोठ्या विचारी माणसाकडून असे ऐकले आहे की, सैतान एखाद्या माणसाला सुंदर स्त्रियापेक्षा कुरूप स्त्रियांमार्फतच मोहात पाडतो. कोणी सांगावे, हा एकांत, ही संधी, रात्रीची ही शांत वेळ – यामुळे माझ्या सुप्त वासना जाग्या होतील आणि ज्या मोहकारक गोष्टीवर मी पूर्वी कधी ठेचकाळलो नाही, त्यामुळेच या उतारवयात माझा अधःपात होईल. अशा बाबतीत, संकटाला तोंड देण्यासाठी थांबण्यापेक्षा पळून जाणे चांगले. पण मी असा मूर्खासारखा विचार करीत का बसलो आहे? प्रेताच्या वस्त्रासारखा पांढरा, लांब बुरखा धारण केलेली व नाकावर चष्मा असलेली एक जुनाट दासी अत्यंत स्वैराचारी पुरुषाच्या भ्रष्ट अंतःकरणात अपवित्र विचार निर्माण करील किंवा जागृत करील, हे खचित अशक्य आहे. अंगावर भरपूर मांस असलेली एखादी तरी दाई किंवा प्रौढा असेल काय? या राजघरातील एक तरी वस्तू नम्र, स्वाभाविक नि सुसह्य आहे काय? कोणाही पुरुषाची करमणूक करण्यास निरुपयोगी अशा रिकामटेकड्या सुरकुतलेल्या दासींचा तांडा चालता होवो! जिने आपल्या खोलीत फक्त दोन रोगट दासींना कामाला बसविले असे जिच्याबद्दल

सांगतात, त्या स्त्रीला काय नावाजायचे? दोन पुतळ्या मांडून ठेवल्यासारखीच शोभा खऱ्याखुऱ्या सोबतिणींमुळे त्या खोलीला आली आहे.

असे म्हणून ते, डोन्ना रोड्रिगेझला बाहेर ठेवण्यासाठी दार बंद करण्यास आपल्या अंथरुणातून उठले पण त्याचवेळी ती पेटलेली मेणबत्ती घेऊन आत आली. तेव्हा रजईत गुंडाळलेले, तोंडाला पट्ट्या बांधलेल्या व डोक्यावर लोकरी टोपी असलेले शिलेदारजी आपल्याजवळ आलेले पाहून ती पुनः घाबरली आणि दोन–तीन पावले मागे सरली व म्हणाली, " शिलेदारसाहेब, येथे माझी अब्रू सुरक्षित आहे ना? कारण, आपण आपल्या बिछान्यातून बाहेर येणे चांगले दिसत नाही, असे मला वाटते." डॉन क्विक्झोट म्हणाले, " बाई, तोच प्रश्न मी तुला विचारला पाहिजे. माझ्यावर काही आक्रमण व बळजबरी होणार नाही ना? मी सुरक्षित आहे ना, हे तू मला सांग." ती म्हणाली, " शिलेदारसाहेब, आपल्याला भय कोणाचे?" डॉन क्विक्झोट उत्तरले, " तुझे! कारण थोडक्यात सांगावयाचे तर, मी पाषाणाचा बनलेलो नाही की तू पितळेची बनलेली नाहीस. आणि आता माध्यान्ह नाही – चांगली मध्यरात्र आहे– माझी चूक होत नसेल, तर मध्यरात्रही टळून गेली आहे. शिवाय, एखाद्या गुहेपेक्षाही खाजगी व एकांताच्या जागी आपण आहो. लबाड नि मग्रूर एनीअसने सुंदर नि कोमल-हृदयी डिडोचा उपभोग अशाच जागी घेतला. तथापि, बाईसाहेब, आपण आपला हात माझ्या हातात द्या. माझा संयम नि सावधानता यापेक्षा दुसऱ्या कोणत्याच संरक्षणाची मला इच्छा नाही." असे म्हणून त्यांनी स्वतःच्याच उजव्या हाताचे चुंबन घेतले आणि त्याने तिचा हात धरला. तसाच विधी करुन तिने आपला हात त्यांच्या हातात दिला.

[येथे सिड् हॅमेट (विषयांतर करुन) महंमदाची शपथ घेऊन सांगतो की, शिलेदारजी व मेट्रन हातात हात घालून खोलीच्या दरवाज्यापासून बिछान्यापर्यंत चालत गेले, हे दृश्य पहाण्यासाठी मी माझ्याजवळच्या दोन कोटातला उत्तम कोट बक्षीस दिला असता.] थोडक्यात सांगायचे तर, डॉन क्विक्झोट पुन्हा अंथरुणाकडे गेले आणि त्यांच्यापासून काही अंतरावर असलेल्या खुर्चीवर डोन्ना रोड्रिगेझ बसली. तिने आपला चष्मा काढून घेतला नव्हता किंवा मेणबत्ती खाली ठेवली नव्हती. डॉन क्विक्झोट यांनी आपल्या तोंडाशिवाय बाकी सारे शरीर पक्के झाकून टाकले होते. थोडा वेळ दोघेही मौन धारण करुन होते. त्या मौनाचा भंग शिलेदारजींनी प्रथम केला आणि ते म्हणाले, " बाईसाहेब, आता आपण आपल्या मनातील सारी खळबळ मोकळेपणाने सांगा. तुमच्या गाऱ्हाण्याकडे माझे शुद्ध कान अगत्याने लक्ष देतील आणि तुमचे संकट दूर करण्यासाठी माझे दयाळू अंतःकरण मदत करील हे खचित समजा." प्रौढा म्हणाली,

" तसा माझा विश्वास आहे. आपल्यासारख्या सुखद व आकर्षक अशा व्यक्तीकडून असेच उदार उत्तर मिळेल, असे मी माझ्या मनास बजावले होते. थोर महाराज, गोष्ट अशी आहे की, आता आपण मला अरॅगॉनच्या मध्यभागी एखाद्या क्षुद्र, अभागी सोबतिणीच्या वेषात खुर्चीवर बसलेली पहात असला, तरी मी ह्या प्रांतातील एका थोर

घराण्यातील असून ओव्हिडोच्या ॲस्टुरिअसची आहे. पण दुर्दैव माझे, माझ्या आई-वडिलांच्या परिस्थितीला, कशामुळे हे मी सांगू शकत नाही, ओहोटी लागली आणि त्यांनी माझी उपेक्षा केली. त्यांनी मला माद्रिदला नेले. तेथे त्यांना माझी दुसरी काही चांगली सोय करता न आल्यामुळे त्यांनी मला एका दरबारी स्त्रीकडे घरची दासी म्हणून ठेवले. स्वच्छच सांगावयाचे तर, माझ्या उभ्या आयुष्यात माझ्यापेक्षा अधिक चांगले काम कोणी केले नसेल. मला तेथे नोकरीवर ठेवून माझे आईबाप घरी परत गेले. काही वर्षां-नंतर ते दोघेही मरण पावले. ते स्वर्गात गेले असावेत, अशी मला आशा आहे. कारण ते अत्यंत सज्जन होते आणि धार्मिक वृत्तीचे कॅथॉलिक होते. मग मी पोरकी झाले आणि भिकार पगार व किरकोळ भत्ता मिळविणाऱ्या दरबारी नोकरांच्या दुर्दशेत जाऊन पडले. त्याचवेळी प्रार्थना–मंदिरातील एक सज्जन सेवक माझ्या प्रेमात पडला. तसे काही होत आहे, हे माझ्या स्वप्नातही नव्हते हे मी ईश्वरसाक्ष सांगते. तो काहीसा उतार-वयाचा होता. त्याची दाढी भव्य होती आणि तो चांगला दिसे—विशेष म्हणजे, तो राजा-सारखा भला माणूस होता. कारण तो डोंगराळ प्रदेशातील होता. आम्ही आमचे प्रेम–प्रकरण फार पुढे नेले नाही, पण ते माझ्या धनिणीच्या कानी गेले. म्हणून लोकांची तोंडे बंद करण्यासाठी, काही गाजावाजा न करता, तिने कॅथॉलिक चर्चमध्ये आपल्या 'पवित्र मातेसमोर' आम्हा दोघांचे लग्न लावून टाकले. त्या लग्नापासून मला एक मुलगी झाली. तिने माझ्या सुदैवाचा ( असल्यास ) पूर्ण विध्वंस केला. याचा अर्थ मला बाळंतपणात मृत्यु आला असे नव्हे. माझे पूर्ण दिवस भरले होते व सुखरूप प्रसूती झाली होती; पण थोड्या काळाने माझा पती मृत्यू पावला. ( त्याच्या आत्म्यास शांती मिळो ! ) त्याला मृत्यू कसा आला हे आपल्याला सांगण्यासाठी, मला वेळ असता, तर आपण आश्चर्य केले असते, असे मी खात्रीने सांगते." येथे ती करुण स्वराने रडू लागली आणि म्हणू लागली, "महाराज, मी आपली क्षमा मागितली पाहिजे, कारण माझे मन मला आवरत नाही. ज्या ज्या वेळी मी माझ्या अभागी पतीचा विचार करते, तेव्हा तेव्हा अश्रू ढाळल्याशिवाय मला राहवत नाही. अहो, तो किती देखणा दिसत होता आणि किती रुबाबाने आपल्या खेचरावर स्वार होत होता. लोखंडासारख्या काळ्याकुट्ट, भरभक्कम खेचरावर तो बसे आणि त्याच्या पाठीमागे माझी धनीण बसे, कारण त्यावेळी आताप्रमाणे गाड्या व खुर्च्या वापरात नव्हत्या. स्त्रिया नोकराच्या पाठीमागे बसत. आता माझी जीभ खवळली आहे. म्हणून सारी कहाणी सांगितल्या-शिवाय मला राहवत नाही. त्यावरून, माझा प्रिय पती किती सुसंस्कृत होता आणि शिष्टाचाराच्या प्रत्येक बाबतीत किती दक्ष होता; हे आपल्याला कळून येईल.

"एके दिवशी माद्रिद येथे तो सेंट जेम्स स्ट्रीटवर आला. तो रस्ता काहीसा अरुंद आहे. माझी धनीण खेचरावर त्याच्या पाठीमागे बसली होती. त्यावेळी न्यायमंदिरातील एक न्यायाधीश त्याला भेटला. त्याच्यापुढे दोन अधिकारी होते. न्यायाधीशाला पहाताच त्याला आदर दाखविण्यासाठी माझ्या नवऱ्याने आपले खेचर एका बाजूस वळविले–

आपण त्यांचेसाठी वाट करून देत आहो, असे त्याला दाखवायचे होते. पण माझी धनीण त्याच्या कानांत कुजबुजली, "अरे मठ्ठा, याचा अर्थ काय ? मी इथं आहे हे तुला माहीत नाही काय ?" न्यायाधीशही काही कमी सभ्य नव्हता. आपला घोडा थांबवून तो म्हणाला, "महाराज, आपण आपल्या वाटेने जा, तुम्ही माझ्यासाठी थांबण्याची गरज नाही. लेडी गॅसिल्डा ( ते माझ्या धनिणीचे नाव होते. ) यांच्या सेवेस सादर होणे हे मला शोभून दिसेल." पण माझ्या नवऱ्याने, आपली टोपी हातात घेऊन, आपली आदब तशीच चालू ठेवली. पण त्यामुळे धनीण त्याचेवर खूपच संतापली आणि शेवटी तिने एक मोठी टाचणी-दाभणच म्हणा ना–आपल्या पिशवीतून काढली आणि त्याच्या पाठीत भोसकली. त्यामुळे माझा नवरा एकदम दचकला आणि आरडत–ओरडत खोगिरावरून खाली पडला–आपल्यामागून धनिणीलाही त्याने खाली पाडले. लगेच तिचे दोन नोकर तिच्या मदतीस धावले– आणि न्यायाधीश व त्याचे दोन अधिकारीही. ग्वाडा-लॅजॅराच्या वेशीत मोठा गोंगाट झाला (वेशीपाशी जमलेल्या रिकामटेकड्या लोकांनी गलगा केला, असे मला म्हणायचे आहे. ) सारांश, माझी धनीण घरी पायी आली आणि माझा नवरा एका शस्त्रविशारद वैद्याकडे गेला. 'आपल्या फुप्फुसात कोणी भोसकले आहे.' अशी तक्रार त्याने केली. त्याने हे जे नम्रपणाचे वर्तन केले, त्याचा बोभाटा सर्वत्र झाला. त्यामुळे रस्त्यावरील मुलेही त्याच्याभोवती गोळा होऊन त्याची टर उडवू लागली. त्यामुळे–आणि माझ्या धनिणीची दृष्टी काहीशी कोती असल्यामुळे–तिने त्याला आपल्या नोकरीवरून बडतर्फ केले. ते त्या अभागी माणसाने आपल्या जिवाला इतके लावून घेतले की लवकरच त्याला आपल्या प्राणाचे मोल द्यावे लागले.

"आता मी एक अनाथ विधवा राहिले–संभाळ करण्यासाठी एक कन्या घेऊन राहिले. ती जसजशी शरीराने वाढत होती, तसतशी सौंदर्यानेही वाढत होती आणि समुद्राच्या फेसासारखी सुंदर दिसत होती. शेवटी मी उत्तम भरतकाम करणारी असल्या-मुळे माझी धनीण डचेस यांनी, ( त्यांचे ड्यूकसाहेबाशी नुकतेच लग्न झाले होते ) मला व माझ्या मुलीला आपल्या सांगती रहाण्यास येथे– अरॅगॉनमध्ये– आणले. कालांतराने माझी मुलगी वयात आली आणि जगांतील सर्वोत्तम स्त्री झाली. ती चंडोलाप्रमाणे गाते, अप्सरे-प्रमाणे नाचते, रान–हरिणाप्रमाणे उड्या मारते, पंतोजीप्रमाणे लिहिते–वाचते आणि सावकाराप्रमाणे हिशेबठिशेब करते. तिचे वागणे किती टाकटीक असते हे मी सांगत नाही, पण झऱ्याचे झुळझुळ वाहणारे शुद्ध पाणी काही तिच्याहून अधिक स्वच्छ खात्रीने नसते. तिच्या वयासंबंधी सांगायचे तर, मी चुकत नसल्यास, ती सोळा वर्षे, पाच महिने व तीन दिवस या वयाची आहे.

"आता अशा या माझ्या मुलीच्या प्रेमात कोण पडले असेल ? येथून फार दूर नसलेल्या, ड्यूकच्या एका खेड्यात रहाणाऱ्या एका अत्यंत श्रीमंत शेतकऱ्याचा मुलगा तिच्या प्रेमात पडला. खरोखर, त्याने काय काय केले हे मला माहीत नाही, पण तो तिच्या इतक्या जवळ गेला की, लग्न करण्याचे वचन देऊन त्याने लाडीगोडीने तिची

संमती मिळविली. सारांश, आपल्या इच्छेप्रमाणे वागण्याचे त्याने तिच्याकडून कबूल करून घेतले, पण आता तो आपला शब्द खरा करण्याचे नाकारीत आहे. हा सारा प्रकार ड्यूकला अपरिचित नाही. कारण मी याबद्दल त्यांचेकडे खूप खूप वेळा तक्रार केली आहे आणि माझ्या मुलीशी लग्न करण्याची त्या तरुणाला आज्ञा देण्यास विनंती केली आहे. पण ड्यूकसाहेब माझे ऐकत नाहीत– फार काय, त्या प्रकरणाविषयी मी काही बोललेले त्यांना खपतही नाही. कारण त्या दुष्ट तरुणाचा बाप श्रीमंत आहे आणि तो ड्यूकला पैसे कर्जाऊ देतो– कोणत्याही प्रसंगी त्याला जामीन राहतो. त्यामुळे त्याला ड्यूकसाहेब कधीही नाराज करू इच्छित नाहीत.

" महाराज, म्हणून मी आपल्याला प्रार्थना करते की, माझ्या मुलीचे हे प्रकरण विनंती करून किंवा सक्ती करून, मार्गाला लावून द्या. लोकांची गाऱ्हाणी दूर करण्यासाठी आणि संकटात सापडलेल्यांना साहाय्य करण्यासाठीच प्रभूने आपल्याला या जगात पाठविले आहे, असे प्रत्येकजण म्हणतो. कृपा करा आणि माझ्या कन्येच्या पोरकेपणाकडे, तिच्या लावण्याकडे, तिच्या तारुण्याकडे आणि तिच्या इतर साऱ्या गुणाकडे, सदय दृष्टीने पहा. माझ्या दृष्टीने विचार केला तर, माझ्या धनिणीच्या साऱ्या दासींमध्ये एकही तिच्या पासंगाला पुरणार नाही – फार काय, जिला आल्टिसिडोरा म्हणतात– ती सर्वांत अत्यंत नाजूक नि सुंदर आहे, असा बोभाटा आहे– पण तीसुद्धा माझ्या मुलीपासून एक मैल अंतरावर उभी रहाण्याच्या योग्यतेची आहे. माझ्या मुलीबरोबर तिचे नावही उच्चारणे योग्य होणार नाही, असे मला खात्रीने वाटते. कारण, महाराज, मी आपल्याला सांगते, जे जे चकाकते, ते सारे सोने नसते. ही आल्टीसिडोरा मोठी आढ्यताखोर आहे. सौंदर्यापेक्षा आढ्यता आणि नम्रतेपेक्षा चढेलपणा तिच्या अंगी अधिक आहे. शिवाय तिची प्रकृतीही मुळीच उत्तम नाही. तिचा श्वासोछ्वास इतक्या जोराने होतो की, तिच्याजवळ कोणीही क्षणभर उभा राहू शकत नाही– छेः, माझी धनीण डचेससुद्धा. पण जाऊ द्या, मी आणखी काही बोलत नाही. भिंतीलाही कान असतात, म्हणतात. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, " डचेसबाईसंबंधी काय म्हणता आपण ? डोन्ना रोड्रिगेझ, मला ते सांगा, अशी मी, आपल्याला प्रिय असणाऱ्या साऱ्या वस्तूंची आण घेऊन, विनंती करतो. " प्रौढा म्हणाली, " महाराज, आपली विनंती इतकी जोरदार नि भुरळ घालणारी आहे की, तिला विरोध करणे शक्य नाही. मी आपल्याला संपूर्ण सत्य सांगितलेच पाहिजे. महाराज, आपण माझ्या स्वामिनीचे सौंदर्य, तिच्या मुद्रेची कोमलता आणि रेखीवपणा पाहिला आहे ना ? घासूनपुसून ठेवलेल्या समशेरीप्रमाणे तिची मुद्रा तळपत असते. तिचे गाल दुधासारखे, केशरासारखे दिसतात – चंद्रासारखे सुंदर आणि सूर्यासारखे तेजस्वी दिसतात. ती जेव्हा चालते, तेव्हा तिच्या मुद्रेवर असा भाव असतो की, भूमीला स्पर्श करण्यात तिला कमीपणा वाटतो. सारांश, तिच्या आरोग्यसंपन्न यष्टीमुळे तिच्या सर्व सौंदर्याला जिवंतपणा प्राप्त होतो. महाराज, मी आपल्याला सांगते की, या सर्व सौंदर्यासाठी तिने प्रथम ईश्वराचे आभार मानले पाहिजेत.

नंतर तिने ईश्वराचे आभार मानले पाहिजेत ते अशासाठी की, तिच्या दोन्ही पायांतून रक्त व पू वहात असतो. तो दूषित स्राव निघून जावा म्हणून ती आपले पाय उघडे ठेवते. तिच्या शरीरात अशी घाण मोठ्या प्रमाणावर आहे असे वैद्यांचे म्हणणे आहे."
डॉन क्विक्झोट म्हणाले, "कुमारी मातेचा जयजयकार असो! डचेसच्या शरीरातून असे स्राव होणे शक्य आहे काय? तुम्ही सांगता म्हणूनच यावर मी विश्वास ठेवतो. नाही तर अनवाणी चालणाऱ्या एखाद्या महंताने ते सांगितले असते, तरी ते मी मानले नसते. सौंदर्याच्या एवढ्या पूर्णावतारापासून आम्ही सुगंधी अष्टगंध द्रवरूपाने पाझरत असेल – रक्तस्राव नव्हे – असे आम्हाला खचित वाटते. आता मला असे वाटू लागले आहे की, असे स्राव होणे आरोग्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असेल – अवश्य असेल."

डॉन क्विक्झोट यांनी हे शब्द उच्चारले, तोंच खोलीचे दार खाडकन् उघडले. त्याबरोबर डोन्ना रोड्रिगेझला भयंकर भीती वाटली आणि त्यामुळे आपल्या हातातील मेणबत्ती तिने खाली पडू दिली. आणि त्या खोलीत (लोक म्हणतात त्याप्रमाणे) लांडग्याच्या तोंडासारखा काळोख पसरला. त्या बिचाऱ्या दासीला वाटले, कोणी तरी आपला गळा धरला आहे आणि तो इतका आवळला आहे की, आरडाओरड करणे आपल्या शक्तीबाहेर आहे, दुसऱ्या एकाने तिचा अंगरखा ओढला आणि तिच्यावर–– तिच्या उघड्या कुल्ल्यावर– सफाईने इतक्या निर्दयपणे बडविले की, तसे करणाऱ्याशिवाय दुसऱ्या कोणाचेही अंतःकरण करुणेने हालले असते. डॉन क्विक्झोट यांनाही करुणा वाटल्याशिवाय राहिली नाही, पण आपल्या बिछान्यावरून उठणे त्यांना योग्य वाटले नाही. म्हणून ते तेथेच आरामात शांतपणे पडून राहिले. या सर्व गोंधळाचा अर्थ काय? हे त्यांना कळेना. मेट्रनच्या पाठीवर उसळलेले तुफान आपल्याही पाठीवर आदळेल, असे भय त्यांना वाटले––आणि ते भय अकारण नव्हते. कारण त्या मूक कार्यकर्त्यांने त्या म्हातारीला सरळ केल्यानंतर (ती ओरडण्यास धजली नाही) ते डॉन क्विक्झोटकडे आले. त्यांच्या अंगावरील रात्रीचे कपडे हिसकावून घेऊन त्यांनी त्यांना इतक्या जोराने आणि इतक्या वेळा चिमटे घेतले की, स्वसंरक्षणासाठी डॉन क्विक्झोट यांना बुक्क्यांचा, शक्य तितका, उपयोग केल्याशिवाय राहवले नाही. हा झगडा सुमारे अर्धा तास चालला. नंतर ती अदृश्य पिशाच्चे गुप्त झाली. डोन्ना रोड्रिगेझ हिने आपला अंगरखा नीट घातला. आपल्या दुर्दैवाबद्दल शोक करीत पण शिलेदारजीशी एकही शब्द न बोलता ती खोलीतून बाहेर गेली. शिलेदारजी होते तेथेच राहिले. चिमटे निघाल्यामुळे ते दुःखी-कष्टी झाले होते––अत्यंत चिंतातुर व विचारमग्न बनले होते. अशा प्रकारे आपल्याला छळणारा दुष्ट जादूगार कोण असावा हे त्यांना कळेना; पण आपल्याला ते योग्य वेळी कळेल. आता आपण त्यांचा निरोप घेऊ या आणि सँको पँझाकडे वळू या. आपल्या इतिहासाच्या क्रमामध्ये आता आपण त्याची भेट घेणे अवश्य आहे.

□ □

प्रकरण ४९

# सँको पँझा आपल्या बेटाची पाहणी करण्यास गेला असता, त्याला काय अनुभव आला ?

आपण आपल्या समर्थ राज्यपालांना बऱ्याच अस्वस्थ अवस्थेत सोडले होते. त्यावेळी त्या खेडवळ व गंमत्या दुष्ट माणसाने त्यांचा पिच्छा पुरविला होता. तसे करण्यास त्या खेडवळास त्या मुख्याधिकाऱ्याकडून---आणि त्याला ड्यूककडून--सूचना मिळालेल्या होत्या. म्हणून त्याने राज्यपालसाहेबांची थट्टा करण्यासाठी आपल्या स्थितीचे बेफाम वर्णन केले होते. पण सँको कितीही मठ्ठ व मूर्ख असला, तरी त्याने त्या सर्वांना चांगले तोंड दिले. शेवटी आपल्याजवळ असलेल्या माणसांना उद्देशून तो बोलू लागला. या माणसामध्ये पेड्रो रोझियोही होता. ड्यूकच्या पत्राची चर्चा संपल्यावर तो बाहेर गेला होता, पण आता तो खोलीत परत आला होता. सँको म्हणाला, " आता मला खरोखर असे वाटते की, न्यायाधीश व राज्यपाल हे पितळेचे घडविलेले असले पाहिजेत-निदान तसे असावेत. म्हणजे आपले काम आहे असा बहाणा करून सर्व काळी, सर्व क्षणी, जे लोक आपापली गाऱ्हाणी घेऊन त्यांचेकडे जातील, त्यांचे म्हणणे ऐकले जाईल व त्यांच्या गाऱ्हाण्यांचा निकाल लावला जाईल. अशा लोकांना स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाची पर्वा नसते. इतरांचे काहीही होवो, आपले काम झाल्याशी कारण, असे ते मानतात. एखाद्या अभागी न्यायाधीशाने त्यांचे म्हणणे ऐकले नाही आणि तत्काळ निकालात काढले नाही-कारण, त्याला दुसरे काही काम असेल किंवा ते लोक योग्य वेळी आले नाहीत म्हणून--तर ते कुरकुरतात, त्याला शाप देतात आणि त्याच्या पूर्वजांच्या अस्थी उकरून काढतात-त्याची हाडे खाऊन टाकण्याची त्यांना इच्छा असते. पण अहो लुडबुडे-महाराज, तुमची कितीही कामे असली, तरी तुम्ही फार घाई करता असे मी तुम्हांला, आपल्या परवानगीने, सांगतो. तुम्ही जरा धीर धरा आणि आपला अर्ज करण्यास योग्य वेळ येईपर्यंत थांबा. भोजनाच्या वेळी येऊ नका— जेव्हा माणूस झोपी जात असतो, तेव्हा येऊ नका. कारण, आम्ही न्यायाधीशही हाडामांसाचीच माणसे आहो-निसर्गाच्या गरजा आम्हांलाही भागवाव्या लागतात. मी इतका दुर्दैवी की, मला माझे अन्नही खावयास मिळत नाही. येथे असलेला माझा दोस्त श्रीयुत डॉक्टर रेझियो टिर्टीफ्युएरला धन्यवाद असोत ! तो मला उपास घालून ठार मारीत आहे-आणि तरीही शपथेवर सांगतो की, हे सारे माझा जीव वाचविण्यासाठी आहे. त्याला-आणि त्याच्यासारख्या

वैदू लोकांच्या टोळीला– ईश्वराने असलेच आयुष्य द्यावे, अशी माझी प्रार्थना आहे. मात्र, चांगल्या वैद्यांना मान-सन्मान मिळणे योग्य आहे."

ज्यांना ज्यांना म्हणून सँकोची माहिती होती, त्या सर्वांना त्याचे इतके शहाणपणाचे भाषण ऐकून आश्चर्य वाटले. त्यांना असे वाटू लागले की, अधिकार आणि विश्वासाची पदे प्राप्त झाल्यानंतर काही लोकांची डोकी फिरतात आणि गोंधळून जातात, त्याचप्रमाणे काही लोकांच्या ठिकाणी शहाणपण येते. तथापि टिर्टीफ्युरा येथील डॉ. पेड्रो रेझिओ ॲगेरो याने त्याला सांगितले, हिप्पोक्रेटसच्या सर्व नियमांचे उल्लंघन करून आपण आज रात्री भोजन करावे. त्यामुळे राज्यपाल तूर्त तरी शांत झाले आणि ते संध्याकाळची व संध्याकाळच्या जेवणाची मोठ्या आतुरतेने वाट पहात बसले. त्यांच्या दृष्टीने काळ इतका मंद गतीने येत होता की, तो एका जागीच थांबला आहे असे त्यांना वाटले. शेवटी तो इच्छित क्षण आला. तेव्हा नोकरांनी त्याला कांद्यासह मांसाचे तुकडे आणि काहीसे शिळे असलेले वासराच्या पायाचे मांस वाढले. राज्यपाल भुकेलेले असल्यामुळे त्यांनी मोठ्या अधीरतेने व चवीने जेवणास सुरुवात केली. मिलनची पाखरे, तशीच रोमची पाखरे, सोरेंटोचो सागुती, रोमनचे कवडापक्षी किंवा लॅव्हाजोसचे हिरवे हंस यांचा मांसाहारच आपल्याला मिळाला आहे असे समजून तो जेवण करीत होता. क्षुधेची तीक्ष्ण धार थोडीफार कमी झाल्यानंतर वैद्याकडे वळून तो म्हणाला, "हे पहा डॉक्टर, यापुढे मला नाजूकसाजूक पदार्थ किंवा माझ्या पोटाला खूष करण्यासारखा आहार देण्याची तसदी तुम्ही घेऊ नका. त्यामुळे माझ्या पोटाचे समाधान मुळीच होणार नाही. माझ्या पोटाला सवय आहे ती चांगल्या गोमांसाची किंवा डुकराच्या अथवा बकऱ्याच्या मांसाची, मुळ्यांची आणि कांद्यांची. पण जर तुम्ही मला दरबारी थाटाचे नाजूकसाजूक जेवण देऊ लागलात तर ते माझ्या पोटाला जड जाईल आणि चिडविल्यासारखे होईल. आज ना उद्या मला त्याचा पुरा तिटकारा येईल. पण जर आचारीबुवांनी मला खमंग खिचडी वाढली तर मला चुकल्यासारखे वाटणार नाही. साऱ्या सडलेल्या पालेभाज्या एकात एक मिसळून शिजविल्या–खूप शिजविल्या, तर त्यांची खुमारी काही न्यारीच ! चविष्टपणाने खाता येईल असे कोणतेही मिश्रण तुम्ही तयार करा. त्याबद्दल मी तुम्हाला चांगले बक्षीस देईन. पण कोणीही आमच्यासारख्या प्रवासी लोकावर आपली हिकमत चालवू नये. आम्ही मूर्ख असू किंवा नसू, आम्हाला कोणी मूर्ख बनवू नये. अरे, आपण मौज करू या, शहाणपणाने वागू या. ईश्वर जेव्हा प्रकाश पाडतो तेव्हा तो सर्वांनाच देतो. मी या बेटाचे राज्य चोखपणे करीन, लबाडीचे व्यवहार करणार नाही, लाच घेणार नाही. पण लक्ष्यात ठेवा, मी माझ्या हक्काचा तिळमात्र भागही कोणाला घेऊ देणार नाही. म्हणून प्रत्येकाने न्यायाने वागावे आणि आपले हात आवरावे, नाही तर प्रत्येकावर उगारण्यासाठी माझ्याजवळ सोटा आहे हे त्याने लक्ष्यात ठेवावे. जे मला फार दूर ओढून नेऊ इच्छितात त्यांना पश्चात्ताप करावा लागेल. तुम्ही मधासारखे गोड वागू लागलात, तर मधमाशा तुम्हाला खाऊन टाकतील."

कारभारी म्हणाला, " राज्यपालसाहेब, खरोखर आपण जे सांगितले ते बहुतेक सारे बरोबर आहे. या बेटातील नागरिकांच्या वतीने मी अशी हमी देतो की, ते आपल्या आज्ञांचे पालन व आचरण तत्परतेने, प्रेमाने आणि वेळच्यावेळी करतील. आपण आपल्या राज्यकारभाराच्या प्रारंभी आपल्या शासनाचा जो सौम्य प्रकार दाखविला, त्यामुळे महाराजांना हानिकारक असे कोणतेही कृत्य–किंवा कोणतीही योजना–करण्याची संधी त्यांना मिळालेली नाही." सँकोने उत्तर दिले, " मलाही तसेच वाटते. याहून निराळा विचार किंवा कृती समजण्यास जे लोक तयार होतील, ते लोक मूर्ख व दुष्ट म्हटले पाहिजेत. तुम्हाला मी हेही सांगणे अवश्य आहे की, तुम्ही माझी आणि माझ्या डॅपलची काळजी घेतली तर मला आनंद वाटेल. आम्हाला पाहिजे तितके खाद्य मिळाले पाहिजे. कारण ती अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. दुसरी गोष्ट म्हणजे, शहरात फेरफटका मारण्यास आपण जाऊ या. त्याची योग्य वेळ तुम्ही मला सांगा. कारण माझा हेतू असा आहे की, या बेटातून सारी घाण आणि कचरा, बदमाष आणि उडाणटप्पू आळशी व दुष्ट आणि गलेलठ्ठ भिकारी या सर्वांची हकालपट्टी करावी. कारण, माझ्या सज्जन मित्रांनो, तुम्ही हे लक्ष्यात घ्या की, एखाद्या जन–समूहामध्ये असलेले सुस्त, आळशी आणि असभ्य लोक म्हणजे मधमाशाच्या मोहळातील निरुद्योगी नर होत. कष्ट करणाऱ्या मधमाशा जो मध गोळा करतात तो हे नर नासून–खाऊन टाकतात. माझी इच्छा शेतकऱ्यांना उत्तेजन देण्याची, सुसंस्कृत माणसांचे हक्क शाबूत ठेवण्याची, गुणी माणसांना बक्षीस देण्याची आणि सर्वाहून अधिक म्हणजे धर्माबद्दल आदर ठेवण्याची–धार्मिक माणसांना मान देण्याची आहे. माझ्या सज्जन मित्रांनो, याबद्दल तुम्हाला काय वाटते ? मी मुद्याला धरून बोलत आहे की रिकाम्या गप्पा मारीत आहे ? " कारभाऱ्याने उत्तर दिले, " राज्यपाल-साहेब, आपण इतके चांगले बोलत आहा की, आपल्यासारखा निरक्षर माणूस (महाराजांना मुळीच वाचता येत नाही असे मी समजतो) इतक्या संस्मरणीय गोष्टी सांगतो आणि एकेक वाक्यातून एकेक सुभाषित बोलतो, हे पाहून मी आश्चर्याने चकित होऊन जातो. ज्यांनी आपल्याला इकडे पाठविले आणि जे येथे हजर आहेत, त्यापैकी कोणीही इतक्या ज्ञानाची आपल्याकडून अपेक्षा केली नसेल; पण प्रत्येक दिवशी काही नवेच आश्चर्य निर्माण होते, चेष्टेच्या गोष्टी खऱ्या होतात आणि दुसऱ्याला हसण्यासाठी जे येतात ते स्वतःच हास्याचा विषय बनतात. "

आता रात्र झाली होती आणि डॉक्टर रेझिओच्या परवानगीने राज्यपालांचे भोजन झाले होते. शहरात फेरफटका मारण्यास ते तयार झाले होते. ते बाहेर निघाले तेव्हा त्यांच्याबरोबर तो कारभारी, तो सचिव, तो आचारी, तो इतिहास–लेखक ( त्यांच्या कृत्यांची नोंद करणारा ), कैक शिपाई आणि कायद्याचे आधारस्तंभ– इतक्या मोठ्या संख्येने निघाले की, त्यांची एक लहानशी पलटणच झाली. त्यांच्या मध्यभागी असलेल्या महापुरुषाने– सँकोने– हातात न्याय-दंड घेऊन, मोठ्या रुबाबाने प्रयाण केले. ते शहरात फार दूर गेले नाहीत तोंच त्यांच्या कानी तरवारींचा खणखणाट पडला.

तो आवाज जेथून येत होता तिकडे ते घाईने गेले. तिकडे जाताच त्यांना दोन माणसे लढत असलेली दिसली. अधिकाऱ्यांना पाहताच त्यांनी आपली लढत थांबविली. त्याच-वेळी त्यांच्यापैकी एकजण ओरडला, "काय, या शहरात ईश्वराला व राजाला न जुमानता लोकांना असे लुबाडले जाते ? भर रस्त्यावर माणसांचे सर्वस्व हिरावले जात असताना येथील नागरिक स्वस्थ कसे बसतात ?" सँको म्हणाला, "भल्या माणसा, थांब, थोडा धीर धर. या झगड्याचे कारण काय ते मला सांग. कारण मी राज्यपाल आहे." दुसरा माणूस म्हणाला, "महाराज, मी आपल्याला थोड्या शब्दात सांगतो. महाराजांनी हे लक्षात घ्यावे की, आताच रस्त्यावर आम्ही जुगार खेळत असताना या माणसाने एक हजार रील जिंकले– कसे ते, देवाला माहीत. मी खेळ चालू असता उभा होतो. अनेक वेळा खेळात वाद उत्पन्न झाला असताना मी निकाल देत होतो, खरा की खोटा हे मला सांगता येणार नाही. आपली कमाई घेऊन तो तेथून निघाला. खुशीने तो मला एक काढून देईल अशी माझी अपेक्षा होती. माझ्या राहणीच्या लोकां-मध्ये तशी पद्धत आहे. जे लोक वरच्या दर्जाचा जुगार खेळतात आणि जिंकतात, त्यांची गोष्ट सोडा, पण मामुली जुगाऱ्यांची भांडणे टळावीत म्हणून असे खुषीने पैसे दिले जातात. बरोबर किंवा चुकीचे असे निकाल देणारे लोक त्याच्या पाठीशी असतात. पण मला काहीही न देता तो निघून गेला. त्याच्या वागण्याने मला फारसा संतोष झाला नाही. तरी मी त्याच्या मागोमाग धावलो. मी त्याचा मित्र आहे आणि दुर्दशेत सापड-लेला सभ्य गृहस्थ आहे – माझ्या मित्राने मला बेकारीच्या काठावर आणून सोडलेले आहे आणि जगण्याचे साधन मजजवळ काही नाही, याचा विचार त्याने करावा, अशी माझी इच्छा मी त्याला अत्यंत नम्रतेने सांगितली आणि मला आठ रील देण्याची कृपा करण्याची विनंती केली. पण तो कंजूष माणूस ! कॅकसपेक्षा मोठा चोर ! अँड्रॅडिलापेक्षा अधिक लुच्चा ! तो मला भिकार चार रील देऊ लागला. महाराज, त्याच्या अंगी किती थोडी लज्जा आणि विवेकबुद्धी आहे हे आपणच पहा म्हणजे झालें. आपण जर ऐनवेळी येथे आला नसता तर मी त्याला जिंकलेले सारे पैसे ओकावयास लावले असते आणि कावळा व बगळा यातील फरक त्याला शिकविला असता."

सँकोने दुसऱ्या माणसाला विचारले, "यावर तुझे म्हणणे काय आहे ?" दुसऱ्याने उत्तर दिले, "माझा प्रतिस्पर्धी म्हणतो ते मी नाकारू शकत नाही. मी त्याला फक्त चार रील देईन. कारण यापूर्वी पुष्कळ वेळा मी त्याला पैसे दिले आहेत. उप-काराची अपेक्षा जे धरतात त्यांनी शिष्टाचाराने वागावे, आणि जे मिळाले असेल त्या-बद्दल ऋणी रहावे. ज्यांनी पैसे जिंकले त्यांच्याशी हुज्जत घालू नये. ते जिंकणारे लोक नेहमी फसवेगिरी करीत असते आणि रास्त मार्गाने पैसे जिंकीत नसते, तर त्यांची गोष्ट निराळी. मी चोखपणाने वागणारा जुगारी आहे– हा म्हणतो त्याप्रमाणे लबाड नाही. हे सिद्ध करण्यास मी त्याला काही जादा रील देण्यास नकार देतो, यापेक्षा दुसरा चांगला पुरावा कोणता असू शकेल ? फसव्या लोकाकडे कानाडोळा करणाऱ्या गुंडाशी लबाड लोक

नेहमी हातमिळवणी करतात. " कारभारी म्हणाला, " ते खरे आहे. महाराज, या माणसाचे आता आम्ही काय करावे अशी आपली इच्छा आहे. " सँको म्हणाला, " मी सांगतो. प्रथम, भल्याबुऱ्या कोणत्याही मार्गाने ज्याने पैसे जिंकले त्याने या गुंडाला ताबडतोब शंभर रील द्यावे आणि गरीब कैद्यांना तीस रील द्यावे. ज्या माणसाजवळ जगण्यासाठी काही नाही, जो बेकारीच्या काठावर उभा आहे आणि या गावाहून त्या गावाला लबाडी करीत हिंडत आहे त्याने, शंभर रील घ्यावे आणि उद्या सकाळी या बेटातून निघून जावे. पुढील दहा वर्षांत त्याने या बेटावर पाऊल ठेवू नये. परलोकात जाऊन आपली हद्दपारी संपुष्टात आणण्याची त्याला इच्छा असेल, तरच त्याने येथे पुन्हा यावे. मला जर तू पुन्हा येथे आढळलास तर मारेकऱ्याच्या मदतीने मी तुला वधस्तंभावर लटकत ठेवीन. चालते व्हा, मला जाब देण्याचा कोणी प्रयत्न करू नका नाही तर मी त्याला पाठीला पाय लावून पळावयास लावीन. "

नंतर एकाने पैसे दिले व दुसऱ्याने घेतले. पहिला घरी गेला व दुसरा बेटाबाहेर गेला. नंतर राज्यपाल म्हणाले, " माझी ठाम इच्छा अशी आहे की, हे बेताल जुगाराचे अड्डे बंद केले पाहिजेत. ते समाजाला अत्यंत घातुक असावेत असा माझा तर्क आहे. " त्या अधिकाऱ्यांपैकी एकजण म्हणाला, " या अड्ड्यासंबंधी सांगावयाचे तर तो बंद करणे फार अवघड आहे. कारण त्याचा मालक मोठ्या दर्जाचा आहे. तो पत्ते खेळून जितके पैसे मिळवितो, त्यापेक्षा अधिक पैसे वर्षाच्या शेवटी जुगारात घालवितो. गुणी व सभ्य माणसांच्या अशा अड्ड्यामध्ये बदमाष लबाडांना आपली हातचलाखी दाखविता येत नाही. पण त्यापेक्षा अधिक उपद्रवकारक आणि अधिक भयंकर माणसांना पोसणाऱ्या पण कमी प्रसिद्ध असलेल्या जुगारी अड्ड्यावर आपण आपली सत्ता चालवावी. जुगार हे व्यसन असले तरी आता ते सर्वांच्या अंगवळणी पडले आहे. म्हणून सज्जनाच्या व सभ्य गृहस्थाच्या घरी जुगार खेळणे चांगले. गुंडांच्या अड्ड्यात सारी रात्र जुगाराचा खेळ झाल्यानंतर खेळणाऱ्याच्या हाती बुडबुडासुद्धा लागत नाही. त्याचे कपडे ओरबडून-घेऊन त्याला हाकलून दिले जाते. " सँको म्हणाला, " ठीक आहे. सारे काही योग्य वेळी होईल. या बाबतीत पुष्कळच बोलण्यासारखे आहे, हे मला माहीत आहे. "

याचवेळी एका अधिकाऱ्याने एका तरुणाला धरून राज्यपालापुढे उभे केले व म्हटले, " महाराज, हा तरुण माणूस आपल्याकडे येत होता, पण आपण शहराची पहाणी करीत आहा हे कळल्यावर तो पळू लागला–त्याचे पाय जितक्या जलद त्याला नेतील तितक्या वेगाने तो पळू लागला. त्यावरून तो जसा असावयास पाहिजे, तसा नाही हे उघड झाले. म्हणून मी त्याच्या पाठीमागे पळालो. वाटेत तो पडला नसता तर मी त्याच्याजवळ जाऊन पोहोचलो नसतो. " सँकोने विचारले, " दोस्ता, तुला पळावयास काय झाले ? " तरुणाने उत्तर दिले, " महाराज, पहारेकऱ्यांच्या प्रश्नाने कोणी माणूस चिडून जातो. ते टाळण्यासाठीच मी पळालो. " सँकोने विचारले, " तू कोणता धंदा करतोस ? " त्याने उत्तर दिले, " मी धंद्याने विणकर आहे. " राज्यपालाने विचारले,

" तू काय विणतोस ? " तो म्हणाला, " महाराजांच्या कृपेने भाल्यासाठी पोलादी टोके घडवितो. " सँको म्हणाला, " वा, वा! तू थट्टेखोर आहेस आणि आमची थट्टा करण्याचे सोंग करीत आहेस असे मला वाटते. फार छान! पण रात्रीच्या यावेळी तू कोठे चालला आहेस ? " त्याने उत्तर दिले, " हवा खाण्यासाठी, महाराज. " सँकोने विचारले, " छान! या बेटात लोक हवा खाण्यास कोठे जातात ? " तरुणाने उत्तर दिले, " जेथे वारा वाहतो तेथे. " सँको म्हणाला, " फार नामी उत्तर! यातील खरी गोष्ट ही आहे की, तू अगदी निर्लज्ज माणूस आहेस. पण लक्षात घे की, मी हवा आहे, वारा आहे आणि तुझ्या शिडात वारा भरून तुला कैदखान्यात पिटाळतो. पकडा त्याला आणि न्या त्याला तिकडे. आज रात्री हा बच्चा मोकळ्या हवेत निजणार नाही, अशी काळजी मी घेईन. तो उघड्यावर निजला तर त्याला थंडी होईल." तरुण म्हणाला," महाराज, रात्री मोकळ्या हवेत मला निजू न देण्यापेक्षा मला राजा करणे सोपे आहे. " सँको म्हणाला, " अरे पळपुट्या तरुणा! तुला तुरुंगात टाकून पुन्हा बाहेर आणणे माझ्या अधिकारात नाही काय ? माझी इच्छा आणि मर्जी असेल तितक्या वेळा मी तसे करू शकेन. " तरुण उत्तरला, " आपला अधिकार कितीही असो, आपण मला तुरुंगात निजावयास लावणार नाही. " सँको म्हणाला, " असे म्हणतोस ? अरे, घेऊन जा याला तुरुंगाकडे, कळू दे त्याला कोण चुकला ते– तो की मी ? ते कळण्यासाठी त्याला ही किंमत द्यावी लागेल. त्याला तुरुंगाबाहेर जाऊ देण्यास तुरुंगाधिकाऱ्याचा हात त्याने ओला केला आणि त्याने त्याला तुरुंगाच्या बाहेर एक हात जाऊ दिले, तर मी त्याला दोन हजार डयूकॅट दंड करीन. " तरुण म्हणाला, " ही सारी थट्टा आहे. कारण आज रात्री मला तुरुंगात निजावयास लावण्याचा प्रयत्न अखिल मानवजातीने केला तरी मी तो धाब्या-वर बसवीन. " सँको म्हणाला, " अरे, तू तर मूर्तिमंत सैतान आहेस. मी तुला बेड्या घालीन. त्या काढून टाकून तुला मोकळे करणारा कोणी देवदूत तुझ्या पाठीशी आहे काय ? " तो तरुण मोठ्या आनंदाने म्हणाला, " भले राज्यपालसाहेब, आता आपण विचाराने बोलू या आणि मुद्यावर येऊ या. समजा, महाराजांनी मला तुरुंगात पाठविले आणि हातापायात बेड्या घालून तेथील उकिरड्यात पुरून टाकले, मला मोकळे सोडल्यास जेलरला जबरदस्त दंड केला आणि आपले सारे हुकूम काटेकोरपणे अंमलात आले असे समजा, तरी काय होईल ? मला जर झोप घेण्याची इच्छा नसेल तर मी रात्रभर जागा राहीन. माझे डोळे मिटणारसुद्धा नाहीत. माझी इच्छा असो—नसो, आपण आपल्या सर्व सामर्थ्याने मला झोप घ्यावयास लावाल काय ते कृपा करून सांगा. " सचिव म्हणाला, " मुळीच नाही. तरुणाने आपल्या बोलण्याचा अर्थ स्पष्ट केला आहे. " सँको म्हणाला, " ठीक तर, तुला जागे रहाण्याची इच्छा आहे आणि ती संतुष्ट करण्यासाठी तू झोप टाळीत आहेस—माझी इच्छा मोडण्यासाठी नव्हे. मग घरी जा आणि झोप देव तुला चांगली विश्रांती देवो. मी त्यात अडथळा आणणार नाही. पण पुन्हा न्यायाचा असा खेळखंडोबा न करण्याची काळजी घे. कारण जेव्हा तू कोणाची टर

उडविशील तेव्हा एखादा अधिकारी कदाचित तुझे डोके उडवील." तरुण आपल्य मार्गाने गेला आणि राज्यपालांनी आपली पहाणी पुढे चालू केली.

थोड्या वेळानंतर दोन अधिकारी एका माणसाला घेऊन आले. त्यांच्यापैकी एक-जण म्हणाला, "राज्यपालसाहेब, आम्ही येथे हा जो माणूस आणला आहे, त्याचा पोशाख पुरुषासारखा आहे, पण तो पुरुष नसून स्त्री आहे– सुंदर स्त्री आहे." नंतर त्यांनी दोन-तीन कंदील तिच्या डोळ्यापाशी उचलून धरले. त्यांच्या प्रकाशात त्यांना, सुमारे सोळा वर्षे वयाच्या स्त्रीचे तोंड दिसले. ते इतके सुंदर होते की, कोणालाही आश्चर्यच वाटावे. तिचे केस सोनेरी व हिरव्या रेशमाच्या जाळीत बांधून टाकलेले होते. त्यांनी तिच्या पोशाखाचे निरीक्षण नखशिखान्त केले. तेव्हा त्यांना आढळले की, तिचे पायमोजे जांभळ्या रेशमाचे असून त्यांचे बंद पांढऱ्या टाफेटाचे आहेत आणि त्याच्या कडेला सोने आणि मोती आहेत. तिचा पायजमा हिरव्या रंगाचा असून त्यावर सोनेरी पट्ट्या होत्या. तिचा अंगरखा त्याच कापडाचा होता. त्याच्या आत अत्यंत तलम अशा पांढऱ्या–सोनेरी कापडाचे जाकीट होते. तिचे बूट पांढरे होते आणि पुरुषासारखे होते. तिच्यापाशी तलवार नव्हती पण एक अत्यंत भारी किमतीची कट्यार मात्र होती. तिच्या बोटावर पुष्कळ मौल्यवान अंगठ्या होत्या. थोडक्यात म्हणजे त्या सर्वांना ती तरुणी अत्यंत देखणी वाटली. पण त्यांच्यापैकी एकालाही तिची माहिती नव्हती. त्या मंडळीं-पैकी जे लोक शहरात रहात होते त्यांनाही, ती कोण आहे याची कल्पना नव्हती. सँकोची मस्करी करण्याच्या या साऱ्या कारस्थानात जी माणसे सामील होती, त्यांना तर इतरां-पेक्षाही अधिक आश्चर्य वाटत होते. कारण आपण रचलेल्या कारस्थानात हे साहस योजलेले नाही, असे त्यांना पक्के माहीत होते. म्हणून पुढील प्रकाराची ते मोठ्या उत्सुकतेने वाट पाहू लागले.

तिच्या लावण्याने सँको विस्मित झाला आणि त्याने तिला विचारले, "तू कोण आहेस ? कोठे चाललीस ? आणि असा पोशाख का केलास ?" योग्य त्या लाजाळूपणाने जमिनीवर आपले डोळे रोखून ती म्हणाली, "महाराज, जी गोष्ट मी गुप्त राखावी याला काही कारण आहे, ती इतक्या लोकांसमोर मी आपल्याला सांगू शकत नाही. फक्त एकच आश्वासन मी आपल्याला देते की, मी चोर नाही–दुष्ट बुद्धीची नाही, तर एक अभागी कुमारिका आहे. कुमारिकांच्या मर्यादेचे अतिक्रमण करणे मला मत्सराच्या प्रभावामुळे भाग पडले आहे." हे ऐकून कारभारी म्हणाला, "राज्यपालसाहेब, आपण आपल्या नोकरांना दूर जाण्यास सांगावे म्हणजे ही महिला आपल्याला आपल्या मनातील विचार अधिक मोकळेपणाने सांगेल." राज्यपालांनी तसे केले. सारे लोक दूर अंतरावर गेले. फक्त मुख्याधिकारी, एक सेवक व सचिव तेथे राहिले. मग त्या तरुणीने आपला वृत्तांत पुढीलप्रमाणे सांगितला—

"मी पेड्रो पेरेझ मॅझोर्काची मुलगी. या शहरात लोकरीचा व्यापार करणारा तो एक शेतकरी आहे. तो माझ्या बापाच्या घरी वारंवार येतो." कारभारी म्हणाला,

" बाई, यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. कारण, पेड्रो पेरेझला मी चांगले ओळखतो. त्याला मुलगा किंवा मुलगी नाही अशी माझी खात्री आहे. शिवाय तू म्हणतेस, तो माझा बाप आहे, आणि त्याचवेळी सांगतेस, तो माझ्या बापाच्या घरी वारंवार येतो. " सँको म्हणाला, " माझ्याही लक्षात ते आले होते. " ती म्हणाली, " सज्जनहो, खरे सांगायचे तर सध्या माझे मन इतके गोंधळले आहे की, मी काय बोलते हे मला कळत नाही. खरी गोष्ट म्हणजे मी डीएगो डी ला ल्लाना याची कन्या आहे. त्यांना तुम्ही सारे ओळखता असे मी समजते." कारभारी म्हणाला, " आता यावर विश्वास बसेल. कारण, मला डीएगो डी ला ल्लाना माहीत आहे. तो फार चांगला गृहस्थ आहे. त्याची जिंदगी मोठी आहे आणि त्याला एक मुलगा व एक मुलगी आहे. पण त्याची बायको मेल्यापासून त्या मुलीला पाहिल्याचे शहरातील कोणी सांगू शकणार नाही. कारण, त्याने तिला इतके कोंडून ठेवले आहे की, सूर्यानेही तिला पाहिलेले त्याला खपत नाही. पण लोकात वदंता आहे की, ती अत्यंत सुंदर आहे. " त्या तरुण स्त्रीने उत्तर दिले, " महाराज, आपण अगदी खरे बोललात. ती मुलगी मीच. माझ्या सौंदर्याच्या लौकिकाने तुमची काही भलती समजूत झाली असल्यास आता तुमचा भ्रम नाहीसा झाला असेल. कारण, तुम्ही माझे मुख पाहिलेले आहे. " असे म्हणून तिच्या डोळ्यांतून अश्रूंचे लोट वाहू लागले. हे पाहून सचिव आपल्या सेवकाच्या कानात कुजबुजला, "या बिचाऱ्या युवतीचे बाबतीत काही तरी विलक्षण घडले असले पाहिजे आणि त्यामुळे असे वेषांतर करून या अयोग्य वेळी ती येथे आली असावी. " सेवक म्हणाला, " ते निर्विवाद आहे. तिच्या अश्रूंमुळे आपला संशय खरा ठरत आहे. " सँकोने आपल्याला सुचतील ती उत्तमोत्तम वचने सांगून तिचे सांत्वन केले आणि तिला म्हटले, " बाबरू नकोस. तुझ्यावर कोणते संकट आले आहे, हे आम्हाला सांग. मुली, तुला सुख वाटावे म्हणून आम्ही सर्वजण शक्य ते सर्व प्रयत्न करू. "

ती म्हणाली, " सद्‌गृहस्थहो, तुम्हाला माहीतच असेल की, माझी आई वारल्यापासून गेली दहा वर्षे माझ्या बापाने मला कोंडून ठेवले आहे. आमच्या घरी अत्यंत सुशोभित असे एक लहानसे प्रार्थना-स्थान आहे. तेथे आम्ही सामुदायिक प्रार्थना करतो. मी या सर्व काळात दिवसा सूर्याशिवाय आणि रात्री चंद्र–ताऱ्यांशिवाय दुसरे काहीच पाहिले नाही. रस्ते, चौक, बाजार, प्रार्थना–मंदिरे ही कशी असतात, हे मला माहीत नाही. माझा बाप, माझा भाऊ आणि तो शेतकरी पेड्रो पेरेझ ( खरे लपविण्यासाठी मी तुम्हाला प्रथम तोच माझा बाप म्हणून सांगत होते ) याशिवाय दुसरी माणसेही मी कधी पाहिली नाहीत. ( प्रार्थना–मंदिराशिवाय दुसरीकडे कोठेही जाण्यास मला परवानगी नसल्यामुळे ) या स्थानबद्धतेने मी फार काळ अस्वस्थ झाले. आणि मला अशी इच्छा झाली की, हे जग पहावे– निदान जेथे मी जन्मले ते शहर तरी पहावे. ही माझी इच्छा अवैध किंवा अयोग्य नाही असे मला वाटले. मेजवान्या, बक्षिस–समारंभ, नाटकांचे प्रयोग, सार्वजनिक क्रीडा वगैरेविषयी लोकांना बोलताना मी ऐकत असे. म्हणून

मी माझ्या भावाला एकदा विचारले, (तो माझ्यापेक्षा एक वर्षाने लहान आहे.) " या साऱ्या प्रकारांचा अर्थ काय ? आणि मी न पाहिलेल्या इतर असंख्य गोष्टी आहेत, त्यांचा अर्थ काय ? " त्याने मला शक्य तितकी माहिती दिली. पण त्यामुळे माझी इच्छा तृप्त न होता, आपण आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी हे सारे पाहण्याची इच्छा मात्र बळावली. सारांश, मी माझ्या भावाला विनंती केली – ती केली नसती तर बरे झाले असते.... येथे पुनः तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. ते पाहून कारभारी म्हणाला, " मुली, चल, पुढे सांग. तुला काय झाले ते शेवटपर्यंत सांग. कारण, तुझ्या शब्दामुळे आणि तुझ्या अश्रूंमुळे आम्हा सर्वांना फार मोठी उत्कंठा लागून राहिली आहे. " ती उत्तरली, " मला आणखी थोडेच शब्द सांगावयाचे आहेत, पण आणखी पुष्कळ अश्रू ढाळावयाचे आहेत. कारण सामान्यतः असे अश्रु म्हणजे अशा अविचारी इच्छांचे फल असतात. "

सँकोच्या सेवकाचे काम करणारा ड्यूकचा नोकर या तरुणीच्या लावण्याने मुग्ध–विद्ध झाला होता. तिला पुनः पाहण्यासाठी आपला कंदील त्याने वर उचलला. प्रेमिकाच्या दृष्टीतून तिच्याकडे तो पहात असल्यामुळे त्याला तिच्या गालांवरून ओघळणारे अश्रु मोत्यांसारखे– किंवा सुंदर फुलांवरील दैवी दवबिंदूसारखे– पूर्वेकडील रत्नांइतके मौल्यवान– वाटले. तिच्या सुस्काऱ्यांमुळे आणि अश्रूंमुळे तिचे दुःख फार मोठे असावे, असे दिसत होते. पण तसे ते नसावे, अशी इच्छा तो करू लागला. तिने आपली कहाणी सांगण्यासाठी इतका वेळ घेतला म्हणून राज्यपाल धुमसत राहिले आणि म्हणून त्यांनी तिला म्हटले, " आपल्या कहाणीचा शेवट झटपट कर. आम्हाला ताटकळत ठेवू नकोस. आता उशीर झाला आहे. आम्हाला अजून पुष्कळ कामे करावयाची आहेत. "

अर्धवट हुंदके देत व सुस्कारे सोडीत ती म्हणाली, " महाराज, माझे दुर्दैव इतकेच की, मी माझ्या भावापाशी त्याचे काही कपडे उसने मागितले आणि आमचे पिताजी झोपी गेल्यावर एखादे दिवशी रात्री मला सारे शहर दाखवून आण असे म्हटले. माझ्या आग्रहाच्या विनंतीला मान देऊन त्याने संमती दिली आणि आपले कपडे मला देऊन माझे कपडे स्वतः घातले. जणू काही त्याच्यासाठीच बनविले आहेत असे माझे कपडे त्याला बरोबर बसत होते. त्याला दाढी मुळीच आलेली नाही. एखाद्या अत्यंत सुंदर स्त्रीसारखा तो दिसतो. अशी तयारी झाल्यावर आजच रात्री, सुमारे एक तासापूर्वी, आम्ही बाहेर पडलो. माझ्या पित्याचा गडी व आमच्या स्वतःच्या अनावर इच्छा यांनी आम्हाला मार्ग दाखविला आणि आम्ही सर्व शहरभर भटकलो. आम्ही घरी परत जात असताना आमच्या बाजूने पुष्कळ लोक येत असलेले आम्हाला दिसले. तेव्हा माझा भाऊ म्हणाला, " ताई, हे खात्रीने पहारेकरी असले पाहिजेत. तू माझ्या मागोमाग ये. आता आपण पळू या. – नव्हे, शक्य तितक्या वेगाने उड्डाण करू या. आपल्याला कोणी ओळखले तर आपली कंबक्तीच भरेल. " असे म्हणून तो इतक्या वेगाने पळू लागला की, जणू काही त्याच्या पायाला पंख फुटले आहेत. मीही घाई केली पण मी इतकी

भ्यालेली होते की, दहा–बारा पावले जाण्यापूर्वीच मी खाली पडले. नंतर एका माणसाने मला पकडले आणि आपल्यासमोर आणून उभे केले– आणि हा लोकांचा जमाव मला दुष्ट चालीची स्त्री – एक मूर्ख नि बेफाम निशाचर – मानू लागला. ही गोष्ट मला लज्जास्पद वाटते. " सँकोने विचारले, " याशिवाय तुला दुसरे काहीच झाले नाही काय ? तू प्रथम म्हणालीस, कोणाच्या मत्सरामुळे मी भटकू लागले. " युवतीने उत्तर दिले, " मी मत्सराचे सोंग केले असले तरी मला दुसरे काहीच झाले नाही. जगाचे किंचित दर्शन घ्यावे– आणि तेही शहरातील रस्त्यापलीकडचे नव्हे– या एकाच इच्छेमुळे मी घराबाहेर पडण्याचे धाडस केले. " नंतर तिच्या या साऱ्या निवेदनाला तिच्या भावाने पुष्टी दिली.

त्याला आता एका पहारेकऱ्याने तेथे आणले होते. त्याने आपल्या बहिणीला सोडल्यावर त्या पहारेकऱ्याने त्याला पकडले होते.त्याच्या अंगावर एक श्रीमंती कोपरी आणि दमास्कसचा निळा भरजरी कोट होता. दुसरे काही नव्हते. त्याच्या मस्तकावर त्याच्या केश–कलापाशिवाय अन्य काही भूषण नव्हते. त्याचे केस सोनेरी कड्यांप्रमाणे नैसर्गिक वळणामुळे कुरळे दिसत होते आणि खालपर्यंत लोंबत होते. राज्यपाल, कारभारी आणि सेवक या सर्वांनी त्याला एका बाजूस नेले आणि ' असा पोशाख तू का केलास ? ' असे विचारले. त्यांनी त्याची कसून तपासणी केली. त्याच्या बहिणीने दिले, तसेच उत्तर त्यानेही दिले. त्यावेळी तो तिच्याइतकाच लाजला आणि चिंतातुर झाला. त्या तरुणीच्या लावण्याचा वेध लागलेल्या सेवकाचे यामुळे समाधान झाले.

सर्व प्रकरण ऐकल्यानंतर राज्यपाल म्हणाले, " खरोखर, हा एक छोटासा बालिश मूर्खपणाच आहे. या स्वैर खेळाचा आणि तारुण्यातील प्रमादाचा वृत्तांत सांगण्यासाठी इतके सुस्कारे टाकण्याची आणि आसवे ढाळण्याची मुळीच गरज नव्हती-- इतके अडखळण्याची आणि मुरडण्याची नि लांबलांब सबबी सांगण्याची काहीच गरज नव्हती. मोठे अवडंबर न माजवता, तुम्हाला असे म्हणता आले नसते का, ' आमची नावे अशी अशी आहेत. केवळ शहरात भटकण्यासाठी आणि आपली छोटीशी जिज्ञासा तृप्त करण्यासाठी आम्ही आमच्या बापाच्या घरातून एक–दोन तास चोरून बाहेर पडलो.' बस्स ! खलास झाली सारी गोष्ट. हे सारे रडणे–ओरडणे कशाला ? " ती युवती म्हणाली, " आपण फार चांगले बोलला. पण आपणच कल्पना करा की, भयामुळे आणि त्रासामुळे, मी जसे वागावयास हवे होते तशी वागू शकले नाही. " सँको म्हणाला, " ठीक आहे. काही बिघडले नाही. आता आमच्याबरोबर चल. आम्ही तुला तुझ्या बापाच्या घरी पोचवू. तू घरात नाहीस हे अद्याप कदाचित् कोणाच्या लक्षात आले नसेल. पण पुनः थाटमाट पहाण्यासाठी बाहेर न भटकण्याची काळजी घे. फार मोठे साहस करू नकोस. शीलवती युवतीने जणू काही आपली एक तंगडी मोडली आहे असे समजून घरीच राहावे. कोंबडी व स्त्री बाहेर भटकू लागल्या की संपले. जिला बाहेरचे पहाण्याची लालसा झाली, तिला आपल्याला लोकांनी पहावे अशीही लालसा होणार. यापेक्षा मी अधिक काही बोलण्याची गरज नाही. "

त्या तरुणाने राज्यपालांनी दाखविलेल्या सभ्यतेबद्दल त्यांचे आभार मानले आणि त्यांच्या व्यवस्थेप्रमाणे तो आपल्या घरी गेला. घरी जाताच या तरुण चिमण्याने लोखंडी गज असलेल्या एका खिडकीवर लहान दगड फेकला. तत्काळ एक दासी ( ती त्यांची वाट पहातच बसली होती. ) खाली आली. त्याला व त्याच्या बहिणीला तिने आत घेतले.

नंतर राज्यपालांनी आपली पहाणी पुढे चालविली. चालत असताना सर्व वेळ ते त्या भावा–बहिणींच्या सभ्य वर्तनाविषयी आणि सौंदर्याविषयी बोलत होते. या अभागी मुलांना रात्रीच्या वेळी दुनिया पहाण्याची तीव्र इच्छा कशी झाली याची चर्चा ते करीत होते.

तो सेवक त्या तरुणीच्या प्रेमात इतक्या आवेगाने पडला होता की, दुसरे दिवशी तिच्या घरी जाऊन तिच्या बापाकडे तिची लग्नासाठी मागणी करण्याचे त्याने ठरविले. आपण ड्यूकचे एक बडे सेवक असल्यामुळे तो म्हातारा बाप आपली विनंती मान्य करील याविषयी त्याला काडीमात्र शंका नव्हती. उलट, सँकोला अशी मोठी इच्छा झाली की, या तरुण माणसाचे आपली मुलगी सँकिका हिच्याशी लग्न लावून द्यावे. राज्यपालाच्या कन्येसाठी कोणताही तरुण स्वतःला भारी समजणार नाही. अशा विश्वासाने सँकोने हे लग्न शक्य तितक्या लौकर जमवून आणण्याचे ठरविले. शेवटी, त्याची भ्रमंती त्या रात्रीपुरती संपली आणि त्यानंतर दोन–तीन दिवसांतच त्याचा राज्य–कारभारही संपुष्टात आला आणि त्यामुळे त्याच्या साऱ्या मोठमोठ्या योजना आणि आकांक्षा धुळीस मिळाल्या. ते आपल्याला पुढे कळून येईल.



## प्रकरण ५०

# डयूएन्नाला बडविणारे आणि डॉन क्विक्झोट यांना चिमटे घेणारे आणि ओरबडणारे कोण होते याचा वृत्तांत, तसेच सँकोचे पत्र टेरेसा पँझा या त्याच्या बायकोकडे घेऊन जाणाऱ्या नोकराच्या यशस्वी कार्याचा वृत्तांत

या अधिकृत इतिहासाचा लेखक सिड हॅमेट अत्यंत बारीसारीक गोष्टीचीही अत्यंत बारकाईने चौकशी करून असे निवेदन करतो की, जेव्हा डोन्ना रोड्रिगेझ आपल्या खोलीतून निघून डॉन क्विक्झोटच्या दालनात जात होती, तेव्हा तिच्याजवळ निजलेल्या एका म्हाताऱ्या दासीने ते पाहिले. सर्वच स्त्री-जनांना मुख्य आनंद वाटतो तो, टेहेळणी करण्यात, चौकशी करण्यात आणि प्रत्येक गोष्टीत आपले नाक खुपसण्यात. त्याप्रमाणे तिने आपल्या सहदासीच्या हालचालीवर तत्काळ नजर ठेवली. ती तिच्या पाठोपाठ इतक्या सावधगिरीने गेली की, तिला त्याचा पत्ता लागला नाही. डोन्ना रोड्रिगेझ शिलेदारजीच्या दालनात जाताक्षणीच ही दुसरी दासी डचेसकडे धावत गेली– बोभाटा करण्याचा दासींचा गुण आपल्या अंगी नाही असे होऊ नये म्हणून. तिने डचेसच्या कानात हळूच सांगितले, डोन्ना रोड्रिगेज डॉन क्विक्झोटच्या दालनात आता आहे. हे डचेसने डयूकला सांगितले. रात्रीच्या या गाठीभेटीचे रहस्य जाणण्याची आपली उत्सुकता तृप्त करण्यासाठी, डयूकची परवानगी घेऊन डचेसने आल्टिसिडोराला आपल्याबरोबर घेतले आणि त्या दोघी त्या अंधारात गुपचुप चालत गेल्या. डॉन क्विक्झोटच्या दारापाशी जाऊन त्या ऐकत उभ्या राहिल्या. आत ते जे बोलत होते त्यातील प्रत्येक शब्द या दोघींच्या कानावर सहजच पडला. आपल्या पायातील रक्तस्रावाचे गुपित आपल्या गळक्या मनाच्या दासीने उघड केल्याचे डचेसने जेव्हा ऐकले, तेव्हा तिला आपला राग आवरेना. आल्टिसिडोराही तितकीच खवळली. संताप आणि अघाशी सूडबुद्धि यांनी ओतप्रोत भरलेल्या त्या दोघीजणी त्या दालनात घुसल्या आणि त्यांनी डयूएन्नाला बडवून काढले व शिलेदाराला चिमटे काढले. हे सारे पूर्वी सांगितलेच आहे. स्त्री-सौंदर्याविरुद्ध किंवा त्यांच्या लौकिकाविरुद्ध अपमानास्पद शब्द कोणी उच्चारले, तर क्रोध आणि संताप परमोच्च बिंदूला पोहोचतात आणि सूड घेण्याची इच्छा जागृत होते.

जे काही घडले त्याचा सारा वृत्तांत सांगून डचेसने डयूकची करमणूक केली. डॉन क्विक्झोट यांच्या आचरट गोष्टीमुळे त्यांना जी मौज चाखावयास मिळत होती, ती

पुढे चालविण्याची मोठी इच्छा त्या दोघांना होती. डल्सीनियाची जादू नष्ट करण्याचे जेव्हां ठरले, तेव्हा तिचे सोंग घेणाऱ्या नोकराला टेरेसा पँझाकडे पाठविण्यास आले. त्याच्याबरोबर तिच्या नवऱ्याचे एक पत्र दिलेले होते. ( कारण सँकोच्या डोक्यात त्याचा राज्यकारभार गच्च बसलेला असल्याने तो आपल्या बायकोला पत्र पाठविण्याचे पार विसरला होता. ) त्याचवेळी त्या नोकराजवळ डचेसने आपले स्वतःचे एक पत्र आणि भेट म्हणून भारी किंमतीची पोवळयाची एक माळ दिलेली होती.

आता गोष्ट अशी आहे की, तो नोकर हुषार आणि चुणचुणीत मुलगा होता. ड्यूक व डचेस यांना खूष करण्याची त्याला फार इच्छा होती. म्हणून तो सँकोच्या खेड्याकडे झपाट्याने निघाला. त्या खेड्याजवळ जाताच त्याला एका ओढ्याच्या काठा-वर काही स्त्रिया कपडे धूत असलेल्या दिसल्या. त्यांना त्याने विचारले, " ला मांचा येथील डॉन क्विक्झोट या शिलेदाराचा सेवक सँको पँझा नावाचा कोणी आहे. त्याची बायको टेरेसा पँझा या शहरात राहते काय ? " त्याने हा प्रश्न विचारताच, कपडे धूत असलेली एक तरुण मुलगी उठली व म्हणाली, " ती टेरेसा पँझा माझी आई आहे आणि गॅफर सँको हा माझा बाप आहे. तो शिलेदार आमचा मालक आहे. " नोकर म्हणाला, " वा छान, चल तर मग माझ्याबरोबर आणि तुझ्या आईकडे मला घेऊन चल. कारण तुझ्या बापाचे एक पत्र व एक भेट तिच्यासाठी मी आणली आहे. " मुलगी म्हणाली, " महाराज, हे काम मी ताबडतोब करीन. " ती सुमारे चौदा वर्षांची दिसत होती–थोडे कमीअधिक वय तिचे असेल. आपण धूत असलेले कपडे आपल्या एका मैत्रिणीपाशी ठेवून, डोक्याचे केस बांधण्यासाठी किंवा पायात बूट घालण्यासाठी न थांबता, उघड्या पायांनी आणि आपल्या कानावर केस उडत असताना, ती त्या नोकराच्या घोड्याजवळ उड्या मारीत गेली व म्हणाली, " चला, चला. आपली मर्जी :असेल तर चला. आमचे घर जवळ आहे. तुम्ही या शहरात येण्याचे वेळी आझी आई बरी आहे. बिचारीचा जीव दुःखाने काठोकाठ भरलेला आहे. कारण, किती दिवस झाले मला माहीत नाही, पण पुष्कळ दिवसांत तिने माझ्या बापाविषयी काही ऐकले नाही. " नोकर म्हणाला, " बरे तर, तिच्या मनाला आनंद देणाऱ्या बातम्या घेऊन मी आलो आहे, हे खचित. "

शेवटी धावत–पळत–उड्या मारीत, ती मुलगी घरापाशी जाताच, शक्य तितक्या मोठ्या आवाजात हाक मारून म्हणाली, " आई आई, ये, बाहेर ये, माझ्या बापाची पत्रे व भेटी घेऊन एक माणूस येथे आला आहे. ' ही हाक कानी पडताच आई बाहेर आली. ती ओबडधोबड तागाचा गुंडा कातीत होती. तिच्या अंगावर तपकिरी रंगाचा परकर होता. तो इतका आखूड होता की, तो वर जणू काही कापलेलाच आहे. त्याच रंगाचे जाकीट तिच्या अंगात होते आणि त्यावर सैलपणे रुळणारा झगा होता. ती म्हातारी नव्हती तरी चाळीशी उलटलेली दिसत होती. पण तिची शरीरयष्टी भक्कम, बळकट, निकोप, उत्साही आणि सुदृढ होती. त्या नोकराबरोबर आपल्या मुलीला पाहून

तिने विचारले, " बाळ, काय आहे हे? हा माणूस कोण आहे? " नोकराने उत्तर दिले, " मी लेडी टेरेसा पँझा यांचा सेवक आहे. " त्याबरोबर घोडयावरून उडी मारून त्याने अत्यंत नम्रपणे तिच्या पायाशी लोटांगण घातले आणि तो म्हणाला, " हे उदार लेडी डोन्ना टेरेसा, आपल्या करकमलाचे चुंबन घेण्याची परवानगी आपण मला द्यावी. कारण बॅराटेरिया बेटाचे अधिकारसंपन्न राज्यपाल लॉर्ड डॉन सँको पँझा यांच्या धर्म-पत्नी आपणच आहा." टेरेसा म्हणाली, " छान, छान, महाराज, आपण काय करीत आहा? आपल्या दरबारी स्त्रियांपैकी मी कोणी नाही. या खेडयातील गरीब व वेडपट बाई मी आहे–एका शेतकऱ्याची मुलगी आहे–शिलेदाराच्या सेवकाची पत्नी आहे हे खरे, पण राज्यपालाची नव्हे. " नोकराने उत्तर दिले, " राज्यपाल होण्यास त्रिवार पात्र असणाऱ्याची अत्यंत सत्पात्र अशा पत्नी बाईसाहेब आहेत. मी जे म्हणतो त्याचा पुरावा म्हणून कृपा करून हे पत्र आणि ही भेट आपण स्वीकारावी. " असे म्हणून त्याने आपल्या खिशातून सोन्यात गुंफलेली प्रवाळाच्या मण्यांची माळ बाहेर काढली आणि तिच्या गळयात घातली व म्हटले, " हे पत्र नामदार राज्यपाल यांनी दिलेले आहे आणि या माळेबरोबर मी आपल्याला देण्यासाठी जे दुसरे पत्र आणले आहे ते डचेस राणीसाहेबांनी दिलेले आहे. त्यांनीच मला बाईसाहेबांकडे पाठविले आहे. "

टेरेसा चकित झाली आणि तिच्या मुलीचा आनंद तर गगनात मावेना! ती चिचुंद्री म्हणाली, " या सर्व प्रकरणाच्या बुडाशी आमचे धनी डॉन क्विक्झोट नसतील, तर मला फाशी द्या. वा:, हे सारे त्यांचेच कर्तृत्व. त्यांनीच माझ्या बापाला ते राज्य किंवा सरदारकी देण्याचे वचन अनेक वेळा दिलेले होते; ते त्यांनी आता खरे केलेले दिसते. " नोकर उत्तरला, " तू म्हणतेस ते खरे आहे. या पत्रात सांगितल्याप्रमाणे बॅराटेरिया बेटाचा राज्यपाल लॉर्ड सँको हे आहेत, ते लॉर्ड डॉन क्विक्झोट यांच्यामुळेच." टेरेसा म्हणाली, " भल्या माणसा, तुझी मर्जी असल्यास मला ते पत्र वाचून दाखव. कारण मला कातता येते, पण वाचता मुळीच येत नाही. " सँकिका म्हणाली, " माझेही तसेच आहे. पण अंमळ थांबा. मी पंडित सॅमसन कॅरॅस्कोला किंवा खुद्द आमच्या धर्म-गुरूला येथे घेऊन येते. माझ्या बापाची बातमी ऐकण्यासाठी ते आनंदाने येथे येतील. " नोकर म्हणाला, " तू इतकी तसदी घेऊ नकोस. कारण, मला जरी कातता येत नसले, तरी वाचता येते. मी तुम्हाला ते पत्र वाचून दाखवतो. " असे म्हणून त्याने ते पत्र वाचून दाखविले. ते या ग्रंथात पूर्वीच आलेले असल्यामुळे येथे गाळले आहे. ते पत्र वाचून झाल्यावर त्या नोकराने डचेसचे पत्र बाहेर काढले आणि वाचून दाखविले. ते पुढीलप्रमाणे होते—

सखी टेरेसा,

" तुमचे पती सँको यांचे गुण, त्यांचा विनोद आणि त्यांचा प्रामाणिकपणा या सर्वांमुळे मी माझे पती डयूकसाहेब यांना माझी अशी इच्छा सांगितली की, आपल्या बेटांपैकी एकाचे राज्य सँकोला बहाल करावे. ते आपल्या कचेरीत एखाद्या ससाण्याप्रमाणे

तल्लखपणे काम करीत असतात असे मला कळले आहे. आणि त्यामुळे मी आणि माझे पती लॉर्ड ड्यूक या उभयतांना फार आनंद झाला आहे. त्या जागेवर त्यांची निवड करताना मी फसले नाही म्हणून मी प्रभूला अनंत धन्यवाद दिले. कारण, सिनिओरा टेरेसा, हे तुम्ही लक्षात ठेवा की, या जगात चांगला राज्यपाल मिळणे कठीण आहे. सँको आपल्या कारभारात जितके चांगले ठरतील, तितकी मी ईश-कृपेने चांगली ठरेन.

" हे माझ्या प्रिय मैत्रिणी, मी तुम्हाला सोन्यात गुंफलेली प्रवाळ-मण्यांची माळ पाठवीत आहे. तुमच्यासाठी पूर्वेकडचे मोती आणावयास हवे होते असे मला वाटते, पण प्रेमाचे हे लहान चिन्ह मोठ्या प्रेम-भेटीच्या आड येणार नाही असे मला वाटते. अशीही वेळ येईल की, जेव्हा आपली जानपछान वाढेल, आपण एकत्र बोलत बसू. त्यातून काय निघेल हे कोणी सांगावे ? तुमची कन्या सँकिका हिला माझे आशीर्वाद कळवा आणि सांगा, ' तयारीत ऐस. ' कारण तिच्या ध्यानीमनी नसताना तिच्या लग्नाचा बार थाटाने उडवून देण्याचा माझा बेत आहे.

" तुमच्या शहरात ओक वृक्षाची मोठमोठी फळे आहेत असे मला कळते. ती पाच-पंचवीस मला कृपया पाठवा. आपल्या हातून ती येणार असल्यामुळे, मी त्याचे मोल मोठे मानीन. तुमचे कसे काय चालले आहे हे कळविण्यासाठी चांगले लांबलचक पत्र मला कृपया लिहा. तुम्हाला जर कशाची गरज लागली तर मला सांगा, म्हणजे मी ती पूर्ण करीन. तुमच्या केवळ तोंड उघडण्यावरून मी तुमच्या मनातील भाव ओळखू शकेन. ईश्वर आपले रक्षण करो !

' किल्ल्यातून ' " आपली प्रेमळ मैत्रीण,

डचेस "

हे पत्र ऐकल्यावर टेरेसा म्हणाली, " धन्य, धन्य आहे मी ! किती थोर बाई आहे ही ! गर्वाचा अंशसुद्धा तिच्या अंगी नाही ! अशा बाईबरोबर प्रभूने मला जमिनीत पुरावे--पण आमच्या शहरातील आढ्यताखोर स्त्रियांबरोबर नको. आपण फार उच्च कोटीतील आहोत म्हणून वाऱ्यानेही आपल्याला स्पर्श करू नये असे त्यांना वाटते. जणू काही आपण राण्या आहोत अशा वैभवाचा थाटमाट करून त्या प्रार्थनामंदिरात येतात. एखाद्या गरीब खेडवळ बाईकडे पहाणे हे त्यांना तुच्छपणाचे वाटते असे दिसते. पण काय आश्चर्य ! ही थोर बाई डचेस असूनही, मला ' सखी ' म्हणून संबोधिते आणि जणू काही तिच्याइतकीच मी मोठ्या योग्यतेची आहे असे समजून वागते. साऱ्या देशातील चर्चवरील सर्वात उंच अशा मनोऱ्याइतकी उंच अशी ती मला दिसेल. तिने ओक-फळे मागितली आहेत-तर मी बाईसाहेबांना सबंध पेटी भरूनच पाठवीन आणि ती इतकी उत्तम असतील की, जवळ-दूरचे सारे लोक त्यांचे कौतुक करतील. सँकिका, आता तू या सद्गृहस्थाचे चांगले स्वागत कर. त्याला काहीही उणीव पडू देऊ नकोस. त्याच्या घोड्याची काळजी घे, तबेल्याकडे पळत जा, काही अंडी आण, डुकराच्या

मांसाचे तुकडे कर. एखाद्या राजपुत्राप्रमाणे त्याने येथे वागावे. त्याने जी अपूर्व वार्ता आणली त्यामुळे आणि त्याच्या उमद्या स्वरूपामुळे असे वाटते की, त्याचा पाहुणचार यापेक्षा कमी होता कामा नये. तोपर्यंत मी शेजाऱ्यापाजाऱ्याकडे जाऊन येते. मला माझा आनंद आवरत नाही. मी धावत जाते आणि ही बातमी त्यांना सांगते. आपला भला पाद्री आणि न्हावी श्री. निकोलस या सर्वांना ही बातमी कळली पाहिजे. कारण ते तुझ्या बापाचे आयुष्यभराचे मित्र आहेत." मुलगी म्हणाली, "तसेच कर आई. पण लक्षात ठेव, तू मला प्रवाळाचे निम्मे मणी दिले पाहिजेस. ते सारे तुला देण्याचे त्या थोर बाईसाहेबांच्या मनात नसेल" आई म्हणाली, "मुली, हे सारे तुझ्या मनचे आहे. पण काही दिवस मला ही माळ माझ्या गळ्यात घालू दे. तसे केल्याने माझे हृदय आनंदाने किती उचंबळून येते याची तुला कल्पना नाही." नोकर म्हणाला, "तुम्हाला आताच आणखी आनंद होईल. माझ्या कातडी पिशवीत काय आहे हे पहा तर खरे! राज्यपालांनी फक्त एक दिवस शिकारीचे वेळी केलेल्या कापडाचा जो उत्तम वेश धारण केलेला होता, तो त्यांनी सँकिकाला माझ्याबरोबर पाठविला आहे." सँकिका उद्गारली, "अरे वा! माझ्या बापावर आणि हा वेष आणणाऱ्या या सुंदर माणसावर प्रभू कृपा करो!"

लगेच टेरेसा गळ्यात ती मण्यांची माळ घालून आणि हातात ती पत्रे घेऊन तेथून धावत गेली. एखाद्या नगाऱ्यावर बोटे आपटावीत त्याप्रमाणे ती त्या पत्रावर आपली बोटे खेळवीत होती. योगायोगाने पाद्री व पंडित कॅरस्को तिला भेटले. तेव्हा तर ती नाचू-बागडू लागली. आणि म्हणाली, "खरोखर, आम्ही आता बडे झालो. आमच्या साऱ्या नातलगात आता कोणी छोटा राहणार नाही. आता आम्हाला 'राज्य' नावाची भली वस्तू मिळाली आहे. आता माझ्याकडे पाहून कोणाही चढेल स्त्रीने नाक उडविले तर मी तिला तसेच करीन. तिच्या माझ्यातले अंतर काय आहे याची जाणीव मी तिला करून देईन." पाद्री म्हणाला, "टेरेसा, काय चालले आहे हे? ही कसली वेडी लहर आली आहे तुला? तुझ्या हातात हे कसले कागद आहेत?" टेरेसाने उत्तर दिले, "ही वेडी लहर मुळीच नाही. डचेस आणि राज्यपाल यांच्याकडून आलली ही पत्रे आहेत. माझ्या गळ्यातील हे मणी शुद्ध प्रवाळाचे आहेत—आणि ते सारे सोन्यात गुंफलेले आहेत. मी गव्हर्नरीण आहे, हे मी तुम्हाला खात्रीपूर्वक सांगते." पाद्री म्हणाला, "खरोखर तू कोण आहेस हे कळत नाही. टेरेसा, तुझ्या म्हणण्याचा अर्थ आम्हाला समजत नाही." टेरेसा म्हणाली, "हे कोडे उलगडणारी ही पत्रे पहा." असे म्हणून तिने त्यांना ती पत्रे दिली. सॅमसन कॅरस्कोलाही कळावे म्हणून पाद्र्याने ती पत्रे मोठ्याने वाचली. दोघेही आश्चर्यचकित होऊन एकमेकाकडे पाहू लागले. पूर्वीपेक्षाही आता त्यांना मोठे कोडे वाटू लागले. "हे पत्र कोणी आणले?" असे पंडिताने विचारले. टेरेसा त्यांना म्हणाली, "माझ्याबरोबर घरी चला म्हणजे पत्र आणणारा माणूस तुम्हाला दिसेल. तो एक उमदा, देखणा तरुण आहे—दुसऱ्या कोणाही माणसाइतका

तो सुंदर आहे. याच्यापेक्षा दुप्पट किंमतीची भेट त्याने मला आणली आहे. ”

पाद्रयाने तिच्या गळ्यातून मण्यांची ती माळ काढली आणि पुनः पुनः ती निरखून पाहिली. ती मोठी मोलाची वस्तु आहे हे ध्यानी आल्यावर त्याला या साऱ्या गोष्टींचा अर्थ काही कळेना. तो म्हणाला, “ मी जो वेष धारण करतो त्यामुळे, या सर्व प्रकरणाचा बोध काय घ्यावा हे मला सांगता येत नाही. पहिली गोष्ट ही की, हे मणी शुद्ध प्रवाळाचे असून सोन्यात गुंफलेले आहेत अशी माझी खात्री झाली आहे. दुसरी गोष्ट अशी की, ओकवृक्षाची पाच–पंचवीस फळे मागणारी डचेस येथे आहे. ” सॅमसन कॅरॅस्को म्हणाला,“ तुम्हाला शक्य असेल तर हा गुंता उलगडा. पण चला. आपण त्या दूताला पाहू या. कदाचित तो आपले सारे संशय दूर करील. ”

त्यानंतर ते सर्वजण टेरेसाबरोबर निघाले. त्यांना तो नोकर आपल्या घोड्यासाठी थोडेसे धान्य चाळीत असलेला आढळला आणि त्याच्या भोजनासाठी, अंड्याबरोबर शिजविण्याकरिता सँकिका डुकराच्या मांसाचे तुकडे करीत होती. त्या दोघांना त्या नोकराचे वर्तन आणि त्याचा पोशाख आवडला. नेहमीचे नमस्कार–चमत्कार झाल्यानंतर सॅम्सन म्हणाला, “ डॉन क्विक्झोट आणि सँको पँझा यांची काही बातमी ऐकण्याची आमची इच्छा आहे. सँकोने आपल्या बायकोस लिहिलेले एक आणि डचेसने लिहिलेले दुसरे पत्र आम्ही वाचलेले असले तरी, आम्हाला ती पत्रे म्हणजे कोडी वाटतात. सँकोला राज्य– त्यातही एका बेटाचे राज्य–कसे मिळाले असेल, याची कल्पनाच आम्हाला करता येत नाही. कारण भूमध्यसमुद्रातील सारी बेटे–निदान बहुतांश बेटे–राजाच्या मालकीची आहेत हे आम्हाला पक्के माहीत आहे. ”

नोकराने उत्तर दिले, “ सद्गृहस्थहो, श्रीयुत सँको पँझा राज्यपाल आहेत हे निःसंशय सत्य आहे. ते एका बेटाचे राज्यपाल आहेत की नाही, याचा निर्णय करण्याचा आव मी आणीत नाही. पण मी तुम्हाला हे खात्रीपूर्वक सांगतो की, एक हजाराहून अधिक नागरिक असलेल्या गावावर त्याची हुकमत चालते. आता डचेस–बाईसाहेबांनी एका खेडवळ स्त्रीकडे मूठभर ओक–फळे मागितली, तर त्यात काही नवल नाही. कारण, त्या गर्वापासून इतक्या मुक्त आहेत की, आपल्या एका शेजाऱ्याकडे कंगवा उसना मागण्यासाठी त्यांनी नोकराला पाठविल्याचे मला माहीत आहे. तुम्ही हे लक्षात घ्या की, अरॅगॉनमधील स्त्रिया कॅस्टाईमधील स्त्रियांइतक्याच थोर असल्या तरी उपचार आणि शिष्टाचार यावर त्या फारसा भर देत नाहीत. त्या मोठी ऐट मिरवीत नाहीत. साऱ्या लोकांना सलगीने वागवितात. ”

अशा तऱ्हेने त्यांचा संवाद चालू असताना, सँकिका नाचत–बागडत तेथे आली. तिचा ओचा अंड्यांनी भरलेला होता. त्या नोकराकडे वळून ती म्हणाली, “ महाराज, आता माझा बाप राज्यपाल आहे, तरी तो मांडचोळणा घालतो काय, हे मला कृपा करून सांगा. ” नोकर म्हणाला, “ खरे म्हणजे मी त्याकडे कधी लक्ष दिले नाही, पण ते घालीत असावेत हे निःसंशय. ” ती छोकरी म्हणाली, “ मांडचोळणा घातलेल्या

माझ्या बापाला पहाण्यासाठी मी हवे ते देईन. मला आठवण आहे तेव्हापासून माझ्या बापाने चोळणा घातलेला पहाण्याची मला इच्छा आहे. हे विचित्र नव्हे काय ? " नोकर म्हणाला, " ते जसे असावेत असे तुला वाटते तसे तू त्यांना, जिवंत राहिल्यास, पहाशील. त्यांचे राज्य दोन महिने टिकले तरी त्यांच्या डोक्यावर छत्री असलेली तुला दिसेल. "

त्या माय–लेकीकडे पाहून नोकर हसत आहे, हे पाद्री व पंडित यांच्या लक्षात स्पष्टपणे आले. पण तरीही मण्यांची मोलाची माळ आणि शिकारीचा पोशाख ( आतापर्यंत टेरेसाने त्यांना या वस्तू दाखवल्या होत्या. ) यामुळे त्यांचा पुनः गोंधळ उडाला. तोपर्यंत सँकिकाच्या विचित्र कल्पना आणि तिच्या आईचे भाषण यामुळे आलेले हसू त्यांना दाबता येईना. टेरेसा म्हणाली, " पाद्रीबुवा, आपल्या शेजाऱ्यांपैकी कोणी माद्रिद किंवा टोलेडो येथे जाणार आहे का, याची जरा चौकशी करा. त्यांच्याकडून मला नव्यातला नवा आणि दरबारी थाटाचा मोठा परकर विकत आणावयाचा आहे—पैसे देऊन चांगल्यातला चांगला, मिळेल तो, परकर आणावयाचा आहे. ' कुमारी मातेची ' शपथ घेऊन मी सांगते, मी माझ्या नवऱ्याच्या राज्यकारभाराला, मला शक्य असेल तितकी, शोभा आणणार आहे. लोकांनी मला येथे त्रास दिला तर मी त्या न्याय-मंदिरात धावत जाईन आणि उत्तमोत्तम अशा गाडीत बसून त्यांच्या राज्यात दौडत जाईन. राज्यपालाची जी अर्धांगी, तिला या साऱ्या गोष्टी मिळाल्याच पाहिजेत. " सँकिका म्हणाली, " आई, तुझ्यासारखी तूच. उद्यापेक्षा आज रात्रीच हे सारे घडावयास हवे. माझ्या आईजवळ मी आमच्या गाडीत बसलेली जेव्हा लोक पहातील, तेव्हा ते चेष्टा करतील– उपहास करतील आणि म्हणतील, ' पहा, पहा, ती भोळसट नि भिकारडी शेतकऱ्याची मुलगी पलीकडे बसली आहे. पहा तिने किती डामडौल केला आहे आणि पोपच्या मैत्रिणीसारखी ती त्या गाडीत कशी लोळत आहे. ' पण अशा बोलण्याची पर्वा मी काय करते ? मी गाडीतून ऐटीने जात असताना त्यांना चिखलात खुशाल खितपत पडू दे. नावे ठेवणाऱ्या साऱ्या क्षुद्र लोकांच्या कपाळी लज्जा आणि दुर्दैव येते. ज्यांची फत्ते होते, त्यांना लोक हसतात – लबाड कोल्ह्याची नेहमीच चलती असते. आई माझे म्हणणे बरोबर आहे ना ? " टेरेसा म्हणाली, " बाळे, तू अगदी बरोबर बोललीस ! या साऱ्या चांगल्या गोष्टी माझ्या भल्या सँकोने मला वारंवार सांगितलेल्या आहेत. याहून आणखी किती तरी गोष्टी व्हायच्या आहेत. मुली, तू पहाशीलच की, मी सरदारीण होईपर्यंत विश्रांती घेणार नाही. साऱ्या गोष्टींचा प्रारंभ व्हावा लागतो, असे तुझा जनक म्हणत असे, हे मी ऐकले आहे. तो म्हणींचाही जनक आहे. तुम्हाला कोणी गाय दिली, तर दावे बांधून तिला घेऊन चला. तुम्हाला कोणी राज्य दिले तर ते घ्या—सरदारकी दिली तर ती पकडा आणि मोठ्या आनंदाने तुम्हाला कोणी मोठी देणगी दिली, तर ती हिसकावून घ्या. मुली, जी वस्तू देण्याला चांगली, ती घेण्यालाही चांगली. जेव्हा सुदैव आपले दार ठोठावीत असते, तेव्हा उठून ते दार न उघडता बिछान्यावर घोरत

पडणे, ही कल्पना विचित्र आहे." सँकिका म्हणाली, "लोकांच्या मनात असेल ते सारे त्यांनी ओकले, तरी मला काय त्याचे ? लोकांची दृष्टी फाटून जाईल इतकी सुंदर मी दिसेन आणि लोक घायाळ होतील इतकी मी मोठी बनेन. मग 'घोड्यावर बसून भिकारीण चालली आहे, पहा.' वगैरे बोलून ते कितीही विष ओकोत."

हे ऐकून पाद्री म्हणाला, "पँझांचे सारे घराणे या जगात आले, ते आपल्या पोटात म्हणींचा साठा घेऊनच आले, असे कोणाला वाटणार नाही ? कोणत्याही विषयावर चर्चा असो, सर्व वेळी ते त्या म्हणी फेकीत असतात पण त्यातील एकीचाही अर्थ त्यांना माहीत नसतो." नोकर म्हणाला, "मलाही तसेच वाटते. नामदार राज्यपालही प्रत्येक वाक्याला अशा चुका करीत असतात. पुष्कळ वेळा त्या मूळ मुद्याला सोडून असतात. मात्र त्यामुळे साऱ्या मंडळींना नेहमी संतोष वाटत असतो आणि माझे धनी व धनीण त्यांची अपार प्रशंसा करतात." कॅरॅस्को म्हणाला, "मग महाराज, आपण आम्हाला अजून खात्रीने सांगत आहा ना की, सँको हा खरोखर राज्यपाल आहे. आणि त्याच्या वतीने डचेसने या भेटी व ही पत्रे पाठविली आहेत. या वस्तु आम्ही पाहात असलो आणि ती पत्रे आम्ही वाचलेली असली, तरी त्यावर विश्वास ठेवण्यास आम्ही आमचे मन तयार करू शकत नाही. उलट आमचा दोस्त डॉन क्विक्झोट यांच्या मताकडे धाव घेण्यास आमचे मन प्रवृत्त होते. हे सारे जादूच्या प्रभावाने झाले आहे असे आम्हास वाटते. तुम्ही हाडा–मांसाचे खरे प्राणी आहात की एक काल्पनिक दूत आहात, याचा शोध माझ्या अंतःकरणात घेण्याचा प्रयत्न मी करीत आहे." नोकराने उत्तर दिले, "सद्‌गृहस्थहो, मी तुम्हाला एवढेच सांगू शकतो की, मी दिसतो तसा खराखुरा दूत आहे, लॉर्ड सँको पँझा खरेखुरे राज्यपाल आहेत, आणि मी ज्यांचा सेवक आहे, ते ड्यूक व डचेस त्याला राज्य देण्यास समर्थ आहेत–आणि ते त्यांनी त्याला दिलेही आहे. तेथे ते अत्यंत योग्य तऱ्हेने वागत असल्याची मला विश्वसनीय माहिती आहे. तरीही यात काही जादू–बिदू असली तर चौकशी करण्याचे काम मी तुमच्यावर सोपवितो. यापेक्षा या प्रकरणाची अधिक काहीच माहिती मला नाही, हे मी माझ्या आई–बापांच्या प्राणांची शपथ घेऊन सांगतो. सर्व शपथांमध्ये ही अत्यंत मोठी आहे. कारण, ते दोघे जिवंत आहेत आणि त्यांच्यावर माझे फार प्रेम आहे."

पंडित म्हणाला, "तसे असेल ! पण तरीही सम्राटाबद्दलही शंका असतेच." नोकराने उत्तर दिले, "तुम्हाला वाटले तर तुम्ही शंका घ्या. पण मी तुम्हाला सत्य सांगितले आहे. सत्य हे असत्यावर नेहमी मात करते आणि पाण्यावर राहणाऱ्या तेला-प्रमाणे वर राहते. पण जर माझ्या शब्दावर तुमचा विश्वास नसेल तर तुमच्यापैकी कोणीही माझ्याबरोबर यावे आणि ज्याबद्दल आपल्या कानांवर विश्वास नाही ते स्वतःच्य डोळ्यांनी पहावे." सँकिका म्हणाली, "मी मोठ्या आनंदाने येते. महाराज, आपण मला आपल्या पाठीमागे बसवा. माझ्या बापाला पहाण्याची मला उदंड इच्छा आहे." नोकर म्हणाला, "राज्यपालांच्या मुलीने अशा प्रकारे, नोकर–चाकर न घेता, प्रवास

करता कामा नये. गाडीतून किंवा धमणीतून, नोकरांच्या मोठ्या ताफ्यानिशी त्यांनी प्रवास करावा. " सँकिका म्हणाली, " हे काय बोलणे ? तुमच्या गाडीतून प्रवास करणे काय आणि गाढवाच्या पाठीवरून जाणे काय, दोन्ही सारखेच. मी तुमच्या त्या नाजूक आजारी मुलीसारखी नाही—मुळीच नाही." आई म्हणाली, " चिमणे, शांत हो. आपण काय बोलतो हे तुला कळत नाही. या माणसाचे म्हणणे बरोबर आहे. काळ बदलला आहे. जेव्हा सँको साधा होता, तेव्हा सँकिका साधी होती. आता तो राज्यपाल आहे, म्हणून तू बाईसाहेब आहेस. माझे म्हणणे बरोबर की चूक हे मी नीट सांगू शकत नाही. " नोकर म्हणाला, " टेरेसाबाईसाहेब आपल्या मनात असेल त्यापेक्षा अधिक बोलत आहेत, पण आता मला शक्य तितक्या लौकर पोटभर खायला द्या. कारण मला आज दुपारी परत गेले पाहिजे. " पाद्री म्हणाला, " मग महाराज, माझ्याबरोबर चला आणि माझ्या घरी किरकोळ जेवण घ्या. आपल्यासारख्या चांगल्या माणसाचा पाहुणचार करण्याची इच्छा, माझी शेजारीण टेरेसा हिला कितीही असली तरी, ती तसे करण्यास समर्थ नाही. "

नोकराने थोडेसे आढेवेढे घेतले, पण तसे करणे चांगले होईल असे पटल्यामुळे, शेवटी त्याने ती विनंती मान्य केली. त्याचा सहवास मिळणार म्हणून आणि डॉन क्विक्झोट यांच्याविषयी आपल्याला पुष्कळ माहिती मिळण्याची संधी आली आहे हे पाहून, पाद्याला आनंद वाटला. टेरेसाला आलेल्या पत्रांची उत्तरे लिहून देण्याची तयारी पंडिताने तिला दाखविली. पण तो एक थट्टेखोर माणूस आहे, असे तिला वाटत असल्यामुळे त्याने आपले सल्लागार व्हावे, अशी तिची इच्छा नव्हती. म्हणून लिहिता येणाऱ्या, प्रार्थना–मंदिरातील एका नवशिक्या तरुणाला तिने दोन अंडी व खाद्यपदार्थ दिले. त्याने तिच्यासाठी दोन पत्रे लिहिली—एक, तिच्या नवऱ्याला आणि दुसरे, डचेसला. त्या पत्रांचा सारा मजकूर तिने सांगितला होता. या सुप्रसिद्ध इतिहासात ती पत्रे फार वाईट ठरणार नाहीत, हे यापुढे दिसून येईल.



## प्रकरण ५१

# सँकोच्या राज्यकारभाराचे वर्णन पुढे चालू आणि इतरही घटना घडल्या तशा

राज्यपालांनी रात्री शहराची पहाणी केल्यानंतर दुसरे दिवशीची सकाळ उजाडली. त्या रात्रीच्या उरलेल्या काळात त्या कुलीन सेवकाने झोप घेतली नाही, तर त्या मोहक मुद्रेच्या आणि वेषांतरित कुमारिकेच्या आकर्षक सौंदर्याचा विचार करण्यात तो काळ आनंदाने घालविला. उलट, कारभाऱ्याने तो काळ आपले स्वामी व स्वामिनी यांना, सँकोने काय केले व तो काय बोलला, हे लिहून कळविण्यात घालविला. सँकोच्या बोलण्यात शहाणपणा व भोळेपणा यांचे विचित्र मिश्रण होते. त्याच्या बोलण्यापेक्षा त्याचे करणे कमी आश्चर्यकारक नव्हते.

शेवटी राज्यपालसाहेबांनी जागे होण्याची मेहेरबानी केली. डॉ. पेड्रो रेझिओच्या हुकुमाप्रमाणे नोकराने त्यांच्या न्याहारीसाठी फळांचा थोडासा मुरंबा आणि शुद्ध घोट-भर पाणी आणले. त्यापेक्षा पाव आणि द्राक्षांचा एक घोस यांची सुंदर न्याहारी त्यांनी अधिक पसंत केली असती. पण त्या बाबतीत त्यांना स्वतःला काही करता येण्यासारखे नव्हते. म्हणून मिळेल ते गोड करून घेणे त्याना भाग होते. त्यांची इच्छा आणि त्यांची भूक याच्याशी विसंगत अशी ती न्याहारी पाहून ते अगदी खिन्न झाले. पण संतुष्ट झाल्याचा देखावा करणे त्यांना भाग पडले. डॉक्टराने त्यांना असे वाटावयास लावले की, "थोडेच खावे पण सुग्रास अन्न खावे. त्यामुळे माणसाच्या वृत्ती तरतरीत होतात आणि बुद्धी तीक्ष्ण होते. वजनदार व्यवसाय करणाऱ्या आणि सत्ताधीश असणाऱ्य माणसांना अशाच प्रकारचा आहार योग्य असतो. अशा माणसांना मनोबलापेक्षा शरीर-बलाची गरज कमी असते." डॉक्टराच्या या पोकळ युक्तिवादामुळे सँको भुकेने हैराण झाला—अर्धमेला झाला आणि आपल्या मनातल्या मनात ते राज्य आणि ते देणारा—या दोघांनाही शिव्याशाप देऊ लागला. तो भुकेलेला असला तरी, त्या किरकोळ न्याहारीच्या बळावर, त्या दिवशी लोकांच्या गाठीभेटी घेण्यास तो चुकला नाही. त्याच्या-पुढे प्रथम जो माणूस आला तो नवखा होता. त्याने आपली पुढील हकीकत निवेदन केली. त्यावेळी कारभारी व इतर सेवक उपस्थित होते. तो नवखा माणूस म्हणाला—

"महाराज, एकाच माणसाच्या मालकीच्या प्रदेशाचे एका मोठ्या नदीने दोन भाग केलेले आहेत. त्यासंबंधीची हकीकत मोठ्या महत्त्वाची आहे आणि काहीशी

अवघड पण आहे. म्हणून आपण माझ्याकडे लक्ष पुरवावे अशी माझी विनंती आहे. या नदीवर एक पूल आहे त्याच्या एका टोकाला वधस्तंभ आहे आणि न्यायमंदिर पण आहे. त्यात चार न्यायाधीश असतात आणि ते त्या प्रदेशाच्या व नदीच्या मालकाने केलेल्या एका विशिष्ट कायद्याची अंमलबजावणी करतात. तो कायदा असा––

'या पुलाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकाकडे जाण्याची ज्याला इच्छा असेल त्याने आपण कोठे जात आहोत व आपले काम काय आहे हे आधी शपथेवर जाहीर केले पाहिजे. त्याने खरे सांगितले तर त्याला जाऊ दिले जाईल. पण जर तो खोटे सांगेल तर त्याला फाशी दिले जाईल––कोणतीही दयामाया न दाखविता पुलाच्या टोकाशी असलेल्या वधस्तंभावर त्याला फाशी दिले जाईल.'

'हा कायदा अमलात आल्यानंतर, त्याच्या कठोरपणाकडे लक्ष न देता, पुष्कळ लोकांनी या पुलावरून जाण्याचे धाडस केले. त्यांनी शपथेवर खरे सांगितले असे दिसून आल्यामुळे न्यायाधिशांनी त्यांना काहीही उपद्रव न देता पलीकडे जाऊ दिले. एके दिवशी असे घडले की, कोणी एक वाटसरू तेथे आला आणि त्याने शपथेवर असे जाहीर केले की, 'या वधस्तंभावर मरण्यासाठी मी येथे आलो आहे. माझे काम एवढेच.'

"यामुळे न्यायाधीश घोटाळ्यात पडले व म्हणाले, 'आम्ही जर या माणसाला मोकळे जाऊ दिले तर त्याने खोटी शपथ घेतलेली आहे आणि कायद्याच्या शब्दाप्रमाणे त्याने मेले पाहिजे. आम्ही जर त्याला फाशी दिले, तर त्याने शपथेवर खरे सांगितले आहे की, मला या वधस्तंभावर मरावयाचे आहे. म्हणून याच कायद्याने आम्ही त्याला जाऊ दिले पाहिजे.'

"महाराज, न्यायाधीशांनी या माणसाचे काय करावे, याचा निर्णय आता आपल्याकडून पाहिजे आहे. कारण या बाबतीत काय निकाल द्यावा हे त्यांना कळत नाही. म्हणून ते अजून खोळंबून राहिले आहेत. आपली तीक्ष्ण बुद्धिमत्ता आणि बिकट प्रश्न सोडविण्याची महान पात्रता–यांची माहिती मिळाल्यामुळे त्यांनी मला आपल्या वतीने महाराजांना अशी विनंती करण्यास पाठविले आहे की, इतक्या गुंतागुंतीच्या आणि जटिल प्रकरणात आपण आपले मत द्यावे."

सँकोने उत्तर दिले, "तुम्हाला स्पष्टच सांगावयाचे तर, ज्यांनी तुम्हाला इकडे पाठविले त्या पूज्य न्यायाधिशांनी इतकी तसदी घेण्याचे काही कारण नव्हते. कारण माझ्या अंगी बुद्धीच्या तीक्ष्णतेपेक्षा मंदताच अधिक आहे हे मी खात्रीने सांगतो. तथापि तुमचा प्रश्न मला पुन्हा एकदा ऐकू द्या, म्हणजे मला तो पुरा कळेल आणि कदाचित शेवटी मी या प्रकरणातून काही तोड काढू शकेन." त्या माणसाने आपला प्रश्न पुनः पुनः सांगितला. त्याचे बोलणे संपल्यावर सँको म्हणाला, "माझ्या मताप्रमाणे, या प्रश्नाचे उत्तर तत्काळ असे देता येईल– वधस्तंभावर मरण्यासाठी आपण आलो आहो असे त्या माणसाने शपथेवर सांगितले आहे. तो तेथे मेला तर तो शपथेवर खरे बोलला असे ठरेल आणि मग कायद्याप्रमाणे त्याला मोकळे केले पाहिजे आणि पुलावरून जाऊ

दिले पाहिजे. उलट, तुम्ही जर त्याला फाशी दिले नाही, तर तो खोटे बोलला असे होईल. मग त्याच कायद्याप्रमाणे त्याला फाशी द्यावे लागेल, " त्या नवख्या माणसाने उत्तर दिले, " महाराज म्हणतात तसेच आहे. आपण हे प्रकरण बरोबर मांडले आहे. " सँको म्हणाला, " मग असे का करीत नाही ? त्या माणसाचा जो भाग खरे बोलला, त्याला बिनधोक जाऊ द्यावे आणि जो भाग खोटे बोलला त्याला फाशी द्यावे, म्हणजे कायद्याचे पालन केल्यासारखे होईल. " नवख्या माणसाने उत्तर दिले, " महाराज, तसे झाले तर आपल्याला त्या माणसाचे दोन तुकडे करावे लागतील—आणि ते केले तर तो मरेल हे खचित. याचा अर्थ कायद्याची अंमलबजावणी नीट होत नाही. पण कायद्याचे पालन काटेकोरपणे झाले पाहिजे. "

सँको म्हणाला, " ठीक, आता माझे ऐका. मी जर अगदी मठ्ठ नसेन तर मला असे दिसते की, ज्याच्याविषयी तुम्ही बोलता त्या माणसाला मारण्यास जितके कारण आहे, तितकेच जिवंत रहाण्यास आणि पुलावरून जाऊ देण्यास आहे. सत्य त्याला वाचविते, असत्य त्याला फाशी देते. आता हे प्रकरण असे आहे– त्याला मुक्त करण्यास जितके कारण आहे तितकेच शिक्षा ठोठावयासही आहे. म्हणून तुम्ही त्याला मुक्त करावे असे तुम्ही त्या न्यायाधिशांना सांगावे अशी माझी इच्छा आहे. कारण हानि करण्यापेक्षा कल्याण करणे केव्हाही स्तुत्य. मला जर लिहिता आले असते, तर मी हा माझा निर्णय स्वहस्ते लिहून दिला असता. मी हे जे काही बोलत आहे, ते माझ्या स्वतःच्या डोक्यातील नाही. या बेटाचे राज्य करण्यास निघण्याआधीच्या रात्री, माझा धनी डॉन क्विक्झोट यांनी मला जे पुष्कळ आदेश दिले, त्यांपैकी एक मला आता आठवतो, आणि तो म्हणजे, जेव्हा न्यायाची पारडी समान असतात किंवा एखादा खटला संशयास्पद असतो, तेव्हा आपण कठोरपणापेक्षा दयेने वागणे पसंत करावे. या आणीबाणीच्या वेळी मला सुदैवाने हे आठवले ही खरोखर प्रभूची कृपाच होय. " कारभारी म्हणाला, " महाराज, आपला हा निवाडा इतका न्यायाचा आहे की, लेस्डीमोनियन लोकांना कायदे करून देणाऱ्या खुद्द लायकरगसने, महान सँकोने दिला त्यापेक्षा अधिक चांगला निर्णय कधीकाळी दिला असेल असे मला वाटत नाही.

" महाराज, सकाळचे काम आता पुष्कळच झाले आहे, म्हणून आपण न्यायमंदिराचे काम कृपया तहकूब करावे. आता महाराजांना पोटभर जेवण देण्याचा हुकूम मी सोडतो. " सँको म्हणाला, " योग्य बोललात. मला जे काही पाहिजे आहे ते हेच. नंतर आपण न्यायाचा पट पुन्हा मांडू, तेव्हा कोणावर विशेष कृपा करण्याचे कारण नाही. मला चांगले खाऊ घाला आणि मग त्रिवार किचकट असलेले प्रश्न आणि खटले माझ्यापुढे आणा. ते सारे मी कसे उलगडतो आणि सूर्यप्रकाशाइतक्या स्वच्छ स्वरूपात कसे मांडतो ते पहा. " कारभारी जसे बोलला तसेच वागला. एवढ्या चतुर राज्यपालाला उपाशी ठेवणे हे त्याच्या न्यायबुद्धीला जड वाटले. शिवाय सँकोची शेवटची जी चेष्टा करण्याचे काम त्याच्यावर सोपविण्यात आले होते, ती दुसरे दिवशी रात्री

करण्याचे त्याने योजले होते.

डॉ. टिफ्युरार्टी याचे सर्व निर्बंध पायाखाली तुडवून, सँकोने त्या दिवशी आकंठ भोजन केले. भोजनाच्या टेबलावरील चादर काढून नेल्यानंतर एक दूत तेथे तातडीने आला. त्याने राज्यपालांना डॉन क्विक्झोटनी लिहिलेले पत्र आणले होते. सँकोने ते मनात वाचण्यास सचिवास फर्माविले. एकांतातच वाचण्यासारखे त्यात काही नसेल, तर ते मोठ्याने वाचण्यास त्याने त्याला सांगितले. त्याप्रमाणे सचिवाने त्या पत्रावरून प्रथम आपली नजर फिरविली आणि तो म्हणाला, "महाराज, हे पत्र जाहीर रीतीने वाचले जावे, एवढेच नव्हे तर, सोन्याच्या अक्षरांनी ते खोदले जाण्याच्या योग्यतेचे आहे. ते पत्र असे—

**ला मांचा येथील डॉन क्विक्झोट यांचे**
**बॅराटेरिया बेटाचे राज्यपाल सँको पँझा यांना पत्र**

"मित्रा सँको, तुझ्या निष्काळजीपणाचा आणि आगाऊपणाचा वृत्तांत माझ्या कानी येईल अशी अपेक्षा मी करीत असताना, तुझ्या चतुर वर्तनाची वार्ता कळल्यामुळे माझा अपेक्षा-भंग झाला आणि त्याचा मला आनंद वाटला. त्यासाठी मी ईश्वराचे विशेष आभार मानतो. ईश्वर सर्वांत हलक्या माणसाला त्याच्या दारिद्र्यातून वर काढतो आणि मूर्खाला शहाणा बनवितो. मी असे ऐकतो की, कोणाही शहाण्या माणसाप्रमाणे तू राज्यकारभार करीत आहेस. त्यामुळे तू स्वतःवर मोठा खूष असलास, तरी अत्यंत नीच प्राण्याची नम्रता तू कायम ठेवली आहेस. पण सँको, एखाद्या अधिकाराच्या सत्तेला बळकटी यावी म्हणून आपल्या हृदयीच्या नम्रतेला आळा घालणे पुष्कळ वेळा अत्यंत अवश्य असते-आणि सोयीचेही असते, हे तू लक्ष्यात घ्यावेस अशी माझी इच्छा आहे. कारण एखाद्या उच्चपदी पोहोचलेल्या माणसाची भाषा त्याच्या थोरपणास अनुसरून असली पाहिजे-पूर्वीच्या हलक्या राहणीला धरून ती भ्रष्ट स्वरूपाची असता कामा नये. तुझा पोशाख व्यवस्थित व सुंदर असावा. एखाद्या खांबालाही चांगला पोशाख चढविला तर तो खांबासारखा दिसत नाही. तू नखरेबाज व भपकेबाज पोशाख करावास असे मला वाटत नाही, पण न्यायाधीश असताना सैनिकाचा वेष धारण करणे योग्य नव्हे. तुझ्या स्थानाला योग्य असा तुझा वेष असावा-तो नेहमी स्वच्छ व सभ्य असावा,

"लोकांची अंतःकरणे जिंकण्यासाठी ज्या पुष्कळ गोष्टी कराव्या लागतात, त्यापैकी मुख्य दोन गोष्टींची शिफारस मी तुला करतो. पहिली म्हणजे सभ्य, सौजन्यपूर्ण आणि सर्व जगाला योग्य वाटेल असे वर्तन ठेवावे, हे मी तुला पूर्वीच सांगितले आहे. दुसरी गोष्ट म्हणजे धनधान्याची विपुलता कमी न पडण्याची तू काळजी घे. कारण गरीब लोकांच्या भावनांना टंचाई व भूक यांच्या इतका त्रास दुसऱ्या कशानेही होत नाही आणि त्यांच्या मनोवृत्ती दुसऱ्या कशानेही प्रक्षुब्ध होत नाहीत.

"पुष्कळ नवेनवे हुकूम तू सोडू नकोस-पण जर सोडलेस, तर ते हितकारक आणि चांगले आहेत का—आणि त्यांचे पालन काटेकोरपणे होईल का—याकडे लक्ष असावे.

कारण ज्या कायद्यांचे पालन नीट होत नाही ते करून न केल्यासारखे असतात. त्यावरून एवढेच दिसते की, ज्या राजपुत्राला कायदे करण्याचे ज्ञान व अधिकार आहे, त्याला ते अंमलात आणण्याचा निर्धार नाही. ज्या कायद्याची केवळ भीति वाटते पण जे पाळले जात नाहीत ते, बेडकांना राजा म्हणून दिलेल्या लाकडाच्या ओंडक्यासारखे, असतात. तो पाहून ते बेडूक प्रथम भ्याले. पण लवकरच ते त्याला तुच्छ मानू लागले आणि पाया-खाली तुडवू लागले.

" तू सद्गुणांचा पिता हो पण दुर्गुणांचा सासरा हो. नेहमी कठोर होऊ नकोस की सदय राहू नकोस. या दोन टोकांतील मध्यमक्रम स्वीकार. मध्यमक्रम हा शहाण-पणाचा मध्यबिंदू असतो.

" कैदखाने, कत्तलखाने, सार्वजनिक बाजार यांना तू भेटी दे, कारण अशा ठिकाणी राज्यपालाने हजर राहणे अत्यंत अवश्य असते.

" लवकरच सुटका होण्याची आशा धरणाऱ्या कैद्यांना समाधान दे.

" कसायांना तुझा दरारा वाटला पाहिजे. म्हणजे ते आपली वजने– मापे चोख ठेवतील आणि त्यामुळे फेरीवाले व लबाड व्यापारी यांच्यावरही वचक बसेल.

" दुर्दैवाने तू जर लोभी बनलास, खादाड बनलास, किंवा स्त्रियांना वश झालास ( तसा तू नाहीस असे मी मानतो ) तर त्या दोषांचे धनी आपण आहो याचे प्रदर्शन करण्याचे टाळ. कारण गाव आणि तुझ्याजवळ येणारे लोक यांनी तुझी ही दुर्बलता ओळखली, तर त्या बाजूने ते तुझ्यावर नक्की हल्ला करतील व तुझा कायमचा सत्यानाश करणाऱ्या मोहात तुला पाडतील.

" तू येथून तुझ्या राज्याकडे जाण्यापूर्वी मी तुला जे आदेश आणि निर्बंध लिहून दिले, ते पुनः पुनः वाच आणि गंभीरपणाने त्यांचा विचार कर. राज्यपालाचे कार्य करीत असताना ज्या अडचणी व पेचप्रसंग वारंवार येत असतात, त्या सर्वांमध्ये त्यांचा तुला चांगला फायदा होईल.

" ड्यूक व डचेस यांना पत्र लिही आणि आपली कृतज्ञता व्यक्त कर. कारण कृतघ्नता हे गर्वाचे अपत्य असते– मनाच्या भ्रष्टतेचे ते अत्यंत कटू फल होय. उलट, जो माणूस आपल्या उपकारकर्त्याशी कृतज्ञ असतो, तो ईश्वराशीही तसाच असेल याची हमी मी देतो. ईश्वराने त्याचे इतके कल्याण केलेले असते आणि पुढेही तो ते सतत करीत असतो.

" लेडी डचेस यांनी तुझी बायको टेरेसा हिच्याकडे तुझा शिकारी वेष आणि दुसरी एक भेट यांच्यासह एका दूताला पाठविले आहे. तो कोणत्याही क्षणी परत येईल अशी आमची अपेक्षा आहे.

" अलीकडे माझा एका मांजराशी सामना झाला. तेव्हा माझ्या नाकाला बराच उपद्रव झाला आणि त्यामुळे माझे मन काहीसे अस्वस्थ झाले आहे. पण हे सारे महत्त्वाचे नाही. कारण मला छळणारे जसे काही मांत्रिक आहेत, तशी माझे रक्षण

करणारीही काही माणसे आहेत.

"तुझ्याबरोबर असलेल्या कारभाऱ्याचा हात ट्रिफाल्डीच्या सरदारणीच्या प्रकरणात काही होता का, हे मला कळव. कारण तसे तुझे एकदा मत होते. तुझ्या वास्तव्यास काय काय येते ते सारे मला कळव. कारण आपणा दोघांच्या मनातील अंतर फार थोडे आहे. माझे येथील आळशी जीवन लवकरच सोडून देण्याचा माझा विचार आहे. कारण चैन व आराम यासाठी मी जन्मास आलेलो नाही.

"मला एक काम सांगून आलेले आहे. त्यामुळे ड्यूक व डचेस यांची कृपा मला गमवावी लागेल असे वाटते. त्यामुळे मला मनस्वी दुःख होईल हे खरे, पण माझ्या निश्चयात बदल होणार नाही. दुसऱ्यांना संतुष्ट करण्यापेक्षा माझा व्यवसाय नीट करणे हे माझे कर्तव्य आहे. 'प्लेटोच्या मैत्रीपेक्षा सत्य थोर आहे.'

लॅटिन शब्दांचा हा तुकडा मी तुला पाठवीत आहे. कारण आता तू राज्यपाल झाल्यामुळे त्या भाषेचे थोडेफार ज्ञान तुला झाले असेल असे मी आनंदाने मानतो. रामराम! जगाच्या दयेवर जगण्यापेक्षा वरच्या स्थितीत ईश्वर तुला राखो.

तुझा मित्र,
ला मांचा येथील डॉन क्विक्झोट

सँकोने ते पत्र मोठ्या दक्षतेने ऐकले. शहाणपणा व प्रांजलपणा या दोन्ही गुणांनी युक्त अशा त्या पत्राची प्रशंसा, ते ज्यांनी ज्यांनी ऐकले, त्या सर्वांनी मुक्तकंठाने केली. नंतर सँको आपल्या टेबलावरून उठला आणि आपल्या सचिवाला बोलावून, आणखी विलंब न लावता, आपल्या खोलीत गेला. आपला धनी डॉन क्विक्झोट यांना उत्तर लिहिण्यासाठी त्याने तेथे स्वतःला कोंडून घेतले. त्याने त्या लेखकाला सांगितले, "मी सांगेन तो मजकूर शब्दन्‌शब्द लिहून घे. त्यात थोडीही भर घालू नकोस किंवा कमी करू नकोस." त्याने ही आज्ञा काटेकोरपणे पाळली. नंतर तयार झालेल्या पत्राचा सर्वसाधारण सूर पुढीलप्रमाणे होता—

## ला मांचा येथील डॉन क्विक्झोट यांना सँको पँझा यांचे उत्तर

"येथे मी कामात इतका गढून गेलो आहे की, माझे डोके खाजवायला किंवा माझी नखे कापण्याला मला वेळ मिळत नाही. त्यामुळे माझी नखे फार लांब झाली आहेत. देव माझ्यावर दया करो! माझे प्रिय धनीसाहेब, मी आपल्याला हे सांगत आहे याचे कारण इतकेच की, या राज्यात माझे बरे–वाईट काय होत आहे हे मी आपल्याला अद्याप कळविले नाही, म्हणून आपण आश्चर्य वाटू देऊ नये, आपण आणि मी जेव्हा रानावनातून भटकत होतो, त्यापेक्षा आता येथे भुकेने माझी उपासमार अधिक होत आहे.

"ड्यूकसाहेबांनी मला परवा एक पत्र लिहिले आणि कळविले की, तुम्हाला

ठार मारण्यासाठी काही हेर या बेटात शिरलेले आहेत. आतापर्यंत असा एकही हेर मला आढळला नाही. फक्त एक डॉक्टर आढळला आहे. जे जे राज्यपाल या बेटावर येतील, त्यांना ठार मारण्यासाठी या बेटावरील लोकांनी त्याला भाडोत्री म्हणून ठेवला आहे. ते त्याला डॉ. पेड्रो रेझिओ डी ॲगेरो या नावाने ओळखतात. त्याचा जन्म टिर्टीफ्युरा येथे झालेला आहे. तो माझा साक्षात् मृत्यू आहे, अशी भीती मला वाटावयास लावणारे त्याचे नाव आहे. हा डॉक्टर स्वतःविषयी असे सांगतो, ' जेव्हा तुम्हाला रोग झालेले असतील, तेव्हा ते मी बरे करतो, पण जेव्हा झाले नसतील, तेव्हा ते होऊ नयेत अशी तजवीज मी करतो. ' हे त्याचे केवळ ढोंग आहे. त्याचा औषधोपचार म्हणजे उपासामागून उपास-शेवटी रोग्याचे शरीर म्हणजे केवळ हाडांचा सांगाडा बनते-जणु काही शरीर झिजून झिजून अस्थिपंजर होणे हे ताप येण्याइतके वाईट नाही. थोडक्यात म्हणजे तो मला उपाशी ठेवून ठार मारीत आहे. वास्तविक मी अशा विचारात होतो की, आपण राज्यपाल झाल्यानंतर आपल्याला चांगले गरम गरम खाद्य-पदार्थ पोटभर खायला मिळतील आणि थंड मद्य प्यायला मिळेल. तसेच तलम सुताचे कपडे अंगावर घालता येतील आणि पराच्या मऊ बिछान्यावर निजून पुनः ताजे-तवाने होता येईल. पण येथे तापसाप्रमाणे मला तपश्चर्या करावी लागत आहे. आणि ती मी नाखुशीने करीत असल्यामुळे शेवटी सैतान मला गट्ट करील अशी मला भीती वाटते.

" आतापर्यंत मी फी म्हणून, लांच म्हणून किंवा दुसऱ्या काही नावाने एक पैसुद्धा माझ्या बोटाच्या चिमटीत धरलेली नाही. असे कसे होते, याची मला कल्पना नाही. कारण जाता जाता मी असे ऐकले आहे की, या बेटावर जे राज्यपाल येतात, त्यांनी येथे प्रवेश करण्यापूर्वीच, या गावातील लोकांकडून त्यांना अत्यंत उत्तम देणगी मिळते—किंवा निदान बरीच मोठी रक्कम कर्जाऊ मिळते. केवळ येथेच नव्हे, तर इतर ठिकाणीही अशीच नित्याची वहिवाट आहे असे लोक बोलतात.

" काल रात्री शहरात भ्रमण करीत असताना, पुरुषाच्या वेषातील एक अत्यंत सुंदर तरुणी आणि स्त्रीच्या पोशाखातील तिचा एक भाऊ मला भेटला. त्या मुलीवर माझ्या सेवकाचे प्रेम बसले आणि तिला मी माझी पत्नी करणार आहे असे तो म्हणतो. त्या तरुण मुलाला मी माझा जावई म्हणून नक्की केले आहे. आज आम्ही दोघे त्याच्या बापाकडे-कोणी एका डीएगा डी ला ल्लाना याच्याकडे-चर्चा करण्यास जाणार आहोत. तो एक सभ्य गृहस्थ आहे आणि रोमरोमात जुना ख्रिश्चन आहे.

" आपण सांगितल्याप्रमाणे मी बाजारपेठांना भेट देतो. काल मला हॅझेल फळे विकणारी एक फेरीवाली आढळली. ती सारी फळे ताजी आहेत अशी तिने थाप मारली. पण मला असे आढळले की, शिळ्या, पोकळ व सडलेल्या फळांच्या मोठ्या राशींमध्ये तिने काही ताजी फळे मिसळली आहेत. ती दवाखान्यातील मुलांना द्यावीत असे मी ठरविले. चांगल्या-वाईटांची निवड कशी करावी हे त्यांना माहीत असते. त्या

फळवालीला मी अशी शिक्षा दिली की, पंधरा दिवस या बाजारात तू येता कामा नये. लोक म्हणतात, मी चांगले केले. इथल्या लोकांच्या मते अशा बाजारी बायकांपेक्षा अधिक बदमाष माणसे साऱ्या दुनियेत नसतील, असे मी आपल्याला सांगतो. या स्त्रिया म्हणजे उद्धट, उर्मट, सैतानी आणि शिवराळ तोंडाच्या प्राण्यांचा घोळका आहे. इतर ठिकाणी मी ज्या स्त्रिया पाहिल्या त्यावरून मला असेच वाटते.

"डचेसनी माझी बायको टेरेसा पँझा हिला एक पत्र लिहिले आणि आपण उल्लेखिलेली भेट पाठविली यामुळे मी फार फार खूष आहे. केव्हा ना केव्हा तरी मी त्यांच्या या प्रेमळ कृत्याची परतफेड करीन. अर्थात् तसे करणे मला जड जाईल. कृपा करून आपण माझे प्रणाम त्यांना कळवा आणि माझे मत सांगा की, आपण आपली देणगी फाटक्या पोत्यात टाकलेली नाही, हे शब्दांपेक्षा कृतीने पुढे सिद्ध होईल

"मी जर आपल्याला सल्ला देऊ शकत असेन तर, आपण आणि ड्यूक व डचेस यांच्यामध्ये कोणताही दुरावा येऊ नये, अशी माझी इच्छा आहे. कारण, आपण त्यांच्याशी भांडला तर त्याचा सर्वात वाईट परिणाम माझ्यावरच होणार! मी कृतज्ञ आहे असे आपण समजता. मग स्वतःच्या किल्ल्यात आपले इतके आगत-स्वागत ज्यांनी केले, त्यांच्याशी आपण कृतज्ञ न रहाल तर ते आपल्याला शोभणार नाही.

"आपले मांजराचे प्रकरण काय आहे हे मला मुळीच कळले नाही. पूर्वीच्याच प्रकाराने आपण अद्याप झपाटलेले आहा, एवढाच तर्क मी करतो. समक्ष भेटीत आपण मला अधिक सांगाल.

"मी आपल्याला एखादी भेट आनंदाने पाठविली असती, पण काय पाठवावे हे मला कळत नाही. येथे फक्त चकचकीत नळ्या मोठ्या कौशल्याने तयार केल्या जातात आणि त्या कातडी फुग्यावर फार कौशल्याने बसविल्या जातात. पण मी जर माझ्या जागी काही काळ राहिलो, तर मी आपल्याला योग्य अशी काही तरी वस्तू खचित पाठवीन—मग ती कोणतीही असो आणि ती मिळविण्यासाठी मला कितीही कष्ट पडोत.

"माझी बायको टेरेसा पँझा हिने मला पत्र लिहिले तर कृपा करून आपण टपालखर्च देऊन ते पत्र मला पाठवावे. तिचे, माझ्या घराचे आणि माझ्या मुलांचे कसे काय चालले आहे, हे कळण्याची मला फार फार इच्छा आहे.

"ईश्वर आपल्याला दुष्ट बुद्धीच्या जादूगारापासून सुरक्षित राखो आणि मला या राज्यातून सुरक्षित आणि सुदृढ असा बाहेर काढो. डॉ. पेड्रो रेझिओ मला ज्या आहारावर ठेवीत आहे त्यामुळे माझी येथून धडपणे सुटका होणार नाही असे वाटते.

महाराजांचा सेवक

"राज्यपाल सँको पँझा"

सचिवाने पत्र पूर्ण केले आणि तत्काळ त्या तातडीच्या दूताबरोबर पाठविले. सँकोविरुद्ध ज्यांनी कारस्थान रचले होते ते लोक नंतर एकत्र जमले आणि त्याला या राज्यातून कसे हलवावे याचा विचार करू लागले. जे बेट आहे असे सँकोला वाटत

होते, त्याची सुव्यवस्था लावण्यासाठी सँकोने पुष्कळ नियम तयार करण्यात ती दुपार घालविली. बाजारातील दलाल आणि वायदे करणारे लोक यांच्याविरुद्ध त्याने एक हुकूम प्रसिद्ध केला. आणि दुसऱ्या हुकुमाने, कोणत्याही प्रदेशातून दारू आणण्यास उत्तेजन दिले. मात्र ती दारू कोठे तयार झालेली आहे हे मालकाने जाहीर केले पाहिजे, म्हणजे तिच्या योग्यतेप्रमाणे आणि चांगुलपणाप्रमाणे तिचा दर ठरविला जाईल. दारूत पाणी मिसळून भेसळ करणाऱ्या किंवा भलत्या नावाने ती विकणाऱ्या लोकांना मृत्यूची शिक्षा ठोठावली जाईल. सर्व प्रकारच्या पोशाखाची – त्यातही पादत्राणांची – किंमत त्याने कमी केली, कारण ती बेसुमार आहे असे त्याला वाटले. तसेच सेवकांचे वेतन अमर्याद आहे असे वाटल्यामुळे त्याने ते मर्यादित केले आणि त्यांच्या सेवा–गुणांवर वेतनाचे प्रमाण ठरविले. जे लोक अश्लील व अनैतिक गीते आणि लावण्या भर दिवसा किंवा अंधाऱ्या सायंकाळी, गातात किंवा तयार करून विकतात, त्यांना त्याने कडक शिक्षा ठेवली. तसेच चमत्काराचे वर्णन जे आंधळे लोक आपल्या गाण्यातून करतात, त्यांना मनाई करण्यात आली. कारण अशा प्रकारे गाइले जाणारे बहुतेक सर्व चमत्कार खोटे असतात आणि सत्याला कमीपणा आणणारे असतात असे त्याला वाटले. ते सत्य असल्याचे अधिकृत पुरावे कोणी दाखल केल्यास त्यांना ही मनाई लागू नसे.

गरीब लोकांची तपासणी करण्यासाठी – त्यांना छळण्यासाठी नव्हे – ते खरोखर गरीब आहेत की नाहीत याची छाननी करण्यासाठी त्याने एका खास अधिकाऱ्याची नेमणूक केली. कारण खोट्या लंगडेपणाच्या आणि कृत्रिम जखमांच्या नावाखाली पुष्कळ ढोंगी उडाणटप्पू लोक पैसे मगरूरपणाने लुबाडतात आणि दारूत व दंग्यात उधळून टाकतात. त्यामुळे खऱ्या गरीब लोकांना दान–धर्माचा फायदा मिळत नाही.

सारांश, त्याने इतके हितकारक निर्बंध घातले की, त्यांचे पालन त्या ठिकाणी आजही होत आहे. 'महान् राज्यपाल सँको पँझा यांच्या राजाज्ञा' या नावाने ते निर्बंध प्रसिद्ध आहेत.



प्रकरण ५२

# डोन्ना रोड्रिगेझ या नावाने ओळखल्या जाणाऱ्या दुसऱ्या निराश किंवा संत्रस्त प्रौढेच्या साहसी कृत्याचे वर्णन

सिड्ड हॅमेट निवेदन करतात की—डॉन क्विक्झोट यांच्या जखमा भरून आल्यामुळे त्यांना असे वाटू लागले की, आपण जो शिलेदारीचा व्यवसाय फुशारकीने सांगत असतो त्याच्याशी या किल्ल्यातील आपले जीवन सुसंगत नाही. म्हणून त्यांनी ड्यूक व डचेस यांचा निरोप घेऊन सॅरॅगोस्सा येथे जाण्याचे ठरविले. तेथे लवकरच सामने होणार होते. तशा समारंभात नेहमी मिळणारे बक्षीस म्हणून आपण चिलखत जिंकून घेऊ अशी आशा त्यांना वाटत होती. म्हणून त्या किल्ल्याच्या स्वामी-स्वामिनींसह ते एकदा भोजनास बसले असताना त्यांनी आपल्या या नव्या योजनेचा परिचय त्यांना करून दिला. तोंच दोन स्त्रियांनी त्या प्रशस्त दालनात प्रवेश केला. त्यांच्या अंगावर शोक-दर्शक वेष नखशिखांत होता. त्यांच्यापैकी एकजण डॉन क्विक्झोटजवळ आली आणि त्यांच्या पायाशी तिने लोटांगण घातले-त्यांच्या पायाचे चुंबन घेतले--आणि मोठमोठे दुःखाचे सुस्कारे सोडून तिने असे काही शोकपूर्ण विलाप करण्यास सुरुवात केली की, तेथे असलेल्या सर्व लोकांना फार आश्चर्य वाटले. डॉन क्विक्झोटवर आपल्या सेवकाने केलेली ही काही नवी करामत असावी असा तर्क ड्यूक व डचेस यांनी केला, तरी ती स्त्री इतक्या कळकळीने सुस्कारे सोडीत होती आणि विलाप करीत होती की, त्यांचे मन संशयात पडले. आणि त्यांना, हे काय घडत आहे, याची काहीच कल्पना येईना.

शेवटी त्या दयाळू वीर-पुरुषाने तिला जमिनीवरून उठविले आणि आपला बुरखा काढावयास लावले. काय आश्चर्य! कोणाचीही अपेक्षा नसताना, त्या सर्वांना कुटुंबातील पाठराखीण डोन्ना रोड्रिगेझ हिचे तोंड दिसले. शोक करणारी दुसरी स्त्री तिची मुलगी होती. तिला त्या श्रीमंत शेतकऱ्याच्या मुलाने फसविले होते. त्या दोघींना जे ओळखत होते त्यांना-विशेषतः ड्यूक व डचेस यांना-नवल वाटले. भोळेपणा व अविचारीपणा या दासीच्या अंगी असला, तरी ती वेडेपणाच्या इतक्या थरापर्यंत जाईल असे कोणासच वाटले नाही. शेवटी ती शोकाकुल प्रौढा ड्यूक व डचेस यांना उद्देशून म्हणाली, "महाराज, एका विश्वासघातकी दुष्ट माणसाच्या निर्लज्जपणामुळे आम्ही या दुर्दैवी प्रकरणात सापडलो आहो. त्यातून आपण बाहेर कसे पडतो याची मला चिंता लागून राहिली आहे. म्हणून या शिलेदारजीशी संवाद करण्याची परवानगी आपण मला द्यावी."

तेव्हा ड्यूकने तिला वाटेल ते बोलण्याची परवानगी दिली. म्हणून ती डॉन क्विक्झोट यांना म्हणाली, "शूर शिलेदारजी, एका घाणेरड्या तरुण शेतकऱ्याने नीचपणाने व विश्वासघाताने माझ्या या प्रिय मुलीला कसे फशी पाडले याची हकिकत मी आपल्याला सांगून फार दिवस झाले नाहीत. ज्या बिचारीच्या आयुष्याचे वाटोळे झाले आहे, ती येथे हजर आहे. तिचा कैवार घेऊन तिच्या आयुष्याची घडी नीट बसविण्याचे वचन आपण मला दिले आहे. पण आताच मला कळते की, आपण या किल्ल्याचा निरोप घेण्याच्या तयारीत आहा आणि प्रभु पाठवील त्या साहसी कामगिरीचा शोध करण्यासाठी निघणार आहा. आपण कोठे जाणार हे कोणासच माहीत नाही. पण आपण येथून जाण्यापूर्वी मी आपल्यापाशी एक वर मागत आहे. तो म्हणजे त्या गलेलठ्ठ उडाणटप्पूला आव्हान देऊन आपण त्याला माझ्या मुलीशी लग्न करण्यास भाग पाडावे. पूर्वी तिच्याशी संबंध असताना त्याने तसे करण्याचे वचन दिले होते. ड्यूकसाहेब माझी ही स्थिती सुधारतील असे मानणे मूर्खपणाचे आहे. त्याचे कारण मी आपल्याला खाजगी रीत्या पूर्वी सांगितलेच आहे. म्हणून ईश्वराने आपले संरक्षण करावे आणि आपण आमचे संरक्षण करावे."

डॉन क्विक्झोट यांनी, मोठ्या गांभीर्याने आणि प्रशांत मुद्रेने, उत्तर दिले, "अहो थोरल्या बाई, आपले अश्रू आवरा–अचूक सांगायचे तर–आपले डोळे कोरडे करा आणि आपले सुस्कारे थांबवा. कारण तुमच्या कन्येवरील अन्याय दूर करण्याचे काम मी माझ्या शिरावर घेत आहे. ती चांगली वागली आहे. पण तिने आपल्या अत्यंत भाबडेपणाने त्या प्रेमिकाच्या आश्वासनावर विश्वास ठेवला नसता तर बरे झाले असते. माझी आश्वासने सहज दिली जातात, पण ती सहजासहजी अंमलात आणली जात नाहीत. म्हणून मी ड्यूकसाहेबांच्या परवानगीने त्या आचरट दुष्टाचा शोध लावण्यासाठी येथून तात्बडतोब प्रयाण करतो. त्याचा शोध लागताच मी त्याला आव्हान देईन आणि तो आपला हट्ट चालवू लागला तर त्याला ठार मारीन. कारण माझ्या व्यवसायाचे मुख्य ध्येय हे आहे की, नम्र माणसांना क्षमा करावी आणि उद्धटांना शासन करावे, दुःखी माणसांना दुःखमुक्त करावे आणि क्रूर माणसांचा विनाश करावा." ड्यूक म्हणाला, "शिलेदारमहाराज, या भल्या दासीने ज्याच्याविषयी तक्रार केली, त्या माणसाचा शोध करण्यासाठी आपण तसदी घेण्याचे काही कारण नाही. तसेच त्याला आव्हान देण्यासाठी आपण माझी परवानगी मागण्याचेही कारण नाही. कारण, जाब देण्यासाठी तो माणूस येथेच या किल्ल्यात आपल्याला भेटेल, अशी मी आपल्याला हमी देतो. तुम्हा दोघांच्या संरक्षणाची व्यवस्था आम्ही करू. अशा प्रकारच्या द्वंद्वयुद्धात जे नियम शस्त्रविद्येनुसार पाळावे लागतात, ते सर्व पाळले जातील आणि दोन्ही पक्षांना न्याय दिला जाईल. आपापल्या प्रदेशात एकेका माणसाचे द्वंद्वयुद्ध करण्यास जे राजे मुभा देतात, त्यांनी हे सारे नियम पाळलेच पाहिजेत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "महाराज, आपले एवढे आश्वासन मिळाल्यावर, आपल्या अनुज्ञेने, मी यावेळी सामन्याचे माझे

नियम बाजूस सारतो आणि त्या गुन्हेगाराच्या नीचपणाइतका मी खाली उतरतो नि त्याला माझ्याशी भाल्याचे हात करण्यास लायक मानतो. म्हणून तो येथे हजर असो वा नसो, त्याला मी आव्हान देतो आणि तुच्छ लेखतो. कुमारी असणाऱ्या या जीवाला ज्याने फसविले आणि ज्याच्या हलकटपणामुळे ती आता कुमारी राहिली नाही, त्याचा धिक्कार मी करतो. त्याने, एक तर मुलीला आपली कायदेशीर पत्नी बनवून आपले वचन पाळावे, नाही तर, द्वंद्वात मरून जावे." असे म्हणून त्यांनी आपला हातमोजा हातातून बाहेर काढला आणि त्या दालनाच्या मध्यभागी फेकून दिला. तो ड्यूकने उचलून घेतला आणि अशी घोषणा केली की, "माझ्या नोकराच्या वतीने मी हे आव्हान स्वीकारतो. सामन्याची वेळ सहा दिवसानंतरची राहील आणि त्याचे स्थळ किल्ल्यातील न्याय-मंदिर हे असेल. शिलेदारांची जी शस्त्रे नेहमी असतात तीच—भाला, ढाल, संरक्षणाचे चिलखत इत्यादी—वापरली जातील. ती वापरताना, फसवेगिरी, वशिलेबाजी किंवा जादूटोणा केला जाणार नाही. रणक्षेत्रावरील न्यायाधीश सामनेवाल्यांच्या झडत्या घेतील."

ड्यूकने आणखी असे सांगितले, "पहिली गोष्ट ही होणे अवश्य आहे की, या सच्च्या सोबतिणीने नि या लुच्च्या कुमारिकेने आपले न्याय्य कार्य आपल्या कैवाऱ्याच्या हाती सोपविले पाहिजे नाही तर काहीही केले जाणार नाही आणि हे आव्हान फोल ठरेल." प्रौढेने उत्तर दिले, "मी माझ्या कार्यातील न्याय यांच्यावर सोपवते." मुलीनेही पुष्टी दिली, "मीही तसेच करते." तेव्हा ती अगदी लाजली होती आणि ती आक्रोशाच्या स्वरात बोलत होती. सारी पूर्वतयारी झाली आणि या प्रकरणी काय करावयाचे याचा निश्चय ड्यूकने आपल्या मनाशी केला. शोक करीत आलेले अर्जदार परत गेले. त्यांना आपल्या घरातील माणसे म्हणून यापुढे कोणी मानू नये, तर न्याय मागण्यासाठी या किल्ल्यात आलेल्या त्या महिला आहेत असे समजावे अशी आज्ञा डचेसने केली. त्यामुळे त्यांच्यासाठी निराळी खोली देण्यात आली आणि पाहुण्याप्रमाणे त्यांची तरतूद करण्यात आली. त्यामुळे इतर सेवकांना मोठे आश्चर्य वाटले. डोना रोड्रिगेझ आणि प्रियकराने सोडलेली तिची मुलगी यांचा शेवट काय होणार याची त्यांना काहीच कल्पना येईना. त्या मुलीने आपल्या अंगावर घेतलेले काम त्यांना हास्यास्पद वाटले.

यानंतर लगेच जणू काही या प्रयोगातील शेवटचा अंक म्हणून, त्या सर्व लोकांची करमणूक पूर्ण करण्यासाठी एक नोकर आत आला. टेरेसा पँझा हिच्याकडे पत्रे व भेटी नेणारा हाच तो नोकर. तो परत आल्याचे पाहून ड्यूक व डचेस यांना परमानंद झाला. त्याचा प्रवास कितपत यशस्वी झाला, हे जाणण्याची त्यांना मोठी इच्छा होती. त्याप्रमाणे त्यांनी त्याला विचारले. पण त्याने सांगितले, "आपल्याला जो वृत्तांत मला सांगावयाचा आहे, तो जाहीरपणे किंवा थोड्या शब्दात सांगता येणार नाही. म्हणून महाराजांनी तो वृत्तांत खाजगी रीतीने ऐकावा आणि त्यापूर्वी त्या पत्रांच्या वाचनाने आपली करमणूक करून घ्यावी, अशी माझी विनंती आहे." असे म्हणून त्याने दोन पत्रे बाहेर काढली

आणि ती बाईसाहेबांचे हाती दिली. एका पत्रावर लिहिले होते—

"(कोणत्या प्रदेशाच्या हे मला माहीत नाही. पण) लेडी डचेस यांचेसाठी." दुसऱ्या पत्रावर सूचना होती "बॅराटेरिया बेटाचे राज्यपाल आणि माझे यजमान सँको पँझा यांचे सेवेसी (माझ्यापेक्षा पुष्कळ वर्षे ईश्वर त्यांची भरभराट करो)" ते पत्र वाचीपर्यंत डचेसचे मन टोचत होते, म्हणून तिने ते पत्र उघडले आणि स्वतःशी भर्रकन् वाचले. त्यात गुप्त असे काहीच नाही असे आढळून आल्यामुळे तिने ते मोठ्याने वाचले. त्यामुळे सर्वांना ते ऐकता आले. पत्रात पुढील मजकूर होता—

## टेरेसा पँझाचे डचेसला पत्र

"बाईसाहेब,

"राणीसाहेबांनी मला जे पत्र पाठविले, त्यामुळे मला प्रचंड आनंद झाला. कारण, अशाच पत्राची वाट मी अंतःकरणापासून खरोखर पहात होते. पोवळ्याची माळ चांगली आहे आणि माझ्या नवऱ्याचा शिकारी वेष तितकाच चांगला आहे. आपण माझ्या पतीला राज्यपाल केले यामुळे आमच्या गावातील सर्व लोकांना फार आनंद झाला आहे. ते आपल्या कृपेचे मोठे फळ आहे, असे ते मानतात. पण त्यावर कोणाचाही विश्वास बसत नाही- विशेषत: आमचा पाद्री, न्हावी, मास्टर निकोलस आणि पंडित सॅम्सन कॅरॅस्को यांचा तर मुळीच विश्वास बसत नाही. पण त्यांचा विश्वास बसो वा न बसो, मला त्याची पर्वा काय? ते खरेच आहे- मग कोणीही काहीही बडबडो! खोटे बोलणे हे मूर्खपणाचे असते. मीही त्यावर विश्वास ठेवला नसता पण पोवळ्याची माळ आणि शिकारी वेष यामुळे माझा विश्वास बसला. येथील प्रत्येक माणसाला वाटते, माझा नवरा मठ्ठ आहे आणि मेंढ्यांच्या कळपावरच राज्य करण्यास लायक आहे. ठीक आहे, ईश्वर त्याला मार्गदर्शन करो आणि तो जशी आपल्या मुलांची काळजी घेतो तशी ईश्वर त्याची घेवो. माझ्यासंबंधी म्हणाल तर, राणीसाहेब, आपल्या कृपेने मी असे ठरविले आहे की, जोवर तवा तापला आहे, तोवर पोळी भाजून घ्यावी- एखाद्या चांगल्या गाडीत लोळत लोळत दरबारात जावे आणि पूर्वीपासून माझा द्वेष करणाऱ्या लोकांचे डोळे आश्चर्याने बाहेर पडू द्यावेत. पाठीमागे निंदा करणाऱ्या अशा लोकांचे टोळके मोठे आहे. म्हणून राणीसाहेब, मी आपल्याला प्रार्थना करते की, मला द्रव्याचा मोठा हंडा पाठविण्याविषयी आपण माझ्या नवऱ्याला हुकूम द्यावा. कारण, दरबारात राहणे फार खर्चाचे असते असे मला वाटते. एका पावाच्या लहानशा तुकड्यासाठी तेथे सहा पेन्स द्यावे लागतात. आणि अच्छेर मांसासाठी तीस नाणी मोजावी लागतात, हे ऐकून कोणीही चकितच होईल. मी तिकडे यावे असे माझ्या नवऱ्याला वाटत नसेल, तर त्याने मला वेळीच तसा निरोप पाठवावा. माझे पाय तिकडे जाण्यास वळवळत आहेत. माझे शेजारी-पाजारी मला सांगतात की, जर मी आणि माझी मुलगी दरबारात गेलो- आणि आम्ही गेले पाहिजे- त्वरेने आणि चलाखीने गेलो—तर माझ्या नवऱ्यामुळे मला जितकी प्रसिद्धी मिळेल, त्यापेक्षा माझ्यामुळे त्याला अधिक प्रसिद्धी मिळेल. कारण,

पुष्कळ माणसांना असा प्रश्न विचारल्याशिवाय राहावत नाही, " या गाडीत कोणत्या स्त्रिया आहेत ? " मग माझ्या सेवकांपैकी एकजण उत्तर देईल, " बॅराटेरिया बेटाचे राज्यपाल सँको पँझा यांच्या पत्नी व कन्या गाडीत आहेत. " अशा प्रकारे माझ्या नवऱ्याला प्रसिद्धी लाभेल आणि मला सर्वत्र सन्मान मिळेल. जसे रोम शहर सर्व जगात श्रेष्ठ, तसे आम्ही सर्वजण श्रेष्ठ ठरू.

" या वर्षी आम्ही ओक फळे गोळा केली नाहीत याचा मला किती खेद वाटतो, हे आपल्या लक्षात येणार नाही. तथापि एक एक फळ तोडून जेवढा साठा मी केला आहे, तो सर्व मी राणीसाहेबांकडे पाठवीत आहे. त्यासाठी मी मुद्दाम डोंगरावर गेले आणि सर्वांत मोठी फळे काढून आणली. ती शहामृगाच्या अंड्याएवढी मोठी असावयास हवी होती, अशी माझी इच्छा आहे.

" आपल्या ऐश्वर्यामुळे आपण मला पत्र लिहिण्यास विसरू नये अशी माझी प्रार्थना आहे. मी आपल्याला उत्तर पाठवीन आणि माझे कसे काय चालले आहे हे आपल्याला कळवीन हे खचित. आमच्या खेड्यातील साऱ्या बातम्या मी आपल्याला कळवीन. राणीसाहेबांचे रक्षण प्रभूने करावे आणि मला त्यांनी विसरू नये अशी प्रार्थना करीत मी या खेड्यात वाट पहात बसले आहे. माझी मुलगी सँकिका आणि माझा मुलगा हे राणीसाहेबांच्या हाताचे चुंबन घेत आहेत.

" आपल्याला पत्र लिहिण्यापेक्षा आपली प्रत्यक्ष भेट घेण्याची इच्छा करणारी

आपली सेविका,

" टेरेसा पँझा. "

या पत्राने त्या सर्व मंडळींची—त्यातही ड्यूक व डचेस यांची–मोठी करमणूक केली. नंतर डचेसने डॉन क्विक्झोट यांना विचारले, " राज्यपालाचे पत्र उघडणे चुकीचे होईल काय ? ते पत्र फार चांगले असेल अशी माझी कल्पना आहे. " शिलेदारजींनी तिला सांगितले, " आपली जिज्ञासा पूर्ण करण्यासाठी मी हे पत्र उघडतो. " तसे त्यांनी केल्यावर त्यांना त्या पत्रात पुढील मजकूर आढळला––

## टेरेसा पँझाचे आपला पती सँको पँझा याला पत्र

" माझ्या लाडक्या, मधुर सँको, मला तुझे पत्र मिळाले. ते वाचून मला आनंदाने वेड लागण्याची पाळी आली, हे मी तुला शपथ घेऊन सांगते. कारण, मी कॅथॉलिक ख्रिश्चन आहे. माझ्या प्रियकरा, तू राज्यपाल झालास हे जेव्हां कानी पडले, तेव्हा मला इतका हर्ष झाला की, केवळ आनंदाच्या भरात मी मरून जमिनीवर पडले असते. कारण तुला माहीतच आहे की, मोठ्या दुःखाप्रमाणेच आकस्मिक आनंदही मृत्यूला कारणीभूत होतो. तुझी मुलगी सँकिका हिने केवळ आनंदामुळे चोहोबाजूस पाण्याचा सडा घातला. नंतर तिला काय झाले हे कळले. तू पाठवलेला वेष माझ्या डोळ्यासमोर होता, लेडी डचेसनी पाठवलेली पोवळ्याची माळ माझ्या मनात होती आणि तुझे पत्र माझ्या हातात होते, ते ज्याने आणले, तो माझ्याजवळ उभा होता. या सर्व प्रकारामुळे

मला असे वाटले की, मी जे पहात आहे, अनुभवीत आहे, ते सारे स्वप्न आहे. एक धनगर कधी काळी बेटाचा राज्यपाल होईल असे कोणाला वाटले असेल ? पण माझी आई म्हणत असे, 'जो मोठमोठी स्वप्ने पहातो, तो मोठे जीवन जगतो.' हे मी सांगते याचे कारण असे की, मी जर दीर्घकाळ जगले, तर आणखी मोठमोठ्या गोष्टी मला पहावयास मिळतील. जकात घेणारा अधिकारी किंवा शेतकरी झालेल्या तुला पाहिल्या-शिवाय मी कधीही स्वस्थ बसणार नाही. त्या कामामुळे पुष्कळ लोक सैतानाकडे जात असले तरी, त्याच्यामुळेच जात्याला दळण मिळते, दरबारात येण्याची मला किती तीव्र इच्छा आहे, हे डचेसबाईसाहेब तुला सांगतील, त्याचा तू कृपया विचार कर आणि तुझ्या मनात काय आहे, ते मला कळव. गाडीतून तेथे येऊन तुझे भूषण होऊन राहावे अशी माझी इच्छा आहे.

" तू राज्यपाल आहेस, यावर पाद्री, न्हावी, पंडित किंवा चर्चचा नोकर यांचा विश्वास बसत नाही. ते म्हणतात, तुझा धनी डॉन क्विक्झोट यांच्या सर्व कार्याप्रमाणेच हेही कार्य जादूने किंवा हातचलाखीने झालेले असावे. सॅम्सनने तर अशी धमकी दिली आहे की, मी सँकोला शोधून काढतो आणि राज्याचे हे वेड त्याच्या डोक्यातून काढून टाकतो–तसेच डॉन क्विक्झोट यांच्या शिरपेचातला मूर्खपणा बाहेर काढतो. मी त्यांच्या-कडे पाहून फक्त हसते आणि माझ्या पोवळ्याच्या माळेकडे पहात बसते आणि विचार करते की, तू पाठविलेल्या पोशाखातून तुझ्या मुलीसाठी झगा कसा तयार करता येईल.

" लेडी डचेस यांना मी काही ओक फळे पाठविली. ती घडीव सोन्याची असती तर किती बरे झाले असते ! तुझ्या बेटात मोत्यांच्या माळा घालण्याची रूढी असेल तर मला काही माळा पाठव.

" येथे अशी बातमी आहे की, बेरेयुकाने आपल्या मुलीचे लग्न एका दुःखी चित्रकाराशी लावले आहे. कोणतेही चित्र मी काढतो अशी थाप मारून तो येथे आला. नागरिकांनी त्याला नगर–भवनावर राजमुद्रा–चिन्हाची चित्रे काढण्याचे काम दिले. त्याने या कामासाठी दोन डयूकॅट मागितले. ते त्यांनी त्याला दिले. तेव्हा तो कामास लागला. आठ दिवस तो भिंती चिताडीत होता, पण शेवटी त्याच्या हातून काहीच काम झाले नाही. तो म्हणाला, असे क्षुद्र काम मला करता येणार नाही आणि त्याने त्यांना त्यांचे पैसे परत दिले. पण एक कसबी माणूस म्हणून त्याचे नाव झाले आणि त्यामुळे त्याचे लग्न झाले. खरी गोष्ट अशी आहे की, त्याने आता आपल्या हातातील कुंचला टाकून कुदळ घेतली आहे आणि सभ्य गृहस्थाप्रमाणे तो शेतावर जात असतो. पेड्रो डी लोबोच्या मुलाने धर्मगुरूचा पंथ स्वीकारला आहे आणि म्हणून आपले डोके तासून घेतले आहे. मिंगो सल्व्हाटोची नात मिंगिल्ला हिला हे कळले आणि तिने त्याला लग्नाचे वचन देण्याची विनंती केली. त्याच्यापासून ती गरोदर झाली आहे असे म्हणण्यास दुष्ट लोकांच्या जिभा कचरत नाहीत. पण तो या गोष्टीचा कडकडून इन्कार करतो. या वर्षी आपल्याला एकही ऑलिव्ह फळ मिळणार नाही आणि दारूचा एक थेंबही कोणी

प्रेमामुळे किंवा पैशामुळे देणार नाही. सैनिकांची एक तुकडी या गावातून गेली आणि जाताना तिने येथील तीन पोरी आपल्याबरोबर नेल्या. त्यांची नावे मी तुला सांगत नाही. कारण, कदाचित त्या परत येतील आणि त्या भल्या–बुऱ्या कशाही असल्या तरी त्यांच्याशी लग्न लावण्यास तरुणांची वाण पडणार नाही. सॅंकिका भरतकाम करते आणि दररोज तीन हाफ–पेन्स पुरे मिळविते. ते पैसे ती एका फट असलेल्या पेटीत ठेवते. त्यातून प्रपंचाला लागणाऱ्या वस्तू आम्ही विकत आणतो. पण आता ती राज्यपालाची मुलगी आहे, म्हणून तिने काम करण्याची काही गरज नाही. तू तिला आपल्या प्राप्तीचा काही भाग देशील. बाजारातील ओढा आटून गेला आहे. अलीकडे दिव्याच्या खांबावर वीज पडली. या माझ्या पत्राला तू उत्तर देशील आणि मी दरबारात येण्यासंबंधी आपला निश्चय कळविशील अशी मला अपेक्षा आहे. प्रभूने तुला दीर्घायुष्य द्यावे–माझ्यापेक्षा अधिक, निदान माझ्याइतके–दीर्घ आयुष्य द्यावे. कारण, मी तुला या जगात माझ्या पाठीमागे खुशीने ठेवणार नाही.

" तुझी बायको,
" टेरेसा पॅंझा."

या पत्रांची मोठी चहा झाली. त्यामुळे खूप हशा पिकला आणि सर्वांची करमणूक झाली. तो आनंद पूर्ण करण्यासाठीच की काय, याचवेळी डॉन क्विक्झोट यांना सॅंकोने लिहिलेले उत्तर घेऊन दूत परत आला. ते उत्तरही जाहीरपणे वाचले गेले. राज्यपाल वेडा आहे असे ज्यांना वाटत होते, ते सर्व श्रोते दचकले ! नंतर डचेस तेथून आत गेली. सॅंकोच्या खेड्यापर्यंत आपण केलेल्या प्रवासासंबंधी त्या नोकराला काय सांगावयाचे आहे हे तिला समजावून घ्यावयाचे होते. त्या प्रवासाचा सारा वृत्तांत, अणुमात्र न वगळता, त्याने तिला सांगितला. टेरेसाने दिलेली ओकफळे आणि चीज त्याने डचेसकडे दिली. ट्रॅचिअनमधील फळांपेक्षा ही चांगली होती. त्यांचा स्वीकार डचेसने कृतज्ञतेने केला. आता आपण तिला तेथेच सोडू या आणि बेटावरील सर्व राज्यपालांचा आदर्श असणारा महापुरुष सॅंको पॅंझा याच्या राज्यकारभाराची परिसमाप्ती कशी झाली हे पाहू या.



प्रकरण ५३

## सँको पँझाच्या राज्य-कारभाराची कष्टप्रद समाप्ती आणि समारोप

आयुष्यातील गोष्टी नेहमी एकाच स्थितीत राहतील, असे मानणे ही चुकीची कल्पना आहे. वस्तुमात्राचे स्वरूप सतत बदलत असते आणि चक्रक्रमाने फिरत असते. वसंतामागोमाग ग्रीष्म येतो, ग्रीष्मामागोमाग शरद येतो. शरदामागोमाग शिशिर आणि नंतर पुन्हा वसंत– असे काळाचे हे रहाट–गाडगे सतत चालू असते. फक्त मानवी जीवन, कालापेक्षाही अधिक त्वरेने, आपल्या अंताकडे धाव घेत असते. ते पुन्हा परत येण्याची आशा नसते. असीम व अनंत आशा असल्या तर पुढील जन्माचीच काय ती आशा असते. मुसलमान तत्त्वज्ञ सिड् हॅमेट याचे म्हणणे असे आहे. मानवाच्या या जीविताची अस्थिरता आणि गतिमानता यांचा शोध केवळ निसर्गाच्या प्रकाशात– श्रद्धेच्या प्रकाशाशिवायदेखील– मानवाला लागलेला आहे. भविष्यकालाचा अवधि अनंत आहे, असे मानले जाते. आपल्या ग्रंथकाराचा हा नैतिक विचार पूर्णार्थाने कोणी स्वीकारावा असे समजण्याचे कारण नाही. त्याला त्यावरून एवढेच दाखवावयाचे होते की, सँकोचे भाग्य किती अशाश्वत आहे– एखाद्या स्वप्नाप्रमाणे ते किती लौकर लुप्त झाले आणि आपल्या उच्च पदावरून तो आपल्या पूर्वीच्या खालच्या स्थानावर परत कसा आला.

इतके दिवस राज्यकारभार केल्यानंतर राज्यपाल विसावा घेण्यास जेव्हा टेकले, ती सातवी रात्र होती. पाव व दारू यांनी त्यांची तृप्ती झाली नसली तरी खटले ऐकण्याचा, शिक्षा ठोठावण्याचा, कायदे करण्याचा आणि हुकूम व जाहीरनामे काढण्याचा त्याला वीट आला होता. जागेपणी भुकेच्या ग्लानीमुळे त्याचे डोळे मिटू लागत, पण त्याला झोप क्वचितच येई. एकदा अशीच झोप लागली असताना एकाएकी घंटांचा आणि अत्यंत भीषण आरडाओरडीचा मोठा आवाज त्याचे कानी पडला– जणू काही सारे बेट बुडत होते. तो एकदम दचकून आपल्या बिछान्यात उठून बसला आणि या गोंगाटाचा आपल्याशी काही संबंध आहे का हे जाणण्यासाठी तो मोठ्या दक्षतेने ऐकू लागला. अशा प्रकारे त्या अंधारात तो कान देऊन ऐकत असताना असंख्य नगारे व तुताऱ्या यांचे आवाज, घंटा व आक्रोश यांच्या गोंगाटात, मिसळले. त्यामुळे त्याला मोठा धोका वाटला. त्याची भीती आणि धास्ती वाढली आणि त्याची अगदी गाळण उडाली. तेव्हा

त्याने बिछान्यातून उडी मारली आणि आपल्या पायात चढाव घातले. जमीन ओलसर होती. त्याच्या अंगावर सदऱ्याशिवाय दुसरे काही नव्हते. त्याने धावत जाऊन खोलीचे दार उघडले. तेव्हा एका हातात पेटते पलिते आणि दुसऱ्या हातात नंग्या समशेरी घेऊन सुमारे वीस माणसे गॅलरीतून येताना त्याला दिसली. ती माणसे ओरडत होती, " राज्यपालसाहेब, शस्त्रे घ्या, शस्त्रे घ्या, शत्रूंचा लोंढा बेटात शिरला आहे. आता आपला पराक्रम आणि आपले कौशल्य यांनी आम्हाला या संकटातून मुक्त केले नाही तर आम्ही सारे खलास झालो!" अशा प्रकारे आरडाओरडा करीत आणि मोठ्या त्वेषाने व स्वैरपणाने इकडे तिकडे धावत ते सर्वजण दारापाशी आले. तेथे सँको आपले भान हरपून व भयभीत होऊन उभा होता. त्या लोकांपैकी एकजण ओरडला, " महाराज, शस्त्रे घ्या, याचक्षणी शस्त्रे घ्या. या सर्व बेटासह आपला सत्यानाश व्हावा असे आपल्याला वाटत नसेल, तर हातात शस्त्रे घ्या." सँको म्हणाला, " अरे, मी शस्त्रे का घेऊ? मला शस्त्रांची किंवा लढायांची काही माहिती आहे का? त्यापेक्षा तुम्ही माझा धनी डॉन क्विक्झोट यांना का बोलावीत नाही? ते तुमच्या शत्रूंना क्षणार्धात पिटाळून लावतील. हाय! हाय! मी केवढा पापी! मला या घाईगर्दीतले काहीच कळत नाही." दुसरा म्हणाला, " राज्यपालसाहेब, केवढी शरमेची गोष्ट आहे ही! आपल्या मनाचा केवढा हा कमकुवतपणा! हे पहा, आम्ही आपल्यासाठी चढाईची नि बचावाची शस्त्रे येथे आणली आहेत. ती आपण धारण करून बाजाराकडे चालू लागा. आपण आमचे नेते व सेनापती आहा– म्हणून तसेच वागा आणि आपण राज्यपाल असल्याचे जगाला दाखवा."

सँको म्हणाला, " असे का? मग आणा ती शस्त्रे, चढवा माझ्या अंगावर, दैव माझ्या पाठीशी असो!" तेव्हा त्यांनी त्याच्यासाठी दोन मोठमोठ्या ढाली आणल्या. त्या त्यांच्याजवळ पूर्वीच होत्या. त्याने आपल्या अंगावर इतर कपडे घालण्यापूर्वी त्यांनी त्याच्या सदऱ्यावर त्या ढाली बांधल्या. एक ढाल त्याच्या पाठीवर आणि दुसरी त्याच्या छातीवर. त्यात मुद्दाम केलेल्या भोकामध्ये त्याची हत्यारे ठेवलेली होती. त्या ढाली दोरानी जितक्या घट्ट बांधता येतील तितक्या घट्ट बांधल्या असल्यामुळे बिचारा राज्यपाल अडकला गेला आणि एखाद्या बाणाप्रमाणे ताठपणे कैदी झाला. त्याला आपले गुडघे वाकविता येईनात की एक पाऊल टाकता येईना. टेकण्यासाठी आणि ताठ उभे राहण्यासाठी त्यांनी त्याच्या हातात एक भाला दिला. आता त्याने कूच करावे, आपले नेतृत्व करावे, आपल्यामध्ये चैतन्य निर्माण करावे, अशी त्यांची इच्छा होती. ते त्याला म्हणाले, " आपण आमचे सेनापती असल्यामुळे आम्हाला विजयाविषयी शंका नाही." सँको म्हणाला, " मी कूच करू? अहो, मी आवळलो गेलो आहे. तेव्हा मी कूच करू शकेन असे तुम्हाला कसे वाटते? हे पट्टे मला इतके घट्ट बांधलेले आहेत की, मी गुडघ्याचे सांधे वाकवू शकत नाही. तुम्ही मला आपल्या हातातून नेले पाहिजे आणि एखाद्या जागेवर मला ठेवले पाहिजे किंवा उभे केले पाहिजे. मग मी या भाल्याने किंवा

माझ्या देहाने तो जमिनीचा तुकडा धन्य करीन." दुसरा माणूस म्हणाला, "धिक्कार असो तुम्हाला राज्यपालसाहेब ! आपले पाय ताठ झाले आहेत व त्यामुळे आपल्याला हालण्यास अडथळा येतो, त्याचे कारण आपली शस्त्रे नसून आपली भीती हे आहे. अहो, उशीर होत आहे. शत्रू बळावत आहे आणि संकट आपल्यावर कोसळत आहे. म्हणून चला, चला, पुढे चला." अशा तऱ्हेने आग्रह व निंदा झाल्यावर त्या बिचाऱ्या राज्यपालाने पुढे जाण्याचा प्रयत्न केला. त्यासाठी एक हालचाल करताच त्याने जमिनी-वर लोटांगण घातले, ते इतक्या जोराने की, त्याला वाटले, आपल्या साऱ्या हाडांचा चुराडा झाला. आपल्या कवचामध्ये एखादा मोठा कासव असावा किंवा दोन फळ्यामध्ये डुकराच्या मांसाचा तुकडा सापडावा अथवा एखादी होडी उलटीपालटी होऊन तिचा कणा वर यावा त्याप्रमाणे तो तेथे जमिनीवर पडला. तो पडला असताना त्याच्याविषयी अणुमात्र अनुकंपा त्या थट्टेखोर सोबत्यांना वाटली नाही. उलट, त्यांनी दिवे मालविले आणि भयंकर गोंगाट केला व आपल्या तलवारींचा खणखणाट चालू केला, एवढेच नव्हे तर, त्या बिचाऱ्या राज्यपालाच्या शरीरावर ते थयथया नाचले आणि त्यांनी त्याच्या ढालीवर आपल्या तलवारी त्वेषाने आपटल्या. त्या ढालीमध्ये आपले डोके लपवून त्याने जर आपला बचाव केला नसता तर त्याची मोठी दुर्दशा झाली असती.

त्या आपल्या छोट्या कवचामध्ये सँको आवळला गेला होता आणि भीषण भीतीने ग्रासलेला होता. घाबरल्यामुळे त्याच्या अंगातून घाम वाहू लागला. तो अंतः-करणातून परमेश्वराची प्रार्थना करू लागला, "हे प्रभो, बेटाचा राज्यकारभार करण्याच्या या खराब धंद्यातून मला मुक्त कर." काही माणसांनी त्याला लाथा मारल्या, काहीजण त्याच्यावर अडखळून पडले आणि एकजण तर त्याच्यावर उडी मारून काही काळ उभा राहिला आणि टेहेळणीच्या बुरुजावर उभ्या राहिलेल्या सेनापतीप्रमाणे आपल्या सैनिकांना उत्तेजन देऊ लागला व हुकूम सोडू लागला. तो गरजला, "ऐका, तरुणांनो ऐका, शत्रूचा मारा या बाजूने जोराने होत आहे, त्याने पाडलेले खिंडार बुजवून टाका, तो दरवाजा ताब्यात घ्या, भिंतीला लावलेल्या त्या शिड्या खाली ओढा, आगीचे गोळे आणा, उकळते डांबर, राळ आणि तेल यांची भांडी आणा, तुम्ही खंदकात बसा, उशा–गाद्या–रजया टाकून रस्ते अडवा." सारांश, त्याने कृतांताची सारी आयुधे बोलाविली. तसेच वेढा घातलेल्या आणि सुरुंग लावलेल्या शहराचे रक्षण करण्यासाठी जी यंत्रे लागतात तीही त्याने बोलाविली. सँकोला फार ओरखडे निघाले होते तरी तो शांतपणे आणि निमूटपणे सारे सहन करीत होता. तो आपल्या मनात म्हणत होता, "देव करो आणि हे बेट जिंकले जावो किंवा मला मृत्यू येवो अथवा या संकटाच्या राशीतून मी बाहेर पडो."

शेवटी प्रभूने त्याची प्रार्थना ऐकली. त्याच्या ध्यानी-मनी नसताना त्याच्या कानी त्यांचा ओरडा ऐकू आला. "फत्ते ! फत्ते ! गनिमाला पिटाळून लावले. आता राज्यपालसाहेब, उठा, चला आणि विजयाची फळे चाखा. आपल्या अजिंक्य शस्त्रांच्या पराक्रमामुळे

गनिमाकडून आपण जी लूट मिळविली आहे, तिची वाटणी करा. " सँको खिन्न स्वराने म्हणाला, " अरे, मला उठवा रे. " त्यांनी त्याला पायावर उभे केले. तेव्हा तो म्हणाला, " मी पिटाळून लावलेल्या साऱ्या गनिमांना माझ्या कपाळावर खिळे ठोकून खिळवून टाका. गनिमाच्या कोणत्याही लुटीची वाटणी मी करणार नाही. येथे माझा जर एखादा मित्र असेल तर त्याने मला शांत करण्यासाठी दारूचा एक घोट द्यावा आणि घामाने माझे जे शरीर डबडबलेले आहे ते कोरडे करण्याच्या कामी मला मदत करावी, एवढीच माझी विनंती आहे. माझ्या साऱ्या शरीरावर पाणीच पाणी झालेले आहे. " तेव्हा त्यांनी त्याचे अंग पुसले, त्याला दारू दिली आणि त्याच्या ढाली काढून घेतल्या नंतर तो बिछान्यावर बसला असताना, काहीशा भीतीने आणि त्याने सोसलेल्या काहीशा कष्टाने, तो मूर्च्छित होऊन पडला. ते पाहून ज्यांनी हा प्रयोग उभा केला होता, त्यांना आपण अतिरेक केला असे वाटून पश्चात्ताप होऊ लागला. पण थोड्याच वेळाने सँको आपल्या मूर्च्छेतून आणि ते आपल्या अस्वस्थतेतून उठले. शुद्धीवर येताच त्याने विचारले, " किती वाजले ?" त्यांनी उत्तर दिले, " आता उजाडले आहे." तो काहीच बोलला नाही. चकार शब्द न काढता तो आपले कपडे अंगावर घालू लागला. तो हे करीत असताना गंभीरपणे गप्प बसला होता. साऱ्या मंडळींचे डोळे त्याच्यावर रोखले होते. कपडे घालण्याची घाई तो इतकी का करीत आहे याचे त्यांना नवल वाटत होते.

शेवटी त्याने आपले कपडे चढविण्याचे काम पूर्ण केले आणि हळूहळू तो चालू लागला, ( तो इतका ओरबाडला गेला होता की, त्याला जलद चालणे अशक्य होते. ) तो तबेल्यात गेला. त्याच्या पाठोपाठ सारी मंडळी गेली. डॅपलपाशी जाऊन त्याने त्या मूक प्राण्याला मिठी मारली आणि त्याच्या कपाळाचे प्रेमाने चुंबन घेतले. डोळ्यांत अश्रू आणून तो म्हणाला, " अरे माझ्या विश्वासू मित्रा, इकडे ये. माझ्या प्रवासाचा आणि दुःखांचा तू भागीदार आहेस. जेव्हा तू नि मी एकत्र आलो तेव्हा तुझे सामानसुमान दुरुस्त करणे आणि तुझ्या छोट्याशा सांगाड्यात अन्न भरणे एवढीच काळजी मला घ्यावी लागत होती. त्यावेळचे माझे दिवस, माझे महिने आणि वर्षे सुखाची होती. पण मी जेव्हा तुला सोडले आणि महत्त्वाकांक्षेच्या आणि अभिमानाच्या मनोऱ्यावर मी चढलो, तेव्हा हजारो दुःखे, हजारो यातना आणि चार हजार कष्ट यांनी माझ्या जीवाला झपाटून टाकले – सतावून सोडले. "

अशा तऱ्हेने बोलत असताना त्याने गाढवाच्या पाठीवर खोगीर चढविले. कोणीही त्याच्याशी बोलण्याची इच्छा दाखविली नाही. ही तयारी झाल्यावर मोठ्या कष्टाने सँको आपल्या गाढवावर स्वार झाला. नंतर तो कारभारी, तो सचिव, तो सेवक, तो डॉ. पेड्रो रेझिओ आणि तेथे असलेली इतर माणसे यांना उद्देशून तो म्हणाला, " सद्गृहस्थहो, वाट मोकळी सोडा. मला माझ्या पूर्वीच्या स्वतंत्र जीवनाकडे परत जाऊ द्या. मी येथून गेलो म्हणजे माझ्या आयुष्याची जुनी रहाटी मी सुरू करीन आणि येथे मला जिवंत पुरणाऱ्या मृत्यूतून मी पुन्हा उठेन. राज्यपाल होण्यासाठी– बेटांचा

किंवा गावांचा बचाव त्यावर तुटून पडणाऱ्या शत्रूपासून करण्यासाठी– मी जन्माला आलेलो नाही. जमीन खणण्या–नांगरण्याला काय लागते, द्राक्षाचे मळे फुलविण्यासाठी व कापण्यासाठी काय लागते याचे मला ज्ञान आहे – कायदे करण्याचे आणि देशांचे व राज्यांचे रक्षण करण्याचे ज्ञान मला नाही. सेंट पीटर रोममध्येच शोभून दिसतो. याचा अर्थ असा की, आपण ज्या व्यवसायासाठी जन्माला आलो त्यालाच प्रत्येकाने चिकटून असावे. राज्यपालाच्या राजदंडापेक्षा माझ्या हातात कुदळच अधिक काम करील. मला उपाशी ठेवून ठार मारणाऱ्या एखाद्या शिष्ट वैद्याच्या कृपेवर अवलंबून राहण्यापेक्षा साध्या खिचडीने पोट भरणे मला अधिक आवडेल. उन्हाळ्याच्या दिवसात ओक वृक्षाच्या सावलीखाली बसणे किंवा थंडीच्या दिवसात माझ्या इच्छेस येईल तेव्हा मेंढ्यांच्या दुहेरी केसाळ चामड्यात लपेटून बसणे हे मला आरामाचे वाटेल. उंची उंची लोकरी कापडामध्ये आणि तलम वस्त्रामध्ये माझे शरीर झाकून मी राज्याची गुलामगिरी सोशीत रहाणे मला नको आहे. सभ्य लोकहो, ईश्वर तुमचे कल्याण करो ! ड्यूकसाहेबांना माझा संदेश कृपया सांगा, मी नागवा जन्मलो आणि आता नागवाच आहे. मी काही कमावले नाही की गमावले नाही. याचा अर्थ असा की, मी या राज्यात पै न घेता आलो आणि पै न घेता येथून चाललो आहे. बेटाचे राज्यपाल जेव्हा येथून जातात तेव्हा त्यांच्याजवळ गडगंज संपत्ती असते, त्याच्या उलट माझे वागणे आहे. म्हणून माझा मार्ग मोकळा करा आणि मला जाऊ द्या. साध्या दफनाच्या कापडात मी माझे सारे शरीर गुंडाळून घेतले पाहिजे. कारण आता माझी एक तरी बरगडी शाबूत आहे असे मला वाटत नाही. ज्या गनिमांनी माझे शरीर रात्रभर तुडविले त्यांना धन्यवाद असोत. ''

डॉ. रेझिओ म्हणाला, '' राज्यपालसाहेब, असे होता कामा नये. मी महाराजांना एक औषधी पेय देतो. जमिनीवर पडणे, हाडे निखळणे, ओरखडे निघणे आणि इतर सर्व प्रकारच्या दुखापती यांच्यावर ते वस्ताद औषध आहे. ते घेतले की आपले पूर्वीचे आरोग्य आणि सामर्थ्य पुन्हा प्राप्त होईल. आपल्या आहारासंबंधी म्हणाल तर मी जेवणाचा एक नवाच प्रकार आखून देण्याचे वचन देतो. आपल्या इच्छेस येतील ते पदार्थ आपण भरपूर खावेत. '' सँकोने उत्तर दिले, '' डॉक्टरसाहेब, फार उशीर झाला. मला जाण्यास अडथळा करण्यापेक्षा एक वेळ मला तुम्ही तुर्क बनवू शकाल. छे ! छे ! या लबाड्या आता पुन्हा माझ्यापुढे चालणार नाहीत. मला येथे ठेवून घेणे किंवा राज्यकारभाराचा आस्वाद घेण्यासाठी झाकलेल्या बशीतून पक्वान्न वाढून आणणे, यापेक्षा तुम्ही मला पंखाशिवाय अस्मानात उड्डाण करावयास लौकर लावाल. मी त्या राज्याचा आस्वाद पुन्हा कधीही घेणार नाही. माझ्या अंगात पँझाचे रक्त खेळत आहे. आम्ही सारेजण प्रबळ इच्छेचे आणि ठाम मताचे लोक आहो. आम्ही एखादी गोष्ट विचित्र आहे असे म्हटले आणि ती सरळ असली व सारी मानवजात तसे म्हणत असली तरी आम्ही तिला विचित्रच म्हणणार. चला तर. या घुंगुरव्याला या तबेल्यात आपले पंख टाकून जाऊ द्या. या पंखांनीच त्याला अस्मानात उचलून नेले आणि ससाण्या – चिमण्यांचे

बळी बनविले. आता मला हळूहळू सरळ मार्गाने पुनः सपाट जमिनीवर येऊ द्या. तेथे मला कोर्डोबामध्ये तयार झालेले उत्तम चामड्याचे रंगीत बूट वापरावयास मिळाले नाहीत, तरी गरीब लोक वापरतात तसल्या सपातांची जोडी माझ्या पायांना मिळण्यास अडचण पडणार नाही. प्रत्येक मेंढीने आपल्या जोडीदाराकडे जावे. चांभाराने आपल्या मर्यादेबाहेरचा उद्योग करू नये. म्हणून मला जाऊ द्या. उशीर झाला आहे. ''

कारभारी म्हणाला, '' राज्यपालसाहेब, महाराजांचा वियोग होणार म्हणून आम्हाला दुःख होत असले तरी, आणि आपले चातुर्य व ख्रिस्ती माणसाला शोभेसे वर्तन यामुळे आपल्या सहवासाचा लोभ आम्हाला कितीही होत असला तरी, आम्ही आपल्याला आपल्या मनाविरुद्ध थांबवून घेण्याचा प्रयत्न करणार नाही; पण महाराज, आपल्याला हे माहीत आहेच की, जेव्हा एखादा राज्यपाल आपण शासन केलेला प्रदेश सोडून जातो तेव्हा त्याला आपल्या कारभाराचा वृत्तांत देणे भाग असते. म्हणून आपण जे दहा दिवस ( वास्तविक सात दिवस ) आमच्यामध्ये होता, त्या काळातील कार-भाराचा वृत्तांत आपण कृपया द्यावा. मग आपल्याला शांति लाभो ! '' सँकोने उत्तर दिले. '' माझ्या कारभाराचा जाब मागण्याचा अधिकार कोणाही माणसाला नाही. त्यासाठी ड्यूकसाहेबांनी कोणाची नेमणूक केली असेल, तर गोष्ट निराळी. पण मी आता त्यांच्या-कडेच जात आहे, अन् त्यांनाच मी सरळ साद्यंत वृत्तांत देईन. आणि खरे म्हटले तर मी इतक्या मोकळ्या हातांनी जात आहे की, या बेटावर देवदूताप्रमाणे मी राज्य केले, याचा दुसरा पुरावा देण्याची गरज नाही. '' डॉक्टर रेझिओ म्हणाला, '' महान् सँको बरोबर बोलत आहेत. हे सत्य आहे. आपण त्यांना जाऊ दिले पाहिजे असे माझे मत आहे. त्यांच्या भेटीचा ड्यूकसाहेबांना मोठा आनंद वाटेल हे खचित.'' तेव्हा सर्वांनी त्यांना जाऊ देण्यास संमती दिली आणि म्हटले, '' आम्ही आपल्या सेवेसाठी आपल्याबरोबर येतो आणि आपल्याला, सोय म्हणून किंवा मौज म्हणून, प्रवासात ज्या ज्या गोष्टी लागतील त्या पुरवितो. '' सँकोने त्यांना सांगितले, '' माझी इच्छा एवढीच आहे की, माझ्या गाढवासाठी थोडे दाणे आणि स्वतःसाठी अर्धा पाव व थोडे चीज आपण मला द्यावे. इतक्या लहान प्रवासात याहून दुसऱ्या गोष्टींची गरज नाही. '' नंतर त्या सर्वांनी त्याला आलिंगन दिले आणि त्याने त्या सर्वांना आलिंगन दिले. त्यावेळी त्यांच्या डोळ्यांत अश्रू आल्याशिवाय राहिले नाहीत. त्याने आपल्या संवादात आणि अढळ निश्चयात जे शहाणपण दाखविले होते, त्याचे साश्चर्य कौतुक करीत ते सर्वजण मागे राहिले.



प्रकरण ५४

## या इतिहासाशी संबद्ध अशाच गोष्टी दुसऱ्या कोणत्याही नाहीत.

डयूक व डचेस यांनी असा निश्चय केला की, आपल्या सेवकाला डॉन क्विक्झोट यांनी जे आव्हान दिले आहे ते व्यर्थ ठरू नये. डोन्ना रोड्रिगेझ ही आपली सासू होण्याचे टाळावे म्हणून तो तरुण फ्लँडर्समध्ये पळून गेला होता. त्यामुळे त्यांनी त्याच्या जागी गॅस्कनच्या एका हुजऱ्याची निवड केली आणि त्याने आपले काम कसे वठवावे याच्या सूचना त्याला दिल्या. दोन दिवसांनी डयूकने डॉन क्विक्झोट यांना सांगितले, " चार दिवसांमध्ये आपला प्रतिस्पर्धी आपल्याला रणांगणावर भेटेल. शिलेदाराप्रमाणे तो सांगोपांग सशस्त्र असेल. मी त्या मुलीला कधी लग्नाचे वचन दिले, हे म्हणणे खोटे आहे, हे तो सिद्ध करील. " या बातमीने डॉन क्विक्झोट यांना मोठा आनंद झाला. यावेळी आपण चमत्कार करून दाखवू असे ते मनात म्हणाले. आपले शौर्य नि आपले सामर्थ्य किती विशाल आहे, हे अशा थोर प्रेक्षकासमोर दाखविण्याची संधी मिळाल्यामुळे त्यांना अलौकिक सुख वाटले. या आशेने त्यांचे मन उन्नत व प्रमुदित झाले. आणि हे चार दिवस कधी संपतात, याची वाट ते पाहू लागले. अधीरतेमुळे आणि उत्सुकतेमुळे त्यांना हे चार दिवस म्हणजे चार युगे वाटली.

बरे, आता आपण त्या चार दिवसांचा निरोप घेऊ–अशा पुष्कळ गोष्टींचा आपण निरोप घेतो–आणि सँकोकडे थोडे लक्ष पुरवू. सुख–दुःखांनी त्याचे मन दुभंगलेले होते. आपल्या डॅपलवर बसून तो आपल्या धन्याकडे शक्य तितक्या लौकर चालला होता. जगातील साऱ्या बेटांच्या राज्यापेक्षा त्याला आपल्या धन्याचा सहवास अधिक मोलाचा वाटत होता. तो आपल्या बेटापासून–अथवा गावापासून ( तुम्ही त्याला कोणतेही नाव द्या. ते काय आहे याची चवकशी करण्याची तसदी त्याने कधीच घेतली नाही. )– फार दूर गेला नाही तोंच त्याला रस्त्यावर सहा यात्रेकरू भेटले. त्यांच्या हातात काठ्या होत्या. गाणी म्हणत भिक्षा मागणारे ते परदेशचे लोक असावेत. त्याच्याजवळ येताच ते एका रांगेने उभे राहिले आणि आपल्या भाषेत काही तरी गाणे म्हणत सुटले. त्यातले सँकोला काहीच कळले नाही. फक्त एकच शब्द कळला– आणि तो भिक्षेसंबंधी होता हे उघड आहे. त्यावरून त्याने ताडले की, त्यांच्या गाण्याचे ध्रुपद व हेतु दान- धर्म हाच असला पाहिजे. तो अत्यंत उदार होता, असे सिड् हमेट सांगतो. त्याने आपली चामड्याची पिशवी उघडली

आणि त्यातून अर्धा पाव व चीज काढून ते त्यांना दिले. तुम्हाला देण्यासारखे माझ्याजवळ दुसरे काही नाही, असे त्याने खुणा करून त्यांना सांगितले. त्यांनी ती भिक्षा मोठ्या आनंदाने स्वीकारली; पण तेवढ्याने संतुष्ट न होता ते आपल्या भाषेत ओरडले, ( " गेल्टे, गेल्टे " ) " पैसे, पैसे ! " सँको म्हणाला, " तुम्हाला काय पाहिजे हे मला कळत नाही. " तेव्हा त्यांच्यापैकी एकाने आपल्या वक्षःस्थळावर असलेली एक थैली बाहेर काढली आणि ती सँकोला दाखविली त्यावरून त्याने ओळखले की, त्यांना पैसे हवे आहेत. पण त्याने आपला अंगठा आपल्या तोंडावर ठेवून आणि आपल्या हाताची चार बोटे हवेत हलवून अशा अर्थाची खूण केली की, माझ्याजवळ एक पैसासुद्धा नाही.

डॅपलच्या कुशीत टाचा मारून सँकोने त्या यात्रेकरूंमधून वाट काढण्याचा प्रयत्न केला. पण तितक्यात त्याच्याकडे बारकाईने पाहात असलेल्या एका यात्रेकरूने त्याला पकडले आणि त्याच्या कमरेला विळखा घालून उत्तम स्पॅनिश भाषेत तो म्हणाला, " देव दया करो ! मी हे काय पाहात आहे ? हे शक्य आहे का ? माझा जिगरदोस्त– माझा भला शेजारी सँको पँझा– याला मी माझ्या बाहूमध्ये धरले आहे काय ? होय, होय, तोच हा असला पाहिजे. कारण मी दारू प्यालेलो नाही किंवा स्वप्नात नाही. " आपल्या नावाने कोणी हाक मारीत आहे आणि तो यात्रेकरू आपल्याला इतक्या प्रेमाने बिलगत आहे हे पाहून सँकोला आश्चर्य वाटले. एक शब्दही न बोलता तो त्याच्याकडे टक लावून पाहू लागला. बराच वेळ त्याने त्याच्या तोंडाकडे निरखून पाहिले, तरी तो कोण असावा याची त्याला काही कल्पना करता येईना. त्याचे आश्चर्य जाणून तो यात्रेकरू म्हणाला, " काय ? दोस्ता, सँको, आपला जुना स्नेही, आपल्या गावात दुकान मांडून बसलेला आपला शेजारी रिकोट दि मोरिस्को याला तू ओळखत नाहीस ? " तेव्हा सँकोने त्याच्याकडे पुनः जिज्ञासेने पाहिले आणि आठवण्याचा प्रयत्न केला. शेवटी त्याला त्याची पुरी ओळख पटली. गाढवावरून खाली न उतरता, त्याच्या गळ्याला मिठी मारून, सँको म्हणाला, " अरे रिकोट, या जुनाट पोशाखात रूपांतर झालेल्या तुला कोणता सैतान ओळखू शकेल ? अशा प्रकारे तुझे रूपांतर कोणी केले ? पुनः स्पेनमध्ये येण्याचे धारिष्ट तू कसे केलेस ? तुला जर कोणी ओळखले, तर काय होईल याची मला कल्पनाच करता येत नाही. साऱ्या दुनियेचे राज्य मिळाले तरी मी तुझ्या वेषात राहणार नाही. " यात्रेकरू म्हणाला, " तू जर मला उघडकीस आणले नाहीस तर, सँको, मी पूर्ण सुरक्षित आहे. या वेषात मला कोणीच ओळखू शकणार नाही. पण आपण या रस्त्यावरून बाहेर जाऊ या आणि त्यापलीकडच्या एल्म वृक्षांच्या राईत बसू या. तेथे मी आणि माझे सांगाती यांनी थोडा फराळ करण्याचे ठरविले आहे. तू आमच्याबरोबरच जेव. ते लोक प्रामाणिक आहेत, याची मी तुला ग्वाही देतो. राजाज्ञेचे पालन करण्यासाठी मला आपले गाव सोडावे लागले, तेव्हापासून मी माझा काळ कसा घालविला, हे तुला सांगण्याची संधी मला तेथे मिळेल. आपल्या दुर्दैवी राष्ट्रातील लोकांना राजाज्ञेचे

फार भय असते, हे तुला माहीत आहेच."

या बेताला सँकोने संमती दिली. रिकोटने बाकीच्या यात्रेकरूंना हा बेत सांगितला. रस्त्यापासून बऱ्याच अंतरावर असलेल्या त्या राईकडे ते सर्वजण एकत्रपणे गेले. तेथे त्यांनी आपले दंड खाली ठेवले आणि यात्रेकरूचा वेष उतरून ते बंड्या घालून बसले. ते सारेजण देखणे तरुण होते. फक्त रिकोट हा काहीसा जरा-जर्जर झालेला होता. प्रत्येकाने स्वादिष्ट व मसालेदार खाद्य पदार्थांनी तुडुंब भरलेली चामड्याची पिशवी आणलेली होती आणि त्यामुळे झकास दारू घशाखाली ओतण्याची इच्छा होत होती. ते जमिनीवर बसले. हिरवे गवत हीच त्यांची जेवणाच्या मेजावरील चादर! थोड्याच वेळात तेथे पाव, मीठ, सुऱ्या, फळे, चीज आणि खारवलेले डुकराचे मांस दिसू लागले. आणि त्यांना आनंदवू लागले. त्या मांसावर अजून काही द्रव दिसत होते. ते कोणालाही शोषून घेता आले असते. तहान निर्माण करण्यासाठी कॅव्हिझार नावाची माशाच्या अंड्यांची काळी गाभुळीही तेथे होती. ऑलिव्ह फळांचा साठाही त्यांच्याजवळ पुष्कळ होता, पण ती सारी सुकलेली होती. पण त्या मेजवानीचे खरे वैभव म्हणजे दारूचे सहा चामडी बुधले. प्रत्येक यात्रेकरू आपल्या वाट्याचा बुधला दाखवीत होता. सज्जन रिकोटही मोरिस्कोचा जर्मन झाला होता. त्याने आपलीही बाटली इतरांच्या दारूत मिसळली. चविष्ट भोजन मोठ्या आवडीने करणाऱ्या माणसांप्रमाणे त्यांनी ते पदार्थ खाण्यास सुरुवात केली. ते पदार्थ अत्यंत रुचकर होते. त्यांचे सेवन ते सावकाशीने करीत होते. प्रत्येक वेळी प्रत्येक पदार्थाचा लहान लहान तुकडा ते सुऱ्याच्या टोकावर घेत होते. नंतर त्या सर्वांनी एकदम आपले हात वर केले आणि बाटल्यांची तोंडे आपल्या तोंडात घालून त्यांचे तळ हवेत ठेवले. त्यांनी आपले डोळे, ब्रह्मानंदी टाळी लागलेल्या माणसाप्रमाणे, आकाशावर रोखले. बराच वेळ ते त्या अवस्थेत होते. त्या बाटल्यातील साक्षात् रक्त असे मद्य ते आपल्या पोटात रिचवीत होते. आपल्याला मिळालेला आनंद व्यक्त करण्यासाठी ते आपली डोकी हलवीत होते– जणू त्यांना परमानंद मिळाला होता. सँकोला या साऱ्या प्रकाराचे मोठे कौतुक वाटले. त्यात त्याला थोडाही दोष आढळला नाही. उलट त्याला सर्वच चांगले दिसले. "तुम्ही रोममध्ये असाल, तेव्हा रोमन लोकांप्रमाणे वागा." ही जुनी म्हण सार्थ करून दाखविण्याचे त्याने ठरविले. म्हणून त्याने रिकोटला आपली बाटली देण्यास विनंती केली. इतरांप्रमाणेच त्याने तिचा आस्वाद घेतला व आनंद लुटला. मेजवानीची पद्धत आपल्याला चांगलीच माहीत आहे असे त्याने दाखविले. त्यांनी त्या बाटल्या अशा प्रकारे चार वेळा कुरवाळल्या. पण पाचव्यांदा कुरवाळण्याचे काही कारण पडले नाही. त्या पार खलास झाल्या होत्या – त्यांच्यातील जीव उडून गेला होता. त्यामुळे त्यांच्या मौजेला शोकाचे स्वरूप आले. जोपर्यंत दारू शिल्लक होती, तोपर्यंत सारे काही ठाकठीक होते. त्या यात्रेकरूंपैकी, हा नाही तर तो, सँकोला मधून मधून आपल्या उजव्या हाताशी बसवी. स्पॅनिश व जर्मन— सारेजण एक होऊन ओरडत, 'दारूचा मजा असो!' सँको म्हणे, 'आज तरी दारूचा मजा असो!' आणि नंतर

तो तब्बल अर्धा तास खो खो हसत सुटे. आपल्या अलीकडील दुःखांची किंवा आपल्या राज्याच्या हानीची त्याला त्यावेळी काडीमात्र चिंता वाटली नाही. जो काळ माणसे खाण्यापिण्यात खर्च करतात, त्यावर चिंतेचा प्रभाव मुळीच पडत नाही. सारांश, त्यांची पोटे तुडुंब भरल्यामुळे त्यांच्या हाडांना विसावण्याची इच्छा झाली. म्हणून त्यांच्यापैकी पाचजण झोपी गेले. फक्त सँको आणि रिकोट हे दारू प्याले होते थोडी, पण त्यांनी खाल्ले होते खूप, म्हणून जागे राहिले. थोड्याच अंतरावर असलेल्या एका बीच झाडाच्या सावलीखाली ते गेले. बाकीचे लोक झोपले असताना, रिकोट सँकोला चांगल्या स्पॅनिश भाषेत पुढीलप्रमाणे बोलला :—

" दोस्ता सँको पँझा, आपल्या राष्ट्रातील ज्या लोकांना राज्याबाहेर निघून जाण्याची राजाज्ञा झाली, ते सर्व भयभीत झाले–निदान मी तरी घाबरलो, हे तुला चांगले माहीत आहे. त्यामुळे आमच्या प्रयाणाची मुदत संपली नसतानाच मला असे वाटले की, माझ्यावर व माझ्या मुलाबाळांवर या कायद्याची अंमलबजावणी लवकरच होणार. म्हणून त्यांची आणि माझी सुरक्षितता वेळीच निर्माण करण्याचे मी ठरविले. आपले निवासस्थान आपल्यापासून हिरावून घेतले जाणार आहे असे ज्या माणसाला माहीत असते, तो तेथून आपली हकालपट्टी होण्यापूर्वी दुसरे घर मिळवितो. तसे मी केले, मी एकट्याने आपले शहर सोडले आणि दुसरे गाव आधी शोधण्यासाठी मी निघालो. आपल्या शहरातून घाईने बाहेर जाणाऱ्या इतर लोकांना ज्या गैरसोयी सोसाव्या लागल्या, त्या आपण न सोसता आपल्या कुटुंबाला दुसरीकडे हलविण्याचा मी विचार केला. आमच्यातील शहाण्या शहाण्या लोकांना योग्य अशी भीती वाटत होती की, आमच्या मूर वंशाला हद्दपार करण्यासाठी जी घोषणा झालेली आहे ती धमकीवजा नाही (ती तशी आहे असे मानून काही लोक मोठ्या खुशीत होते ) तर दिलेली मुदत संपल्यानंतर तिचा अंमल खात्रीने केला जाईल. यावर विश्वास ठेवण्याकडे माझा कल होता. कारण आमच्या लोकांच्या योजना फार भयंकर आहेत याची मला जाणीव होती. राज्याच्या अंतरंगातून या सर्पांना हुसकून लावण्याचा धडाडीचा निर्णय राजाने केला, तो दैवी प्रेरणेचा असावा, असे मला वाटल्याशिवाय राहिले नाही. आम्ही सर्वजण अपराधी होतो असे नव्हे, आमच्यामध्ये काहीजण निष्ठावंत व खरे ख्रिश्चन होते; पण त्यांची संख्या इतकी लहान होती की, त्यांच्याविरुद्ध असणाऱ्या लोकांना ते प्रतिकार करू शकत नव्हते आणि घरात शत्रू ठेवणे सुरक्षितपणाचे नव्हते. सारांश, आम्हाला हद्दपार करणे अवश्य होते. काही लोकांना आमचे हे दैव सौम्य व सुखद वाटले असेल, पण आम्हांला आमच्या शिरावर कोसळलेले ते अत्यंत भयानक संकट वाटले. जेथे कोठे आम्ही असू, तेथे आम्ही अश्रू ढाळीत, स्पेनमधून झालेल्या आपल्या हद्दपारीबद्दल शोक करीत असतो. कारण, काही झाले तरी, आम्ही त्या देशात जन्मलो होतो आणि तो देश आमची मायभूमी आहे. आमच्या दुःखामध्ये आम्हाला जो विरंगुळा हवा असे, तो आम्हाला कोठेही मिळत नसे. बार्बेरीसारख्या आफ्रिकेतील प्रदेशात

आपले चांगले स्वागत होईल व आपल्याला सुख मिळेल, अशी आमची अपेक्षा होती, पण तेथेही आम्हाला अत्यंत मोठी अमानुषता आढळली आणि अत्यंत वाईट तऱ्हेने वागविले गेले. आमचे सौख्य आम्ही गमावीपर्यंत आम्हाला आमच्या सौख्याची ओळख नव्हती. आमच्यापैकी बहुतेक लोकांना स्पेनमध्ये परत येण्याची तीव्र इच्छा आहे. मी जी भाषा बोलतो ती बोलणारे पुष्कळ लोक इकडे परत येतात आणि आपल्या बायका-मुलांना पोरक्या अवस्थेत सोडतात. मातृभूमीवरील त्यांचे प्रेम इतके गाढ असते. ' माणसाची मातृभूमीवरील माया मधुर असते ' या म्हणीचे तथ्य आता मला अनुभवाने कळत आहे. माझ्यासंबंधी सांगावयाचे तर, आपले गाव सोडल्यानंतर मी फरान्समध्ये गेलो. तेथे माझे चांगले स्वागत झाले तरी इतर देश पाहण्याची मला इच्छा होती. म्हणून फ्रान्समधून मी इटालीत गेलो आणि तेथून जर्मनीत गेलो. तेथील नागरिक सत्प्रवृत्त व प्रेमळ असल्यामुळे आणि परस्परांशी स्नेहभावाने वागणारे असल्या-मुळे प्रत्येकाला आपल्या मार्गाने जाण्याचे स्वातंत्र्य आहे; तसेच स्वातंत्र्य मलाही लाभेल असे मला वाटले. त्या देशाच्या मोठ्या प्रदेशात विचार-स्वातंत्र्य आहे. तेथे ऑग्स-बर्गजवळील एका खेड्यात मी घर घेतले. नंतर मी या यात्रेकरूच्या टोळीत शिरलो आणि त्यांच्यापैकी एक झालो. स्पेनला जावे, आपल्या तीर्थ-स्थानाला दरसाल भेट द्यावी, अशी प्रथा त्यांच्यापैकी बहुतेकांची होती. ती स्थाने म्हणजे त्यांची इंडीज् बेटे होती. त्यांच्या उत्तम बाजारपेठा होत्या आणि पैसे कमावण्याची हमखास साधने होती. बहुधा सर्व राज्यभर ते प्रवास करीत असतात. जेथे त्यांना मद्यमांस आणि निदान सहा पेन्स मिळणार नाहीत असे एकही खेडे त्या राज्यात नाही. ते सारा व्यवहार इतक्या कुशलतेने करतात की, आपल्या यात्रेच्या शेवटी ते सुमारे शंभर क्राऊनची कमाई कडोसरीला लावून तेथे जातात. त्या नाण्यांचे रूपांतर ते सोन्यात करतात आणि ते सोने आपल्या काठ्यांच्या पोकळीत किंवा कपड्यांच्या ठिगळामध्ये लपवून ठेवतात. अशा प्रकारे किंवा दुसऱ्या काही गुप्त मार्गाने ते आपल्या देशात ते सोने नेतात. राज्यातून बाहेर जाताना त्यांच्या कितीही झडत्या झाल्या, तरी ते आपले हे काम पार पाडतात. आता सँको, माझा बेत मी तुला सांगतो. येथे परत येण्याचा माझा हेतू असा आहे की, मी येथून निघून गेलो तेव्हा जो ठेवा मी जमिनीत पुरून ठेवला, तो घेऊन जावा. शहराच्या अगदी बाहेर असणाऱ्या जागेत तो ठेवा असल्याने मला तो नेण्यात काही अडचण येणार नाही असे वाटते. ते काम झाल्यावर व्हॅलेन्सियाहून मी माझ्या बायकोला व मुलीला पत्र लिहीन किंवा स्वतःच तिकडे जाईन. त्या अल्जीर्समध्ये आहेत हे मला माहीत आहे. तेथून त्यांना मी या ना त्या प्रकारे फ्रान्सच्या एखाद्या बंदरात नेईन आणि तेथून जर्मनीत आणीन. तेथे आम्ही राहू आणि ईश्वर आमची काय सोय लावतो हे पाहू. कारण मला खात्रीने वाटते की, माझी बायको फ्रॅन्सिस्का आणि माझी मुलगी या दोघी उत्तम कॅथॉलिक खिश्चन आहेत. त्यांच्याइतका मी श्रद्धाळू आहे असे जरी मी म्हणू शकत नसलो, तरी माझ्या अंगात महंमदापेक्षा खिस्ताचे रक्त अधिक

आहे. मी त्या सर्वशक्तिमान प्रभूची निरंतर प्रार्थना करीत असतो की, प्रभो, माझ्या बुद्धीचे डोळे उघड आणि तुझी सेवा कशी करावी हे मला शिकव. मला आश्चर्य याचे वाटते की, माझी बायको व मुलगी फ्रान्सपेक्षा बार्बेरीला जाणे अधिक पसंत करतात. पण मला वाटते, फ्रान्समध्ये त्यांना ख्रिश्चनाप्रमाणे राहता आले असते."

सँकोने उत्तर दिले, "रिकोट, हे पाहा, यात तुझा काही दोष नाही. माझ्या माहितीप्रमाणे, तुझ्या बायकोचा भाऊ जॉन टिओपिओ याने त्यांना आपल्याबरोबर नेले आणि तो अट्टल मूर असल्यामुळे आपल्या इच्छेस येईल तिकडे त्यांना घेऊन गेला. दोस्ता, मी तुला आणखी हे सांगितले पाहिजे की, आपला गुप्त ठेवा शोधण्यासाठी परत जाण्याचे जे श्रम तू करशील, ते वाया जातील की काय अशी मला शंका आहे. कारण आमच्यामध्ये अशी गरमागरम बातमी होती की, तुझ्या मेव्हण्याजवळ आणि बायकोजवळ पुष्कळच मोती आणि खूप सोने होते. जमिनीत तू पुरलेले सारे धन त्यांनी पळविले असावे." रिकोट उत्तरला, "तसे असेलही. पण मित्रा, माझी खात्री आहे की, माझा ठेवा त्यांना गवसला नसावा. कारण काही विपरीत घडू नये म्हणून मी तो कोठे दडवून ठेवला आहे हे त्यांना कधीच सांगितले नाही. म्हणून मित्रा, तू माझ्याबरोबर जर आलास आणि माझे हे धन दूर नेण्यास मदत केलीस तर मी तुला दोनशे क्राऊन देईन. त्यामुळे तुला जगात सुखाने जगता येईल. तुझ्या मानाने ही रक्कम फार थोडी आहे, हे मी जाणतो." सँकोने उत्तर दिले, "मी ते काम करीन; पण मला लोभ मुळीच नाही. तो जर माझ्या अंगी थोडासाही असता तर मी आज सकाळीच एक उद्योग सोडला नसता. तो मी आपल्या हाती ठेवला असता तर, माझ्या घराच्या भिंती सोन्याने मढविण्याइतका पैका मी मिळविला असता आणि सहा महिने पूर्ण होण्याच्या आत मी सोन्याच्या ताटात जेवत बसलो असतो. या कारणामुळे आणि राजाच्या शत्रूंना मदत करणे हा राजद्रोह असल्यामुळे मी तुझ्याबरोबर येणार नाही–त्यासाठी तू मला दुप्पट पैसे मोजलेस तरी मी येणार नाही." रिकोटने विचारले," तू सोडलास तो उद्योग कोणत्या स्वरूपाचा होता?" सँको म्हणाला, "काय सांगू? मी एका बेटाचे राज्य सोडले. आणि ते बेट असे होते की, ओक वृक्षापासून एक मैलाच्या अंतरावर तसे बेट तुला खरोखर सापडणार नाही." रिकोटने विचारले, "हे बेट कोठे आहे?" सँको म्हणाला, "अरे फक्त सहा मैल दूर. त्याला बॅराटेरियाचे बेट म्हणतात." रिकोटने उत्तर दिले, "असे काही बोलू नकोस. अरे बेटे समुद्राच्या आत दूरवर असतात. जमिनीवर मुळीच नसतात." सँको म्हणाला, "का नाही? दोस्ता रिकोटा, मी तुला सांगतो की, तेथून आज सकाळीच मी निघालो. एखाद्या नागराजाप्रमाणे मी तेथे काल माझ्या इच्छेप्रमाणे व मर्जीप्रमाणे राज्य करीत होतो– आणि तरीही ते मी सोडले. कारण राज्यपालाचे पद हे मला जोखमीचे व धोक्याचे वाटले." रिकोटाने विचारले, "त्या राज्यापासून तुला काय मिळाले?" सँकोने उत्तर दिले, "पुष्कळच मिळाले. गुरांच्या कळपाशिवाय दुसऱ्या कशावरही राज्य करण्यास मी लायक नाही, हे समजण्याइतकी अक्कल मला आली.

शिवाय अशा राज्यकारभारापासून जी संपत्ती मिळते, तिच्यासाठी माणसाला फार श्रम व कष्ट करावे लागतात आणि भूक सोसावी लागते व दक्ष राहावे लागते. तुमच्या बेटामध्ये राज्यपालांनी जवळजवळ काहीच खाल्ले न पाहिजे–त्यातही त्यांच्या आरोग्याकडे लक्ष देणारे वैद्य असतील तर मुळीच खाता कामा नये." रिकोट म्हणाला, "मला याचा ओ का ठो कळत नाही. मला हा सारा मूर्खपणा दिसतो. अरे तुला राज्य करण्यासाठी बेटे देण्याइतका भोळाभावडा कोण असेल? जग काय कर्तबगार माणसांचे बाबतीत ओस पडले आहे? तुझ्याशिवाय दुसरा कोणी माणूस राज्यपालाच्या पदासाठी त्यांनी का निवडला नाही? मर्दा, आता अधिक काही बोलू नकोस, शुद्धीवर ये आणि माझ्याबरोबर येऊन माझी गुप्त संपत्ती, माझा ठेवा बाहेर नेण्यास तू मदत करशील काय, याचा विचार कर. तेथे किती दौलत पुरलेली आहे याचा विचार करून मी 'ठेवा' असे नाव देतो. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे मी तुला पैसे देऊन संसारी माणूस बनवीन."

सँकोने उत्तर दिले, "रिकोटा, माझे ऐक. मी माझ्या मनातले तुला पूर्वीच सांगितले आहे. मी तुझा विश्वासघात करणार नाही एवढे पुरेसे आहे. ईश्वराचे नाव तुझ्या पाठीशी असो. मला माझ्या वाटेने जाऊ दे. पण मला हे पक्के माहीत आहे की, 'आपण जे प्रामाणिकपणे मिळवितो ते नाश पावण्याचा संभव असतो, पण जे लबाडीने मिळवितो ते धन आणि त्याचा धनी हे दोघेही नाश पावतात हे नक्की." रिकोट म्हणाला, "ठीक आहे सँको, याहून अधिक आग्रह मी तुला करीत नाही. आता मला इतकेच सांग की, जेव्हा माझी बायको व मुलगी माझ्या मेव्हण्याबरोबर पळून गेली, तेव्हा तू गावात होतास काय?" सँको म्हणाला, "अरे, होतो तर. त्यावेळी तुझी मुलगी इतकी जबरदस्त सुंदर दिसत होती की, म्हातारे लोकही तिला पाहण्यासाठी गर्दी करीत होते आणि प्रत्येकजण म्हणत होता, ईश्वराच्या या पृथ्वीवर हा सर्वात सुंदर जीव आहे. ती बिचारी रस्त्याने जात असताना एकसारखी ओक्साबोक्शी रडत होती आणि आपल्या सर्व मैत्रिणींना व ओळखीच्या माणसांना आलिंगन देत होती. तिच्यासाठी प्रार्थना करण्यासाठी तेथे जे लोक गोळा झाले होते त्यांना तिने इतक्या कळकळीने व काकुळतीने विनंती केली की, माझ्याही डोळ्यांतून अश्रू गळू लागले. मोठमोठ्याने हुंदके देत रडणाऱ्या माणसांपैकी मी नाही, तरी माझी स्थिती अशी झाली. रस्त्यावर तिला आपल्या मामापासून पळवून आणावे आणि दडवून ठेवावे अशी तीव्र इच्छा पुष्कळ लोकांच्या मनात होती. पण राजाच्या घोषणेमुळे ते भीतीने वचकून राहिले. तथापि तिच्याबद्दल सर्वात जास्त आस्था कोणी दाखविली असेल, तर ती म्हणजे डॉन पेड्रो डी ग्रेगोरिओ– तुला माहीत असलेला, श्रीमंताचा वारस असलेला तो तरुण– याने. तो तिच्या प्रेमात आकंठ बुडालेला होता असे लोक म्हणतात. ती गेल्यापासून तो त्या गावात कोणाला कधीच दिसला नाही. आम्हाला वाटले, तो तिच्यामागोमाग तिला चोरून पळवून आणण्यासाठी गेला असावा. पण आतापर्यंत या गोष्टीसंबंधी आम्ही अधिक काही ऐकले नाही."

रिकोट म्हणाला, "मला नेहमी असा संशय येई की, या माणसाचे माझ्या मुलीवर प्रेम आहे. पण रिकोट–घराण्याच्या शीलाविषयी माझे मत नेहमी चांगले असे. त्यामुळे त्याच्या प्रेमभावनेने मी कधी बेचैन झालो नाही. सँको, तुला माहीतच आहे की, मूर वंशातील आमच्या एकाही स्त्रीने प्रेमाखातर कोणाही खिश्चनाशी कधीही लग्न केले नाही. म्हणून मला अशी आशा वाटते की, प्रेमापेक्षा धर्माची कर्तव्ये माझी मुलगी अधिक महत्त्वाची मानते आणि म्हणून या तरुण वारसाच्या प्रणयाराधनेकडे ती फारसे लक्ष देणार नाही." सँको म्हणाला, "देव करो आणि ती तशीच वागो. नाही तर त्या दोघांचेही वाटोळे होईल. माझ्या सच्च्या शेजाऱ्या, आता मी तुला रामराम ठोकला पाहिजे. कारण आज संध्याकाळी माझा धनी डॉन क्विक्झोट यांच्यापाशी राहाण्याची मला इच्छा आहे." रिकोट म्हणाला, "दोस्ता सँको, ईश्वर तुझा पाठीराखा असो. माझ्या सोबत्यांची वामकुक्षी संपली आहे असे मला दिसते. आम्ही आमच्या मार्गाने झटपट जाण्याची ही वेळ आहे." नंतर सँकोने त्याला प्रेमाने आलिंगन दिले आणि तो आपल्या डॅपलवर स्वार झाला. रिकोटने आपली यात्रेकरूची काठी घेतली आणि ते दोघे एकमेकापासून दूर गेले.



## प्रकरण ५५

# रस्त्यात सँकोला काय झाले? त्याचा वृत्तांत आणि इतर गोष्टी. त्या तुम्ही फक्त ऐकाव्यात.

सँको ग्रिकोटबरोबर फार वेळ थांबला, त्यामुळे ड्यूकच्या किल्ल्यापासून मैल-दीड मैल अंतरावर तो आला, तेव्हा रात्र झाली. अंधार पडला पण ते दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळे तो फारसा घाबरला नाही. दुसरे दिवशी सकाळपर्यंत मुक्काम करण्याच्या इराद्याने त्याने रस्त्यापासून दूर जाण्याचे ठरविले. पण त्याचे दुर्दैव असे की, विश्रांतीसाठी तो एखादे ठिकाण शोधीत असताना, तो आणि डॅपल एकाएकी एका अत्यंत खोल खड्ड्यात कोसळले. काही जुन्या इमारतींच्या अवशेषातील तो खड्डा होता. खाली पडत असताना, त्याने अंतःकरणापासून प्रभूची प्रार्थना केली. त्यावेळी त्याची कल्पना होती की, तळ नसलेल्या खड्ड्यात आपण खाली खाली खचत चाललो आहो. पण तसा काही धोका त्याला नव्हता. कारण, तोपर्यंत तो फक्त अठरा फूट खाली गेला होता. तेथे जाताच डॅपल तळावर एकदम थांबला. आणि त्याचा स्वार त्याच्या पाठीवर अजूनही बसलेला होता व त्याला कोणत्याही तऱ्हेची दुखापत झालेली नव्हती. सँकोने तत्काळ आपली हाडे नीट आहेत ना हे पाहण्यास सुरुवात केली, आपला श्वास रोखून धरला व आपले सर्व शरीर चाचपून पाहिले. आपले हात-पाय सारे शाबूत आहेत आणि आपली त्वचा अभंग आहे, असे आढळल्यावर त्याच्या मनात विचार आला, 'ज्या प्रभूने आपले रक्षण इतक्या आश्चर्यकारक रीतीने केले, त्याचे पुरेसे आभार मानणे आपल्याला शक्य नाही.' प्रथम त्याला वाटले होते, आपल्या शरीराचे हजारो तुकडे झाले आहेत आणि आपले आयुष्य संपलेले आहे.

त्याने आपल्या दोन्ही हातांनी त्या खड्ड्याच्या भिंती चाचपून पाहिल्या-कोणाच्या मदतीशिवाय बाहेर पडणे शक्य असेल तर तसा प्रयत्न करण्याचे त्याच्या मनात होते. पण त्या साऱ्या भिंती इतक्या सपाट आणि उंच चढणीच्या होत्या की, वर जाण्यासाठी तेथे कोणताच आधार नव्हता. त्यामुळे त्याच्या जीवाला फार दुःख झाले. त्या दुःखात भर म्हणून डॅपलने अत्यंत करुण व खिन्न स्वराने ओरडण्यास व आपला आवाज चढविण्यास सुरुवात केली. त्या आवाजाने त्याच्या धन्याचे अंतःकरण भेदून गेले. त्या बिचाऱ्या जनावराने जो विलाप केला, तो अकारण नव्हता. कारण, खरे सांगायचे तर, त्याची अगदी दुर्दशा झाली होती. सँको म्हणाला, "काय हे माझे दुर्दैव! या दुःखी

दुनियेत राहणाऱ्या आम्हा अभागी जीवांवर पावलोपावली केवढी अकल्पित संकटे अकस्मात् कोसळत आहेत! अहो, कोणाला असे वाटले असते का, की जो माणूस कालच एका बेटाच्या राज्यपालाच्या सिंहासनावर आरूढ झालेला होता आणि त्याच्या तालावर नाचणारे कैक सेवक नि हुजरे होते, तोच आज एका खड्ड्यात गाडला जाईल आणि त्याला मदत करण्यास किंवा त्याचे दुःख कमी करण्यास एकही माणूस नसेल! हे गाढव आपल्या जखमांमुळे आणि मी दुःखामुळे व चिंतेमुळे आधीच आटोपलो नाही, तर आम्ही दोघे भयंकर भुकेने मरून जाण्याचा संभव आहे. माझा धनी डॉन क्विक्झोट यांच्याइतका दैववान् मी असणार नाही. तो जेव्हा जादूगार मॉंटेसिनोजच्या गुहेत गेला, तेव्हा त्याला स्वतःच्या घरापेक्षा अधिक सुखसोयी मिळाल्या. तेथे त्याच्या जेवणाची व्यवस्था होती, त्याचा बिछाना घातलेला होता आणि आनंददायक दृश्यापेक्षा दुसरे काही त्याला दिसत नव्हते. पण मला येथे साप आणि बेडूक यांच्याशिवाय दुसरे काही दिसण्याचा संभव नाही. किती दुर्दैवी प्राणी आहे मी! माझ्या मूर्खपणाच्या योजनांमुळे आणि लहरीमुळे माझी अवस्था काय झाली आहे? माझी हाडे पुढे सापडावीत अशी परमेश्वराची शुभेच्छा असली, तर या दुःखी स्थानातून ती हाडे उघडी, पांढरी आणि गुळगुळीत अशी उचलली जातील-आणि त्याबरोबरच माझ्या गरीब बिचाऱ्या डॅपलचीही. त्या हाडांवरून ती कोणाची आहेत हे लोकांना कळेल. सँको पँझा आपल्या गाढवापासून कधी दूर गेला नाही आणि ते गाढव सँको पँझापासून दूर गेले नाही, असे ज्यांना माहीत आहे, ते लोक तरी ती हाडे कोणाची आहेत हे ओळखतील. खरोखर आम्ही दोघे अभागी जीव आहोत, हे मी पुन्हा म्हणतो. आम्ही जर आमच्या घरी आमच्या मित्र-मंडळींमध्ये मरण पावलो असतो आणि आम्हाला कोणी फारशी मदत केली नसती, तर निदान आमच्यावर करुणा करणाऱ्यांची आणि शेवटच्या श्वासाचेवेळी आमचे डोळे मिटणाऱ्यांची आम्हाला वाण पडली नसती." नंतर तो आपल्या गाढवाला उद्देशून म्हणाला, "अरे माझ्या प्रिय सोबत्या आणि दोस्ता, तुझ्या विश्वासू सेवेची परतफेड मी किती कंजूषपणाने केली आहे! मला क्षमा कर. या अपघातातून आपल्याला मुक्त करण्या-साठी तू दैवाची शक्य तितकी मनोभावाने प्रार्थना कर. मग मी तुझ्या मस्तकावर विजयाचा मुकुट चढविण्याचे वचन देतो. मग तुझा सन्मान राजकवीपेक्षाही अधिक होईल!" अशा प्रकारे सँकोने आपल्या दुर्दैवाबद्दल विलाप केला. तो जे बोलला ते त्याच्या गाढवाने कान देऊन ऐकले पण एका शब्दानेही उत्तर दिले नाही. कारण त्यावेळी त्या बिचाऱ्या जीवाला सहन करावे लागणारे दुःख आणि यातना फारच दारुण होत्या.

अत्यंत खिन्न स्वराने सर्व रात्रभर त्याने शोक केल्यानंतर व कुरकुर केल्यानंतर शेवटी दिवस उजाडला. दिवसाच्या प्रकाशात सँकोची अशी खात्री झाली की, कोणाच्या मदतीशिवाय आपण या खड्ड्यातून बाहेर पडणे अशक्य आहे. कोणी तरी आपली हाक ऐकावी म्हणून त्याने आपला घसा पुनः साफ केला आणि तो जोराने ओरडला पण हाय! त्याचे सारे ओरडणे अरण्यरुदन ठरले! कारण, हाकेच्या अंतरावर तेथे कोणीही

नव्हते. आता आपण ठार मेलो–गाडले गेलो असेच धरून तो चालला. त्याने डॅपलकडे नजर टाकली, तेव्हा तो जमिनीवर पाय ताणून पडलेला दिसला. त्याचे तोंड दुःखाने सुकलेले होते. सँको त्याच्याकडे गेला आणि त्याला आपल्या पायावर उभे करण्याचा प्रयत्न त्याने केला. पुष्कळ खटाटोप केल्यानंतर त्याच्या मदतीने ते जनावर शेवटी उभे राहिले, पण उभे राहण्यास ते समर्थ नव्हते. नंतर त्याने आपल्या चामड्याच्या पिशवीतून एक पाव काढला. ( तिचीही दुर्दशा तशीच झाली होती. ) आणि तो त्याने गाढवाला दिला. काही कुरकुर न करता त्याने तो खाल्ला. आपले बोलणे त्या जनावराला जणु काही कळत आहे असे समजून सँको म्हणाला, "उपाशी राहून दुःख करण्यापेक्षा पोट-भर खाऊन ते करणे चांगले." शेवटी, त्याला त्या खड्डयाच्या एका बाजूस एक मोठे भोक दिसले. त्यातून माणसाला वाकून रांगत जाता येईल इतके ते रुंद होते. तो त्याच्या-जवळ गेला आणि हाता–पायावर रांगत रांगत त्या खड्डयाच्या काठापर्यंत जाऊन पोहो-चला. पुढे त्या खड्डयाचे तोंड अधिकाधिक रुंद होत गेलेले त्याला आढळले. त्या पोकळीच्या डोक्यावर सूर्य प्रकाशत असल्यामुळे तो ते सहज पाहू शकला. हा शोध लावल्यानंतर तो आपल्या गाढवाकडे परत गेला. खणण्याची कला माहीत असणाऱ्या माणसाप्रमाणे, त्याने एक दगड घेऊन त्या भोकाभोवतालची माती दूर करण्यास सुरुवात केली. त्याने इतके परिश्रम केले की, त्यामुळे त्याच्या सोबत्याला जाण्यास लौकरच वाट तयार झाली. नंतर गाढवाला लगामाने धरून त्याने हळूहळू त्याला गुहेत नेले. दुसऱ्या बाजूस बाहेर पडण्याला काही वाट आहे का हे तो पाहू लागला. काही वेळा त्याला अंधारातून जावे लागले आणि काही वेळा प्रकाशाशिवाय जावे लागले, पण भीतीपासून तो कधीच मुक्त राहिला नाही. तो स्वतःशी म्हणाला, "देव मला वाचवो ! माझे काळीज सशाचे आहे. मला हे जे दुःखदायक संकट वाटत आहे, ते माझा धनी डॉन क्विक्झोट यांना दुर्मिळ साहसाचे कृत्य वाटले असते. त्यांना या गुहा आणि उकिरडे सुंदर उद्याने व वैभवशाली राजवाडे वाटले असते आणि या अंधाऱ्या, अरुंद गुहेतून चांगल्या कुरणावर जाण्याची आशा त्यांनी बाळगली असती. पण मी दैवशून्य; आधारशून्य, हृदयशून्य असा दुर्दैवी प्राणी आहे. एक पाऊल टाकले की मला वाटते, मी या खड्डयापेक्षा अधिक खोल खचत जाणार – आणि शेवटी कोठे जाणार हे मला माहीत नाही. दुर्दैव एकटे आले तर त्याचे स्वागत करावे." अशा तऱ्हेने तो शोक करीत आणि निराशेचे उद्गार काढीत पुढे चालला. दीड मैलाहून अधिक दूर आपण गेलो असे त्याला वाटले. नंतर एखाद्या माळावर सूर्योदयाचा प्रकाश पडावा तसा संमिश्र प्रकाश त्याला शेवटी दिसला. पण त्याला वाटले, दुसऱ्याच दुनियेत जाण्याचा हा मार्ग असावा.

पण येथे सिड् हॅमेट बेनेनगेली याने त्याला थोडा वेळ सोडले आहे आणि तो डॉन क्विक्झोटकडे वळला आहे. डोन्ना रोड्रीगेझच्या कन्येचा अपमानकर्ता आणि आपण यांच्यामध्ये लौकरच सामना होणार या आशेने ते आपल्या मनात खूष होते. ठरलेल्या

दिवशी त्या कन्येवरील अन्याय दूर करण्याचा त्यांनी चंग बांधला होता.

एके दिवशी सकाळी असे घडले की, लढयाची तयारी करण्यासाठी ते घोड्यावरून बाहेर पडले. आपले घोडे रोझेनांट याच्यासह ते कवायत करीत असताना एका खोल गुहेच्या काठावर त्यांचे पाय टेकले. ते इतके पक्के की, डॉन क्विक्झोट यांनी आपले कौशल्य पणास लावले नसते, तर ते त्या गुहेत नक्कीच पडले असते. पण ते त्यांचे संकट टळले. त्या गुहेत खाली न उतरता तिच्या आंत काय आहे हे पहाण्याचा त्यांना मोह झाला. म्हणून इकडे तिकडे हिंडून ते त्या गुहेजवळ घोड्यावरून गेले. तेथे ते आपली जिज्ञासा तृप्त करीत असताना आणि गंभीरपणे चिंतन करीत असताना, खालून काही आवाज ऐकू येत आहे असे त्यांना वाटले. तेव्हा ते कान देऊन ऐकू लागले. त्या गुहेतून करुण स्वराने निघालेले पुढील शब्द त्यांच्या कानी स्पष्टपणे पडले– "अरे! वर कोणी आहे का? माझे शब्द ऐकणारा कोणी सज्जन ख्रिश्चन नाही का? राज्याशिवाय राज्यपाल असलेला एक अभागी, पापी माणूस जमिनीत जिवंत गाडला जात असताना त्याच्यावर दया करणारा कोणी उदार शिलेदार किंवा सभ्य गृहस्थ तेथे नाही का?" आपण सँकोचा आवाज ऐकत आहोत अशी डॉन क्विक्झोट यांची कल्पना झाली. त्यामुळे त्यांना फार आश्चर्य वाटले. आपली जिज्ञासा अधिक तृप्त करून घेण्यासाठी, आपला आवाज शक्य तितका चढवून, ते ओरडले, "खाली कोण आहे? गाऱ्हाणे कोण गात आहे?" सँकोने उत्तर दिले, "अत्यंत दुर्दैवी सँको पँझाशिवाय दुसरे कोण असणार आणि दुसरे कोण दुःख करणार? माझ्या पापामुळे आणि कमनशिबी भ्रमंतीमुळे मी बॅराटेरिया बेटाचा राज्यपाल होतो आणि त्यापूर्वी ला मांचा येथील सुप्रसिद्ध शिलेदार डॉन क्विक्झोट यांचा सेवक होतो."

हे शब्द ऐकल्यामुळे डॉन क्विक्झोट यांचे कौतुक द्विगुणित झाले आणि त्यांचे आश्चर्य वाढले. त्यांनी चट्‌कन् तर्क केला की, सँको मेला असावा आणि त्याचा आत्मा येथे प्रायश्चित्त घेत असावा. त्या कल्पनेने झपाटले गेल्यामुळे ते म्हणाले, "मी एक कॅथॉलिक ख्रिश्चन आहे. मी तुला कळकळीने विनंती करतो की, तू कोण आहेस हे मला सांग. तू जर एक दुःखी आत्मा असशील तर तुझ्यासाठी मी काय करावे अशी तुझी इच्छा आहे ते मला सांग. या जगात जे जे कोणी संत्रस्त असतील त्यांना मदत करणे व आधार देणे हा माझा व्यवसाय असल्यामुळे, परलोकातही ज्यांना गरज असेल आणि जे स्वतःचा उद्धार स्वतः करू शकत नसतील त्यांना मदत करणे आणि दुःखमुक्त करणे हे माझे कर्तव्य आहे." त्याने खालून उत्तर दिले, "महाराज, माझ्याशी बोलणारे आपण माझे धनी डॉन क्विक्झोट असाल हे खचित. आपल्या आवाजावरून दुसरा कोणी माणूस बोलत नाही हे उघड आहे." शिलेदारजींनी उत्तर दिले, "माझे नाव डॉन क्विक्झोट आहे. केवळ जिवंत माणसानाच नव्हे तर मेलेल्या माणसांनाही त्यांच्या अडचणीच्या वेळी मदत करणे हे माझे कर्तव्य आहे, असे मी समजतो. तू माझे मन विस्मयाने भरून टाकीत आहेस. म्हणून तू कोण आहेस, हे मला सांग. तू जर माझा

सेवक सँको पँझा असशील– मेलेला असशील– पण सैतानाच्या तावडीत सापडलेला नसशील– आणि ईश्वराच्या कृपेने 'शुद्धीकरणाच्या' लोकात असशील, तर आपली 'माता' व रोमन कॅथॉलिक चर्च तू सहन करीत असलेल्या यातनातून तुला मुक्त करण्यास पूर्ण समर्थ आहे. तुझ्या वतीने, माझ्या प्रतिष्ठेला धरून, मी तिची प्रार्थना करीन. म्हणून तू कोण आहेस हे मला लौकर सांग. चल, पुढे चल. " याला प्रतिसाद आला, " आपण सांगाल त्याची शपथ घेऊन मी सांगतो की, मी आपला सेवक सँको पँझा आहे आणि मी माझ्या आयुष्यात कधीच मेलेलो नाही. मी माझे राज्य सोडताच– त्याची कारणे आपल्याला सांगण्यास मला आता सवड नाही– गेल्या रात्री दुर्दैवाने मी या गुहेत पडलो. येथे अजून मी आहे आणि माझ्याबरोबर डॅपल आहे. तो मला खोटे बोलू देणार नाही. मी म्हणतो याचा आणखी पुरावा म्हणजे तो येथे आहे. " पुढे असे चमत्कारिक घडले की, आपला मालक काय म्हणत आहे हे जणु काही समजल्यामुळे, त्याच्या पुराव्याला पाठिंबा देण्यासाठी ते गाढव इतक्या मोठमोठ्याने ओरडू लागले की, त्याच्या आवाजाने ती सारी गुहा पुन्हा निनादू लागली. डॉन क्विक्झोट म्हणाले, " योग्य साक्षीदार ! त्याचे ओरडणे मला माहीत आहे – जणू काही मी त्याचा जनकच आहे. सँको, तुझा आवाजही मला माहीत आहे. तू माझा खरा सेवक आहेस हे मी जाणतो. म्हणून तेथेच थांब. मी किल्ल्यावर जातो – तो जवळच आहे आणि तेथून काही माणसे आणतो, म्हणजे या खड्ड्यातून वर येण्यास ती तुला मदत करतील. तुझ्या पातकांनी तुला या खड्ड्यात लोटले आहे हे निःसंशय. " सँको म्हणाला, " महाराज, घाई करा आणि शक्य तितक्या जल्दीने परत या अशी माझी विनंती आहे. कारण येथे जिवंत पुरले जाण्याच्या यातना मी यापुढे सहन करू शकत नाही. भयाने मी येथे मरत आहे. "

डॉन क्विक्झोट अत्यंत वेगाने किल्ल्याकडे गेले आणि त्यांनी ड्यूक व डचेस यांना सँकोच्या अपघाताचा वृत्तांत निवेदन केला. त्याचे त्यांना मोठे आश्चर्य वाटले. कोणाच्या स्मरणात नसेल अशा वेळी खोदलेल्या त्या गुहेच्या तोंडात तो सहज पडला असावा अशी त्यांनी कल्पना केली. पण त्यांना मोठे आश्चर्य वाटले ते याचे की, तो परत आल्याची आपल्याला बातमी मिळण्यापूर्वीच त्याने राज्यत्याग केला.

सारांश, त्यांनी आपल्या सेवकाबरोबर दोरखंड वगैरे साधने त्याला वर काढण्यासाठी पाठविली. शेवटी पुष्कळ त्रास सोसल्यावर व खूप श्रम केल्यावर, तो व त्याचा डॅपल दोघेही त्या अंधाऱ्या खड्ड्यातून सूर्यप्रकाशाचा पूर्ण उपभोग घेण्यासाठी वर आले. त्यावेळी जवळच उभा असलेला एक विद्वान, त्याला वर येताना पाहून, म्हणाला, " अशाच रीतीने सारे वाईट राज्यपाल आपल्या राज्यातून वर आले पाहिजेत. या खोल दरीतून हा अभागी जीव वर उचलून आणला आहे आणि तो फिक्कट, अर्धपोटी उपाशी, आणि माझ्या कल्पनेप्रमाणे, खिशात एकही नाणे नसलेला असा आहे. " सँको, म्हणाला, " भल्या निंदका, ऐक. मला मिळालेल्या बेटाचे राज्य मी आठ–दहा दिवस करीत होतो, त्या सर्वकाळी माझे पोट फक्त एकदाच भरत असे. वैद्यांनी माझा छळवाद

मांडला, वैऱ्यांनी मला पायाखाली तुडविले आणि माझी हाडे मोडली. लाच घेण्याला किंवा न्यायाने मिळणाराही पैसा घेण्याला मला सवडच नव्हती. या सर्व गोष्टींचा विचार केला असताना मला असे वाटते की, या रीतीने मी राज्यातून बाहेर येणे योग्य नव्हते. पण माणूस योजना करतो आणि ईश्वर निराशा करतो. आपणा सर्वांच्या दृष्टीने उत्तम काय आहे, हे ईश्वराला उत्तम समजते. जसा काळ येईल तसा आपण पत्करला पाहिजे आणि आपल्या नशिबी जे येईल ते स्वीकारले पाहिजे. हे पाणी मी आणखी पिणार नाही, असे कोणाही माणसाने म्हणू नये. पुष्कळ माणसे आपल्या कोंबडीची अंडी पिकण्यापूर्वी पिलांचा हिशेब करीत असतात. जेव्हा त्यांना डुकराचे मांस मिळण्याची आशा असते, तेव्हा त्यांना फुटलेली हाडे मिळतात. माझ्या मनात काय आहे, हे ईश्वराला माहीत आहे. मी पुष्कळ बोलू शकेन, पण आता अधिक बोलत नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, तू स्वतःला त्रास करून घेऊ नकोस. दुसरी माणसे काय म्हणतील याचा तू विचार करू नकोस, केलास तर तुला काहीच कार्य करता येणार नाही. आपले मन स्वच्छ असले म्हणजे झाले–मग जग हवे ते बोलो–त्याला तसे बोलण्याची सवयच आहे. वाऱ्याला बांधून ठेवण्याइतकेच निंदकाच्या जिभा बांधून ठेवणे कठीण आहे. एखादा राज्यपाल आपल्या राज्यातून गबर होऊन परत आला, तर लोक म्हणतात, याने जनतेला लुटले–ओरबाडले, उलट तो गरीब होऊन परत आला तर ते म्हणतात, हा रिकामटेकडा मूर्ख आहे–नालायक कारभारी आहे." सँको म्हणाला, "ते मला उथळ मूर्ख म्हणून माझ्यावर हल्ला करतील हे खचित. पण मला चोर–लुटारू कोणी म्हणणार नाहीत. त्या शब्दांचा मला तिटकारा आहे. ते शब्द मला साऱ्या जगाने लावले तर मी त्याचा धिक्कार करीन."

अशा तऱ्हेने त्यांचा संवाद चालला असताना मुलांचा आणि रिकामटेकड्यांचा जमाव त्यांचेभोवती गोळा झाला. शेवटी ते किल्ल्यावर जाऊन पोहोचले. शिलेदार व सेवक यांची वाट पहात ड्यूक व डचेस सज्ज्यात उभे होते. आपले गाढव तबेल्यात गेले आहे आणि त्याला चारा पाणी मिळाला आहे, हे पाहीपर्यंत सँको ड्यूकला भेटण्यास वर जाणार नव्हता. तो म्हणाला, "या गरीब जनावराला काल रात्री त्या मुक्कामात फार दुःख भोगावे लागले." त्याची व्यवस्था करून तो ड्यूक व डचेस यांच्याकडे गेला आणि गुडघे टेकून त्यांना म्हणाला, "महाराज आणि महाराणीसाहेब, आपली इच्छा आणि मर्जी होती म्हणून, मी बॅराटेरिया या आपल्या बेटाचे राज्य करण्यासाठी गेलो. त्याला माझ्या गुणापेक्षा आपला भलेपणाच अधिक कारण आहे. मी त्या बेटात नागव्याने प्रवेश केला आणि नागव्यानेच त्या बेटातून बाहेर आलो. मी काही कमावले नाही की गमावले नाही. मी तेथे राज्य चांगले केले की वाईट केले, हे सांगणारी माणसे फार दूर नाहीत. त्यांची मर्जी असल्यास त्यांनी सांगावे. माझ्यापेक्षा तीच चांगली सांगू शकतील. मी संशयास्पद प्रकरणे सोडविली, कायद्याच्या खटल्यांचा निकाल दिला, पण सर्व वेळ मी भुकेने मरण्यास तयार होतो. त्या बेटावरील राज्यपालांचा खास वैद्य टिर्टीफ्युराचा

डॉ. पेड्रो रेझिओ याची तशी इच्छा होती. रात्रीच्या वेळी शत्रू आमच्या उरावर बसले आणि त्यांनी आमच्यावर मोठे संकट आणले. माझ्या शस्त्राच्या सामर्थ्याने त्या शत्रूवर विजय मिळाला आणि आपण संकटातून मुक्त झालो, असे त्या बेटातील लोक म्हणतात. ते जर खरे बोलत असतील तर ईश्वर त्यांची भरभराट करो. थोडक्यात म्हणजे, त्या अवधीत, शासनाच्या उद्योगात ज्या ज्या चिंता येतात आणि भार सहन करावे लागतात, त्या सर्वांचा अनुभव मी घेतला. त्यावरून ते ओझे मला असह्य आहे असे मला आढळून आले. राज्यकर्ता म्हणून माझी मूर्ती कधीच घडविली गेली नाही. गुंतागुंतीच्या कारभारात ढवळाढवळ करण्याइतका मी चलाख नाही. म्हणून राज्याने मला सोडण्यापूर्वी राज्य सोडण्याचा मी निश्चय केला. आणि त्याप्रमाणे काल सकाळी मी ते बेट सोडले. मी त्या बेटात ज्या रस्त्याने, ज्या घराजवळून आणि त्यावरील ज्या छपराजवळून मी गेलो, त्याच मार्गाने मी बाहेर पडलो. उसने पैसे कोणाकडून मी मुळीच मागितले नाहीत आणि आपत्तीच्या वेळी उपयोगी पडावेत म्हणून मी पैसे साठविलेही नाहीत. खरे म्हणजे पुष्कळ उपयुक्त हुकूम सोडण्याचा माझा विचार होता, पण ते पाळले जाणार नाहीत अशा भयाने मी ते सोडले नाहीत. हुकूम पाळले गेले नाहीत तर ते करणे काय अन् न करणे काय-दोन्ही सारखेच. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे माझ्या डॅपलशिवाय दुसऱ्या कोणालाही बरोबर न घेता मी त्या बेटातून बाहेर आलो आणि गुहेत पडलो—खूप खाली गेलो. आज सकाळी सूर्याच्या प्रकाशात मला बाहेर जाण्याचा मार्ग दिसला. तो सोपा नव्हता. माझे धनी डॉन क्विक्झोट यांना माझ्या मदतीस ईश्वराने पाठविले नसते तर मी तेथेच कल्पांतापर्यंत राहिलो असतो. पण ड्यूकसाहेब नि डचेसराणीसाहेब, हा आपला राज्यपाल सँको पँझा पुन्हा येथे आलो आहे. दहा दिवसांच्या राज्यकारभारामुळे तो असा धडा शिकला आहे की, एका बेटाचाच काय पण सर्व विश्वाचा राज्यपाल होण्यासाठी गवताची काडीसुद्धा देऊ नये. आपण मला इतके बोलू दिले तेव्हा मी आपल्या हाताचे चुंबन घेऊन त्या राज्यातून माझ्या जुन्या धन्याच्या सेवेकडे पुन्हा उडी घेतो. जेव्हा मुले बेडूकउडीचा खेळ खेळतात तेव्हा म्हणतात, " तू उडी मार अन् मग मला मारू दे. " तसे माझे झाले आहे. माझ्या धन्याबरोबर मी मोठ्या भीतीने पाव खातो पण त्याने माझे पोट भरते—मग ते गाजराने भरो की मांसाने भरो. "

अशा प्रकारे सँकोने आपले लांबलचक भाषण पुरे केले. तो आपल्या भाषणात हजारो आचरट गोष्टी सांगेल असे भय डॉन क्विक्झोट यांना एकसारखे वाटत होते. पण त्याने थोडक्यात आपले भाषण आटोपले हे पाहून त्यांनी मनातल्या मनात देवाचे आभार मानले. ड्यूकने सँकोला मिठी मारली अन् ते म्हणाले, " तुम्ही इतक्या लौकर राज्य सोडले याचे मला अत्यंत दुःख वाटते. यापेक्षा कमी त्रासाचा आणि अधिक फायद्याचा दुसरा काही उद्योग मी तुम्हाला देईन. " डचेसनेही तसाच प्रेमळपणा दाखविला आणि आपल्या सेवकांना हुकूम सोडला, " यांना फार दुखापती झाल्या आहेत आणि त्यांचे मन अस्वस्थ झाले आहे, तरी त्यांना कशाचीही उणीव पडू देऊ नका."

□ □

प्रकरण ५६

# प्रौढा डोन्ना रोड्रिगेझच्या कन्येच्या समर्थनार्थ ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आणि हुजऱ्या टोसिलॉस यांच्यामधील अलौकिक व अकारण संग्राम

सँकोच्या राज्यकारभाराच्या नाटकांतील हा अंक चांगला रंगला गेला, याबद्दल ड्यूक व डचेस यांना खेद वाटला नाही. त्याच दिवशी आलेल्या कारभाऱ्याने, राज्यपालाने आपल्या कारभारामध्ये काय काय केले व म्हटले, याचा खडान्‌खडा आणि स्पष्ट वृत्तांत त्यांना निवेदन केला. तसे करताना त्याने सँकोचे प्रत्यक्ष शब्द उच्चारले आणि सँकोने उच्चारलेले अक्षरन्‌अक्षर त्याने म्हणून दाखविले. शेवटी बेटावरील हल्ल्याचे वर्णन करून सँकोच्या घाबरगुंडीचे व राज्य-त्यागाचे चित्रण त्याने केले. त्यामुळे झालेली करमणूक त्यांना मानवण्यासारखीच होती.

आता या इतिहासात असे सांगितलेले आहे की, संघर्षाचा नियोजित दिवस आला, तेव्हा आपला हुजऱ्या टोसिलॉस याला डॉन क्विक्झोट यांना कसे जिंकावे आणि तरीही त्यांना घायाळ करू नये व ठार मारू नये याच्या जरूर त्या सर्व सूचना देण्यास ड्यूक विसरला नाही. त्यासाठी त्याने असे हुकूम सोडले की, भाल्याचे पोलादी फाळ काढून घ्यावेत. डॉन क्विक्झोट यांना त्याने समजावून सांगितले की, " ज्या खिस्ती धर्माविषयी तुम्हाला मोठा आदरभाव वाटतो, त्याला अशा संघर्षामुळे प्रतिस्पर्ध्यांचे जीव धोक्यात यावेत हे मंजूर नाही. माझ्या प्रदेशात द्वंद्वयुद्ध खेळू दिले म्हणजे पुरे. आपल्या पवित्र धर्मसंस्थेच्या आज्ञेशी हे विसंगत आहे. अशी आव्हाने देण्याला धर्माचा विरोध आहे. म्हणून आपण हे प्रकरण फार धसास लावू नये, अशी माझी इच्छा आहे. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " सर्व गोष्टींचा निर्णय करण्याची एकमेव सत्ता महाराजांच्या हाती आहे. आपली आज्ञा पालन करणे एवढेच माझे कर्तव्य. "

आता तो भयंकर दिवस उगवला. संग्रामाच्या न्यायाधीशासाठी आणि फिर्यादी प्रौढा व तिची मुलगी यांच्यासाठी ड्यूकने एक प्रशस्त चौथरा उभा करविला होता.

सामन्याचा हा नवा व अजब प्रकार पाहण्यासाठी आसपासच्या साऱ्या गावांतून आणि खेड्यांतून असंख्य लोक गोळा झाले होते. असा सामना पूर्वी कोणी पाहिलेला नव्हता किंवा जिवंत अथवा मेलेल्या माणसाने त्या मुलुखात तो कधी ऐकलाही नव्हता. चौथऱ्याच्या कठड्यापाशी प्रथम आला तो त्या मैदानाचा लष्करी अधिकारी. जमिनीची

पाहणी करण्यासाठी तो आला होता. कोणी काही खोडी केली नाही ना ? किंवा सामनेवाल्यांनी अडखळून पडावे म्हणून गुप्त भोके किंवा काही क्लुप्त्या केल्या नाहीत ना ? हे पाहण्यासाठी तो तेथे हिंडला. त्याच्यानंतर प्रौढा व तिची मुलगी आली. त्या आपापल्या जागी बसल्या. त्या अत्यंत शोकाकुल होत्या. त्यांचे बुरखे त्यांच्या डोळ्यापर्यंत ओढलेले होते आणि त्यांच्या छातीवर रुळत होते. त्यामुळे त्यांच्या दुःखाचे मोठे प्रदर्शन होत होते. इतक्यात त्या मैदानाच्या एका टोकाशी अद्वितीय वीर पुरुष ला मांचा येथील डॉन क्विक्झोट दाखल झाले. थोड्या वेळाने दुसऱ्या टोकाशी तो रुबाबदार हुजऱ्या टोसिलॉस, एका उमद्या घोड्यावर स्वार होऊन पुष्कळ तुताऱ्यांच्या आवाजात, तेथे प्रवेश करता झाला. त्यावेळी प्रत्यक्ष पृथ्वी थरथरा कापू लागली. त्याच्या शिरस्त्राणाची नाकपट्टी खाली होती आणि तो चकचकीत चिलखतासह नखशिखांत सशस्त्र होता. त्याचा पिसवांनी पीडलेला घोडा फ्रीसलँडच्या पैदाशीचा दिसत होता. त्याच्या प्रत्येक टापेपाशी बरीच लोकर होती. तो पराक्रमी प्रतिस्पर्धी पुढे सरसावला. त्याला त्याचा धनी ड्यूक याने चांगले पढविले होते. "ला मांचा येथील शूर डॉन क्विक्झोट यांच्याशी कसे वागावे—काही झाले तरी त्यांचे प्राण वाचविलेच पाहिजेत – म्हणजे तुझ्या पहिल्या सामन्यात तुला धक्का बसणार नाही. तू त्यांच्यावर सरळ हल्ला केलास तर, तो प्राणघातक ठरेल." इत्यादी उपदेश ड्यूकने त्याला केला. टोसिलॉसने कठड्याभोवती एक चक्कर मारली आणि शेवटी त्या दोन स्त्रियांच्या अगदी समोर तो थांबला. त्याला लग्नासाठी मागणी घालणाऱ्या त्या मुलीकडे त्याने वक्र नजरेने पाहिले. नंतर त्या लष्करी अधिकाऱ्याने डॉन क्विक्झोट यांना बोलावले आणि टोसिलॉसच्या समक्ष त्या मायलेकींना विचारले, "तुमचा हक्क शाबीत करण्याचा अधिकार ला मांचा येथील डॉन क्विक्झोट यांना आहे ना ? तुमच्या या कैवाऱ्याचे यशापयश तुम्ही आपले मानाल ना ?" त्यांनी 'होय' म्हटले आणि "ते आमच्या वतीने जे जे काही करतील ते आम्ही चांगले व कायदेशीर मानू." असे सांगितले.

एवढ्यात ड्यूक व डचेस सज्जात बसले. तो सज्जा त्या कठड्याच्या वर होता. त्या कठड्याभोवती प्रेक्षकांचा मोठा थवा बसला होता. पूर्वी कधी न पाहिलेला तो आवेशपूर्ण संग्राम पाहण्यासाठी सर्वजण उत्सुक होते. संग्रामाच्या अटी अशा होत्या – डॉन क्विक्झोट विजयी झाले तर त्यांच्या प्रतिस्पर्ध्याने डोन्ना रोड्रिगेझच्या कन्येशी विवाह करावा, पण शिलेदारजी पराभूत झाले तर त्या विजेत्याला आपल्या वचनातून मुक्त करावे. त्याने तिला कोणतीही नुकसानभरपाई देण्याचे कारण नाही. नंतर त्या दोघांनी द्वंद्वयुद्धास जेथून प्रारंभ करावयाचा, त्या जागेवर त्या लष्करी अधिकाऱ्याने त्या दोघांना आणून ठेवले. जमिनीचा फायदा दोघांनाही सारखाच मिळावा अशा बेताने त्याने त्यांची स्थाने ठरविली होती. कोणाच्याही डोळ्यावर ऊन येऊ नये, अशी व्यवस्था त्याने केली होती.

आणि आता नगारे वाजू लागले. तुताऱ्यांच्या ललकाऱ्यांनी सारे आकाश निनादून

गेले. त्या योद्धयांच्या पायाखालील जमीन हादरू लागली. असंख्य प्रेक्षकाची अंतःकरणे उत्कंठित झाली. काहींना भीति वाटू लागली, तर काहीजण या लढ्याचा बरा-वाईट परिणाम काय होतो याची वाट पाहात बसले. डॉन क्विक्झोट मनोभावाने ईश्वराला आणि टोबोसोच्या लेडी डल्सीनियाला शरण गेले आणि लढ्याचा इशारा प्रत्यक्ष केव्हा दिला जातो याची वाट पहात उभे राहिले. पण त्या हुजऱ्याच्या मनात दुसरेच विचार चालले होते. ते कशासंबंधी होते, हे मी आता आपल्याला सांगणार आहे.

आपल्या वैरिणीकडे पहात असताना त्याला असे वाटले की, आपण आपल्या साऱ्या आयुष्यात पाहिलेल्या स्त्रियांमध्ये ही अत्यंत सुंदर आहे. जग ज्याला 'मदन' असे नाव देते, त्या चिमण्या व आंधळ्या तिरंदाजाने त्याच्यावर आपला बाण सोडला. एखाद्या हुजऱ्याच्या हृदयावर जय मिळविण्यातही त्याला आनंद वाटतो. कोणाला दिसत नसताना तो त्या हुजऱ्याजवळ गुपचुप गेला आणि त्या बिचाऱ्या हुजऱ्याचे हृदय त्याने आरपार भेदून टाकले. त्या खोडसाळ मुलाला ते सहज शक्य होते. कारण, मदन अजिंक्य असतो आणि आपल्या इच्छेस येईल तेथे मोकळेपणाने आणि अतर्क्य गतीने जाण्या-येण्यास तो समर्थ असतो. म्हणून तुमच्या लक्षात येईल की, जेव्हा युद्धाचा इशारा दिला गेला, तेव्हा हा हुजऱ्या परमानंदात निमग्न होता आणि आपल्या सुंदर वैरिणीच्या सौंदर्याच्या विचाराने बेभान झालेला होता. त्यामुळे तुतारीच्या ललकारीकडे त्याचे लक्ष गेले नाही. त्याच्या अगदी उलट स्थिती डॉन क्विक्झोट यांची होती. तुतारीचा आवाज कानी पडताच त्यांनी आपल्या घोड्याला टाच मारली आणि रोझिनांट नेईल तितक्या त्वरेने आपल्या शत्रूकडे धाव घेतली.

ते युद्धास सुरुवात करणार असे पाहताच त्यांचा भला सेवक सँको पँझा मोठ्याने ओरडला, "ईश्वर आपल्याला वाट दाखवो! आपण शिलेदारीचा तुरा आणि गाभा आहा. आपल्या बाजूस न्याय आहे, म्हणून ईश्वर आपल्याला जय देईल." डॉन क्विक्झोट आपल्यावर चालून येत आहेत हे टोसिलॉसने पाहिले. पण त्यांचेशी सामना देण्यासाठी पवित्रा घेण्याऐवजी, ती जागा न सोडता त्याने त्या लष्करी अधिकाऱ्याला शक्य तितक्या मोठ्या स्वरात पाचारण केले. त्याला काय हवे आहे हे पाहण्यासाठी तो अधिकारी त्याचेजवळ गेला. तेव्हा टोसिलॉस त्याला म्हणाला, "मी त्या पलीकडच्या तरुण मुलीशी लग्न करावे किंवा येथून निघून जावे या अटीवर हे द्वंद्व-युद्ध खेळले जात आहे ना?" अधिकाऱ्याने उत्तर दिले, "होय." हुजऱ्या म्हणाला, "मी जर हे द्वंद्वयुद्ध करण्यास पुढे सरसावलो तर माझ्या बुद्धीवर भार पडल्यासारखा मला वाटेल आणि मला पुष्कळ गोष्टींचा जाब द्यावा लागेल, याची मला जाणीव आहे. म्हणून मी पराभूत झालो हे मान्य करतो आणि याच क्षणी त्या युवतीशी लग्न करण्याचे कबूल करतो."

अधिकाऱ्याला नवल वाटले. ड्यूकच्या त्या साऱ्या कारस्थानाची माहिती त्याला होती. त्यामुळे हुजऱ्याच्या अकल्पित कबुलीमुळे तो फार गोंधळून गेला. त्याला काय

उत्तर द्यावे हे त्याला कळेना. उलट, आपला प्रतिस्पर्धी बचावाच्या पवित्र्यात उभा नाही असे पाहून डॉन क्विक्झोट मध्येच थांबले. द्वंद्वयुद्धाचा कारभार का थांबला, याची काहीच कल्पना ड्यूकला करता येईना. पण त्या अधिकाऱ्याने त्याला हुजऱ्याचे म्हणणे सांगितल्यावर ड्यूकला मोठे आश्चर्य वाटले आणि तो फार संतापला. मध्यंतरी, टोसिलॉस हा डोन्ना रोड्रिगेझकडे जाऊन म्हणाला, "बाईसाहेब, मी आपल्या मुलीशी लग्न करण्यास राजी आहे. त्यासाठी कोर्ट-कचेऱ्या करण्याची किंवा द्वंद्वे खेळण्याची काही गरज नाही. कोणाचेही शरीर आणि जीव धोक्यात न घालता मी हे सारे प्रकरण शांततेने मिटवू इच्छितो." हे ऐकून शूर डॉन क्विक्झोट म्हणाले, "असे जर असेल, तर मी माझ्या वचनातून मुक्त होत आहे. देवाचे नाव घेऊन त्यांना लग्न करू द्या. ईश्वर त्यांना आशीर्वाद व आनंद देवो." त्याच वेळी ड्यूक त्या युद्ध-भूमीवर आला आणि टोसिलॉसला म्हणाला, "शिलेदारजी, तुम्ही लढा न करताच शरण गेला हे खरे आहे काय ? हे मला सांगा. आपल्या भित्र्या स्वभावाच्या प्रेरणेने तुम्ही या युवतीशी लग्न करण्याचे ठरविले आहे काय ?" टोसिलॉसने उत्तर दिले, "होय, महाराजांनी अनुज्ञा दिली तर तसे होईल." सँको म्हणाला, "खुशाल लग्न करा. तोच सर्वात शहाणपणाचा मार्ग आहे. कारण, म्हण अशी आहे, 'उंदराला जे मिळेल ते त्याने मांजराला द्यावे आणि कटकटीतून सुटावे !" तोपर्यंत टोसिलॉसने आपले शिरस्त्राण मोकळे करण्यास सुरुवात केली. ते लौकर काढण्यास मदत करण्यासाठी कोणी यावे, अशी हाक त्याने दिली. त्या सशस्त्र वेषाने तो इतका गुदमरून गेला होता की, तो श्वासोच्छ्वास करू शकत नव्हता. तेव्हा इतरांनी अत्यंत त्वरेने त्याचे शिरस्त्राण काढून घेतले. मग त्या हुजऱ्याचे तोंड सर्वांना स्वच्छपणे दिसू लागले. ते पाहताच प्रौढा रोड्रिगेझ व तिची मुलगी दोघीही किंचाळल्या, "लबाड, लबाड ! माझ्या कायदेशीर नवऱ्याचे सोंग घेऊन हा टोसिलॉस—ड्यूकचा हुजऱ्या—येथे आला आहे. देवाने आणि राजाने आम्हाला न्याय द्यावा. द्वेष व विश्वासघात यांचे हे कृत्य आम्ही सहन करू शकत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "स्त्रियांनो, तुम्ही स्वतःला त्रास करून घेऊ नका. या प्रकरणात द्वेष नाही आणि विश्वासघातही नाही. आणि जर असेल, तर त्याचा दोष ड्यूककडे नाही. माझा छळ करणारे दुष्ट बुद्धीचे मांत्रिक हेच खरे विश्वास-घातकी आहेत. या युद्धामुळे मला जी कीर्ति मिळाली असती, तिचा मत्सर वाटून त्यांनी माझ्या प्रतिस्पर्ध्याचे तोंड बदलून टाकले. हा ड्यूकचा हुजऱ्या आहे, हे तुम्ही पाहताच." नंतर त्या मुलीकडे वळून ते म्हणाले, "बाळे, माझा सल्ला ऐक. माझ्या शत्रूंनी—मांत्रिकांनी—नीचपणा दाखविला असला तरी तू त्याच्याशी लग्न कर. कारण, आपला पती म्हणून तू ज्याच्यावर हक्क सांगतेस, तोच हा माणूस आहे, अशी ग्वाही मी देतो."

ड्यूकने हे बोलणे ऐकले. तो रागावला होता तरी त्याच्या साऱ्या रागाचे विसर्जन हास्यात झाले. त्याला आपले हसू दाबता येईना. तो म्हणाला, "महान् डॉन क्विक्झोट यांच्यावर दररोज इतके असामान्य अनर्थ कोसळत आहेत की, हा माणूस

माझ्या हुजऱ्यासारखा दिसत असला तरी, तो तसा नाही असे मानण्याकडे माझ्या मनाचा कल होत आहे. पण आपल्या समाधानासाठी आपण हे लग्न एक पंधरवडा पुढे ढकलू या. त्या काळात, आपणा सर्वांना गोंधळात टाकणाऱ्या या माणसाला पक्क्या बंदोबस्तात ठेवू या. कदाचित् त्या काळानंतर तो आपले पहिले स्वरूप पुनः धारण करील. कारण, त्या खोडसाळ मांत्रिकांचा थोर डॉन क्विक्झोटविषयीचा द्वेष फार काळ टिकून राहणार नाही हे निःसंशय. अशा लबाडयांचा आणि रूपांतरांचा काहीच उपयोग होत नाही असे त्यांना कळून येईल. " सँको म्हणाला, " महाराज, आपल्याला वाटते तितक्या लौकर हे सैतानाचे भयंकर दूत थकणार नाहीत. जेथे माझ्या धन्याचा प्रश्न असेल तेथे ते कोणालाही कोणतेही रूप देतात आणि याला त्याच्यासारखे व त्याला याच्यासारखे बदलतात. माझ्या धन्याने ज्याच्यावर जय मिळविला, त्या 'दर्पणयुक्त शिलेदाराचे.' रूप थोडयाच काळापूर्वी त्यांनी आमच्या एका मित्राच्या स्वरूपासारखे केले. आमच्या खेडयातील पंडित सॅम्सन कॅरॅस्को याचे रूप त्याला दिले. आमची स्वामिनी–टोबोसोची लेडी डल्सीनिया– हिच्यावर जादू करून तिला त्यांनी एका साध्या खेडवळ तरुणीचे रूप दिले. म्हणून मला असे खात्रीने वाटते की, हा गमत्या माणूस हुजऱ्या म्हणून मरेल आणि आपल्या सर्व आयुष्यात हुजऱ्या म्हणूनच जगेल. " ती मुलगी म्हणाली, " ठीक आहे. तो कोणीही असो. त्याला जर मी पाहिजे असेन, तर मला तो पाहिजे आहे. मी त्याचे आभार मानले पाहिजेत. कारण, शिष्ट माणसाची टाकलेली बाई होण्यापेक्षा हुजऱ्याची बायको होणे मला आवडेल. शिवाय ज्याने मला फसविले तोही काही सभ्य माणूस नव्हता. "

सारांश, एकंदर प्रकरणाचा निष्कर्ष असा झाला की, टोसिलॉसला बंधनात ठेवावे आणि त्याच्या रूपांतराचे काय होते हे पहावे. सर्वानुमते डॉन क्विक्झोट विजेते झाल्याची घोषणा झाली. नंतर लोक निघून गेले. त्यांपैकी पुष्कळजण खिन्न झाले होते. कारण, त्यांची करमणूक करण्यासाठी सामनेवाल्यांनी एकमेकांचे तुकडे केले नव्हते. तरुणांच्या जमावाला अशी सवय लागलेली होती की, एखाद्या माणसाला फाशी जाताना पाहाण्यासाठी आपण आलो असलो आणि ज्याच्यावर अन्याय झाला त्याने किंवा मॅजिस्ट्रेटने त्याला क्षमा केली, तर प्रेक्षकांना दुःख व्हावे. सारा जमाव पांगल्यानंतर ड्यूक व डचेस हे डॉन क्विक्झोटसह आपल्या किल्ल्यात गेले. टोसिलॉसला पकडून बंदीवासात ठेवण्यात आले. या साऱ्या प्रकरणाचा शेवट, या ना त्या प्रकारे, विवाहात होणार हे पाहून डोन्ना रोड्रिगेझ व तिची कन्या यांना मोठा आनंद झाला. विवाहाच्या आशेने टोसिलॉसचे मन खुशालून गेले.

▣ ▣

## प्रकरण ५७

# डॉन क्विक्झोट यांनी ड्यूकचा निरोप कसा घेतला आणि डचेसची चतुर व चवचाल दासी आल्टिसिडोरा व डॉन क्विक्झोट यांच्यामध्ये काय घडले त्याचा वृत्तांत

किल्ल्यातील आपल्या आळशी जीवनाचा निरोप घेण्याची वेळ आता आली आहे असे डॉन क्विक्झोट यांना वाटले. ते शिलेदार असल्यामुळे त्या किल्ल्याच्या स्वामीने व स्वामिनीने त्यांच्या करमणुकीसाठी नाना तऱ्हेचे मोहकारी करमणुकीचे प्रकार आणि चमचमीत खाद्यपदार्थ यांचा पाहुणचार त्यांना केला होता. पण आपल्या इंद्रियांची भूक तृप्त करण्यासाठी आपण तेथे स्वतःला कोंडून घेणे, हा महान दोष आहे, असे त्यांना वाटले. आपल्या क्रियाशील व्यवसायाशी अत्यंत विसंगत असलेला जीवनक्रम आपण तेथे घालविल्याबद्दल आपल्याला ईश्वरापुढे खडखडीत जाब द्यावा लागेल, असाही विचार त्यांच्या मनात आला. म्हणून एके दिवशी त्यांनी आपल्या भावना ड्यूक व डचेस यांना कळविल्या आणि तेथून जाण्याची परवानगी देण्याची विनंती केली. त्यांना सोडण्यास ते उभयता अत्यंत नाखूष दिसले पण त्यांनी केलेल्या आर्जवांना अखेरीस ते दोघे शरण गेले. डचेसने सँकोला त्याच्या बायकोची पत्रे दिली. ती कोणी वाचली, तेव्हा त्याने ती ऐकली आणि ऐकता ऐकता तो रडू लागला आणि म्हणाला, " माझ्या बढतीमुळे माझी बायको प्रचंड आशांनी तट्ट फुगली होती. पण शेवटी तिला या परिस्थितीशी तोंड द्यावे लागेल असे कोणाला वाटले असेल ? भूक भागविण्यासाठी नि मोडकी हाडे शोधण्यासाठी माझा धनी 'ला मांचा येथील डॉन क्विक्झोट' याच्यामागे मला पुन्हा रखडत जावे लागेल असे तरी कोणास वाटले असेल ? पण टेरेसाने डचेसकडे ओक फळे पाठवून आपल्याला शोभेसे वर्तन केले हे पाहून मला आनंद वाटतो. तिने ती फळे पाठविली नसती, तर ती एक घाणेरडी, बेइमान, डुकरीण ठरली असती आणि तिला पाहून माझे डोके फिरले असते—भणाणले असते. त्या फळांची भेट ही लाच आहे असे कोणीही माणूस म्हणू शकणार नाही, याचा मला संतोष वाटतो. कारण तिने ती भेट पाठविण्यापूर्वीच मला राज्य मिळाले होते. ज्यांच्यावर कोणी कृपा करतो त्यांनी, लहानशा भेटीच्या रूपाने का होईना, कृतज्ञता व्यक्त करणे योग्य

असते. सारांश, मी माझ्या राज्यात नागवा गेलो आणि त्यातून नागवा बाहेर पडलो. त्याचप्रमाणे माझे हृदय शाबूत ठेवून माझ्या समाधानासाठी मी असे म्हणू शकेन की, मी या दुनियेत नागवा आलो आणि अजून नागवाच आहे. मी काही कमावले नाही की गमावले नाही. ही काही मामुली गोष्ट नाही, हे मी तुम्हाला सांगतो. " तेथून निघण्याचे वेळी सँकोच्या भावना अशा होत्या.

डॉन क्विक्झोट यांनी ड्यूक व डचेस यांचा निरोप रात्रीच गंभीरपणाने घेतला होता. म्हणून दुसरे दिवशी सकाळी त्यांनी आपली खोली सोडली आणि सशस्त्र वेषात ते अंगणात येऊन दाखल झाले. चोहो बाजूंच्या गॅलऱ्यांमध्ये त्यावेळी घरातील माणसांनी गर्दी केली. त्यांना निरोप देण्यासाठी ड्यूक व डचेस हेसुद्धा तेथे आले. सँको आपल्या डॅपलवर बसला होता आणि तो अत्यंत उत्साही व आनंदी दिसत होता. त्याच्याबरोबर त्याचा अंगरखा, त्याची पिशवी आणि त्याचे खाद्यपदार्थ होते. ट्रिफाल्डीचे सोंग घेणाऱ्या कारभाऱ्याने त्याचा खर्च भागविण्यासाठी सोन्याचे दोनशे क्राऊन असलेली थैली त्याला दिली. त्यावेळी डॉन क्विक्झोट यांना हे माहीत नव्हते. आता ते बाहेर पडणार म्हणून प्रत्येकजण त्यांच्याकडे पहात असताना अकस्मात मिस्किल व चतुर आल्टिसिडोरा, डचेसच्या इतर दासींमधून व नोकरांमधून, बाहेर पडली आणि करुण स्वराने त्यांना उद्देशून पुढील चालचलाऊ गीत म्हणू लागली—

## नकली निरोप

१

" थांबा, निष्ठुर डॉन, चालते होऊ नका, किंवा घोड्याला टाच देऊ नका,
कारण तुम्ही घोड्याला देता तो प्रत्येक इशारा मला खोलपर्यंत टोचतो !
एकाद्या लोणी लावलेल्या रोटीची किंवा नागड्या उघड्या साळूची तुम्ही अपेक्षा करीत नाही; मी तर, हाय ! जणु कोकरू आहे, पण प्रेम करते राक्षशिणीसारखी.
व्हीनस नि डायना यांच्याजवळ डोंगरात वा झाडीत उभी राहिली असेल अशा कोणाही तरुणीसारख्या धडधाकट पोरीला तुम्ही फसवलेत नी आता सोडीत आहा.
विश्वासघातकी पिशाच्चा ! अप्सरा मैत्री करीत असता ज्या अर्थी तू तिला
ईनिअससारखी उडवून लावतोस, त्याअर्थी जा, कुजत पड नी मर,
बॅरॅबस चोराबरोबर पापलोकात शिजवून भाजून तळून घे आपल्याला.

२

बिचाऱ्या लहानग्या पक्ष्याचा नाजुक घास पंज्यात धरून उडणाऱ्या
खवखवलेल्या घारीसारखी भरारी मारून तू जातो आहेस.
पांढऱ्या—काळ्या–निळ्या आणि विचित्र रंगांच्या पायांतून
पट्टीचे बंद आणि रात्रीच्या तीन टोप्या यांच्यासह माझ्या हृदयात तू लूट करतोस.

दोन हजार विव्हळणी आणि उष्ण निश्वास तुझ्या खोगीराखाली
कोंबले आहेत, त्यातल्या एकानेही जळत्या डांबरासारखी प्राचीन
इन्निओम नगरी जाळून टाकली असती. विश्वासघातकी पिशाच्चा,
अप्सरा मैत्री करीत असता ज्याअर्थी ईनिअससारखी तू तिला उडवून
लावीत आहेस त्याअर्थी जा कुजत पड नी मर, बॅरॅबस चोराबरोबर
पापलोकात शिजवून, भाजून, तळून घे आपल्याला.

३

तुझ्या विटक्या कांतीपाशी तुझ्या सँकोचे दोंद खेकड्यासारखे
आंबून जावो, नि त्या तिला जादुगाराच्या शापातून सोडवण्यासाठी
तो आपल्या पुष्ट कुल्ल्यांवर कधीही फटके मारून न घेवो.
साऱ्या अपमानाचे नि संशयांचे ओरखडे तुझ्या त्या गबाळ गांवढीवर
चरे पाडोत, आणि तुझ्या दुष्कृत्याखातर तांबरलेल्या नी चट्टे
पडलेल्या चेहऱ्यापासून तिची कधी सुटका न होवो. भाग्याचा
शाप तुझ्या साऱ्या साहसात जास्तच बिघाड आणो, तुझ्या हर्षाचा
खेद करो, तुझ्या बढाया निरर्थक करो, तुझ्या आशांचे हसे करो.
ज्याअर्थी विश्वासघातकी पिशाच्चा, अप्सरा मैत्री करीत असता
ईनिअससारखी तू तिला उडवून लावीत आहेस त्या अर्थी
जा, कुजत पड नी मर, बॅरॅबस चोराबरोबर पापलोकात
शिजवून भाजून तळून घे आपल्याला.

४

कुत्र्यासारखा लपत छपत, अज्ञातपणे डोंगरदऱ्यातून रखडत
जावे लागो तुला-स्पेनपासून कॅलेपर्यंत, उस्कपासून
वेल्सपर्यंत नि वाटेत क्रूसाचे दर्शनही न होवो. सटकण्यात
तू जर इतका चपळ आहेस, नि संपत्तीची आशा करतोस, तर
मग पोरीच्या अभावी नुसती बैठक हलवलीस
तरी तुमान घालवून बसशील. तुझ्या पायाची कुरुपे दुखोत,
मग चाकूने हाडापर्यंत कापून घे. दातदुखी तुला सतावो
की जबडा उपटला तरी ती न थांबो. ज्याअर्थी विश्वासघातकी
पिशाच्चा, अप्सरा मैत्री करीत असता ईनिअससारखी तू तिला
उडवून देतोस, त्या अर्थी जा, कुजत पड नि मर, बॅरॅबस चोराबरोबर
पापलोकात शिजवून, भाजून, तळून घे आपल्याला. ”

अशा प्रकारे आल्टिसिडोराने आपला संताप व्यक्त केला. डॉन क्विक्झोट सर्व वेळ तिच्याकडे गंभीरपणे पहात होते पण त्यांनी एका शब्दाने तिला उत्तर दिले नाही.

सँकोकडे वळून ते म्हणाले, "प्रिय सँको, तुझ्या पूर्वजांचे स्मरण करून मी तुला सत्य सांगण्याची विनंती करतो. या प्रेमवेड्या दासीच्या टोप्या किंवा बंद तुझ्याजवळ आहेत काय हे सांग." सँको म्हणाला, "रात्री घालावयाच्या तीन टोप्या माझ्याजवळ आहेत. पण पायाला बांधावयाच्या बंदांसंबंधी मला चंद्रावरील माणसाहून अधिक माहिती नाही." आल्टिसिडोराच्या या चेष्टेचे काहीच ज्ञान नसल्यामुळे, तिने केलेला हा अतिरेक पाहून डचेसला नवल वाटले. त्या दासीचा स्वभाव मिष्किल व मजेदार आहे, हे तिला माहीत होते. तरी तिला तिच्या या वागण्याचे आश्चर्य वाटले. त्या थट्टेने ड्यूक खूष झाले आणि ती थट्टा पुढे चालविण्याचा त्यांनी निश्चय केला. म्हणून ते डॉन क्विक्झोट यांना उद्देशून म्हणाले, "शिलेदारमहाशय, खरोखर मी आपल्याला सांगतो की, माझ्या किल्ल्यात आपल्याला इतका सादर पाहुणचार मिळाला असताना आपण, दोन बंद सोडले तरी, तीन टोप्या पळवून न्याव्यात—येथे हजर असलेल्या या दासीच्या मालकीचे सामान तुम्ही चोरून न्यावे, या गोष्टीची मी गय करणार नाही. सभ्य गृहस्थाला शोभणारे हे वर्तन नव्हे. आपल्याला जगात ज्या चारित्र्याने रहावयाचे आहे, त्याला धरून हे वर्तन नाही. म्हणून तुम्ही तिचे बंद परत करा. नाही तर मी तुम्हाला प्राण-घेण्या सामन्याचे आव्हान देतो. तुमच्या दुष्टमति मांत्रिकानी माझ्या नोकराचा चेहरा जसा पालटून टाकला तसा ते माझाही चेहरा पालटतील, अशी भीती मनात न बाळगता मी तुम्हाला हे आव्हान देत आहे."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "महाराज, आपण मजवर पुष्कळ उपकार केले आहेत आणि त्याबद्दल मी आपला ऋणी आहे. आपल्यासारख्या सुविख्यात माणसावर मी माझी तलवार उगारू लागलो तर ईश्वराने त्याला प्रतिबंध करावा. महाराज, त्या टोप्या परत करावयास मी लावीन. कारण त्या आपल्याजवळ आहेत असे सँको मला सांगत आहे. पण बंद परत करणे अशक्य आहे, कारण त्याच्याजवळ किंवा माझ्याजवळ ते नाहीत. आपल्या या दासीने आपले सामानसुमान काळजीपूर्वक तपासून पाहिले तर तिला ते सापडतील असे मी खात्रीने सांगतो. महाराज, मी कधीही चोर नव्हतो. ईश्वराने माझा अव्हेर केला नाही तर, माझ्या हातून असा नीच गुन्हा कधीही होणार नाही. आपल्या लक्ष्यात हे आले असेल की, प्रेमात पडलेल्या स्त्रीप्रमाणे ही दासी बोलत आहे आणि मी ज्या बाबतीत निष्पाप आहे, त्याचा आरोप मजवर करीत आहे. तिच्या या लहानशा सूड-बुद्धीबद्दल तिची किंवा आपली क्षमा मी मागण्याची काहीच गरज नाही. माझी आपल्याला एवढीच विनंती आहे की, आपण माझ्याविषयी चांगले मत बाळगावे आणि येथून जाण्यास मला पुनः एकदा परवागी द्यावी."

डचेस म्हणाली, "उदात्त पुरुषा, मी निरोप देते. ईश्वर आपला जीवनक्रम अशा दिशेने चालवो की त्यामुळे आपल्या पराक्रमाच्या शुभवार्ता ऐकून आम्हाला नेहमी धन्य वाटावे. आता तुम्ही जा. देव तुमचा पाठीराखा असो. कारण, जितका अधिक काळ तुम्ही येथे थांबाल, तितक्या तुमच्याकडे निरखून पाहणाऱ्या दासींच्या हृदयातील ज्वाला

भडकतील. या अविचारी तरुण मुलीची मी चांगलीच हजेरी घेईन. त्यामुळे भावी काळात ती एका शब्दाने किंवा नजरेने वाईट वागणार नाही. " आल्टिसिडोरा म्हणाली, " हे पराक्रमी डॉन क्विक्झोटा, आणखी एका शब्दाने मी आपल्याला विनंती करते आणि तुम्ही माझे बंद चोरले असे म्हटल्याबद्दल क्षमा मागते. ते बंद माझ्या पायावर आहेत असे मला विचारांती दिसून येत आहे. परंतु त्यावेळी माझे विचार इकडे-तिकडे भरकटत होते. गाढवावर बसलेला हा जो खेडवळ माणूस आपल्या गाढवाचा शोध करीत होता, तो मला फार आवडला. " सँको म्हणाला, " काय म्हणता ? तुम्ही मला काय समजता ? चोरीचा माल लपवून ठेवणारा मी आहे, असे समजता की काय ? छे तसे मुळीच नाही. तसा मी असतो तर मला माझ्या राज्यात पुष्कळ संधी मिळाल्या असत्या. "

नंतर डॉन क्विक्झोट यांनी आपले मस्तक लवविले आणि ड्यूक, डचेस व इतर सर्व मंडळी यांना नम्रपणे अभिवादन केले. नंतर त्यांनी रोझिनांटला पुढे चालविले. त्यांच्यापाठोपाठ सँको डॅपलवरून गेला. किल्ला सोडून त्यांनी सॅरॅगोस्साची वाट धरली.



## प्रकरण ५८

# डॉन क्विक्झोटवर साहसी प्रसंगांनी कशी गर्दी केली आणि त्यामुळे एकमेकांच्या पायावर पाय टाकून ते कसे आले, याचा वृत्तांत

मोकळ्या शेतातील हवा डॉन क्विक्झोट यांनी पोटात घेतली आणि आल्टिसिडोराच्या प्रेमाच्या चाळ्यातून ते मुक्त झाले. तेव्हा त्यांना वाटले, 'आता आपण मूळपदावर आलो—आपल्या अंतःकरणातील शिलेदारीची वृत्ती पुनः जागृत झाली आहे.' सँकोकडे वळून ते म्हणाले, "मित्रा सँको, परमेश्वराने मानवजातीवर ज्या अमोल देणग्यांचा वर्षाव केला आहे, त्यांपैकी स्वातंत्र्य ही देणगी अमोल आहे. भूगर्भात किंवा सागराच्या अंतर्यामी जी भांडारे लपलेली आहेत, त्यांपैकी कशाचीही तुलना स्वातंत्र्याशी करता येणार नाही. स्वातंत्र्यासाठी माणसाने आपले प्राण आणि आपली प्रतिष्ठा संकटात घालावी—नव्हे, घातली पाहिजे. बंदिवास ही मानवाला सहन न करता येण्यासारखी महान आपत्ती होय. प्रिय सँको, मी तुला हे सांगत आहे याचे कारण, आपल्याला त्या किल्ल्यात मौज-मजा व विपुल खाद्य-पेये मिळत होती, हे तू पाहिले आहेस. पण त्या चमचमीत मेजवानीमध्ये नि त्या मनोवेधक खाद्य-पदार्थांमध्ये आणि बर्फाने थंड केलेल्या त्या मद्यामध्ये असतानाही मला परमावधीची भूक लागल्यासारखे वाटत होते. कारण, ते सर्व माझ्या मालकीचे आहे असे समजून मी त्याचा उपभोग मुक्त मनाने घेऊ शकत नव्हतो. आपल्याला मिळालेल्या उपकाराची योग्य ती फेड करण्याचे बंधन आपल्यावर असते अन् त्यामुळे उदार मनाच्या माणसाला, आपण स्वतंत्र आहो, असे वाटत नाही. ज्या माणसाला आपल्याला मिळालेल्या भाकरीबद्दल फक्त ईश्वरालाच धन्यवाद द्यावे लागतात तो खरा सुखी." सँको म्हणाला, "आपण असले कितीही सुंदर सुंदर शब्द बोलला, तरी ड्यूकच्या कारभाऱ्याने एका लहानशा थैलीत मला जे सोन्याचे दोनशे क्राऊन दिले, त्याबद्दल आपण कृतज्ञ नसणे योग्य नाही. ते क्राऊन माझ्याजवळ आहेत आणि अडचणीच्या वेळी उपयोगी पडतील म्हणून मी ते जिवाभावाने जतन केले आहेत. कोणत्याही अपघातात ते आपल्याला समाधान देऊ शकतील, म्हणून मी ते माझ्या काळजात जपून ठेवले आहेत. किल्ल्यात आपला बडेजाव झाला हे खरे, पण असे किल्ले आपल्याला नेहमीच भेटण्याचा संभव नाही. आपल्याला भेटतील त्या भिकार खानावळी; तेथे आपल्या बरगड्या खिळखिळ्या होतील."

शिलेदारजी व सेवक अशा व इतर विषयांवर बोलत बोलत चालले असताना, मैल दीड मैल जाताच, त्यांना दहा–बारा खेडवळ माणसे काही खात बसलेली दिसली. एका कुरणाच्या मध्यभागी, हिरव्या गवतावर, पसरलेल्या आपल्या अंगरख्यावर ते बसले होते. त्यांच्याजवळच पुष्कळ पांढऱ्या चादरी एकमेकांना लागून पसरलेल्या दिसत होत्या. काही तरी झाकण्यासाठी त्या पसरलेल्या होत्या. डॉन क्विक्झोट त्या लोकांजवळ गेले आणि अदबीने सलाम करून त्यांनी विचारले, "या कापडाखाली काय आहे?" त्यातील एकाने उत्तर दिले, "महाराज, त्या कोरलेल्या मूर्ति आहेत. आमच्या शहरात आम्ही स्थंडिल उभारीत आहो आणि त्यावर या मूर्ति बसवावयाच्या आहेत. त्या खराब होऊ नयेत म्हणून आम्ही त्या झाकल्या आहेत, आणि त्या भंग पावू नयेत म्हणून आम्ही त्या आपल्या खांद्यावरून वाहून नेत आहोत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "आपली इच्छा असल्यास मी त्या मूर्ति आनंदाने पाहीन. आपण त्या ज्या काळजीने नेत आहा, त्यावरून त्या मोलाच्या कलाकृति असाव्यात, असे वाटते." दुसरा म्हणाला, "अर्थात्! त्या तशाच आहेत. नसल्या तर आमची भयंकर फसवणूक झाली असे ठरेल. कारण, त्यामध्ये एकही मूर्ति अशी नाही की, जिच्यासाठी आम्हाला पन्नास ड्यूकॅट मोजावे लागले नाहीत. आणि मी थापाड्या नाही, हे आपण लक्षात घ्यावे. थोडे थांबा. म्हणजे तुम्हाला त्या मूर्ति स्वतःच्या डोळ्यांनी पहाता येतील."

असे म्हणून त्या माणसाने आपले खाण्याचे पदार्थ सोडून तो आपल्या पायावर उभा राहिला आणि त्याने त्यातील एका मूर्तीवरील आच्छादन काढून घेतले. ती मूर्ति घोड्यावर बसलेल्या सेंट जॉर्जची होती. त्याच्या पायाखाली एक साप वेटोळे घालून बसला होता आणि त्या सापाच्या घशात एक भाला खुपसलेला होता. अशा चित्रात नेहमी दिसून येणारा उग्रपणा त्या मूर्तिमध्ये दिसत होता. साऱ्या मूर्ती कशा नव्या, नीटनेटक्या आणि सोन्याच्या पत्र्याप्रमाणे चकाकणाऱ्या होत्या. ती मूर्ती पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "धर्मयुद्धात किंवा चर्चच्या सेनेत जे उत्तमोत्तम शिलेदार आजवर होऊन गेले, त्यांपैकी हा योद्धा आहे. त्याचे नाव डॉन सेंट जॉर्ज असे होते. युवतीचा असामान्य संरक्षक तो होता. बरे, दुसरी मूर्ति कोणाची?" त्या माणसाने ती मूर्ती उघडली. ती अश्वारूढ सेंट मार्टिनची होती. ती पाहताच डॉन क्विक्झोट म्हणाले, "हा शिलेदारही एक साहसी ख्रिश्चन होता. तो जितका पराक्रमी होता त्याहून अधिक उदार होता. आणि सँको लक्षात घे की, त्याने एका गरीबाला आपला अंगरखा फाडून दिला–अर्धा दिला, कारण, ते हिवाळ्याचे दिवस होते. नाही तर त्याने सबंध अंगरखा त्याला दिला असता, इतका तो उदार होता." सँको म्हणाला, "खचित, तसेच असेल, असे मी समजतो. पण माझा तर्क असा आहे की, 'दान करावे पण चांगले आपल्याजवळ ठेवून घ्यावे, याला थोडेसे शहाणपण लागते.' या म्हणीप्रमाणे तो वागला असावा." डॉन क्विक्झोट यांनी स्मित केले. तिसरी मूर्ती त्यांनी दाखवावी अशी इच्छा त्यांनी प्रदर्शित केली. हातात रक्तबंबाळ समशेर घेतलेली आणि पायाने मूर लोकांची डोकी तुडविणाऱ्या

अश्वारूढ स्पेनच्या पेट्रनची ती मूर्ती होती. ती पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "खरोखर, हा एक शिलेदार आहे. जगताचा जो त्राता, त्याच्या सेनेत दाखल होऊन तो लढला. डॉन सेंट जँगो, मॅटो मोरोझ किंवा मूर-हंता डॉन सेंट जेम्स असे त्याला म्हणतात. त्यावेळी पृथ्वीतलावर जे अत्यंत शौर्यशाली साधुसंत होते, आणि शिलेदारीचे नेते होते, त्यांमध्ये त्याची गणना केली पाहिजे."

नंतर त्यांनी आणखी एक मूर्ती उघडली. सेंट पॉल आपल्या घोड्यावरून खाली पडत आहे, असे त्या मूर्तीत दाखविले होते. त्याच्या धर्मांतराच्या कथेत ज्या ज्या गोष्टी नेहमी सांगितल्या जातात, त्याचे दर्शन त्या मूर्तीत घडत होते. ती मूर्ती इतकी हुबेहूब जिवंत भासत होती की, स्वर्गातून येणाऱ्या संदेशाला तो उत्तर देत आहे असे वाटत होते. डॉन क्विक्झोट म्हणाले, "एके काळी चर्च-सेनेचा हा महान् शत्रू होता, पण पुढे तो महान् कैवारी बनला. तसा चर्चचा वाली कधी क्वचितच झाला असेल. तो आपल्या जीवनात खरा शिलेदार होता आणि मृत्यूत स्थितप्रज्ञ संत होता. प्रभूच्या मळ्यातील तो एक कधी न दमणारा कामकरी होता आणि बिगरज्यूंचा उपदेशक होता. स्वर्ग ही त्याची शाळा होती आणि साक्षात् ख्रिस्त हा त्याचा प्रभू नि गुरू होता." आणखी काही मूर्ती नाहीत असे पाहून, आपण पाहिलेल्या मूर्ती झाकून टाकाव्यात असे डॉन क्विक्झोट यांनी त्या माणसांना सांगितले व म्हटले "भल्या दोस्तांनो, मूर्तींचे मला जे दर्शन झाले, तो एक शुभशकुन आहे, असे मानल्याशिवाय मला राहवत नाही. कारण, हे संत आणि हे शिलेदार माझ्याच व्यवसायाचे-युद्धशास्त्राचे-आहेत. त्यांच्या-माझ्या मध्ये एकच फरक आहे आणि तो म्हणजे ते संत होते आणि पावित्र्याच्या-शिस्तीच्या नियमानुसार ते लढले. पण मी पापी आहे आणि माणसासारखा लढत असतो. त्यांनी बळाने स्वर्ग जिंकला-स्वर्ग बळानेच जिंकता येतो. पण हाय! माझ्या श्रमाच्या बळाने मला काय मिळते हे मी अद्याप सांगू शकत नाही. माझी स्वामिनी टोबोसोची डल्सीनिया आपल्या संकटातून मुक्त झाली असती, तर माझ्या नशिबात चांगला फरक पडला असता आणि माझ्या बुद्धीत काही सुधारणा झाली असती, मग आतापेक्षा अधिक चांगला मार्ग मी स्वीकारला असता." सँको म्हणाला, "ईश्वर तसे करो-मग सैतान कितीही आग पाखडो."

डॉन क्विक्झोट यांची आकृती आणि संभाषण यामुळे ती सारी माणसे चकित झाली, पण त्यांच्या संभाषणाचा अर्थ काय, हे त्यांना थोडेही कळले नाही. म्हणून आपले जेवण आटोपल्यावर त्यांनी आपल्या मूर्ति घेतल्या आणि डॉन क्विक्झोट यांचा निरोप घेऊन ते आपल्या प्रवासास पुढे निघाले.

जणू काही आपल्या धन्याला यापूर्वी आपण कधी नीट ओळखलेच नाही, अशा भावनेने सँकोला त्यांच्याविषयी परम आश्चर्य वाटले. या साऱ्या गोष्टी त्यांना कशा माहीत आहेत, याचे नवल करीत तो राहिला. त्यांच्या जिभेच्या शेंड्यावर न खेळणारे असे कोणतेही साहसी कृत्य किंवा इतिहास जगात नसेल असे त्याला वाटले आणि तो

म्हणाला, " धनीसाहेब, खरोखर, आज जे काही घडले त्याला जर साहस म्हणावयाचे असेल, तर आपल्या आजवरच्या साऱ्या संचारामध्ये आपण केलेल्या साहसी कृत्यात हे अत्यंत मधुर आणि आनंददायक आहे. यातून आपण काहीही शारीरिक दुखापत न होता सुखरूपपणे बाहेर पडलो आहोत. आपल्याला आपल्या शस्त्रांना हातही घालावा लागला नाही आणि पृथ्वी आपल्या प्रेतानी दबली नाही. येथे आपण शाबूत आणि सुरक्षित आहो-तहानभुकेचा त्रास नाही. हे सारे मी माझ्या डोळ्यांनी पाहिले. याबद्दल प्रभूची प्रशंसा केली पाहिजे." डॉन क्विक्झोट म्हणाले, " तू चांगले बोललास. पण मी तुला हे सांगितले पाहिजे की, ऋतु आणि काळ हे सदैव सारखे नसतात—त्यांना निरनिराळे वळण लागते. गांवढळ लोक ज्यांना भविष्ये आणि शकुन म्हणतात, त्यांना निसर्गात सयुक्तिक कारण काही नसते. शहाण्या लोकानी ते निसर्गाशी केलेले सामने असेच मानले पाहिजे. असाच एखादा भोळा मूर्ख सकाळच्या वेळी घराबाहेर पडतो आणि सेंट फरान्सिसच्या पवित्र परंपरेतील एका भिक्षुकाला भेटतो. पण जणु काही गरूड किंवा सिंहगरुड ( ग्रिफिन ) दृष्टीस पडला असे समजून तो पाठ वळवितो आणि घरी पळत सुटतो. दुसरा असाच एक पढतमूर्ख चादरीवर मीठ सांडतो आणि ते पाहून खचून जातो. जणु काही, अशा क्षुद्र व नगण्य घटनांनी भावी संकटांची सूचना निसर्ग देत असतो ! खऱ्या धार्मिक व शहाण्या माणसाने ईश्वरी रहस्यात डोकावून पाहण्याचा कधी प्रयत्न करू नये. स्किपिओ आफ्रिकेत जेव्हा उतरला तेव्हा किनाऱ्यावर तो अडखळला आणि पालथा पडला. त्याच्या सैनिकांना तो अपशकुन वाटला पण जमीन घट्ट धरून तो ओरडला, ' हे आफ्रिके, मी तुला घट्ट धरले आहे. तू माझ्या हातून निसटून जाणार नाहीस. ' सँको, याच पद्धतीने मी हा एक अत्यंत आनंददायक योगायोग समजतो. त्यामुळे या मूर्तींचे दर्शन मला झाले. "

सँको म्हणाला, " मलाही तसेच वाटते. पण स्पॅनिश लोक सेंट जेम्सला मूर-हंता असे म्हणत असतात, युद्धाचे वेळी मात्र ' सेंट जॅगो, स्पेन बंद कर ' असे का म्हणतात हे कळल्यास मला आनंद वाटेल. स्पेन खुले आहे काय ? आणि म्हणून ते बंद व्हावे अशी त्यांची इच्छा असते काय ? त्या समारंभाचा अर्थ आपण काय लावता ? " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " तू एक अत्यंत साधाभोळा माणूस आहेस. तुला हे माहीत असले पाहिजे की, जेव्हा स्पॅनिश लोकांचा मूर लोकांशी निर्वाणीचा लढा चालू होता, तेव्हा ईश्वराने स्पेनला त्याचा त्राता व हितकर्ता म्हणून रेड-क्रॉसचा हा बलाढ्य वीर दिला. म्हणून आपल्या सर्व लष्करी संघर्षामध्ये ते त्याला आपला त्राता म्हणून आवाहन करतात. पुष्कळ वेळा तो स्वतः मूर पलटणीची कत्तल करीत आहे, त्यांना ठार मारीत आहे, त्यांना अस्मानात उडवीत आहे आणि पायाखाली तुडवून त्यांचा नायनाट करीत आहे, असे दिसून आले आहे. याची पुष्कळ उदाहरणे स्पेनच्या अधिकृत इतिहासातून मी तुला काढून देऊ शकेन. "

येथे सँकोने संवादाचा सूर बदलला आणि तो म्हणाला, " महाराज, डचेसची

दासी अल्टिसिडोरा हिच्या उद्धटपणाचे आश्चर्य वाटल्याशिवाय मला राहावत नाही. ज्याला लोक ' मदन ' म्हणतात, त्या खोडसाळ प्राण्याने तिचा भयंकर छळ केला आणि तिच्या शरीरात निर्दयपणे प्रवेश केला असे मी खात्रीने सांगतो. तो एक लहानसा, आंधळा व खोडकर मुलगा आहे असे लोक बोलतात. पण तरीही तो काळाकुट्ट तरुण, झुरळासारखा पहात, तुमच्या हृदयावर बंदुकीप्रमाणे नेमका नेम मारतो आणि त्याचा बाण आरपार जातो. पण मी असे ऐकले आहे की, मदनाचे बाण कुमारिकांच्या नम्र आणि शांत वर्तनाने बोथटतात आणि परत जातात. पण या अल्टिसिडोराच्या हृदयावर त्या बाणांचे टोक बोथट न होता धारदार बनले असे दिसते. ”

डॉन क्विक्झोट म्हणाले, “ सँको, तुझ्या हे लक्षात आले पाहिजे की, प्रेम हे विवेकशून्य असते आणि त्याची प्रक्रिया तर्काच्या नियमात बसत नाही. ते मृत्यूसारखेच असते– राजांच्या उंच उंच राजवाड्याप्रमाणे धनगरांच्या खुज्या झोपड्यांवरही ते हल्ला करते. जेव्हा मदन एखाद्या जीवाचा पूर्ण ताबा घेतो, तेव्हा तो पहिली गोष्ट करतो ती ही की, सारी लाज–लज्जा आणि संकोच यांना हद्दपार करतो. अल्टिसिडोराच्या अंतः-करणातून लाज–लज्जा निघून गेली असल्याने तिने आपल्या स्वैर वासना आत्मविश्वासाने प्रगट केल्या. पण हाय ! त्यामुळे माझे मन दयेपेक्षा संभ्रमाने भरून गेले. ” सँको म्हणाला, “ असे असेल तर, तुम्ही गोंधळल्यामुळे क्रूर बनला. इतके पाषाणहृदयी आणि कृतघ्न आपण कसे झाला ? त्या बिचाऱ्या जीवाने माझ्यावर प्रेम केले असते तर, तिच्या पहिल्या शब्दासरशी मी तिच्याकडे धावत गेलो असतो आणि तिची सेवा करीत राहिलो असतो. पण आपले हृदय संगमरवरी आहे, आपली आतडी पितळेची आहेत आणि आपला जीव चुन्याचा ( प्लॅस्टरचा ) आहे ! पण खरोखर मला हे कळत नाही की, त्या तिच्या या जीवाने आपल्यावर प्रेम करावे आणि अशा प्रकारे मूर्खपणाने वागावे असे आपल्या अंगी तिला काय दिसले ? चमकदार स्वरूप, चलाख हालचाल, रुबाबदार ढब, मधुर मुख – असे काही, तिचे मन वेधून घेणारे, आपल्या अंगी आहे काय ? खरोखर, मी पुनः पुनः आपली मूर्ती, आपल्या पायाच्या नखापासून ते आपल्या डोक्या-वरील झुपक्याच्या केसापर्यंत, निरखून पहात असतो. आपली मी खुशामत करीत नाही. पण सांगतो की, कोणीही प्रेमात पडावे असे काही आपल्या अंगी असण्यापेक्षा कोणालाही भीती वाटावी, असेच आपले स्वरूप आहे. प्रेम निर्माण करण्याचे प्रथम व प्रमुख साधन म्हणजे सौंदर्य हे होय असे मी ऐकले आहे. पण त्याचा काहीच थांगपत्ता आपल्या अंगी नाही. म्हणून त्या बिचारीचा जीव कशाने वेधला गेला याची मला कल्पना येत नाही. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ सँको, हे लक्षात घे की, सौंदर्याचे दोन प्रकार असतात. एक आत्म्याचे आणि दुसरे शरीराचे. आत्म्याचे सौंदर्य बुद्धीमध्ये, सद्‌गुणांमध्ये, सन्मानामध्ये, सदाचारामध्ये, औदार्यामध्ये आणि सुसंस्कारामध्ये असते– आणि त्यांच्या द्वारेच ते प्रकट होत असते. ज्याची बाह्य आकृती फारशी सुंदर नसेल त्याच्या अंगी हे सारे गुण सापडणे शक्य आहे. हे आत्म-सौंदर्य – शरीर सौंदर्य नव्हे–

जेव्हा प्रेमाचा विषय बनते, तेव्हा त्या प्रेम-भावनेचे हल्ले अधिक भयंकर, आश्चर्यकारक आणि परिणामकारक असतात. सँको, मी देखणा नाही हे मला समजत असले तरी मी कुरूप नाही हेही मला समजते. एखाद्या सज्जन माणसापाशी मी मघाशी सांगितलेले मानसिक गुण असले आणि त्याचे रूप राक्षसी नसले, तर विचारी व्यक्तीचे प्रेम संपादण्याचा त्याला पुरेसा हक्क आहे. ''

अशा प्रकारे बोलत बोलत ते दोघे रस्त्यापासून अगदी दूर एका अरण्यात गेले. आपण कोठे आहो हे लक्ष्यात येण्यापूर्वीच डॉन क्विक्झोट यांना अकस्मात असे आढळून आले की, झाडाझाडावर पसरलेल्या हिरव्या दोऱ्याच्या जाळ्यात आपण गुरफटले गेलो आहो. ते काय आहे याची त्यांना कल्पनाच करता येईना. ते म्हणाले, ''सँको, हे जाळ्याचे:संकट म्हणजे कल्पनेत येणार नाही असे अत्यंत अतर्क्य संकट आहे, हे निश्चित. मला छळणाऱ्या दुर्मती मांत्रिकांचा हा व्यूह नसेल तर मी मृत्यू पत्करीन. आल्टिसिडो-राच्या भाषणाचा धिक्कार केला, त्याचा सूड उगविण्यासाठीच मला पुढे जाऊ न देण्याकरिता या जाळ्यात मला त्या मांत्रिकानी अडकविले आहे. पण त्यांनी खूप लक्षात ठेवावे की केवळ हिरव्या दोऱ्यांची ही जी जाळी आहेत, ती वज्राची असती आणि लोहारांच्या मत्सरी देवाने व्हीनस व मार्स (रोमन प्रेमदेवता व युद्धदेवता) यांना घातलेल्या बेड्यापेक्षा ही जाळी अधिक भक्कम असती, तरी मी ती, जणू लव्हाळ्याची किंवा तलम सुताची असल्याप्रमाणे, लीलेने तोडली असती. '' असे म्हणून मोठ्या आवेशाने शिलेदारजी पुढे निघाले आणि ती जाळी तोडून आपले शब्द खरे करण्याचा निश्चय त्यांनी केला. पण त्याचक्षणी त्या झाडाआडून दोन अत्यंत सुंदर धनगरिणी पुढे वेगाने आल्या. त्यांच्या राहणीवरून त्या सुंदर दिसत होत्या. त्यांचे पोषाख जरतारी होते. सूर्याच्या सोनेरी किरणाप्रमाणे, त्यांचे कुरळे केस आकर्षक दिसत होते आणि ते त्यांच्या खांद्यापर्यंत रुळत होते. त्यांच्या भुवयावर त्या केसाच्या बटा आलेल्या होत्या आणि त्या केसात हिरवी-तांबडी फुले गुंफलेली होती. त्यांची वये पंधरा वर्षापेक्षा कमी नव्हती आणि अठरा वर्षापेक्षा अधिक नव्हती. हे अकल्पित दृश्य पाहून सँकोचे डोळे दिपले आणि मन चकित झाले. डॉन क्विक्झोट यांनाही मोठे आश्चर्य वाटले. फार काय, जगाकडे पहात असलेला सूर्यही आपल्या परिभ्रमणात थोडा काळ थांबला. काही काळ तेथे उत्कंठा आणि मौन यांचे साम्राज्य पसरले. शेवटी एका धनगरिणीने आपले पोवळ्या-सारखे ओठ उघडले आणि ती म्हणाली, '' थांबा महाराज, आम्ही आमची करमणूक करण्यासाठी ही दोऱ्यांची जाळी पसरली आहेत-आपल्याला सतावण्यासाठी नव्हे. ती आपण तोडू नयेत अशी प्रार्थना आहे. ती येथे का पसरली आहेत आणि आम्ही कोण आहोत, याची चौकशी आपण कदाचित कराल, म्हणून मी थोड्या शब्दात आमचा सारा वृत्तांत सांगते.

'' येथून सुमारे सहा मैलांवर एक खेडे आहे. त्यात पुष्कळ प्रतिष्ठित आणि श्रीमंत लोक आहेत. त्यांपैकी काहीजणांनी एक मंडळ तयार केले आहे. त्यात सारे मित्र

आणि नातलग आहेत. ते सर्वजण करमणुकीसाठी येथे येतात. या भागात हे स्थान अत्यंत आल्हाददायक आहे. म्हणून आम्ही येथे नवा आर्काडिया निर्माण करण्याचे योजले आहे. तरुणांनी धनगरांचा आणि तरुणींनी धनगरिणींचा वेष धारण केलेला आहे. आम्ही दोन ग्रामीण गीते पाठ केलेली आहेत. एक आहे सुप्रसिद्ध गार्सिलॅसोचे आणि दुसरे आहे कॅमोन्सचे. तो सर्वश्रेष्ठ पोर्तुगीज कवी होऊन गेला. पण खरे म्हणजे आम्ही अजून ती गीते पाठ केली नाहीत. कारण आम्ही येथे कालच आलो. या सर्व कुरणांना पाण्याचा पुरवठा करणाऱ्या एका मोठ्या ओढ्याच्या काठाजवळ असलेल्या या झाडांच्या सावलीत आम्ही काही तंबू उभारले. काही साध्या पक्ष्यांना पकडण्यासाठी काल रात्री ही जाळी आम्ही पसरली, आमच्या हाकांनी त्याना या जाळ्यात पडण्याचा मोह होईल. महाराज, आपल्या संगतीचा लाभ आम्हाला देण्यास आपण तयार असाल, तर आपले स्वागत प्रेमाने केले जाईल आणि आपला पाहुणचार थाटाने केला जाईल. कारण मोठ्या मजेत वेळ घालवावा आणि या स्थानापासून औदासीन्याला हद्दपार करावे,असे आम्ही योजले आहे."

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, "हे सुंदरी, तुझे म्हणणे खरे आहे. तुझ्या सौंदर्याने मला जे आश्चर्य व कौतुक वाटले, त्यापेक्षा स्नान करीत असलेल्या डाएनाला पाहून ॲक्टेनला अधिक वाटले नसेल. तुम्ही करमणुकीची जी योजना आखली आहे, तिची मी तारीफ करतो आणि मला त्यात सहभागी होण्याचे निमंत्रण दिल्याबद्दल मी आपले आभार मानतो. आपली काही सेवा करणे माझ्या शक्तीच्या आटोक्यात असेल तर आपल्या आज्ञेचे पालन मी करीन ही खात्री आपण बाळगावी, असे अभिवचन मी देतो. कारण माझा व्यवसाय कृतघ्नतेच्या अगदी उलट आहे. सर्वांचे भले करावे–त्यातही तुमच्यासारख्या गुणी माणसाच्या आणि तुमच्या परिस्थितीतील माणसांचे भले करावे हे माझे ध्येय आहे. त्यामुळे, ही जाळी अखिल भूतलावर पसरलेली असती, तरी मी यातून मार्ग काढून नव्या जगात गेलो असतो, पण तुम्हाला आनंद देणारा दोराचा लहान तुकडाही मी तोडला नसता. माझे हे बोलणे तुम्हाला अतिशयोक्तीच वाटेल पण त्याचे श्रेय आपण मला द्यावे. कारण आपल्याला अभिवचन देणारा मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे—हे नाव आपल्या कानी कधी काळी पोहोचले असेल."

दुसरी धनगरीण म्हणाली, "वा! किती शिकंदर नशीब आहे आपले! आपल्यापुढील या थोर माणसाकडे पहा. तो जगात अत्यंत शूरवीर, प्रणयी आणि संतुष्ट असा माणूस आहे. त्याच्या पराक्रमाचा इतिहास सध्या छापला गेला आहे आणि तो आपल्याला फसविणारा नाही. तो मी वाचला आहे. मी पैजेवर सांगते की, त्याच्याबरोबर असलेला हा भला माणूस म्हणजे त्याचा सेवक सँको पँझा हा आहे. त्याच्याइतका विनोदी प्राणी दुसरा कधी जन्मास आला नसेल." सँको म्हणाला, "तुम्ही बरोबर ओळखले. आपण कल्पना केली तोच विनोदी प्राणी आणि तोच सेवक मी आहे. आणि हे माझे स्वामी व धनी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट हे आहेत. इतिहासात

त्यांचे नाव आता अमर झाले आहे. " दुसरी मुलगी म्हणाली, " अग, आपण त्यांना येथे मुक्काम करण्याची विनंती करू. आपल्या वडिलांना आणि आपल्या भावांना त्यामुळे फार आनंद वाटेल. तू आताच वर्णन केलेल्या त्यांच्या शौर्याविषयी आणि गुणाविषयी मी पुष्कळ ऐकले आहे. विशेष म्हणजे ते जगातील एक अत्यंत एकनिष्ठ नि विश्वासू प्रियकर आहेत, असे लोक बोलतात. त्यांच्या हृदय-स्वामिनीला टोबोसोची डल्सीनिया असे म्हणतात. स्पेनमधील सर्व सुंदर युवतींमध्ये तिच्या सौंदर्याला बक्षिस मिळण्यासारखे आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " आपले अप्रतिम लावण्य तिच्या कीर्तीच्या आड येत नसेल तर, मी म्हणेन, ते न्यायाचेच आहे. पण सुंदरींनो, मला येथे थांबवून घेण्याचा प्रयत्न तुम्ही करू नका अशी माझी विनंती आहे. माझ्या व्यवसायाच्या अटळ कर्तव्यामुळे एका जागी मला विश्रांति घेता येत नाही. "

इतक्यात एका धनगरिणीचा भाऊ तेथे आला. त्याचा पोशाख धनगरासारखा होता, पण तो त्या मुलींच्या पोशाखासारखाच भपकेबाज आणि मजेशीर होता. त्या मुलींनी त्याला सांगितले, " आमच्याबरोबर हे जे गृहस्थ तुला दिसत आहेत ते ला मांचा येथील शौर्यशाली डॉन क्विक्झोट होत. आणि तो दुसरा माणूस त्यांचा सेवक असून त्याचे नाव सँको पँझा आहे. त्यांचा इतिहास तू वाचलेला आहेसच. " त्या शूर धनगराने शिलेदारजींना सलाम केला आणि आपल्या तंबूत येऊन आपल्या सहवासाचा लाभ देण्याची इतक्या कळकळीने विनंती केली की, ती मान्य करणे डॉन क्विक्झोट यांना भाग पडले आणि ते त्यांच्याबरोबर गेले.

याच सुमारास ती जाळी ओढून घेण्यात आली. त्यामध्ये नाना तऱ्हेचे लहान लहान पक्षी सापडलेले होते. जाळ्यांच्या हिरव्या रंगामुळे ते फसले आणि संकटात सापडले. त्यांना ते संकट टाळता आले असते. तेथे धनगरांच्या आणि धनगरिणींच्या मजेशीर पोशाखात सुमारे तीस माणसे जमली होती. त्या सर्वांना शिलेदारजींचा इतिहास अपरिचित नव्हता, म्हणून त्यांना खूप आनंद झाला. सारांश, त्यांनी त्यांना आपल्या तंबूत नेले. तेथे स्वच्छ, सकस आणि भरपूर खाद्यपेये होती. मेजवानीतील मानाची जागा त्यांनी शिलेदारजींना घ्यावयास लावली. सर्वजण टेबलाभोवती बसल्यावर शिलेदारजींकडे जो टक लावून पहात नव्हता आणि त्यांच्या विचित्र आकृतीचे आश्चर्य करीत नव्हता, असा एकही माणूस तेथे नव्हता. शेवटी टेबलावरील चादर काढली गेली. डॉन क्विक्झोट, आपला आवाज चढवून, मोठ्या गांभीर्याने म्हणाले, " माणसांच्या हातून जी पापे होतात, त्यामध्ये कृतघ्नतेएवढे दुसरे मोठे पाप नाही, असे माझे मत आहे. गर्व हे अधिक मोठे पाप आहे असे काही लोकांना वाटते. पण माझ्या विधानाला आधार हा आहे की, कृतघ्न लोकांनी पापलोक भरलेला आहे असे लोक म्हणतात. जेव्हापासून मी माझी अक्कल वापरू लागलो, तेव्हापासून मी कृतघ्नतेचा गुन्हा टाळण्याचे आटो-काट प्रयत्न केले. मला ज्या स्वरूपात इतराकडून लाभ मिळतात, त्या स्वरूपात मी त्यांची परतफेड करू शकत नसलो, तरी योग्य ती परतफेड करण्याचा माझा इरादा

असतो यात शंका नाही. ती माझी परतफेड पुरेशी नसली तर मी माझ्यावरील उपकारांची दखल शक्य तितक्या जाहीरपणे घेतो. कारण, आपल्याला लाभलेला प्रेमळपणा जो जाहीर करतो, तो शक्य तर परत करण्याचा त्याचा स्वभाव आहे असे त्यामुळे दिसून येते. जे कोणी काही देतात त्यांच्यापेक्षा जे ते घेतात, ते सामान्यतः कमी दर्जाचे असतात. सर्वांपेक्षा श्रेष्ठ असणारा परमात्मा आपल्यावर इतक्या कृपाप्रसादांचा वर्षाव करतो की, इतर सर्व उपकारकर्त्यांच्या आटोक्यापलीकडचे ते असतात. परमेश्वराचे आभार आपण कितीही मानले तरी त्याच्या भलेपणाच्या मानाने ते कमीच पडतात. तथापि उपकृत माणसे उपकारांची फेड करण्यास असमर्थ असली तर आपल्या हार्दिक इच्छांनी आणि सादर कृतज्ञतेच्या स्वाभाविक उद्गारांनी आपली असमर्थता काही प्रमाणात भरून काढतात. येथे मला ज्या आदरभावाने वागविण्यात आले, त्यामुळे माझी स्थिती तशी झाली आहे. मी आपल्या प्रेमळपणाचा जो पाहुणचार घेतला त्याला योग्य असा प्रतिसाद देण्यास मी असमर्थ आहे. म्हणून मी माझ्या कर्तृत्वाच्या लहानशा मर्यादेत जे शक्य आहे, ते मी आपल्याला अर्पण करीत आहे. ते म्हणजे सॅरॅगोसाला नेणाऱ्या रस्त्याच्या मध्यभागी सतत दोन दिवस मी असे जाहीर करीन की, माझी एकमेव हृदय-स्वामिनी टोबोसोची अप्रतिम डल्सीनिया हिचा एकटीचा अपवाद केला तर, धनगरिणीचा पोशाख केलेल्या या दोन तरुणी म्हणजे जगातील अत्यंत सुंदर आणि शालीन अशा युवती आहेत. कोणालाही न दुखविता मी असे बोलेन."

आपल्या धन्याच्या या आभाराच्या भाषणाकडे आतापर्यंत अत्यंत एकाग्रतेने कान देऊन ऐकत असलेल्या सँकोला आता वाटले, आपणही आता एखादा-दुसरा शब्द बोलणे योग्य होईल. तो म्हणाला, "हा माझा धनी वेडा आहे, असे शपथ घेऊन सांगण्याइतका उर्मट माणूस साऱ्या दुनियेत कोणी असू शकेल काय ? अहो सभ्य धनगरांनो, कृपा करून मला असे सांगा की, तुमच्या खेड्यातील एखादा तरी धर्मगुरू-कितीही शहाणा नि पंडित असला तरी-इतके सुंदर भाषण करू शकेल काय ? किंवा ज्यांच्या सामर्थ्याची फारशी प्रसिद्धी झालेली नाही अशा शिलेदारांपैकी कोणी यांच्या-सारखे पराक्रम करण्याची तयारी दाखवील काय ?" सँकोकडे वळून आणि क्रोधाग्नीने जळणाऱ्या आपल्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, ज्याची कधीही सुधारणा होणार नाही असा तू मठ्ठ डोक्याचा माणूस आहेस आणि मूर्खपणा व दुष्टपणा यांचा अर्क आहेस नि त्यात मत्सराचाही बराचसा भाग आहे, असे न म्हणणारा कोणी प्राणी या जगात असेल काय ? अरे मूर्खा, माझ्या कार्यात ढवळा-ढवळ करण्यास तुला कोणी सांगितले आणि माझे मूर्खपण किंवा शहाणपण बाहेर काढण्याचा उद्योग तू का करीत आहेस ? बदमाशा, आपली उद्धट जीभ आवर ! तू काही उत्तर देऊ नकोस. जा आणि रोझिनांटवर खोगीर नसल्यास ते घाल. मी जे करतो म्हटले ते मी तत्काळ करणार. अशा उदात्त नि न्याय्य कार्यात मला विरोध करण्याचे जे कोणी मनात आणतील ते सर्व जिंकले जातील आणि उलथून फेकले जातील हे तू

लक्ष्यात ठेव."

असे म्हणून ते तत्काळ निघाले. त्यावेळी त्यांचा आवेश भयंकर होता आणि त्यांच्या चेहऱ्यार क्रोधाच्या लाटा उसळत होत्या. त्यामुळे त्या सर्व मंडळींना आश्चर्य वाटले. या माणसाला वेडा म्हणावे की शहाणा म्हणावे हे त्यांना कळेना. त्यांनी त्यांच्या मनावर असे ठसविण्याचा प्रयत्न केला की, "आपण आपली आव्हाने बाजूस ठेवा. त्यांचा धोका आपण पत्करला नाही तरी आपल्या कृतज्ञ स्वभावाची आम्हाला पुरेशी खात्री पटली आहे. तसेच आपल्या असंख्य पराक्रमांचा इतिहास आम्हाला चांगला माहीत आहे, म्हणून आपल्या शौर्याची खात्री आम्हाला पटविण्यासाठी आपण नवे उदाहरण देण्याची काहीच आवश्यकता नाही." पण या सर्व बोलण्याचा उपयोग, त्यांना आपल्या उद्देशापासून परावृत्त करण्याचे कामी, काहीच झाला नाही. म्हणून ते रोझिनांटवर स्वार झाले, त्यांनी आपली ढाल घट्ट धरली आणि आपला भाला हातात पकडला. त्या हिरव्या लुसलुशीत कुरणापासून फार दूर नसलेल्या राजमार्गाच्या मध्यावर ते जाऊन पोहोचले. त्यांच्यामागोमाग आपल्या डॅपलवर बसलेला सँको आणि ती सारी मेंढपाळ मंडळी निघाली. शिलेदारजींच्या अतर्क्य व अतिरेकी निश्चयाचा परिणाम काय होतो हे पाहण्यास ते सर्वजण उत्सुक होते. आता वीरपुरुष आपल्या पवित्र्यात उभा राहिला आणि पुढील आव्हान देऊन भोवतालचा सारा प्रदेश निनादवू लागला—"अहो तुम्ही पायी किंवा घोड्यावरून जाणारे शिलेदार किंवा सेवक कोणीही असा. तुम्ही आता किंवा यापुढील दोन दिवसात या रस्त्याने जाणार असाल तर हे लक्ष्यात ठेवा की, ला मांचा येथील शिलेदार डॉन क्विक्झोट येथे मुक्काम करून उभे आहेत आणि असे आव्हान देत आहेत की, माझी हृदय–सम्राज्ञी टोबोसोची लेडी डल्सीनिया हिला वगळले असता या राईमध्ये आणि कुरणामध्ये राहणाऱ्या या दोन अप्सरा, सौंदर्य व सौजन्य या दोन गुणांचे बाबतीत, विश्वातील सर्व सुंदरींना मागे सारण्यासारख्या आहेत. त्याच्या उलट ज्याचे मत असेल त्यानी माझ्यापुढे उभे रहावे. त्याच्या आगमनाची मी वाट पहात आहे."

हे शब्द त्यांनी उच्च स्वराने दोनदा उच्चारले. पण दोन्ही वेळा ते वाया गेले. कारण कोणाही पराक्रमी पुरुषाने ते ऐकले नाहीत. पण त्यांचा जुना मित्र म्हणजे दैव. तेच त्यांच्या साऱ्या घडामोडी घडवून आणीत असे. त्या दैवानेच त्यांना एक गंमतीचे दृश्य दाखविले. हळूहळू शिलेदारजींना दिसले की, हातात भाले घेतलेले आणि अत्यंत वेगाने व शिस्तीने चाललेले असे पुष्कळ लोक घोड्यावर बसून त्या रस्त्याने जात आहेत. डॉन क्विक्झोट यांच्या हालचालीवर नजर ठेवणाऱ्या त्या मेंढपाळ मंडळींनी आपल्या-पुढील धूळ उडवीत चाललेली ही पलटण पाहिली आणि संकटाच्या इतक्या जवळ असणे सुरक्षितपणाचे नाही असे समजून संकटाच्या टप्प्यापलीकडे ते गेले. सँको रोझिनांटच्या पाठीमागे लपला. एकटे डॉन क्विक्झोट अदम्य धैर्याने तेथे अढळपणे उभे राहिले. जेव्हा ते घोडेस्वार जवळ आले तेव्हा त्यांच्यापैकी एक म्होरक्या शिलेदारजींना

ओरडून म्हणाला, "अरे अरे, रस्त्यातून दूर हो, नाही तर फाशी जाशील. तुझ्या अंगात काय सैतान संचारला आहे ? अरे, दूर हो, नाही तर बैल तुला आपल्या पाया-खाली तुडवून तुझे तुकडे तुकडे करतील." डॉन क्विक्झोट उत्तरले, "अरे बदमाषांनो, चालते व्हा. तुमच्या बैलांचे मला काडीमात्र भय नाही. झरामा नदीच्या तीरावर पोसलेले ते अत्यंत उग्र बैल असले, तरी मला काय त्याचे ? अरे कुत्र्यानो, तुम्ही सर्वजण मिळून असे कबूल करा की, मी आता जी घोषणा केली ती खरी आहे. नाही तर माझ्याशी दोन हात करण्यास सिद्ध व्हा."

उत्तर देण्याला त्या घोडेस्वारांच्या म्होरक्याला वेळ नव्हता आणि रस्त्यावरून दूर जाण्याला डॉन क्विक्झोट यांनाही, मनात असले तरी, वेळ नव्हता. कारण रानटी बैलांचा कळप तावडतोब त्यांच्या अंगावर धावून आला. त्यांच्याबरोबर दुसऱ्या कित्येक माणसाळलेल्या गाईही होत्या. दुसऱ्या दिवशी बैलांची साठमारी करण्यासाठी एका गांवाला जाऊन पोहोचणाऱ्या बैल–हाक्यांची आणि इतर लोकांची एक मोठी टोळीही त्याच्यासह होती. तेव्हा शिलेदारजी व सेवक, घोडा व माणूस या सर्वांना त्या बैलांनी अत्यंत निर्दयपणे आपल्या पायाखाली तुडविले. सँको दुखापत होऊन पडला. डॉन क्विक्झोट सुन्न झाले, डॅपलला जखमा झाल्या आणि रोझिनांटची स्थिती अत्यंत शोचनीय झाली. असे झाले तरी त्या माणसांचा आणि जनावरांचा सारा तांडा निघून गेल्यानंतर डॉन क्विक्झोट ताडकन् उठून उभे राहिले. तोवर ते पूर्णपणे शुद्धीवर आलेले नव्हते. तरी पडत–धडपडत–अडखळत–पुन्हा उठत, शक्य तितक्या वेगाने ते त्याचा पाठलाग करीत धावत सुटले आणि मोठ्याने ओरडले, "थांबा, बदमाषांनो थांबा. तुम्हा सर्वांचा धिक्कार मी एकटा शिलेदार करीत आहे. पळून जाणाऱ्या शत्रूसाठी सोन्याचा पूल बांधण्याचा खेळ मला आवडत नाही." पण त्यांनी कितीही जोरजोराने त्यांचा धिक्कार केला तरी वेगाने चाललेले ते प्रवासी थांबले नाहीत की त्यांनी आपली गती कमी केली नाही. गुदस्ताच्या बर्फाकडे आता ते जसे लक्ष देत नव्हते, तसेच ते शिलेदारजींच्या बोलण्याची पर्वा करीत नव्हते.

शेवटी डॉन क्विक्झोट थकले आणि थांबले. त्यांना कितीही संताप आलेला असला आणि सूड उगविण्याची संधी दिसत नसली, तरी त्यांना रस्त्यावरच खाली बसणे भाग पडले. नंतर रोझिनांट व डॅपल यांना घेऊन सँको तेथे आला. मग धनी व सेवक यांनी पुनः स्वार होण्याचा प्रयत्न केला. आपल्या अपयशाची लाज वाटून त्यांनी आपला प्रवास घाईघाईने सुरू केला. नव्या आर्केडियामधील आपल्या मित्रांचा निरोपही त्यांनी घेतला नाही.

□ □

## प्रकरण ५९

# डॉन क्विक्झोट यांना झालेला एक असामान्य अपघात– साहसी कृत्य म्हणून तो सहज मानला जाईल.

हिरव्यागार झाडांमध्ये झुळझुळ वाहणारा स्वच्छ पाण्याचा झरा डॉन क्विक्झोट व सँको यांना सापडला. त्या बैलांच्या आडदांड सामन्यामुळे त्या दोघांचे अंग धुळीने माखलेले होते आणि ते थकून गेले होते. पण त्या झऱ्याच्या पाण्यामुळे ते ताजेतवाने झाले. रोझिनांट व डॅपल यांचे लगाम व पट्टे काढून घेऊन त्यांनी त्यांना स्वातंत्र्य उपभोगण्यास मोकळे सोडले आणि ते दोन हैराण साहसवीर ओढ्याच्या काठा-वर बसले. सँकोने आपले तोंड धुतले आणि डॉन क्विक्झोट यांनी आपला चेहरा स्वच्छ केला. नंतर सेवक आपल्या जुन्या फडताळाकडे – चामड्याच्या पिशवीकडे– गेला आणि त्यातून, तो ज्याला ' पोटाचे जळण ' म्हणत असे, ते त्याने बाहेर काढले व शिलेदारांच्या पुढ्यात ठेवले. डॉन क्विक्झोट नाराजीमुळे काहीच खाईनात आणि केवळ शिष्टाचार म्हणून सँको खाण्याची सुरुवात करण्यास धजेना. धन्याने आपल्याला खाण्याचा मार्ग प्रथम दाखवावा अशी त्याची अपेक्षा. पण आपला धनी कल्पनांमध्ये इतका गढून गेला आहे की, त्यामुळे त्याच्या मनात आपले हात तोंडापर्यंत नेण्याचा विचारही येत नाही, हे पाहून, सेवकाने तोंडातून चकार शब्द न काढता आणि संस्कृतीचा सारा विचार बाजूस ठेवून, आपल्यापुढे जे काही पाव–चीज होते, त्याने आपले भुकेलेले पोट भरण्यास सुरुवात केली.

डॉन क्विक्झोट म्हणाले, " मित्रा सँको, खा. निसर्गाने केलेली हानी भरून काढ आणि जीव जगव. माझ्यापेक्षा तुला जीव जगविण्याची आवश्यकता अधिक आहे. माझी दुःखे आणि माझी दुर्दैवे याच्या अत्याचारांना बळी पडून मला खुशाल मरू दे. सँको, मी मरत मरत जगण्यासाठी जन्मलो आहे – आणि तू खात खात मरण्यासाठी. तुझी खात्री पटावी म्हणून मी तुला सत्य सांगतो. तू माझ्यासंबंधी केवळ विचार कर. अरे, इतिहासात सुप्रसिद्ध, ग्रंथाच्या सन्मानाने विभूषित, शस्त्र–चमत्कारासाठी सुविख्यात, वर्तनात शालीन, राजेमहाराजांच्या आदरास पात्र आणि तरुणींच्या प्रेमाचा व आर्जवांचा विषय झालेला असा मी ! आपल्याला मोठमोठे विजय मिळतील, सन्मान लाभतील आणि राजमुकुट प्राप्त होतील. कारण माझ्या शौर्यामुळे त्या साऱ्या बक्षिसांना मी लायक आहे– अशा आशा-तरंगावर माझे मन पोहत–सुखावत असताना, दुष्ट आणि

किळसवाण्या जनावरांनी आपल्या खुरांनी मला लाथा मारून जखमा केल्या, राजमार्गावरील धुळीप्रमाणे मला तुडवले आणि माझी खूप पायमल्ली केली ! या केवळ आठवणीने माझ्या भुकेची आणि दातांची धार बोथटून गेली आहे, माझे जबडे खिळखिळे झाले आहेत, माझे हात बधिर बनले आहेत आणि माझी संवेदना नष्ट झाली आहे. मरणापेक्षा जगण्याचेच भय मला अधिक वाटत आहे. म्हणून मी माझी उपासमार करण्याचे ठरविले आहे. उपासमारीने मरणे हा मृत्यूच्या साऱ्या प्रकारांपैकी अत्यंत क्रूर मार्ग होय." सँको अन्नाचे चर्वण करण्यात वेळ न घालविता म्हणाला, "भरल्या पोटी मरणे चांगले.' ही म्हण आपण खरी करणार नाही काय ? माझ्यासंबंधी म्हणाल तर, स्वतःचा जीव घेण्याइतका मी भोळाभावडा नाही. छेः, मी चांभारासारखा आहे. तो आपल्या दातांनी आपले कातडे ताणतो. तसे खाऊन खाऊन मी माझे आयुष्य लांबविणार आहे. ईश्वर मुभा देईल तितके मी माझे आयुष्य माझ्या दातानी लांबवीन. धनीसाहेब, माणसाने निराश होऊन कुन्हाडीबरोबर तिचा दांडाही फेकून देणे, यापेक्षा मोठा मूर्खपणा या जगात दुसरा कोणताही नसेल. म्हणून महाराज, माझे ऐका आणि माझ्याप्रमाणे खाऊ लागा. खाणे झाल्यावर जमिनीवर निजा आणि एक डुलकी घ्या. येथील ताजे गवत पराच्या गादीसारखे तुम्हाला वाटेल. तुम्ही जागे व्हाल तेव्हा शरीराने व मनाने टवटवीत व्हाल असे मी खात्रीने सांगतो."

सँकोचा हा सल्ला डॉन क्विक्झोट यांनी मानला. कारण त्यांची अशी खात्री पटली की, आपला सेवक यावेळी चांगले स्वाभाविक तत्त्वज्ञान बोलत आहे. पण मध्यंतरीच त्यांच्या मनात एक विचार चमकून गेला आणि ते म्हणाले, "अरे सँको, मी आता तुझ्या इच्छेप्रमाणे वागत आहे, म्हणून तू माझ्यासाठी एक काम कर. त्यामुळे माझ्या मनावरील चिंतांचे ओझे हलके होईल आणि मला खात्रीने समाधान मिळेल. हे काम एवढेच—तुझ्या सल्ल्याप्रमाणे मी झोपी जाऊन माझे विचार शांत करण्याचा प्रयत्न करीत असताना तू फक्त थोडासा बाजूस जा आणि उघड्या हवेत आपली पाठ उघडी कर. नंतर रोझिनांटच्या लगामाचे पट्टे घेऊन तू स्वतःच्या पाठीवर तीन–चारशे झणझणीत फटके लगाव. डल्सीनियावरील जादू नाहीशी करण्यासाठी तुला जे तीन हजार आणि वर आणखी काही फटके घ्यावयाचे आहेत, त्यांचा हा भाग समज. कारण, खरोखर तुझ्या निष्काळजीपणामुळे आणि हयगयीमुळे इतका काळ त्या बिचाऱ्या स्त्रीला जादूच्या अमलाखाली राहावे लागत आहे, ही मोठ्या शरमेची आणि करुणेची गोष्ट होय." मग सँको म्हणाला, "त्यासंबंधी पुष्कळच बोलण्यासारखे आहे. पण ते एका बाजूस ठेवू या. प्रथम आपण झोपी जाऊ या, मग काय व्हायचे असेल ते होवो. पुढे काय होईल हे प्रभूला माहीत. महाराज, एखाद्या माणसाने स्वतःला अकारण निर्दयपणे फटके लगावणे म्हणजे काहीच नव्हे असे आपल्याला वाटते काय ? आपण हे समजून घ्या की, माझ्यासारख्याच दुबळ्या आणि आतून भयंकरपणे पोखरलेल्या शरीरावर फटके बसणे ही गोष्ट क्रूर आहे. लेडी डल्सीनियाने थोडा धीर धरावा. तिच्या स्वप्नात नसेल अशा वेळी, एखादे दिवशी,

फटक्यांच्या तडाख्यामुळे काळी–निळी झालेली माझी ओबडधोबड त्वचा तिला दिसेल. शेवटी जे घडत असते, त्यामुळे काहीच बिघडत नाही. जोपर्यंत जीव आहे तोपर्यंत आशा आहे. याचा अर्थ असा की, मी माझे वचन खरे करण्याच्या उद्देशाने जिवंत राहीन." डॉन क्विक्झोट यांनी त्याचे आभार मानले आणि थोडेसे खाल्ले, सँकोने खूप खाल्ले. नंतर आपले नित्याचे सखे–सोबती रोझिनांट आणि डॅपल यांनी विसावा घ्यावा किंवा कुरणात ज्याची रेलचेल होती, त्या गवतावर स्वैरपणे ताव मारावा, याचे स्वातंत्र्य देऊन ते दोघे विश्रांती घेऊ लागले.

शिलेदार व सेवक जेव्हा जागे झाले, तेव्हा दिवस फार वर आला होता. ते स्वार झाले आणि आपल्या प्रवासास निघाले. सुमारे दीड मैल अंतरावर असलेल्या एका खाणावळीकडे ते चालले. मी 'खानावळ' म्हणतो याचे कारण, खुद्द डॉन क्विक्झोट यांनी आपली वहिवाट सोडून त्या इमारतीला त्या नावाने संबोधिले, नाही तर खानावळींना 'किल्ले' म्हणण्याचा त्यांचा नित्याचा प्रघात.

तेथे गेल्यावर त्यांनी खानावळवाल्याला विचारले, 'जागा आहे का?' त्याने उत्तर दिले, "होय आहे, सॅरगोस्सा शहरातही तुम्हाला मिळणार नाही इतकी चांगली जागा येथे आहे." ते खाली उतरले. सँकोने आपले सामानसुमान एका खोलीत ठेवले. तिची किल्ली घरमालकाने त्याला दिली होती. रोझिनांट व डॅपल यांची व्यवस्था तबेल्यात लागलेली पाहून तो आपल्या धन्याच्या सेवेस गेला. धनी भिंतीच्या कमानीतील एका बैठकीवर बसलेला होता. शिलेदारजी या खानावळीला किल्ला समजले नाहीत, म्हणून सेवकाने स्वतःला अनेकवार धन्यवाद दिले. रात्रीच्या जेवणाची वेळ झाली. तेव्हा डॉन क्विक्झोट आपल्या दालनात गेले. यजमानाजवळ बसलेल्या सँकोने त्याला विचारले, "आज रात्रीच्या जेवणासाठी कोणते पदार्थ तुम्ही आम्हाला देणार?" तो उत्तरला, "तुम्ही मागाल ते मासे किंवा मांस, गाईचे मांस किंवा कोंबडीचे मांस, रानपक्षी किंवा तुम्ही निवडाल, पसंत कराल, ते सर्व काही तुम्हाला मिळेल. जमीन, समुद्र आणि आकाश—यातून जे जे खाद्य मिळण्यासारखे असेल, ते सर्व! तुम्ही फक्त मागा की ते तुम्हाला मिळेल. या खानावळीत प्रत्येक पदार्थ आहे." सँको म्हणाला," या सर्व पदार्थांची काही गरज नाही. दोन भाजलेल्या कोंबड्यांनी आमचे काम भागेल. कारण, माझ्या धन्याचे पोट नाजूक आहे आणि तो फार थोडे खातो. आणि मी तर काय? मूर्ख लाकूडतोड्यासारखा खादाड नाही."

खानावळवाला म्हणाला, "लहान पिलांबद्दल म्हणाल, तर ती आमच्याजवळ मुळीच नाहीत. –घारींनी ती सारी फस्त केली." सँको म्हणाला, "तर मग अंडी असलेलेली एक छानशी कोंबडी तळून आम्हाला घाला म्हणजे झाले–मात्र ती तरणी नि कोवळी असावी." यजमानाने उत्तर दिले, "कोंबडी? साहेब, काय सांगू? कालच मी पन्नास कोंबड्या विकण्यासाठी शहराकडे पाठविल्या. कोंबड्या बाजूस ठेवल्या, तर तुम्हाला दुसरे काहीही मिळेल." सँको म्हणाला, "तर मग आम्हांला गाईच्या

वासराची आणि लहान बोकडाची खिचडी करून द्या म्हणजे झाले. " खानावळवाल्याने उत्तर दिले, " मी आपली दया भाकतो. आता मला आठवते, आता घरात काहीच शिल्लक नाही. आताच जी मंडळी जेवून गेली, त्यांनी माझे घर कसे साफ धुऊन काढले. पण पुढील आठवड्यात आमच्याकडे खूप खाद्य–पदार्थ असतील–शिल्लक रहाण्याइतके असतील. " सँको म्हणाला, " अखेर आमचा घात झाला ! आता मी पैजेवर सांगतो, या साऱ्या उणिवा भरून काढण्यासाठी तुम्ही आम्हांला अंड्यांची नि डुकराच्या मांसाची बशी भरून द्या म्हणजे आम्ही सारे पावलो ! " यजमान म्हणाला, " वा: ! वा: ! माझ्या पाहुण्याची तर्क–शक्ति फारच अजब आहे. अहो, मी त्यांना सांगितले की, माझ्याकडे घरात लहान–मोठ्या कोणत्याच कोंबड्या नाहीत, आणि तरीही त्यांना वाटते माझ्यापाशी अंडी आहेत ! दुसरे कांही तरी मागा, अशी माझी विनंती आहे. त्या-संबंधी अधिक बोलणे नको. " सँको म्हणाला, " हाय रे दुर्दैवा ! आता आपण काही मार्ग काढू या. अहो घरमालकसाहेब, आपल्याकडे कोणकोणते पदार्थ आहेत, ते मला सांगा. यापुढे माझ्या डोक्याला आणखी शीण देऊ नका. " यजमान म्हणाला, " आता असे पहा, तुम्हांला खरे सांगायचे तर, माझ्याजवळ गाईच्या नाजूक खुरांची एक जोडी आहे–ती वासराच्या पायासारखी दिसते; आणि वासरांच्या पायांची एक जोडी आहे–ती गाईच्या खुरासारखी दिसते. कांद्याबरोबर, वाटाण्याबरोबर आणि डुकराच्या मांसाबरोबर ते खाल्ले तर राजाला मेजवानी मिळाल्यासारखे वाटेल. आता ते चुली-वरून उतरायला अगदी तयार आहेत. ' या, मला खा; या, मला खा. ' असे आता ते ओरडत आहेत. " सँको म्हणाला, " गाईचे खूर ?, त्याच्यावर माझे नाव असू द्या. दुसऱ्या कोणाला त्यांना हात लावू देऊ नका. दुसऱ्या कोणाहीपेक्षा मी त्यांची किंमत जास्त देईन. त्यांच्यापेक्षा अधिक आवडीचे मला दुसरे काहीही वाटत नाही. " यजमानाने उत्तर दिले, " तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाला ते मिळणार नाहीत. तुम्ही भीती बाळगू नका. आपल्याशिवाय जे पाहुणे या घरात आहेत, ते सारे प्रतिष्ठित आहेत–ते आपल्याबरोबर आपले आचारी आणि सामानसुमान आणतात. " सँको म्हणाला, " प्रतिष्ठेबद्दल म्हणाल तर, त्यांच्यापैकी सर्वांत आढ्यताखोर जो असेल, त्याच्याइतकीच प्रतिष्ठा माझ्या धन्याची आहे. तुम्ही जर तसेच म्हणाल, तर तो सर्वश्रेष्ठ आहे. पण आपल्या व्यवसायामुळे तो धान्याची कोठारे किंवा दारूच्या बुधल्यांची तळघरे ठेवीत नाही, इतकेच. सर्वसाधारणपणे आम्ही रानाच्या मध्यभागी स्वत:ला डांबून घेतो आणि ओक–फळांनी किंवा गुलाबाच्या फळांनी आपले पोट भरतो. " सँको व खानावळवाला यांच्यामध्ये संवाद झाला, तो हा. सँकोच्या धन्याच्या व्यवसायासंबंधी यजमानाने प्रश्न विचारले, पण त्यांना उत्तर देण्याची फुरसद सँकोला तेव्हा नव्हती.

सारांश, जेवणाची वेळ झाली, तेव्हा डॉन क्विक्झोट आपल्या खोलीत गेले आणि भोजन करण्यासाठी ऐसपैस बसले. यजमानाने त्यांच्यापुढे गाईच्या खुराची, होती तशी, ताटली आणून ठेवली. पण त्याच वेळी शेजारच्या खोलीत कोणी बोलत असल्याचे

शिलेदारजींच्या कानावर आले. ते जेथे बसले होते त्या खोलीपासून ही खोली एका पातळ भिंतीने विभागलेली होती. त्या खोलीतील न दिसणारा माणूस म्हणाला, " प्रिय डॉन जेरोनिमो, जेवणाचे पदार्थ येथे येईपर्यंत आपण ' डॉन क्विक्झोटच्या दुसऱ्या भागा 'चे एक प्रकरण वाचावे :अशी माझी विनंती आहे. " आपल्या नावाचा उच्चार झालेला ऐकताच आमचा वीर-पुरुष ताडकन् उठला आणि आपल्याविषयी काय बोलले जात आहे, हे कान देऊन ऐकू लागला. डॉन जेरोनिमोने दिलेले उत्तर त्यांच्या कानी पडले– " सिनॉर डॉन जॉन, ते मूर्खपणाचे लेखन तुम्ही आम्हाला वाचावयास का लावता ? ' डॉन क्विक्झोट यांचा पहिला भाग ' ज्याने वाचला असेल, त्याला दुसरा भाग वाचण्यात फारच थोडी गोडी वाटेल, असे मी समजतो. " डॉन जॉनने उत्तर दिले, " तसे असेल, पण ते वाचणे काही चुकीचे होणार नाही. कारण, ज्यात काही ना काही चांगले नाही, इतके वाईट पुस्तक असतच नाही. या भागातील मला अत्यंत न आवडणारा भाग हा आहे की, डॉन क्विक्झोट यापुढे टोबोसोच्या डल्सीनियावर प्रेम करीत नाहीत असे दाखविले आहे. "

हे शब्द ऐकताच क्रोधाने व संतापाने जळफळणारे डॉन क्विक्झोट ओरडले, " कोण म्हणतो असे ? टोबोसोच्या डल्सीनियाला ला मांचा येथील डॉन क्विक्झोट विसरले– किंवा विसरू शकतील– असे जो कोणी म्हणेल तो सत्यापासून पूर्णपणे च्युत झाला आहे, अशी जाणीव मी त्याला माझ्या शस्त्र-सामर्थ्याने करून देईन. टोबोसोच्या अद्वितीय डल्सीनियाचे विस्मरण कधीच होणे शक्य नाही. तसेच डॉन क्विक्झोट यांना विस्मरणाचा दोष कधीच लागणार नाही. ' निष्ठा ' हे त्यांचे ब्रीदवाक्य आहे आणि कोणताही निर्बंध न मानता ती निष्ठा आनंदाने जपणे हा त्यांचा व्यवसाय आहे." शेजारच्या खोलीतील एका माणसाने विचारले, " आम्हाला उत्तर देणारा हा कोण ? " सँको म्हणाला, " दुसरा कोण असणार ? ला मांचा येथील डॉन क्विक्झोट हे स्वतःच उत्तर देत आहेत. ते जे जे बोलले – आणि जे बोलतील– ते सारे खरे करून दाखवितील या माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. कारण, ज्याचेजवळ आहे पैका, तो जामीन देण्यात मानीत नाही धोका. "

सँकोने हे उत्तर देताच ते दोन सभ्य गृहस्थ ( कारण तसे ते दिसत होते ) आत आले. त्यांच्यापैकी एकाने डॉन क्विक्झोट यांच्या गळ्याला मिठी घालून म्हटले, " शिलेदारमहाराज, आपल्याला प्रत्यक्ष पाहून आपला लौकिक खोटा नाही असे समजले. आपला लौकिक आपल्याविषयी आदर निर्माण करण्यास चुकत नाही. आपण ला मांचा येथील खरे डॉन क्विक्झोट आहा हे खचित. आपण शिलेदारीचे तेजोगोल आहा–उत्तर ध्रुवाचा तारा आहा. तुमचे नाव बळकावून घेणाऱ्या आणि तुमचे यश नष्ट करू पाहणाऱ्या शिलेदाराचे चित्रण या पुस्तकात लेखकाने केले आहे. ते मी आपल्या हाती देत आहे." असे म्हणून त्याने आपल्या मित्राकडून एक पुस्तक घेतले आणि ते डॉन क्विक्झोट यांना दिले. शिलेदारजींनी ते घेतले आणि एक शब्द न बोलता त्याची पाने ते चाळू लागले.

थोड्या वेळाने ते पुस्तक परत करून ते म्हणाले, " मी जे काही थोडेसे पाहिले आहे त्यावरून मला असे दिसून आले की, ज्यासाठी या ग्रंथकाराला दोष देणे योग्य ठरेल अशा तीन गोष्टी आहेत. पहिली, त्याच्या प्रस्तावनेतील काही शब्द मला सदोष वाटतात. दुसरी गोष्ट म्हणजे त्याची भाषा ॲरॅगोनियन आहे. काही काही वेळा तो उपपदाशिवाय लिहितो. आणि त्याचे अज्ञान तीव्रपणे प्रगट करणारा तिसरा दोष मला जो आढळला तो म्हणजे या इतिहासाच्या एका प्रमुख घटनेच्या बाबतीत तो सत्यापासून दूर गेला आहे. कारण, तो म्हणतो माझा सेवक सँको पँझा याच्या बायकोचे नाव मेरी गुटीरेझ आहे. पण ते खरे नाही. तिचे नाव टेरेसा पँझा आहे. एवढ्या महत्त्वाच्या बाबतीत जो चूक करतो, त्याने या सर्व इतिहासात पुष्कळ ढोबळ चुका केलेल्या असतील, असा संशय कोणासही सहज येईल. " सँको म्हणाला, " हा इतिहास–लेखक चांगलाच उमेट दिसतो. माझी बायको टेरेसा पँझा हिला तो मेरी गुटीरेझ म्हणतो. आमच्यासंबंधी त्याला फारच थोडी माहिती आहे हे खचित. हे पुस्तक आपल्याला आवडले असेल तर ते परत द्या. आणि लेखकाने माझ्यासंबंधी काही म्हटले आहे काय आणि माझेही नाव बदलले आहे काय हे पाहा. "

डॉन जेरोनिमो म्हणाला, " तू जे काही बोललास त्यावरून तू श्रीमान् डॉन क्विक्झोट यांचा सेवक सँको पँझा असला पाहिजेस." सँको म्हणाला, " होय, तोच मी– आणि या नोकरीचा मला अभिमान वाटतो." तो सभ्य गृहस्थ म्हणाला, " तुला खरे सांगायचे तर, हा ग्रंथकार तुझे चित्र तुझ्या योग्यतेप्रमाणे सभ्यतेने काढीत नाही. तू खादाड आहेस आणि मूर्ख आहेस आणि तुझ्या डोक्यात विनोदाचा किंवा शहाणपणाचा कणही नाही, असे त्याने दाखविले आहे. तुझ्या धन्याच्या इतिहासाच्या पहिल्या भागात जो सँको आम्हाला दिसतो, त्याच्यापेक्षा हा अगदी निराळा आहे. " सँको म्हणाला, " देव त्याला क्षमा करो. माझ्या कामात लुडबूड न करता, त्याने मी होतो तेथेच मला सोडून द्यावयास हवे होते. प्रत्येक माणसाच्या नाकाचे शिंग बनविता येत नाही. जग जसे आहे, तसेच आपण ते सोडून द्यावे. सेंट पीटर रोममध्ये खुशाल नांदत आहे."

त्या दोन सभ्य गृहस्थांनी डॉन क्विक्झोट यांना आपल्या खोलीत भोजनास येण्याचे निमंत्रण तत्काळ दिले. कारण, त्या खानावळीत त्यांना योग्य असे खाद्यपदार्थ काही मिळणार नाहीत हे त्यांना माहीत होते. डॉन क्विक्झोट नेहमीच गोडी-गुलाबीने वागत. त्यांना त्यांची विनंती अमान्य करवेना, म्हणून ते त्यांच्याबरोबर गेले. त्यांच्या जागी सँको मांसाची वशी घेऊन थांबला. मोठ्या न्यायाधीशाची जागा छोट्याने घ्यावी, तसे त्याने केले. टेबलाच्या वरच्या टोकाला तो बसला. खाणावळवाला भोजन–भाऊ म्हणून बसला. कारण, सँकोइतकीच त्याला गाईच्या खुरांची आवड होती.

त्या दोन सद्गृहस्थाबरोबर डॉन क्विक्झोट भोजनास बसले असताना डॉन जॉन याने त्यांना विचारले, " टोबोसोच्या लेडी डल्सीनियासंबंधी आपण केव्हा काय ऐकले ? तिचे लग्न झाले का ? तिला मुले आहेत का ? का तिला मुले झालीच नाहीत ?

अथवा अजून ती कुमारीच आहे का ? आणि आपले शील व लौकिक तिने निष्कलंक राखलेला आहे का ? श्रीमान् डॉन क्विक्झोट यांच्या प्रेमाबद्दल आणि निष्ठेबद्दल कृतज्ञतेची भावना तिच्या मनात आहे का ? " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " अजून डल्सीनिया कुमारिका आहे आणि माझे प्रणयाचे विचार तिच्यावर पूर्वीपेक्षाही अधिक स्थिर झालेले आहेत. पूर्वीप्रमाणे आमचा पत्रव्यवहार नेहमी होत नसतो. पण तिच्या सौंदर्याचे रूपांतर एका खेडवळ स्त्रीच्या साध्या रूपात झालेले आहे. " असे म्हणून त्यांनी त्या सद्गृहस्थांना तिच्यावरील जादूची सारी कथा सांगितली आणि त्याबरोबरच तिला जादूतून मुक्त करण्यासाठी साधू मर्लीनने जो उपाय सांगितला (सँकोने तीन हजार तीनशे फटके खाण्याची तपश्चर्या केली पाहिजे) तोही त्यांनी त्यांना निवेदन केला आणि मँटेसिनोजच्या गुहेत आपल्याला जे अनुभव आले तेही त्यांनी त्यांना कथन केले. डॉन क्विक्झोट यांच्या स्वतःच्या मुखातून त्यांच्या इतिहासातील विलक्षण घटना ऐकताना त्या दोघांना परम आनंद झाला. त्यांच्या अतिरेकी वर्तनाचे त्यांना जसे नवल वाटले, तसेच त्या घटना निवेदन करण्यातील त्यांचे कौशल्य पाहून त्यांना आश्चर्य वाटले. एका क्षणी त्यांना ते ज्ञानसंपन्न वाटत, तर दुसऱ्याच क्षणी ज्ञानशून्य भासत. म्हणून मूर्खपणा व प्रबुद्धपणा यातील कोणती पदवी त्यांना अर्पण करावी याचा निश्चय त्यांना करता येईना.

या वेळपर्यंत सँकोने आपले जेवण आटोपले आणि आपल्या यजमानाला सोडून तो, आपला धनी त्या दोन पाहुण्यांसह जेथे बसला होता, त्या खोलीत गेला. आत जाताच तो म्हणाला, " अहो सद्गृहस्थहो, आपल्याजवळ जे पुस्तक आहे, ते लिहिणाऱ्या माणसाच्या मनात, त्याने आणि मी एकत्र बसून एकादा पेला प्रेमाने प्यावा, असे कधी आले होते काय ? तो मला जसे खादाड म्हणतो तसेच दारुडा म्हणत नसेल, अशी मला आशा आहे. " डॉन जेरोनिमो म्हणाला, " छेः, त्या बाबतीत तो तुला भलेपणा देत नाही. त्याचे प्रत्यक्ष शब्द मला आठवत नाहीत, पण ते निंदा करणारे आणि खोटे आहेत, एवढे मी जाणतो. कारण, येथे समोर दिसणाऱ्या विवेकी सँकोच्या चेहऱ्यावरून मी त्याला बरोबर ओळखतो. " सेवक म्हणाला, " सज्जनहो, माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. तुमच्या पुस्तकात जो सँको आहे आणि डॉन क्विक्झोट आहे, ते कोण आहेत हे मला माहीत नाही. पण सिड् हॅमेट बेनेनगेलीच्या इतिहासात वर्णिलेले ते नाहीत हे खचित. बेनेनगेलीने आम्हाला जसे रंगविलेले आहे, तसेच आम्ही दोघे आहोत. माझा धनी शूर, विवेकी आणि प्रेमिक आहे. आणि मी साधाभोळा पण मजेत राहणारा माणूस आहे—अघाशी किंवा दारुडा नाही. " डॉन जॉन म्हणाला, " माझा तुझ्यावर विश्वास आहे. अपेलेसशिवाय दुसऱ्या कोणाही चित्रकाराने आपले चित्र काढू नये, अशी बंदी जशी अलेक्झांडरने घातली, तशी सिड हॅमेट या पहिल्या इतिहासकाराशिवाय दुसऱ्या कोणी महान् डॉन क्विक्झोट यांच्या कृत्यांची नोंद करू नये—तसे करण्यास इतर सर्व लेखकांना बंदी आहे, अशी आज्ञा, शक्य असल्यास,

करण्याची मला इच्छा आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ज्याची इच्छा असेल अशा कोणीही माणसाने माझे चित्रण करावे. पण मूळ लेखकाला कोणी दोष देऊ नये. कारण, जेव्हा धीमेपणामुळे माणसाच्या मनावर अन्यायाचा भार येतो, तेव्हा त्याचा तो धीमेपणा त्या भाराखाली पुष्कळ वेळा खचून जातो." डॉन जॉनने उत्तर दिले, "श्रीमान् डॉन क्विक्झोट यांच्यावर कोणताही अन्याय करणे कोणालाही शक्य नाही. त्याचा सूड घेण्यास किंवा निदान आपल्या शांतपणाच्या ढालीने तो दूर लोटण्यास ते समर्थ आहेत. त्यांची शांती फार मोठी आणि प्रभावी आहे, असे माझे मत आहे."

अशा संवादामध्ये त्यांनी बहुतेक सारी रात्र घालविली. त्या पुस्तकाचा आणखी काही भाग वाचावा, त्यात लेखकाने आपला विषय कसा हाताळला आहे, हे पहावे, म्हणून डॉन क्विक्झोटचे मन वळविण्याचा प्रयत्न डॉन जॉनने केला. पण त्याचा त्यांच्यावर काहीच परिणाम झाला नाही. शिलेदारजींनी त्याला समजावून सांगितले, "मी वाचले इतके बस् झाले. मी हे सारे पुस्तक वाचले आहे असे समजून मी असा निष्कर्ष काढतो की, ते एकाच नमुन्याचे आहे. त्यात सर्वत्र मूर्खपणा भरलेला आहे. मी ते पुस्तक वाचले हे कळल्यामुळे ते खरडणाऱ्या लेखकाच्या अभिमानाला भरते येईल. तसे मी करणार नाही. त्याचे पुस्तक माझ्या हाती पडले हे त्याच्या कानी कधी काळी गेले, तर तो चढून जाईल. दुष्ट आणि अश्लील गोष्टी वाचून आपले विचार – आणि त्याहीपेक्षा आपले डोळे – भ्रष्ट करण्याचे आपण टाळले पाहिजे, हे मला चांगले माहीत आहे."

त्यांनी त्यांना विचारले, "आपण कोणत्या मार्गाने प्रवास करीत आहा?" त्यांनी सांगितले, "मी सॅरॅगोस्साला चाललो आहे. वर्षातून एकदा त्या शहरात शस्त्र–विद्येसाठी सामने भरविले जातात आणि बक्षीस दिले जाते." डॉन जॉन याने त्यांना माहिती दिली. इतिहासाच्या दुसऱ्या तथाकथित भागात डॉन क्विक्झोट (जो कोणी असेल तो) सॅरॅगोस्साला जातो आणि पळण्याच्या शर्यतीत भाग घेतो त्याचे वर्णन, योजनेच्या दृष्टीने सदोष व खराब आहे, शैली व भाषा यांच्या दृष्टीने नीच व अधम आहे आणि मूर्खपणाच्या, शिळोप्याच्या अत्यंत भिकार गोष्टींनी भरलेले आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तर मग मी सॅरॅगोस्सामध्ये पाय ठेवणार नाही. त्यामुळे जगाला कळून येईल की, या नव्या इतिहासकाराने किती धादांत खोट्या गोष्टी लिहिण्याचा दोष पत्करला आहे. तो ज्याच्याविषयी बोलतो, तो डॉन क्विक्झोट मी नाही, हे साऱ्या मानव–जातीला कळून येईल." डॉन जेरोनिमो म्हणाला, "तसेच करा आपण. शिवाय बार्सेलोना येथे दुसरे सामने आहेत. त्यात तुम्हाला आपल्या शौर्याची चमक दाखविता येईल." डॉन क्विक्झोट उत्तरले, "तसे करण्याचा विचार मी करतो. सद्गृहस्थहो, मी आपला रात्रीचा निरोप घेतो. मला निजण्याची परवानगी द्या. आता वेळ झाली आहे. आपल्या उत्तमोत्तम मित्रांच्या आणि अत्यंत विश्वासू सेवकांच्या यादीत आपण माझे नाव घालावे अशी माझी प्रार्थना आहे." सँको म्हणाला, "आणि माझेही. माझाही काही कामासाठी उपयोग

आहे असे आपल्याला आढळून येईल. ”

एकमेकांचे निरोप घेतल्यानंतर, डॉन क्विक्झोट व सँको आपल्या खोलीत परत गेले. ते दोघे पाहुणे नवल करीत राहिले की, सद्बुद्धी व आचरटपणा यांचे किती विलक्षण मिश्रण या शिलेदाराच्या अंगी आहे. पण त्यांना असे पूर्ण समाधान लाभले की, त्या ॲरॅगोनियन लेखकाने जनतेवर लादलेले डॉन क्विक्झोट व सँको ते हे नव्हेत– हे खरेखुरे आहेत.

डॉन क्विक्झोट भल्या पहाटे उठले आणि त्या सद्गृहस्थाच्या खोलीपासून स्वतःची खोली अलग करणाऱ्या पातळ भिंतीवर ठोठावू लागले. त्यांनी त्या दोघांचा निरोप घेतला. सँकोने यजमानाला सढळ हाताने पैसे दिले. पण बजावले की, “ आपल्या खानावळीत याहून चांगले खाद्यपदार्थ ठेवा, नाही तर त्यांची प्रशंसा कमी करा. ”



## प्रकरण ६०

# बोर्सेलोनाकडे जाणाऱ्या डॉन क्विक्झोटला काय झाले ?

सकाळची थंड हवा पडली होती. सारा दिवस सौम्यपणे जाईल असे आश्वासन मिळत होते. अशा वेळी डॉन क्विक्झोट यांनी ती खानावळ सोडली. त्यापूर्वी, बार्सेलोनाला जाणारा जवळचा रस्ता कोणता याची माहिती त्यांनी घेतली. सॅरॅगोस्साचे दर्शनही घ्यायचे नाही असा त्यांचा निश्चय होता. त्या नव्या लेखकाला थापाड्या ठरविण्यासाठी तिकडे जाण्याचा विचारच त्यांनी सोडून दिला होता. कारण त्याने आपल्या इतिहासाच्या दुसऱ्या कल्पित भागात आपले चित्रण विद्रूपपणे केले असल्याचे त्यांना सांगण्यात आले होते. सहा दिवसांच्या काळात प्रवास करीत असताना संस्मरणीय असा एकही साहसाचा प्रसंग त्यांच्यापुढे उभा राहिला नाही, पण सातवे दिवशी त्यांची वाट चुकली आणि रात्र पडली. म्हणून त्यांना एका जंगलात राहणे भाग पडले. त्यातील झाडे ओक होती की कॉर्क होती, हे सिड् हॅमेट सांगत नाही. इतर बाबतीत त्याने जो बारकावा दाखविला आहे, तो येथे दिसत नाही. त्या जंगलात धनी व सेवक–दोघेही आपापल्या वाहनावरून खाली उतरले आणि झाडांच्या पायथ्याशी पहुडले. त्या दिवशी सँकोचे पोट भरपूर भरले असल्यामुळे तो निद्रादेवीच्या बाहूत सहजच विसावला. पण डॉन क्विक्झोट भुकेपेक्षा कल्पना–विलासामुळे जागेच राहिले. ते आपले डोळे मिटू शकले नाहीत. त्यांचे चपळ विचार हजारो विविध स्थानी सैरावैरा धावत होते. एकदा ते अशी कल्पना करीत की, आपण मॉंटेसिनोजच्या गुहेत आहोत; तर एकदा त्यांना वाटे, खेडवळ मुलीचे रूप मिळालेली आपली डल्सीनिया स्वतःच्या गाढवाच्या पिल्लावर एका उडीत जाऊन बसलेली आपल्याला दिसत आहे. दुसऱ्याच क्षणी त्यांना वाटे, तिच्यावरील जादू नाहीशी करण्याचे उपाय साधू मर्लिन भयंकर शब्दांनी सांगत आहे अन् ते आपण ऐकत आहो. क्षणात निराशेचा झटका त्यांना येई. सँकोच्या निष्काळजीपणाचा आणि कंजूषपणाचा विचार करून करून ते ठार वेडे झाले. आपल्या सेवकाने पाचाहून अधिक फटके स्वतःला दिले नाहीत,त्याच्या तपश्चर्येसाठी जी संख्या अवश्य होती तिच्या मानाने ही संख्या अगदीच क्षुल्लक होती, अजून किती तरी फटके त्याला खावयाचे होते. या विचाराने त्यांना इतका संताप आला आणि त्यांचा मनस्ताप इतका वाढला की, काही तरी विलक्षण मार्ग शोधून काढल्या-शिवाय त्यांना राहावेना. " जेव्हा महान अलेक्झांडरला गॉर्डियन गाठ सोडविता येईना,

तेव्हा तो म्हणाला, गाठ सोडणे काय अन् तोडणे काय–एकच ? आणि म्हणून त्याने ती गाठ तोडली अन् तरी तो जगाचा स्वामी झाला. तर मग, सँको स्वतःला बडवून घेवो वा न घेवो, डल्सीनियाला जादूमुक्त करण्यासाठी मी स्वतः सँकोला फटके का न मारावेत ? सँकोने तीन हजार अधिक काही फटके घेणे ही जर या उपायाची शर्त असेल, तर ते त्याने स्वतः घेतले काय किंवा दुसऱ्या कोणी दिले काय–दोहोंचा अर्थ एकच. कारण, कटाक्ष आहे तो त्याने फटके घेण्यावर– मग तो कोणीही देवो. ''

या विचाराने भारलेले ते सँकोकडे गेले. त्याला फटके लगावण्यासाठी रोझिनांटच्या लगामाचे पट्टे त्यांनी आधी हातात घेऊन ते वळवून ठेवले होते. तेथे जाताच त्यांनी सँकोच्या पायजम्याचे बंद सैल करण्याचा प्रयत्न केला. त्याच्या पायजम्याला एकच बंद होता, हे सर्वांना माहीत होते. त्यांनी आपल्या कामात हात घातला न घातला, तोंच सँको झोपेतून ताडकन् उठला आणि क्षणार्धात पुरा जागा झाला व म्हणाला, '' काय आहे हे ? मला कोण चाचपत आहे ? माझ्या पायजम्याचा बंद कोण सोडीत आहे. '' डॉन क्विक्झोट उत्तरले, '' मी आहे ! तुझ्या हयगयीची भरपाई करण्यासाठी मी आलो आहे. माझ्या यातनांवर उपाय शोधण्यासाठी मी आलो आहे––सँको, तुला फटके मारण्यासाठी आणि तुझ्या डोक्यावर असलेले ऋण अंशतः तरी फेडण्यासाठी मी आलो आहे. अरे, तिकडे ती डल्सीनिया मृत्यू पावत आहे आणि तिच्या भवितव्याविषयी बेफिकीर राहून तू जिवंत आहेस. पण मी तिच्या आशेने मरत आहे. म्हणून तू राजी-खुशीने आणि मोकळेपणाने आपला पायजमा सैल कर. कारण, मी असा निश्चय केला आहे की, या एकांतात आपण दोघे एकटे असताना, तुला निदान दोन हजार फटके लगावावयाचे. ''

सँको म्हणाला, '' तेथेच थांबा, शांत व्हा, मला मोकळे सोडा. नाही तर मी इतका आरडाओरडा करीन की, बहिरी माणसेही तो ऐकतील ! मी स्वतःला जे तडाखे द्यावयाचे आहेत ते स्वखुषीचे असले पाहिजेत–सक्तीचे नव्हेत आणि यावेळी तडाखे खाण्याचे माझ्या मनात मुळीच नाही. जेव्हा माझ्या मनाचा कल होईल, तेव्हा मी मला फटके देईन असे मी आपल्याला वचन देतो—आणि तेवढे पुरेसे आहे. '' डॉन क्विक्झोट म्हणाले, '' सँको, तसे होणार नाही. तुझ्या या सौजन्याला काही आधार नाही. कारण तू कठोर हृदयाचा आहेस. तू विदूषक असलास तरी स्वतःच्या शरीरावर दया करणारा आहेस. '' असे म्हणून त्यांनी आपल्या सेवकाचा पायजमा मोकळा करण्यासाठी आपली सर्व शक्ती खर्च केली. ते पाहून सँको आपल्या पायावर खडा झाला आणि आपल्या मालकावर तुटून पडला. त्याने त्यांना घट्ट आवळले, त्यांचे पाय वर उचलले आणि जमिनीवर त्यांना आपटले. ते आपल्या पाठीवर पडले. नंतर त्यांच्या छातीवर गुडघा टेकून व त्यांचे हात घट्ट पकडून तो बसला. त्यामुळे धन्याला हालता येईना की श्वास घेता येईना. अशा तऱ्हेने आपल्याला आपल्या सेवकाने लोळविलेले पाहून डॉन क्विक्झोट ओरडले, '' अरे निमकहरामा, काय हे ? आपल्या धन्याविरुद्ध–

आपल्या जन्मापासूनच्या मालकाविरुद्ध––आपल्या भाकरी देणाऱ्याविरुद्ध तू बंड करतोस ! ''

सँको म्हणाला, '' मी कोणाला राजा करीत नाही की कोणा राजाला मारीत नाही. मी फक्त माझे संरक्षण करीत आहे. मी माझा स्वतःचा स्वभावतःच स्वामी आहे. जर महाराज मला मोकळे सोडण्याचे आणि यावेळी फटके न देण्याचे वचन देत असतील, तर मी आपल्याला उठू देईन आणि स्वतंत्र करीन. नाही तर अरे डोन्ना सँकोच्या विश्वासघातक्या, येथेच तू मर ! '' डॉन क्विक्झोट यांनी तसे वचन दिले आणि सँकोच्या डोक्यावरील केसालाही धक्का लावणार नाही असे, आपल्या प्राणाची शपथ घेऊन, सांगितले. आणि ' तुला योग्य वाटेल त्या वेळी तू स्वतः फटके मारून घे ' अशी मुभा दिली. तेव्हा सँको त्यांच्या छातीवरून उठला आणि दूर अंतरावर दुसऱ्या जागी त्याने आपला मुक्काम ठोकला. तेथे तो एका झाडाला टेकू लागला, तेव्हा आपल्या डोक्यावर काही तरी खाली–वर होत आहे असे त्याला दिसले. त्याने आपले हात वर केले, तेव्हा त्याला कोणा माणसाचे पाय आहेत आणि पायात पायमोजे व बूट आहेत असे त्याला दिसले. भीतीने थरथरा कापत तो दुसऱ्या झाडाकडे गेला. तेथेही तसेच भीतिदायक संकट त्याच्या डोक्यावर लोंबकळू लागले. तेव्हा मदतीसाठी त्याने डॉन क्विक्झोट यांना सरळ हाक दिली. डॉन क्विक्झोट तिकडे गेले आणि त्याच्या भीतीचे कारण त्यांनी विचारले. सँकोने उत्तर दिले, ही सारी झाडे माणसांच्या पायांनी आणि तंगड्यांनी भरलेली आहेत. डॉन क्विक्झोट यांनी शोध घेण्याचा व चाचपडण्याचा प्रयत्न केला आणि त्या कामात जीव ओतून ते म्हणाले, '' सँको, तू कसलीही भीती बाळगू नकोस. येथे कोणताही धोका नाही. कारण तुला या अंधारात जे काही असल्याचा भास होत आहे, ते म्हणजे या झाडावर फाशी दिलेल्या चोर–दरोडेखोरांचे पाय व तंगड्या आहेत. न्यायाधिकारी अशा लोकांना वीस–विसांच्या आणि तीस–तिसांच्या गटाने फाशी देत असतात. यावरून मला वाटते की, आपण बार्सेलोनापासून फार दूर नाही. '' आणि खरोखर त्यांचा तर्क बरोबर होता.

आता दिवस उजाडला. त्यांनी आपले डोळे उघडले तेव्हा त्यांना झाडावर लोंबकळत असलेली वाटमाऱ्यांची प्रेते दिसली. मेलेल्या दरोडेखोरांनी त्यांना इतके आश्चर्यचकित केले, तर त्यांच्यावर अकस्मात् येऊन तुटून पडणाऱ्या आणि त्यांना वेढा घालणाऱ्या चाळीस जिवंत लुटारूंना पाहून ते किती गोंधळले असतील ? ' आमचा सेनापती येईपर्यंत येथे उभे राहा ' असे त्यांनी यांना कॅटॅलन भाषेत बजावले.

त्यावेळी डॉन क्विक्झोट आपल्या पायांवर उभे होते, त्यांच्या घोड्याचा लगाम काढलेला होता, त्यांचा भाला दूरच्या एका झाडावर टेकून ठेवलेला होता, म्हणजे संरक्षणाचे काहीही साधन त्यांच्याजवळ नव्हते. म्हणून आपले दोन्ही हात आडवे धरून आणि आपले खांदे उडवून त्यांना आपले मस्तक खाली लववणे भाग पडले. दुसऱ्या चांगल्या संधीची वाट पहात ते राहिले. ते चोर चटकन् आपल्या कामास लागले. डॅपलला

त्यांनी लुटले. त्याच्या पाठीवरील एकही वस्तू त्यांनी शिल्लक ठेवली नाही. चामड्याच्य-पिशवीतील किंवा अंगरख्याच्या पिशवीतील एकही पदार्थ त्यांनी शिल्लक ठेवला नाही. ड्यूकने दिलेली सोन्याची नाणी आणि स्वतः घरून आणलेली काही नाणी सँकोने आपल्या कमरेभोवती गुंडाळलेल्या कशात लपवून ठेवली होती हे फार चांगले झाले! त्या प्रामाणिक सज्जनांनी त्याच्या साऱ्या शरीराची झडती घेण्याचे कष्ट घेतले असते, आणि जरूर तर त्याची कातडी सोलून त्याच्याजवळील सोने हिसकून घेतले असते, पण सुदैवाने त्यांचा सेनापती मध्येच आला. तो सुमारे चाळीस वर्षे वयाचा दिसत होता.

त्याचा देह सुदृढ होता आणि त्याचा बांधा उंच होता. त्याचा चेहरा उग्र होता आणि त्याचा वर्ण काळा होता. तो एका भक्कम घोड्यावर बसला होता, त्याने अंगात चिलखत घातले होते आणि त्याच्या दोन्ही बाजूस निदान दोन-दोन पिस्तुले होती. ( त्या धंद्यातील लोकांना त्या प्रदेशात ' शागीर्द ' म्हणत. ) आपले शागीर्द सँकोला उघडे-नागडे करीत आहेत असे पाहून त्याने त्यांना तसे न करण्याचा हुकूम सोडला. तो त्यांनी तत्काळ पाळला. त्यामुळे सँकोचा कसा सुखरूप राहिला. एका झाडाशी टेकून ठेवलेला भाला, जमिनीवर पडलेली ढाल आणि चिलखत घातलेले पण चिंतातुर असे डॉन क्विक्झोट त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हा त्याला मोठे नवल वाटले. मूर्तिमंत निराशाही घडवू शकणार नाही अशी अत्यंत दुःखी आणि उदास मुद्रा त्यांची दिसत होती. त्यांच्याजवळ जाऊन तो म्हणाला, " भल्या माणसा, इतके दुःख वाटून घेऊ नकोस. तू काही क्रूर ओसिरिसच्या हातात सापडलेला नाहीस– रोके गिनार्टच्या हातात पडला आहेस– आणि तो कठोर असण्यापेक्षा करुण आहे. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " हे पराक्रमी रोके, तुझ्या हातात मी पडलो म्हणून मी दुःखी नाही. तुझी असीम कीर्ती साऱ्या विश्वात पसरलेली आहे, पण माझ्या घोड्याला लगाम घातलेला नसताना तुझ्या सैनिकांनी माझ्यावर अकस्मात् हल्ला करावा, इतका निष्काळजी मी राहिलो याचे मला दुःख होते. माझा व्यवसाय शिलेदारीचा असल्याची मी बढाई मारतो. त्या व्यवसायाच्या परंपरे-प्रमाणे मी नेहमी माझे संरक्षण केले पाहिजे आणि सदा-सर्वदा माझा संरक्षक असले पाहिजे. अरे महान् रोके, मी तुला सांगतो की, माझी ढाल आणि भाला माझ्या हातात असताना आणि मी माझ्या घोड्यावर बसलेलो असताना ते जर मला भेटले असते, तर मला शरण आणणे हे काम सोपे नाही, असे त्यांना आढळून आले असते. कारण, तू हे लक्षात ठेव की, ज्याच्या पराक्रमाचे पवाडे या साऱ्या पृथ्वीतलावर गायिले जात आहेत, तो ला मांचा येथील डॉन क्विक्झोट मीच आहे. "

रोके गिनार्टच्या ध्यानात डॉन क्विक्झोटच्या स्वभावाची कच्ची बाजू चटकन आली आणि त्याने ओळखले, या स्वारीच्या अंगी शौर्यापेक्षा मूर्खपणाच अधिक आहे. त्याचे नाव बोलण्याच्या ओघात त्याने पुष्कळ वेळा ऐकले होते. पण त्याच्याविषयी जे सांगितले जात होते, ते खरे असेल यावर त्याचा कधीच विश्वास बसला नव्हता. इतका लहरीपणा कोणा माणसाच्या स्वभावात असेल असेही त्याला कधी वाटले नव्हते. त्यामुळे

त्याची भेट झाल्याचा त्याला फार आनंद वाटला. अनुभवानेच आता आपल्याला सत्यस्थिती कळून येईल, असे त्याला वाटले. म्हणून त्यांना उद्देशून तो म्हणाला," हे शूर शिलेदारा, तुम्ही स्वतःला त्रास करून घेऊ नका अन् दैवाला निष्ठुर मानू नका. कारण, कोणी सांगावे, तुम्हाला आता जो दुःखाचा अपघात वाटत आहे, तो तुम्हाला लाभदायकही ठरेल. कारण मानवी तर्काच्या आटोक्यापलीकडे असणाऱ्या विलक्षण आणि गूढ मार्गांनी ईश्वर दलितांना वर उचलतो आणि रंकाना राव करतो. " डॉन क्विक्झोट त्याचे आभार मानणार होते, तोच त्यांच्या कानी कैक घोड्यांच्या टापांचा आवाज आला. पण खरोखर तो एकाच घोड्याच्या टापांचा होता. त्या घोड्यावर बसून एक माणूस अत्यंत वेगाने तेथे आला. तो सुमारे वीस वर्षे वयाचा दिसत होता. त्याच्या अंगावर जरतारीची किनार असलेला हिरवा रेशमी अंगरखा होता. तो आतल्या जाकिटाला शोभून दिसत होता. त्याच्या डोक्यावरील टोपी मागे वळविलेली होती अन् त्याच्या पायात चामड्याचे बूट होते. त्याची टाच, तलवार आणि कट्यार यांना सोन्याचा मुलामा दिलेला होता आणि त्याच्या हातात लहानशी पक्ष्यांची बंदूक होती. तो आवाज ऐकून रोकेने आपले डोके मागे वळविले, तेव्हा त्याला ती देखणी मूर्ती दिसली. तो माणूस त्याच्याजवळ येऊन पुढीलप्रमाणे बोलला—

" हे शूर रोके, मी ज्याचा शोध करीत होते, तेच तुम्ही आहा. माझ्या दुःखात तुमच्याकडून मला काही उपाय मिळाला नाही तरी समाधान मिळेल अशी आशा आहे, तुम्हाला संशयात न ठेवता, मी कोण आहे हे मी तुम्हाला सांगते. तुम्ही मला ओळखत नाही हे मी जाणते. माझे नाव क्लॉडिया जेरोनिमा असे आहे. आपला खास मित्र सायमन फोर्टे याची मी कन्या आहे. तुमचाही जो शत्रु आहे आणि तुमच्या विरुद्ध गटाचा जो आहे, त्या क्लॉकेल टोरेलास यांचा कट्टा वैरी माझा पिता आहे. तुम्हाला हे माहीतच आहे की, या टोरेलासला एक मुलगा होता. त्याला लोक डॉन व्हिन्सेन्ट टोरेलास असे म्हणत–निदान गेल्या दोन तासात त्याला तसे नाव पडले होते. माझी ही शोकाची कहाणी थोडक्यात आटोपावयाची तर, त्याच्या त्या मुलाने मला कोणते दुःख दिले हे मी चार शब्दात सांगते. त्याने मला पाहिले, माझे प्रणयाराधन केले आणि त्याचे बोलणे ऐकून मी त्याच्यावर प्रेम केले. आमचा प्रणय इतक्या गुप्त रीतीने चाललेला होता की, माझ्या बापाला याची काहीच कल्पना नव्हती. जिला आपल्या अनावर भावना आवरण्यास वेळ मिळतो अशी स्त्री या जगात कोणीही नसते. मग ती कितीही एकांतात राहो आणि तिच्यावर कितीही कडक पहारा असो. सारांश, त्याने मला लग्नाचे वचन दिले, आणि मी त्याला दिले. यापेक्षा पुढे आमची मजल गेली नाही. आता काल मला कळले की. माझ्याशी केलेला करार विसरून तो दुसऱ्या मुलीशी लग्न करणार आहे आणि त्यांचे लग्न आता सकाळीच होणार आहे. ही बातमी ऐकताच माझे मन अत्यंत अस्वस्थ झाले आणि माझा सारा धीर सुटला. माझा बाप बाहेरगावी गेलेला असल्याने, तुम्ही पहाता तो वेष मी धारण केला आणि येथून सुमारे दोन मैलावर असणाऱ्या डॉन

व्हिन्सेन्ट याला माझ्या घोडयावरून जाऊन पकडले. तेथे जाताच मी माझ्यावरील अन्यायाचा पाढा न वाचता किंवा त्याच्या सबबी ऐकण्यासाठी न थांबता, त्याच्यावर या दोन्ही पिस्तुलातून गोळ्या झाडल्या आणि त्या त्याच्या शरीरातून पार गेल्या असे मला वाटते. त्याच्या हृदयातील रक्ताने मी माझ्या शीलावरील कलंक पुसून टाकला. हे झाल्यावर मी त्याला त्याच्या सेवकांच्या हवाली करून तेथून निघाले. हे सारे काम इतके झटपट झाले की, ते सेवक माझा प्रतिकार करू शकले नाहीत. किंवा करण्यास धजले नाहीत. आता मी आपल्याकडे संरक्षण मागण्यासाठी आले आहे. आपल्यामार्फत मला फ्रान्समध्ये जाता येईल. तेथे माझे स्वागत करण्यासाठी माझे नातलग आहेत. तसेच त्याच्या मृत्यूचा सूड डॉन व्हिन्सेन्टचा पक्ष आमच्या कुटुंबावर उगवील, तेव्हा तुम्ही माझ्या बापाचा बचाव करावा अशीही विनंती करण्यासाठी मी येथे आले आहे."

सुंदर क्लॉडियाची देखणी आकृती, सुखदायक वर्तणूक आणि निश्चयी स्वभाव या सर्वांचे आश्चर्य वाटून रोके म्हणाला, "मुली, ये, आपण आधी तुझ्या शत्रूच्या मृत्यूची खात्री करून घेऊ आणि नंतर तुझ्यासाठी काय करावयाचे याचा विचार करू." हा सारा संवाद अत्यंत लक्षपूर्वक ऐकत असलेले डॉन क्विक्झोट म्हणाले, "थांबा, या प्रकरणामुळे तुमच्यापैकी कोणी काही तसदी घेण्याचे कारण नाही. स्त्रीसंरक्षण हा माझा खास प्रांत आहे. मला माझा घोडा आणि शस्त्रे द्या आणि मग माझ्यासाठी येथे थांबा. मी येथून जाऊन त्या शिलेदाराला, मृत वा जिवंत, शोधून काढतो आणि एवढ्या सौंदर्यशालिनी स्त्रीसंबंधीचे आपले कर्तव्य पार पाडावयास लावतो." सँको म्हणाला, "वाः वाः! यांच्या शब्दांवर आपण विश्वास ठेवा. लग्ने जमविण्यात माझ्या धन्याची विलक्षण हातोटी आहे. परवाचीच गोष्ट पहा ना, एका तरुण बदमाषाला त्यांनी एका कुमारिकेशी लग्न लावावयास भाग पाडले; नाही तर तिला वचन देऊन त्याने तिला वाऱ्यावर सोडून दिले असते. आमच्या धनीसाहेबांना पिच्छा पुरविणाऱ्या जादूगारांनी वराचे रूपांतर एका नोकरात केले नसते आणि त्यामुळे ते लग्न फिसकटले नसते तर आज त्या कुमारिकेचे भाग्य किती उजळले असते!"

क्लॉडियाच्या धाडसाच्या विचारांनी रोकेचे मन इतके भरून गेले होते की, त्याने तो धनी किंवा सेवक यांच्या बोलण्याकडे फारसे लक्ष दिले नाही. त्याने आपल्या सेवकांना हुकूम दिला, 'डॅपलवरून ज्या वस्तू तुम्ही घेतल्या असतील, त्या सँकोला परत करा आणि आदल्या रात्री तुम्ही जेथे मुक्काम केला होता त्याच जागी परत जा.' नंतर तो मरणोन्मुख डॉन व्हिन्सेन्ट याचा शोध लावण्यासाठी क्लॉडियाबरोबर तातडीने निघून गेला. जेथे क्लॉडिया त्याला भेटली होती, त्या जागी ते दोघे गेले. तेथे नुकत्याच सांडलेल्या रक्ताच्या थेंबाशिवाय त्यांना दुसरे काही आढळले नाही. पण आसपास पाहताच त्यांना एका टेकडीच्या बाजूवर, काही अंतरावर, काही माणसांची टोळी दिसली. तत्काळ त्यांनी निर्णय केला की, डॉन व्हिन्सेन्टला बरे करण्यासाठी किंवा जमिनीत पुरण्यासाठी तेथून त्याला नेणारे त्याचे हे सेवक असावेत. त्यांना गाठण्यासाठी

या दोघांनी धावपळ केली. ते सेवक सावकाश जात असल्यामुळे त्यांना यांनी लौकरच गाठले. त्या सेवकांच्या बाहूंमध्ये तो तरुण असलेला त्यांना दिसला. तो त्या सेवकांना क्षीण व ओढलेल्या आवाजात म्हणत होता, "याच जागी मला मरू द्या. या जखमांच्या वेदना मला इतक्या होत आहेत की, यापुढे थोडेही जाणे मला सहन होणार नाही."

क्लॉडिया आणि रोके घोड्यावरून उतरून घाईने त्याच्याकडे गेले. रोकेला पाहून ते सेवक दचकले आणि डॉन व्हिन्सेन्टला पाहून क्लॉडिया त्रस्त झाली. क्रोध व करुणा यामध्ये तिचे मन दुभंगले गेले. त्याचा हात पकडून ती त्याला म्हणाली, "हा हात तुम्ही मला दिला असता आणि आपले वचन खरे केले असते, तर तुम्ही आपल्या शिरावर हे अरिष्ट ओढवून घेतले नसते." आपले क्षीण होणारे नेत्र वर उचलून आणि क्लॉडियाला ओळखून तो जखमी युवक म्हणाला, "हे सुंदर, भ्रांत तरुणी, आता मला कळले. हा प्राणघातक प्रहार माझ्यावर करणारी तू आहेस हे मला कळले. हा निष्पाप आणि दुर्दैवी व्हिन्सेन्ट या शिक्षेला कधीच पात्र नव्हता. कारण, त्याच्या साऱ्या कृती आणि इच्छा यांचे साध्य आपल्या क्लॉडियाची सेवा करण्याशिवाय दुसरे काहीच नव्हते." ती लगेच उत्तरली, "काय महाराज ? श्रीमंत बॅलव्हॅस्ट्रोची कन्या लिओनोरा हिच्याशी लग्न करण्यासाठी आज सकाळी आपण तिकडे गेला होता, हे आपण नाकारू शकता काय ?" त्याने उत्तर दिले, "छेः, ती सारी खोटी बातमी होती. माझ्या दुर्दैवी ग्रहयोगामुळे, तुझा मत्सर जागृत करावा आणि माझा जीव घेण्यास प्रवृत्त करावे, म्हणून ती कंडी उठविलेली होती. माझा जीव मी तुझ्या सुंदर हातात सोपविला आहे. आता त्याचा विनियोग चांगला होईल असे मी समजतो. हे सत्य सिद्ध करण्यासाठी, तू आपला हात माझ्या हातात दे आणि माझा हात तुझ्या हातात घे म्हणजे प्रेम व प्राण या दोहोंची अखेरची शपथ घेतल्यासारखे होईल. मग तू आपला पती म्हणून माझा स्वीकार कर. मी जो काल्पनिक अन्याय केला असा तुला संशय आहे, त्याची भरपाई एवढीच करता येईल." क्लॉडियाने त्याचा हात दाबला. तिच्या अंतःकरणाला भेदून हे दुःख गेल्यामुळे ती मूर्च्छित होऊन त्याच्या रक्तलांछित वक्षःस्थलावर पडली. डॉन व्हिन्सेन्टही बेशुद्ध पडला – पण मरणाच्या मूर्च्छेत तो गेला.

रोके निःस्तब्ध उभा राहिला. त्या अभागी जोडप्याच्या तोंडावर मारण्यासाठी पाणी आणण्याकरता ते सेवक धावले. पाणी शिंपडल्यावर शेवटी क्लॉडिया शुद्धीवर आली पण डॉन व्हिन्सेन्ट आपल्या मूर्च्छेतून कधीच उठला नाही. आपल्या आयुष्यातील शेवटचा श्वास त्याने सोडला. हे जेव्हा क्लॉडियाने पाहिले आणि आपला प्रिय पती मृत झाला आहे– परत कधी येणार नाही– याविषयी तिला जेव्हा काडीमात्र शंका राहिली नाही, तेव्हा आपल्या सुस्काऱ्यांनी तिने सारे वातावरण भेदून टाकले व आपल्या आक्रोशानी स्वर्गाला घायाळ केले. तिने आपले केस उपटले, वाऱ्यावर इतस्ततः फेकले आणि आपल्या निर्दय हातांनी स्वतःचे मुख विद्रूप केले. निराशेच्या पहिल्या धक्क्याने निर्माण होणाऱ्या दुःखाची सारी स्पष्ट चिन्हे तिच्या मुखावर दिसू लागली, ती स्वतःला

उद्देशून म्हणाली, " हे कठोर आणि अविचारी स्त्रिये, हे रानटी कृत्य करण्यास तू सहजासहजी कशी तयार झालीस ? हे मूर्ख मत्सरा, तुझा दंश किती भयंकर असतो आणि त्याचे परिणाम किती घातुक असतात ! अरे माझ्या अभागी पतिराजा, माझ्या-वरील तुझ्या कळकळीच्या प्रेमाने आणि निष्ठेने मला विवाह–शय्येऐवजी थंड थडग्यावर आणून सोडले आहे ! "

अशा प्रकारे ती अभागिनी हृदयद्रावक व दुःखदायक स्वराने इतका विलाप करीत राहिली की, रोकेचे कठीण हृदयही वितळले आणि अश्रूंच्या रूपाने वाहू लागले. त्याच्या डोळ्यात कोणत्याही प्रसंगी असे अश्रू कधी आलेले नव्हते. सेवक रडू लागले आणि शोक करू लागले. क्लॉडिया पुनः मूर्च्छित पडली. सेवकांनी तिला पुनः शुद्धीवर आणले. तेथले ते सारे दृश्य अत्यंत हृदयद्रावक होते. शेवटी रोके गिनार्ट याने डॉन व्हिन्सेन्टच्य सेवकांना फर्मावले, " याचे शव त्याच्या बापाच्या घरी न्या म्हणजे तेथे त्याचे दफन होईल. " ते घर फार दूर नव्हते. क्लॉडियाने रोकेला आपला असा निश्चय निवेदिला की, ' एका मठात राहून मी माझा सारा जन्म घालविणार. तेथे माझी आत्या महंतीण आहे. तेथे माझे लग्न एका मंगल आणि अजरामर अशा वराशी होईल. " तिच्या या पवित्र निश्चयाची प्रशंसा त्याने केली आणि तिच्या इच्छेप्रमाणे तिला कोठेही पोचविण्याची तयारी दाखविली. तसेच तिच्या बापाचे व कुटुंबाचे संरक्षण त्यांच्या अत्यंत भयंकर अशा शत्रूंच्या हल्ल्यापासून आणि कार्यापासून करण्याचीही तयारी त्याने दाखविली. पण क्लॉडियाने मोठ्या नम्रपणे त्याची संगती नाकारली आणि रडत रडत त्याची रज घेतली. डॉन व्हिन्सेन्टच्या सेवकांनी त्याचे शव तेथून नेले आणि रोके आपल्या माणसांकडे परत गेला. अशा प्रकारे क्लॉडिया जेरोनिमाचे प्रेम–प्रकरण समाप्त झाले. क्रूर व बेफाम मत्सराच्या प्रभावी शक्तीमुळे केवढा दारुण अनर्थ ओढवला !

रोके गिनार्ट याने आपली टोळी जेथे ठेवली होती, तेथेच ती त्याला आढळली. त्या लोकांच्या मध्यभागी, डॉन क्विक्झोट हे रोझिनांटवर बसून, त्यांच्या राहणीची यथेच्छ निंदा करीत होते. दरोडेखोरांची राहणी ही त्यांच्या शरीराला भीतिदायक असून त्यांच्या आत्म्याचा नाश करणारी आहे, असे ते सांगत होते. पण त्याचा श्रोतृवर्ग मुख्यतः जंगली व बेबंद अशा गॅस्कोन लोकांचा असल्यामुळे, त्यांचा सारा नैतिक उपदेश पालथ्या घड्यावर पडला. तेथे आल्यावर रोकेने सँकोला विचारले, " या लोकांनी तुला आपल्या साऱ्या वस्तू परत दिल्या काय ? " सँकोने उत्तर दिले, " होय, महाराज, फक्त रात्री घालावयाच्या तीन टोप्या मिळाल्या नाहीत. एखाद्या राजाच्या खंडणीइतकी त्यांची किंमत आहे. " एक दरोडेखोर ओरडला, " काय म्हणतो आहे हा माणूस ? त्या टोप्या येथेच कोठे असतील आणि त्यांची किंमत तीन रीलइतकीही नाही. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " त्यांची मूळची किंमत काहीच नसेल. पण मला ज्या माणसाने त्या दिल्या, त्याच्या गुणामुळे त्यांचे मोल त्या किमतीपर्यंत चढले आहे. "

त्या टोप्या तत्काळ परत करण्याचा हुकूम रोकेने सोडला. आपल्या सर्व माणसांना

एका रांगेत उभे राहण्याची आज्ञा त्याने केली. पूर्वीच्या मोहिमेनंतर लूट म्हणून जे जे कपडे, रत्ने, पैसे वगैरे मिळाले असतील, ते सर्व आपल्यापुढे आणण्यास त्याने त्यांना फर्माविले. नंतर प्रत्येक वस्तू बारकाईने पाहून त्याने, ज्या वस्तूंची वाटणी करता येत नाही, त्यांची पैशात किंमत केली. त्या सर्वांचा हिशेब करून त्याने त्यांची वाटणी न्यायाने केली. प्रत्येक माणसाला त्याने त्याचा योग्य तो वाटा अचूकपणे दिला. तसे करताना त्याने इतके शहाणपण आणि न्यायबुद्धी दाखविली की, न्यायाने वाटणी करण्याचे कोणतेही तत्त्व त्याने झुगारून दिले नाही. सर्वांना समाधान होईल अशा रीतीने लुटीची वाटणी केल्यानंतर डॉन क्विक्झोटकडे वळून रोके म्हणाला, "अशा तऱ्हेने न्यायाची व्यवस्था ठेवली नाही तर आम्हाला जगताच येणार नाही." सँको म्हणाला," बरोबर! न्याय ही चांगली गोष्ट आहे. 'चोर आपापसामध्ये कधीच बदमाषी करीत नाहीत' ही जुनी म्हण अजून खरी आहे." त्याचे बोलणे ऐकून एका दरोडेखोराने आपली बंदूक त्याच्यावर रोखली– आणि त्याच्या डोक्यात त्याने आपली गोळी मारली असती, पण त्याच्या सेनापतीने त्याला हात आवरण्यास फर्माविले. बिचारा सँको एखाद्या माश्यासारखा गप्प बसला. चांगल्या लोकांच्या संगतीत जाईपर्यंत आपले ओठ पुन: उघडावयाचे नाहीत असा निश्चय त्याने केला.

इतक्यात त्यांचे एक–दोन टेहळ्ये तेथे आले. त्यांना रस्त्यावर उभे केलेले होते. त्यांनी आपल्या सेनापतीला सांगितले, "बार्सेलोनाला जाणाऱ्या मुशाफिरांचा मोठा तांडा आम्हाला दिसला." रोकेने विचारले, "आपण ज्यांचा शोध करतो असे ते आहेत की आपला शोध जे करतात असे ते आहेत?" एकाने उत्तर दिले, महाराज, आपण ज्यांचा शोध करतो असे ते आहेत." रोके ओरडला, "अरे माझ्या मुलांनो चला, जा आणि त्यांना येथे माझ्याकडे सरळ घेऊन या. एकालाही निसटू देऊ नका." त्या सेवकांनी हा हुकूम मानला आणि डॉन क्विक्झोट, रोके व सँको यांना आपल्या परत येण्याची वाट पहाण्यासाठी तेथे सोडले. मध्यंतरी रोकेने आपल्या राहणीसंबंधी आपले काही विचार सांगून शिलेदारजींची करमणूक केली. तो म्हणाला," श्रीमान् डॉन क्विक्झोट आमचे आयुष्य आपल्याला संकटे व अशांतता यांचे खळबळीचे मिश्रण वाटावे यात काही नवल नाही. माझ्या प्रत्येक दिवसाच्या अनुभवामुळे मला त्याची पूर्ण जाणीव झालेली आहे. तुम्ही हे लक्षात ठेवा की, जे रानटी आणि उग्र वर्तन मी लोकांना दाखवितो ते निसर्गाने माझ्यावर सक्तीने लादलेले आहे. माझ्यावर जे काही कठोर अन्याय झाले, त्यामुळे मला संताप आला आणि मी या टोकाला येऊन पोचलो. मनाजोगता सूड घेतल्याशिवाय मला ते अन्याय सहन करता येईनात. आता मी या धंद्यात आहे, तेव्हा मला शेवटपर्यंत गेलेच पाहिजे. मी कितीही चांगल्या योजना केल्या, तरी एक पाप दुसऱ्या पापाला ओढून आणते. आता मी अन्याय, कलह, गुन्हे आणि सामने यांच्या जाळ्यात इतका सापडलो आहे की, या गोंधळाच्या चक्रव्यूहातून माझी सुटका ईश्वराच्या दैवी शक्तीशिवाय दुसरा कोणी करू शकणार नाही. तथापि माझ्या दुर्दैवाचा शेवट यशस्वीपणे

होईल, याविषयी मी अद्याप निराश झालेलो नाही."

इतकी निकोप विचारसरणी आणि गंभीर विवेक यांनी भरलेले भाषण ऐकून डॉन क्विक्झोट यांना आश्चर्य वाटले. विवेक आणि सभ्यता यांच्याशी विसंगत असा बेबंद धंदा करणाऱ्या माणसाच्या तोंडून ते ऐकताना त्यांचे मन चकित झाले आणि ते म्हणाले, "श्रीमान् रोके, आपल्या स्वभावातील विकृती माणसाने ओळखणे हे त्याच्या आरोग्याच्या दृष्टीने मोठेच पाऊल होय. आरोग्यशास्त्राचे नियम रोग्याने पाळणे म्हणजे अर्धे-अधिक उपचार करणेच होय. तुम्हाला आपल्या रोगाची जाणीव झालेली आहे असे दिसते. आपला रोग फार जुनाट असल्यामुळे त्याच्यावरील उपाय-योजना कंटाळवाणी होईल अशी मला भीती वाटते. तो सर्वशक्तिमान वैद्यराज प्रभावी औषध तुम्हाला देईल. म्हणून तुम्ही आपले हृदय शाबूत ठेवा आणि आपल्या आजारी मनाला बरे वाटण्यासाठी आपली कर्तव्ये करा. सुखाचा जवळचा मार्ग तुम्हाला गाठावयाचा असेल, तर आता तुम्ही करीत असलेला हा प्राणघातक व्यवसाय ताबडतोब सोडून द्या आणि माझ्याकडून शिक्षण घ्या. शिलेदारीच्या नियमांचे शिक्षण मी तुम्हाला देईन. त्यामुळे तुमच्या अपराधांचे लौकरच क्षालन होईल आणि तुम्हाला सन्मान व खरे सौख्य लाभेल." डॉन क्विक्झोट यांचा हा गंभीर उपदेश ऐकून रोकेने स्मित केले. संवादाचा विषय बदलून त्याने त्यांना क्लॉडिया जेरोनिमाच्या दुःखदायक साहसाचा वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून सँकोला मनापासून दुःख झाले. कारण, त्या तरुणीच्या सौंदर्याचा, जीवनाचा आणि वृत्तीचा परिणाम त्याच्या प्रेमळ स्वभावावर पुष्कळच झालेला होता.

या वेळपर्यंत रोकेच्या मंडळींनी आपण मिळविलेली लूट आणली. ती म्हणजे घोड्यावर बसलेले दोन सद्गृहस्थ, पायी चालणारे दोन यात्रेकरू आणि स्त्रियांनी भरलेली एक गाडी, त्या स्त्रियांच्या सेवेसाठी असलेले पाचसहा सेवक. काही पायी तर काही घोड्यावर बसून जाणारे होते. त्याशिवाय त्या दोन सद्गृहस्थांची दोन खेचरवाली माणसे होती. त्या सर्वांना मोठ्या गांभीर्याने तेथे आणले गेले. त्यांच्याभोवती विजेत्यांचा वेढा होता. विजेते आणि जित हे दोघेही स्तब्ध होते. भव्य रोकेच्या निर्णायक शिक्षेची ते वाट पहात होते. रोकेने प्रथम त्या सद्गृस्थांना विचारले, "तुम्ही कोण आहा? कोठे चालला आहा? तुमच्याजवळ किती पैसे आहेत?" त्यांनी जबाब दिला, "आम्ही दोघेही स्पॅनिश पायदळाचे कप्तान आहो. आमच्या सैन्याच्या तुकड्या नेपल्स येथे आहेत. आम्ही चार जहाजांतून जाण्याचे योजले आहे. ही जहाजे सिसिलीला जाणार असल्याचे आम्ही ऐकले आहे. आमची सारी पुंजी दोन-तीनशे क्राऊन एवढीच आहे. आमच्या व्यवसायातील माणसांच्या दृष्टीने ही रक्कम फार थोडी आहे. कारण, आम्ही संपत्ती क्वचितच साठवितो." यात्रेकरूंची ही अशीच तपासणी झाली, तेव्हा ते म्हणाले, "रोमला जाण्याचा आमचा उद्देश आहे आणि आम्हा दोघांजवळ मिळून सुमारे साठ रील आहेत." गाडीवानाची तपासणी केल्यावर तेथील एका सेवकाने रोकेला अशी माहिती दिली की, "नेपल्स येथील एका न्यायाधीशाची पत्नी लेडी डोन्ना ग्विओमार

डी क्विनोनेस या, आपल्या छोट्या कन्येसह आणि एक दासी, एक म्हातारी मोलकरीण आणि इतर सहा नोकर यांच्यासह, गाडीतून चालल्या आहेत. आम्हा सर्वांजवळ मिळून सुमारे सहाशे क्राऊन आहेत. ''

रोके म्हणाला, '' तर मग येथे आपल्याजवळ सर्व मिळून नऊशे क्राऊन आणि साठ रील आहेत. येथे माझ्याबरोबर सुमारे साठ सैनिक आहेत असे मला वाटते. इतक्या माणसांमध्ये प्रत्येकाच्या वाट्याला किती पैसे येतील ? मी काही चांगला हिशेब-नीस नाही, म्हणून सद्गृहस्थहो, तुम्हीच हिशेब करा. '' हे ऐकून ते वाटमारे लोक ओरडले, '' रोके गिनार्ट, चिरंजीव होवो ! त्याचा नाश करू पहाणाऱ्याचे वाटोळे होवो ! ! '' ते कप्तान शांतपणे पहात राहिले, ती स्त्री दुःखी व खिन्न नजरेने पहात होती, आणि यात्रेकरूही काही कमी खचलेले नव्हते. आपल्याजवळील छोटीशी पुंजी अशा विलक्षण प्रकारे खलास होणार याचे त्यांना दुःख होत होते. त्या सर्वांच्या वृत्ती कसकशा होतात हे पाहण्यासाठी रोकेने त्यांना थोडा वेळ संशयात ठेवले. आपला द्रव्यनाश होणार म्हणून दुःख वाटण्याचे बाबतीत सर्वजण समान आहेत असे त्याला आढळले. मग त्या कप्तानाकडे वळून तो म्हणाला, '' कप्तानसाहेब, साठ क्राऊन मला उसने देण्याची कृपा करा आणि बाईसाहेब, आपल्या मर्जीस येईल तर, माझ्या पथकातील या इमानी सेवकांना संतुष्ट करण्यासाठी आपण चाळीस क्राऊन देऊन मला उपकृत करा. हीच आमची सारी जिंदगी आणि कमाई ! तुम्हाला माहीतच आहे की, महंताला गाणे गाऊन जे मिळते, त्यावरच पोट भरावे लागते. म्हणून आपण, आम्ही केलेल्या मागण्यांसाठी, आम्हास क्षमा कराल, अशी मला आशा आहे. आपण त्या मागण्या पूर्ण केल्या म्हणजे अशा प्रकारच्या उपद्रवापासून यापुढे तुम्ही मुक्त व्हाल. जागोजाग माझ्या ज्या तुकड्या मी ठेवल्या आहेत, त्यांना देण्यासाठी मी एक परवाना आपल्याला देईन. त्या माझ्या हुकुमामुळे ते माझे लोक तुम्हाला काहीही उपद्रव न देता पुढे जाऊ देतील. एखाद्या सैनिकावर अन्याय करण्याचा मला तिटकारा आहे. आणि बाईसाहेब, स्त्रीजातीला-त्यातही आपल्या योग्यतेच्या स्त्रियांना-मान देण्यास मी चुकता कामा नये. ''

रोकेच्या थोर सभ्यतेसाठी आणि औदार्यासाठी, त्या कप्तानांनी शक्य तितक्या डौलदारपणे त्याचे आभार मानले. कारण, त्याने त्यांच्याजवळचा काही पैसा शिल्लक ठेवला होता. त्या स्त्रीने गाडीतून उडी मारून त्याच्या पायांवर लोळण घेतली असती. पण रोकेला ते आवडले नसते. आपल्या नशिबामुळे जे करणे अवश्य आहे, त्यामुळे आपण या मागण्या करीत आहो, असे तो समजत होता. नंतर त्या स्त्रीने आपल्या एका सेवकाला ऐंशी क्राऊन रोकेला ताबडतोब देण्याचा हुकूम फर्मावला. त्या कप्तानांनी आपल्या वाट्याचे पैसे दिले आणि यात्रेकरूंनी आपला हविर्भाग दिला. पण रोकेने त्यांना अंमळ थांबण्यास सांगितले आणि आपल्या लोकांकडे वळून तो म्हणाला, '' सभ्य गृहस्थहो, तुमच्यापैकी प्रत्येकाला दोन क्राऊन मिळतील आणि तरी वीस शिल्लक राहतील. त्यातील दहा आपण या गरीब यात्रेकरूना दान म्हणून देऊ या आणि

उरलेले दहा काऊन या इमानी सेवकाला देऊ या म्हणजे तो आपल्या प्रवासात आपल्याविषयी दोन चांगले शब्द बोलेल. " असे म्हणून त्याने लेखणी, शाई व कागद मागविले. ते साहित्य त्याच्याबरोबर नेहमी असे. आपल्या निरनिराळ्या पथकांच्या सुभेदारांना उद्देशून त्याने या लोकांसाठी एक परवाना लिहिला. त्या सर्वांना जाण्यास सांगून त्याने निरोप घेतला. त्याच्या मनाचा मोठेपणा पाहून सर्वजण चकित झाले एखाद्या अट्टल दरोडेखोरापेक्षा तो शिकंदर बादशहाप्रमाणे बोलत आहे, असे त्या सर्वांना वाटले. त्याच्या साथीदारांपैकी एकजण आपल्या कॅटॅलन भाषेत पुटपुटू लागला, " हा आपला सेनापती भयंकर उदार आहे. दरोडेखोरापेक्षा तो चांगला भिक्षू झाला असता. हे पाहा, त्याला जर इतके उदार व्हायचे असेल, तर त्याने आपल्या खिशातून पैसे द्यावेत– आमच्या खिशातून नव्हे. " तो दुर्दैवी माणूस फार हलक्या आवाजात बोलला नाही, म्हणून त्याचे बोलणे रोकेच्या कानी पडले. त्याने तत्काळ आपली समशेर उपसली आणि तिच्या एका तडाख्याने त्याच्या कवटीचे जवळजवळ दोन तुकडेच केले. तो म्हणाला, " बंडखोरांना मी शिक्षा करतो ती अशी ! "

सर्व लोक निश्चल उभे राहिले. तोंडातून ब्र काढण्याची छाती कोणास होईना, त्यांना त्याचेविषयी तितका दराराच वाटत होता. नंतर रोके थोडा मागे गेला आणि बार्सेलोनामधील आपल्या एका मित्राला त्याने पत्र लिहिले. त्यात त्याने म्हटले, " सुप्रसिद्ध शिलेदार डॉन क्विक्झोट यांच्याविषयी कैक विलक्षण गोष्टी सांगितल्या जातात. ते आता माझ्याजवळ आहेत. तुमच्या शहराच्या मोठ्या धक्क्यावर ते तुम्हाला वसंत ऋतूच्या मध्यकाली आढळतील. ते नखशिखांत सशस्त्र असून रोझिनांटवर बसलेले असतील आणि त्यांचा सेवक गाढवावर बसलेला असेल. शिलेदारजी हे एक अत्यंत कल्पक व गमत्या माणूस आहेत. ते तुम्हाला आणि तुमच्या मित्रांना मोठा संतोष देतील. त्यामुळेच मी त्यांच्या आगमनाची ही सूचना देत आहे. माझे शत्रू – कॅडेली – यांना या आनंदात सहभागी करून घेऊ नका. तसे करण्यास ते लायक नाहीत. पण त्यांच्यापासून किंवा दुसऱ्या कोणापासून डॉन क्विक्झोट यांचा मूर्खपणा व विचारीपणा आणि सँको पँझाचा विदूषकीपणा लपवून ठेवणे कसे शक्य आहे ? " त्याने ते पत्र आपल्या एका माणसाच्या हाती दिले. त्या माणसाने आपला दरोडेखोराचा वेष उतरून खेडवळ माणसाचा पोशाख घातला आणि बार्सेलोना येथे जाऊन ते पत्र धन्याने सांगितल्याप्रमाणे पोचते केले.



## प्रकरण ६१

# डॉन क्विक्झोट यांचा बार्सेलोनामध्ये प्रवेश, सत्यापेक्षा कल्पकता ज्यात कमी आहे अशा इतर घटना.

डॉन क्विक्झोट हे रोकेबरोबर तीन दिवस आणि तीन रात्र राहिले. तीनशे वर्षे ते तेथे रेंगाळले असते, तरी त्यांना त्या जीवनक्रमामध्ये कौतुकाचा भाग पुष्कळ मिळाला असता. एके ठिकाणी ते झोपत असत तर एके ठिकाणी जेवण करीत असत. कधी त्यांना भीती वाटे– पण कशाची हे त्यांना माहीत नसे, तर कधी ते कोणाची वाट पहात बसत– पण कोणाची हे त्यांना माहीत नसे. कधी कधी ते उभ्या उभ्या डुलकी घेत पण गाढ झोपेचा आनंद त्यांना कधी मिळत नसे. कधी त्या प्रदेशाच्या या बाजूस, तर लगेच दुसऱ्या बाजूस ते जात. नेहमी टेहळणी करीत हेर कान देऊन ऐकत असत, टेहळे लक्ष देत असत आणि बंदुका सज्ज असत. त्यांच्याजवळ अवजड बंदुका थोड्या होत्या. सामान्यतः त्यांचेपाशी पिस्तुले असत. इतर लोकांपासून दूर रोके झोपत असे आणि आपल्या निवासात कोणाला सहभागी करीत नसे. कारण, बार्सेलोनाच्या व्हाईसरॉयाने त्याला पकडण्यासाठी कैक जाहीरनामे लावलेले होते. आपल्या लोकांपैकी काहीजणांकडून आपण विश्वासघाताने पकडले जाऊ असे भय व चिंता त्याला सदैव वाटत असे. त्यामुळे तो कोणावरही विश्वास ठेवण्यास धजत नव्हता. किती दुःखी व अस्वस्थ असे हे जीवन! शेवटी आडमार्गाने आणि गल्लीबोळाने रोके, डॉन क्विक्झोट, सँको आणि इतर सहा सेवक – हे सर्वजण वसंतोत्सवाच्या आदले दिवशी रात्री बार्सेलोनाच्या सीमेवर जाऊन पोचले. तेथे रोकेने डॉन क्विक्झोट यांना आलिंगन दिले आणि पूर्वी वचन दिल्याप्रमाणे सँकोला दहा क्राऊन दिले. दोन्ही पक्षांनी एकमेकांना विपुल धन्यवाद दिल्यानंतर त्याने त्या दोघांचा निरोप घेतला. रोके आपल्या मंडळींकडे परत गेला आणि सूर्योदयाची वाट पहात डॉन क्विक्झोट तेथे थांबले – रोकेने त्यांना सोडले त्या वेळेप्रमाणेच ते घोड्यावर बसलेले होते.

प्रसन्न उषा पूर्वेच्या गवाक्षातून डोकावू लागली आणि फुलबागांना आनंदित करू लागली. सनयांचा आणि नगाऱ्यांचा मंजुळ ध्वनि लोकांच्या कानांना सुखवीत होता. घंटांच्या निनादामध्ये लौकरच, शहरातून बाहेर येणाऱ्या घोडेस्वारांच्या आरोळ्या आणि टपटप् आवाज मिसळून गेला. आता उषादेवतेने आनंदी सूर्याला आकाशात प्रविष्ट केले. क्षितिजाच्या कडेवर तो मोठा दिसत होता आणि त्याचे बिंब ढालीएवढे मोठे होते.

डॉन क्विक्झोट आणि सँको यांनी आपली नजर दूरवर फेकली तेव्हा त्यांना समुद्र दिसला. त्यांनी पूर्वी समुद्र कधीच पाहिला नव्हता. ला मांचा येथे त्यांनी रूडेरा तळेच पाहिले होते. त्यापेक्षा किती तरी मोठा आणि विशाल असा समुद्र त्यांना दिसला. बंदरातील जहाजे आपली शिडे आवरीत होती. त्यांच्यावरील निशाणे आणि बावटे हवेत डुलत होते. त्यामुळे तो सारा देखावा मोठा आनंददायक वाटत होता. कधी कधी ती जहाजावरची निशाणे समुद्राच्या पाण्याचे चुंबन घेत किंवा पाण्यावरून फिरत. त्या जहाजावरील तुताऱ्या, रणभेऱ्या आणि इतर रणवाद्ये यांचे जे ध्वनी निघत, ते सारे आकाश भरून टाकीत. ते ध्वनी उत्साहवर्धक आणि सैनिकी स्वरमेळाचे असत. थोड्या वेळाने ती जहाजे पुढे सरकली आणि त्या शांत समुद्रावर लुटुपुटूची लढाई खेळू लागली. त्याच वेळी शहरातून पुष्कळ सभ्य गृहस्थ बाहेर आले. त्यांचे वेष श्रीमंती थाटाचे होते. ते आपापल्या घोड्यावर ऐटीत बसले होते आणि समुद्रावरील रण-क्रीडेची पूर्तता भूमीवर करीत होते. खलाशांनी जहाजावरून असंख्य गोळ्यांचा वर्षाव केला आणि त्यांना शहराभोवतीच्या तटावरून आणि बुरुजावरून मोठमोठ्या तोफांनी जाब दिला. शहराच्या किल्ल्यावर दारुगोळ्यांचा वर्षाव झाला. त्यावेळी होणाऱ्या आवाजाचा प्रतिध्वनी जहाजावरून ऐकू येऊ लागला.

समुद्र हसू-नाचू लागला, पृथ्वी आनंदाने डोलू लागली आणि आकाशाचा कोपरा न् कोपरा शांत दिसू लागला. मात्र धुराच्या ढगांनी आकाश थोडा वेळ धुरकटले गेले. माणसांच्या मुद्रेवर नवाच आनंद खेळू लागला. त्यांच्या ऐश्वर्यामधून आनंद आणि भव्यता ओसंडत होती. पण सँकोला मोठे कोडे पडले की, समुद्रावर संचार करणाऱ्या या मोठमोठ्या अवाढव्य जहाजांना इतके पाय कसे ?

हे होत आहे तोंच किनाऱ्यावरील खेळांची व्यवस्था पाहणारी माणसे मोठमोठ्याने ओरडत डॉन क्विक्झोट यांच्याकडे दौडत आली, तेव्हा शिलेदारजींना फार आश्चर्य वाटले. त्या माणसांपैकी एकाला रोकेने पत्र पाठविले होते. तो मोठ्याने ओरडला, "अहो आदर्श शिलेदारजी, आपले स्वागत असो ! आपण शिलेदारी व्यवसायाचे तेजोगोल आहा-ध्रुवतारा आहा. ला मांचा येथील शूर डॉन क्विक्झोट यांचे मी स्वागत करतो-अलीकडे खोट्या इतिहासात रंगविलेल्या नकली व तोतया शिलेदारजींचे नव्हे. इतिहासकारांचा मुकुटमणि सिड हॅमेट याने ज्याचे वर्णन केले आहे, त्या अस्सल, खऱ्या व कायदेशीर शिलेदारजींचे मी स्वागत करतो !" डॉन क्विक्झोट यांनी काही उत्तर दिले नाही किंवा उत्तरासाठी तो माणूस थांबलाही नाही. आपल्या इतर सवंगड्यांबरोबर तो फिरू लागला आणि जर्वजण त्याच्याभोवती आनंदाने उड्या मारू लागले. ते सर्वजण शिलेदारजी व त्यांचा सेवक यांच्याभोवती गोळा झाले. सँकोकडे वळून डॉन क्विक्झोट म्हणाले, "ही सभ्य माणसे आपल्याला चांगली ओळखतात असे दिसते. अलीकडेच ॲरागोनियाने प्रसिद्ध केलेला आपला इतिहास त्यांनी वाचला असेल असे मी प्रतिज्ञेवर सांगतो." शिलेदारांशी मघाशी बोललेला गृहस्थ परत आला व त्यांना म्हणाला

"अहो, माननीय डॉन क्विक्झोट, आमच्या मंडळींबरोबर चलावे अशी आमची विनंती आहे. आम्ही सर्वजण आपले नम्र सेवक आणि रोके गिनार्टचे मित्र आहोत." डॉन क्विक्झोट उत्तरले, "महाशय, आपले सौजन्य हे त्या थोर रोकेच्या औदार्याशी इतके सुसंगत आहे की, नम्रतेतून नम्रता कशी निर्माण होते हे यावरून कळते. तुमची सभ्यता ही रोकेच्या सभ्यतेची मुलगी किंवा जवळची नातलग असावी असे मला वाटते. आपण आज्ञा कराल तेथे मी आपली सेवा करीत राहीन. तुमच्यावर माझी फार भक्ती जडली आहे." त्या गृहस्थाने त्यांना परत धन्यवाद दिले. त्या सर्वांनी त्यांना आपल्या पलटणीच्या मध्यभागी ठेवून शहराकडे चालविले. सर्व रस्त्यांवर त्यांच्यापुढे ढोल वाजत होते आणि रणभेरी निनादत होत्या.

पण सैतानाची किंवा दुर्दैवाची इच्छा म्हणा–अथवा सैतानापेक्षाही दुर्दैवी असणाऱ्या मुलांची इच्छा म्हणा–दोन खोडसाळ, कमअस्सल तरुण त्या घोडेस्वाराच्या गर्दीतून घुसण्याचा प्रयत्न करू लागले. त्यांच्यापैकी एकाने रोझिनांटची तर दुसऱ्याने डॅपलची शेपटी उडविली आणि त्यांच्या ढुंगणात काटेरी पुंजके कोंबले. आपल्या पाठीला हे निराळेच उत्तेजन मिळालेले पाहून ती बिचारी जनावरे आपल्या शेपट्या खाली घेऊ लागली. त्यांच्या वेदना वाढत चालल्या. ते मागे–पुढे हिसडे मारू लागले आणि त्वेषाने लाथा मारू लागले. शेवटी त्यांनी आपल्या स्वारांना फेकून दिले. त्यांचा धनी व सेवक दोघेही रस्त्यावर अस्ताव्यस्त पडले. डॉन क्विक्झोट यांना आपल्या या अपमानाचे मोठे दुःख वाटले आणि आपल्या नव्या संकटातून आपल्या घोड्याला मोकळे करण्यासाठी ते उठले. सँकोनेही आपल्या डॅपलसाठी तसेच केले. तेथील सद्गृहस्थ त्या मुलांना त्यांच्या खोडसाळपणाबद्दल शासन करण्यास निघाले. पण त्यांच्यामागे जमलेल्या प्रचंड जमावात ते तरुण बदमाष केव्हाच लुप्त झाले आणि म्हणून सुरक्षित राहिले. नंतर शिलेदारजी आणि सेवक पुनः स्वार झाले. संगीत आणि मिरवणूक पुढे चालू लागली. शेवटी ते आपल्या नेत्याच्या घरी आले. ते घर इतके प्रशस्त आणि सुंदर होते की, त्यावरून त्याच्या मालकाच्या प्रचंड जिंदगीची कोणालाही कल्पना यावी. येथे आपण शिलेदारजींना तूर्त सोडू या. कारण आपण तसे करावे, अशी सिड् हॅमेटची इच्छा व मर्जी आहे.



## प्रकरण ६२

# मंतरलेल्या मस्तकाचा पराक्रम आणि गाळता न येण्यासारख्या इतर फालतू गोष्टी

डॉन क्विक्झोट यांचे स्वागत करणाऱ्या माणसाचे नाव डॉन अँटोनियो मोरेनो असे होते. तो एक धनिक व शिष्टाचारसंपन्न माणूस होता. आपल्या शेजाऱ्याला बाधा न करता सहज मिळणाऱ्या साऱ्या निष्पाप करमणुकीचा तो चाहता होता. आपला मित्र गमावला तरी चालेल, पण आपली चेष्टा गमवावयाची नाही, अशा वृत्तीच्या लोकांपैकी तो नव्हता. म्हणून डॉन क्विक्झोट यांच्या शरीराला अपाय न करता त्यांच्या वेडेपणाचा फायदा उठविण्याचा त्याने निश्चय केला.

त्यासाठी त्याने शिलेदारजींना आपले चिलखत काढावयास लावले आणि शामॉय चामड्याच्या जरतारी किनारीच्या कपड्यात ( ज्या स्वरूपात आम्ही त्यांना पूर्वी दाखविले आहे ) सज्जामध्ये उभे राहण्यास त्यांचे मन वळविले. त्या सज्जावरून शहरातील एक मोठा रस्ता दिसत होता. त्या रस्त्यावर जो जमाव जमला होता, त्यांच्या नजरेस ते पडले. विशेषतः जमावातील मुले त्यांच्याकडे आ वासून व टक लावून पाहू लागली— जणु काही ते कोणी बुद्धे माकडच होते. आपापले गणवेष घातलेल्या पायदळाच्या व घोडेस्वारांच्या कैक तुकड्या त्यांच्यापुढून मिरवत जाऊ लागल्या. जणु काही उत्सव साजरा करण्यासाठी त्या आल्या नसून डॉन क्विक्झोट यांच्या सन्मानासाठीच हा समारंभ आयोजित केलेला होता. सँकोला अपार आनंद झाला. दुसऱ्या कॅमॅचिओच्या लग्न–समारंभात किंवा मिरांडाच्या डॉन डीएगोसारख्या थोरामोठ्याच्या घरात अथवा ड्यूकसारख्याच्या किल्ल्यात आपण उतरलो आहो अशी त्याची कल्पना झाली.

त्या दिवशी डॉन ॲटोनिओचे पुष्कळ मित्र त्यांच्या सांगाती जेवले. त्या सर्वांनी एक शिलेदार म्हणून डॉन क्विक्झोट यांना मोठा मान दिला व आदर दाखविला, आणि त्यांच्या अभिमानाचा फुगा त्यांनी इतका फुगविला की, त्यांच्या स्तुतीमुळे आपल्याला वाटणारा आनंद ते लपवू शकले नाहीत. सँकोने घरातील सेवकांची आणि त्याचे भाषण ऐकणाऱ्या सर्व माणसांची इतकी करमणूक केली की, त्याच्या तोंडातून बाहेर पडणाऱ्या प्रत्येक शब्दाची ते वाट पाहू लागले. जेवणाचे वेळी सारे लोक मौज करीत असताना, डॉन अँटोनियो म्हणाला, " इमानी सँको, तुम्हाला मसालेदार मांसाचे पदार्थ इतके आवडतात की, त्यांनी तुमचे पोट गच्च भरले असेल आणि तुम्हाला

अधिक काही खाता येत नसले, तरी दुसऱ्या दिवशीच्या न्याहारीसाठी तुम्ही ते उरलेले खाद्य-पदार्थ आपल्या विजारीत कोंबता." सँकोने उत्तर दिले, "छे: हो! महाराज, त्या साऱ्या गप्पा आहेत. मी अधाशी असण्यापेक्षा स्वच्छ अधिक आहे. मी आपल्याला सांगतो आणि येथे असलेला माझा धनीही आपल्याला सांगू शकेल—कैक वेळा ते व मी ओकाच्या व अक्रोडाच्या मूठभर फळांवर एक एक आठवडाभर राहिलो आहो. खरे हे आहे की, मी फार चोखंदळ नाही. अशा ठिकाणी मला जे दिले जाते ते मी खातो. 'देणगी मिळालेल्या घोड्याचे दात मोजू नयेत.' असे म्हणतात [ना? मी खादाड आणि गबाळ्या आहे असे आपल्याला ज्या कोणी सांगितले असेल, त्याने आपल्याला खोटे सांगितले. येथील मंडळींबद्दल मला जर आदर वाटत नसता, तर मी त्या माणसाला माझ्या मनातील विचार स्पष्टच सांगितले असते."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अगदी बरोबर! सँकोची आहार-पद्धति चर्मपत्रावर लिहून पुढील पिढ्यांना कळविणे अवश्य आहे. भावी पिढ्यांना त्याचा मिताहार आणि स्वच्छता आदर्श वाटेल आणि ते चर्मपत्र त्याचे स्मारक ठरेल. जेव्हा जेव्हा तो आपल्या भुकेच्या हाकेला ओ देतो, तेव्हा तो काहीसा अधाशीपणा करतो असे दिसते हे खरे. तो गटागट गिळतो, आपल्या दातांचा उपयोग सपाटून करतो आणि एकाच वेळी दोन्ही जबड्यांनी तो अन्नाचे चर्वण करतो. पण त्याच्यावर गबाळेपणाचा जो आरोप करण्यात आला आहे, त्यासंबंधी मी जाहीरपणे सांगतो की, नीटनेटकेपणाचे पालन तो मोठ्या दक्षतेने करतो आणि आपल्या आहाराचे सेवन व्यवस्थितपणे करतो. तो जेव्हा राज्यपाल होता तेव्हा त्याचा खाण्यातील चोखंदळपणा लक्षणीय होता. जेव्हा तो द्राक्षे किंवा डाळिंबाचे दाणेसुद्धा खात असे, तेव्हा तो चिमट्याच्या टोकाने ते उचलून घेई." ॲंटोनियो ओरडून म्हणाला, "काय, सँको कधी राज्यपाल होता?" सँकोने उत्तर दिले, "होय, होय, बॅरॉटेरिया बेटाचा तो राज्यपाल होता. त्या बेटाचे राज्य दहा दिवस मी केले—दुसरे कोण करणार? पण मला कधीही विश्रांती म्हणून मिळालीच नाही. तेथे मला जो धडा मिळाला तो म्हणजे राज्यकारभाराच्या धंद्याचा अंतःकरणाच्या तळापासून तिटकारा करणे. म्हणून मी तेथून इतक्या घाईघाईने निघालो की, मी एका खोल खड्ड्यात पडलो—तेथे मी जिवंतपणे पुरला गेलो. आणि परमेश्वराने मला बाहेर ओढून काढले नसते, तर आतापर्यंत मी तेथेच राहिलो असतो."

नंतर डॉन क्विक्झोट यानी सँकोच्या राज्याची परिस्थिती सांगितली. जेवणाच्या टेबलावरील चादर काढून घेण्यात आली. तेव्हा डॉन ॲंटोनियोने शिलेदारजींना हाताशी धरून एका खाजगी खोलीत नेले. तेथे सामानसुमान काहीच नव्हते. फक्त एक टेबल होते. ते सूर्यकांत मण्याचे केलेले असावे असे दिसत होते. आणि त्याचे पायही त्याच रत्नाचे होते. त्या टेबलावर एक ब्रॉझचे डोके ठेवलेले होते एखाद्या रोमन सम्राटाच्या पुतळ्याप्रमाणे छातीपासून वरचा भाग तो होता. त्या खोलीत डॉन ॲंटोनिया हा डॉन क्विक्झोटसह पुष्कळ वळणे घेत हिंडला आणि म्हणाला, "श्रीमान डॉन

क्विक्झोट, आता आपण अगदी खाजगी जागेत आलो आहोत. दार पक्के बंद केलेले आहे. आपल्याला कोणी ऐकत नाही. म्हणून मी कोणी कधी ऐकला नसेल, असा एक अत्यंत विलक्षण व आश्चर्यकारक साहसानुभव आपल्याला निवेदन करतो. तो तुम्ही आपल्या हृदयाच्या आतल्या कप्प्यात एक गुप्त रहस्य म्हणून जपून ठेवला पाहिजे." शिलेदारजींनी उत्तर दिले, "एका थडग्याप्रमाणे मी ते रहस्य जपून ठेवीन–आणि अधिक सुरक्षिततेसाठी आपल्या त्या रहस्यावर मी थडग्यावरील शिला ठेवीन. शिवाय, अहो डॉन अँटोनियो, (आतापर्यंत त्यांना त्या माणसाचे हे नाव कळले होते) तुम्ही ही खात्री बाळगा की, ज्याचे कान ऐकण्यासाठी उघडे असतात, पण ज्याची जीभ ऐकलेले उघडकीस आणीत नाही अशा माणसाशी तुम्ही संवाद करीत आहा. म्हणून तुम्ही जे जे माझ्या हवाली कराल ते सर्व मौनाच्या अथांग सागराच्या तळाशी जाऊन पोचेल. आपल्या स्वतःच्या अंतःकरणात ते जितके सुरक्षित असेल, तितकेच ते तेथे राहील."

डॉन अँटोनियो म्हणाला, "आपल्यावर माझा विश्वास असल्यामुळे मी आपली उत्कंठा वाढवीत नाही. दीर्घकाळ माझ्या विचारात लपून बसलेले ते रहस्य आज मी आपल्याला सांगून माझ्या छातीवरील भार हलका करणार आहे. अशा गुप्त गोष्टी ज्यांना विश्वासाने सांगाव्यात असा माणूस मला आतापर्यंत कोणीच भेटला नाही." त्याची ही खबरदारी पाहून डॉन क्विक्झोट यांची उत्कंठा पराकोटीला पोचली. नंतर डॉन अँटोनियोने त्यांना टेबलाजवळ नेले आणि ते टेबल, त्याचे सूर्यकांत मण्याचे आधारभूत पाय आणि त्यावरील पितळी डोके हे सर्व चाचपून-तपासून पाहण्यास त्यांना लावले. मग तो म्हणाला, "महाराज, आता आपण हे लक्षात घ्या की, हे पितळी डोके ज्याने तयार केले, तो जगातील एक अत्यंत थोर जादूगार किंवा मांत्रिक होता. मी चुकत नसेन तर, त्याचा जन्म पोलंडमध्ये झालेला होता आणि ज्याच्याविषयी अनेक अद्‌भुत कथा सांगितल्या जातात, त्या सुविख्यात एस्कोटिल्लोचा तो शिष्य होता. हा अजब माणूस येथे माझ्या घरात राहात होता. एक हजार क्राऊन नाण्यांच्या मोबदल्यात मी त्याला माझ्यासाठी हे डोके तयार करण्यास लावले. सर्व प्रश्नांचे उत्तर तुमच्या कानात सांगण्याचा विलक्षण गुण या डोक्यात आहे. खूप अभ्यास करून, योजना आखून, पुतळे ओतून, ग्रहमान पाहून आणि इतर गणिती प्रक्रिया करून हे मस्तक पूर्णत्वास नेलेले आहे. उद्या (कारण शुक्रवारी ते बोलत नाही) ते आपल्या ज्ञानाचा पुरावा आपल्याला देईल. आपल्याला अत्यंत महत्त्वाच्या व गूढ अशा ज्या ज्या शंका असतील, त्या आपण विचाराव्या म्हणजे त्यांचे पूर्ण समाधान हे पितळी डोके करील." त्या डोक्याचा हा विलक्षण गुण ऐकून डॉन क्विक्झोट चकित झाले. डॉन अँटोनियोच्या हकिगतीवर त्यांचा विश्वास बसेना. पण त्या बाबतीत अल्पावधीतच आपले समाधान होणार आहे, या विचाराने त्यांनी आपले मत दुसऱ्या दिवसापर्यंत खुषीने थोपवून धरले. एवढा महान शोध आपल्याला सांगितल्याबद्दल त्यांनी त्या सद्‌गृहस्थाचे फक्त आभार मानले. मग त्या खोलीतून ते दोघे बाहेर पडले. डॉन अँटोनियोने अत्यंत काळजीपूर्वक दाराला कुलूप घातले. नंतर ते

पूर्वीच्या खोलीत परत आले. तेथे बाकीची मंडळी सँकोच्या तोंडून आपल्या धन्याचे पराक्रम मौजेने ऐकत होती.

त्या दिवशी दुपारी तेथील माणसांनी डॉन क्विक्झोट यांना चिलखत न घालता घराबाहेर नेले आणि रोझिनांटऐवजी एका सुस्वभावी खेचरावर त्यांना बसविले. त्यावर सामान थोडेच होते. शहराच्या राहणीला शोभेल असा त्यांचा वेष होता. पिंगट रंगाच्या कापडाचा लांब कोट त्यांनी घातला होता. त्या मोसमातील उष्मा इतका भयंकर होता की, त्यामुळे दवबिंदूंचे रूपांतर घर्मबिंदूत होत असे. त्या माणसांनी असे खाजगी हुकूम सोडले होते की, सँकोची सर्व दिवसभर घरातच करमणूक करावी; नाही तर तो बाहेर जाऊन आपली सारी मौज बिघडवून टाकील. शिलेदारजी खेचरावर बसल्यावर त्या लोकांनी त्यांच्या पाठीवर, त्यांना न कळत, एक चर्म–पत्र टाचणीने अडकविले. त्यावर पुढील शब्द मोठ्या अक्षरांनी लिहिलेले होते– " हा माणूस ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. " ते सर्व लोक चालू लागताच ते चर्मपत्र सर्व लोकांच्या नजरेस पडले. आणि ते तो लेख वाचू लागले. " हा माणूस ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहे. " हे शब्द इतके लोक पुनः पुनः उच्चारीत आहेत, हे पाहून त्यांना मोठे आश्चर्य वाटले आपल्याला पाहणारा प्रत्येक माणूस आपल्याला ओळखतो आणि आपले नाव घेतो, हे पाहून ते चकित झाले. त्यांच्याबरोबर घोड्यावरून चाललेल्या डॉन अँटोनियोकडे वळून ते म्हणाले, " शिलेदारीचे हे अनन्य सौभाग्य किती थोर आहे! विश्वाच्या सर्व कोनाकोपऱ्यात शिलेदारीचे पुरस्कर्ते ओळखले जातात आणि सन्मानिले जातात. मला ज्यांनी कधी पूर्वी पाहिले नाही, ती रस्त्यातील पोरेसुद्धा मला ओळखतात हे, महाराज, आपल्या लक्षात आले नाही काय? " डॉन अँटोनियोने उत्तर दिले, " महाराज, हे अगदी खरे आहे. अग्नि हा आपल्या स्वतःच्या तेजाने ओळखला जातो. तसेच तेज सद्गुणांमध्ये असते. ते प्रगट झाल्याशिवाय कधीच राहात नाही– विशेषतः शस्त्रबळाने मिळणारा लौकिक कधीच गुप्त राहात नाही. "

शिलेदारजींची आणि त्यांचा जयजयकार करणाऱ्या अनुयायांची ही मिरवणूक चालली असताना कोणा एका कॅस्टिलियन माणसाने डॉन क्विक्झोटच्या पाठीवरील लेख वाचला आणि तो मोठ्याने ओरडला, " अरे, तू ला मांचा येथील डॉन क्विक्झोट आहेस असे सैतानसुद्धा मानणार नाही. तुझ्या खांद्यावर इतके जबरदस्त तडाखे बसले असताना, तू अजून जिवंत आहेस आणि येथे आला आहेस, असे कोणाला वाटेल? तू आपल्या मित्र–मंडळीमध्ये आणि खाजगी लोकांमध्ये वेडा ठरला नाहीस काय? अशा रीतीने तू जगभर भटकत सुटलास आणि तुझ्या सहवासात येणाऱ्या प्रत्येकाला आपल्यासारखेच वेडे केलेस, त्या तुला रोग पडो. अरे, तू आपल्या घरी आपल्या बायका–मुलांत जा. अरे ठोंब्या, आपल्या घराकडे लक्ष दे आणि हे वेडेचार करण्याचे बंद कर. मूर्खपणाच्या लहरींचे गाठोडे आपल्या अकलेशी बांधून तू तिचे असे वाटोळे का करतोस? " डॉन अँटोनियो म्हणाला, " मित्रा, तू आपल्या कामाला जा. ज्यांना तुझ्या उपदेशाची

गरज असेल, त्यांना तो सांग. श्रीमान् डॉन क्विक्झोट हे अत्यंत बुद्धिमान गृहस्थ आहेत. त्यांना तुझ्या सल्ल्याची गरज नाही. तू लुडबुड केल्याशिवाय आम्हाला आमचा उद्योग कळतो. फक्त गुणी माणसांना आम्ही मान देतो. तू दुर्दैवी आहेस. तेव्हा तू आपल्या वाटेने जा आणि ज्याच्याशी तुझा काही संबंध नाही, त्यात लुडबूड करू नकोस." कॅस्टिलियन म्हणाला, "खरेच! तुमचे म्हणणे बरोबर आहे. याला उपदेश करणे म्हणजे प्रवाहाविरुद्ध पोहत जाण्याचा प्रयत्न करणे होय. या मूर्खाच्या अंगी काही चांगले गुण आहेत असे लोक बोलतात. पण शिलेदारीच्या विक्षिप्त लहरीमुळे त्या साऱ्या गुणांची माती होत आहे, या विचाराने मला दुःख होते. मी पुनः त्याला किंवा दुसऱ्या कोणाला उपदेश करण्याची इच्छा मनात धरली, आणि त्यासाठी मला मेथुसॅलेमचे ( १००० वर्षांचे ) आयुष्य लाभले तरी मी कोणाला कधी उपदेश करणार नाही. तो करताना आपण मला पकडले तर, आपण इच्छिता त्याप्रमाणे, माझ्यावर आणि माझ्या साऱ्या पिढीवर दुर्दैव ओढवो." असे म्हणून तो सल्लागार आपल्या वाटेने गेला आणि मिरवणूक पुढे चालू राहिली. डॉनच्या पाठीवरील लेख वाचण्यासाठी जमावाने इतकी दाटीवाटी केली की, आपण दुसरे काही करीत आहो असे भासवून डॉन अँटोनियोला तो लेख ओढून काढणे भाग पडले.

रात्र पडल्यावर ते घरी परत आले. डॉन अँटोनियोची पत्नी ही एक प्रतिष्ठित व सर्वांगांनी सुसंस्कृत अशी स्त्री होती. तिने आपल्या पाहुण्यांच्या सन्मानार्थ, नृत्य–समारंभासाठी आणि डॉन क्विक्झोटच्या बेताल वर्तनामुळे होणाऱ्या करमणुकीत भाग घेण्यासाठी आपल्या कैक मित्रांना पाचारण केले होते. रात्रीचे चमचमीत भोजन झाल्यावर सुमारे दहा वाजता नृत्य सुरू झाले. त्या माणसांमध्ये दोन स्त्रिया खेळकर व गमती स्वभावाच्या होत्या. त्या अंतःकरणापासून सद्‌गुणी होत्या, पण चांगल्या लोकांच्या मौजेसाठी आपल्या अब्रूची तार ताणण्यास त्या कचरणाऱ्या नव्हत्या. त्यांनी मुख्यतः डॉन क्विक्झोटकडे आपला मोर्चा वळविला आणि त्यांच्याशी एकीमागून दुसरी इतकी नाचत राहिली की, त्यामुळे त्यांचा केवळ देहच नव्हे तर जीवही थकून गेला. पण त्या समारंभात सर्वात प्रेक्षणीय काही असेल तर गंभीर डॉनची गूढ आकृती. ते जेव्हा नाचताना कधी सावकाश चालत तर कधी उडी मारत, कधी शरीराला मोठा हेलकावा देत. ते उपाशी दिसत आणि त्यांची कांती लाकडी तक्तपोशीसारखी दिसत होती. दोन पायांवर उभी असलेली आणि अंगात घट्ट बंडी घातलेली ती मूर्ती फार विचित्र दिसत होती. एखाद्या भव्य नृत्य–समारंभात ती मुळीच शोभण्यासारखी नव्हती. त्यांच्या शरीराला वश होण्याची आपली इच्छा असल्याच्या कैक गुप्त खुणा त्या स्त्रियांनी नाचता नाचता त्यांना केल्या. पण त्यांची आपल्याला काही पर्वा नाही असे त्यांना तितक्याच गुप्तपणे कळविण्यात ते मागे राहिले नाहीत. शेवटी त्या स्त्रियांनी त्यांना खिजवून–खिजवून नकोसे केले. तेव्हा ते मोठ्याने ओरडले, "धिक्कार असो! शत्रुपक्ष पळून जावो आणि मोह टळो. सभ्य स्त्रियांनो, तुम्ही आपल्या प्रेमाचे चाळे दुसऱ्या

कोणाबरोबर करा. मला माझ्या स्वतःच्या विचारात दंग असू द्या. माझ्या प्रेमाची एकमेव सम्राज्ञी टोबोसोची अप्रतिम डल्सीनिया हिने माझे सारे विचार व्यापून टाकले आहेत. ”

असे म्हणून ते आपल्या थकलेल्या हाडांना विसावा देण्यासाठी त्या दालनाच्या मध्यभागी जमिनीवर बसले. त्यांना घेऊन बिछान्याकडे न्यावे असे डॉन अँटोनियोने फर्मावले. त्यांना मदतीसाठी हात देणारा पहिला माणूस म्हणजे सँको. त्यांना उचलता उचलता तो म्हणाला, “ धनीसाहेब, आपल्या ‘ कुमारी माते ’ची शपथ घेऊन मी सांगतो की, तुम्ही आपले तळवे मोठ्या कौशल्याने नाचविले. भक्कम शरीराचे शूर--वीर असे आपण वागडणारी पोरे आहोत आणि प्रत्येक शिलेदार नाचात भाग घेणाराच असला पाहिजे असे आपल्याला वाटते काय ? वाटत असेल तर, तो तुमचा भयंकर भ्रम आहे असे मी आपल्याला सांगतो. काही माणसांना नाच करण्यापेक्षा राक्षसाच्या नरडीचा घोट घेणे आवडते हे मला माहीत आहे. आपण जर आपल्या बुटाच्या तळव्यावर हाताने थाप मारीत असता तर मी आपल्याला साथ केली असती. कारण कोणाही तबलजीइतक्या कौशल्याने मी ताल देऊ शकतो. पण प्रत्यक्ष नृत्य करण्याचे बाबतीत मात्र मी एक इंचभरही हालचाल करू शकत नाही. ” त्याच्या या बोलण्याची मंडळींना मोठी मौज वाटली. सँकोने आपल्या धन्याला बिछान्यावर निजविण्यासाठी तेथून नेले. बिछान्यावर त्याने त्यांच्या अंगावर डोक्यापर्यंत पांघरूण घातले. हेतू असा की, नृत्यामुळे त्यांना झालेली सर्दी घाम येऊन निघून जावी.

दुसरे दिवशी डॉन अँटोनियो यांनी त्या मंतरलेल्या मस्तकाचा संकल्पित प्रयोग करण्याचे ठरविले आणि ते डोके जेथे होते, त्या खोलीत डॉन क्विक्झोट यांना नेले. त्यांच्याबरोबर सँको, त्यांचे दोन मित्र व समारंभात शिलेदारजींना खेळविणाऱ्या आणि रात्रभर अँटोनियांच्या पत्नीला सोबत करणाऱ्या त्या दोन स्त्रिया होत्या. त्यांनी दाराला काळजीपूर्वक कुलूप घातले आणि त्या सर्व लोकांना गुप्तपणा राखण्याची सूचना दिली. त्या मस्तकाचा गुण कोणता हे त्याने त्यांना सांगितले आणि म्हटले, “ त्याचा पडताळा पहाण्याची ही पहिलीच वेळ आहे, माझ्या दोन मित्रांशिवाय दुसऱ्या कोणालाही ही जादूगिरी माहीत नाही. तुम्हाला जर मी आधी माहिती दिली नसती तर इतरांसारखी चूक तुम्हीही केली असती. या यंत्राची रचना इतकी कलात्मक आणि चातुर्याची आहे की, त्यातील जादू ओळखणे अशक्य आहे. ” त्या मस्तकाच्या कानाशी आपले डोके नेणारा पहिला माणूस म्हणजे डॉन अँटोनियो. सर्व मंडळींना ऐकू जाईल इतक्या बेताने तो त्या मस्तकाजवळ जाऊन बोलला, “ हे मस्तका, तुला प्राप्त झालेल्या रहस्यमय शक्तीमुळे, सध्या माझे विचार काय आहेत हे तू मला सांग. ” त्या मस्तकाने, ओठ न हालविता, स्पष्ट व सुबोध स्वरात उत्तर दिले, “ विचारांचा पारखी मी नाही ! ” तो आवाज ऐकून सर्वजण चकित झाले. कारण उत्तर देण्यास त्या खोलीत कोणीच नाही, हे सर्वांना माहीत होते.

डॉन अँटोनियोने पुनः विचारले, " या खोलीत आम्ही किती माणसे आहोत ? " त्या आवाजाने पहिल्याच पट्टीत उत्तर दिले, " तू आणि तुझी बायको, तुझे दोन मित्र, तिच्या दोन मैत्रिणी, ला मांचा येथील डॉन क्विक्झोट या नावाचा एक सुप्रसिद्ध शिलेदार आणि सँको पँझा या नावाचा त्याचा सेवक. " आता त्यांचे आश्चर्य पूर्वीपेक्षा अधिकच वाढले. त्यांना मोठा विस्मय वाटला आणि त्यामुळे त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्या मस्तकापासून दूर जाऊन अँटोनियो म्हणाला, " हे पुरे झाले. तुला ज्याने मला विकले, तो माणूस लबाड नव्हता अशी माझी खात्री झाली आहे. खरोखर हे मस्तक शहाणे आहे, संवाद करणारे आहे, दिव्य चमत्कार करणारे आहे. आता दुसऱ्या कोणी आपले नशीब अजमावून पहावे. " सामान्यतः स्त्रिया अत्यंत जिज्ञासू आणि चौकस असतात. म्हणून त्यातील एका स्त्रीने धाडस करून व त्या मस्तकाजवळ जाऊन म्हटले,

" मी खरोखर सुंदर होण्यासाठी काय करावे, हे तू, मस्तका, मला सांग. " मस्तकाने उत्तर दिले, " प्रामाणिक हो. " ती स्त्री उत्तरली, " माझे काम झाले." नंतर तिची मैत्रीण पुढे आली आणि तिच्याइतक्याच जिज्ञासेने म्हणाली, " माझ्या नवऱ्याचे माझ्यावर प्रेम आहे की नाही हे जाणण्याची माझी इच्छा आहे. " मस्तकाने उत्तर दिले, " त्याचे वर्तन निरखून पाहा, म्हणजे ते तुला सांगेल. " ती सुवासिनी परत गेली आणि जाता जाता स्वतःशी म्हणाली, " खरोखर हा प्रश्न निरर्थक होता. कारण माणसाची कृत्ये हीच त्याच्या मनोवृत्तीच्या हमखास खुणा होत. " नंतर डॉन अँटोनियोचा एक मित्र पुढे आला. त्याने विचारले, " मी कोण आहे ? " उत्तर आले, " ते तू जाणतोस. " त्या माणसाने पुनः विचारले, " तू मला जाणतोस काय हे सांग. " मस्तक उत्तरले, " मी जाणतो. तू डॉन पेड्रो नॉरिस आहेस. " तो माणूस म्हणाला, " हे मस्तका, हे पुरेसे आहे. तू सर्व गोष्टी जाणतोस याची मला खात्री पटली. " इतरांसाठी जागा करून देण्याकरिता त्याचा मित्र पुढे झाला आणि त्याने त्या मस्तकाला विचारले, " माझा थोरला मुलगा आणि वारस यांच्या मनात कोणती इच्छा आहे ? " मस्तक म्हणाले, " मी तुला पूर्वीच सांगितले आहे की, विचारांचा पारखी मी नाही. तथापि तुला जमिनीत पुरण्याची इच्छा आहे. " त्या गृहस्थाने उत्तर दिले, " अगदी खरे आहे. मला माझ्या डोळ्याने जे दिसते ते मी माझ्या बोटाने लिहून ठेवतो. मला सारे काही माहीत आहे. " डॉन अँटोनियोच्या पत्नीने मस्तकाला पुढील प्रश्न विचारला, " तुला काय विचारावे हे मला नीटसे कळत नाही. माझ्या प्रिय पतीचा सहवास मला दीर्घकाळ लाभेल का ? एवढे सांग. " मस्तकाने उत्तर दिले, " लाभेल. कारण त्याची प्रकृति आरोग्यसंपन्न आहे आणि तो मितपान करतो. त्यामुळे त्याला दीर्घायुष्य लाभेल. जी माणसे अत्यंत स्वैरपणे जगतात, ती फार दिवस जगण्याचा संभव नसतो. " नंतर डॉन क्विक्झोट आले आणि म्हणाले, " मॉंटेसिनोजच्या गुहेत मी जे साहस केले, ते सत्य होते की स्वप्न होते हे सांग. सेवक सँको आपले वचन पूर्ण करून स्वतःला पुरेसे फटके मारून घेईल काय ? त्यामुळे डल्सीनियावरील जादू नाहीशी होईल काय ? " मस्तकाने

उत्तर दिले, " त्या गुहेतील साहसासंबंधी दोन्ही बाजूंनी पुष्कळ बोलता येण्यासारखे आहे. फटके खाण्याचे सँकोचे काम चालेल पण सावकाश, तथापि शेवटी डल्सीनिया जादूतून खरोखर मुक्त होईल. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " मला एवढेच जाणण्याची इच्छा होती. कारण माझ्या भाग्याचा सारा भर डल्सीनिया जादूमुक्त होण्यावर आहे. "

शेवटचा प्रश्न सँकोने विचारला, तो म्हणाला, "श्रीयुत मस्तका, कृपा करून मला हे सांग की, मला दुसरे राज्य मिळण्याचा संभव आहे काय ? उपासपोटी भ्रमंती करण्याचे हे माझे सेवकाचे काम कधीकाळी सुटेल काय ? मला माझे सैपाकघर पुनः कधी दिसेल काय ? " मस्तकाने उत्तर दिले, " तू आपल्या स्वतःच्या घरात - राज्यपाल होशील. तू घरी गेलास तर तुला स्वतःचे सैपाकघर पुनः पहावयास मिळेल. तू आपली नोकरी सोडलीस तर तू या सेवकगिरीतून मुक्त होशील. " सँको म्हणाला, " फारच चांगले ! अहो, एखाद्या घोड्याच्या मस्तकानेदेखील हे सारे सांगितले असते. मी स्वतःसुद्धा एवढे भाकीत केले असते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " असे कसे म्हणतोस मूर्खा ? तुझ्या प्रश्नाला योग्य तीच उत्तरे मिळणार. दुसरी कोणती कशी मिळणार ? " सँको म्हणाला, " बरे तर, आपल्याला जसे वाटते तसे होऊ दे. या बाबतीत श्रीयुत मस्तकाने मला आणखी थोडे सांगावे एवढीच माझी इच्छा होती. "

अशा प्रकारे प्रश्न मांडले गेले आणि त्यांची उत्तरे दिली गेली– आणि सारा कार्यक्रम शेवटास गेला. पण त्या सर्व मंडळींचे आश्चर्य कायमच राहिले. त्याला अपवाद म्हणजे डॉन अँटोनियोचे दोन मित्र. त्यांना ते रहस्य माहीत होते. ते आता उघड करण्याचे बेनेनगेलीने ठरविले आहे. त्या मस्तकात काही जादू किंवा चेटूक आहे, अशा चुकीच्या समजुतीने जगाने यापुढे आश्चर्य करू नये, म्हणून तो लेखक तुम्हाला सांगतो की, आपली करमणूक करावी आणि अज्ञ लोकांना चकित करावे या उद्देशाने डॉन अँटोनियो मोरेनो याने ही युक्ती केली होती. माद्रिद येथील शिल्प–कला–संग्रहात त्याने ही युक्ती पाहिली होती. तिचे अनुकरण त्याने आपल्या घरी केले होते.

त्या युक्तीची पद्धत अशी होती– ते टेबल आणि ते ज्यावर उभे राहिले होते, ती चौकट, गरुडाच्या पंजाप्रमाणे दिसणारे ते टेबलाचे पाय हे सारे लाकडाचे होते, पण सूर्यकांत मण्यासारखे ते दिसावेत असा रंग त्यांना दिलेला होता. एखाद्या रोमन सम्राटाच्या पुतळ्याप्रमाणे दिसणारे ते पितळेच्या रंगाचे मस्तक पूर्ण पोकळ होते– आणि तसेच त्या टेबलाचे पायही होते. त्या मस्तकाची मान आणि छाती तंतोतंत तशीच होती या साऱ्या वस्तू इतक्या कौशल्याने बसविलेल्या होत्या की, त्या सर्व एकाच पदार्थाच्या केलेल्या आहेत असे वाटावे. या पोकळीत एक पत्र्याची नळी होती. त्या टेबलाखालच्या तक्तपोशीतून ती नळी तेथे नेलेली होती. जो माणूस उत्तरे देत होता तो खालच्या खोलीत त्या नळीच्या तोंडाशी आपले तोंड ठेवीत असे. त्या नळीच्या पोकळीतून त्याला प्रश्न ऐकू येत असत आणि त्यांना तो स्वच्छ व स्पष्ट शब्दांनी उत्तर देत असे. म्हणून त्याची लबाडी उघडकीस येत नसे. हा सारा दिव्य चमत्कार एक कल्पक तरुण घडवून

आणत असे. तो डॉन अँटोनियोचा पुतण्या होता. त्याला आपल्या चुलत्याकडून आधी सूचना मिळत आणि म्हणून तो पहिल्या प्रश्नांना तत्काळ सरळ उत्तरे देत असे. बाकीच्या प्रश्नांची उत्तरे तो आपल्या कल्पनाशक्तीने अंदाज बांधून किंवा उडवाउडवीची देत असे.

सिड् हॅमेट आपल्याला आणखी असेही सांगतो की, यानंतर पुढे दहा–बारा दिवस ते अजब यंत्र मोठ्या लौकिकाने आपले काम करीत राहिले. पण साऱ्या प्रश्नांना उत्तर देणारे एक मंतरलेले मस्तक डॉन अँटोनियोच्या घरात आहे, असा बोभाटा सर्व शहरभर पसरला. तो आपल्या धर्माच्या जागरूक पहारेकऱ्यांच्या कानी जाईल या भीतीने, पूज्य पाद्र्यांना ती सारी हकीगत सांगणे योग्य ठरेल असे त्याला वाटले. त्या पाद्र्यांनी ती हकिगत ऐकून त्या मस्तकाचे तुकडे करण्याची आज्ञा दिली– नाही तर अडाणी व गांवढळ लोकांना धर्माचा दुर्लौकिक करण्यास कारण मिळेल. तरीही डॉन क्विक्झोट आणि सँको यांना वाटत राहिले की, ते मस्तक म्हणजे दैवी चमत्कार होता आणि जादूचा प्रयोग होता. खरी गोष्ट अशी आहे की, या बाबतीत सेवकांपेक्षा शिलेदारजींचे समाधान अधिक झाले होते.

डॉन अँटोनियोच्या विनंतीला मान देऊन, डॉन क्विक्झोट यांची मोठी करमणूक करावी म्हणून, किंवा त्यांच्या वेडेपणामुळे लोकांची अधिक करमणूक करावी म्हणून, शहरातील सभ्य लोकांनी, सहा दिवसानंतर पळण्याची शर्यत ठेवली. पण नंतर घडलेल्या एका प्रसंगाने ती रद्द झाली.

डॉन क्विक्झोट यांना शहरात पायी फेरफटका करण्याची इच्छा झाली. आपण घोड्यावर बसून चाललो म्हणजे मुलांचा जो थवा आपल्या मागोमाग येतो तो टाळावा हा त्यांचा हेतू. सँको आणि डॉन अँटोनियोचे दोन सेवक यांच्यासह ते बाहेर पडले. आपल्या धन्याच्या हुकुमावरून ते सेवक त्यांच्याबरोबर गेले. एका रस्त्याने जात असताना डॉन क्विक्झोट यांनी वर पाहिले आणि एका दारावर मोठ्या अक्षरांनी पुढील शब्द लिहिलेले त्यांना दिसले– ' येथे छापखाना आहे. ' हे पाहून शिलेदारजींना परम आनंद झाला. कारण त्यांनी छापखाना पूर्वी कधीच पाहिला नव्हता. तो पाहण्याची संधी त्यांना आता लाभली. आपली जिज्ञासा तृप्त करण्यासाठी ते आपल्या लवाजम्यासहित आत गेले. तेथे त्यांना दिसले– काही माणसे कागद लावीत आहेत, काही माणसे मुद्रिते तपासीत आहेत. एकीकडे खोक्यातून ठशांचे खिळे काहीजण काढून घेत आहेत, तर कोणी दुसरीकडे काही मुद्रितांवरून नजर फिरवीत आहेत. थोडक्यात म्हणजे मोठ्या मुद्रणालयात दिसणारे सारे प्रकार तेथे त्यांना दिसले. एका कामगाराकडून दुसऱ्याकडे ते गेले आणि प्रत्येकाच्या हातात काय काम आहे याची बारकाईने चौकशी करू लागले. त्यांची जिज्ञासा तृप्त करण्याचे कामी ते कामगार मागे सरले नाहीत.

शेवटी ते एका जुळाऱ्याजवळ गेले आणि ' तू काय करीत आहेस ? ' असे त्यांनी त्याला विचारले. मुद्रक म्हणाला, " महाराज, हा जो माणूस येथे आहे ( काहीसा गंभीर व उतार वयाच्या माणसाकडे त्याने बोट दाखविले ) त्याने एका इटालियन

पुस्तकाचे स्पॅनिश भाषेत भाषांतर केले आहे. त्यातील काही मजकूर मी येथे छपाईसाठी जुळवीत आहे." डॉन क्विक्झोट यांनी विचारले, "या पुस्तकाचे नाव काय?" लेखकाने उत्तर दिले, "महाराज, त्याचे इटालियन भाषेतील नाव, 'ले बॅगेटेल' असे आहे." डॉन क्विक्झोटनी विचारले, "महाराज, त्या शब्दांचा स्पॅनिश भाषेत काय अर्थ होतो?" त्या सद्गृहस्थाने उत्तर दिले, "महाराज, ले बॅगेटेल' म्हणजे 'सटरफटर' या नावावरून पुस्तकाविषयी फारशी आशा उत्पन्न होत नाही, पण त्यातील विषय महत्त्वाचा आहे." शिलेदारजी म्हणाले, "इटालियन भाषेचा मला थोडाफार परिचय आहे आणि एरिओस्टोचे काही चरण म्हणता येतात असे मी मानतो. म्हणून महाराज, आपल्याला न दुखविता आणि आपल्या कौशल्याविषयी शंका न घेता पण केवळ माझी जिज्ञासा तृप्त करण्यासाठी मी आपल्याला नम्रतेने विचारतो की, इटालियन भाषेत 'पिग्नॅटा' हा शब्द आपल्याला कधी आढळला आहे काय?" ग्रंथकाराने उत्तर दिले, "होय, पुष्कळ वेळा!" डॉन क्विक्झोटनी विचारले, "मग त्याचे भाषांतर तुम्ही कसे करता?" भाषांतरकाराने उत्तर दिले, "कसे म्हणजे? खिचडी–भांडे–पॉरिज–पॉट या शब्दाने!" डॉन क्विक्झोट म्हणाले, "वाः रे वा! आपण तर इटालियन वाक्–प्रचाराचे प्रभु आहा. मी पैजेवर सांगतो की, जेव्हा इटालियन माणूस 'पियास', म्हणतो, तेव्हा तुम्ही त्याचे भाषांतर 'प्लीज' ने करता, तेथे 'पियू' असेल तर तुम्ही 'आणखी' म्हणता, 'सू' च्या जागी 'वर' आणि 'गियू' म्हणजे 'खाली'" त्याने उत्तर दिले, "अगदी बरोबर, महाराज! त्यांचे योग्य अर्थ असेच आहेत." डॉन क्विक्झोट म्हणाले, "ज्या गुणांचा वापर होत नाही, आणि जे गुण सर्वांना माहीत असत नाहीत ते नष्ट होतात, ही मानवजातीची केवढी हानि आहे. महाराज, आपल्या गुणांना उत्तेजन देण्याचे कामी जग कुचराई करीत आहे, असे मी शपथेवर सांगतो. पण सर्वच प्रतिभासंपन्न माणसाचे नशीब असेच असते. कमनशिबामुळे किती तरी कल्पक माणसांच्या कर्तृत्वाला मर्यादा पडते आणि उणेपणा येतो. कोणी कितीही कष्टाने उद्योग केले तरी त्यापैकी कितीक जणांचा धीर खचला जातो! महाराज, जाता जाता मी सांगतो की, ग्रीक व लॅटिन अशा सर्वश्रेष्ठ भाषा सोडल्या तर बाकीच्या भाषांपैकी एकीतून दुसरीमध्ये रूपांतर करणे म्हणजे फ्लँडर्समधील चित्रविचित्र पडदा उलट बाजूने पहाण्यासारखे आहे. त्या उलट बाजूवर पडद्यांवरील चित्रे स्पष्टपणे दिसतात पण त्या पडद्याचे दोरे आणि टोके इतकी असतात की, त्यामुळे त्या चित्रांचे सौंदर्य आणि यथार्थत्व झाकून जाते. तो पडदा सुलट्या बाजूने पाहिला म्हणजे जसा चांगला दिसतो, तसा मग तो दिसत नाही. अशा साध्यासुध्या भाषांतील पुस्तकांचे भाषांतर करण्याच्या रिकाम्या खटाटोपात बुद्धीची चमक किंवा भाषेचे प्रभुत्व हे काहीच दिसत नाही. पूर्वी कोणी तरी लिहिलेल्या मजकुराची नकल करण्यासारखे हे काम असते. भाषांतराच्या या कामाची स्तुती होत नाही. पुष्कळ वेळा माणसांना याहून भिकार काम करावे लागते. भाषांतराच्या गुणांचा पुरावा म्हणून आपल्यापुढे 'पॅस्टोर फिडो'चे

' फिगेरोच्या डॉक्टर ख्रिस्तोव्हल ' ने केलेले भाषांतर आहे. तसेच झॉरिगीच्या डॉन जुआनने केलेले ' ॲमिंटा ' हे भाषांतर अत्यंत उत्तम आहे. जणू काही ती त्यांची स्वतःचीच स्वतंत्र पुस्तके आहेत. मूळचे कोणते आणि भाषांतर कोणते याविषयी वाचकांना शंका यावी असे बेमालूम काम त्यांनी केले आहे. पण महाराज, कृपा करून मला सांगा की, आपण आपले पुस्तक स्वतःच्या खर्चाने छापता की आपले हस्तलिखित आपण एखाद्या पुस्तक-विक्रेत्याला विकले आहे ?" भाषांतरकाराने उत्तर दिले, "हे काय विचारता, महाराज ? मी माझ्याच पैशाने हे प्रसिद्ध करीत आहे. त्याच्या या पहिल्या आवृत्तीने मला निदान एक हजार क्राऊन सुटतील अशी मला आशा आहे. त्याच्या दोन हजार प्रती काढण्याचा माझा विचार आहे आणि प्रत्येकी सहा रील या किमतीने त्या क्षणार्धात खपतील अशी मला आशा आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तुमचा हिशेब चुकेल अशी मला भीती वाटते. या मुद्रकांच्या आणि पुस्तक-विक्रेत्यांच्या लांड्या-लबाड्यांची माहिती तुम्हाला अजून काही नाही, याचेच हे चिन्ह आहे. त्यांच्यामध्ये हातचलाखी चालू असते. मी तुम्हाला खात्रीने सांगतो की, जर तुमचे पुस्तक काहीसे कंटाळवाणे आणि निर्जीव असले, तर दोन हजार प्रतींचा भार तुमच्या शिरावर राहील." लेखक म्हणाला, "काय महाराज, माझ्या श्रमाचा मोबदला, प्रत्येक पानाला तीन कवड्या, असा घेऊन मी माझे पुस्तक पुस्तकविक्रेत्याला विकावे असे आपल्याला वाटते काय ? जास्तीत जास्त तेवढेच पैसे ते मला देतील- आणि त्यासाठी मी त्यांचे आभार मानावेत असेही इच्छितील. छे, छे, महाराज, जगात कीर्ती मिळावी म्हणून मी माझी पुस्तके छापीत नाही. माझा नाव-लौकिक पूर्वीच झालेला आहे. नफा मिळविणे हे माझे साध्य आहे. त्याच्याशिवाय नुसत्या लौकिकाला काय अर्थ आहे ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "ठीक आहे, आगे बढो. तुमची भरभराट होवो." नंतर त्या खोलीच्या दुसऱ्या भागात ते गेले, तेव्हा त्यांना एक माणूस ' आत्म-तेज ' नावाच्या पुस्तकाची मुद्रिते तपाशीत असलेला दिसला. तेव्हा शिलेदारजी म्हणाले, "हां, हे ठीक आहे. अशा प्रकारची पुस्तके पुष्कळ असली तरी, अशीच पुस्तके प्रसिद्ध व्हावयास हवीत. कारण या युगात पापी लोकांची संख्या अवाढव्य आहे. आपल्यामध्ये इतके काळेकुट्ट जीव आहेत की, ते उजळण्यासाठी आत्म-तेजाची आवश्यकता अनंत पटींनी आहे."

नंतर ते दुसरीकडे गेले आणि तेथे दुसरा एक माणूस ज्याची मुद्रिते तपाशीत होता, त्याचे नाव त्यांनी विचारले. तेथील माणसांनी त्यांना सांगितले, "टोर्डेसिलासच्या एका नागरिकाने लिहिलेल्या ला मांचा येथील डॉन क्विक्झोट या कल्पनाचतुर माणसाच्या चरित्राचा हा दुसरा खंड आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "त्या पुस्तकासंबंधी मी ऐकले आहे. त्यात मूर्खपणाने व उर्मटपणाने केलेली निंदा असल्याने ते जाळण्यात आले आणि भस्मसात् झाले असे मला खरोखर वाटत होते. योग्य वेळी सारे काही होईल. फाशीचा दिवस शेवटी उगवतोच. कारण, कृत्रिम गोष्टी जोपर्यंत सत्याचा आभास निर्माण

करतात आणि फायदा मिळवून देतात, तोपर्यंत त्या लोकांना चांगल्या वाटतात व मानवतात. अशा कल्पित गोष्टींपासून खरा इतिहास जितका दूर असेल, तितका तो अधिक मोलाचा. " असे म्हणून त्या छापखान्यातून ते संतापाने बाहेर पडले.

त्याच दिवशी डॉन अँटोनियोने डॉन क्विक्झोट यांना बंदरातली जहाजे दाखविण्याचे ठरविले. सँकोने आपल्या आयुष्यात एकही जहाज पूर्वी कधी पाहिले नसल्याने त्याला या योजनेमुळे संतोष वाटला. डॉन अँटोनियोने जहाजावरील कप्तानाला सूचना दिली की, मी माझे पाहुणे, ला मांचा येथील डॉन क्विक्झोट, यांना जहाजे पहाण्यासाठी दुपारी घेऊन येणार आहे. शिलेदारजींचे चरित्र या वेळपर्यंत कप्तानाला आणि शहरातील सर्व लोकांना चांगलेच परिचित झाले होते. जहाजावर काय घडले, हा विषय पुढील प्रकरणाचा आहे.



## प्रकरण ६३

# जहाजावर सँकोच्या नशिबी ओढवलेले दुर्दैव आणि (मूर स्त्री) मोरिस्को या सुंदरीचे विलक्षण प्रताप

त्या मंतरलेल्या मस्तकाने दिलेल्या उत्तरासंबंधी डॉन क्विक्झोट यांच्या मनात अनेक गंभीर विचार आले, पण त्यातील लबाडीचा विचार त्यांच्या मनात आला नाही. डल्सीनिया जादूमुक्त होईल या एकाच उत्तरावर त्यांचे सारे विचार केंद्रित झाले होते. ती लौकरच जादूमुक्त होईल अशा आशेने ते मोठ्या आनंदाने व संतोषाने विश्रांती घेत राहिले. सँकोला जरी राज्यपाल होण्याच्या कटकटीचा तिटकारा वाटत होता, तरी राज्य करण्याची, लोकांना हुकूम सोडण्याची आणि आपण मोठे दिसण्याची खाज व महत्त्वाकांक्षा अजून त्याला होती. कारण, मूर्खांनाही अधिकाराची आवड असते.

सारांश, त्या दिवशी दुपारी डॉन अँटोनियो, त्याचे दोन मित्र, डॉन क्विक्झोट आणि सँको हे सारे जहाजाकडे निघाले. त्यांच्या येण्याची बातमी कप्तानाला आधीच दिलेली असल्यामुळे, धक्क्यावर ते दिसताच त्याने सर्व जहाजांना शिडे उभारण्याचा हुकूम सोडला. वाद्ये वाजू लागली, उंची गालिचे आणि लालसर–जांभळे लोड ठेवलेली होडी जहाजातून खाली त्यांना जहाजावर आणण्यासाठी पाठविण्यात आली. डॉन क्विक्झोट यांनी तिच्यावर पाय ठेवताक्षणी मुख्य जहाजाने आपली फळी खाली सोडली आणि बाकीच्या जहाजांनीही तसेच केले. जहाजाच्या काठावर जेव्हा डॉन क्विक्झोट उजव्या बाजूस जाऊन उभे राहिले, तेव्हा गुलामांच्या खलाशीवर्गाने 'हू, हू, हूश' अशा आरोळ्यांनी त्यांचे स्वागत केले. कोणाही प्रतिष्ठित माणसाला अभिवादन करण्याची त्यांची ही पद्धत होती. जहाजाचा जनरल ( आता आपण त्याला तसेच म्हटले पाहिजे ) जन्माने व्हॅलेन्शियन होता. तो मोठा प्रतिष्ठित होता. त्याने आपला हात त्यांच्या हातात दिला आणि नंतर त्यांची अंगभेट करून तो म्हणाला, " माझ्या साऱ्या आयुष्यात कधी दिसणार नाही इतका अत्यंत सुखाचा दिवस आजचा आहे, अशी मी नोंद करीन. कारण आज ला मांचा येथील श्रीमान् डॉन क्विक्झोट यांचे दर्शन घेण्याचा मान मला लाभला आहे. सर्वसंचारी शिलेदारीची साक्षात मूर्ति आज माझ्या डोळ्यांपुढे उभी आहे. " डॉन क्विक्झोट यांनी तितक्याच सभ्यतेने त्याला परत धन्यवाद दिले. एखाद्या उमरावाप्रमाणे आपल्याला वागविले जात आहे, हे पाहून त्यांचा आनंद गगनात मावेना.

लगेच ते सर्वजण एका भव्य सभागृहात गेले. ते चांगले भूषविलेले होते. तेथे ते सर्वजण आपापल्या जागी बसले. एक दुय्यम अधिकारी वर खलाश्यांच्या जागेकडे गेला आणि शिटी फुंकून त्याने गुलामांना कपडे काढण्याचा इशारा दिला. तसे त्यांनी एका क्षणात केले. इतकी माणसे नागड्या अवस्थेत पाहून सँको चपापला. पण त्याहीपेक्षा त्याला सर्वात मोठे आश्चर्य वाटले ते म्हणजे, अतर्क्य त्वरेने त्यांनी वर जाऊन शिडे उभारली. सैतानांशिवाय दुसरे कोणी इतक्या जलदीने ते काम करू शकणार नाही असे त्याला वाटले. तो जहाजाच्या मध्यभागी उजव्या बाजूकडे वल्हे चालविणाऱ्या माणसाच्या पाठीमागे बसला होता. त्या माणसाने, आपल्याला मिळालेल्या सूचनेप्रमाणे, सँकोला पकडले आणि त्याच्या हातात एक निशाण देऊन त्याला शेजारच्या माणसाचे हवाली केले. त्या दुसऱ्या माणसाने त्याला तिसऱ्या माणसाकडे फेकले. अशा प्रकारे, जहाजाच्या उजव्या बाजूकडील साऱ्या गुलाम खलाश्यांनी त्याला या बाकावरून त्या बाकावर पटापट फेकून दिले. त्यामुळे बिचाऱ्या सँकोची दृष्टीच गेली आणि त्याला वाटले, नरकातील सारी पिशाच्चे आपल्याला योग्य जागी नेत आहेत. साऱ्या डाव्या बाजूवरही त्याची अशी फेकाफेक करीपर्यंत ते गुलाम स्वस्थ बसले नाहीत. शेवटी त्याला त्यांनी जेथून उचलले होते, तेथेच ठेवून दिले. पण अत्यंत विचित्र परिस्थितीत–धापा टाकीत असलेला व थंडगार घाम गाळीत असलेला सँको तेथे बसला. आपल्याला काय झाले हेच त्याला मुळी कळेना.

आपला सेवक पंखाशिवाय इतक्या वेगाने उड्डाण करीत आहे हे पाहून डॉन क्विक्झोट यांनी जनरलला विचारले, "जहाजावर येणाऱ्या सर्व पाहुण्यांना अशा विधीतून जावे लागते काय? जर असेल तर मी तुम्हाला निक्षून सांगतो की, येथे राहण्याचा माझा विचार नाही आणि मला असा पाहुणचार आवडत नाही. तुमच्यापैकी कोणी जर माझ्यावर हात टाकला आणि माझी अशी फेकाफेक केली, तर मी तुमच्या शरीरातून तुमचे प्राण पिळून बाहेर काढीन, हे देवाची शपथ घेऊन मी सांगतो." असे म्हणून व उठून त्यांनी आपल्या समशेरीला हात घातला.

त्याच वेळी त्या खलाश्यांनी शिडे खाली केली आणि मुख्य दोर खाली सोडला. त्यावेळी मोठा भयंकर आवाज झाला. त्यामुळे सँकोची बाबरगुंडी वळली आणि त्याला वाटले, वरचे आकाश निखळून खाली आपल्या डोक्यावर पडत आहे. म्हणून त्याने आपले डोके भीतीने आपल्या दोन पायांमध्ये दाबून धरले. डॉन क्विक्झोटही थोडेसे बावरले. त्यांचे शरीर कापू लागले, त्यांनी आपले खांदे वर उडविले आणि त्यांच्या शरीराचा वर्ण बदलत गेला. त्या गुलामांनी मुख्य दोर जितक्या वेगात व गोंगाटात खाली सोडला होता, तसाच त्यांनी तो पुनः वर चढविला. पण हे सर्व करीत असताना ते इतके गप्प होते की, जणू काही त्यांना आवाजच नाही किंवा श्वासही नाही. दुय्यम अधिकाऱ्याने नांगर उचलण्याचा आदेश त्यांना दिला. खलाश्यांच्या जागेवर उडी मारून त्यांच्या मध्यभागी तो उभा राहिला. नंतर त्याने आपल्या चाबकाने त्यांच्या खांद्यांवर हलके

फटके मारले. हळुहळू ते जहाज समुद्रातून चालू लागले.

त्या जहाजाची वल्ही म्हणजे त्याचे पाय आहेत असे सँकोला वाटले. इतके रंगीत पाय एकाच वेळी चालू लागल्याचे पाहून सँको म्हणाला, "खरोखर ही जादू आहे. हिच्यापुढे आमचे सारे पराक्रम आणि जादूटोणा कःपदार्थ आहे. या बिचाऱ्या दुर्दैवी खलाश्यांनी असे काय केले आहे म्हणून त्यांची चामडी अशी कमावली जात आहे? आणि हा दुष्ट माणूस एकटा उभा राहून शिटी फुंकतो आणि इतक्या माणसांना उपद्रव देण्यास धजतो हे कसे? मी म्हणतो हा पापलोक आहे– निदान 'पापे जाळणारी पाताळाची भट्टी' आहे–( नरक ) आहे."

या सर्व हालचालींकडे सँको किती बारकाईने पहात आहे हे लक्षात घेऊन डॉन क्विक्झोट त्याला म्हणाले, "अरे, प्रिय सँको, या माणसाबरोबर उभे राहून तू स्वतःच्या कमरेवर फटके मारून घेणे किती सोपे आहे! त्यामुळे डल्सीनियावरील जादू पूर्णपणे नाहीशी होईल. तुझ्या दुःखात तुला इतके सोबती मिळाले म्हणजे तुला वेदनांची जाणीव होणार नाही. आणि तू ते इतक्या सफाईने मारलेस तर साधु मर्लिन कदाचित् असे समजेल की, पुढे केव्हा तरी तुला जे फटके खाणे भाग आहे, त्यातील दहा फटक्यांबरोबर येथला एक फटका आहे." या फटक्यांचा आणि डल्सीनियाच्या जादू-मुक्तीचा अर्थ काय असे जहाजांचा जनरल विचारणार, तोंच एक खलाशी ओरडला, "मोंजोईच्या दीपस्तंभावरील माणसे आपल्याला खुणा करून सूचना देत आहेत की, पश्चिमेकडे किनाऱ्याजवळ एक जहाज उभे आहे." हे ऐकताच जनरल उडी मारून म्हणाला, "माझ्या जिगरदोस्तांनो, झपाट्याने चला. ते जहाज निसटू देऊ नका. हे जहाज अल्जेरियाचे असले पाहिजे असे मी खात्रीने सांगतो." लगेच आणखी तीन जहाजे हुकूम घेण्यासाठी जनरलकडे आली. त्याने त्यांना फर्मावले "दोन जहाजांनी समुद्रात जावे आणि एका जहाजाबरोबर मी किनाऱ्याबर राहीन म्हणजे आपल्याला हा ऐवज नक्की मिळेल."

वल्ही मारणाऱ्यांनी जहाजे इतक्या त्वेषाने पुढे नेली की, विजेच्या चपळाईने ती चालू लागली. समुद्रावर असलेल्या लोकांना असे आढळून आले की, सुमारे दोन मैल दूर असलेल्या त्या जहाजावर चौदा–पंधरा वल्ही आहेत. ही जहाजे पाहिल्यावर त्या जहाजाने पळून जाण्याचा फार प्रयत्न केला. आपल्या चपळाईमुळे आपण निसटून जाऊ अशी त्या जहाजातील लोकांना आशा होती, पण व्यर्थ! कारण त्या समुद्रामध्ये जनरलचे ते जहाज अत्यंत वेगवान होते. म्हणून त्याने त्या नवख्या जहाजामधील पुष्कळ अंतर तोडले. आपल्यावरील संकट ओळखून त्या नवख्या जहाजाच्या मालकाला वाटले, आपल्या खलाश्यांनी आता आपली वल्ही टाकून द्यावीत आणि शरणागती पत्करावी. नाही तर आपल्या कप्तानाचा दम उखडेल अशी भीती त्याला वाटली. पण दैवाच्या मनात दुसरेच होते. जनरल त्या नवख्या जहाजाच्या अगदी जवळ येऊन ठेपला आणि त्यावर हल्ला करण्याचा हुकूम तो आपल्या गुलामांना देणार, तोंच त्या जहाजावर असलेल्या बार

दारुड्या तुर्कांपैकी दोघांनी दोन बंदुका झाडल्या आणि या जहाजाच्या पुढील भागावर उभ्या असलेल्या दोन सैनिकांना ठार केले. ते पाहून जनरलने प्रतिज्ञा केली की, त्यांच्या-पैकी एकही माणूस मी आता जिवंत सोडणार नाही. मोठ्या त्वेषाने ते जहाज पकडण्यासाठी जनरलचे जहाज पुढे धावले, पण त्याच्या वल्ह्याखालून ते नवखे जहाज निसटून गेले. जनरलचे जहाज त्याच्या पुष्कळ पुढे गेले. तरी त्या नव्या छोट्या जहाजाला तेथून निसटण्याची आशा वाटू लागली. म्हणून सारी शिडे उभारून व वल्ही चालवून ते छोटे जहाज आपली वाट झपाट्याने चालू लागले. पण त्यांच्या अपेक्षेप्रमाणे काहीच घडून आले नाही. त्या जहाजावरील लोकांनी केलेली सारी चपळाई पाण्यात पडली. कारण, थोडासा पाठलाग करून जनरल त्या जहाजाजवळ जाऊन पोहोचला आणि आपली वल्ही त्यात टाकून त्याने त्या जहाजाचा ताबा घेतला, एवढेच नव्हे तर, त्या जहाजावरील प्रत्येक जिवंत माणसालाही त्याने पकडले.

हे होईपर्यंत दुसरी जहाजे तेथे येऊन पोचली. चारी जहाजे आपली ती लूट घेऊन जेव्हा बंदरात परत आली, तेव्हा तेथे लोकांचे थवेच्या थवे वाट पहात उभे होते. त्यांनी कोणती लूट आणली याची जिज्ञासा त्यांना होती. किनाऱ्यापाशी नांगर टाकल्यावर जनरलला दिसले की, किनाऱ्यावर व्हॉइसरॉय आलेला आहे. तेव्हा त्याला जहाजावर आणण्यासाठी जनरलने होडी खाली सोडली आणि मुख्य दोर खाली टाकण्याचा हुकूम दिला. नव्या जहाजाचा मालक आणि बाकीचे खलाशी यांना बांधून वर आणण्याचा हुकूम त्याने सोडला. ते खलाशी सुमारे छत्तीस होते. ते सारे धडधाकट होते आणि त्यापैकी बहुतेक जण बंदुकधारी तुर्क होते. ' जहाजावरील मुख्याधिकारी कोण आहे ? ' असे जनरलने विचारले, तेव्हा एका कैद्याने स्पॅनिश भाषेत त्याला उत्तर दिले. तो स्पॅनिश आहे आणि बाटगा आहे हे नंतर कळले. तो म्हणाला, " महाराज, आमचे धनी हे ! " असे म्हणून त्याने एका तरुणाकडे बोट दाखवले. तो विशीच्या आतील होता आणि कल्पना करता येणार नाही इतका अत्यंत सुंदर होता. त्याला जनरल म्हणाला, " अरे मूर्ख कुतरड्या, पळून जाणे अशक्य आहे, असे तुला कळल्यावर तू माझ्या माणसांना का मारलेस ? कप्तानाला असाच मान द्यावयाचा असतो काय ? मूर्खपणा म्हणजे धाडस नव्हे हे तुला माहीत नाही काय ? जोपर्यंत आपल्याला आशा असते तोपर्यंत आपण धडाडी दाखवावी, पण बेफाम होऊ नये. " त्या जहाजाचा मालक उत्तर देत होता, पण ते ऐकण्यासाठी जनरल तेथे थांबू शकला नाही. व्हाइसरॉयकडे जाऊन त्याचे स्वागत करणे त्याला भाग होते. आपल्या लवाजम्यासह आणि शहरातील इतर लोकांसह व्हाइसरॉय जहाजावर नुकताच आलेला होता. तो म्हणाला, " महाशय, तुमचा पाठलाग यशस्वी झाला. त्याचे बक्षीस तुम्हाला काय मिळाले ? " जनरलने उत्तर दिले, " नामदारसाहेबांना लौकरच ते दिसेल. डोलकाठीला लटकणारे ते बक्षीस मी आपल्याला लौकरच दाखवीन. " व्हाइसरॉयने विचारले, " ते कसे ? " जनरल म्हणाला, " युद्धशास्त्र, तर्कशास्त्र आणि समुद्रावरील निर्बंध या सर्वांचे उल्लंघन करून त्यांनी

माझ्या जहाजावरील दोन उत्तम सैनिकांना ठार केले आहे. म्हणून मी शपथ घेतली आहे की, त्यांच्यापैकी प्रत्येकाला–विशेषतः या तरुण बदमाषाला—त्यांच्या मालकाला–मी फाशी देईन." असे म्हणून त्याने व्हाइसरॉयाला एक माणूस दाखविला.

त्याचे दोन्ही हात पूर्वीच बांधलेले होते आणि त्याच्या गळ्याभोवती फाशीचा दोर टाकलेला होता. त्याचा अर्थ मृत्यु! त्या माणसाचे तारुण्य, सौंदर्य आणि धीरगंभीर वृत्ती या सर्वांनी व्हाइसरॉयजवळ त्याची वकिली केली. म्हणून त्याला वाचवावे असा त्याच्या मनाचा कल झाला. त्याने विचारले, "हे कप्ताना, तुझा जन्म तुर्क म्हणून झाला आहे की मूर म्हणून? का तू बाटगा आहेस हे मला सांग." त्या तरुणाने उत्तम स्पॅनिश भाषेत उत्तर दिले, "यापैकी मी कोणीच नाही." व्हाइसरॉयने विचारले, "मग तू कोण आहेस?" तरुणाने उत्तर दिले, "एक खिस्ती स्त्री! एक स्त्री—आणि ती खिश्चन–त्यातही अशा पोशाखात आणि अशा अधिकारावर–ही विश्वास ठेवण्यासारखी गोष्ट नव्हे—आश्चर्य करण्यासारखी आहे. मी माझा जीवन–वृत्तांत आपल्याला सांगेपर्यंत आपण माझी फाशीची शिक्षा लांबणीवर टाकावी, अशी माझी नम्र विनंती आहे. त्यामुळे तुम्हाला माझा सूड उगविण्यास विलंब होईल हे खरे, पण तो अल्प असेल हे मी खात्रीने सांगते." ही विनंती इतक्या करुण स्वराने करण्यात आली होती की, ती कोणीही नाकारू शकला नाही. आपला वृत्तांत सांगण्यास जनरलने त्याला फर्मावले. पण त्या-बरोबरच असेही बजावले की, "जो अपराध तू केला आहेस तो इतका भयंकर आहे की, त्याची क्षमा होण्याची आशा तू मुळीच बाळगू नकोस." नंतर तरुणाने आपली कहाणी सुरू केली—

"ज्या राष्ट्राच्या दुःखद आठवणी आपल्या मनात ताज्या आहेत, त्या अभागी नि अविचारी राष्ट्रातील मी एक नागरिक आहे. माझे आईवडील मोरिस्को वंशाचे होते. त्यांच्या दुर्दैवाच्या प्रवाहामुळे आणि माझ्या दोन चुलत्यांच्या हट्टामुळे मला स्पेनमधून बार्बेरीमध्ये तातडीने निघून जावे लागले. मी खरोखरच खिश्चन आहे–आमच्यापैकी पुष्कळजण मनातून मुसलमान असतात, तशी मी नाही–असे मी पुष्कळ सांगितले पण ते व्यर्थ गेले. त्याचा प्रभाव माझ्या चुलत्यांच्या मनावर काहीच पडला नाही अन् म्हणून ते मला माझ्या जन्मभूमीत ठेवण्यास राजी नव्हते. त्याचप्रमाणे आम्हाला स्पेनमधून निघून जाण्याचा हुकूम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या कठोर मनावरही माझ्या बोलण्याचा काहीच परिणाम झाला नाही. मी खिश्चन आहे, हे माझे ढोंग नव्हे, यावर त्यांचा विश्वास बसेना. माझी आई खिश्चन होती आणि माझ्या विचारी पित्याने तोच आपला धर्म असल्याचे जाहीर केले होते. मी स्तनपान करता करता कॅथॉलिक-श्रद्धा सेवन केली होती. माझे सुरेख शिक्षण झाले होते आणि माझ्या बोलण्या-चालण्यात मोरिस्को वंशाची अणुमात्र छटा कधीही दिसत नसे. अशा गुणांनी संपन्न असताना माझे वय वाढत गेले, आणि त्याबरोबरच माझ्या अंगी जे काही थोडेफार सौंदर्य होते, तेही वाढू लागले. माझे जीवन एकाकी होते आणि मी बाहेर जाण्यावर निर्बंध होते. तरीही

डॉन गॅस्पर ग्रेगोरिओ या तरुणाच्या दृष्टीस मी एकदा पडले. आमच्या शेजारच्या शहरात राहणाऱ्या एका शिलेदाराचा तो मुलगा नि वारस होता. माझ्याशी बातचीत करण्याची संधी त्याने कशी मिळविली, माझ्या प्रेमात तो बेहोषपणे कसा पडला आणि त्याच्या कामवासनेचा प्रभाव माझ्यावर कसा पडला, हे सारे सांगणे कंटाळवाणे होईल. मी संक्षेपानेच बोलले पाहिजे, नाही तर माझ्या मानेभोवतीचा हा फास, माझी गोष्ट मध्यावर आली असतानाच, मला कापून टाकील. मी तुम्हाला एवढेच सांगते की, माझ्या हद्दपारीत मला सोबत करण्याची त्याला इच्छा होती. मोरिस्को भाषेवर त्याचे पूर्ण प्रभुत्व होते. त्या बळावर तो आम्हा हद्दपार केलेल्या लोकात मिसळला. मला नेणाऱ्या माझ्या दोन चुलत्याशी त्याने परिचय करून घेतला. आम्ही सारे मिळून बार्बेरीला गेलो आणि अल्जीअर्स येथे—म्हणजे प्रत्यक्ष सैतानाच्या राज्यात—आम्ही आमचा मुक्काम ठोकला.

"मध्यंतरी माझ्या बापाने मोठ्या शहाणपणाने आमच्या हद्दपारीची वार्ता कळताच, कोणत्या तरी पर-राष्ट्रात आश्रय घेण्याचा विचार केला आणि त्याचा शोध करण्यासाठी तो तेथून निघून गेला. जाताना त्याने एका खाजगी जागेत पैसे व रत्ने यांचा बराच मोठा साठा लपवून ठेवला. ती जागा त्याने माझ्याशिवाय दुसऱ्या कोणास सांगितली नाही. आपण परत येईपर्यंत तो ठेवा हलवावयाचा नाही, अशी त्याने मला आज्ञा दिली.

"अल्जीअर्सच्या राजाला कळले की, माझ्याजवळ थोडेफार सौंदर्य आहे आणि संपत्तीही आहे. (तिचा मला पुढे फायदा झाला) राजाने मला बोलाविले आणि माझ्या देशासंबंधी, तसेच माझ्याजवळ किती रत्ने व सोने आहे, यासंबंधी खूप चौकशी केली. माझ्या जन्मभूमीची माहिती मी त्याला दिली व सांगितले की, 'माझी संपत्ती एका विशिष्ट स्थानी पुरलेली आहे. ती जेथे आहे तेथे परत जाण्यास आपण मला परवानगी द्याल, तर मी ती सहज परत आणू शकेन.'

"असे मी त्याला सांगितले याचे कारण, माझ्या संपत्तीचा वाटा त्याला दिला तर त्याच्या लोभीपणामुळे माझ्या शरीराला त्याच्याकडून अपाय होणार नाही अशी मला आशा वाटली. आमची ही प्रश्नोत्तरे चालू असताना, राजाला कोणी अशी माहिती दिली की, जगातील एक अत्यंत देखणा व सुंदर असा तरुण आमच्याबरोबर आलेला आहे. हा तरुण म्हणजे डॉन ग्रेगोरिओ असला पाहिजे हे मी तत्काळ ओळखले. कारण, त्याचे सौंदर्य त्या वर्णनाशी तंतोतंत जुळत होते. माझ्या स्वतःच्या दुर्दैवापेक्षा या तरुणावरील संकटाच्या जाणीवेने मला अधिक दुःख झाले. कारण मी असे ऐकले होते की, या रानटी तुर्कांना अत्यंत सुंदर स्त्रियापेक्षा देखणे तरुण अधिक आवडतात. राजाने तत्काळ हुकूम सोडला की, त्या तरुणाला माझ्यासमोर आणा. राजाने मला विचारले, "या लोकांनी केलेल्या प्रशंसेस तो तरुण खरोखरच पात्र आहे काय?" त्यावेळी जणु काही माझ्या अंगात कोणा भल्या देवदूताने संचार केला आणि त्यामुळे प्रेरित होऊन

मी राजाला सांगितले, " आपल्या माणसांनी ज्याची इतकी प्रशंसा केली तो पुरुष नाही – माझ्यासारखीच स्त्री आहे. तिला स्त्री–वेष धारण करण्याची आपण जर परवानगी दिली तर तिचे सौंदर्य त्याच्या स्वयंभू कांतीने चमकू लागेल. उलट राजेसाहेबापुढे ती जर, स्वतःला न शोभणाऱ्या वेषात, दाखल झाली तर तिला लज्जा वाटेल. ती लज्जा स्त्री–वेषामुळे नाहीशी होईल. " राजाने संमती दिली. त्याबरोबरच मी माझ्या द्रव्याचा ठेवा परत आणण्यासाठी स्पेनला परत जाण्याचा हुकूम दुसरे दिवशी सकाळी देण्याचेही त्याने वचन दिले. मी डॉन गॅस्परशी बोलले आणि पुरुषाच्या वेषात राजापुढे जाण्यात कोणते संकट आहे हे त्याला समजावून सांगितले व म्हटले, " आज संध्याकाळी मूर स्त्रीच्या पद्धतीचा पोषाख करून तू राजाच्या सेवेस सिद्ध रहा. " तिच्या सौंदर्याने राजा इतका खूष झाला की, महाराजाधिराजांना भेट म्हणून अर्पण करण्यासाठी म्हणून तिला राखून ठेवण्याचे त्याने ठरविले. सेरॅग्लिओमधील आपल्या राण्या तिचा मत्सर करतील आणि आपल्या स्वतःच्या वासना उफाळून येतील या भीतीने, त्याने तिला शहरातील एका प्रतिष्ठित महिलेच्या स्वाधीन केले. तिच्या घरी हिला तत्काळ नेण्यात आले.

" हा वियोग आम्हा उभयतांना दुःखदायक होता. मी त्याच्यावर प्रेम करते हे मी नाकारू शकत नाही. प्रेमातील वियोगाच्या वेदना ज्यांनी कधी अनुभविल्या असतील, त्यांनाच आमच्या जीवाची तगमग किती झाली असेल, याची योग्य कल्पना करता येईल. दुसरे दिवशी सकाळी, राजाच्या आज्ञेवरून, मी स्पेनला जाण्यासाठी या जहाजावर चढले. तुमच्या माणसांना ठार मारणारे हे दोन तुर्क आणि तुमच्याशी प्रथम बोलणारा हा स्पॅनिश बाटगा हे माझ्याबरोबर होते. हा बाटगा मनातून खिश्चन आहे. बार्बेरीला परत जाण्यापेक्षा स्पेनला परत जाण्याची इच्छा मनात धरून तो माझ्याबरोबर आला होता. वल्ही मारणारे बाकीचे सारे मूर व तुर्क आहेत. त्यांना असे हुकूम मिळालेले होते की, ' जेथे तुम्हाला स्पेनची भूमी प्रथम दिसेल तेथे खिश्चनांच्या वेषात या स्त्रीला व या बाटग्याला किनाऱ्यावर सोडावे. ' पण हे दोन हावरे व उर्मट तुर्क, आपले हुकूम मोडून, प्रथम किनाऱ्यावर फिरत राहिले. काही तरी बक्षीस मिळेल अशी त्यांना आशा वाटत होती. उलट, त्यांना अशी भीती वाटत होती की, आपण जर या दोघांना प्रथम किनाऱ्यावर सोडले तर त्यांना काही तरी अपघात घडेल आणि त्यामुळे त्यांचे जहाज समुद्रात फार दूर नाही, हे आम्ही उघडकीस आणू. त्यावेळी किनाऱ्यावर दुसरी जहाजे असली तर आपण पकडलो जाऊ असे भय त्यांना वाटत होते. रात्री आम्ही या भूमीवर उतरलो. एखादे जहाज जवळच असावे असा आम्हाला विश्वास वाटत होता आणि आम्ही तुमच्या हाती पडलो.

" शेवटी सांगायचे म्हणजे, डॉन ग्रेगोरिओ स्त्री–वेषात मूर लोकामध्ये राहिलेला आहे. त्याच्या सोंगामुळे त्याचा नाश होण्याचे फार काळ टळणार नाही– आणि येथे मी माझ्या भवितव्याची वाट पहात–किंवा त्याचे भय बाळगीत–उभी आहे. आता मला माझ्या आयुष्याचा कंटाळा आलेला असल्यामुळे मृत्यूलाही मी स्वागतार्ह मानते.

सज्जनहो, अशा प्रकारच्या माझ्या आयुष्यातील दुःखी घटना मी आपल्याला सांगितल्या आणि त्या तुम्ही ऐकल्या. सत्याशिवाय दुसरे काहीही मी तुम्हाला सांगितले नाही. आता माझी प्रार्थना एवढीच आहे की, मला ख्रिश्चन म्हणून मरू द्या. माझ्या दुर्दैवी राष्ट्रावर ज्या अपराधाचा आरोप केला जातो, त्याच्याशी माझा काडीमात्र संबंध नाही." येथे ती थांबली. तिच्या कहाणीमुळे आणि तिच्या अश्रूमुळे त्या मंडळींपैकी पुष्कळांची अंतःकरणे विरघळली.

व्हॉइसरॉयाचे मन कोमल करुणेने द्रवले. तिच्या सुंदर हातांना बांधून टाकणारे दोर त्याने मोकळे केले. त्याचवेळी एक म्हातारा यात्रेकरू एकदम पुढे आला. व्हॉइस-रॉयाच्या नोकरवर्गाबरोबर तो जहाजावर आलेला होता. ती तरुणी आपली कहाणी निवेदन करीत असताना तो ती एकाग्रतेने व लक्ष्यपूर्वक ऐकत होता. तिच्या पायाशी लोळण घेऊन तो ओरडला, "अगे, ॲन्ना फेलिक्स, माझ्या प्रिय कन्ये, किती दुर्दैवी तू ! आपला पिता रिकोट याच्याकडे पहा. तुला शोधण्यासाठी तो येथे परत आला आहे. बाळे, तुझ्याशिवाय जगणे मला अशक्य झाले. माझ्या वार्धक्याचा आधार नि आनंद तूच आहेस." इतका वेळ सँको तिरसटपणाने कुढत बसला होता. नुकतीच त्याची जी फेकाफेक झाली होती, त्यामुळे तो त्रासलेला होता. आपले डोके वर उचलून आणि त्या यात्रेकरूच्या तोंडाकडे टक लावून त्याने पाहिले आणि ओळखले की, आपण ज्या दिवशी आपले राज्य सोडले त्या दिवशी आपल्याला रस्त्यात हाच रिकोट भेटला, आणि त्याचीच ही मुलगी असली पाहिजे. ती आता बंधमुक्त झालेली असल्यामुळे तिने आपल्या बापाला आलिंगन दिले आणि त्याच्या सुखदुःखात ती सामील झाली. तो म्हातारा यात्रेकरू म्हणाला, "अहो सरदारहो, ही माझी मुलगी–ॲन्ना फेलिक्स– आहे. नावापेक्षा तिचे नशीब अधिक खडतर आहे. आपल्या बापाच्या संपत्तीइतकेच तिचे सौंदर्य सुविख्यात आहे. माझ्या वार्धक्यात राहण्यास योग्य असे पवित्र स्थान शोधण्या-साठी मी माझा देश सोडला आणि जर्मनीतील एक स्थान मी कायम केले. जमीन खणून माझी संपत्ती परत मिळविण्यासाठी मी या वेषात इतर यात्रेकरूंबरोबर इकडे परत आलो. पण माझी सर्वात मोठी संपत्ती–माझी प्रियतम कन्या– मला येथे अनपेक्षित-पणे भेटेल, असे मला मुळीच वाटले नव्हते. अहो उमरावहो, आमच्या अल्पशा अप-राधाची क्षमा करणे आपल्या न्यायाच्या शुद्धतेशी विसंगत नसेल, तर आपण आम्हावर दया दाखवावी अशी विनंती मी करतो आणि माझ्या कन्येच्या प्रार्थनेमध्ये नि अश्रूमध्ये सहभागी होतो. तुम्हाला काही इजा करावी असे आमच्या मनात कधीही आले नाही. ज्या अपराधाबद्दल आमचे राष्ट्र वाळीत टाकण्यात आले आहे–आणि ते न्यायाचे आहे– त्यांच्याशी आमचा काहीही संबंध नाही." सँको मध्येच म्हणाला, "वा ! वा ! भिकारी जसा आपली थाळी ओळखतो तसा मी रिकोटला ओळखतो. ॲन्ना फेलिक्स ही त्याची मुलगी आहे, हे अगदी खरे आहे. पण तो बाहेर का गेला ? परत का आला ? त्यात त्याचे हेतू काय होते ? ते चांगले होते की वाईट होते ? याविषयी मला भलेबुरे काहीही

म्हणायचे नाही. ”

या विलक्षण अपघातामुळे साऱ्या मंडळींची मने आश्चर्याने भरून गेली. त्या सौंदर्यशालिनी कप्तानाकडे वळून जनरल म्हणाला, “ बाई ग, तुझे अश्रू इतके परिणामकारक आहेत की, त्यामुळे माझी पूर्वीची प्रतिज्ञा सोडून देणे मला भाग आहे. हे सुंदरी ॲन्ना फेलिक्स, ईश्वराने तुला दिली असतील तितकी वर्षे तू जिवंत राहा. ज्या मूर्ख व उर्मट गुलामांनी हे गुन्हे केले त्यांना त्यांची शिक्षा भोगू दे. ” असे म्हणून त्याने त्या दोन गुन्हेगार तुर्कांना जवळच फाशी देण्याचा हुकूम दिला. पण व्हॉइसरॉयाने मध्यस्थी केली की, यांचा गुन्हा हेतुपूर्वक केलेला नसून वेडाच्या भरात झालेला आहे. त्यामुळे त्यांची प्राणघातक शिक्षा रद्द करण्यात आली. त्याचवेळी जनरलनेही असा विचार केला की, त्यांची कत्तल निर्दयपणे करणे, हे न्यायापेक्षा क्रौर्याचे दिसेल.

नंतर डॉन गिस्पर ग्रेगोरिओ याला त्याच्या संकटातून आपण मुक्त कसे करावे याचा विचार ते करू लागले. त्याला मुक्त करण्यासाठी दोन हजार ड्यूकॅट देण्याची तयारी रिकोटने दाखविली. रत्नाच्या रूपाने याच्याजवळ तेवढे पैसे होते. पण त्या स्पॅनिश बाटग्याने जी एक सूचना मांडली ती तत्काळ फलदायी होईल असे सर्वांना वाटले. तो म्हणाला, “ ख्रिस्ती खलाशी आणि सहा वल्ही असलेली एक लहानशी होडी घेऊन मी ॲल्जीअर्सला जातो आणि त्याला स्वतंत्र करतो. त्याला बंदीत कोठे ठेवले आहे हे मला माहीत आहे आणि कोठे व केव्हा उतरावे हेही मला माहीत आहे. ” पण जनरल व व्हॉइसरॉय या दोघांनी त्याच्या या सूचनेला हरकत घेतली. कारण बाटग्याच्या निष्ठेवर त्यांचा विश्वास नव्हता. आपल्याबरोबर येणाऱ्या ख्रिश्चनांचा विश्वासघात तो करील अशी त्यांना भीती वाटत होती. पण त्याच्या सत्यनिष्ठेबद्दल ॲन्ना फेलिक्स हिने ग्वाही दिली आणि ख्रिश्चनांना कोणी कैद केले तर आपण खंडणी भरून त्यांना सोडवून आणू असे आश्वासन रिकोटने दिले. त्यामुळे ती सूचना अंमलात आणण्याचे सर्वांनी ठरविले.

व्हॉइसरॉय किनाऱ्यावर गेला. जाण्यापूर्वी त्याने मोरिस्का आणि तिचा बाप यांना डॉन ॲंटोनिओ मोरेनोच्या हवाली केले. त्या दोघांच्या पाहुणचारासाठी काही लागले तर आपल्या घरातून घेऊन जाण्यास त्याने त्याला सांगितले. ॲन्ना फेलिक्स हिच्या लावण्याने त्याच्या अंतःकरणात प्रेमाच्या आणि सदिच्छेच्या अशा भावना निर्माण केलेल्या होत्या.



प्रकरण ६४

# आतापर्यंत डॉन क्विक्झोट यांच्यावर जी संकटे आली, त्या सर्वांपेक्षा अधिक दुःखदायक संकटांचा वृत्तांत.

त्यांनी हे संकट आपल्या मनाला फार लावून घेतले.

डॉन अँटोनियोच्या पत्नीला सुंदर मोरिस्काच्या संगतीमुळे अत्यंत आनंद झाला. तिच्या सौंदर्याइतकेच तिचे ज्ञान उत्तम होते. त्यामुळे शहरातील बहुतेक सारी प्रतिष्ठित मंडळी तिला भेटण्यास आली. डॉन क्विक्झोट यांनी डॉन अँटोनियोला सांगितले, "डॉन ग्रेगोरियोला मुक्त करण्याचा जो मार्ग आपण स्वीकारला आहे, तो मला मुळीच पसंत नाही. कारण, त्यात संकट असून यशाची आशा फारच थोडी आहे. खात्रीचा मार्ग म्हणजे तुम्ही मला माझ्या घोड्याहत्यारासह बार्बेरीच्या समुद्र–किनाऱ्यावर सोडावयाचे. मग मूर लोकांच्या सर्व शक्तीशी सामना देऊन त्या माणसाला बंधमुक्त करण्याचे काम माझ्याकडे लागले. डॉन गेसेरोझने आपली पत्नी मेलिसँड्रा हिला याच पद्धतीने पूर्वी बंधमुक्त केले होते."

हे ऐकून सँको म्हणाला, "महाराज, उडी घेण्यापूर्वी विचार करा. डॉन गेसेरोझने आपल्या बायकोला तेव्हा फ्रान्सला नेले, तेव्हा त्याला कोरड्या जमिनीवरून पाठलाग करावा लागला. पण येथे आपण डॉन ग्रेगोरियोची सुटका केली तरी त्याला अफाट समुद्रावरून स्पेनमध्ये आपण कसे आणणार ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे, मृत्यूशिवाय सर्व गोष्टींवर तोडगा आहे. समुद्राजवळ फक्त एक लहानशी होडी असू दे, मग तीत प्रवेश करण्यास आपल्याला कोण अडथळा करतो हे मी पाहीन." सँको म्हणाला, "अहो धनीसाहेब, लोकांची लक्तरे धुण्यापेक्षा दुसऱ्या पुष्कळ गोष्टी करण्यासारख्या आहेत. बोलणे सोपे आहे, करणे कठीण आहे. मला हा बाटगा फार आवडतो. तो एक नामी, इमानी माणूस आहे आणि याच कामासाठी जन्मास आलेला आहे असे मी समजतो." डॉन अँटोनियो म्हणाला, "ठीक आहे. बाटगा अपेशी ठरला तर बार्बेरिला जाण्यासाठी महनीय डॉन क्विक्झोट जहाजावर चढतील."

दोन दिवसात त्या बाटग्याला तेथून पाठविण्यात आले. होडीच्या प्रत्येक बाजूस वल्ही चालविणारी सहा–सहा माणसे होती. ती माणसे चलाख व सुदृढ होती. दोन दिवसानंतर त्या जनरलसह ती जहाजे बंदरातून बाहेर गेली आणि पूर्वेकडचा मार्ग आक्रमू लागली. त्यापूर्वी जनरलने व्हाइसरॉयला सांगितले, डॉन ग्रेगोरियो आणि

ॲन्ना फेलिक्स यांच्या भवितव्याची बातमी मला कळवा.

एके दिवशी सकाळी काय घडले पहा. समुद्र-किनाऱ्यावरील हवा खाण्यासाठी म्हणून डॉन क्विक्झोट, आपल्या नित्याच्या सवयीप्रमाणे नखशिखांत सशस्त्र होऊन, बाहेर पडले, ( माझी शस्त्रे हाच माझा उत्तम वेष आणि युद्ध हीच माझी क्रीडा, असे ते म्हणत. ) तेव्हा त्याना एक शिलेदार घोड्यावर बसून आपल्याकडे येत असलेला दिसला. त्यांच्याप्रमाणेच तोही आपादमस्तक शस्त्रसज्ज होता. त्याच्या ढालीवर तेजस्वी चंद्राचे चित्र चमकत होते. हाकेच्या अंतरावर येताच तो त्यांना उद्देशून म्हणाला, " ला मांचा येथील सुविख्यात शिलेदार डॉन क्विक्झोट, आपली स्तुती कितीही केली तरी थोडीच! मी 'धवलचंद्रांकित' शिलेदार आहे. लोकांचा विश्वास बसणार नाही असे पराक्रम मी केले आहेत. ते कदाचित् आपल्या कानी आले असतील. मी येथे तुझ्याशी सामना करण्यास आलो आहे. माझ्या खड्गबळाने मी तुला असे कबूल करावयास लावीन की, माझी हृदय-स्वामिनी ( तिचे नाव व प्रतिष्ठा कोणतीही असो ) हिची सर कोणालाही येणार नाही आणि तुझ्या टोबोसोच्या डल्सीनियापेक्षा ती अधिक सौंदर्यवती आहे. हे सत्य तू सरळपणे मान्य केलेस तर, तुझ्यावर हमखासपणे ओढवणारा मृत्यू टळेल आणि तुझा जीव घेण्याचा माझा त्रास वाचेल. जर तू हे मान्य केले नाहीस तर पुढील अटींवर आपले द्वंद्व-युद्ध होईल – मला जय मिळाला तर तुला आपल्या हत्यारांचा आणि साहसांच्या शोधाचा त्याग तत्काळ करावा लागेल व आपल्या घरी परत जावे लागेल. तेथे एक पूर्ण वर्षभर, आपल्या तलवारीला हात न लावता, तुला शांततेने व निवांतपणे काळ कंठावा लागेल, आणि त्या काळात आपल्या जिंदगीची सुधारणा व आपल्या आत्म्याचा उद्धार तुला करता येईल. पण जर तुझी फत्ते झाली, तर माझे आयुष्य तुझ्या हाती येईल, माझा घोडा व हत्यारे ही तुझी विजय-चिन्हे उरतील आणि माझ्या पूर्वीच्या साऱ्या पराक्रमांची कीर्ती, विजयाच्या अनुषंगाने, तुला प्राप्त होईल. आता काय करावे, याचा विचार कर आणि मला ताबडतोब उत्तर दे. कारण, माझे काम आजच्याच दिवशी आटोपले पाहिजे."

'धवल-चंद्रांकित' शिलेदाराच्या आव्हानातील उर्मटपणामुळे डॉन क्विक्झोट यांना जितके आश्चर्य व नवल वाटले, तितकेच त्या आव्हानाच्या विषयाचेही वाटले. म्हणून गंभीर व उग्र मुद्रेने ते म्हणाले, " हे धवल-चंद्रांकित शिलेदारा, आपल्या यशाची वार्ता माझ्यापासून अद्याप दूर आहे. सुविख्यात डल्सीनियाचे दर्शन तुम्हाला झाले नसेल हे संभवनीय आहे. कारण, तुम्ही जर तिची संपूर्ण गुणवत्ता पाहिली असती तर तुमची अशी खात्री पटली असती की, भूत-वर्तमान-भविष्य काळातील कोणाही सुंदरीला तिची सर येणार नाही. तुम्ही खोटे बोलता असे मी न म्हणता, आपल्याला एवढेच सांगतो की, 'शिलेदारजी, तुम्ही चुकत आहा!' ( तुमच्या पराक्रमाची कीर्ती मला प्राप्त होण्याची अट मी वगळतो. कारण आपल्या कार्याचे स्वरूप मला माहीत नाही. ) आपल्या अटीवर मी आपले आव्हान स्वीकारतो आणि माझे मवाचे मत कायम

ठेवतो. मी माझ्या स्वतःच्या कीर्तीवर संतुष्ट राहीन. तुमच्या बाकीच्या साऱ्या अटी मला मान्य आहेत. तुमचा वेळ इतका मर्यादित असल्याने तुम्ही आपले रण–क्षेत्र निवडा आणि तुमच्या इच्छेप्रमाणे शक्य तितक्या लौकर आपले काम सुरू करा. आपल्यावर कोणी कृपा करील अशी अपेक्षा धरू नका. आपले युद्ध नीतीने होईल. यश देणारा ईश्वर आहे, सेंट पीटर आशीर्वाद देईल."

द्वंद्व–युद्धाची पूर्वतयारी करण्यात ते दोघे शिलेदार असे गुंतले असताना, व्हाइसरॉय त्या रणक्षेत्राजवळ घाईघाईने आला. 'धवलचंद्रांकित शिलेदार' शहराच्या तटबंदीजवळ आलेला आहे आणि डॉन क्विक्झोटशी वाटाघाटी करीत आहे, अशी बातमी त्याला मिळाली होती. पण डॉन अँटोनियो मोरेनो याने किंवा दुसऱ्या कोणीतरी काही तरी क्लृप्ती काढली असावी, असा त्याला संशय आला. त्याच्याबरोबर डॉन अँटोनियो आणि इतर पुष्कळ सभ्यजन तेथे गेले. रोझिनांटला फिरवून आणण्याचे काम डॉन क्विक्झोट करीत असतानाच ते सर्वजण तेथे आले. हल्ला करण्यासाठी दोघेही सिद्ध आहेत, असे पाहून व्हाइसरॉयाने त्यांना त्या आकस्मिक सामन्याचे कारण विचारले. धवल–चंद्रांकित शिलेदाराने त्याला सांगितले, या प्रकरणात एका स्त्रीचा संबंध आहे. नंतर आपण व डॉन क्विक्झोट यांच्यामध्ये काय बोलणे झाले ते त्याने संक्षेपाने निवेदिले. व्हाइसरॉयाने डॉन अँटोनियोच्या कानात हळूच विचारले, "हा धवल–चंद्रांकित शिलेदार तुझ्या माहितीचा आहे काय? डॉन क्विक्झोट यांची चेष्टा करण्यासाठी हा संग्राम निर्माण झाला आहे काय?" डॉन अँटोनियोने स्वच्छ उत्तर दिले, "हा शिलेदार माझ्या माहितीचा नाही आणि हा सामना चेष्टेचा आहे की खरा आहे हेही मला माहीत नाही." त्यांचा संघर्ष थांबविण्याचा आपण प्रयत्न करावा काय, असा संशय व्हाइसरॉयला पडला. पण शेवटी त्याच्या मनाचा कल असा झाला की, याच्या बुडाशी चेष्टाच असावी. म्हणून त्याने माघार घेतली आणि म्हटले, "हे शूर–वीर शिलेदारांनो, कबुली किंवा मृत्यू यांच्यामध्ये काहीच मार्ग नसेल आणि डॉन क्विक्झोट यांचा नकार कायम असेल व धवल-चंद्रांकित शिलेदाराचा हट्टही कायम असेल, तर मला काही म्हणावयाचे नाही. पटांगण मोकळे आहे. प्रभू तुम्हावर कृपा करो."

व्हाइसरॉयने उदार मनाने आपल्या संग्रामाला संमती दिली म्हणून त्या दोघा शिलेदारांनी त्यांना धन्यवाद दिले. अशा प्रसंगी डॉन क्विक्झोट नेहमी करीत त्याप्रमाणे, त्यांनी ईश्वराची आणि आपल्या स्वामिनीची छोटीशी प्रार्थना केली. तुतारीची ललकारी किंवा दुसरी काही खूण न होता, त्यांनी आपले काम सुरू केले. त्यांचा प्रतिस्पर्धीही आपल्या घोड्याला टाच मारून पुढे आला. तो घोडा खूपच चपळ होता. डॉन क्विक्झोट अर्धे अंतर तोडून जाण्याच्या आतच त्या शिलेदाराने त्यांच्यावर इतक्या त्वेषाने धाव घेतली की, त्याने मुद्दाम उचललेल्या भाल्याचा काहीही उपयोग न करता, ला मांचाच्या शिलेदाराला आणि रोझिनांटला फेकून दिले. ते दोघेही भयंकर वेगाने जमिनीवर आदळले.

ताबडतोब धवलचंद्रांकित शिलेदार त्यांच्या उरावर बसला आणि त्यांच्या तोंडावर आपल्या भाल्याचे टोक रोवून म्हणाला, " शिलेदारजी, तुम्ही पराभूत झाला, मृत झाला. नाही तर आपल्या द्वंद्वयुद्धाच्या शर्ती तुम्ही तत्काळ पूर्ण करा. " जमिनीवर पडल्यामुळे डॉन क्विक्झोटचे डोके सुन्न झाले होते आणि त्यांचे शरीर ओरबाडले गेले होते. आपली टोपी वर न उचलता त्यांनी क्षीण व पोकळ आवाजात उत्तर दिले, थडग्यातून बोलावे, तसे ते बोलले, " टोबोसोची डल्सीनिया ही जगात अत्यंत सुंदर स्त्री आहे आणि या पृथ्वीवरील अत्यंत अभागी शिलेदार मी आहे. माझ्या दौर्बल्यामुळे त्या सर्वगुणसंपन्न स्त्रीला कमीपणा यावा हा अन्याय आहे. छे, मी तसे होऊ देणार नाही. हे शिलेदारा, खुपस माझ्या देहात तुझा भाला आणि होऊ दे शेवट अब्रूसह माझ्या आयुष्याचा ! " त्या जेत्याने उत्तर दिले, " इतके कठोर व्हायचे काही कारण नाही. टोबोसोच्या लेडी डल्सीनियाची कीर्ती निष्कलंक नि शाबूत राहो. मात्र सामन्यापूर्वी आपण कबूल केल्याप्रमाणे, महनीय डॉन क्विक्झोट यांनी एक वर्षभर आपल्या घरी रहावे. तेवढ्यावर मी संतुष्ट आहे. " व्हॉइसरॉय, डॉन अँन्टोनिओ आणि इतर पुष्कळ माणसे या बोलाचालीला विशेषतः या योजनेला-साक्षी होती. डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " डल्सीनियाला बाधा आणण्यासारखे मला काहीही करावे लागणार नाही ही अट मान्य असेल, तर मी दुसरी कोणतीही गोष्ट करण्यास सिद्ध आहे. खऱ्या शिलेदाराच्या या माझ्या शब्दावर विश्वास ठेवा. " हे मान्य करून, धवलचंद्रांकित शिलेदार व्हॉइसरॉयला सलाम करून अत्यंत वेगाने शहरात दौडत गेला. तो कोण आहे याचा तपास, शक्य तर, करावा अशी व्हॉइसरॉयने विनंती केल्यामुळे डॉन अँटोनिओ त्याच्या पाठोपाठ गेला.

डॉन क्विक्झोट यांना उठविण्यात आले. त्यांनी आपले शिरस्त्राण उचलून घेतले. ते फिक्कट दिसू लागले आणि त्यांच्या शरीरावर घामाचे थंड बिंदू उभे राहिले. रोझिनांटची स्थिती फारच वाईट होती. तूर्त तो हलू शकत नव्हता. सँकोला आपण काय करावे आणि काय बोलावे हेच कळेना. त्याच्या मनावर जबरदस्त भार पडल्यासारखे झाले. काही काळ त्याला वाटले, आपण स्वप्नात आहो, तर काही काळ त्याला वाटले, हा दुःखदायक प्रसंग म्हणजे केवळ जादू व चेटूक आहे. सारांश, जगाच्या दृष्टीने आपला धनी पेचात सापडला आहे आणि चांगल्या वर्तनासाठी व सबंध वर्षभर आपली हत्यारे बाजूस ठेवण्यासाठी तो बांधला गेला आहे, असे सँकोला कळून आले. ' आपल्या वैभवाला ग्रहण लागले-मोठे होण्याच्या आपल्या आशा हवेत विरल्या आणि आपल्या धन्याची वचने, खाली पडल्यामुळे खिळखिळी झालेल्या हाडाप्रमाणे, अस्ताव्यस्त झालेली आहेत. ' असे त्याला वाटले. रोझिनांट व आपला धनी या दोघांनाही त्या अधःपाताने लुळे-पांगळे केले आहे असे भय त्याला वाटले. शेवटी पराभूत शिलेदारजीसाठी व्हॉइसरॉयने एक खुर्ची मागविली आणि तीत बसवून त्यांना शहराकडे नेले. त्यांच्याबरोबर व्हॉइसरॉयही गेला. डॉन क्विक्झोटची इतकी दुर्दशा करणारा हा धवलचंद्रांकित शिलेदार कोण आहे हे जाणण्याची त्यांना मोठी उत्सुकता होती. ▣ ▣

## प्रकरण ६५

# धवलचंद्रांकित शिलेदाराचा वृत्तांत, डॉन ग्रेगोरिओची मुक्तता आणि इतर घटना

धवल–चंद्रांकित शिलेदाराच्या मागोमाग त्याच्या खानावळीपर्यंत डॉन ॲंटोनियो मोरेनो गेला. तेथे वात्रट मुलांचा जमाव जमलेला होता. शिलेदार आपल्या खोलीत गेला. तेथे त्याच्या अंगावरील शस्त्र–संभार काढून घेण्यासाठी त्याचा सेवक हजर होता. डॉन ॲंटोनियो आत गेला आणि म्हणाला, " तू कोण आहेस हे मला कळल्याशिवाय मी येथून हालणार नाही. " हा माणूस आपल्याला सोडणार नाही हे लक्षात आल्यामुळे शिलेदार म्हणाला, " महाराज, मी स्वतःला छपविण्याचे कोणतेच बंधन माझ्यावर नाही. म्हणून, आपली इच्छा असेल तर, माझा माणूस माझा शस्त्र–संभार उतरीपर्यंत, आपण माझी पूर्ण सत्य हकिगत ऐकावी.

"महाराज, मला पंडित कॅरॅस्को म्हणतात, हे आपण लक्षात घ्या. या डॉन क्विक्झोटबरोबर मी त्याच गावी राहतो. त्याच्या अतर्क्य वेडेपणामुळे त्याच्या शेजाऱ्यांना– आणि मलाही–त्याचा वेडेपणा कोणत्या तरी मार्गाने दूर करण्याचा प्रयत्न करावा असे वाटते. त्यासाठी मी ही सध्याची युक्ती योजली. विसावा व स्वास्थ्य हाच त्यांच्या वेडेपणावर रामबाण तोडगा आहे, असा माझा विश्वास आहे. सुमारे तीन महिन्यांपूर्वी, ' दर्पणांकित शिलेदार ' अशी पदवी धारण करून आणि शिलेदाराचा सारा जामानिमा करून मी त्यांना रस्त्यावर भेटलो, त्यांच्याशी भांडण उकरून काढले आणि आमच्या संग्रामाच्या अटी, आपण पूर्वी ऐकल्या तशाच, होत्या, पण त्यावेळी दैवाने त्यांना हात दिला. त्यांनी मला घोड्यावरून खाली पाडले आणि जिंकले. तेव्हा मी निराश झालो. त्यांनी आपली साहसी मोहीम पुढे चालविली. मी लज्जित होऊन आणि पराभवाने अत्यंत दुःखी होऊन परत आलो. पण माझी पत पुनः मिळविण्यासाठी मी हा दुसरा प्रयत्न केला. त्यात मला यश आले. आपण जो शब्द दिला असेल अन् ज्यात आपल्या अब्रूचा प्रश्न असेल त्यांचे ते इतक्या काटेकोरपणे पालन करतात की, ते आपले वचन सिद्धीस नेतील याविषयी मला काडीमात्र शंका नाही. महाराज, माझ्या साऱ्या कहाणीचे सार हे आहे. आता आपण मला डॉन क्विक्झोट यांच्यापासून लपवून ठेवावे अशी माझी विनंती आहे. तसे झाले तरच माझी ही दुसरी योजना धुळीस मिळणार नाही आणि पुष्कळ गुण अंगी असलेल्या या भल्या माणसाची बुद्धी ठिकाणावर येईल. "

डॉन अँटोनिओने उत्तर दिले, "काय हे महाराज ? मानवजातीला आतापर्यंत जो मजेशीर मूर्खपणा चाखावयास मिळाला, त्यापासून जगाला वंचित करून तुम्ही काय मिळविणार ? महाराज, आपण विचार करा. त्यांच्या विकृतीमुळे जनतेचे जितके कल्याण होत आहे, त्याच्या निम्मेही ते बरे झाल्याने होणार नाही. पण पंडितमहाराज, माझ्या मनाचा कल असा आहे की, त्यांचा वेडेपणा त्यांच्या मनात पक्का रुजलेला आहे आणि तो दूर करणे तुमच्या कलेला शक्य नाही–आणि तसेच व्हावे अशी इच्छा केल्याशिवाय मला रहावत नाही. ( त्यासाठी ईश्वर मला क्षमा करो. ) डॉन क्विक्झोट बरे झाले तर त्यांच्या सत्संगाला आम्ही मुकू, एवढेच नव्हे तर, सँको पँझाच्या विनोदी चुटक्यांना आणि गंमतीच्या गोष्टींनाही मुकू. त्याच्या विनोदामुळे साक्षात् औदासीन्याचीही उदासीनता नाहीशी होईल. पण याविषयी मी काहीच बोलणार नाही असे वचन देतो. महाराज, मला असे खात्रीपूर्वक वाटते की, तुमची सारी यातायात फुकट जाईल." कॅरॅस्को म्हणाला, "आतापर्यंत मला यश मिळाल्यामुळे पुढील आशा बाळगण्यास मला जागा आहे. आपली काही सेवा करण्याची आज्ञा मला आहे काय ?" असे म्हणून त्याने त्याचा निरोप घेतला. आपला सारा शस्त्रसंभार एका खेचरावर लादून आपल्या तत्पर घोड्यावर तो स्वार झाला. त्याच दिवशी ते शहर सोडून तो आपल्या घराकडे निघाला. या विश्वासार्ह इतिहासात स्थान पावावे असे कोणतेही साहसी कृत्य त्याने वाटेत केले नाही.

कॅरॅस्कोबरोबर आपला जो संवाद झाला, त्याचा वृत्तांत डॉन अँटोनिओने व्हॉइसरॉयला सांगितला, तो ऐकून तो नाराज झाला. डॉनच्या आचरट गोष्टी ज्यांना माहीत होत्या त्यांची इतकी मौजेची करमणूक नाहीशी होण्याचा संभव आहे, हे कळल्याने त्याला दुःख वाटले.

सहा दिवस डॉन क्विक्झोट आपल्या अंथरुणावर पडून होते. ते अत्यंत खिन्न, तिरसट, बेचैन झाले होते. आपल्या घातुक पराभवामुळे त्यांच्या मनामध्ये कठोर व काळेकुट्ट विचार गर्दी करीत होते. सँको त्यांचे सांत्वन करीत होता. त्या सांत्वनाचे तुकडे पुढीलप्रमाणे होते. तो म्हणत होता, "प्रिय धनीसाहेब, उत्साही व्हा, चांगला धीर धरा, याहून अधिक वाईट घडले नाही याबद्दल ईश्वराचे आभार माना. अहो, काय सांगावे ? याहून एखादा माणूस कमी पडतो पण त्याची मान मोडते, पण आपली एक बरगडीसुद्धा मोडली नाही. महाराज, जे खेळतात तेच कधी कधी हरतात, हे लक्ष्यात घ्या. आपल्याला जेवणात किडे वाढले असले तर आपण डुकराच्या मांसाची वाट पाहू नये. चला महाराज, डॉक्टरची पर्वा करू नका. या आजारात तुम्हाला त्याची गरज लागणार नाही. आपण आपल्या घरी सरळपणे, शांतपणे, मंदपणे जाऊ या. साहसी कृत्यांच्या आणि रक्तबंबाळ नाकांच्या शोधार्थ, कोठे जावयाचे हे माहीत नसताना, उगाच इकडे तिकडे भटकण्याचा विचार आता आपण सोडून द्या. तसेच म्हणायचे तर, आपण जरी अत्यंत दुर्दशेत असला, तरी सर्वात मोठी नुकसानी झाली आहे माझी. राज्यपाल होण्याचा मला कंटाळा आला होता हे खरे–त्या दिशेने विचार करण्याचे मी

पार सोडून दिले होते. पण सरदार होण्याचा मनसुबा मी कधीच सोडला नव्हता. आता आपण शिलेदारीची वस्त्रे फेकून दिल्यावर मी राजा होणार नाही आणि मग मला पामराला सरदारकी न मिळाल्यामुळे केवळ शीळ घालीत हिंडावे लागेल." डॉन क्विक्झोट म्हणाले, " बस्स् कर सँको, अरे मी फक्त एक वर्षासाठी निवृत्त होत आहे. त्यानंतर मी माझा सन्मान्य व्यवसाय पुनः अंगीकारीन आणि त्यामुळे मला राज्य आणि तुला सरदारकी निःसंशय मिळेल." सँको म्हणाला, " देव करो आणि तसे होवो! आपल्यावर काही अरिष्ट ओढवू नये. 'भल्याची आशा करा म्हणजे तुम्हाला भले मिळेल' अशी म्हणच आहे."

डॉन अँटोनिओ आत आला, त्यामुळे त्यांचा हा संवाद खंडित झाला. हर्षाच्या खुणा करीत तो डॉन क्विक्झोट यांना म्हणाला, " बक्षीस द्या, महाराज, शुभ वार्ता आणल्याबद्दल मला बक्षीस द्या. डॉन ग्रेगोरिओ व तो बाटगा दोघेही सुरक्षितपणे आले आहेत. सध्या ते व्हॉइसरॉयच्या राजवाड्यात आहेत आणि आताच ते येथे येतील." ही वार्ता ऐकून शिलेदारजी थोडेसे ताजेतवाने झाले आणि अँटोनिओला म्हणाले, " महाराज, खरे सांगायचे तर त्याच्या या सुदैवाबद्दल मला दुःखच होत आहे. माझ्या शस्त्रबळाने, त्यालाच काय पण बार्बेरीतील साऱ्या ख्रिश्चन गुलामांना बंधमुक्त करून मला जी कीर्ती मिळाली असती, ती त्याने आघाडी मारून चोरून घेतली आहे. पण आता मी अभागी येथे खितपत पडलो आहे. पराजयाचे दुःख भोगत आहे आणि जमिनीवर लोळलो गेल्याची शरम मला वाटत आहे. कीर्तीचा मार्ग मला तब्बल एक वर्ष बंद झाला आहे. किती कंटाळवाणा काळ होणार तो! हातात समशेर घेण्यापेक्षा टकळी घेण्यासच मी अधिक लायक असताना मी कशाची बढाई मारू?" सँको म्हणाला, " पुरे करा हे सारे. खायला अजिबात डुकरच न मिळण्यापेक्षा बरी घाणेरडे डुक्कर मिळणे चांगले. रोगट का होईना, पण कोंबडी जिवंत रहावी. आजचा दिवस आपला आहे आणि उद्याचा दिवस माझा आहे. हे दुर्दैव आपण मनाला लावून घेऊ नका. आज जो खाली पडला तो उद्या उठेल–मात्र अंथरुणातून उठण्याची त्याला इच्छा असली पाहिजे. जखमा गेल्या खड्ड्यात. महाराज, उठा आणि डॉन ग्रेगोरिओचे स्वागत स्पेनमध्ये करा. घरात चाललेल्या गडबडीवरून तो आला असावा असे मला वाटते."

आणि तसेच घडले. व्हॉइसरॉयाला अभिवादन करून आणि आपल्या मुक्ततेचा वृत्तांत सांगून डॉन ग्रेगोरिओ त्या बाटग्या माणसासह डॉन अँटोनिओच्या घरी नुकताच आला होता. ॲन्ना फेलिक्सला भेटण्यास तो अत्यंत आतुर झालेला होता. तो बंधमुक्त झाला, तेव्हा ज्या स्त्री–वेषात होता, तो बदलून त्याने पुरुषांना योग्य असा पोशाख धारण केला होता. त्याच्याबरोबर जहाजातून आलेल्या एका कैद्याकडून तो त्याला मिळाला होता. त्याचे वय अठरा वर्षांवर नव्हते, तरी त्या पोशाखात तो अत्यंत प्रसन्न नि देखणा दिसत होता, त्याला भेटण्यासाठी रिकोट आणि त्याची मुलगी पुढे आली. बापाच्या डोळ्यात अश्रू उभे होते आणि मुलीला सलज्ज हर्ष झालेला होता. त्याला

आलिंगन न देता तिने नेत्रांनी त्याचे स्वागत केले. त्यांचे प्रेम अत्यंत सुसंस्कृत होते- त्यात स्वैराचाराला स्थान नव्हते. त्या दोघांच्या सौंदर्याने प्रत्येकजण विस्मित झाला होता. त्यांच्या आनंदात मौनावर भर होता. त्यांच्या जिव्हा बोलतील त्यापेक्षा प्रेमाची अधिक भाषा त्यांचे डोळे बोलत होते.

बाटग्या माणसाने आपल्या जलप्रवासाच्या विजयाचा संक्षिप्त वृत्तांत निवेदन केला. डॉन ग्रेगोरिओने आपल्या स्थानबद्धतेत स्त्रीसमूहामध्ये असताना आपण काय काय युक्त्या केल्या ते थोडक्यात सांगितले. त्यावरून तो आपल्या वयाच्या मानाने फारच बुद्धिमान आणि विवेकी असल्याचे दिसून आले. रिकोटने जहाजावरील खलाशांना उदारपणे पैसे देऊन संतुष्ट केले-विशेषत: त्या बाटग्याला खूष केले. ख्रिस्ती धर्माच्या अंकावर तो पुनः खेळू लागला. आपल्या पूर्वीच्या साऱ्या दोषापासून तो पश्चात्तापाने व तपश्चर्येने आता मुक्त झाला होता.

थोड्याच दिवसानंतर व्हॉइसरॉयाने डॉन ॲंटोनिओचा सल्ला घेऊन, रिकोट व त्याची मुलगी यांची हद्दपारी रद्द करण्यासाठी, योग्य ते उपाय योजले. इतकी न्यायी आणि सनातनी माणसे आपल्यामध्ये राहिल्याने राष्ट्राचे काहीच नुकसान होणार नाही असे त्यांनी ठरविले. दुसऱ्या काही कामासाठी डॉन ॲंटोनिओला कोर्टात जावयाचे होते. तेव्हा त्यांच्या वतीने वकिली करण्याची तयारी त्याने दाखविली आणि व्हॉइसरॉयला असे सूचित केले की, " तेथे पुष्कळ अवघड गोष्टी, मित्रांच्या मध्यस्थीने आणि जबरदस्त लाचलुचपतीने, पक्षकाराला संतोष होईल अशा पद्धतीने, साधता येतात. " जवळच असलेला रिकोट म्हणाला, " आपल्या प्रकरणात कोणाची मेहरबानी व लाच यावर विसंबून रहाण्याचे कारण नाही. कारण सालाझारचा सरदार-डॉन बर्नार्डो डी व्हेलॅस्को- याला राजाने आमची हकालपट्टी करण्याचे काम सांगितले होते. तो थोर माणूस अत्यंत कडक असून न्यायनिष्ठुर आहे. पैसा, कृपा किंवा प्रेम यांनी त्याचे मन चळणार नाही. इतर बाबतीत तो सदय न्यायाधीश आहे हे मी नाकारू शकत नसलो, तरी त्याचे धोरण दक्ष व भेदक असते. आमच्या मोरिस्कन वंशाचा सारा देह दूषित झाला आहे आणि त्यावर उपाय, तो कापून टाकणे हा एकच आहे, हे त्याने ओळखले आहे. तो आपल्या कर्तव्यात आर्गसप्रमाणे सहस्राक्ष आहे. आपल्या सूक्ष्म दृष्टीने त्याने त्यांच्या कारस्थानाचे गुप्त धागेदोरे शोधून काढले आहेत. अशा अस्तनीतील निखाऱ्यापासून-सामर्थ्यवान शत्रूंच्या समूहापासून-आपल्या राज्याला पोहोचणारा धोका टाळण्याचा त्याने निश्चय केला आणि अत्यंत परिणामकारक उपाय योजले. कारण, काही झाले तरी, झाडाच्या फांद्या तोडल्याने झाडाची फक्त काटछाट होते आणि त्याची विषारी फळे लवकर बाहेर पडतात. पण ते समूळ उपटून फेकून देणे हाच खरा व खात्रीचा मार्ग आहे. तिसऱ्या फिलिपची प्रशंसा करावी तितकी थोडी. कारण इतक्या बिकट आणि भारभूत अशा प्रकरणात त्याने शौर्याने निश्चय केला ही पहिली गोष्ट आणि नंतर आपली योजना सिद्धीस नेण्यासाठी डॉन बर्नार्डो डी व्हेलास्की याची नेमणूक करण्यात त्याने चातुर्य दाखविले. "

डॉन अँटोनिओ रिकोटला म्हणाला, " ठीक आहे. जेव्हा मी कोर्टात येईन तेव्हा अत्यंत न्याय्य मार्ग उपयोगात आणीन आणि प्रभूवर बाकी सारे सोपवीन. डॉन ग्रेगो-रिओ आपल्या मातापित्यांचे सांत्वन करण्यासाठी माझ्याबरोबर येईल. त्याच्या वियोगा-मुळे ते दीर्घकाळ शोक करीत आहेत. ॲन्ना फेलिक्स येथे माझ्या पत्नीसमवेत राहील किंवा एखाद्या मठात राहील. मला माझ्या कार्यात यश आल्याचे पाहीपर्यंत व्हॉइसरॉय प्रामाणिक रिकोटला आपल्या कृपाछत्राखाली ठेवून घेतील असे मी ठामपणे सांगतो." या सर्व गोष्टींना व्हॉईसरॉयाने संमती दिली. पण काहीतरी वाईट घडेल अशा भीतीमुळे, डॉन ग्रेगोरिओ आपल्या सुंदर स्वामिनीला तेथे सोडून जाण्यास नाखूष होता. तथापि आपल्या माता–पित्यांची भेट घेतल्यावर आपण तिच्याकडे परत येऊ, असा विचार करून, त्याने ती सूचना मान्य केली. अशा प्रकारे ॲन्ना फेलिक्स ही डॉन अँटोनिओच्या पत्नी-जवळ आणि रिकोट व्हॉइसरॉयजवळ राहिले.

दोन दिवसांनी डॉन क्विक्शोट यांना थोडेसे बरे वाटू लागले. त्यांनी डॉन अँटोनिओचा निरोप घेतला. डॅपलवर आपले चिलखत चढवून ते घरच्या प्रवासास निघाले. त्यांच्यापाठोपाठ पायी रखडत जाणे सँकोला भाग पडले. उलट, डॉन ग्रेगोरि-ओने ॲन्ना फेलिक्सचा निरोप घेतला. त्या दोघांचा विरह अल्पकालीन असला तरी त्यामुळे अश्रूंचे लोट वाहू लागले आणि दुःखाच्या भावनेचा अतिरेक झाला. त्याला रिकोटने एक हजार क्राऊन देऊ केले पण त्याने ते नाकारले. डॉन अँटोनिओकडून फक्त पाच क्राऊन त्याने उसने घेतले. ते तो दरबारी परत करणार होता.



## प्रकरण ६६

# या प्रकरणातील विषय जो वाचील त्याला कळेल आणि तो वाचला जात असताना जो कान देईल, त्याला ऐकू जाईल.

डॉन क्विक्झोट बार्सेलोनाहून बाहेर पडताच, ते जेथे पराभूत झाले होते त्या जमिनीच्या तुकड्यावर, त्यांनी नजर फेकली आणि ते म्हणाले, " एके काळी येथेच ट्रॉय शहर उभे होते. माझ्या भित्रेपणामुळे नव्हे तर दुर्दैवामुळे, पूर्वी मी कमावलेली सारी कीर्ती नष्ट झाली. येथेच भाग्य-देवतेने अकल्पित पलटी खाऊन मला आपल्या बेइमानीची आणि चंचलपणाची जाणीव करून दिली. येथेच माझ्या पराक्रमाला खग्रास ग्रहण लागले. काय सांगावे ? येथेच माझे सौख्य धुळीस मिळाले-ते पुनः कधी उठणार नाही. " स्वतःच्या दुर्दैवावर अशा प्रकारे आपला धनी खिन्न स्वराने भाष्य करीत आहे, हे ऐकून सँको म्हणाला, " धनीसाहेब, जेव्हा सारे काही ठाकठीक असते तेव्हा आनंदी राहणे हे जसे थोर पुरुषांचे एक लक्षण आहे, तसेच जग आपल्यावर रागावले तरी आपण शांत राहणे हेही आहे. मी माझ्यावरूनच हे ओळखतो ना ! मी जेव्हा राज्यपाल होतो, तेव्हा मजेत होतो. आता मी पायी रखडणारा फक्त एक सेवक आहे. तेव्हा मी दुःखी आहे. आणि मी असेही ऐकले आहे की, भाग्य-देवता म्हणून जिला म्हणतात, ती एक लहरी, चंचल, मद्यपी राणी आहे. तिचा सारा कारभार आंधळेपणाने चालतो. आपण काय करतो हे ती कधीच पहात नाही. आपण कोणाला वर चढवितो आणि कोणाला खाली फेकून देतो हे तिला माहीत नसते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " अरे सँको, तू तर चांगलाच तत्त्वज्ञ आहेस की ! तू मोठ्या शहाणपणाने बोलतोस. इतके ज्ञान तुला कोठून आले याचे मला नवल वाटते. पण मी तुला सांगतो की, या जगात दैव म्हणून काही वस्तू नाही. या भूतलावर भली-बुरी कोणतीही गोष्ट योगायोगाने होत नाही-ईश्वराच्या निश्चित योजनेनुसारच होते. त्यामुळे ' आपल्या नशिबासाठी प्रत्येकाने स्वतःलाच बोल लावावा ' ही म्हण खरी ठरते. माझ्यासंबंधी म्हणशील सर मी माझ्या जीवनाचा कर्ता आहे. मी जो विवेक वापरावयास हवा होता, तो न वापरल्यामुळे माझ्या मनचे सारे मनोरे ढासळले आणि एकदम भुईसपाट झाले. धवलचंद्रांकित शिलेदाराच्या प्रचंड आणि सुदृढ घोड्याला तोंड देण्यास माझा रोझिनांट क्षीण व दुर्बळ आहे हे मी ओळखावयास हवे होते. पण मला साहसाची आवड, म्हणून मी शक्य ते केले. त्यात

माझा पराभव झाला. त्यामुळे माझी प्रतिष्ठा लयास गेली. पण माझे वचन पूर्ण करण्याचा प्रामाणिकपणा मी कधी सोडला नाही–आणि सोडू शकणार नाही. जेव्हा मी शूर–वीर आणि धडाडीचा शिलेदार होतो, तेव्हा माझ्या बाहु–बलाने व शस्त्र–बलाने माझ्या कृत्यांचा लौकिक पसरला. पण आता मी एखाद्या पायउतार शागिर्दासारखा झालो आहे. मी माझे वचन पूर्ण केले तर माझ्या शब्दाला कीर्ती मिळेल. म्हणून मित्रा सँको, चालू लाग. आपण घरी जाऊ आणि उमेदवारीचे हे वर्ष घालवू. त्या निवृत्तीच्या काळात आपल्याला नवी शक्ती प्राप्त होईल आणि युद्धाचा व्यवसाय आपण पुनः चालू करू. त्याचे विस्मरण मला कधीच होणार नाही." सँको म्हणाला, "महाराज, दूरदूरचे दौरे काढण्यात मला आनंद वाटत नाही. घोड्याचे खूर कशाला झिजवायचे ? आपले हे चिलखत कोणत्या तरी झाडावर आपण टांगून ठेवू. दरोडेखोर आपल्या हत्यारांचे गाठोडे असेच टांगून ठेवतात. मी डॅपलच्या पाठीवर पुनः बसलो म्हणजे आपण तुमच्या इच्छेप्रमाणे वेगाने दौडत जाऊ, पण सारा प्रवास पायी करून मी सारे अंतर तोडू शकेन असे समजू नका. त्या बाबतीत आपण मला क्षमा केली पाहिजे."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, मुद्याला धरून तू बोललास. माझी हत्यारे, विजय–चिन्हे म्हणून, आपण टांगून ठेवू या आणि त्यांच्या खाली–किंवा जवळपास–झाडाच्या सालीवर आपण एक लेख कोरून ठेवू या. ओर्लँडोच्या शस्त्रांनी विजय मिळवून दिल्यानंतर जो लेख लिहिला, तोच आपण कोरू या. तो लेख असा—

"ओर्लँडोच्या संतप्त मुद्रेला
तोंड देण्यास जो धजत असेल,
त्यानेच हलवावीत ही हत्यारे--
दुसऱ्या कोणी हात लावू नये."

सँको म्हणाला, "मला जसा हवा तसा हा लेख आहे. आपल्याला रस्त्यावर रोझिनांट नको असता तर त्यालाही झाडावर टांगून ठेवणे चुकीचे होणार नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "आता मला दुसरा चांगला विचार सुचत आहे. चिलखत किंवा घोडा यांची विल्हेवाट अशी लावू नये. माझ्यासंबंधी असे कोणीही म्हणू नये–'उत्तम सेवेला वाईट बक्षीस.'" सँको म्हणाला, "ही म्हण योग्यच आहे. शहाणी माणसे म्हणतच असतात की, 'नाचता येईना अंगण वाकडे' आणि 'गाढवाचा दोष खोगीराकडे' असे म्हणू नये. आपल्या शेवटच्या कार्यात दोष आपला होता, म्हणून आपण स्वतःलाच शिक्षा करून घेतली पाहिजे. आपली सेवा करता करता झिजलेल्या, फुटलेल्या बिचाऱ्या चिलखतावर आपण आपला संताप ओतू नये. तसेच सुस्वभावी रोझिनांट या जनावराच्या मायाळूपणावर किंवा जरूरीपेक्षा ज्यांना अधिक चालावे लागते अशा माझ्या नाजूक पायांवर आपण आपला राग काढू नये."

त्या दोघांनी तो दिवस–आणि त्यानंतरचे चार दिवस–अशा प्रकारच्या संवादात घालविले. त्यांच्या प्रवासात अडथळा आणणारा एकही प्रसंग ओढवला नाही. पण पाचवे

दिवशी ते एका गावात गेले असताना त्यांना एका खानावळीच्या दाराशी पुष्कळ लोकांचा घोळका दिसला. सुटीचा दिवस असल्यामुळे ते मौजेसाठी तेथे जमले होते. त्यांच्याजवळ डॉन क्विक्झोट जाताच, एक गावकरी इतरांना उद्देशून बोलत असल्याचे त्यांनी ऐकले. तो म्हणत होता, "अरे, हे पाहा, या रस्त्याने ही दोन माणसे येत आहेत. त्यांच्यावर आपण या प्रकरणाचा निवाडा करण्याचे काम सोपवू या. त्यांना कोणताच पक्ष माहीत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मी ते काम मनापासून करीन. तुम्ही आपले प्रकरण मला योग्य प्रकारे सांगितले तर मी शक्य तितक्या न्यायबुद्धीने निवाडा देईन." गावकरी म्हणाला, "महाराज, आमचे प्रकरण असे आहे–आमच्या गावातील एक शेजारी इतका लठ्ठ आणि वजनदार आहे की, त्याचे वजन अकरा ॲरोबॅस–किंवा पावणे तीनशे पौंड ( दोहीचा अर्थ एकच )–आहे. याहून निम्म्या वजनाच्या दुसऱ्या गावकऱ्याला त्याने असे आव्हान दिले आहे की, माझ्याइतकेच वजन ठेवून शंभर पावले तू माझ्याबरोबर पळून दाखव. त्या आव्हान देणाऱ्या माणसाला लोकांनी विचारले, दोघांचे वजन सारखे कसे करता येईल ? तेव्हा त्याने उत्तर दिले, "सव्वाशे पौंड वजन असणाऱ्या माणसाने दीडशे पौंड वजनाचे लोखंड आपल्या खांद्यावरून न्यावे म्हणजे दोघांची वजने सारखी होतील." डॉन क्विक्झोट यांनी उत्तर देण्यापूर्वी सँको म्हणाला, "थांबा, महाराज. हे काम माझे आहे. राज्यपाल आणि न्यायधीश यांची कामे करून मी नुकताच परत आलो आहे, हे साऱ्या जगाला माहीत आहे. या संशयास्पद खटल्याचा निकाल मीच दिला पाहिजे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मित्रा सँको, तसे करण्यास मी तुला मनापासून परवानगी देतो. एखाद्या मांजराला भाकरीचा चुरा-देखील देण्यास मी लायक नाही. माझा मेंदू इतका सुन्न नि बेचैन झालेला आहे."

अशा प्रकारे सँकोला परवानगी मिळाल्यानंतर, तो कोणती शिक्षा देतो हे हे ऐकण्यासाठी सारे गावकरी आ वासून त्याच्याभोवती उभे होते. तो म्हणाला, "बंधूनो, हा लठ्ठ माणूस चुकत आहे. तो जे मागत आहे त्यात काहीच विवेक नाही, हे मी तुम्हाला सांगतो. मी सतत असे ऐकत आलो आहे की, ज्याला आव्हान दिले जाते, त्या माणसाने आपली शस्त्रे निवडावीत. त्याला अडचणीत टाकणारी किंवा त्याचा धिक्कार करणाऱ्या माणसावर मात करण्याचे कामी आड येणारी शस्त्रे तो निवडील असे मानण्यास काही कारण नाही. म्हणून माझा निवाडा असा आहे की, ज्या माणसाने आव्हान दिले आहे आणि जो इतका प्रचंड नि लठ्ठ आहे, त्याने आपल्याला योग्य वाटेल त्या जागचे, दीडशे पौंड मांस कापावे, तासावे, सोलावे किंवा छेदावे म्हणजे त्याचे वजन दुसऱ्या माणसाइतके होईल आणि ते दोघेजण समान भूमिकेवरून धावण्याची शर्यत चालवितील." ही शिक्षा ऐकणाऱ्या लोकांपैकी एकजण म्हणाला, "देवाशपथ हा माणूस स्वर्गातील साधु-संताप्रमाणे बोलला आहे. एखाद्या नीति-शास्त्राच्या पंडिताप्रमाणे त्याने निकाल दिला आहे. पण मी सांगतो की, या लठ्ठ माणसाचे प्रेम आपल्या मांसावर इतके आहे की, तो त्यातील तसूभरही भाग काढू

देणार नाही–मग दीडशे पौंडांची गोष्ट कशाला ? ” दुसरा गावकरी म्हणाला, “ तर मग उत्तम मार्ग म्हणजे त्यांना मुळीच पळू देऊ नये म्हणजे झाले. कृश माणसाने एवढे ओझे घेऊन नि पळून आपली पाठ दुखवून घेण्याचे धाडस करू नये आणि त्या लठ्ठ माणसाने आपले लाडावलेले मांस कापून टाकण्याचीही गरज नाही. म्हणून आपण पैजेची अर्धी रक्कम मद्यपानात खर्च करू या आणि उत्तम मद्य ठेवणाऱ्या उपाहारगृहात आपण या सभ्य माणसांना नेऊ या नि ‘जेव्हा पाऊस पडेल तेव्हा माझ्या अंगावर कांबळे घाला. ” डॉन क्विक्झोट म्हणाले, “ सभ्य गृहस्थहो, मी तुमचे आभार मानतो. पण मी येथे क्षणभरही थांबू शकत नाही. कारण, उदास विचार आणि संकटे यामुळे मी येथें थांबलो तर ते अशिष्टपणाचे दिसेल. म्हणून ती संकटे दूर करण्यासाठी मला विलक्षण वेगाने प्रवास केला पाहिजे. ” असे म्हणून त्यांनी रोझिनांटला टाच मारली आणि ते पुढे गेले. मागे राहिलेले लोक त्यांच्या विचित्र आकृतीची आणि त्यांच्या मोतद्दाराच्या ( सँकोला ते तसे मानत होते ) चर्चा करीत होते. एक गावकरी इतरांना म्हणाला, “ हा नोकर जर इतका शहाणा आहे, तर त्याच्या धन्याबद्दल आपण काय म्हणावे ? ” दुसरा म्हणाला, “ सॅलामॅंका येथे ते अभ्यास करण्यासाठी जात असतील तर; ते एका क्षणात सरन्यायाधीश होतील हे मी पैजेवर सांगतो. तसे होणे फार सोपे आहे. पुनः पुनः अभ्यास करायचा, कोणाची थोडीशी कृपा मिळवायची आणि नशीब पाठीशी असायचे. म्हणजे, त्या माणसाच्या ध्यानी–मनी नसताना एकदम एके दिवशी आपल्या पाठीवर न्यायाधीशाचा झगा किंवा आपल्या डोक्यावर धर्मगुरूची टोपी चढलेली त्याला आढळेल. ”

त्या दिवशी रात्री तो धनी व नोकर यांनी, उघड्या आकाशाच्या छताखाली, एका शेताच्या मध्यभागी, आपला मुक्काम ठोकला. दुसरे दिवशी ते प्रवासास निघाले असताना, हातात भाला किंवा शूल घेतलेला आणि गळ्यात चामड्याची पिशवी अडकविलेला एक माणूस पायी येत असलेला त्यांना दिसला. तो डॉन क्विक्झोटजवळ जेव्हा आला, तेव्हा धावत–धावत येऊन त्याने त्यांच्या उजव्या मांडीला घट्ट मिठी मारली. कारण, याहून वर तो जाऊ शकत नव्हता. त्याच्या मुद्रेवरून आनंद ओसंडत होता. तो म्हणाला, “ अहो, महाराज, ला मांचा येथील डॉन क्विक्झोट, आपण आपल्या किल्ल्यात पुनः येत आहात हे आमच्या ड्यूकसाहेबांना कळले तर त्यांना मनापासून केवढा आनंद वाटेल ! ते डचेससह अजून तेथेच आहेत. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ मित्रा, मी तुला ओळखत नाही. तू स्वतःच मला सांगितल्याशिवाय, तू कोण आहेस याची मला कल्पना करता येत नाही.” तो म्हणाला, “ माझे नाव टोसिलॉस आहे, मी ड्यूकसाहेबांचा नोकर आहे. डोन्ना रोड्रिगेझच्या मुलीसाठी आपल्याशी न लढणारा माणूस तो मीच. ” डॉन क्विक्झोट म्हणाले, “ धन्य आहे ! माझे वैरी असणाऱ्या मांत्रिकांनी त्या लढ्याचा मान मला मिळू नये म्हणून ज्याचे रूपांतर हुजऱ्यात केले, तो माणूस तूच असावास, हे शक्य आहे काय ? ” नोकराने उत्तर दिले, “ थांबा महाराज, त्याबाबतीत काही जादूटोणा नाही की

रूपांतर नाही. मी प्रथम तेथे गेलो तेव्हा जसा नोकर होतो, तसाच तेथून बाहेर पडता-नाही होतो. त्या तरुणीशी लग्न करण्याची मला इच्छा असल्यामुळे मी लढण्याचे नाकारले. पण माझी घोर निराशा झाली. कारण आपण गेल्यानंतर माझे धनी ड्यूकसाहेब यांनी मला आपल्या आज्ञेप्रमाणे मी वागलो नाही म्हणून खूप चोप दिला. शेवट असा झाला की, डोन्ना रोड्रिगेझ हिला आपले नशीब काढण्यासाठी दूर पाठविण्यात आले आणि तिच्या मुलीला एका मठात कोंडून ठेवण्यात आले. आता मी बार्सेलोनाला जात आहे. माझ्या धन्याने व्हाइसरॉयला दिलेल्या पत्रांचा गठ्ठा माझ्याजवळ आहे. पण महाराज, आपली इच्छा असल्यास आपण जेवण करा. माझ्याजवळ उत्तम मांसाचे अन्न आहे. ते थोडे तिखट आहे, हे मी कबूल करतो. पण ते नामी आहे. शिवाय माझ्याजवळ उत्तम चीज आहे. त्यामुळे ते मांस आपल्या घशाखाली उतरेल असे मी खात्रीने सांगतो."

सँको म्हणाला, "मी तुझ्या शब्दांवर विश्वास ठेवतो. मी अभिमानी माणूस नाही. सारे सोपस्कार आपण चर्चेवर सोपवू या आणि इंडिजमधील मांत्रिकांनी काही केले तरी, यथेच्छ दारू पिऊ या." डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, तू अत्यंत खादाड आहेस आणि जगात पूर्वी कोणी कधी झाला नसेल इतका मठ्ठ आहेस. अरे, तुला हे कळावयास हवे होते की, तुला हा जो माणूस दिसत आहे, तो मंतरलेला आहे आणि हुजऱ्याचा तोतया आहे. तुला योग्य वाटत असेल तर तू त्याच्याबरोबर राहा आणि आपली खादाड भूक शमव. मी पूर्वीप्रमाणेच हळुहळू दौडत जाईन." टोसिलॉसने स्मित केले आणि आपली बाटली आणि चीज गवतावर ठेवले. तो व सँको तेथे खाली बसले. नंतर मन-मिळाऊ भोजनभाऊप्रमाणे आपल्या पोटाला मानवेल असे त्या चामड्याच्या पिशवीत जे जे होते, त्या सर्वांचा चट्टामट्टा करीपर्यंत ते तेथून हालले नाहीत. त्यांना इतकी भूक लागली होती की, ते सारे पदार्थ पोटात रिचविल्यानंतर त्यांनी पत्राचा तो गठ्ठाही चाटला. कारण, त्याला चीजचा वास येत होता. अशा प्रकारे त्यांचे जेवण चालले असताना टोसिलॉस म्हणाला," या तुझ्या धन्याचे काय करावे हे मला कळत नाही. खरोखर त्याची गणना वेड्यात केली पाहिजे." सँकोने उत्तर दिले, "असे का म्हणतोस? तो कोणाचे देणे लागत नाही. तो प्रत्येकाचे पैसे देऊन टाकतो. विशेषतः जेथे वेडेपणा असतो, तेथे कोणाचेही देणे ठेवत नाही. त्यांच्याजवळ द्रव्याचा इतका साठा आहे की, या राज्यातील सर्वांत श्रीमंत माणूस तोच असेल, हे मला पुरे माहीत आहे. तसे मी त्याला सांगितले आहे. पण त्याचा काय उपयोग? धवलचंद्रांकित शिलेदाराने त्याची दुर्दशा केल्यापासून तो खचून गेला आहे." ती सारी कहाणी आपल्याला सांगण्याची विनंती टोसिलॉसने सँकोला केली. पण सँको म्हणाला, "माझ्यासाठी माझ्या धन्याला तिष्ठत ठेवणे योग्य होणार नाही. पुनः आपण भेटू तेव्हा मी तुला सारी हकिगत सांगेन."

असे म्हणून ते दोघे उठले. सँकोने आपले कपडे साफ केले आणि आपल्या दाढीत अडकलेले अन्नकण काढून टाकले. नंतर टोसिलॉसचा निरोप घेऊन व डॅपलवर बसून तो आपल्या धन्याला गाठण्यासाठी पुढे गेला. त्याचा धनी एका झाडाच्या सावलीत त्याची वाट पहात उभा होता.

◘ ◘

## प्रकरण ६७

# धनगर बनून ग्रामीण जीवन कंठण्याचा निश्चय डॉन क्विक्झोट यांनी कसा केला ? एक वर्षभर शस्त्रे धारण न करणे त्यांना अवश्य होते.

डॉन क्विक्झोट आपल्या पराभवापूर्वी फार उद्विग्न होते, पण पराभवानंतर त्याहून अधिक अस्वस्थ झाले. आपल्या सेवकाची वाट पहात ते जेव्हा एका झाडाखाली थांबले होते, तेव्हा मोहोळाकडे धाव घेणाऱ्या मधमाशाप्रमाणे, हजारो विचारांनी त्यांच्या डोक्यात गर्दी केली. केव्हा ते डल्सीनियाला जादूमुक्त करण्याच्या उपायाचे चिंतन करीत, तर कधी आपल्या अनैच्छिक निवृत्तीच्या काळात आपण आयुष्य कसे घालवावे, याचा विचार करीत. अशा तंद्रीत असताना सँको त्यांच्याकडे आला व म्हणाला, "अलम दुनियेत टोसिलॉस हा अत्यंत प्रामाणिक आणि सभ्य असा सेवक आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "सँको, तो खरा सेवक आहे असे तुला अजून वाटते काय ? डल्सीनियाचे रूपांतर एका खेडवळ तरुणीमध्ये कसे झाले आणि दर्पणांकित शिलेदाराचे रूपांतर पंडित कॅरॅस्कोमध्ये कसे झाले, हे तू विसरलास काय ? मला छळणाऱ्या दुष्ट बुद्धीच्या मांत्रिकांनी आपल्या पिशाच्चविद्येने हे सारे घडवून आणले, हे तुला माहीत नाही काय ? पण हे आपण बाजूस ठेवू. तू मला कृपा करून सांग की, आल्टिसिडोराचे काय झाले–माझ्या विरहामुळे ती शोक करीत बसली, की मी तिच्याजवळ असताना ज्या प्रेमभावना तिला छळीत, त्या तिने आपल्या हृदयातून काढून टाकल्या, हे तू टोसिलॉसला विचारले नाहीस का ?" सँको म्हणाला, "खरे सांगायचे तर माझे डोके दुसऱ्याच विचारात होते. त्यामुळे अशा मूर्खपणाच्या गोष्टीचा विचार मी केला नाही. महाराज, खरोखर यावेळी आपल्याला दुसऱ्या लोकांचे विचार–त्यातही त्यांच्या प्रेम–भावना–विचाराव्यात असे वाटते काय ?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "हे पहा, प्रेमा-मुळे होणारी कृत्ये आणि कृतज्ञतेचा परिणाम म्हणून होणारी कृत्ये–यात फार अंतर असते. एखादा माणूस प्रेमलुब्ध मुळीच नसेल, पण तो कृतघ्न असणार नाही, हे शक्य आहे. संभव आहे की, आल्टिसिडोराचे माझ्यावर प्रेम असेल, तिने मला रात्रीच्या तीन टोप्या अर्पण केल्या हे तुला माहीतच आहे. मी निघून आलो तेव्हा ती रडू लागली आणि तिच्या भावनेचा उद्रेक झाला. तिच्या अंगी विनय असला तरी तिने माझी निंदा केली, मला शिव्याशाप दिले आणि आपल्या भावनेला मोकळी वाट करून

दिली. माझ्यावर तिचे गाढ प्रेम होते याची ही सारी चिन्हे होत. सामान्यतः प्रेमिकांचा क्रोध शिव्याशापांच्या रूपाने प्रगट होतो. तिला काही आशा दाखवावी किंवा उंची देणग्या द्याव्यात, हे माझ्या शक्तीबाहेरचे होते. कारण मी सारे काही डल्सीनियासाठी राखून ठेवले आहे. शिलेदाराची संपत्ती म्हणजे त्याची कीर्ति. म्हणून आता मी त्या दुर्दैवी स्त्रीसाठी जे काही करू शकेन ते इतकेच की, डल्सीनियाच्या हक्कांना बाध न आणता तिचे स्मरण करणे. सँको, तू डल्सीनियाची फार मोठी हानी करीत आहेस. त्या बिचाऱ्या स्त्रीची दुःखातून सुटका होण्यासाठी तू जे तप करावयास हवेस, ते तू लांबणीवर टाकीत आहेस. आपल्या लाडावलेल्या ज्या कातडीचा सांभाळ तू इतक्या कद्रूपणाने करीत आहेस, ती तुझी कातडी लांडग्यांनी खाल्लेली पाहण्याची मला इच्छा आहे. तू इतक्या काळजीने जपून ठेवलेली कातडी किड्यामुंग्यांच्या तोंडी जाण्यापेक्षा लांडग्यांनी खाल्लेली काय वाईट ? ”

सँको म्हणाला, “महाराज, आपल्याला स्पष्टच सांगावयाचे म्हणजे माझ्या पाठीवर फटके बसल्याने मंतरलेल्या व्यक्तीवरील जादूचा प्रभाव कसा नाहीसा होईल, हे काही माझ्या डोचक्यात शिरत नाही. ‘तुमचे डोके दुखत असेल तर तुमच्या घोट्याला मलम लावा’ असे म्हणण्यासारखेच ते आहे. आतापर्यंत तुम्ही शिलेदारीच्या ज्या ज्या गोष्टी वाचल्या आहेत त्यामध्ये, फटके मारण्याने कोणाचे चेटूक नाहीसे झाले, असे तुम्ही वाचले नसेल असे मी शपथेवर सांगतो. हे पहा, जेव्हा वेळ येईल, माझे मन खुशीत असेल, तेव्हा मी मला शिक्षा करून घेईन. भिऊ नका. ” डॉन क्विक्झोट उत्तरले, “ तू तसे करावेस अशी माझी इच्छा आहे. आपल्या मालकिणीचे दुःख नाहीसे करणे हे आपले किती कर्तव्य आहे, हे समजण्याची अक्कल परमेश्वर तुला देवो. कारण ती जशी माझी आहे, तशीच व त्यामुळेच ती तुझीही आहे. कारण तू माझा आहेस. ”

अशा तऱ्हेने बोलत बोलत ते एका ठिकाणी आले. तेथे त्यांच्या अंगावर पूर्वी बैल धावून गेले होते. ते आठवून डॉन क्विक्झोट म्हणाले, “सँको, ते पलीकडे कुरण आहे ना ? तेथेच आपल्याला सुंदर धनगरिणी आणि शूर धनगर भेटले. त्यांना आदर्श ग्रामीण जीवन पुनः निर्माण करण्याची किंवा त्याचे अनुकरण करण्याची इच्छा होती. खरोखर ती कल्पना अभिनव आणि कल्पकतापूर्ण होती. तुला जर ती चांगली वाटली असेल तर आपण त्यांचा कित्ता गिरवू आणि धनगर बनू– निदान शिलेदारीचा व्यवसाय ज्या काळात मला बाजूस ठेवावा लागत आहे, त्यापुरते तरी. मी शेळ्यांचा कळप विकत घेईन आणि ग्रामीण जीवनाला योग्य असे सर्व काही खरेदी करीन. नंतर मी स्वतःला क्विक्सोटिस धनगर व तुला पॅन्सिनो धनगर असे म्हणवून घेईन. मग आपण रानावनात भटकत राहू, डोंगर-दऱ्यात हिंडत राहू, कविता करीत आणि त्या गात गात फिरत जाऊ. आपण स्फटिकांसारखे पाणी पिऊ–कधी झऱ्यांचे तर कधी झुळु-झुळू वाहणाऱ्या ओढ्यांचे, तर कधी वेगाने धावणाऱ्या प्रवाहांचे. ओक, कॉर्क व चेस्टनट

ही झाडे आपल्याला निवारा आणि अन्न दोन्ही देतील. वाळुंजीची झाडे आपल्याला सावली देतील. गुलाबाची झुडुपे आपला मधुर स्वाद देतील. प्रशस्त कुरणे हे आपले गालिचे बनतील–आणि त्यात सर्व प्रकारचे विविध रंग असतील. अत्यंत शुद्ध हवा आणि अनिर्बंध जीवन यांचा लाभ झाल्यामुळे आपल्याला आरोग्य व स्वातंत्र्य मिळत राहील. चंद्र आणि तारे या आपल्याला रात्रीच्या मेणबत्त्या होतील आणि त्यांचा प्रकाश आपल्या संध्याकाळच्या सहलीवर पडेल. आपल्या हृदयातील आनंदामुळे आपण मजेत असू आणि मजेत आपण गात असू. प्रेमामुळे आपल्याला (काव्याचे) विषय व बुद्धि प्राप्त होईल आणि अपोलो आपल्याला सुस्वर गीते रचावयाची प्रेरणा देईल. त्यामुळे, आपण जिवंत आहो तोपर्यंतच नव्हे तर, आपल्या काव्याइतकेच आपण शाश्वत स्वरूप मिळवू आणि सुविख्यात होऊ."

सँको म्हणाला, "असे आयुष्य माझ्या रोमरोमात भिनते. मला वाटते, पंडित सॅम्सन कॅरॅस्को आणि मास्टर निकोलस यांना जर अशा आयुष्याचे फक्त एकदाच ओझरते दर्शन झाले असते, तर तेसुद्धा धनगर बनले असते. पाद्री त्यांच्यापैकीच एक झाला नाही तर बरे होईल. कारण तो फार थट्टेखोर आहे आणि त्याच्या मनाचा कल मौज करण्याकडे आहे." डॉन क्विक्झोट म्हणाले, "तू हा चांगला विचार केला आहेस. तो पंडित जर आपल्यापैकी एक झाला–तो होईल यात मला काडीमात्र शंका वाटत नाही– तर त्याने सॅम्सोनिनो किंवा कॅरॅस्कॉन असे नाव घ्यावे आणि पूर्वी म्हाताऱ्या बोस्कनने घेतले, ते नेमोरोजो हे नाव मास्टर निकोलस निकुलोसो याने घ्यावे. पाद्रीबुवांना आपण कोणते नाव द्यावे, हे मला नीट कळत नाही. फार तर आपण त्यांना कुरिअँब्रो म्हणावे. आता ज्यांच्या प्रेमात आपण पडले पाहिजे, त्या धनगरिणींना नावे शोधण्यात आपण हार खाता कामा नये. आपण निवडावीत आणि घ्यावीत अशी पुष्कळ नावे आहेत. माझ्या हृदयस्वामिनीचे नाव राजकन्येप्रमाणेच धनगर–कन्येला अयोग्य नाही. म्हणून त्याहून चांगले नाव शोधण्याची तसदी मी घेणार नाही. तू आपल्या स्वामिनीला इच्छेप्रमाणे कोणत्याही नावाने हाक मार."

सँको म्हणाला, "माझ्या बायकोसाठी टेरेसोना याशिवाय दुसरे नाव मला सुचत नाही. हे नाव तिच्या लठ्ठ शरीराला चांगले शोभून दिसेल. आणि तिच्या मूळच्या ख्रिश्चन नावावरूनच ते घेतले आहे. म्हणून जेव्हा जेव्हा मी तिचा उल्लेख माझ्या कवितामध्ये करीन, तेव्हा ती माझी बायको आहे हे प्रत्येकाला ओळखता येईल. आणि मग सर्वजण माझ्या प्रामाणिकपणाची वाहवा करतील.दुसऱ्या माणसाचे कुलूप तोडणारा मी नव्हे असे ते ओळखतील. चांगला किस्सा घालून द्यावा म्हणून, पाद्रयाने धनगरिणीशिवाय संतोष मानावा. पंडिताला नवे नाव घेण्याची इच्छा असेल तर त्याला स्वतःला निवड करू द्यावी." डॉन क्विक्झोट म्हणाले, "किती धन्य आहे मी! कोणते जीवन घालविणार आपण! वेळूंचे संगीत आणि स्पेनमधील झामोरा शहराचे संगीत आकाशात निनादत असलेले आपल्या कानी पडेल. पखवाज, नृत्यघंटा आणि दिलरुबा यांचे किती विलक्षण

मिश्रण होईल! त्या विविध वाद्यांमध्ये आलबोगेची भर पडली तर आपल्याला सर्व प्रकारचे ग्रामीण संगीत ऐकावयास मिळेल." सँकोने विचारले, "हे आलबोगे काय आहेत? माझ्या आयुष्यात मी ते कधी पाहिल्याचे किंवा ऐकल्याचे आठवत नाही." डॉन क्विक्झोट म्हणाले, "पितळेच्या पत्र्यापासून तयार केलेली आणि मेणबत्तीसारखी वाटोळी असलेली ती एक प्रकारची वाद्ये आहेत. त्यातील एक दुसऱ्यात शिरले म्हणजे छिद्रे निर्माण होतात अन् त्यातून विचित्र आवाज निघतो. तो फारसा सुस्वर किंवा संतोषदायक नसला तरी न आवडण्यासारखा नसतो. पण सनई व पखवाज या गावढळ वाद्यांना तो चांगला शोभून दिसतो. त्याचे नाव मूर भाषेतून आलेले आहे. आल्मोझा, आल्मोरसार, आलहोम्ब्रा, अलगासिल्, आल्सेमा, आल्मेसेन, आल्कॅन्झिया वगैरे ज्या नावांची सुरुवात स्पॅनिश भाषेत 'आल्' ने होते ते सर्व शब्द मूर भाषेतील आहेत. ते शब्द फार नाहीत. 'ई' ने शेवट होणारे तीन मूर शब्दही आपल्या भाषेत आहेत. ते म्हणजे बोर्सेकी, झॅकिकेमी व मॅरॅव्हेडी. आल्हेली व आल्फेकी या दोन शब्दांचा आरंभ 'आल्'ने होतो आणि शेवट 'ई' ने होतो म्हणून ते अरबी मानले जातात. तू आलबोगेसंबंधी विचारलेस म्हणून माझ्या डोक्यात जे काही आले, ते तुला जाता जाता सांगितल्याशिवाय मला राहवले नाही. आपल्या नव्या जीवनाला पूर्णता आणण्याचे कामी ज्या एका गोष्टीचा पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे, ती म्हणजे काव्य. काव्याकडे माझा थोडाबहुत कल आहे, हे तुला माहीत आहे. पंडित कॅरॅस्को हा एक अत्यंत सिद्ध कवी आहे. पाद्र्यासंबंधी काहीच बोलावयास नको, तरी तो काव्यात लुडबुड करतो, हे मी पैजेवर सांगतो–आणि तसाच मास्टर निकोलस हाही आहे हे सांगण्याचे धाडस मी करतो. तुझे सारे न्हावी लोक पट्टीचे गवई आहेत. मी विरह–गीत गाईन, तू आपल्या निष्ठेचे व भक्तीचे गौरव–गीत गाशील. कॅरॅस्कॉन धनगर आपल्या प्रियतमेने केलेल्या आपल्या धिक्काराचे शोकगीत गाईल आणि कुरिॲम्ब्रो आपल्या इच्छेप्रमाणे कोणताही विषय घेईल. अशा प्रकारे साऱ्या गोष्टी मनासारख्या होतील."

सँको म्हणाला, "हाय रे दैवा! किती मी दुर्दैवी! हे भाग्याचे दिवस पाहण्यास मी जिवंत असणार नाही अशी भीति मला वाटते. लोणी आणि साय मी किती चवीने चाटीन! माझ्या खिशात लाकडी चमचा ठेवल्याशिवाय मी कधी राहणार नाही. त्यापैकी कित्येक चमचे मी बनवीन. किती तरी माळा आणि ग्रामीण जीवनातील तऱ्हेतऱ्हेच्या वस्तू मी बनवीन! त्यामुळे मी शहाणा आहे असे ठरणार नाही, पण डोकेबाज आहे असे तरी लोक मला मानतील. माझी मुलगी सँकिका शेतावर आमचे जेवण घेऊन येईल. पण थांबा. तिची काळजी घेतली पाहिजे. ती एक सुंदर तरुणी आहे आणि काही धनगर मूर्ख असण्यापेक्षा दुष्ट असतात. माझ्या मुलीने लोकर आणण्यासाठी जावे आणि स्वतःचीच लोकर गमावून घरी यावे हे मला खपणार नाही. शहराप्रमाणेच शेतातही प्रेमाची आणि दुष्टपणाची कृत्ये होत असतात–राजाच्या राजवाड्याप्रमाणे धनगराच्या झोपड्यातही ती होतात. कारण काढून घ्या म्हणजे कार्य होण्याचे थांबते. जे

डोळ्यांनी पाहिले नाही, त्यासाठी पश्चात्ताप करण्याची पाळी हृदयावर येत नाही. पायाची एक जोडी हातांच्या दोन जोड्यावरोबर असते. आपण नजर ठेवली पाहिजे आणि प्रार्थना केली पाहिजे.

डॉन क्विक्झोट म्हणाले,“अरे सँको, पुरेत या म्हणी. त्यांच्यापैकी एका म्हणीनेही आम्हाला तुझ्या म्हणण्याचा अर्थ कळेल. तू आपल्या म्हणींची उधळपट्टी इतकी करू नकोस असे मी तुला वारंवार सांगितले आहे, पण ते सारे व्यर्थ गेले–अरण्य–रुदन ठरले. माझी आई मला बडवते आणि मी दुसऱ्याला बडवतो.” सँको म्हणाला, “ असे म्हणणे म्हणजे, गाडग्याने मडक्याला काळे म्हणण्यासारखे आहे. म्हणी उच्चारल्याबद्दल तुम्ही माझी हजेरी घेता, पण तुम्ही स्वतः एकाच वेळी दोन–दोन म्हणी बाहेर काढता.” डॉन क्विक्झोट म्हणाले,“ हे पहा सँको, मी ज्या म्हणी वापरतो, त्या मुद्याला धरून असतात. पण तू त्याना हातापायांना धरून खेचून आणतोस. त्यामुळे त्यांनाही कमीपणा येतो अन् तुलाही. पण यासंबंधी यावेळी आणखी काही बोलावयास नको. आता उशीर होत चालला आहे. आपण रस्त्यावरून जरा दूर जाऊ या आणि पलीकडच्या शेतात आसरा घेऊ या. उद्याचा दिवस नवा असेल. ”

त्याप्रमाणे त्यांनी केले. त्यांचे जेवण फारच किरकोळ स्वरूपाचे होते. ते सँकोला मुळीच आवडले नाही. त्यामुळे शिलेदारीच्या कष्टाचे विचार त्याच्या डोक्यात पुनः आले. डॉन डीएगो, कॅमेची व डॉन अँटोनिओ यांच्या घरी केव्हा केव्हा त्याचा चांगला पाहुणचार झाला होता. तसा तो पुन्हा व्हावा अशी त्याला इच्छा झाली. पण त्याने शेवटी विचार केला की, नेहमीच हवा चांगली नसते की वाईट नसते. म्हणून तो सकाळपर्यंत विश्रांती घेत राहिला. त्याचा धनी नेहमीप्रमाणेच तरल कल्पनांमध्ये गुंग होऊन गेला.



## प्रकरण ६८

# डुकरांचा पराक्रम

रात्र चांगलीच काळोखी होती. चंद्र आकाशात अजून आपल्या आसनावर विलसत होता. पण त्याचा प्रकाश अशा भागात पडत होता की, त्यामुळे तो आम्हाला अदृश्य होता. चंद्र-कला कधी पृथ्वीच्या या टोकास, तर कधी त्या टोकास वळत होती. आणि अंधारात बुडालेल्या डोंगर-दऱ्या चंदाराणीच्या विरहाबद्दल विलाप करीत होत्या. आपली पहिली झोप झाल्यानंतर डॉन क्विक्झोट दुसऱ्या झोपेच्या मोहाला वश झाले नाहीत. कारण त्यांना सारी सृष्टी चांगली टवटवीत झालेली दिसली. सँकोनेही दुसऱ्या झोपेचा उपभोग घेतला नाही. पण त्याचे कारण भिन्न होते. नेहमी तो सर्व रात्रभर एकच डुलकी घेत असे. कारण त्याचे शरीर भरभक्कम होते आणि त्याच्या मनाला चिंता करण्याचा कधी अनुभव नव्हता. डॉन क्विक्झोट यांच्या मनावर मात्र चिंतांचा भार प्रचंड असे.

शिलेदारजींनी आपल्या सेवकाला तो जागा होईपर्यंत गदगदा हालविले आणि म्हटले, "अरे सँको, तुझ्या निर्बुद्ध स्वभावाचे मला मोठे नवल वाटले. तू संगमरवरी दगडातून किंवा टणक पितळेतून घडविला असावास रे खचित. म्हणूनच तुझ्या मनात भावनांची काही हालचाल नाही. अरे, मी जागा असतो तेव्हा तू निजलेला असतोस, मी शोक करीत असतो तेव्हा तू गात असतोस आणि जेव्हा उदरभरणाची काही सोय नसल्यामुळे मी मूर्च्छित पडतो, तेव्हा तू केवळ खादाडपणामुळे सुस्त आणि अस्ताव्यस्त पडलेला असतोस; अरे, आपल्या धन्याच्या दुःखात सहभागी होणे हे चांगल्या सेवकाचे लक्षण होय. पहा, पहा, रात्रीची ही निःस्तब्धता पहा आणि आपण ज्या स्थळी आहोत त्याची एकांतता पहा. सुस्ती आणि निष्क्रिय विश्रांती यामुळे हे निसर्ग-सौंदर्य पहाण्याची संधी दवडणे ही खरोखर कीव येण्यासारखी गोष्ट आहे. अरे लाजेकाजेने तरी ऊठ जरा आजूबाजूला पहा. मोठ्या डौलाने नि आनंदी अंतःकरणाने डलसीनियाला जादूमुक्त करण्यासाठी तुझ्या पाठीवर तीनचारशे फटके मला ओढू दे; ही माझी तुला कळकळीची विनंती आहे. या बाबतीत मी तुझ्याशी पुनः कधीच कठोरपणे न वागण्याचा निश्चय केला आहे. तू स्वतः कोणाच्याही अंगावर, प्रसंगविशेषीसुद्धा, जोराने हात टाकणार नाहीस, हे मी कबूल केले पाहिजे. फटक्यांचा कार्यक्रम उरकला म्हणजे आपण रात्रीच्या उरलेल्या काळात गाणी गात बसू-मी विरहाची आणि तू निष्ठेची गाणी गा. मग आपण घरी जो ग्रामीण उद्योग करणार आहो त्याचा अभ्यास करू."

सँकोने उत्तर दिले, " महाराज, तुम्ही मला काय भिक्षू किंवा साधू समजता, की मी मध्यरात्री उठावे आणि अशा प्रकारे स्वतःला शासन करून घ्यावे ? एका क्षणी मी माझी पाठ बडवून घ्यावी आणि हुळहुळी करावी, पण दुसऱ्या क्षणी मी गात सुटावे, ही सोपी गोष्ट आहे असे आपल्याला वाटते काय ? हे पाहा महाराज, या फटक्यांच्या बाबतीत आता एकही अधिक शब्द बोलू नका. माझे माझ्या शरीरातील मांसावर प्रेम आहे. म्हणून आपल्याला न आवडणारी एखादी बेफाम शपथ मला घ्यावी लागेल. मग मी माझा नुसता कोट झाडल्याने तुमचे कल्याण होणार असले तरी मी ते करणार नाही–मग चामडी लोळविण्याची बातच सोडा ! मला पुनः झोपी जाऊ द्या. "

डॉन क्विक्झोट ओरडले, " अरे, हट्टी माणसा ! हे पापी सेवका ! तुला इतके खाऊ-पिऊ घातले आणि देणग्या दिल्या, ते सारे फुकट ! अरे, मी तुला एक राज्य मिळवून दिले आणि सरदारकी–किंवा तसेच काही मिळवून देण्याचा माझा चांगल विचार होता. आपल्या अज्ञातवासाचे हे वर्ष संपले की, मी तसे करण्याचे अभिवचन तुला देतो. सारांश, ' अंधारानंतर आशेचा प्रकाश पडतो. " सँको म्हणाला, " ते मला काही कळत नाही. मला एवढेच कळते की, मी जेव्हा झोपलेलो असतो तेव्हा मला आशा किंवा निराशा काहीच माहीत नसते–तेव्हा मी दुःखापासून मुक्त असतो आणि कीर्तीची जाणीवही मला नसते. अशी ही निद्रा ज्याने प्रथम शोधून काढली, त्याला धन्यवाद ! एखाद्या अंगरख्याप्रमाणे ही निद्रा माणसाच्या सर्व अंगाला–त्याच्या विचारांना-सर्वांना झाकून टाकते. निद्रा म्हणजे, भुकेल्याला मेजवानी, तहानलेल्याला दारू, गारठलेल्याला ऊब आणि तापलेल्याला थंडी आहे. झोप हे एक चलनी नाणे आहे. त्यामुळे जगातील सारी सुखे स्वस्तपणे विकत घेता येतात. राजा व धनगर, वेडा व शहाणा हे सारे निद्रेमुळे समान पातळीवर येतात. माझ्या डोक्यात कोणी तरी एक विचार कोंबला आणि केवळ त्यामुळेच मला झोप आवडेनाशी झाली. तो विचार म्हणजे, झोप मृत्यूसारखी असते. पहिली झोप घेणारा माणूस आणि शेवटची झोप घेणारा माणूस यांच्यामध्ये फारच थोडे अंतर असते. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, फारच सुंदर बोललास. आतापर्यंत तुझ्याकडून मी जे जे काही ऐकले, त्या सर्वावर तू ताण केलीस. त्यामुळे तुझ्याच एका म्हणीची यथार्थता मला पटत आहे. ती म्हण म्हणजे ' जन्म महत्त्वाचा, पण संगोपन अधिक महत्त्वाचे. " सँको म्हणाला, " धनीसाहेब, आता म्हणी गुंफणारा मी एकटाच राहिलो नाही. माझ्यापेक्षा अधिक जल्दीने तुम्ही त्या गुंफता, असे मला वाटते. आता आपणा दोघांमध्ये मला कोणताच फरक दिसत नाही. फक्त एक फरक आहे–तो म्हणजे तुमच्या म्हणी योग्य वेळी येतात, आणि माझ्या अवेळी येतात. पण ते काहीही असले तरी, म्हणी त्या म्हणीच. "

अशा प्रकारे त्यांच्या गप्पागोष्टी चालू असताना त्यांच्या कानावर एक घोगरा व रेकल्यासारखा आवाज पडला आणि ते चपापले. तो आवाज आजूबाजूच्या साऱ्या दऱ्यात घुमत होता. तत्काळ डॉन क्विक्झोट आपल्या पायावर उभे राहिले आणि

आपल्या तलवारीला त्यांनी हात घातला. सँकोने आपल्याभोवती ताबडतोब तटबंदी उभी केली. एका बाजूला त्याने चिलखताचे गाठोडे ठेवले आणि दुसऱ्या बाजूचा बंदोबस्त करण्यासाठी गाढवाचे खोगीर ठेवले. नंतर शरीराचे गांठोडें करून, डॅपलच्या पोटा-खाली, तो धापा टाकीत बसला. त्याच्या धन्याला जितके आश्चर्य वाटले होते, तितके त्याला भय वाटले. क्षणोक्षणी गोंगाट वाढत चालला. कारण, गोंगाट करणारी कारणे जवळ येऊ लागली. त्यामुळे निदान एकाच्या मनात तरी धडकी भरली. दुसऱ्याचा पराक्रम किती आहे हे सर्वांना माहीत होते.

प्रसंग असा होता--एका जत्रेसाठी काही माणसे सुमारे सहाशे डुकरांचा कळप घेऊन जात होती. त्या बाणेरड्या डुकरांच्या वेगवेगळ्या स्वरांनी असा काही भयंकर आवाज होत होता की, त्यामुळे डॉन क्विक्झोट व सँको दोघेही सुन्न झाले होते. तो आवाज कोठून येत आहे याची त्यांना काही कल्पना करता येत नव्हती. शेवटी शिलेदारजी आपल्या सेवकासह त्यांच्या वाटेत उभे राहिले. तेव्हा ती उद्धट नि केसाळ जनावरे एकजुटीने त्यांच्याकडे धावत आली. माणसांची कदर त्यांना काहीच नव्हती. काही शिलेदारजींच्या पायात, तर काही सेवकाच्या पायात घोटाळू लागली–आणि त्यांनी धनी व सेवक या दोघानाही खाली पाडले. सँकोच्या तटबंदीचा तर त्यांनी उपमर्द केलाच; पण रोझिनांटलाही खाली फेकून दिले. अशा प्रकारे त्यांच्यावर तुटून पडल्या-नंतर ती डुकरे पुढे गेली आणि वाटेत येईल ते सारे त्यांनी उडवून लावले. मोठ्या विलक्षण वेगाने ती डुकरे धावत–तुडवत चालली होती आणि खोगीर, चिलखत, शिलेदार, सेवक, घोडा वगैरे सर्वांना फेकून देत होती. आपल्या पायावर प्रथम उभा राहणारा म्हणजे सँको. काय चालले आहे, हे आता त्याच्या ध्यानी आले. त्याने आपल्या धन्याकडे आपली तलवार उसनी देण्याची मागणी केली आणि शपथ घेऊन म्हटले, " या उर्मट डुकरांपैकी निदान पाच–सहांचा तरी फन्ना मी ताबडतोब पाडतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, " नको, नको, मित्रा, तसे करू नकोस. जाऊ दे त्यांना. मी अपराध केला म्हणून देवाने मला हा कमीपणा आणला. अरे, कुत्र्यांनी चावावे, गांधीलमाश्यांनी दंश करावा आणि भिकारड्या डुकरांनी पराभूत शिलेदाराला पायाखाली तुडवावे, ही शिक्षा योग्यच आहे. " सँको म्हणाला, " तसेच दंश करण्यासाठी माशा, चावण्यासाठी उवा आणि आमच्यासारख्या गरीबांची उपासमार करण्यासाठी भूक ईश्वराने निर्माण केलेली आहे. अशा पराभूत शिलेदाराच्या संगतीत राहिल्याबद्दल ही आम्हाला शिक्षा आहे. जर आम्ही सेवक लोक त्या शिलेदारांची मुले असतो किंवा कोणत्या तरी नात्याची असतो–मग तिसऱ्या–चवथ्या पिढीचे का आम्ही असू ना–तर शिलेदारांच्या शिक्षेचा काही भार आम्ही सोसावा असे थोडेफार म्हणता आले असते. पण पँझा-घराण्याचा क्विक्झोट–घराण्याशी काय संबंध ? जाऊ द्या. आपण आपल्या जुन्या जागी पुनः जाऊ या आणि जेवढी रात्र उरली असेल तेवढ्या काळात थोडी झोप घेऊ या. उद्याचा दिवस नवा असेल. "

डॉन क्विक्झोट म्हणाले, "झोप, सँको, झोप, तुझा जन्म झोपण्यासाठीच आहे. पण मी अजून जागा राहणार आहे. अरुणाने सूर्याचा प्रवेश क्षितिजावर घडवून आणी-पर्यंत जागे राहण्याचा आणि माझ्या विचारांना स्वैर-विहार करू देण्याचा माझा हेतु आहे. तुला न कळत काल रात्री मी एक छोटेसे प्रेम-गीत रचले आहे. ते गाऊन मी माझ्या भावना व्यक्त करणार आहे." सँको म्हणाला, "मला वाटते की, जो माणूस आपले डोके कविता करण्याकडे वळवू शकतो, तो फार फार मोठ्या दुःखात असू शकणार नाही. म्हणून आपल्या इच्छेप्रमाणे वाटेल तितका वेळ आपण कविता करीत बसा आणि मला शक्य तितका वेळ मी झोप घेत राहीन." असे म्हणून तो जमिनीवरच पहुडला. तसे करणे त्याला बरे वाटले. हात-पाय घट्ट आवळून तो गाढ झोपी गेला. कर्ज, जामिनक्या यांच्या-किंवा दुसऱ्या कोणत्याही-काळज्यांनी त्याच्या झोपेत व्यत्यय आणला नाही. उलट, डॉन क्विक्झोट एका बीच किंवा काक ( कोणते 'झाड, हे सिड् हॅमेटने नकी सांगितले नाही. ) झाडाच्या बुंध्याला टेकून गात राहिले. मधून मधून सुस्कारे सोडीत ते पुढील काव्य गाऊ लागले :--

## प्रेमाला उद्देशून गीत

"तुझ्या बंधनाचा साखळदंड ओढणाऱ्या दासाला किती प्रबळ दुःख
भोगावयास पाहिजे याचा जेव्हा जेव्हा मी विचार करतो,
तेव्हा हे प्रेमा, दुःखमुक्तीसाठी मी मृत्यूकडे जातो. तोच तुझ्यापासून
उपशम, जीवनाचा आणि दुःखाचा तोच परिहार.
पण जेव्हा, हाय ! जे मारण्याने बरे होईल याची खात्री मला वाटते
तेव्हा मरणात मला वाटणारे सुख माझ्या पुनर्जीवनाला
अमोघ संजीवनी ठरते.
याप्रमाणे जीवन दरक्षणाला मला मरायला लावते
आणि खुद्द मृत्यूच नवजीवन देऊ शकतो
मी निराश आणि यातनाग्रस्त होऊन पडतो
आणि ना खरोखर मरतो, ना जगतो."

हे शोकाकुल प्रेमगीत गात असताना त्यांच्या डोळ्यातून अश्रू आणि तोंडातून सुस्कारे निघाले. त्यावरून शिलेदारांनी आपला नुकताच झालेला पराभव आणि डल्सी-नियाचा विरह आपल्या मनाला फार लावून घेतला होता, असे दिसत होते.

आता दिवस उजाडला. सूर्याने सँकोच्या तोंडावर फेकलेल्या किरणांनी त्याला जागे केले. नंतर डोळे चोळीत आणि जांभया देत आणि आपले सुस्त अवयव ताणीत त्याने इकडेतिकडे पाहिले. तेव्हा आपल्या सामानासुमानाचा डुकरांनी किती विध्वंस केला आहे हे त्याला कळले. नुसत्या डुकरांच्या कळपाचे हे कृत्य नसून दुसऱ्या कोणत्या तरी सैतानाचे हे कृत्य असावे असे त्याला वाटले. सारांश, शिलेदारजी आणि सेवक, दोघेही

आपल्या प्रवासास पुढे निघाले. संध्याकाळ पडण्याचे सुमारास, त्यांना पाच-सहा घोडेस्वार आणि चारपाच पादचारी थेट आपल्याकडे येत असलेले दिसले. त्यांना पाहताच डॉन क्विक्झोट यांच्या अंतःकरणात विलक्षण कळ उठली आणि सँकोला डोक्यापासून पायापर्यंत कापरे भरले. कारण त्यांना असे दिसले की, या नवख्या लोकांजवळ भाले आणि ढाली आणि इतर युद्धाची हत्यारे आहेत. ती पाहून शिलेदारजी सेवकाकडे वळून म्हणाले, " यावेळी जर हत्यारे बाळगणे मला कायदेशीर असते आणि माझे हात स्वतंत्र असते-वचनबद्ध नसते—तर, अरे सँको, आपल्याकडे येणारी ही लष्करी तुकडी जवळ येत असलेली पाहून मला किती आनंद झाला असता! पण सध्याची माझी भीति नाहीशी होऊन आपल्या कल्पनेपेक्षा काही तरी चांगले कदाचित घडेल."

हे बोलणे होईपर्यंत, भाले घेतलेले ते घोडेस्वार त्यांच्या अगदी जवळ आले आणि एक शब्दही न बोलता त्यांनी भयप्रद रीतीने डॉन क्विक्झोट यांना वेढले. त्यांच्या भाल्यांची टोके त्यांच्या छाती-पाठीवर रोखलेली होती. पायी चालणाऱ्या एका माणसाने आपल्या तोंडावर आपले बोट ठेवून डॉन क्विक्झोट यांना सुचविले की, तुम्ही गप्प रहा. नंतर रोझिनांटचा लगाम धरून त्यांनी त्याला रस्त्यावरून दूर नेले. बाकीच्या पायदळाने सँको व डॅपल यांचा ताबा घेतला आणि त्यांना डॉन क्विक्झोट यांच्या मागोमाग निःस्तब्धपणे चालविले. या वर्तनाचे कारण काय, हे विचारण्याचा प्रयत्न डॉननी दोनतीनदा केला. पण त्यांनी आपले तोंड उघडताच त्यांच्या कंठातून आपल्या भाल्यांची फाळे आरपार नेण्याची शिपायांनी तयारी दाखविली. बिचाऱ्या सँकोची दुर्दशा अधिकच झाली. त्याने बोलण्यास प्रारंभ करताच एका पायदळवाल्याने आपल्या भाल्याने त्याला टोचले आणि डॅपललाही प्रसाद दिला—त्या बिचाऱ्या जनावराने ब्र काढण्याचेही मनात आणले नव्हते.

रात्र वाढत चालली आणि ते आपल्या गतीने चालू लागले. रात्रीच्या अंधारामुळे बंदीवान शिलेदारजींची आणि त्याच्या सेवकाची भीती वाढत गेली आणि प्रत्येक क्षणी पुढील किंवा तसेच काही दुसरे शब्द त्यांच्या कानांना सतावू लागले, "चला, चला, ट्रोगलोडाईटस्, गप्प बसा. बार्बेरियन गुलामांनो, आम्ही सूड घेणार! हे अँथ्रोपोफॅगी, कुरकुरू नका, हे सिथियन्स, तुमचे डोळे फुटोत, हे खुनी पॉलिफेम्युसेस—हे खादाड सिंहानो!" (सँकोला वाटले) "हे लोक आम्हाला कोणत्या नावानी हाक मारीत आहेत. ट्रोलोपाईटस् काय, बार्बर्स गुलाम काय, आणि अँड्र्यूहॉजपोडगी काय, सिटीकॅन्स काय आणि बर्फेमस् काय, या शब्दांचा आवाजच मला आवडत नाही. एका संकटावर दुसरे संकट आले. एखादा माणूस खाली पडला की लोक त्याला खाली खाली दडपतात. मला कोणी खरपूस मार दिला, तरी तो मी सोसेन आणि आनंदाने पळून जाईन." डॉन क्विक्झोटही त्याच्याइतकेच गोंधळलेले होते. त्यांच्या कठोर वर्तनाचे किंवा शिवराळ भाषेचे कारण त्यांना काहीच कळेना. त्यातून काही चांगले निघेल अशी आशाही नव्हती. शेवटी, अंधारात सुमारे तासभर चालून गेल्यानंतर, ते

सर्वजण एका किल्ल्याच्या दारापाशी आले. तो किल्ला ड्यूकचा आहे हे डॉन क्विक्झोट यांनी तत्काळ ओळखले. ते तेथे नुकतेच राहिले होते ना ! ते म्हणाले, " देव माझ्यावर कृपा करो ! हे मी काय पहात आहे ? हा राजवाडा सभ्यता आणि मानवता यांनी भरलेला नव्हता काय ? पण पराजित लोकांचे हे दुर्दैवच असते की, प्रत्येक वस्तू आपल्यावर संतप्त झालेली त्यांना दिसते. " नंतर त्या दोन बंदिवानांना किल्ल्यातील एका मोठ्या चौकात नेण्यात आले. तेथे त्यांना अशा विलक्षण गोष्टींची तयारी केलेली दिसली की, त्यामुळे त्यांचे भय आणि आश्चर्य एकदम वाढले. ते कसे, हे आपण पुढील प्रकरणात पाहू.



## प्रकरण ६९

# या सुप्रसिद्ध इतिहासाच्या सर्व प्रसंगामध्ये अत्यंत असामान्य व विलक्षण असा जो प्रसंग डॉन क्विक्झोट यांचेवर कोसळला, त्याचे वर्णन

सारे घोडेस्वार घोड्यावरून खाली उतरले आणि साऱ्या पायदळाने डॉन क्विक्झोट व सँको यांना आपल्या हातांनी पकडून त्यांना अंगणात नेले. मोठमोठ्या मेणबत्त्यांच्या घरात बसविलेल्या शेकडो मशालींनी ते अंगण उजळलेले होते आणि त्या चौकाभोवती असलेल्या साऱ्या सज्जामध्ये सुमारे पाचशे दिवे लावले होते. त्यामुळे रात्रीच्या काळोखात तेथे दिवस उजाडल्यासारखा दिसत होता. त्या चौकीच्या मध्यभागी एक थडगे होते. ते जमिनीपासून पाचसहा फूट उंच होते. त्यावर काळ्या मखमलीचा दफनाच्या वेळचा मोठा पडदा सोडलेला होता. त्याच्याभोवती चांदीच्या खोबणीत बसलेल्या शंभर पेटलेल्या मेणबत्त्या होत्या. त्या थडग्यात एका युवतीचे शरीर पडलेले होते. ती मृत असल्याचे दिसत होते. पण ती इतकी सुंदर होती की, साक्षात मृत्यू तिच्या मुखावर सुंदर दिसत होता. तिच्या मस्तकावर सुगंधी फुलांची माला ठेवलेली होती आणि जरतारी कापडाची उशी तिच्या मानेखाली होती. तिचे हात आपल्या छातीवर आडवे होते, आणि त्या हातात पाम वृक्षाची पिवळी फांदी दिसत होती. प्राचीन काळी अशी फांदी विजेत्यांचा विजय भूषविण्यासाठी उपयोगात आणीत असत. त्या चौकीच्या एका बाजूस, एक प्रकारचे नाट्यगृह उभारलेले होते. त्या नाट्यगृहात दोन माणसे खुर्च्यांवर बसलेली होती. त्यांच्या मस्तकावरील मुकुटावरून आणि त्यांच्या हातातील राजदंडावरून ते राजे असावेत--निदान तसे ते दिसत होते. त्या नाट्यगृहाच्या एका बाजूस, राजे ज्या पायऱ्या-वरून वर चढत त्यांच्या पायथ्याशी दोन खुर्च्या ठेवलेल्या होत्या. तेथे डॉन क्विक्झोट व सँको यांना नेण्यात आले आणि बसविण्यात आले. त्यांना नेणारे पहारेकरी सर्ववेळ गप्प होते आणि भयसूचक खुणा करून ते आपल्या कैद्यांना असे समजावीत होते की, तुम्ही गप्प बसा. पण अशी सूचना देण्याचे काहीच कारण नव्हते. कारण, त्यांचे आश्चर्य इतके मोठे होते कीं, ती सूचना नसती तरी त्यांच्या जिभा जागच्या जागी खिळलेल्या होत्या.

त्याचवेळी दुसरी दोन मोठी माणसे, आपल्या मोठ्या परिवारासह, रंगभूमीवर चढून आली आणि त्या दोन नाटकी राजांच्या शेजारी असलेल्या राजेशाही खुर्च्यांवर बसली. ती माणसे म्हणजे ड्यूक व डचेस आहेत, हे डॉन क्विक्झोट यांनी तत्काळ

ओळखले. त्यांच्या राजवाड्यात डॉन क्विक्झोट यांचा पाहुणचार थाटामाटाने झालेला होता ना ! पण त्यांना सर्वात मोठे आश्चर्य वाटले ते याचे की, थडग्यावरील प्रेत हे सुंदर आल्टिसिडोराचे आहे.

ड्यूक व डचेस वर येताक्षणीच डॉन क्विक्झोट आणि सँको यांनी त्यांना अत्यंत नम्रतेने अभिवादन केले. त्यांनीही आपले डोके किंचित खाली करून प्रतिसाद दिला. नंतर एक अधिकारी त्या चौकात आला आणि सँकोजवळ गेला. त्याने त्याच्या अंगावर काळ्या कापडाचा झगा घातला. त्यावर अग्नीच्या ज्वालांची चित्रे काढलेली होती. त्याची टोपी काढून घेऊन अधिकाऱ्याने त्याच्या डोक्यावर बिशपासारखी एक टोपी घातली. जाहीरपणे चौकशी करून ज्याला शिक्षा दिली जाते, अशा लोकांच्या डोक्यावर तशी टोपी घातली जाते. ती टोपी घालीत असतानाच तो अधिकारी सँकोच्या कानात कुजबुजला, "तुम्ही जर आपले तोंड उघडण्याचा प्रयत्न केला तर आम्ही तुमचे तोंडात बोळा कोंबू किंवा तुम्हाला अगदी ठार मारू." सँकोने स्वतःकडे आपादमस्तक पाहिले आणि अग्नी व ज्वाळा यांनी आपले सर्वांग वेढल्याचे पाहून तो चकित झाला. पण अजून आपण जळून खाक झालो नाही, म्हणून तो बेफिकीर राहिला. त्याने आपल्या डोक्यावरील नवी टोपी काढून घेतली, तेव्हा त्याला तिच्यावर भुताखेतांची चित्रे काढलेली दिसली. ती टोपी त्याने पुनः आपल्या डोक्यावर चढविली आणि तो मनात म्हणाला, "ज्याअर्थी या ज्वाळांनी मला जाळून टाकले नाही किंवा या भुतांनी मला पळवून नेले नाही, त्याअर्थी हे सारे ठीक आहे." डॉन क्विक्झोट त्याच्याकडे टक लावून पाहू लागले. आणि त्याचे विलक्षण स्वरूप पाहून त्यांना त्या साऱ्या भयप्रद परिस्थितीतही हसू आवरता आले नाही. त्या प्रगाढ शांततेमध्ये प्रत्येकजण मूक होता आणि प्रत्येकाची उत्कंठा शिगेस पोहोचली होती. अशा वेळी, त्या थडग्याच्या पोकळीतून आल्याप्रमाणे, पाव्याचा सौम्य व मोहक स्वर सर्वांच्या कानी पडला आणि त्यांना त्याने आनंदित केले. नंतर त्या पुतळ्याच्या मस्तकापाशी एक तरुण माणूस दिसू लागला. तो अत्यंत देखणा होता. त्याचा पोशाख रोमन पद्धतीचा होता आणि तो एक तंतुवाद्य वाजवीत होता. त्याच्या साथीने आणि अत्यंत मधुर स्वराने त्याने पुढील गीत गाईले :—

## आल्टिसिडोराचे शोक-गीत

"डॉन क्विक्झोटच्या उदासीन उपेक्षेला बळी पडलेली सुंदर आल्टिसिडोरा
येथे मृत पडली असताना साऱ्या वस्तू शोक करतात,
सारे सुख तिच्यासह लय पावते, आणि दुःखाची तणे
त्या गुणसुंदरीचे वस्त्र झाकून टाकतात.
तिच्या मुद्रेचे नि मनाचे सौंदर्य, तिची हताश प्रीति,
तिचे सुखशून्य दैव यांचे गाणे मी गाईन;
याहून सफाईदार कडवी रचून स्वतः ऑर्फिअसदेखील

तिच्या मोहकतेचे, प्रेमाचे, यातनाचे निवेदन करू शकणार नाही
आणि केवळ माझ्या जिवन्तपणीच त्या सुंदरीचे गुणगान होणार नाही.
तिची असीम स्तुति माझ्या अमर आवडीचा विषय आहे.
थंड समाधीत मृत्यु जेव्हा माझी जिव्हा बधिर करील
हे तेजस्विनी, तुझ्यासाठी माझ्या आत्म्याला कंठ फुटेल.
या चिंचोळ्या कोठडीतून माझा प्राण जेव्हा मुक्त होईल
आणि सावल्यांच्या सोबतीने शोक करीत अधोलोकी भटकेल,
तेव्हा विस्मृतीच्या लाटांवरूनही मी तुला उद्देशून गाईन
आणि खुद्द पाताळलोक दुःखात सहभागी होईल. ''

त्या दोन राजांपैकी एकजण म्हणाला, " पुरे, पुरे. हे स्वर्गीय गायका, आणखी काही गाऊ नकोस. आल्टिसिडोराच्या गुणांची गणती करणे किंवा तिच्या दुर्दैवाची कहाणी आम्हास सांगणे, हे काम कधीच न संपणारे आहे. अडाणी, गांवढळ लोकांना वाटते त्याप्रमाणे ती मेलेली नाही. कीर्तीच्या मुखात ती जिवंत आहे आणि ती या जगात पुनः यावी म्हणून जे प्रायश्चित्त सांगितलेले आहे, ते सँकोने घेतले, तर ती पुनः जिवंत होईल. म्हणून, हे ऱ्हॅडॅमँथस, पातालपुरीतील महान् न्यायाधीश आणि पातालेश्वर डिस्च्या अज्ञात छायेखाली माझ्यासमवेत कार्य करणाऱ्या सहकाऱ्या! मर्त्य मानवाला दैवाच्या आज्ञा अतर्क्य असतात, पण त्या तुला ज्ञात आहेत. म्हणून तू या युवतीला पुनर्जन्म येण्यासाठी दैवाच्या त्या आज्ञा तत्काळ घोषित कर आणि या खिन्न जगताला समाधान देण्यासाठी तिच्या पुनरागमनाचे सौख्य पुनरपि मिळण्यास विलंब लावू नकोस. ''

मिनॉसने आपले भाषण पुरे केले नाही तोंच ऱ्हॅडॅमँथस म्हणाला, " राजघराण्यातील श्रेष्ठ-कनिष्ठ, उच्च-नीच अधिकाऱ्यांनो आणि कार्यकर्त्यांनो, एकामागोमाग पुढे या आणि सँकोच्या हनुवटीला चोवीस हिसके द्या, त्याला बारा चिमटे घ्या आणि त्याच्या हातात व पृष्ठावर सहा खिळे ठोका. हा विधी पार पाडण्यावर आल्टिसिडोराचे पुनरुज्जीवन अवलंबून आहे. '' हे ऐकून सँकोला दम धरवेना. तो मोठ्याने ओरडला, " अरे, काय हे ? हे सारे करण्यास तुम्हाला मुभा देण्यापेक्षा मी आधीच तुर्क होऊन जाईन. माझ्या हनुवटीचे किंवा तोंडाचे असे हाल मी करू देणार नाही. अरे, माझे तोंड विद्रूप करणे आणि त्या तरुणीने पुनः जिवंत होणे याचा काय संबंध आहे ? त्यापेक्षा मी माझी बंदूक उचलून व बार उडवून तिला जागी केलेले काय वाईट ? डल्सीनियावर जादू केली गेली आहे आणि त्यापासून तिला मुक्त करण्यासाठी म्हणे मला फटके मारून घेतले पाहिजेत ! आणि आता येथे आल्टिसिडोरा कोणत्या तरी विकाराने खाली पडली आहे, तरीही बिचाऱ्या सँकोचे तोंड फाटले जाणार, त्याच्या चामडीत भोके पडणार आणि तिला किड्यापासून वाचविण्यासाठी त्याचे हात चिमटे घेतल्यामुळे काळे-निळे पडणार ! छेः छेः मुशाफिराच्या अशा चेष्टा तुम्ही करता कामा नयेत. सापळा

कोणता हे म्हाताऱ्या कुत्र्याला कळते."

ऱ्हॅडॅमॅथस मोठ्याने ओरडून म्हणाला, "अरे वाघा, शांत हो, शांत हो आणि गर्विष्ठ निम्रोड, कबूल हो– शांतपणे सारे सहन कर– नाही तर तू मरशील. तुझ्याकडून कोणत्याही अशक्य गोष्टीची अपेक्षा केली जात नाही. म्हणून आपल्या नशिबी कडक शिक्षा आल्याबद्दल कुरकुर करण्याचे सोंग करू नकोस. तुझ्या तोंडावर हिसके पडणारच, तुझ्या चामडीला चिमटे बसणारच आणि तुला या प्रायश्चित्ताच्या वेदना सोसाव्या लागणारच! हे न्यायाधिकाऱ्यांनो, चला चालू करा, माझी शिक्षा जारी करा, असे मी तुम्हाला बजावतो. नाही तर आपण जन्माला आल्याबद्दल तुम्हाला पश्चात्ताप करावा लागेल असे मी सांगतो. मी नेकीचा माणूस आहे." याच वेळी सहा म्हाताऱ्या दासी, एकीमागे दुसरी अशा मिरवणुकीने, चौकात आल्या. त्यांच्यापैकी चौघींच्या डोळ्यावर चष्मे होते. त्या सर्वांनी आपले उजवे हात वर उंच धरले होते. त्यावेळच्या पद्धतीप्रमाणे त्यांची मनगटे सुमारे चार इंच मोकळी होती आणि त्यामुळे त्यांचे हात अधिक लांब दिसत होते. त्या दृष्टीस पडताच सँकोने बैलाप्रमाणे डुरकाळी फोडली आणि तो म्हणाला, "तुमच्या इच्छेस येईल तशी माझी विल्हेवाट लावा. या किल्ल्यात पूर्वी माझ्या धन्याला जसा अनुभव आला तसे तुम्ही पोतेभर पिसाळलेली मांजरे माझ्या अंगावर सोडा, तीक्ष्ण कट्यारीने मला भोसका, लाल लाल तापलेल्या चिमट्यांनी माझ्या हाडातील मांस तोडून बाहेर काढा. ते सारे मी शांतपणे सहन करीन आणि आपणा सर्वांची सेवा करीन. पण या म्हाताऱ्या दासींनी माझ्या अंगावर आपले बोट ठेवण्यापूर्वी सैतानाने मला एकदम पळवून न्यावे." हे ऐकून डॉन क्विक्झोट यांनी आपले मौन सोडले आणि ते म्हणाले, "माझ्या मुला, धीर धर आणि या सर्व सत्ताधीशांना शरण जा. अरे, खरोखर तू देवाचे आभार मानले पाहिजेस, ते अशासाठी की, मंतरलेल्या माणसाला मुक्त करण्याची आणि मेलेल्या माणसाला थडग्यातून उठविण्याची देणगी देवाने तुला दिली आहे."

या वेळेपर्यंत त्या दासी सँकोपर्यंत येऊन पोचल्या होत्या. पुष्कळ आर्जवे केल्यानंतर त्याने शेवटी आपल्या जागी बसून राहण्याचे आणि त्या घातकी स्त्रियांच्या हाती आपले तोंड व दाढी देण्याचे कबूल केले. प्रथम त्याच्याकडे आलेल्या दासीने त्याला एक लहानसा हिसका दिला आणि अभिवादन केले. सँको म्हणाला, "श्रीमती सोवतीणबाई, फार सौजन्य नको की फार अतिप्रसंग नको. फॅराहोची शपथ घेऊन सांगतो. तुमच्या बोटांना दारूचा वास येत आहे." सारांश, त्या साऱ्या दासी आणि बहुतेक सारे सेवक तेथे आले आणि त्याला नाजूक चिमटे घेऊ लागले. ते सर्व त्याने अवर्णनीय शांततेने सहन केले. पण जेव्हा ते त्याला खिळ्यांनी टोचण्यासाठी पुढे आले, तेव्हा त्याला ते सहन होईना. तो वेगाने धावत सुटला आणि जवळच असलेली एक मशाल हिसकावून घेऊन ती त्याने गरगरा फिरविण्यास सुरुवात केली. त्यामुळे त्या साऱ्या स्त्रिया आणि इतरही त्याचे छलक पाय लावून पळाले. तो ओरडला, "थांबा, सैतानाच्या

बच्चांनो, थांबा. माझी पाठ पितळेची बनलेली आहे असे तुम्हाला वाटते काय ? तुमच्या धन्यासाठी हुतात्मा होण्याचा माझा मनसुबा आहे असे तुम्हास वाटते काय ? आग लागो तुम्हाला ! ”

त्याच वेळी आपल्या पाठीवर इतका वेळ पडून राहिल्याचा कंटाळ आल्यामुळे आल्टिसिडोरा एका कुशीवर वळू लागली. ते पाहताच सारे प्रेक्षक ओरडू लागले, “ ती जिवंत आहे, ती जिवंत आहे ! आल्टिसिडोरा जिवंत आहे ! ” नंतर ऱ्हॅडॅमँथसने सँकोला म्हटले, “ आता ही आश्चर्यकारक घटना घडून येत आहे–तिचा पुनर्जन्म होत आहे. तेव्हा तू शांत राहा. ” उलट, आल्टिसिडोरा हालचाल करू लागली आहे असे पाहून डॉन क्विक्झोट सँकोकडे गेले आणि गुडघे टेकून त्याला म्हणाले, “ अरे, माझ्या लाडक्या बाळा, आता मी तुला सेवक म्हणणार नाही. डल्सीनियाला जादूमुक्त करण्यासाठी तू फटके खाण्याची वेळ आता आलेली आहे. केवढा हा मंगल काल आहे ! तुझ्या त्वचेपासून ज्या चमत्कारांची अपेक्षा केली जाते, ते करण्यास तुझी त्वचा आता अत्यंत पक्व व लायक झालेली आहे. ” सँको म्हणाला, “ आगीतून निघून मी फोफाट्यात पडलो आहे. खरोखर, मी माझी डुकरे चांगल्याच बाजाराला आणली आहेत ! माझे नाक पिळले–पिरगळले गेल्यावर आणि माझ्या कुल्ल्यावर चांगली भोके पडल्यावर आणि माझे सर्व शरीर म्हणजे टाचण्याचे घर झाल्यावर मी स्वतःला फटके मारून घेतले पाहिजेत काय ? मला सोडण्याची तुम्हाला इच्छा असेल तर तुम्ही माझ्या गळ्यात एक मोठा धोंडा बांधून मला विहिरीत का सोडीत नाही ? एखाद्या भाड्याच्या तट्टांप्रमाणे माझ्यावर दुसऱ्या माणसांचे ओझे पावलोपावली लादण्यापेक्षा माझ्या आयुष्याचा शेवट एकदम का करून नाही टाकीत ? हे पाहा, अशा प्रकारासंबंधी तुम्ही मला आणखी एक शब्द बोलाल तर माझ्या शरीरातील सारी चरबी आगीत जाऊन पडेल हे खात्रीने समजा. ”

आता आल्टिसिडोरा थडग्यावर बसली. संगीत सुरू झाले. सारी वाद्ये वाजू लागली आणि सारे प्रेक्षक एकसुरात गरजू लागले, “ आल्टिसिडोरा जिवंत राहो, जिवंत राहो ! ” ड्यूक व डचेस उठून उभे राहिले आणि मिनोस् व ऱ्हॅडॅमॅन्थस, डॉन क्विक्झोट व सँको यांच्यासह आल्टिसिडोराचे स्वागत करण्यासाठी एकत्रितपणे पुढे गेले, आणि थडग्यावरून खाली उतरण्यासाठी त्यांनी तिला हात दिला. मूर्च्छा आल्याचे तिने सोंग केले. तिने ड्यूक व डचेस यांना आणि त्या दोन राजांना मुजरे केले पण डॉन क्विक्झोट यांच्याकडे तिरकसपणे पहात ती म्हणाली, “ अरेरे, एक हजार वर्षे मला परलोकाचा रहिवास ज्या पाषाणहृदयी देखण्या शिलेदाराच्या रानटीपणामुळे करावा लागला, त्याला प्रभू क्षमा करो ! ” सँकोकडे वळून ती म्हणाली, “ अलम दुनियेत नसेल इतका कनवाळू सेवक तू आहेस. तू मला मृत्यूपासून जीवनात आणलेस म्हणून तुला माझे धन्यवाद ! माझ्या उत्तम सहा अंगरख्यांचे सदरे मी तुला करून देईन. ते कोरे करकरीत नसले तरी आरशासारखे स्वच्छ आहेत. ” सँकोने आपली

टोपी काढली आणि जमिनीवर गुडघे टेकून तिच्या हाताचे चुंबन घेतले. त्याची टोपी त्याला परत द्यावी आणि त्या ज्वालांकित झग्याऐवजी त्याला त्याचा लोकरीचा कोट द्यावा असा हुकूम ड्यूकने सोडला. पण सँकोने त्यांना विनंती केली, "हा अंगरखा आणि ही टोपी आपण माझ्याजवळच राहू द्यावी. या विलक्षण साहसी कृत्याचे स्मारक म्हणून मी या वस्तू स्वदेशी घेऊन जाईन." त्या वस्तू त्याच्याजवळच ठेवाव्यात असे डचेसने सांगितले. ती नेहमी त्याच्याशी अत्यंत मित्रभावाने वागत असे. नंतर ड्यूकने आज्ञा केली की, सर्वांनी चौक मोकळा करावा आणि आपापल्या मुक्कामी जावे. तसेच डॉन क्विक्झोट व सँको यांना त्यांच्या खोल्यांकडे नेण्याची आज्ञा ड्यूकने केली.



## प्रकरण ७०

### हे प्रकरण ६९ व्या प्रकरणानंतर येते. या इतिहासातील घटना स्पष्ट करण्यासाठी अवश्य त्या पुष्कळ गोष्टी या प्रकरणात आहेत.

त्या दिवशी रात्री डॉन क्विक्झोट यांच्या खोलीत एका छोट्या खाटल्यावर सँको निजला. तेथे राहणे त्याला फारसे आवडले नाही. कारण आपला धनी सारी रात्र काही तरी त्रासदायक गप्पागोष्टी करून आपल्याला सतावून सोडील असे भय त्याला फार वाटत होते. त्या गप्पागोष्टींना तो फारसा अनुकूल नव्हता. त्याची नुकतीच जी परवड झाली होती, त्यामुळे तो काही बोलण्याच्या अवस्थेत नव्हता. एखाद्या झोपडीत गाढ झोपी जाणे हे त्याला त्रासदायक माणसाच्या संगतीत राजेशाही दालनात निजण्यापेक्षा अधिक सुखदायक होते. आणि त्याची भीती खरी ठरली. अंथरुणावर पाठ टेकताच त्याच्या धन्याने तोंड उघडले. तो म्हणाला—

" सँको, आज रात्री जे अचाट कृत्य घडले, त्याविषयी तुझे मत काय आहे ? तिरस्कारामुळे तीव्र झालेल्या प्रेमाची शक्ती महान आणि बलाढ्य असते. आल्टिसिडोराच्या मृत्यूमुळे या सिद्धांताची प्रचीती तुला आली असेल. तिला मृत्यू आला तो बाणाने, कट्यारीने किंवा एखाद्या विषाने नव्हे – तर केवळ तिच्या प्रेमाचा धिक्कार मी केला या भावनेने तिचे प्राणोत्क्रमण झाले. " सँकोने उत्तर दिले, " ती कोंबड्याच्या रोगाने मेली असती तरी मी त्याची पर्वा केली नसती. उलट तिच्यापासून मी मुक्त झालो असेच मानले असते. मी कधी तिची प्रणयाराधना केली नाही की साऱ्या आयुष्यात तिला कधी तुच्छ मानले नाही. आल्टिसिडोरासारख्या लहरी आणि चमत्कारिक स्त्रीचे आयुष्य आणि कल्याण सँको पँझाच्या छळावर अवलंबून असावे हे विलक्षण आहे असे मला वाटते. पण जगात जादूगार आणि चेटके असतात हे खचित. ईश्वर मला त्यापासून वाचवो ! मी काही केले असे मला वाटत नाही. पण महाराज, आता मला निजू द्या अशी मी विनंती करतो. आणखी प्रश्न विचारून आपण मला उच्छाद दिला, तर मी खिडकीतून उडी मारून बाहेर जाण्याचे ठरविले आहे. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " भल्या सँको, मी तुला उच्छाद देणार नाही. नुकत्याच झालेल्या यातनानंतरही तुला झोप येत असेल तर घे. " सँकोने उत्तर दिले, " माझ्या तोंडाचे जे हाल झाले, त्याच्याशी कोणत्याही यातनांची तुलना करता येणार नाही. कारण ते हाल अत्यंत दुष्ट स्वभावाच्या प्राण्यांनी– म्हणजे म्हाताऱ्या दासींनी– केले होते. सैतान त्यांना घेऊन जावो. निरोप

असावा. मला स्वस्थता मिळण्यासाठी चांगल्या झोपेची गरज आहे. म्हणून मी पुनः आपली प्रार्थना करतो की, मला निजू द्या." डॉन क्विक्झोट म्हणाले, "नीज जा, ईश्वर तुझ्या पाठीशी असो."

नंतर ते दोघे झोपी गेले. ते झोपले आहेत तोंवर, ड्यूक व डचेस यांनी जे विचित्र चेष्टा-प्रकार केले, आणि जे नुकतेच सांगितले गेले, त्यांचे हेतू काय आहेत हे सिड हॅमेट आपल्याला सांगत आहेत. ते म्हणतात–"दर्पणांकित शिलेदार म्हणून आपण गेलो असताना डॉन क्विक्झोट यांनी आपला जो पराभव केला, त्याचा सूड घेण्याचा विचार पंडित कॅरॅस्कोने केला आणि चांगले भवितव्य घडेल अशा आशेने दुसरा प्रयत्न करण्याचे त्याने ठरविले. सँकोच्या बायकोला ज्या नोकराने पत्रे व नजराणा आणून दिला, त्याच्याकडून त्याला डॉन क्विक्झोट कोठे आहे हे कळले होते. त्याने एक नवा घोडा आणि हत्यारे मिळविली आणि आपल्या ढालीवर पांढराशुभ्र चंद्र रंगवून घेतला. त्याचे सारे सामानसुमान खेचरावर बांधले गेले. आपला पूर्वीचा सेवक थॉमस सेसियल याला डॉन क्विक्झोट किंवा सँको ओळखेल असे वाटून, त्याने आपला सेवक म्हणून एक खेडवळ माणूस आपल्याबरोबर घेतला. ड्यूकच्या किल्ल्यात आल्यावर त्याला कळले की, सॅरॅगोसा येथील सामने पहाण्यासाठी शिलेदारजी गेले आहेत. सँकोच्या पाठीवर वळ बठवून डल्सीनियाला जादूतून मुक्त करण्याची युक्ती आपण किती गंमतीने शिलेदारजींच्या गळी उतरविली, याचा वृत्तांत ड्यूकने पंडिताला सांगितला. शेवटी त्याने त्याला असेही सांगितले की, जादूच्या शक्तीने डल्सीनियाचे रूपांतर गांवढळ मुलीत झाले आहे, यावर सँकोने आपल्या धन्याचा विश्वास बसविला. सँको खरोखर फसविला गेला आहे आणि डल्सीनियावर खरोखर जादू झालेली आहे हे डचेसने सँकोला पटवून दिले, ते ऐकून पंडिताला हसू आवरेना. तथापि सेवकाच्या अंगी असलेले चातुर्य व भोळेपण यांचे मिश्रण आणि त्याच्या धन्याचा असाधारण मूर्खपणा–हे पाहून त्याला आश्चर्याचा धक्का बसला. शेवटी ड्यूकने त्याला अशी विनंती केली की, "तुझी शिलेदारशींशी गाठ पडली तर परत आल्यावर मला भेट आणि तू त्याला जिंकलेस की नाहीस याचा वृत्तांत सांग."

ड्यूकची आज्ञा पालन करण्याचे पंडिताने वचन दिले आणि डॉन क्विक्झोट यांच्या शोधार्थ तो निघाला. सॅरॅगोसा येथे त्यांची गाठ पडली नाही, पण पुढे गेल्यावर शेवटी त्यांची गाठ पडली आणि त्यांच्यावर पंडिताने सूड उगविला, हे आम्ही आपल्याला सांगितलेच आहे. घरी जाताना तो ड्यूकच्या किल्ल्यात गेला आणि झालेल्या द्वंद्वयुद्धाच्या अटी व परिणाम यांचा वृत्तांत त्याने ड्यूकला निवेदिला. आता डॉन क्विक्झोट आपले वचन पूर्ण करण्यासाठी घरी परत जाणार आहेत आणि आपल्या खेड्यात वर्षभर राहणार आहेत–कारण तसे करणे शिलेदारीच्या अब्रूसाठी अवश्य होते–हे सारे त्याने ड्यूकला सांगितले आणि म्हटले, "या एक वर्षाच्या काळात हा बिचारा सालस माणूस पुनः ताळ्यावर येईल अशी मला आशा आहे. त्याच्यासारखा गुणी माणूस अशा

दुर्दशेत सापडलेला पाहून मला त्याची चिंता वाटत होती आणि केवळ त्या हेतूनेच मी या प्रयत्नाला हात घातला. आता मी घरी निघालो आहे. तेथे मी डॉन क्विक्झोटची वाट पाहीन. ते माझ्यापाठोपाठ येत आहेत." ही माहिती ऐकून ड्यूकने डॉन क्विक्झोटची आणखी गंमत करण्याची संधी साधावी असे ठरविले. शिलेदारजी व त्यांचा सेवक यांच्या विनोदाचा ड्यूकला कधीच कंटाळा येत नसे. त्याने सर्व रस्त्यावर–विशेषतः ज्या मार्गानी डॉन क्विक्झोट जाण्याचा फार संभव होता, त्यावर– आपल्या अनेक सेवकांनी पहारा ठेवावा आणि त्यांना, भल्याबुऱ्या कोणत्याही मार्गाने, किल्ल्यात आणावे असा हुकूम ड्यूकने सोडला होता.

त्या सेवकांची डॉन क्विक्झोटशी गाठ पडली. त्यांनी आपल्या धन्याला ते कळविले. तेव्हा त्यांच्या आगमनाची सर्व तयारी झाली. चौकातील साऱ्या मशाली व मेणबत्त्या पेटविण्याची व्यवस्था ड्यूकने केली. आल्टिसिडोराचा शोक–हास्य–संमिश्र प्रवेश रंग-विण्यात आला आणि त्यात सँको पँझाचा विनोद घालण्यात आला. ते सर्व चित्र इतके हुबेहूब जिवंत आहे असे वाटत होते की, हे सोंग आहे असे कोणालाच ओळखू आले नसते. ( सिड हॅमेट आणखी असे सांगतात की, ) ज्यांची सोंगे ते लोक करीत होते, त्याच्याइतकेच तेही वेडे होते. खुद्द ड्यूक व डचेस हेही वेडे समजले जाण्याच्या अवस्थेस पोहोचले होते. कारण, दोन गरीब व दुर्दैवी मूर्ख माणसांच्या व्यंगांची चेष्टा करण्यासाठी इतके कष्ट ते घेत होते.

आता आपण आपल्या दोन धाडसी वीरांकडे वळू या–एकजण सकाळी गाढ झोपी गेलेला होता अन् दुसरा आपल्या मोकाट कल्पनांनी उन्मत्त होऊन सताड जागा होता. जागे होण्याची वेळ झालेली आहे असे त्यांना–विशेषतः डॉन–यांना वाटले. जेता असो की जित असो, बिछान्यावर लोळत पडणे हे त्यांना कधीच मानवण्या-सारखे नव्हते

मृत्यूच्या अवस्थेतून आल्टिसिडोरा मुक्त होऊन उठली आहे असे डॉन क्विक्झोट समजत होते. ( आपल्या स्वामीला व स्वामिनीला खूष करण्यासाठी ) तिने त्या दिवशी आपल्या मस्तकावर पुष्पमाला धारण केली. तीच तिने थडग्यावर असताना घातली होती. जरतारी किनार असलेला, शुभ्र टॅफेटाचा सैल झगा तिने अंगात घातला. तिच्या विस्कटलेल्या केसांचे पुंजके तिच्या खांद्यावर स्वैरपणे रुळत होते. काळ्या काठीचा आधार घेऊन ती डॉन क्विक्झोट यांच्या खोलीत शिरली.

हे अकल्पित भूत पाहून शिलेदारजींना इतके आश्चर्य व नवल वाटले की, त्यांची वाचाच खुंटली. अशा वेळी कसे वागावे हे न कळल्यामुळे ते अंथरुणावरील चादरीमध्ये शिरले आणि स्वतःला त्यांनी डोक्यावरून झाकून घेतले. तथापि त्यांच्या बिछान्याच्या माथ्याशी असलेल्या एका खुर्चीवर आल्टिसिडोरा बसली आणि एक दीर्घ श्वास टाकून, सौम्य व क्षीण आवाजात म्हणाली, " जेव्हा माझ्यासारख्या गुणी आणि प्रतिष्ठित तरुणी नम्रतेचे नियम पायाखाली तुडवितात आणि कुमारिकेच्या सभ्यतेची पर्वा

करीत नाहीत, तेव्हा त्यांच्या दुर्दैवाची नि दुःखाची पराकाष्ठा कशी होते आणि त्यांना आपली जीभ स्वैर सोडून आपल्या हृदयातील गुप्त रहस्ये प्रगट कशी करावी लागतात, हे आपण पाहिले आहे. हाय, हाय ! ला मांचा येथील थोर डॉन क्विक्झोट, कामवासनेने पादाक्रांत झालेल्या दुर्दैवी माणसांपैकी मी एक आहे. पण मी माझे दुःख इतक्या शांतपणे आणि स्तब्धपणे सोसले आहे की, त्यामुळे माझे अंतःकरण मौनाने भंग पावले आणि माझे मौन अंतःकरणाने भग्न केले. हे अत्यंत निर्दय आणि पाषाण–हृदयी माणसा, तुझ्या निष्ठुर व क्रूर अशा वर्तनामुळे मला मृत्यू आला–किंवा असेच काही घडले की ज्यामुळे मला पाहणाऱ्या प्रत्येक माणसाला वाटले, मी मेले आहे. या गोष्टीला आता दोन दिवस झाले. जर प्रेम दयाळू नसते आणि या प्रेमळ सेवकाच्या यातनावर माझा पुनर्जन्म अवलंबून नसता तर मी परलोकात कायमची राहिले असते. ''

सँको म्हणाला, '' खरोखर, त्या कामासाठी प्रेमाला माझ्या गाढवाची निवड करता आली असती. आणि त्यामुळे माझ्यावर मोठे उपकार झाले असते. पण बाईसाहेब, आता मला कृपा करून एक गोष्ट सांगा. ( आणि माझ्या धन्यापेक्षा सुस्वभावी प्रियकर ईश्वर आपल्याला देवो ! ) परलोकात आपण काय पाहिले ? पापलोकात कोणत्या प्रकारचे लोक आहेत ? तेथे तुम्ही होता असे मी समजतो. कारण जी माणसे निराशेने मरतात, त्यांना त्या शीतमंडपात जावे लागते. '' आल्टिसिडोराने उत्तर दिले, '' तुम्हाला खरे सांगायचे तर, मी पूर्णपणे मेले होते असे मला वाटत नाही. कारण पापलोकापर्यंत जाऊन मी पोहोचले नव्हते. मी तेथे एकदा गेले असते तर तेथून बाहेर पडण्यास मला मुभा मिळाली नसती असे मला खात्रीने वाटते. पापलोकाच्या वेशीपाशी मी गेले होते हे खरे. तेथे मला पायजमे व जाकिटे आणि जळत्या रॅकेटनी टेनिस खेळणारी दहा–बारा पिशाच्चे दिसली. त्यांनी फ्लँडर्सचे, जरतारी किनारीचे पट्टे बांधलेले होते आणि त्यांची मनगटे चार इंच उघडी होती. त्यामुळे त्यांचे हात अधिक लांब दिसत होते. एकेकाच्या हातात जळती रॅकेटे होती. पण मला सर्वांत कशाचे आश्चर्य वाटले असेल तर, टेनिसच्या चेंडूऐवजी ती पुस्तकांचा उपयोग करीत होती. त्या पुस्तकात वारा किंवा केस अथवा अशाच काही सटरफटर गोष्टी भरलेल्या होत्या आणि ती पुस्तके अगदी हलकी होती. हे खरोखर अत्यंत विलक्षण आणि आश्चर्यकारक होते. पण त्याहून मला अधिक आश्चर्य याचे वाटले की, खेळाडू लोकांमध्ये जिंकणारा पक्ष आनंदी असतो आणि हरणारा पक्ष संतप्त असतो. पण या प्रथेविरूद्ध, पुस्तकांची फेकाफेक करणारे दोन्ही बाजूचे हे पापलोकचे खेळाडू एकसारखे असे धुमसत–चडफडत–आदळआपट करीत–शिव्याशाप देत–आणि अत्यंत भयंकर रीतीने आरडाओरड करीत होते की, जणू काही ते सारेजण खेळ हरले आहेत. ''

सँको म्हणाला, '' त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काहीच नाही. तुमची ती भुते केव्हाही संतुष्ट नसतात– मग ती खेळोत वा न खेळोत, जिंकोत वा हरोत. '' आल्टिसिडोरा म्हणाली, '' तसे असेल. पण दुसऱ्या ज्या गोष्टीचे मला आश्चर्य वाटते ( ' वाटले ',

असे मी म्हणावयास हवे. ) ती म्हणजे त्यांचा चेंडू दुसरा ठोसा सहन करू शकत नव्हता. प्रत्येक फटक्याबरोबर त्यांना पुस्तके बदलावी लागत होती– काही नवी, काही जुनी. ते मला फार विलक्षण वाटले. या बाबतीत जी एक चमत्कारिक गोष्ट घडली, ती मी विसरू शकत नाही. चांगल्या बांधणीचे एक नवे पुस्तक त्यांनी वर फेकले आणि त्याला असा काही जबरदस्त फटका लगावला की, त्यातून त्याची आतडीच बाहेर आली आणि त्यातील पाने चोहोकडे विखुरली. तेव्हा एक पिशाच्च दुसऱ्याला म्हणाले, "पहा, पहा. हे कोणते पुस्तक आहे? दुसरा म्हणाला, "डॉन क्विक्झोट यांच्या इतिहासाचा हा दुसरा खंड आहे. पहिल्या खंडाचा लेखक सिड् हॅमेट याने तो लिहिलेला नसून कोणा एका ॲरॅगोनियनने तो लिहिलेला आहे. आपण टोर्डेसिलासचे रहिवासी आहो असे तो म्हणतो." पहिले पिशाच्च ओरडले, "फेकून दे ते पुस्तक, खाली टाकून दे ते पुस्तक, पाताळाच्या खोल खोल खड्डयात पुरून टाक ते पुस्तक. म्हणजे मला ते पुनः कधीही दिसणार नाही." दुसऱ्याने विचारले, "का? त्यातील मजकूर इतका वाईट आहे?" पहिले पिशाच्च ओरडले, "अरे, त्यातील मजकूर इतका न वाचण्यासारखा आहे की, मी आणि पाताळातील साऱ्या पिशाच्यांनी याहून वाईट लिहिण्यासाठी आपली डोकी चालविली तरी, तितके वाईट पुस्तक लिहिणे आपल्या कौशल्याच्या पलीकडचे आहे." पिशाच्चांनी आपला खेळ पुढे चालविला आणि इतर अनंत पुस्तकांच्या चिंधड्या केल्या. पण मला अत्यंत पूज्य वाटणाऱ्या डॉन क्विक्झोट यांच्या नावामुळे माझे विचार मी आताच सांगितलेल्या दृश्यावर खिळून ठेवले."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "खात्रीने हा दृष्टिभ्रम असला पाहिजे – दुसरे काही नाही. सांप्रत या विश्वात त्या नावाचा माणूस मीच एकटा आहे. माझ्याविषयीचे पुस्तक एकसारखे इकडून तिकडे जात असते– एके ठिकाणी कधीच रहात नाही– कारण प्रत्येकाची उडी त्यावर असते. एखाद्या पिशाच्चाने माझे नाव धारण करून अंधारामध्ये किंवा या जगातील उजेडामध्ये हिंडत रहावे, याच्याशी मला काही कर्तव्य नाही. कारण या इतिहासात ज्याच्याविषयी लिहिले गेले आहे, तो माणूस मी नव्हे. तो इतिहास जर चांगला, प्रामाणिक आणि अधिकृत असा असेल, तर तो युगानुयुगे टिकून राहील. पण जर तो वाईट असेल, तर आपल्या जन्मापासून विस्मृतीच्या थडग्यापर्यंत त्याला जलद प्रवास करावा लागेल." डॉन क्विक्झोट यांच्याविरुद्ध असलेल्या आपल्या तक्रारी व गाऱ्हाणी आल्टिसिडोरा पुनः सांगू लागणार, तोंच त्यांनी तिला अडविले व म्हटले, "बाईसाहेब, जो आपल्या प्रेमाची योग्य प्रकारे परतफेड करण्यास पूर्णपणे असमर्थ आहे अशा माणसावर तुम्ही आपले प्रेम ठेवू नका, अशी सावधगिरीची सूचना मी आपल्याला वारंवार दिलेली आहे. माझ्यावर आपण आपले अंतःकरण लादले आहे याचे मला दुःख वाटते. कारण केवळ कोरड्या धन्यवादाशिवाय माझ्याजवळ दुसरे काही देण्यासारखे नाही. माझा जन्म खास टोबोसोच्या डल्सीनियासाठी झालेला आहे. आणि दैवाने ( ते असेल तर ) माझे प्रेम केवळ तिच्याच चरणी वाहिले आहे. म्हणून तिच्या जागी

आपण येऊ किंवा माझ्या हृदयात असलेल्या तिच्या स्थानात आपण सहभागी होऊ, अशी कल्पना दुसऱ्या कोण्या सुंदरीने करणे हे धाष्ट्र्य ठरेल. एवढ्याने तुमच्या सर्व आशांचा आधार काढून घेतला जाईल अशी मला आशा वाटते. मग तुम्ही आपली अब्रू योग्य मर्यादेत पुनः ठेवाल. या भूतलावरील कोणाही माणसाकडून अशक्य गोष्टींची अपेक्षा धरू नये.

हे ऐकून आल्टिसिडोरा मोठ्या भावनावेगाने किंचाळली, "आग लागो माझ्या आयुष्याला! अरे, तू शिशाचा गोळा आहेस– चुन्याचा आत्मा तुझ्या शरीरात आहे आणि तुझे हृदय तर ऑलिव्हच्या बीइतके छोटे आणि टणक आहे! एखाद्या सामान्य नांगर–हाक्यापेक्षा किंवा सरळ रस्त्यावरून मुळीच बाजूला न जाणाऱ्या झापड लावलेल्या ओझ्याच्या घोड्यासारखा तू आडमुठा आहेस. तुझे डोळे तुझ्या डोक्यात जितके खोल बसविलेले आहेत, तितकेच ते बाहेर उपसून काढण्याची मला फार इच्छा आहे. अरे, पराभूत घमेंडनंदना! बरगड्या खिळखिळ्या झालेल्या सोटेबाज शिलेदारा! तुझ्या लोंबत्या जबड्यावरील प्रेमाने मी मेले, असे वाटण्याइतका उर्मटपणा तुझ्या अंगी आहे काय? छेः छेः सर तिफानी, तू काल रात्री जे जे पाहिलेस ते सर्व सोंग होते. तुझ्यासारख्या उंटाकरता मी मला माशीचा दंशसुद्धा होऊ देणार नाही– मग मरणाची गोष्ट कशाला?" सँको म्हणाला, "बाई, तुझ्या म्हणण्यावर माझा विश्वास आहे. प्रेमासाठी माणसांनी मरण पत्करल्याच्या साऱ्या गोष्टी म्हणजे भाजलेल्या घोड्याच्या दंतकथाच होत. आपण प्रेमासाठी मरण पत्करतो असे जे तुम्हाला सांगतील, ते सारे झूट आहेत. त्यावर तुम्ही विश्वास ठेवला की तुम्ही लोकांच्या चेष्टेचा विषय व्हाल."

येथे त्यांचा संवाद खंडित झाला, कारण, एक माणूस तेथे आला. तो वाद्य–वादक, गायक आणि आदल्या रात्री चौकात म्हटल्या गेलेल्या कवितांचा रचनाकार होता. डॉन क्विक्झोट यांना अत्यंत नम्रतेने अभिवादन करून तो म्हणाला, "शिलेदारमहाराज, आपल्या अत्यंत नम्र सेवकांमध्ये माझी गणना करण्याची कृपा आपण करावी अशी माझी विनंती आहे. आपला मोठा लौकिक आणि आपल्या यशाचे महान मोल यांचा विचार करून मी आपला सेवक होण्याची महत्त्वाकांक्षा फार काळ मनात वागविली आहे. आपले सेवकत्व हा मी माझा सन्मान मानतो." डॉन क्विक्झोट म्हणाले, "महाराज, आपण कोण आहा, हे मला कृपया सांगा, म्हणजे मी आपल्या गुणांस अनुसरून माझा आदरभाव व्यक्त करीन." त्या चैनी माणसाने त्यांना सांगितले, "काल रात्री आपण ज्या कविता ऐकल्या, त्या रचणारा व गाणारा माणूस मीच!" डॉन क्विक्झोट म्हणाले, "महाशय, आपला आवाज उत्तम आहे. पण मला वाटते, आपले काव्य काहीसे अप्रस्तुत होते. गॅर्सिलस्सोच्या कवितांचा या स्त्रीच्या मृत्यूशी काय संबंध?" गवयाने उत्तर दिले, "महाराज, त्याचे काही आश्चर्य वाटू देऊ नका. माझे कवि–बंधू जे करतात तेच मी केले. या काळातील सारे उपटसुंभ कवी असेच करतात. आपल्याला जे आवडेल, जसे लिहिणे आवडेल, तसे प्रत्येकजण लिहीत जातो. आणि आपल्या इच्छेस येईल,

त्याचे वाङ्मय-चौर्य करतो–मग ते प्रस्तुत असो वा नसो. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांनी काहीही लिहावे-मग ते कितीही अप्रस्तुत आणि अविचारी असो. कवीचे निरंकुशत्व म्हणून काही आहे ना ? तोच आमच्या मूर्खपणाचा आधार आणि संरक्षण असतो–स्वरमात्रा जुळविणाऱ्या आम्हा सर्व लोकांचे ते आश्रयस्थान असते. "

डॉन क्विक्झोट उत्तर देणार होते, पण ड्यूक व डचेस यांच्या आगमनाने त्यांना अडथळा आला. त्या दोघांनी ते संभाषण उच्च पातळीवर नेले आणि बराच काळ त्यांचा संवाद अत्यंत आनंदाने झाला. सँकोने आपल्या विचित्र कल्पना आणि चेष्टा–मस्करीचे किस्से सांगितले. तेव्हा ड्यूक आणि डचेस यांना प्रश्न पडला, चातुर्य किंवा भोळेपणा यापैकी याच्या कोणत्या गुणाचे कौतुक करावे ? नंतर डॉन क्विक्झोट यांनी त्याच दिवशी तेथून निघून जाण्याची परवानगी मागितली आणि म्हटले," दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडलेल्या माझ्यासारख्या शिलेदारांनी राजाच्या राजवाड्यात राहण्यापेक्षा गरीब खोपटात राहणेच योग्य. " त्यांची विनंती त्या दोघांनी मनमोकळेपणाने मान्य केली. डचेसने विचारले, " आपल्या कृपेचा काही अंश आल्टिसिडोराला अद्याप मिळाला की नाही ? " डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, " बाईसाहेब, मी आपल्याला मोकळेपणाने सांगतो की, या तरुणीचा सारा रोग केवळ रिकामटेकडेपणातून उद्भवलेला आहे. जगातील दुसऱ्या कोणत्याही कारणापासून नव्हे, असे मला खात्रीने वाटते. म्हणून तिच्या विकृतीवर उत्तम उपाय म्हणजे कोणत्या तरी साध्या, सभ्य कार्यात तिला गुंतवून ठेवणे. याहून अधिक चांगला उपाय निसर्गात दुसरा सापडणार नाही. तिने मला असे सांगितले आहे की, पापलोकात झालर–विणीचे कपडे पुष्कळ वापरतात. ती वीण कशी करावी, हे तिला माहीत आहे. म्हणून तिला हेच काम द्यावे. सुताच्या आणि रेशमाच्या गुंड्या गुंडाळण्याने व उलगडण्याने तिच्या डोक्यातून तिचे प्रेम बाहेर फेकले जाईल असे मी प्रतिज्ञेवर सांगतो. बाईसाहेब, माझे मत असे आहे आणि माझा सल्लाही असाच आहे. " सँको म्हणाला, " आणि माझाही सल्ला तसाच आहे. झालरकाम करणारी माणसे प्रेम करून कधी मेल्याचे मला माहीत नाही. दुसरे काही काम करणारी तरुण पोरगीही प्रेमामुळे मेल्याचे माहीत नाही. अहो, मी माझीच गोष्ट सांगतो ना ! जेव्हा मी हातात कुदळ घेऊन खूप काम करतो, तेव्हा त्या डुकरिणीचा ( म्हणजे माझ्या प्रिय पत्नीचा ) विचार माझ्या मनात मेलेल्या गायीइतकासुद्धा येत नाही. तरी माझ्या बायकोवर मी माझ्या डोळ्यातील बुब्बुळांइतके प्रेम करतो. " डचेसने उत्तर दिले, " सँको, तू चांगले बोललास. यापुढे आल्टिसिडोराला कामाची वाण भासणार नाही, याची काळजी मी घेईन, तिला सुई चालविता येते. तिचाच तिने उपयोग करावा, असे मी ठरविले आहे. "

आल्टिसिडोरा म्हणाली, " बाईसाहेब, अशा प्रकारचा कोणताही उपाय मी करण्याची गरज नाही. या उडाणटप्पू राक्षसाने मला ज्या कठोर व वाईट रीतीने वागविले आहे, त्यामुळे मी लौकरच त्याला माझ्या स्मृतीतून जमीनदोस्त करून नष्ट करीन. त्यासाठी दुसऱ्या उपायांची गरज नाही. तोपर्यंत मला येथून जाण्याची परवानगी

राणीसाहेबांनी द्यावी म्हणजे त्याचे विद्रूप आणि भयंकर स्वरूप– त्याची दुःखी मुद्रा, असे मी म्हणत नाही– मला पहावे लागणार नाही. " ड्यूक म्हणाला, " हे शब्द ऐकून 'आधी निंदा, मग क्षमा' या म्हणीची मला आठवण होते. " जणू काही आपले डोळे पुसण्यासाठी आल्टिसिडोराने आपला हातरुमाल आपल्या डोळ्यापाशी नेला आणि ड्यूक व डचेस यांना मुजरा करून ती त्या खोलीतून बाहेर गेली. सँको म्हणाला, " अरेरे! गरीब बिचारी पोरगी! तुझा शेवट कसा होईल हे मला माहीत आहे. ज्या माझ्या निर्दय धन्याच्या– दुःखी जीवाच्या– हातात तू सापडली आहेत, त्याचे हृदय खेकड्यासारखे आहे– ओक वृक्षासारखे टणक आहे. केवढे तुझे दुर्दैव! माझ्या मधुर मुद्रेकडे पाहून तू जर माझ्या प्रेमात पडली असतीस, तर प्रेमाच्या खेळात तुझी फत्ते झाली असती! " येथे संवाद संपला. डॉन क्विक्झोट यांनी पोशाख चढविला, डयक व डचेस यांच्याबरोबर जेवण केले आणि दुपारी तेथून प्रयाण केले.



## प्रकरण ७१

# आपल्या घरी जाण्याच्या वाटेवर असताना डॉन क्विक्झोट आणि त्यांचा सेवक यांना काय झाले ?

हर्ष-शोक यांच्यामध्ये मन सारखेच विभागलेले असताना पराभूत शिलेदारजींनी आपला प्रवास पुढे चालविला. आपल्या पराभवाच्या विचाराने कधी कधी त्यांची वृत्ती खचून जात असे, पण सँकोच्या शिक्षेने आल्टिसिडोराचा पुनर्जन्म झाला या विचाराने त्यांच्या वृत्ती उल्हसित होत. ती प्रेममुग्ध तरुणी खरोखरच मेलेली होती असे ते आपल्या मनाला मोठ्या कष्टाने पटवीत होते. सँकोच्या डोक्यातील विचार मुळीच आनंद-दायक नव्हते. उलट, तो अगदी चिडून गेलेला होता. कारण, आल्टिसिडोराने त्याला कपडे देण्याचे जे वचन दिलेले होते, ते तिने मोडले होते. त्या विचाराने त्याचे डोके गरगरत होते. तो म्हणाला, " खरोखर, महाराज, या पृथ्वीवरील कोणाही वैद्याच्या वाट्यास आले नसेल, असे दुर्दैव माझे आहे. इतर वैद्य आपल्या रोग्यांना ठार मारतात आणि तरीही त्यांना पैसे मिळतात. ते दोनचार शब्द लिहून देण्यापलीकडे कसलीही तसदी घेत नाहीत. त्याप्रमाणे औषध तयार करण्याचे कष्ट औषधविके करतात. पण मी असा आहे की, थडग्यातून दुसऱ्या माणसांना जिवंत करण्यासाठी मी माझ्या कातडीला टोचून घेतो, चिमटे घेऊ देतो, तिच्यात खिळे ठोकू देतो आणि फटके मारून घेतो आणि तरीही त्यापासून मला एक कवडीही मिळत नाही. अशा प्रकारे, आधी माझी फी मिळाली नसताना, मी दुसऱ्या कोणास बरे कसे करणार? काहीही लाभ नसताना माझी ससेहोलपट झाली. त्यासाठी त्यांनी मला चांगली फी द्यावयास हवी. पैसे नाहीत, तर औषध नाही. भिक्षू गाणे म्हणून पोट भरतो. मग फी न घेता मी औषध द्यावे असे देवाच्या मनात असेल, असे मला वाटत नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, तुझे म्हणणे बरोबर आहे. तुला कपडे न देऊन आल्टिसिडोराने तुला निराश केले, हे तिला शोभत नाही. मात्र तू हे कबूल केले पाहिजेस की, तू हे चमत्कार ज्या आपल्या गुणाने करतोस, तो फुकट मिळालेला आहे. ती विद्या शिकण्यासाठी तुला काहीही खर्च करावा लागला नाही. फक्त सोशिकपणाची कला तू शिकलास. डल्सीनियाला जादूमुक्त करण्यासाठी तू मला फी मागितली असतीस, तर मी तुला ती केव्हाच दिली असती. पण रोगहरणाच्या प्रमाणात कधीही फी मिळत नसते. म्हणून तू आपला उपाय बक्षिसावर अवलंबून ठेवू नकोस, कोणी सांगावे, मी तुला

बक्षीस देऊ केले आणि तू ते स्वीकारलेस तर त्यामुळे कदाचित् तुझ्या प्रायश्चित्ताचे फल मिळण्यास अडथळा येईल. पण आता या बाबतीत आपण इतकी मजल मारलीच आहे, तर तुझ्या उपायाची कसोटीच आपण पाहू. सँको, चल तुझी किंमत सांग आणि आपला पायजमा खाली सोड. प्रथम तू आपल्या कातडीची किंमत दे आणि नंतर तुझ्या ताब्यात असलेल्या माझ्या पैशातून स्वतःसाठी फी घे." ही नामी सूचना ऐकून सँकोने आपले डोळे व कान हातभर ताणले आणि त्या सूचनेवर वेगाने झडप घातली. तो म्हणाला, "वाः वाः महाराज, आता आपण काही तरी मुद्याचे बोलत आहा. आपण इतक्या भावनेने सांगत आहा म्हणून मी ते आनंदाने पत्करीन. महाराज, मला माझी बायका–मुले संभाळायची आहेत, म्हणून मी ही महत्त्वाची संधी घेतली पाहिजे. चला, सांगा, मला प्रत्येक फटक्याला आपण काय फी देणार?" डॉन क्विक्झोट म्हणाले, "उपचाराच्या मोठेपणाला आणि गुणवत्तेला अनुरूप असा मोबदला तुला द्यावयाचा म्हटले तर व्हेनिसमधील सारी संपत्ती किंवा हिंदुस्थानातील साऱ्या खाणी तुला बक्षीस देण्यास पुऱ्या पडणार नाहीत. पण तुझ्या हातात माझी किती रोकड आहे ते पाहा आणि प्रत्येक फटक्याची किंमत तुझ्या इच्छेप्रमाणे ठरव." सँको म्हणाला, "एकूण फटके तीन हजार तीनशे–आणखी वर काही मला खावयाचे आहेत. त्यापैकी मी पाच फटके मारले, बाकीचे फटके लगावयाचे आहेत. ते पाच फटके म्हणजे आपण वरचे समजू या. आपण तीन हजार तीनशे फटक्याचा विचार करू या. प्रत्येक फटक्याला एक क्वार्टिलो किंवा तीन हाफ–पेन्स मला मिळाले पाहिजेत. माझा भाऊ असला तरी यातून मी एक फार्दिंगही कमी करणार नाही. एकूण तीन हजार तीनशे तीन हाफ–पेन्स मिळाले पाहिजेत. तीन हजार तीन–हाफ–पेन्स म्हणजे पंधराशे तीन पेन्स. याचा अर्थ सातशे पन्नास रील किंवा सहा–पेन्स. मग तीनशे तीन हाफ–पेन्स राहतात. त्याचा अर्थ दीडशे तीन–पेन्स म्हणजे पाऊणशे सहा–पेन्स या सर्वांचा हिशेब केला म्हणजे आठशे पंचवीस रील किंवा सहा–पेन्स एक फार्दिंग कमी नाही की जास्त नाही. महाराज, आपल्याला हे मान्य असेल तर, माझ्या हातात असलेल्या आपल्या पैशातून ही रक्कम मी वजा टाकीन आणि माझ्या हालांची किंमत मला चांगली मिळाली असे समजून मी, खूप फटकारलेला पण अत्यंत खुष झालेला, असा घरी जाईन. त्या फटक्यांचे मला काही वाटणार नाही. प्रत्येक वस्तूची काही किंमत असते. ज्याला आपले पाय भिजविण्याची भीती वाटते, त्याने मासे पकडण्याचा विचार आपल्या मनात कधी आणू नये. याहून मी अधिक बोलण्याची गरज नाही."

डॉन क्विक्झोट म्हणाले, "अरे माझ्या अत्यंत लाडक्या सँको, तुझ्या हृदयावर ईश्वराचे आशीर्वाद असोत. अरे माझ्या मित्रा, या पृथ्वीवर जोपर्यंत प्रभु आम्हाला ठेवील तोपर्यंत डल्सीनिया आणि मी तुझ्यासाठी प्रार्थना करण्यास आणि तुझी सेवा करण्यास सदैव बांधलेले राहू! तिला जर आपले पूर्वीचे रूप व सौंदर्य पुनः प्राप्त झाले– आता ते तिला खात्रीने प्राप्त होणारच– तर तिच्या दुर्भाग्याचे रूपांतर सद्भाग्यात

होईल आणि मी माझ्या पराभवात विजयी होईन. प्रिय सँको, बोल, तू आपल्या कामाला केव्हा सुरुवात करणार ? तू तत्काळ काम सुरू केलेस तर मेहेरबानी म्हणून तुला आणखी शंभर रील मिळतील." सँकोने उत्तर दिले, "आज रात्रीच मी हे काम पुरे करतो. आपण फक्त हुकूम द्या म्हणजे झाले. मग आपण रानात जाऊ आणि नंतर मी स्वतःला कसा चोपतो हे आपण पहात राहा. मी माझ्या शरीरातील मांस जपणार नाही असे खात्रीने सांगतो."

डॉन क्विक्झोट रात्रीची वाट अत्यंत अधीरतेने पाहू लागले. इतर सर्व अधीर प्रेमिकांप्रमाणे त्यांनाही वाटले, सूर्याने आपल्या रथाची चाके मोडली असावीत आणि म्हणून दिवस इतका लांबलचक झाला आहे, शेवटी अंधार पडला. तेव्हा ते दोघे रस्त्यावरून एका गर्द झाडीत गेले. तेथे ते दोघे खाली उतरले आणि गवतावर बसले. सँकोच्या पिशवीत होते त्या पदार्थांचे जेवण त्यांनी केले.

जेवणामुळे खूष झालेल्या सँकोला वाटले, आता आपल्या धन्याला संतुष्ट करण्याची आणि स्वतःला पैका कमविण्याची वेळ आलेली आहे. त्यासाठी त्याने डॅपलच्या लगामाच्या पट्ट्याचा चाबूक बनविला. कमरेपर्यंतचे शरीर उघडे करून, आपल्या धन्यापासून थोड्या अंतरावर, तो त्या अरण्यात दूर गेला. त्याची तत्परता आणि निश्चय पाहून, डॉन क्विक्झोट यांना त्याला हाक मारल्याशिवाय राहावेना. ते म्हणाले, "प्रिय सँको, तू स्वतःवरही फार क्रौर्य दाखवू नकोस. आपल्या शरीराचे तुकडे न होतील अशी काळजी घे. गती चांगली ठेव पण घाई करू नकोस. आपले काम सावकाशीने कर. मंद आणि सौम्य काम अधिक होते. हिशेब पुरा होण्यापूर्वी तू स्वतःला ठार मारावेस अशी माझी इच्छा नाही. हिशेब दोन्ही बाजूनी बरोबर व्हावा. मी दूर अंतरावर उभा राहीन आणि माझ्या माळेच्या मण्यांच्या सहाय्याने तुझ्या फटक्यांचा हिशेब ठेवीन. तुझे पवित्र कार्य ईश्वर उत्कर्षास नेवो." सँको म्हणाला, "जो पै न् पै पैसे देतो, तो माणूस प्रामाणिक होय. मी मला फक्त सुरेख फटके देण्याचा विचार करीत आहे– चमत्कार करून दाखविण्यासाठी मी स्वतःला ठार मारीन असे समजू नका." असे म्हणून त्याने आपल्या प्रायश्चित्ताच्या साधनाचा उपयोग करण्यास सुरुवात केली आणि डॉन क्विक्झोटनी फटके मोजण्याचे काम सुरू केले. सहा–सात फटके सँकोने आपल्या पाठीवर ओढले, तेव्हा त्याला वाटले, ही मस्करी आपल्या अंगाला चांगलीच झोंबत आहे. म्हणून त्याला आपण केलेल्या सौद्याबद्दल पश्चात्ताप होऊ लागला. त्याने थोडा वेळ थांबून आपल्या मालकाला बोलावले आणि सांगितले, "मी आपल्यापासून निघून जातो. कारण, असे फटके खाण्याची किंमत माफकपणाने म्हटली तरी, एका फटक्याला तीन पेन्स कोणाही माणसाकडून मिळणे अवश्य आहे. एका फटक्याला तीन हाफ– पेन्स या दराने मी हे काम पुढे चालविणार नाही." डॉन क्विक्झोट उत्तरले, "चालू दे, मित्रा, सँको, धैर्य धर आणि पुढे हो ! तुझी मागणी एवढीच असेल तर मी तुला दुप्पट पैसे देईन." सँको म्हणाला, "असे म्हणता ? मग घेतो तर सारे फटके मारून !– तिप्पट फटकेसुद्धा

घेईन. एकून ठेवा. " असे म्हणून त्याचा चाबूक कडाडला. पण त्या धूर्त बदमाषाने आपल्या स्वतःच्या कातडीवर फटके न मारता झाडावर त्वेषाने मारले. मधून मधून तो असें काही दुःखाने कण्हे की, कोणाला वाटावे, त्याच्या अंगातून भूत निघून जात आहे.

डॉन क्विक्झोट जात्याच कोमल अंतःकरणाचे होते. ती शिक्षा पुरी होईपर्यंत सँको आपल्या आयुष्याचा अंत करून घेईल आणि त्या शिक्षेचा जो आनंददायक परिणाम व्हावयाचा, त्या बाबतीत आपली निराशा होईल अशी भीती त्यांना वाटली आणि म्हणून ते म्हणाले, " थांब, थांब, माझ्या मित्रा, थांब. तुझे आपल्या प्राणांवर प्रेम आहे ना ? मग थांब–यावेळी आणखी फटके नकोत, अशी मी तुझी विनवणी करतो. हा व्यायाम अत्यंत तीक्ष्ण स्वरूपाचा आहे, असे दिसते. म्हणून तो सारा एकाच वेळी घेऊ नकोस–दोन हप्त्यात घे, अशी माझी प्रार्थना आहे. ये, ये, योग्य वेळी सारे काही होईल. रोम शहर एका दिवसात बांधले गेले नाही. मी जर तुझे फटके बरोबर मोजले असतील तर तू स्वतःला एक हजाराहून अधिक फटके दिले आहेस. एका वेळी इतके पुरेत. घरगुती भाषेत सांगायचे तर, गाढव आपले योग्य ओझे नेते पण दुप्पट ओझे नेऊ शकत नाही. मोकळ्या घोड्याला मरेपर्यंत दामटू नये. " सँको म्हणाला, " छेः छेः, माझ्याबद्दल असे कोणीही म्हणता कामा नये की, खाल्लेल्या मिठाला हा जागला नाही किंवा मला आधी पैसे मिळाले असल्यामुळे मेलेल्या घोडयाला मारण्याचे काम मी केले नाही. म्हणून, महाराज, आपण दूर उभे राहावे अशी माझी विनंती आहे. माझ्या चाबकाच्या आटोक्यापलीकडे राहा आणि मला आणखी हजार फटके घेऊ द्या. तसे झाले म्हणजे या कामाचा कणाच मोडला असे होईल. त्यानंतर आणखी एकदा फटक्यांचा हा सामना झाला की सारे काम संपेल. " डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, " तू जोसात आहेस, म्हणून मी बाजूस सरतो. देव तुला सामर्थ्य नि बक्षीस देवो. " नंतर सँको आपल्या कामास पुनः लागला. त्याने त्या झाडांना आवेशाने फटके लगावले आणि त्यांची साल निर्दयपणे बाहेर काढली. शेवटी, अखेरचे फटके मारण्याचा निश्चय त्याने केला असे दिसले. त्याने मोठ्या सामर्थ्याने एका बीच झाडावर जोर-जोराने फटके मारण्यास सुरुवात केली. आपला आवाज चढवून तो ओरडला, " तेथेच थांब. अरे सॅम्सन, तुझा आणि तुझ्याजवळ असणाऱ्या सर्वांचा मी धुव्वा उडवितो. "

हा त्याचा भयाण आक्रोश आणि त्याबरोबरच फटक्यांचा भयप्रद आवाज ऐकून डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाकडे वेगाने धावत गेले आणि सँकोने एखाद्या बैलाच्या शेपटीप्रमाणे पिरगळलेला पट्टा त्यांनी घट्ट धरला व ते ओरडले, " थांब, मित्रा सँको, तुझ्या बाहूतील आवेश थांबव. अरे, तुझ्या मृत्यूचे आणि तुझ्या बायका–मुलांच्या सत्यानाशाचे खापर माझ्या डोक्यावर फुटावे असे तुला वाटते काय ? तसे करू नकोस. डल्सीनिया काही काळ थांबेल. मग चांगली संधी आपोआप चालून येईल. तुला जेव्हा नवी शक्ती प्राप्त होईल, तेव्हा ही कामगिरी पार पाडता येईल. त्यावेळी सर्वांना संतोष होईल आणि मीही आशेवर संतोषाने जिवंत राहीन. " सँको म्हणाला, " ठीक आहे,

महाराज. आपली जर तशीच इच्छा नि मर्जी असेल तर तसेच होऊ द्या असे मी म्हणतो. पण एक भलेपणा दाखवा. तो म्हणजे माझ्या खांद्यावर आपला अंगरखा टाका. कारण माझे सारे अंग घामाने डबडबलेले आहे. आणि मला सर्दी व्हावी अशी इच्छा नाही. जेव्हा आम्ही नवखे लोक फटक्यांची शिक्षा प्रथमच भोगतो, तेव्हा तसे होण्याची भीती असते." हे ऐकल्यावर डॉन क्विक्झोट यांनी आपल्या खांद्यावरील अंगरखा सँकोच्या खांद्यावर घातला आणि आपण स्वतः उघडे राहिले. तो धूर्त सेवक ऊबदार पांघरूण घेऊन गाढ झोपी गेला. दुसरे दिवशी सकाळी सूर्याने उठवीपर्यंत तो हालला नाही.

सकाळी ते आपल्या प्रवासास निघाले. तीन तास प्रवास केल्यावर एका खाणावळीत ते गेले. आता खाणावळीत राहण्याचे डॉन क्विक्झोट यांनी ठरविले. ते खंदक, ते बुरुज, ते लोखंडी दरवाजे आणि ते घालता-काढता येणारे पूल यांनी वेढलेल्या किल्ल्यात आता ते जाऊ इच्छित नव्हते. कल्पनेच्या भराऱ्या मारण्याची त्यांना पूर्वी सवय होती, पण आता ती पार ढासळली होती. त्याचे वर्णन लौकरच विस्ताराने केले जाईल. पहिल्या मजल्यावरील एका खोलीत त्यांना जागा देण्यात आली होती. त्या खोलीत उंची उंची पडदे नव्हते, तर खेड्यात नेहमी दिसणाऱ्या रंगीत व खडबडीत फळ्या उभ्या केलेल्या होत्या. एका फळीवर ट्रॉयच्या हेलेनची कथा रंगविलेली होती. तिचा पती मेनेलॉस याच्यापासून पॅरिसने तिला चोरून पळविले होते. पण कोणा दुष्ट चित्रकाराने ते सारे पुसून टाकले होते. दुसरे चित्र डिडो आणि एनीअस यांची कथा सांगणारे होते. ती युवती मनोऱ्याच्या माथ्यावर उभी होती आणि आपल्या पळून जाणाऱ्या पाहुण्याला एक कागद फडफडवून दाखवीत होती. तो पाहुणा समुद्रातील एका जहाजावर होता. तिच्यापासून त्वरेने दूर जाण्यासाठी त्याने सारी शिडे उभारली होती. तेथे रंगविलेल्या या दोन कथा पाहून डॉन क्विक्झोट यांनी असे विधान केले की, "हेलेनवर जी सक्ती करण्यात आली, त्यामुळे ती मुळीच नाराज झाली नाही. उलट ती आपल्या प्रियकराकडे वक्र दृष्टीने पहात स्मित करीत होती. सुंदर डिडो आपले दुःख आपल्या अश्रूंनी व्यक्त करीत होती. ते अश्रू प्रेक्षकांना दिसावेत म्हणून चित्रकाराने आक्रोडाच्या फळाएवढे ते मोठे काढले होते. या दोन युवती सध्याच्या काळात नाहीत हे केवढे दुर्दैव! अथवा त्यांच्या काळात मी नव्हतो, हे माझे केवढे दुर्दैव!! मी त्या माणसांना भेटलो असतो आणि थांबविले असते नि ट्रॉय व कार्थेज या दोघांचाही विनाश होऊ दिला नसता. फार काय, एकट्या पॅरिसच्या मृत्यूने ही सारी दुःखे टाळता आली असती."

सँको म्हणाला, "मी आपल्याला पैजेवर सांगतो की, ज्यांच्या भिंतीवर आपल्या आयुष्याची आणि कृत्यांची कथा चित्रित केलेली आणि चिकटविलेली नसेल, असे या देशात एकही उपाहारगृह, खाणावळ, गुत्ता, किंवा न्हाव्याचे दुकान असणार नाही. आपण फार म्हातारे होण्याच्या आत हे घडून येईल. पण माझी मनापासून अशी इच्छा आहे की, ही चित्रे ज्या रांडलेकाने काढली असतील त्याच्यापेक्षा चांगल्या माणसाने आपली कथा

चित्रित करावी. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, तुझे म्हणणे बरोबर आहे. ही चित्रे ज्या माणसाने काढली असतील, त्याची कल्पना केली म्हणजे मला यूवेडाचा चित्रकार ऑर्बनेजाची आठवण होते. तो चित्रे काढण्यास बसला आणि 'हे चित्र कशाचे ?' असे त्याला कोणी विचारले, म्हणजे तो उत्तर देई, " माझ्या मनात जी कल्पना उसळून येते, तिचे हे चित्र. त्याने जर कोंबड्याचे चित्र काढले, तर तो त्याचेखाली लिहीत असे 'हा कोंबडा आहे.' नाही तर लोक ते चित्र कोल्ह्याचे समजावयाचे. ज्याने ही चित्रे काढली किंवा लिहिली (दोहोंचा अर्थ एकच) अशाच माणसाने या नव्या डॉन क्विक्झोटचा इतिहास लिहिला असावा अन् तो नुकताच बाहेर पडला असावा. आता तो इतिहास सर्वत्र भटकत आहे. जे जे म्हणून मनात उचंबळून येईल, ते ते स्वैरपणे चितारायचे किंवा लिहायचे असा त्याचा खाक्या. काही वर्षांपूर्वी एका दरबारात मॉलियन नावाचा कोणी कवी होता. तो असाच होता. त्याला कोणतेही प्रश्न विचारले तरी तो त्यांची समय–स्फूर्त उत्तरे देई. एकाने विचारले, " डीएम् डी डो म्हणजे काय ? " त्याला या माणसाने स्पॅनिश भाषेत अत्यंत उद्धटपणे उत्तर दिले, 'डी डोंडे डीरे' ( ईश्वर कोण ? तर सटरफटर ).

" पण आता आपण आपल्या कामगिरीवर येऊ. आज रात्री आणखी फटके मारून घेणे तुला आवडेल काय ? उघड्या जागेपेक्षा या ऊबदार घरात ती कामगिरी पार पाडणे चांगले नव्हे काय ? " सँको म्हणाला, " अहो, उघड्या मैदानावर काय आणि बंदिस्त घरात काय, फटके ते फटकेच ! पण झाडांच्या राईत बंदिस्त असलेल्या, ऊबदार जागेत फटके मारून घेणे मला आवडेल. कारण, माझे झाडावर उदंड प्रेम आहे. मला वाटते, झाडे मला नेहमी सोबत करीत असतात आणि माझ्या दुःखात एक प्रकारचा बंधुभाव दाखवीत असतात. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " आता मी विचार केला तेव्हा मला असे वाटते, ते काम आज रात्री व्हावयास नको. भल्या सँको, तुला पुनः शक्ती येण्यास आणखी काही काळ लागेल. आपण घरी जाईपर्यंत फक्त विश्रांति घेऊ या. घरी पोचण्यास जास्तीत जास्त दोन दिवसांहून अधिक काळ लागणार नाही. " सँकोने उत्तर दिले, " महाराजांच्या मर्जीप्रमाणेच होऊ दे. पण जर मला माझ्या इच्छेप्रमाणे वागता येत असेल, तर हे काम येथेच शेवटास नेणे उत्तम. कारण आता माझा हात त्या कामाला सरावलेला आहे. आणि माझे रक्त उसळत आहे. लोखंड तापले आहे, तोंवरच त्याच्यावर घाव घालणे चांगले. विलंबात धोका असतो. नदीचे पाणी निघून जाण्याचे आत पाणचक्कीतून पीठ दळून घेणे चांगले. मिळत आहे तोपर्यंत घ्यावे. झुडुपातल्या दोन पक्ष्यांपेक्षा हातातील एक पक्षी चांगला. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " भल्या सँको, देवाशपथ तुझ्या म्हणी पुरे कर. पूर्वीप्रमाणे खरे असेल, ते तू सरळ सांगत जा, म्हणजे मी तुझे सारे ऐकेन. इतर माणसाप्रमाणे तुला सरळ बोलता येत नाही काय ? वळणा-वळणाने कंटाळवाणे बोलणे तू टाकून दे. हे मी तुला किती तरी वेळा सांगितले नाही काय ? मी काय सांगतो ते नीट ऐक. त्यामुळे तुझे कल्याण होईल अशी मला खात्री

वाटते." सँकोने उत्तर दिले, "माझी ती एक दुर्दैवी लकब आहे. एखादी म्हण घातल्याशिवाय मी चार शब्दही बोलू शकत नाही. मुद्याला धरून असणारी म्हण मी आपल्याला नेहमी ऐकवीत असतो. ही माझी खोड मी शक्य तर दुरुस्त करीन." अशा प्रकारे या वेळेपुरते त्यांचे संभाषण समाप्त झाले.



प्रकरण ७२

## डॉन क्विक्झोट आणि सँको घरी कसे पोचले ?

त्या खानावळीत डॉन क्विक्झोट व सँको सर्व दिवसभर, रात्र केव्हा येते, याची वाट पहात राहिले— एकाला मोकळ्या मैदानात आपल्या प्रायश्चित्ताचा शेवट करण्याची संधी साधावयाची होती, तर दुसऱ्याला ते प्रायश्चित्त पुरेपूर पार पडले ते पहावयाचे होते. त्यांच्या इच्छेची पूर्तता होण्यासाठी ही प्राथमिक गोष्ट होणे अवश्य होते.

मध्यंतरी तीन-चार सेवकांसह एक गृहस्थ त्या खाणावळीजवळ घोड्यावरून आला. त्यांच्यापैकी एक सेवक दुसऱ्याला डॉन ॲल्व्हॅरो टार्फे म्हणून संबोधीत होता. तो त्याचा धनी असावा असे दिसले. तो सेवक म्हणाला, "दिवसाचा ऊष्मा निघून जाईपर्यन्त महाराजांनी येथे थांबणे चांगले. हे घर थंड व स्वच्छ आहे असे माझे मत आहे." टार्फेचे नाव ऐकून डॉन क्विक्झोट आपल्या सेवकाकडे लगेच वळून म्हणाले, "सँको, माझ्या इतिहासाचा तो कल्पित दुसरा खंड चाळून पहाताना मला डॉन ॲल्व्हॅरो टार्फे हे नाव ओझरते पाहिल्याचे आठवते. त्यात माझी फारशी चूक नसावी." सँको म्हणाला, "तसे होणे जितके शक्य, तितकेच अशक्यही आहे. पण आधी त्याला खाली उतरू द्या. मग आपण त्याला त्यासंबंधी प्रश्न विचारू."

तो गृहस्थ घोड्यावरून उतरला. घरधनिणीने त्याला तळमजल्यावरील खोलीत नेले. ती खोली डॉन क्विक्झोट यांच्या दालनासमोर होती. त्या खोलीत तशाच तऱ्हेची ओबड-धोबड चित्रे काढलेली होती. गारवा यावा म्हणून त्या पाहुण्याने आपल्या अंगावरील कपडे काढले आणि त्या घराला वळसा घालण्यासाठी तो पडवीवर आला. पडवी प्रशस्त आणि हवेशीर होती. तेथे त्याला डॉन क्विक्झोट आढळले. त्यांना उद्देशून तो म्हणाला, "महाराज, आपण कोणीकडे चालला आहा ?" डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, "जवळच्याच खेड्याकडे. ती माझी जन्मभूमी आहे. महाराज, आपण कोणीकडे निघाला आहा ?" शिलेदार म्हणाला, "ग्रॅनॅडाकडे, महाराज, तेथे माझा जन्म झाला." डॉन क्विक्झोट उत्तरले, "किती सुरेख आहे तो देश ! आपले नाव सांगण्याचा अनुग्रह आपण कराल काय ? महाराज, आपली माहिती माझ्या कार्याला इतकी महत्त्वाची असेल असे मला वाटते की, त्याचे वर्णन मी करू शकत नाही." त्या गृहस्थाने उत्तर दिले, "लोक मला डॉन अल्व्हॅरो टार्फे म्हणतात." डॉन क्विक्झोट म्हणाले, "मग हे निर्विवाद आहे की, एका नव्या ग्रंथकाराने अलीकडेच

प्रसिद्ध केलेल्या, ला मांचा येथील डॉन क्विक्झोटच्या इतिहासाच्या द्वितीय खंडात ज्याचे नाव आले आहे ते डॉन अल्व्हॅरो टार्फे आपणच आहा." शिलेदाराने उत्तर दिले, "होय, तोच मी माणूस. आणि त्या पुस्तकाचा प्रमुख नायक असलेला डॉन क्विक्झोट हा माझ्या निकट परिचयाचा होता. त्याला त्याच्या घरातून बाहेर फूस लावून नेणारा मीच. मी जर त्याचे मन वळविले नसते आणि माझ्या संगतीत घेतले नसते, तर त्याला सॅरगोस्सा येथील सामने कधीच पहावयास मिळाले नसते. खरोखर त्याच्या सर्व मित्रांमध्ये मीच सर्वोत्तम मित्र ठरलो. मी त्याची अनन्यसाधारण सेवा केली. मी जर त्याच्या पाठीशी उभा राहिलो नसतो, तर त्याच्या असह्य उर्मटपणामुळे त्याला लाजिरवाणी शिक्षा भोगावी लागली असती." डॉन क्विक्झोट म्हणाले, "पण महाराज, मला एक गोष्ट कृपा करून सांगा. तुमच्या त्या डॉन क्विक्झोटसारखा मी थोडा तरी दिसतो काय?" दुसऱ्याने उत्तर दिले, "छेः छेः महाराज, जगातील कोणत्याही माणसापेक्षा आपण त्याचेपासून अत्यंत दूर आहा." शिलेदारजींनी विचारले, "सँको पँझा नावाचा त्यांचा कोणी सेवक होता काय?" डॉन ॲल्व्हॅरो म्हणाला, "होय, होय, पण त्याचे बाबतीत मी पार फसलो. लोक म्हणत की, तो हुजऱ्या मोठा विनोदी, गंमत्या प्राणी आहे, पण मला तो मोठा ठोंब्या वाटला." सँको म्हणाला, "मलाही तसेच वाटले. मस्करी करणे किंवा गमतीच्या गोष्टी बोलणे हे प्रत्येकाला शक्य नसते. तुम्ही ज्या सँकोविषयी बोलता तो लुच्चा, लबाड, बदनाम, चोर किंवा तऱ्हेवाईक मूर्ख असला पाहिजे असे मी खात्रीने सांगतो. कारण खरा सँको तो मीच आहे. गंमत्या-बढाईखोर सेवक तो मीच आहे. माझ्याजवळ थट्टामस्करीचा खजिना नेहमी भरपूर भरलेला असतो. त्यामुळे मी मूर्तिमंत गांभीर्याला हसावयास लावीन. या माझ्या बोलण्यावर आपला विश्वास बसत नसेल, तर माझी परीक्षा घ्या–बारा महिने माझ्या संगतीत रहा. म्हणजे क्षणोक्षणी माझ्या तोंडून विनोदाचा आणि कोट्यांचा किती पाऊस पडतो हे तुम्हाला कळेल. मी प्रत्येक माणसाला पुनःपुनः खळखळून हसावयास लावतो. पण तसे करण्याचा माझा उद्देश नसतो. असल्यास, मला फाशी द्या. आता ला मांचा येथील खऱ्या डॉन क्विक्झोटविषयी सांगायचे तर, तो येथे आपल्यासमोर आहे. कट्टा, विख्यात, शूर, शहाणा, प्रेमळ असा ला मांचा येथील डॉन क्विक्झोट हा अन्यायाचा कृतांत काळ, दुष्टांचा शासनकर्ता, अनाथांचा नाथ, विधवांचा आधार, तरुणींचा व कुमारिकांचा संहारकर्ता ('संभाळकर्ता' असे सँकोला म्हणायचे आहे.) आहे. टोबोसोची अद्वितीय डल्सीनिया हीच ज्याची एकमेव प्रिय हृदय–स्वामिनी आहे, असा तो येथे आहे–आणि त्याचा सेवक हा मी येथे आहे. आम्हा दोघाशिवाय बाकीचे सारे डॉन क्विक्झोट आणि सारे सँको पँझा हे तोतया आहेत– थापाडये आहेत."

डॉन ॲल्व्हॅरो म्हणाला, "सेंट जॅगोच्या समशेरीची शपथ घेऊन, हे भल्या मित्रा, मी तुझ्यावर विश्वास ठेवतो. आताच तू जे काही थोडे शब्द उच्चारलेस त्यांमध्ये, आता-पर्यंत दुसऱ्याकडून मी ऐकलेल्या साऱ्या विनोदापेक्षा, अधिक विनोद भरलेला आहे. त्या

ठोंब्या माणसाच्या पोटात त्याची सारी अक्कल भरलेली आहे असे दिसत होते. आपले पोट भरण्याशिवाय दुसरा काही विनोद त्याला माहीतच नव्हता. विनोद कळण्याला तो हरामखोर पात्रच नव्हता. डॉन क्विक्झोटसारख्या भल्या माणसाचा छळ करणारे मांत्रिक असतात यावर माझा विश्वास आहे. माझाही छळ करण्यासाठी त्यांनी एका दुष्ट माणसाला पाठविले होते. या सर्व प्रकरणाचा अर्थ काय, हे मला सांगता येत नाही, हे मी शपथ घेऊन सांगतो. टोलेडो येथे पोपच्या प्रतिनिधीचे घरी एका शस्त्रक्रियाविशारद डॉक्टराच्या हाती मी एका डॉन क्विक्झोटला सोडून आलो. पण त्याच्याहून अगदी भिन्न असलेला दुसरा डॉन क्विक्झोट येथे उगवला आहे." आमचे शिलेदारजी म्हणाले, "मी चांगला आहे असे प्रतिज्ञेवर सांगू शकत नाही, पण मी वाईट नाही एवढे सांगण्याचे धाडस करतो. आणि त्याचा पुरावा म्हणून मी हे खात्रीपूर्वक सांगतो की, माझ्या उभ्या आयुष्यात मी सॅरॅगोसा शहर कधीही पाहिलेले नाही. त्या शहरापासून मी इतका दूर आहे की, माझे नाव बळकावणारा माणूस त्या सामन्यात दाखल झालेला आहे हे कळताच मी त्या सामन्याजवळ जाण्याचे नाकारले. तो तोतया आहे अशी जगाची खात्री पटविण्याचा मी निश्चय केला. मी माझा मोहरा बार्सेलोनाकडे वळविला. सभ्यतेचे माहेरघर, पाहुण्यांचे तीर्थक्षेत्र, दुःखितांचे आश्रयस्थान, शूर पुरुषांचे मातृगृह, घायाळांचे संजीवन, सन्मैत्रीचे निवासस्थान आणि सौंदर्य व परिसर या बाबतीत सर्व जगातील अग्रगण्य नगर ते आहे. तिकडे जाताना माझ्यावर काही अरिष्टे कोसळली असली, तरी त्यामुळे माझा मनोनिग्रह वाढला आणि ते शहर आपण पाहिले या विचाराने माझे दुःख हलके झाले याचा मला आनंद वाटतो. अहो डॉन अॅल्व्हॅरो, कीर्तीने जो विभूषित झालेला आहे तो ला मांचा येथील डॉन क्विक्झोट मी आहे. माझे नाव बळकावणारा आणि माझ्या संकल्पांचा मान स्वतःकडे हिरावून घेणारा तो नीच माणूस खरा डॉन क्विक्झोट नव्हे. महाराज, आपण सभ्य गृहस्थ आहा. तेव्हा या गावातील मॅजिस्ट्रेटपुढे आपण माझ्या वतीने एक कैफियत देण्याची कृपा कराल अशी मला आशा आहे. ती म्हणजे आपण आपल्या साऱ्या आयुष्यात या दिवसापर्यंत, मला कधीही पाहिलेले नाही आणि दुसऱ्या खंडात उल्लेखिलेला डॉन क्विक्झोट मी नाही. तसेच आपल्याला पूर्वी माहीत असलेला माणूस हा माझा सेवक सँको पँझा नाही."

डॉन अॅल्व्हॅरो म्हणाला, "अगदी मनापासून मी हे करीन. एकाच वेळी दोन डॉन क्विक्झोट आणि दोन सँको पँझा–नावाने सारखे पण वर्तनात भिन्न पाहून मी बराचसा गोंधळून गेलो आहे. यावरून काय समजावे हे मला कळत नाही. मी जे पाहिले ते पाहिले नाही आणि माझ्या बाबतीत जे घडले ते घडले नाही असे मानण्याकडे माझा कल होत आहे." सँको म्हणाला, "वा, वा! खात्रीने हा काही तरी दुष्टपणाचा खेळ असला पाहिजे. टोबोसोची लेडी डल्सीनिया हिच्यावर जे चेटूक झाले तेच तुमच्यावरही झालेले दिसते. माझ्या पोटाच्या मागच्या बाजूवर मी तीन हजार आणि वर काही फटके मारून घेतल्यामुळे जशी डल्सीनिया जादूमुक्त झाली, तसेच आपण होणार असाल तर, मी

आपली सेवा मनोभावे करण्यास तयार आहे. विशेष म्हणजे त्यासाठी आपल्याला पैचाही खर्च येणार नाही." डॉन ॲल्व्हॅरो म्हणाला, "त्या फटक्यांचा अर्थ काय, हे मला कळत नाही." सँको म्हणाला, "ती एक कहाणीच आहे. पण एका मिनिटाची सूचना मिळताच ती सांगता येणार नाही. कारण ती लांबलचक आहे. पण सहप्रवाशी होण्याचे आपले भाग्य असेल तर आपल्याला याविषयी अधिक ऐकण्याची संधी मिळेल."

जेवणाची वेळ झाली. डॉन क्विक्झोट आणि डॉन ॲल्व्हॅरो एकत्र जेवले. त्या गावचा मेयर किंवा बेलिफ एका सरकारी अधिकाऱ्याबरोबर त्या खानावळीत आला. डॉन क्विक्झोट यांनी त्याच्याजवळ अशी इच्छा प्रदर्शित केली की, "येथे उपस्थित असलेले डॉन ॲल्व्हॅरो टार्फे हे एक कैफियत देण्यास तयार आहे, ती आपण घ्यावी. ती अशी येथे हजर असलेले डॉन क्विक्झोट यांची मला पूर्वी काहीच माहिती नव्हती. टोबॅफिलास येथील नागरिक ॲव्हेलॅनेडी याने लिहिलेल्या "ला मांचा येथील डॉन क्विक्झोटचा दुसरा खंड." या नावाच्या छापील इतिहासात ज्याचा उल्लेख केलेला मी पाहिला आहे, ते डॉन क्विक्झोट हे नव्हेत." सारांश, त्या अधिकाऱ्याने कबुलीजबाबाचा तक्ता काढला आणि तो भरला. डॉन क्विक्झोट व सँको यांच्या सर्व हेतूंना धरून माहिती भरण्यात आली. त्यामुळे ते दोघे फारच खूष झाले. दोन डॉन क्विक्झोट व दोन सँको-यांमधील वरकरणी भेद स्पष्ट करण्यास त्यांचे बोलणे आणि वागणे जणू काही पुरेसे नव्हते, म्हणूनच तो तक्ता भरला गेला.

त्यानंतर डॉन ॲलव्हॅरो व डॉन क्विक्झोट यांनी एकमेकांना खूप धन्यवाद दिले आणि एकमेकांची सेवा करण्याची पुष्कळ आश्वासनेही दिली. ला मांचा येथील आमचे शिलेदारजी त्यावेळी इतक्या चातुर्याने वागले की, आपली काही चूक झाली, अशी डॉन ॲलव्हॅरो याची खात्री पटली. 'येथे काही तरी जादूटोणा असला पाहिजे आणि म्हणूनच एकाच नावाचे आणि एकाच व्यवसायाचे पण अत्यंत भिन्न असलेले, दोन शिलेदार व दोन सेवक आपल्याला भेटले.' असे त्याच्या मनात आले.

संध्याकाळी त्यांनी तेथून प्रयाण केले. शहरापासून मैलभर दूर गेल्यावर, रस्त्याला दोन फाटे फुटले– एक डॉन क्विक्झोटच्या घरी जाणारा आणि दुसरा डॉन ॲल्व्हॅरो याला इष्ट स्थानी पोहोचविणारा. तेवढ्या अल्पावधीत डॉन क्विक्झोट यांनी त्याला आपल्या पराभवाची कहाणी सांगितली आणि डल्सीनियावरील जादू व तिच्यावरील मर्लिनने सांगितलेला तोडगा – हेही त्यांनी त्याला सांगितले. डॉन ॲल्व्हॅरोला ही सारी माहिती नवी व नवलाईची होती. त्याने डॉन क्विक्झोट आणि सँको यांना आलिंगन दिले आणि त्यांना त्यांच्या वाटेवर सोडून तो आपल्या वाटेने गेला.

डॉन क्विक्झोट यांनी ती रात्र वृक्षराजीमध्ये घालविली. सँकोला आपली शिक्षा पूर्ण करण्याची योग्य संधी द्यावी हा त्यांचा हेतु. त्या धूर्त व लबाड माणसाने आदल्या रात्रीप्रमाणेच आपली शिक्षा भोगली. झाडांच्या सालींनी फटके खाल्ले. सँकोने

आपल्या पाठीची इतकी काळजी घेतली की, तिच्यावर एखादी माशीसुद्धा विनासायास विश्रांती घेत राहिली असती.

ते सारे होत असताना त्याचा श्रांत मालक काटेकोरपणे फटक्यांची मोजदाद करीत होता. आदल्या रात्रीचे फटके जमेस धरले असता एकूण फटक्यांची संख्या तीन हजार एकोणतीस झाली. हा मानवी यज्ञ पाहण्यासाठी सूर्य नेहमीपेक्षा अधिक त्वरेने उदय पावला आणि त्यांना आपला प्रवास पुढे चालविण्यासाठी त्याने प्रकाश पाडला. प्रवास करीत असताना ते डॉन अल्व्हॅरोच्या चुकीची आणि आपल्या शहाणपणाची सविस्तर चर्चा करीत होते. मॅजिस्ट्रेटपुढे आपण संपूर्ण आणि अधिकृत असे प्रमाणपत्र तयार करून घेतले हा त्यांचा शहाणपणा.

तो सर्व दिवस आणि पुढील सर्व रात्र त्यांचा प्रवास चालू होता. त्यात सांगण्यासारखे काही घडले नाही. फक्त त्या रात्री सँकोने आपल्या फटक्यांच्या कामगिरीला शेवटचा हात घातला आणि त्यामुळे डॉन क्विक्झोट यांना अवर्णनीय आनंद झाला. आता आपली लेडी डल्सीनिया जादूमुक्त अवस्थेत आपल्याला दिसेल या आशेने ते येणाऱ्या दिवसाची वाट अत्यंत उत्सुकतेने पाहात होते. ते ज्या रस्त्याने गेले, त्या सर्व रस्त्यावर, जी जी स्त्री त्यांना दिसली ती टोबोसोची डल्सीनिया आहे की नाही हे पहाण्यासाठी ते त्या प्रत्येक स्त्रीकडे गेले. मर्लिनच्या वचनावर ते इतके ठामपणे विसंबून होते की, तसे होईल याविषयी त्यांना काडीमात्र शंका नव्हती.

अशा आशांनी आणि कल्पनांनी त्यांचे मन पूर्णपणे भारले गेले असताना ते एका टेकडीच्या माथ्यावर गेले. तेथून त्यांचे खेडे दिसत होते ते दृश्य पाहून सँकोला आपल्या नेत्रांचे पारणे फिटले असे वाटले. चटकन गुडघे टेकून तो ओरडला, " फार फार काळपर्यंत मी ज्याची वाट पाहिली ते हे माझे घर ! अरे घरा, आपले डोळे उघड आणि तुझ्याकडे परत आलेल्या तुझ्या बाळाला–सँको पँझाला–पहा. तो पैशाने नसला तरी फटक्यांनी पुरता लादलेला आहे. आपले बाहु पसर आणि आपला मुलगा डॉन क्विक्झोट याचेही स्वागत कर. दुसऱ्या लोकांचा त्याला वाईट अनुभव आला असला तरी त्याने स्वतःचा उद्धार केला आहे. कोणीही इच्छा करावी अशा प्रकारचा त्याचा हा विजय आहे. तसे त्याने स्वतःच म्हटले आहे. मला खूप फटके खावे लागले असले तरी त्या सौद्यात मी माझे सर्वस्व गमावले नाही. फटके खाऊन काही पैसा मी माझ्या खिशात आणला आहे."
डॉन क्विक्झोट म्हणाले," पुरे कर तुझा आगाऊपणा. आता आपण आपल्या जन्मभूमिमध्ये सभ्य प्रकारे प्रवेश करू या. तेथे आपण आपली कल्पनाशक्ती स्वैर सोडून आपल्या संकल्पित जीवनाचा नकाशा आखू या. " असे म्हणून ते दोघे टेकडीखाली आले आणि थेट आपल्या खेड्याकडे गेले.

▣ ▣

प्रकरण ७३

# डॉन क्विक्झोट आपल्या खेड्यात प्रवेश करीत असताना घडलेले अशुभ अपघात, त्याचप्रमाणे या संस्मरणीय इतिहासाला भूषविणारे आणि विशद करणारे दुसरे काही व्यवहार

सिड् हॅमेट सांगतात–ते दोघे जेव्हा खेड्यात प्रवेश करीत होते, तेव्हा शेजारच्या शेतात भांडणारी दोन लहान मुले डॉन क्विक्झोट यांना दिसली. त्यांपैकी एक मुलगा दुसऱ्यास म्हणत होता, " त्याबद्दल तू आपल्या डोक्याला शीण देऊ नकोस. तुझ्या शरीरात प्राण आहे तोपर्यन्त ती तुला कधीच दिसणार नाही. " हे ऐकून डॉन क्विक्झोट म्हणाले, " सँको, या मुलाचे शब्द ऐकलेस–' तुझ्या शरीरात प्राण आहे तोपर्यन्त ती तुला कधीच दिसणार नाही.–' " सँकोने उत्तर दिले, " असेल, तो मुलगा तसे म्हणाला असेल. पण त्याचा आपल्याशी काय संबंध ? " डॉन क्विक्झोटनी उत्तर दिले, " का नाही ? माझ्या बाबतीत ते शब्द लागू केले, तर त्यांचा स्वच्छ अर्थ असा होतो की, माझी डल्सीनिया मला कधीच दिसणार नाही. हे तुझ्या लक्षात येत नाही काय ? " सँको पुनः उत्तर देण्याच्या तयारीत होता, पण एका सशाचा पाठलाग करणाऱ्या शिकारी माणसांच्या व कुत्र्याच्या जोराच्या ओरडण्याने त्याच्या बोलण्यात अडथळा आला. तो ससा बावरून एकसारखा इकडे–तिकडे धावत होता आणि शेवटी तेथे येऊन तो डॅपलच्या पायांमध्ये आश्रयासाठी बसला. चटकन् सँकोने त्याला विनासायास पकडले आणि डॉन क्विक्झोट यांना तो नजराणा अर्पण केला. पण त्यावर खिन्न नजर टाकून त्यांनी तो नजराणा घेण्याचे नाकारले आणि ते मोठ्याने ओरडले, "अपशकुन ! अपशकुन ! ससा पळतो आहे, शिकारी–कुत्री त्याचा पाठलाग करीत आहे आणि डल्सीनिया कोठे दिसत नाही. " सँको म्हणाला, " तुम्ही एक विचित्रच माणूस आहा. हा बिचारा ससा म्हणजे डल्सीनिया आहे, त्याचा पाठलाग करणारी शिकारी कुत्री ही जादूगारांची कुत्री आहेत आणि त्या जादूगारांनी डल्सीनियाचे रूपांतर खेडवळ तरुणीत केले आहे, असे आपण का समजू नये ? ससा पळत आहे, मी त्याची शेपटी पकडीत आहे आणि आपल्या हाती हा चांगला सुंदर–भक्कम प्राणी देत आहे. आता तो तुमच्याजवळ आहे तर त्याचे कौतुक करा. या सर्व प्रकरणात मला काही अपाय किंवा दुर्दैव दिसत नाही हे मी खात्रीने सांगतो. "

यावेळेपर्यन्त ती भांडणारी दोन मुले ससा पहाण्यासाठी तेथे आली. सँकोने त्यांना त्यांच्या भांडणाचे कारण विचारले. ज्याने ते अभद्र शब्द उच्चारले होते, त्या मुलाने उत्तर दिले, "या माझ्या खेळगड्यापासून मी रातकिड्यांचा एक लहानसा पिंजरा हिसकावून घेतला होता. तो तो मला परत देत नाही." तेव्हा सँकोने आपल्या खिशात हात घातला आणि त्याच्या पिंजऱ्याची किंमत म्हणून त्या मुलाला तीन पेनिंगचे नाणे दिले. डॉन क्विक्झोट यांना तो पिंजरा देऊन सँको म्हणाला, "पहा, महाराज, दुर्दैवाची सारी लक्षणे फोल ठरली आहेत. ते रातकिडे तुमच्याच हातात आहेत. मी जरी रेम्याडोक्या असलो तरी हे खात्रीने सांगतो की, या किड्यांचे महत्त्व आपल्याला नाताळात पडणाऱ्या पावसापेक्षा मुळीच अधिक नाही. अशा मूर्खपणाच्या गोष्टींकडे लक्ष देऊ नका, असा उपदेश आमच्या परगण्यातील पाद्री साऱ्या विचारी कॅथॉलिकांना करीत असताना मी ऐकले आहे. त्यात मी काही चुकीने ऐकले नाही. प्रिय धनीसाहेब, खुद्द आपणही असेच सांगताना मी ऐकले आहे की, भविष्याच्या मूर्खपणाच्या गोष्टी ऐकून आपली डोकी शिणविणारे सारे ख्रिश्चन पुरेपुर वेडे असतात.—वेड्यापेक्षा ते थोडेही चांगले किंवा वाईट नसतात. म्हणून आता आपण या साऱ्या गोष्टी होत्या तशाच ठेवून, शक्य तितक्या जलदीने घरी जाऊ या."

यावेळी ते शिकारी तेथे आले आणि आपली शिकार मागू लागले. डॉन क्विक्झोट यांनी त्यांचा ससा त्यांना दिला. नंतर हे दोघे निघाले. गावात शिरताच त्यांना दिसले की, शेजारच्या लहानशा पटांगणात पाद्री व पंडित कॅरॅस्को प्रार्थना करीत आहेत. (याच वेळी जाता जाता हे सांगितले पाहिजे की, सँको पँझाने ज्वालांची चित्रे असलेला जो अंगरखा आपल्या अंगावर होता, तो त्याने आपल्या डॅपलच्या पाठीवर टाकला होता.) ज्या दिवशी रात्री आल्टिसिडोरा थडग्यातून उठली, त्यावेळी ड्यूकच्या घरी त्याने तो अंगरखा घातला होता. त्याचप्रमाणे तितक्याच समंजसपणाने त्याने त्या गाढवाच्या डोक्यावर पाद्र्याची टोपी घातली होती. त्यामुळे त्या गाढवाचे रूप इतके विचित्र आणि चमत्कारिक दिसत होते की, आतापर्यंत कोणतेही चतुष्पाद गाढव अशा वैभवाने नटले नसेल, असे म्हणता येईल.

आपल्या जुन्या मित्रांना पाद्री व पंडित यांनी चटकन ओळखले आणि डॉन क्विक्झोट यांचे बाहु पसरून स्वागत करण्यासाठी ते धावत गेले. डॉन क्विक्झोट घोड्यावरून खाली उतरले आणि त्यांना त्यांनी मिठी मारली. मुले काय ? तीक्ष्ण नजरेची असतात आणि त्यांच्या नजरेतून काहीही सुटत नाही. टोपी घातलेले गाढव पहाताच ती तेथे धावत गेली आणि घोळका करून उभी राहिली. ती एकमेकांना म्हणू लागली, "तिकडे पहा गड्यांनो, गॅफर सँको पँझाचे गाढव एखाद्या तरुणीप्रमाणे सुंदर दिसत आहे ! डॉन क्विक्झोटचे घोडे पूर्वीपेक्षा कृश झाले आहे." असे म्हणून ती मुले त्यांच्याभोवती फिरू लागली आणि आरोळ्या ठोकू लागली. साऱ्या गावभर ती त्यांच्याबरोबर होती. हे दोन पराक्रमी वीर, पाद्री व पंडित यांच्यासह, डॉन क्विक्झोट

यांच्या घराकडे चालले. वरी पोहोचताच त्यांच्या घरधनिणीने आणि पुतणीने त्यांचे स्वागत केले. त्यांच्या आगमनाची वार्ता त्यांना पूर्वीच कळली होती. सँकोची बायको, टेरेसा पँझा, ती बातमी कळताच अर्ध्या-उघड्या वेशात आणि :आपले केस कानावर भुरभुरत असतांना, आपल्या नवऱ्याला भेटण्यासाठी तेथे धावत आली. येताना तिने आपली मुलगी सँकिका हिला हाताने धरून फरफटत आणले. असे फरफटत जाणे त्या मुलीला आवडले नाही. आपला नवरा राज्यपालाच्या वैभवात किंचित उणा असलेला पाहून टेरेसा म्हणाली," कारभारी, याचा अर्थ काय ? जणु काही सारा प्रवास तुम्ही पायी केला आहे, आणि त्यामुळे तुमचे पाय थकले आहेत असे दिसत आहे. राज्यपालाऐवजी एखाद्या हिंस्र माश्यासारखे तुम्ही आला आहा." सँको म्हणाला, "चूप ! टेरेसा, जे जे चकाकते ते सारे सोने नसते आणि जो जो माणूस जन्मास येतो, त्याच्या तोंडात चांदीचा चमचा नसतो. प्रथम आपण घरी जाऊ या. नंतर मी तुला अजब गोष्टी सांगेन. मुद्याची गोष्ट मी आणली आहे. अगे जुन्या मैत्रिणी, मी पैसा आणला आहे-कोणावरही अन्याय न करता, मी तो प्रामाणिकपणे मिळविलेला आहे." टेरेसा उद्गारली, "अरे जुन्या सोबत्या, तू पैका आणला आहेस ? तेवढे मला पुरेसे आहे ! भल्या-बुऱ्या कोणत्याही मार्गाने तो तू मिळविला असलास तरी मला त्याची पर्वा नाही. तुझ्यापेक्षा चांगल्या लोकांनी यापूर्वी असेच केले आहे." याच वेळी सँकिका आपल्या बापाला बिलगली व बोलली, "माझ्यासाठी काय आणले आहे ? मे महिन्यात फुले दवबिंदूंची जशी वाट पहातात, तशी मी तुमची वाट पहात होते." मग सँको आपल्या झोपडीकडे निघाला. एका बाजूस त्याने डॅपलला लगाम धरून पुढे चालविले होते. तर दुसऱ्या बाजूस त्याच्या बायकोने त्याच्या हातात हात घातला होता. त्याची मुलगी त्याच्या पायजम्याच्या कमरपट्टयाला चिकटली होती. डॉन क्विक्झोट यांना त्यांच्या घरी सँकोने सोडले. पुतणी व घरधनीण या त्यांची काळजी घेऊ लागल्या आणि पाद्री वा पंडित त्यांच्या सोबतीस राहिले.

याच क्षणी डॉन क्विक्झोट यांनी त्या दोघांना एका बाजूस नेले आणि आपल्या पराभवाचा संक्षिप्त वृत्तांत, रतिमात्र उणा न करता, निवेदन केला आणि म्हटले, "आपल्या गावी मला एक वर्षभर डांबून पडण्याचे बंधन आहे आणि खऱ्या शिलेदारा-प्रमाणे ते बंधन काटेकोरपणे पाळण्याचे मी ठरविले आहे. तो काळ धनगराची सालस कामे करण्यात घालविण्याचा माझा इरादा आहे. म्हणून मी धनगरी जीवनास तत्काळ सुरुवात करणार आहे. मग मी प्रणयरम्य कल्पनांमध्ये रमून रानावनात रममाण होईन. तुमचे एखादे मोठ्या महत्त्वाचे काम आड येणार नसेल तर तुम्ही माझ्या संगतीत राहण्याची कृपा करावी. मी तुम्हाला इतक्या मेंढ्या देईन की, त्यामुळे मेंढपाळाचा धंदा करण्याच्या हक्कास तुम्ही पात्र व्हाल. एका प्रकारे मी तुम्हाला या उद्योगासाठी लायक बनविले आहे. साऱ्या जगात सापडणार नाहीत अशी धनगरी नावे मी तुम्हाला दिलेली आहेत." ती नावे जाणण्याची पाद्र्याने इच्छा व्यक्त केली. तेव्हा डॉन क्विक्झोट यांनी

त्याला सांगितले, " मी स्वतःला क्विक्झोटिस धनगर म्हणवून घेईन, पंडिताने कॅरस्कोन् धनगर म्हणवून घ्यावे, पाद्र्याने कुरिॲम्ब्रो मेंढपाळ आणि सँको पँझाने पॅन्सिनो धनगर म्हणवून घ्यावे. "

त्यांच्या वेडेपणाची ही नवी लहर पाहून ते आश्चर्याने स्तिमित झाले. पण यामुळे ते घरी राहतील आणि वर्षभरात शिलेदारीचे वेड त्यांच्या डोक्यातून निघून जाईल अशी आशा त्यांना वाटू लागली. म्हणून त्यांच्या धनगरी वेडात ते सामील झाले आणि त्यांच्या योजनेची प्रशंसा करून त्यात आपण सहभागी होण्याचे त्यांनीं मोकळ्या मनाने मान्य केले. सॅम्सन कॅरस्को म्हणाला, " आपण कल्पनातीत आनंदी जीवन घालवू. कारण तुम्हा सर्वांना माहीतच आहे की, मी एक अत्यंत सुप्रसिद्ध कवी आहे. म्हणून मी तेथे विपुल जानपद्गीते लिहीन. आपण दऱ्या–खोऱ्यातून संचार करीत असताना, प्रसंग येईल तेव्हा आपली करमणूक करण्यासाठी मी उच्च स्वराने काव्य–गायनही करीन; पण सभ्य गृहस्थहो, आपण एक गोष्ट विसरता कामा नये. ती म्हणजे आपण आपल्या गीतांमध्ये ज्या धनगर–कन्येचा गौरव करणार असू, तिचे नाव आपण आधी नक्की करणे अत्यंत अवश्य आहे. तसेच प्रेमिक धनगरांच्याप्रमाणे अशा धनगर–कन्यांची नावे प्रत्येक वृक्षावर ( मग त्यांची साल कितीही कठीण असो ) आपण कोरली–खोदली पाहिजेत, हे विसरता कामा नये. "

डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " तुमच्या म्हणण्यात पुष्कळ तथ्य आहे. मात्र कोणा काल्पनिक धनगर-कन्येचे नाव शोधण्याची तसदी मी घेण्याची गरज नाही. टोबोसोची अद्वितीय डल्सीनिया हिने मला केव्हाच बंदिवान केलेले आहे. ती या झऱ्यातील अप्सरा आहे, या कुरणांचे भूषण आहे, सौंदर्याचा फुलोरा आहे, शोभेचा तुरा आहे—थोडक्यात म्हणजे, अतिशयोक्तीने बोलणारा माणूस जी जी प्रशंसा करू शकेल, तिला ती पात्र आहे. " पाद्री म्हणाला, " हे सारे आम्हाला मान्य आहे पण अशा सर्वगुणसंपन्न प्रियकरिणीचा लाभ ज्यांना झाला नाही, अशा आम्ही लोकांनी खालच्या दर्जाची एखादी धनगरकन्या शोधून काढणे हे आमचे कर्तव्य आहे. ती सुस्वभावी असावी आणि प्रसंग पडेल तेव्हा प्रियकराशी तडजोड करणारी असावी. " कॅरस्कोने उत्तर दिले, " अशा मुली आपल्याला भरपूर मिळतील, असे मी खात्रीपूर्वक सांगतो. आणि कोणीही मिळाले नाही तरी ग्रंथात आपल्याला सापडतात तीच नावे आपण वापरू. ती म्हणजे फिलिस्, ॲमॅरिलिस्, डिएना, फ्लोरिंडा, गॅलाटिए, बेलिसार्डा आणि अशीच आणखी हजारो ! जी उघड्या बाजारात जाहीरपणे उच्चारता येतात ती नावे आपण विकत घेतली म्हणजे ती आपलीच झाली. शिवाय, जर माझ्या स्वामिनीचे ( ' धनगर–कन्ये 'चे असे मी म्हणावयास हवे ) नाव ॲन असेल तर मी तिला माझ्या कवितांमध्ये ॲनार्डा म्हणेन–फॅन्सिस असेल तर फॅन्सेनिया म्हणेन–आणि तिचे नाव ल्यूसी असेल तर लुसिंडा ही माझी धनगर–कन्यका होईल. आपल्या या भ्रातृ–संघात सँको पँझा येत असेल तर त्याने आपली बायको टेरेसा हिला

टेरेसॅनिया या नावाने अलंकृत करावे. " टेरेसाच्या नावाला त्याने दिलेले वळण पाहून डॉन क्विक्झोट यांना आपले हसू आवरेना. त्यांच्या स्तुत्य निश्चयाची प्रशंसा पाद्र्याने पुनः केली आणि असे आश्वासन दिले की, " माझ्या इतर उद्योगातून मला जेवढा वेळ मिळेल तेवढा सारा वेळ मी आपल्या संगतीत राहीन. " नंतर त्यांनी एकमेकांचे निरोप घेतले. डॉन क्विक्झोट यांच्या आरोग्याला आणि हिताला पोषक असा जो सल्ला त्यांना वाटला, तो त्यांनी त्यांना दिला.

पाद्री व पंडित निघून जाताच घरधनीण आणि पुतणी दोघीही डॉन क्विक्झोट-कडे आल्या. नेहमीच्या शिरस्त्याप्रमाणे त्या दोघी त्यांचा सारा संवाद ऐकत होत्या. पुतणी म्हणाली, " काका, आता काय करायचे ? तुमच्या डोक्यात कोणती नवी लहर आली आहे ? तुम्ही आपल्या घरी येऊन एखाद्या शांत नि भल्या सभ्य माणसाप्रमाणे स्वतःच्या घरी राहाल अशी आमची कल्पना होती. पण तुम्ही नवे नवे शोध लावण्या-साठी निघणार काय आणि लोकर गोळा करण्यासाठी मेंढ्यांमागे धावणार काय ? पण महाराज, आता तुम्ही काहीसे म्हातारे झाला आहा. धान्य इतके जुने झाले आहे की, त्याच्या पोळ्या करता येणार नाहीत. " घरधनीण म्हणाली, " अहो धनी, उघड्या शेतात उन्हाळ्यातील ताप आणि हिवाळ्यातील धुके महाराजांना कसे सहन होईल ? तेथे लांडग्यांच्या आरोळ्या ऐकू येणार ! छेः छेः ईश्वर आपल्यावर कृपा करो. महाराज, तो विचार आपण सोडून द्या अशी माझी प्रार्थना आहे. जी माणसे त्याच कुळात जन्मलेली–वाढलेली असतात आणि घोड्यासारखी दणकट असतात, त्यांनीच हे काम करणे योग्य. काय वाईट व्हायचे असेल ते होवो, तुम्ही मेंढपाळ होण्यापेक्षा पुनः शिलेदार होणे चांगले. मालक, माझा सल्ला ऐका. मी वेडी नाही की दारू प्यालेली नाही. माझी बुद्धी ताजीतवानी आहे. मी साऱ्या गोष्टीचा त्याग केला आहे. पन्नास वर्षांच्या आयुष्याचा भार मी माझ्या शिरावर वाहात आहे. मी सांगते ते ऐका—घरी राहा, आपले उद्योग पहा, चर्चमध्ये अधूनमधून जा, गरीबांचे कल्याण करा आणि तुमचे काही बरेवाईट व्हायचे असेल तर ते सारे माझ्यावर येऊ द्या. " डॉन क्विक्झोट म्हणाले, " भल्या मुलींनो, तुमची बडबड बंद करा. मी काय करावे हे मला चांगले माहीत आहे. मला बिछान्यावर जाण्यास मदत तेवढी करा म्हणजे पुरे. आता माझे चित्त स्वस्थ नाही. पण मी शिलेदार होतो की धनगर होतो, या विचाराने तुम्ही आपली माथी शिणवू नका. मी तुमची तरतूद केलेली आहे असे तुम्हाला खास आढळून येईल. " पुतणी आणि घरधनीण निःसंशय सुस्वभावी होत्या. त्यांनी त्यांचे कपडे उतरले, त्यांना बिछान्यावर निजविले, त्यांना काही खाऊ घातले आणि शक्य तितकी काळजी घेऊन त्यांची सेवा केली.

□ □

प्रकरण ७४

# डॉन क्विक्झोट आजारी कसे पडले, त्यांनी आपले मृत्युपत्र कसे केले, आणि ते कसे मेले?

सर्व मानवी वस्तु-विशेषत: मानवी जीवने-क्षणभंगुर असतात. त्यांचा प्रारंभ म्हणजे विनाशाकडे नेणाऱ्या पायऱ्या असतात. सर्वसामान्य मानवाच्या या भवितव्या-पासून डॉन क्विक्झोट मुळीच मुक्त नव्हते. त्यांना जेव्हा अजिबात कल्पना नव्हती तेव्हा मृत्यूने त्यांचे प्राण हिरावून नेले. त्यांच्या खिन्न विचारांचा परिणाम म्हणून असो किंवा ईश्वराने पूर्वीच नियोजित केल्यामुळे असो, त्यांना भयंकर तापाने गाठले आणि बिछान्या-वर सहा दिवस खिळवून ठेवले.

त्या सर्व काळात त्यांना भेटण्यासाठी त्यांचे सज्जन मित्र, पाद्री, पंडित व न्हावी वारंवार येत असत-आणि त्यांचा विश्वासू सेवक सँको पँझा हा तर त्यांच्या बिछान्यापासून कधीही हलत नसे.

त्या सर्वांनी असा अंदाज बांधला की, त्यांचे दुखणे त्यांच्या पराभवाच्या दुःखा-तून आणि डल्सीनियाला जादूमुक्त करण्याच्या बाबतीत झालेल्या निराशेतून उद्भवले असावे. म्हणून त्यांचे विचार दुसरीकडे वळविण्यासाठी त्यानी कोणतेही प्रयत्न करण्याचे सोडले नाही. पंडिताने त्यांना सांगितले, "धैर्य धरा आणि उठा. आपण आता धनगरी जीवन सुरू करू या. त्या दृष्टीने मी एक छोटेसे ग्रामीण गीतही रचले आहे. सॅनॅझॅरोच्या काव्यापेक्षा ते कमी दर्जाचे नाही. तसेच क्विन्टानार येथील एका धनगराकडून मी स्वतःच्या पैशाने दोन क्रूर कुत्री विकत आणली आहेत. त्यांचे काम मेंढ्यांच्या कळपावर पहारा ठेवणे. एका कुत्र्याचे नाव बार्सिनो असून दुसऱ्याचे बट्रॉन आहे." पण या सर्व बोलण्याचा डॉन क्विक्झोटवर काहीच परिणाम झाला नाही. त्यांची खिन्नता कायमच राहिली.

एका वैद्याला बोलविण्यात आले. त्याने त्यांची नाडी तपासली. ती त्याला फारशी चांगली वाटली नाही. तो म्हणाला, "यांचे शारीरिक आरोग्य धोक्यात असल्यामुळे त्यांच्या आत्मिक आरोग्यासाठी काही तरतूद केली पाहिजे." हे डॉन क्विक्झोट यांनी, जवळच्या इतर माणसांपेक्षा पुष्कळच शांततेने, ऐकून घेतले. त्यांची पुतणी, घर-धनीण आणि त्यांचा सेवक हे सारेजण ओक्साबोक्सी रडू लागले-जणू काही त्यांना धोंगडीवरच काढले आहे. केवळ खेदामुळे आणि त्रासामुळे त्यांचा अंत नवळ आला आहे असे वैद्याचे

मत पडले. डॉन क्विक्झोट यांनी अशी इच्छा प्रदर्शित केली की, 'मला विश्रांती घेण्याची गरज वाटत असल्यामुळे आपण सर्वांनी मला थोडा वेळ एकटे राहू द्यावे.' सारी माणसे निघून गेली. डॉन क्विक्झोट यांना सुमारे सहा तास गाढ झोप लागली. ती त्यांची काळ-झोप असावी अशी भीति घरधनीण व पुतणी यांना वाटली.

शेवटी ते जागे झाले आणि मोठ्या आवाजात म्हणाले, "सर्वशक्तिमान प्रभूला धन्यवाद असोत! त्याने माझ्यावर ही केवढी महान कृपा केली आहे! खरोखर त्याचे कृपा-प्रसाद अनंत आहेत. मानवाच्या पापापेक्षा ते संख्येने अधिक आहेत आणि मोठेही आहेत." आपल्या चुलत्याचे हे शब्द लक्षपूर्वक ऐकल्यानंतर पुतणीला वाटले, त्यांच्या नेहमीच्या बोलण्यात असतो, त्यापेक्षा या बोलण्यात अधिक शहाणपणा आहे. निदान ते आजारी पडल्यानंतर जे बोलले, त्यापेक्षा हे बोलणे अधिक शहाणपणाचे होते. तिने विचारले, "काका, आपण काय म्हणता? काही विशेष घडले आहे काय? आपण म्हणता ते कृपा-प्रसाद कोणते?"

त्यांनी उत्तर दिले, "माझे कितीही अन्याय झाले तरी प्रभूने माझ्यावर दयाच दाखविली आहे. माझी विवेकबुद्धी स्वच्छ आणि निर्मळ स्वरूपात मला पुनः प्राप्त झाली आहे. माझ्या बुद्धीवर, शिलेदारीच्या त्या निंद्य पुस्तकांच्या अखंड वाचनाने, अज्ञानाचा जो ढग आलेला होता, तो आता निघून गेलेला आहे. त्या पुस्तकातील मूर्खपणा नि आचरटपणा आत्ता मला कळत आहे. हा शोध मला फार उशीरा लागला याचेच मला दुःख वाटते. आता माझ्या आत्म्याची उन्नती करणारे आणि भविष्यकाळासाठी मला सिद्ध करणारे ग्रंथ वाचण्यास वेळ पाहिजे आहे. त्यामुळे पूर्वीच्या नुकसानीची भरपाई होईल. बाळे, माझा अंतकाळ जवळ आला आहे असे मला दिसते. माझ्या आयुष्यात मी मूर्ख माणसासारखा वागलो असलो तरी माझ्या मृत्यूचे वेळी मी शहाण्यासारखे वागावे अशी माझी इच्छा आहे. प्रिय बाळे, माझा भला मित्र पाद्री, पंडित कॅरॅस्को आणि न्हावी श्री. निकोलस यांना बोलावणे पाठव. कारण माझा कबुलीजबाब आणि माझे मृत्युपत्र तयार करण्याचा माझा इरादा आहे." त्यांना बोलावणे पाठविण्याची तसदी त्यांच्या पुतणीला घ्यावी लागली नाही. कारण, ते तिघेही त्याचवेळी तेथे आले. त्यांना पाहून डॉन क्विक्झोट म्हणाले, "माझ्या सन्मित्रांनो, तुम्हाला सांगण्यासारखी एक आनंदाची बातमी माझ्याजवळ आहे. यापुढे मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट नाही-अलोन्सो क्विक्सॅनो आहे. सारे जग ज्याला पूर्वी त्याच्या सद्वर्तनामुळे 'सज्जन' म्हणत असे, तो मी आहे. ॲमॅडिस डी गॉल याचा आणि त्याच्या सर्व पिढीचा मी वैरी आहे, असे मी आता जाहीर करतो. शिलेदारीच्या साऱ्या अभद्र कथांचा- प्रणयरम्य वर्णनांचा-मी तिटकारा करतो. त्या वाचण्यापासून कोणता धोका आहे याची मला खरी जाणीव झालेली आहे- तसेच माझ्या मागील सर्व मूर्खपणाच्या गोष्टींचीही जाणीव झालेली आहे. ईश्वराच्या कृपेने आणि माझ्या स्वतःच्या अनुभवाने मला त्यांची घृणा वाटत आहे." अशा प्रकारचे त्यांचे हे भाषण ऐकून त्यांचे तीन मित्र फार चकित झाले. काही तरी

वेडाची नवी लहर यांना झपाटून गेली असावी, असा निष्कर्ष त्यांनी काढला. सॅम्सन डॉन क्विक्झोट यांना म्हणाला, "अहो डॉन क्विक्झोट, आता काय ? या सर्वांचा उपयोग आता काय ? लेडी डल्सीनिया जादूमुक्त झाल्याची बातमी आम्हाला नुकतीच मिळाली आहे. आता आपण धनगर बनून गात गात हिंडायचे आणि राजपुत्रासारखे रहायचे, असा आमचा बेत चालला असता आपण वैराग्याच्या अवस्थेस जात आहा."

डॉन क्विक्झोट उत्तरले, "त्यासंबंधी आता काही बोलू नका अशी मी विनंती करतो. पूर्वीच्या साऱ्या मूर्खपणाचा उपयोग मी माझा पश्चात्ताप वाढविण्यासाठीच करीन. आतापर्यंत त्या मूर्खपणामुळे माझी हानी झालेली असली तरी ईश्वराच्या साह्याने तोच मूर्खपणा मृत्यु-समयी माझ्या उपयोगी पडेल. मृत्यू माझ्याकडे वेगाने धावत येत आहे असे मला दिसते. म्हणून सज्जनहो, आपण गंभीरपणे विचार करू या. माझा अंतःकाळचा कबुलीजबाब घेण्यासाठी एक धर्मगुरू आणि माझे मृत्युपत्र तयार करण्यासाठी एक कारकून मला पाहिजे आहे. अशा वेळी व्यर्थ बडबड करण्यात काही अर्थ नाही. मी माझ्या आत्म्याची काळजी घेतली पाहिजे. म्हणून, कृपा करून, त्या कारकुनाला बोलवा. तोपर्यंत पाद्रीबुवा माझा कबुलीजबाब तयार करतील."

डॉन क्विक्झोट यांचे हे शब्द ऐकून ते सर्वजण इतके आश्चर्यचकित झाले की, ते एकमेकाकडे पहात उभे राहिले. त्यांचा विवेक पुनः जागृत झाला की नाही याविषयी शंका घेण्यास जागा आहे असे त्यांना वाटले, पण तरीही त्यांच्यावर विश्वास ठेवल्याशिवाय त्यांना रहावेना. डॉन क्विक्झोट यांची बुद्धी एकाएकी परत आली हे पाहून त्यांना असे भय वाटले की, त्यांच्या मृत्यूची घडी जवळ आली आहे. त्यानंतर डॉन क्विक्झोट यांनी इतके शहाणपण, विवेक आणि निष्ठा व ईश्वरी इच्छेला शरण जाण्याची तयारी प्रगट केली की, शेवटी त्यांची अक्कल पूर्णपणे ठिकाणावर आल्याचे मानण्यास ते मुळीच कचरले नाहीत. नंतर पाद्र्याने सर्व मंडळींना खोलीबाहेर घालविले. फक्त तो व डॉन क्विक्झोट तेथे राहिले. मग डॉन क्विक्झोट यांनी आपल्या आयुष्यातील पापांची कबुली पाद्र्यापुढे दिली.

मध्यंतरी पंडित कारकुनाकडे धावत गेला आणि त्याने त्याला आपल्याबरोबर तत्काळ आणले. सँको पँझाला पंडिताने, त्याचा धनी किती आजारी आहे, हे सांगितले. त्याची पुतणी आणि घरधनीण अश्रू ढाळीत आहेत, हे पाहून सँकोने दुःखी चेहऱ्याने रडण्यास आरंभ केला. आजारी माणसाचा कबुलीजबाब ऐकून पाद्री बाहेर आला. त्याने सर्वांना सांगितले, "ॲलोन्सो क्विक्झॅनो हे सज्जन गृहस्थ आता आपल्या मृत्यूच्या जवळ गेलेले आहेत. तरी ते शुद्धीवर आहेत. म्हणून तुम्ही खोलीत जाणे चांगले. ते आता आपले मृत्युपत्र तयार करतील." ही दुःखाची बातमी ऐकून, घरधनिणीच्या, पुतणीच्या आणि भल्या सेवकाच्या सुजलेल्या डोळ्यांची दारे उघडली आणि त्यातून अश्रूंचे मोठे लोट वाहू लागले. त्यांच्या हृदयातून हजारो सुस्कारे निघू लागले. ॲलोन्सो क्विक्झॅनो म्हणा, किंवा ला मांचा येथील डॉन क्विक्झोट म्हणा, या आजारी माणसाचा

स्वभाव इतका चांगला होता आणि त्यांचे वर्तन इतके सुखदायक होते की, केवळ त्याच्या घरातील माणसांचेच नव्हे, तर त्यांना ओळखत असलेल्या प्रत्येक माणसाचे प्रेम त्याच्यावर बसले.

नंतर सर्व मंडळींबरोबर कारकून खोलीत गेला. मृत्युपत्राचा प्रास्ताविक भाग त्याने लिहून काढला. मृत्युपत्र करणाऱ्या डॉननी आपला आत्मा ईश्वर-चरणी वाहिला आणि आपला देह पृथ्वीस अर्पण केला. तशी रूढीच होती. नंतर त्यांनी पुढीलप्रमाणे कायदे-शीर भाषेत मृत्युपत्र सांगितले :—

कलम—१, माझ्या वेडेपणाच्या काळात मी ज्याला माझा सेवक नेमले, त्या सँको पँझाला मी त्याच्याजवळ जे काही द्रव्य असेल किंवा त्याच्या हाती माझे जे काही द्रव्य असेल ते मी वंशपरंपरेने देत आहे. आम्हा दोघामधील हिशेब अजून पुरे व्हावयाचे आहेत आणि त्याला किती पैसे मिळाले व ते कसे खर्च झाले याची तपासणी व्हावयाची आहे. तरीसुद्धा तो मला जे देणे असेल (ते अगदी थोडे असेल) ते सर्व माझी बिनशर्त देणगी म्हणून त्याने उपभोगावे, अशी माझी इच्छा आणि मर्जी आहे. त्या कामी त्याला कोणाचाही अडथळा किंवा त्रास होऊ नये. त्या द्रव्याने त्याचे पुष्कळ कल्याण होईल. मी वेडा असताना, माझ्या मध्यस्थीमुळे, त्याला एका बेटाचा राज्यपाल करण्यात आले होते. आता मी शुद्धीवर असताना, माझ्या अधिकारात असेल तर, त्याचा प्रामाणिकपणा आणि विश्वासूपणा लक्षात घेऊन, मी त्याला एका राज्याचा कारभार बहाल करीन." नंतर सँकोकडे वळून ते म्हणाले, "माझ्या मित्रा, मी तुला माझ्या चुकीच्या मार्गावर खेचून नेले आणि जगात पूर्वी शिलेदार होऊन गेले व अद्याप आहेत असे तुला पटविले, त्यामुळे माझ्याबरोबर तुलाही मूर्खपणाचा कलंक लागला, याबद्दल मला क्षमा कर."

एकसारखे अश्रु गाळीत सँको म्हणाला, "प्रिय धनीसाहेब, केवढे माझे दुर्दैव! या आजारात आपण मरू नका. माझा सल्ला ऐका आणि पुष्कळ वर्षे जगा. माणसाची सर्वात मूर्खपणाची कृती कोणती असेल तर ती म्हणजे, काही गाजावाजा न करता आपल्या शरीरातून आपले प्राण गुपचूप जाऊ देणे. डोक्यावर थप्पड मारली किंवा आतड्यावर लाथ मारली, तरी केवढा गवगवा होतो! तो न करता, फुंकरीने विझणाऱ्या मेणबत्तीप्रमाणे, गुपचुप मरून जाणे योग्य नव्हे. सुस्त पडून रहाणे लाजीरवाणे असते. आपण या दुःखाच्या खाईतून वर या आणि उठा. आपण पूर्वी ठरविल्याप्रमाणे, धनगराचा वेष करून, जेव्हा आपण रानावनात फिरत रहायचे, तेव्हा बिछान्यावर आपण कण्हत-कुंथत पडण्याची ही वेळ आहे काय? मला खात्रीने वाटते की, कोणत्या तरी झुडुपाच्या आड किंवा कुंपणाच्या मागे आपल्याला लेडी मॅडम डल्सीनिया सापडेल आणि त्यावेळी तिच्या अंगावर मंतरलेले कपडे असणार नाहीत. ती राणीप्रमाणे सुंदर दिसेल. परवा आपल्याला घोडयावरून ढकलण्यात आले आणि अंगावर ओरखडे निघाले, हे आपण आपल्या मनाला लावून घेतले असेल. पण तेवढेच कारण असेल तर

त्याचा दोष माझ्यावर टाका. रोझिनांटचे पट्टे मी घट्ट आवळले नाहीत हा माझा दोष होता असे तुम्ही म्हणा म्हणजे झाले. शिलेदारांना पदोपदी घोगिरावरून खाली यावे लागते असे वर्णन तुमच्या शिलेदारीच्या ग्रंथात वारंवार येते, हेही आपल्याला माहीत आहे. या जगात चढउतार असावयाचेच. आज जो खाली फेकला गेला, तो उद्या वर चढेल. ''

सॅम्पसन म्हणाला, " भल्या सँकोला या प्रकरणाची योग्य कल्पना आहे. " डॉन क्विक्झोट यांनी उत्तर दिले, " अरे सद्गृहस्था, मागल्या वर्षीच्या घरट्यात या वर्षीच्या पक्ष्यांचा शोध घेऊ नकोस. मी मूर्ख होतो पण आता शुद्धीवर आहे. एके काळी मी ला मांचा येथील डॉन क्विक्झोट होतो, पण पूर्वी सांगितल्याप्रमाणे, आता मी साधा ॲलोन्सो क्विक्झॅनो आहे. पूर्वी आपल्याला माझ्याविषयी जो आदर वाटत होता, तोच आता माझ्या शब्दातील कळकळीने आणि माझ्या पश्चात्तापाने आपल्याला पुनः वाटू लागेल अशी मला आशा आहे. कारकूनसाहेब, चला पुढे लिहा. ''

कलम—२, येथे हजर असलेली माझी पुतणी ॲंटोनिया क्विक्झॅनो हिला मी माझ्या सर्व जिंदगीची एकमेव वारस म्हणून नेमतो. माझी सर्व न्याय्य देणी दिल्यानंतर आणि या मृत्युपत्रातील देणग्या दिल्यानंतर उरलेल्या माझ्या सर्व जिंदगीची ती वारस होईल. माझ्या सामानसुमानातून आणि भाड्याकुंडयातून प्रथम माझ्या घरधनिणीला देणे असलेले भाडे द्यावे आणि त्याशिवाय वीस ड्यूकॅट तिला द्यावेत. त्या रकमेतून तिने आपल्या सुतकाचा खर्च करावा.

कलम—३, श्री. पाद्री आणि पंडित श्री. सॅम्सन कॅरॅस्को येथे हजर आहेत. त्यांना मी माझ्या या अखेरच्या मृत्युपत्राची अंमलबजावणी करण्यासाठी नेमत आहे

कलम—४, माझी अशी इच्छा आहे की, माझी पुतणी ॲन्टोनिया क्विक्झॅनो हिला जर लग्न करावेसे वाटले तर तिचे लग्न अशाच माणसाशी व्हावे की, ज्याने आपल्या सर्व आयुष्यात शिलेदारीचे एकही पुस्तक वाचले नाही असे, करून चौकशी केल्यानंतर, सिद्ध होईल. आणि जर त्याला तशा पुस्तकांची तोंडओळख आहे असे आढळून आले आणि त्याच्याशीच लग्न करण्याचा आग्रह जर तिने धरला, तर तिला माझे सर्व वारसा-हक्क गमावावे लागतील. तसे झाल्यास माझ्या जिंदगीची अंमलबजावणी करणाऱ्या लोकांना, आपल्याला योग्य वाटेल त्या पवित्र कार्यासाठी ती जिंदगी खर्च करण्याचा अधिकार राहील.

कलम—५, ' ला मांचा येथील डॉन क्विक्झोट यांच्या विजयाचा दुसरा खंड ' या नावाने सध्या अस्तित्वात असलेल्या ग्रंथाचा लेखक माझ्या मृत्युपत्राच्या व्यवस्थापकांना जर कधी काळी भेटला, तर त्यांनी माझ्या वतीने त्याची अंतःकरणपूर्वक क्षमा मागावी. कारण त्या ग्रंथात आचरटपणाचा तो गठ्ठा आहे, तो लिहिण्यास मी नकळत का होईना, कारण झालो आहे. असे लेखन त्याने जनतेसमोर मांडण्यास मी कारणीभूत झालो, हे माझ्या येथून जाणाऱ्या आत्म्यावर सर्वांत मोठे ओझे आहे. ''

मृत्युपत्र सांगण्याचे काम संपविल्याबरोबर त्यांना मूर्च्छा आली आणि त्यांनी बिछान्यावर आपले सर्व शरीर ताणून दिले. सारे लोक घाबरले आणि त्यांच्या मदतीस धावले. शेवटी ते शुद्धीवर आले. त्यांनी मृत्युपत्र केल्यानंतर पुढे तीन दिवस ते जिवंत होते. त्या काळात अशीच मूर्च्छा त्यांना बहुधा तासातासाने येत होती.

सारे कुटुंब दुःखात आणि गोंधळात बुडून गेले. तरीही पुतणी जेवत होती, घरधनीण दारू पीत होती आणि साऱ्यांचे दुःख वाहून जात होते. सँको पँझाला स्वतःचे मोठे कौतुक वाटले. चांगला वारसा मिळणार या विचारात किंवा एखादी जिंदगी मिळणार या आशेमध्ये विलक्षण मौज असते. मित्राच्या मृत्यूमुळे माणसांना एरवी जे दुःख वाटले असते, ते अशा विचारामुळे व आशेमुळे नष्ट होते–निदान कमी होते–हे केवढे आश्चर्य !

सारांश, डॉन क्विक्झोटचा अंतकाळ आला. भल्या ख्रिश्चनांनी मृत्यूची जी पूर्व-तयारी करावयाची असते, ती त्यांनी आधीच केली होती. शिलेदारीच्या ग्रंथाविषयीचा आपला तिटकारा त्यांनी, नवनवे व भारदस्त युक्तिवाद करून, व्यक्त केला. त्यांच्याजवळ असलेल्या कारकुनाने निषेधपूर्वक सांगितले की, " शिलेदारीच्या कोणत्याही पुस्तकात, डॉन क्विक्झोटप्रमाणे आपल्या बिछान्यात शांतपणे आणि भल्या ख्रिश्चनाप्रमाणे, कोणी शिलेदार मरण पावल्याचे मी कधी वाचले नाही. "

शेवटी, आपल्या मित्रांच्या शोकप्रवाहात आणि अश्रुप्रवाहात त्यांचा देह पंचमहा-भूतात विलीन झाला–स्पष्टपणे सांगायचे म्हणजे, ते मरण पावले. ते पाहून पाद्रयाने कारकुनाला असे प्रमाणपत्र द्यावयास सांगितले की, नेहमी ' सज्जन ' म्हणून ओळखले जाणारे आणि कधीकधी ' ला मांचा येथील डॉन क्विक्झोट ' या नावाने प्रसिद्ध असलेले ॲलोन्सो क्विक्झॅनो या जीवनातून दुसऱ्या जीवनात गेले आणि त्यांना नैसर्गिक मृत्यु आला. अशी इच्छा पाद्र्याने व्यक्त केली याचे कारण असे की, सिड् हॅमेट बेनेनगेली यांच्याशिवाय दुसऱ्या कोणी लेखकाने त्यांना मृतावस्थेतून उठवून त्यांच्या कल्पित विजयाचे अनंत इतिहास लिहिण्याचे सोंग करू नये.

अशा प्रकारे कल्पनासंपन्न सज्जन ' ला मांचा येथील डॉन क्विक्झोट ' हे मरण पावले. त्यांच्या जन्मभूमीचे नाव स्पष्टपणे सांगणे योग्य होणार नाही, असे सिड हॅमेट यांना वाटले. नाही तर त्यांचे जन्मस्थान असल्याचा मान आपल्याकडे आहे असा दावा ला मांचामधील सारी शहरे व खेडी करू लागतील. होमरसाठी ग्रीसमधील सात शहरांनी असा दावा केला होता. सँकोने, पुतणीने आणि घरधनिणीने किती शोक केला हे आम्ही गाळतो. त्याचप्रमाणे त्यांच्या थडग्यावर बसविण्यासाठी जे कैक समाधि–लेख तयार झाले होते, तेही आम्ही गाळतो. फक्त पंडित कॅरॅस्कोने त्यांच्या थडग्यावर जो समाधिलेख लिहिला तेवढाच पुढे देतो :—

## डॉन क्विक्झोट यांचा समाधिलेख

" येथे ज्या कुलीन वीराचा देह पडला आहे तो इतका शूर होता की,
अमर कीर्ती हीच त्याची चिंता होती, शेवटच्या श्वासापर्यंत,
आणि त्यामुळेच त्याने मृत्यूवर विजय मिळविला. दर घटकेला त्याची
मुद्रा भय पसरीत होती. जुलमाचे नियंत्रण करण्याचा त्याचा
यत्न होता आणि पापलोकाची एकत्रित शक्तिदेखील त्याच्या
महान आत्म्याचे दमन करू शकणार नाही की त्याला डरवूं
शकणार नाही। त्याच्या विस्मयकारक जीवनाने जग
चकित झाले तसे त्याच्या मृत्यूने जगाला फसवले,
कारण जर तो वेड्या माणसासारखा जगला असेल, तर
निदान शहाण्या माणसासारखा मेला. "

येथे सुज्ञ सिड हॅमेट आपल्या लेखणीला उद्देशून म्हणतो, " हे माझ्या कोमल कलमा, तुझे डोके नीट केले असेल वा नसेल, पण मी तुला माझे विचार सांगण्यास धजत नाही. मी तुला ज्या आसनावर पितळेच्या तारेवर लोंबकळत ठेवले आहे, तेथेच तू रहा. तुझी निंदा करण्यासाठी चढेल व दुष्ट इतिहासकारांनी तुला तेथून खाली ओढीपर्यंत तू तेथे युगानुयुगे रहा. पण जर ते आपले जबरदस्त हात तुझ्यावर टाकू लागतील तर तू त्यांना खबरदारीचा इशारा दे आणि शक्य तितक्या त्यांच्याच भाषेने त्यांना बजावून सांग की,

चालते व्हा रे बदमाशांनो सारेजण
अशा कुठल्या कामासाठी मला इथे ठेवलेले नाही.
मला विटाळू नका, तर फासावर टांगून घ्या
—आणि देव राजाला बचावो !

कारण महान क्विक्झोट माझ्यासाठीच जन्मास आले होते आणि मीच एकटा त्यांच्यासाठी जन्मास आलो आहे. कृती करणे हे त्यांचे काम आणि त्या नोंदणे हे माझे काम. आम्ही दोघे एकमेकांच्या कार्यास पूरक होतो. पण एकमेकापासून दूर गेल्यानंतर आम्ही कोणीच नाही. टोर्डेसिलासच्या त्या तोतया कारकुंड्याने आपल्या फटकळ आणि गोंधळ घालणाऱ्या लेखणीने माझ्या अत्यंत पराक्रमी शिलेदाराच्या कृत्यावर उगाच हल्ला चढविला. त्या प्रयत्नाचा भार सोसण्यास त्याचे खांदे असमर्थ आहेत. त्याच्या गोठलेल्या प्रतिभेपेक्षा ते कार्य वरच्या दर्जाचे होते.

"आणि हे वाचका, तू जर कधीकाळी त्यांना विस्मृतीतून बाहेर काढून ओळखलेस, तर माझी तुला विनंती आहे की, डॉन क्विक्झोट यांची थकली–भागलेली हाडे ज्या मातीत झाकलेली आहेत, तेथेच ती पडू देत. मृत्यू झाला असतानाही

जुन्या स्टाईलमध्ये त्यांचे प्रदर्शन करू नका. आता जगात तिसऱ्यांदा त्यांनी संचार करण्याचा संभव नाही. अशा अवस्थेत ते ज्या तळघरात स्वस्थ पहुडले आहेत, तेथून त्यांना उकरून काढण्याचे पाप करू नका. त्यांनी पूर्वी ज्या दोन मोहिमा केल्या, त्या या दोन खंडांचे विषय आहेत. या देशात व अन्य राज्यांतही त्यांची सार्वत्रिक प्रशंसा झाली. त्यामुळे कोणाही शिलेदाराने पराक्रम करण्याचे सोंग घेतले, तर त्याची चेष्टाच होईल. असे तू केलेस म्हणजे खिश्चनाचे कर्तव्य पार पाडल्यासारखे होईल. ते कर्तव्य म्हणजे, जो आपले अनिष्ट इच्छितो, त्याचे कल्याण करणे. माझ्यासंबंधी म्हणाल तर, शिलेदारीच्या कल्पित व मूर्खपणाच्या गोष्टींना, जनतेच्या तिटकाऱ्याचा विषय, मी प्रथम बनविले, यामुळे मला फार आनंद वाटतो. त्या कथा आता विसरल्या जात आहेत आणि थोड्याच काळात त्या पूर्णपणे गळून पडतील व पुनः कधी उद्भवणार नाहीत, याविषयी मला कांडीमात्र शंका नाही. रामराम ! ! ”

समाप्त